# पुरवणी प्रस्तावना.

( सन १७९८ जून ते १७९९ फेब्रुवारीअखेर. )

दहाव्या भागाच्या अखेरच्या दोन प्रकरणांत समाविष्ट करण्याजोगीं आणखी पुष्कळ पत्रें नवीन मिळालीं आहेत, तीं कालानुक्रमानें आधीं छापून नंतर पुढचें प्रकरण छापावयास सुरुवात करावयाची आहे. या नवीन पत्रांचा संदर्भ समजण्यास निराळी सविस्तर प्रस्तावना देण्याचें कारण नाहीं. तें कार्य त्या त्या प्रकरणांच्या प्रस्तावना पूर्वी लिहिल्या गेल्या आहेत त्यांतरून होण्याजोगें आहे. मात्र कमीज्यास्ती तपशील या पत्रांतून आढळतो तेवढ्यापुरतें निराळें टिप्पण आम्ही येथें देतों. हें टिप्पण "सातारकर महाराजांचा दंगा" व "परशुरामभाऊंची शेवटची स्वारी" या प्रकरणाची पुरवणी प्रस्तावना समजावी. ज्या गोष्टींचा ज्या पृष्ठांतील मजकुराशीं संबंध येतो तीं तीं पृष्ठें आम्ही येथें नमूद करीत जाऊं.

पृ. ५४२२ अमृतरावावर शिंद्याच्या पलटणांचा हल्ला.—ता. २५ जून रोजीं शिंद्याच्या पलटणांनीं संगमाजवळ नदी उतरून पलीकडे काशीराव होळकराचा गोट उतरला होता त्याजवरून जाऊन निःशंकपणें अमृतरावाच्या गोटावर तोफा सुरू केल्या आणि हल्ला करून गोट लुटला. होळकर आपलें बाजारबुणगे आवरून फौज तयार करून स्वस्थ तमाशा पहात अंतरावर उभे राहिले होते. अमृतरावाचा सबंध गोट लुटला गेला तसा त्यांबरोबर प्रतिनिधीचें पथक चाकरीस होतें त्याचीही पुष्कळ नासधूस झाली. त्या गर्दीत अमृतरावाची स्त्री व पुत्र विनायकराव नाप पळून पाषाणास गेलीं. अमृतराव मागें हटून विठ्ठलवाडीवर गेले तों बायाकडील पठाण व शेणवी व मराठे सरदार सज्ज होऊन त्यांच्या मदतीस आले. परंतु त्या दिवशीं अखेरपर्यंत पलटणांवर हल्ला करण्याचा लाग त्यांस साधला नाहीं. सूर्यास्त झाल्यावर पलटणें निघून गेलीं. दुसऱ्या दिवशीं शिंद्याचीं पलटणें पुन्हा नदीपर्यंत चालून आलीं. परंतु या खेपेस बाया व अमृतराव यांची फौज पलीकडे लढाईच्या तयारीनेंच उभी होती. सायंकाळपर्यंत गोळागोळी होऊन पलटणें माघारीं गेलीं. ता. २७ च्या रात्रीस बायांच्या फौजेनें येऊन शिंद्याच्या छावणीवर बाणांची सरबत्ती केली. रात्र अंधारी, बाण कोणीकडून येतात हें नीट कळेना, सबब

शिंयाचे गोलंदाज चारी दिशांनी तोफांचा भडिमार करीत सुटले! त्यांपैकीं एक दोन गोळ्यांचा प्रसाद भवानी पेठेंत मानाजी फाकडे उतरले होते त्यांस प्राप्त होऊन त्यांचीं चार दोन माणसें जायां झालीं. पेशव्यांच्या तोफा फाकड्याजवळच होत्या व त्यांचे गोलंदाज तोंडे शिलकावून तयारच होते. त्यांनीं तत्काळ दोन चार गोळे शिंयाच्या छावणीवर टाकिले. मग तिकडून शहरावर गोळे येण्याचें बंद झालें. रात्रौ बायांच्या फौजेनें येऊन काळोखांतून बाण मारावे, त्यास उलट जबाब म्हणून शिंयानी तोफा मारून आपण हुषार आहों असें दर्शवावें, हा क्रम पुढें कित्येक दिवस चालला होता. अमृतरावांस शिंयांचा अतिशय संताप आला होता. त्यांच्या लष्कराच्या डेरेराहुट्या लुटल्या गेल्या हें कळतांच बाजीरावसाहेबांनी त्याजकडे नवीन सामान पाठविलें; परंतु त्याचा स्वीकार न करतां दोनतीन दिवस ते तसेच पावसांत उघडे राहिले होते!

पृ० ५५९६ पेशव्यांची भेट—सदर पृष्ठावर विठ्ठलराव पांडुरंग पटवर्धन यांची व पेशव्यांची भेट छ० २४ मोहरमी झाली असा उल्लेख आला आहे. त्या भेटीचा वृत्तांत विठ्ठलराव यांनीं नं. ४४७३ च्या पत्रांत वर्णिला आहे तो बराच मनोरंजक आहे. उतारा लांबलचक असल्यामुळें येथें दिला नाहीं वाचकानीं मूळ पत्रच वाचून पहावें.

पृ. ५४३३ करवीरच्या महाराजांवर मारकरी—या वर्षी बत्तीसशिराळ्याच्या मुक्कामीं नागपंचमीच्या दिवशीं परशुरामभाऊंनी महाराजांवर मारकरी घातल्याची हास्यास्पद गोष्ट कोल्हापूरच्या एका मिरास बखरींत लिहिलेली आहे, ती लिहिणाऱ्याच्या द्वेषबुद्धीची द्योतक होय. ही कल्पना त्या लेखकाला कशावरून सुचली हें आजपर्यंत आम्हांस ठाऊक नसल्यामुळें महाराजांवर मार झाल्याची गोष्टच मुळीं अथपासून इतिपर्यंत खोटी असावी असें आम्ही समजत होतों. परंतु वस्तुतः तसा प्रकार नाहीं. सर्पाचा आभास उत्पन्न होण्यास रज्जु अथवा जलधारा अथवा कमळाचा देंठ अशी कांही तरी वस्तु मुळाशीं असावी लागते तोच नमुना येथेंही घडलेला आहे हें वाचकांस नं. ४४८२ च्या पत्रावरून कळून येईल. तें पत्र मिरजकरांचा वकील तेथें त्या दिवशीं हजर होता त्यानें त्याच तारखेस लिहिलेलें आहे. त्यांतलें तात्पर्य थोडक्यांत असें आहे कीं, महाराजानीं गुलाबखान नांवाचा एक रोहिला जमादार चाकरीस ठेविला होता त्याचा पगार तुंबला होता. रोहिल्यानें पगार चुकता करण्याविषयीं पुन्हा पुन्हा जिकीर केली असतांही महाराजानीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. नाग-

पंचमीच्या दिवशी बत्तीसशिराळ्याच्या मुक्कामीं ते पालखींत बसून गोटांतून गांवांत जात असतां गुलाबखानानें येऊन आपला पगार देण्याविषयीं सक्तीचा तगादा केला. तरी त्याही प्रसंगी त्याची हेटाळणीच झाली. तेव्हां त्या माथेफिरू परदेशी शिपायानें संतापून तरवार उपसली व चालून येऊन महाराजांच्या पालखीवर वार टाकिला. कापशीकरांच्या घराण्यांतले बळवंतराव घोरपडे त्यावेळीं महाराजांशी बोलत पालखीबरोबर चालत होते. त्यानीं त्या रोहिल्यावर तत्काळ झडप घातली. त्या दोघांची झोंबी जुंपली असतां भोंवतालच्या लोकांनीं रोहिल्यास ठार केलें. याप्रमाणें ही हकीगत आहे. असले प्रसंग पूर्वीच्या काळांत घडून येणें मोठेंसें दुर्घट नव्हतें. तेव्हांची सरकारें दरिद्री व अव्यवस्थित असत. त्यांनीं आरब रोहिले पठाण रजपूत वगैरे माथेफिरू, परदेशी कडवे शिपाई चाकरीस ठेवण्याचा प्रघात पाडला होता. त्या लोकांचा पगार वेळच्या वेळीं चुकता झाला नाहीं म्हणजे ते मारामारीवर येत व खुनापर्यंतसुद्धां असल्या कटकटींची मजल जाई, हें ऐ० ले० संग्रहाच्या वाचकांस तरी नवीन सांगावयास नको ! तर असल्या या नेहमीं घडणाऱ्या प्रसंगाचा काडीमात्र पुरावा नसतां एकदम परशुरामभाऊंच्या नांवाशी जर कोणी संबंध जोडील तर त्यावरून काय सिद्ध होईल ? त्यानें भाऊसाहेबांच्या शुद्ध चरित्रास कलंक न लागतां एवढें मात्र सिद्ध होईल कीं द्वेषानें जळणाऱ्या या लेखकास जळीं स्थळीं जिकडे तिकडे परशुरामभाऊ दिसत होता !

पृ० ५४२५ सातारा काबीज होतो—किल्ल्यावरच्या दोन दोनशें लोकांनीं खालीं उतरावें, रास्त्यानीं त्यांचा पगार चुकता करून त्यांस थांबवून ठेवावें, आणि आपले दोनशें लोक किल्ल्यावर चढवावे. ते महाराजांनीं बिनतकरार वर घेतले तर रास्त्यांनीं उतरलेल्या लोकांस हत्यारेंसुद्धां सोडून द्यावें. नसें न झाल्यास त्यांचा पैका व हत्यारें हिसकून घेऊन त्यांस कैदेंत ठेवावें. याप्रमाणें उभयपक्षीं करार ठरून क्रमाक्रमानें महाराजांचें पंधराशें माणूस खालीं उतरलें आणि रास्त्यांचें तितकें माणूस किल्ल्यावर चढलें.

पृ० ५४२६ रहिमतपुरचें ठाणें—या ठाण्यात पूर्वीपासून पटवर्धनांचा अंमल होता. परशुरामभाऊ कैदेंत पडले त्या गर्दींत मानाजी फाकड्यानें रहिमतपूर बळकाविलें तें अजून त्याजकडेच राहिलें होतें. भाऊ सातार्‍याहून तासगांवाकडे निघाले तेव्हां रहिमतपुरास पुन्हा अंमल बसविण्याकरितां त्यानीं आपले तृतीय पुत्र महादेवराव दाजी यांस पाठविलें त्यांच्या

फौजेनें पेठ लुटून ठाण्यास वेढा घातला. आंत फांकड्याचा कारभारी पाडु-रंगपंत म्हणून होता तो पांचचारशें आरब बाळगून होता. त्यानें दोन अडीच प्रहर लढाई केली. इकडचें तिकडचें शेंपन्नास माणूस ठार व जखमी झाल्यावर पांडुरंगपंतानें कौल घेऊन ठाणें हवालीं केलें. "यास अडकावून ठेवावें. सोडूं नये, सोडिल्यास या प्रांतीं याची दहशत भारी असल्यामुळें हा रहिमतपूरचें ठाणें नांदूं देणार नाहीं;" असें पुष्कळ लोक भाऊंस सांगत होते. परंतु त्यास कौल देऊन आपण बाहेर काढिले त्या अर्थी आतां विश्वासघात करितां येत नाहीं; असें बोलून भाऊनी त्यास जाऊं दिलें. पुढें पांडुरंगपतानें रहिमतपुरास बराच उपद्रव दिला. कण्हेरखेडास फाकड्याची पागा होती तेथें राहून तो रहिमतपुरावर चालून येण्याचा वारंवार धाक घाली व त्यामुळें तेथील थाणी उदमी व रयत नेहमीं अस्वस्थ असत. रहिमतपुराचा हा ग्रंथ मानाजी-फाकड्यानी पढें बराच लांबविला. तें ठाणें आपणास पुन्हा मिळावें म्हणून ते बाजीरावसाहेबांजवळ धरणें देऊन उपोषित बसले श्रीमंतांस त्यांचें मागणें कबूल करवेना आणि त्यांची भीडही मोडवेना! शेवटीं मानाजीबावांची समजूत पाडण्याकरिता श्रीमंतांनी शक्कल काढिली की, इंडी व तांबें हे महाल घोरपडे याजकडे सरंजामांत चालत आहेत ते त्यांजकडून काढून फांकड्यांस द्यावे. तो बूट बाहेर पडतांच समस्त मराठे सरंजामी बिथरले. "आज मुधोळ-करांचा सरंजाम काढून फांकड्यास देतां, उद्या आमचेही सरंजाम घेऊन त्याला किंवा दुसऱ्या कोणाला द्याल. अशी तमची मिजाज कायम नाहीं त्या-पक्षीं आम्ही तुमची चाकरी करीत नाहीं. आजच आम्हास विदा द्या, आम्हीं वाटेल तिकडे निघून जाऊं" याप्रमाणें सरंजामी बोलूं लागले. तेव्हा श्रीमं-तांचें बोलणें अर्धांनच थकलें व फांकड्यांचा रुसवा कायम राहिला.

पृ० ५५५४- ५५५५ सुरापुरावर स्वारी—सुरापुराच्या मोहि-मेवर भाऊनीं रामचंद्रपंत आपांची योजना केली तेव्हां आपा तास-गांवास नव्हते. ते अलीकडे दोन मजलीं मायर्णाच्या आसपास फौजेसह मुक्काम करून होते. भाऊंचा हुकूम येतांच ते सप्टेंबरांतच कूच करून मंगळवेढें बाजूस टाकून बरडोल परगण्याच्या सरहद्दीनें सुरापुराकडे गेले. आपले द्वितीय पुत्र हरीपंतबाबा यांस पांचशें स्वारांनिशी रास्त्यांच्या कुमके-करितां साताऱ्यास रवाना करून परशुरामभाऊ आक्टोबरांत तासगांवाहून निघून विजापूर बागलकोटावरून सुरापुराकडे गेले. पुढच्या महिन्यांत मिरज-करांची फौज तयार करून चिंतामणराव पांडुरंग मिरजेहून निघाले तेही

भाऊंच्या फौजेस जाऊन मिळाले. मिरजकरांच्या फौजेपैकीं एक टोळी या वेळीं साताऱ्यास हरीपंत बाबांकडे पाठविण्यांत आली होती.

पृ० ५५७२ रास्ते व प्रतिनिधि—सातारकर महाराजांचा बंदोबस्त झाल्यावर त्यांचे साथी करवीरकर यांच्या मुलखावर रास्ते व प्रतिनिधि यांच्या फौजांनीं स्वारी केली, आणि बत्तीसशिराळ्याची पेठ लुटून जाळून त्या ठाण्यास शह बसविला; व आणखीही गांवोगांव पुष्कळ लुटालूट केली. परंतु करवीरकरानी पुणें दरबारात कारवाई चालवून पेशव्यांकडून रास्ते व प्रतिनिधि यांस ताकीद आणविली कीं, आमचा हुकूम नसतां तुम्ही करवीर राज्यावर स्वारी करण्याचें कारण काय ? तुम्ही आपापल्या ठिकाणीं परत निघून यावें. ती ताकीद येतांच त्या फौजा परत निघून सातारा व कऱ्हाड येथें येऊन राहिल्या.

पृ० ५५६५ गोखले व राजाज्ञा—सावनुरांत धोंडोपंत गोखले होते. व बाहेर करवीरकरांची फौज घेऊन रत्नाकरपंत राजाज्ञा राहिले होते. महिना दीड महिना त्या दोघांचें युद्ध सुरू होतें. त्या अवधींत लहान मोठी दहावीस झुंजें झालीं, परंतु कोणी कोणास हार गेलें नाही. त्या झुजांची हकीगत चालू प्रकरणांतील पुष्कळ पत्रांतून आली आहे. अक्टोबरच्या तिसऱ्या तारखेस सावनुराजवळ कारडगी येथें शेवटची लढाई फार मोठी झाली तींत राजाज्ञा यांचा पूर्ण पराजय झाला. त्या युद्धाचीं बातमीपत्रें ठिकठिकाणाहून आलेलीं पंचवीस तीस मिळालीं. त्यांतलींच थोडीं निवडून येथें छापिलीं आहेत.

पृ० ५५५५ सांपत्तिक स्थिति—संसारखर्च चालविण्याकरितां घरचें सोनें रुपें गहाण टाकून भाऊंच्या मुलानें अठ्ठेचाळीस हजार रुपये कर्ज काढिलें तें फेडण्याचें अवसान नसल्यामुळें भाऊनी गहाण पडलेलें सोनें रुपें विकून कर्ज फेडलें, ही गोष्ट पूर्वी नमूद केलीच आहे. भाऊंचे प्रतिस्पर्धी करवीरकर महाराज यानीं दोन तीन वर्षे सारा दक्षिणमहाराष्ट्र लुटून पालथा घातला आणि अगणित द्रव्य मिळविलें, यावरून ते खूब गबर झाले असतील अशी जर कोणाची समजूत असेल तर ती अगदीं चुकीची होय ! नुसत्या पराक्रमाच्याच नव्हे, तर दारिद्र्याच्या बाबतींतसुद्धां परशुरामभाऊंस ते महाराज हार जाणार नव्हते ! हा प्रकार पुढें मिरजकरांचा वकील नारो हरि करंदीकर याच्या पत्रांतील उतारा देत आहों त्यावरून कळेल.

" कऱ्हाडाकडे हुजूरची स्वारी गेली ( त्या ) समयीं वाड्यांतील अंबाबाईचे दागिने गहाण ठेवून ऐवज घेतला होता. त्यास नवरात्राचे उत्साहात

देवींचे दागिने सोडविले पाहिजेत व दसऱ्यास कापड पाहिजे, तेव्हां चिकोडी, मनोळी व गोकाक व राजाज्ञांचे चिरंजीव मिळोन सत्तर हजारांची वर्गत घातली. पैकीं राजश्री निंबाजी यादव याजकडे कापड पन्नास हजारांचें करार केलें व वीस हजार रुपये देऊन देवींचे दागिने सोडविले. करवीरकर पेठकरी यांजवळून तूर्त पंधरा हजार रुपये घेतले. शिराळेकडे व राजाज्ञांकडे खर्चास पाठवावयास पाहिजे, तेव्हां रुप्याचे दागिने, घागरी व तबकें व पराता व तांब्ये वगैरे दागिने झाडून निंबाजी यादव याचे विद्यमानें गहाण ठेविले, आणि कर्जाऊ ऐवज घेऊन कांहीं शिराळ्यांकडे पांच हजार व राजाज्ञांकडे दहा हजार तूर्त पाठविले."

पृ० ५५६६—भाऊ व करवीरकर यांत समेटाची बोलवा—गोखल्यानी. राजाज्ञांचा पराजय केल्यावर आपली बाजू सांवरून धरण्याकरितां महाराज नोव्हेंबरांत करवीराहून पुन्हा स्वारीस निघाले. निघण्यापूर्वी भाऊंशीं समेट करण्याची थोडी खटपट त्यांनीं करून पाहिली. त्यांच्या बोलावण्यावरून भाऊंनी आपले फडणीस बाबा काळे यांस शिरोळास पाठविलें. तेथें करवीर-चे मुत्सद्दी येऊन भवति न भवति झाली. अखेरीस बाबा काळे यांनीं बत्तीस कलमांची याद लिहून दिली. "भूधरगड किल्ला व चिकोडी, अकीवाट आणि शिरोळ ही ठाणीं त्यांतील ऐवज व चीजवस्त वगैरे जें कांहीं घेतलें असेल त्यासुद्धां परत द्यावी, आणि गोकाक, मनोळी, यादवाड व सदलगें हीं ठाणीं तुम्हीं घेऊन लुटलीं ती सर्व लूट परत द्यावी. शिवाय तासगांवचा वाडा तुम्हीं जाळिला त्याचें नुकसान भरून द्यावें," हे मुद्दे या यादींत मुख्य होते. करवीरकरांस ही याद अमान्य झाल्यामुळें समेटाचें बोलणें रहित झालें.

पृ० ५५७१ ब्राह्मणांची दुर्दशा—करवीरकरांच्या मोहिमांतून इतर रयतेबरोबर ब्राह्मणांचीही पराकाष्ठेची दैना झाल्याचीं उदाहरणें हमेशा आढळतात. पान्हाळपूरच्या ब्राह्मणांबद्दलचा मजकूर दहाव्या भागांत आलाच आहे. त्यांतलाच हा आणखी एक मासला पहा—"सुणदळी ( गांव ) चे बंद ब्राह्मण कुळकर्णी वगैरे पंधरा वीस असामी व रयत शंभरपर्यंत वस्त्रविरहित लष्करांत बरोबर पहाऱ्यांत ठेविले आहेत. गाडदी ओझीं डोकीवर देऊन चालवितात राजाज्ञा ब्राह्मणांस एक वेळ भोजनास घालितात !"

पृ० ५५८० पठाणानी नाशीक लुटलें—या लुटालुटींत यशवंतराव शिवाजी व बाळाजी कृष्ण वगैरे बायांचे सरदार सामील होते व त्यानीं अनेक क्रूरकर्मे करून दुर्लौकिक संपादिला होता. पुढें पंढरपूर, मंगळवेढें,

कासेगांव वगैरे बाजूस या सरदारांच्या स्वाऱ्या संचारार्थ निघाल्या तेव्हां त्यांनीं पूर्वी मिळविलेला कुलौकिक वृद्धिंगत केला !

पृ० ५५७० येलबर्ग्याचा वेढा — येलबर्ग हें मोंगलांचें ठाणें असून तेथील किल्लेदार खर्ड्याच्या लढाईंत पराक्रम करणाऱ्या आसदअली-खानाचा भाचा होता. त्याजवळ सात आठशें निवडक पायदळ व दोनशें-स्वार होते. ठाण्यांत आसदअलीखानाची चारशें घोडीं होती. सभोंवती खंदक नव्हता, पण तटबंदी बळकट व बारा हात उंच होती आणि तिला पन्नास पाऊणशें बुरूज होते. किल्लेदारानें लष्करचीं उंटें घोडीं व गुरें लुटून नेलीं, माणसें मारिलीं, व वाटा बंद पाडिल्या. शिवाय खंडणीच्या बाबतींत तो मग-रूरीचे जाबसाल बोलूं लागला. सबब भाऊंनी ठाण्यास वेढा घालून त्या किल्लेदारास ताळ्यावर आणिलें.

पृ० ५५७२–७३ चतुरसिंगाचा रास्त्यांच्या फौजेवर छापा—मागें सांगितल्याप्रमाणें रास्ते व प्रतिनिधि शिगळ्याहून परत आल्यावर सातारकर महाराजांचा भाऊ चतुरसिंग यानें बंड फारच फैलावलें. तो करवीरकरांच्या आश्रयानें बत्तीसशिराळें येथें राहून साताराप्रांतीं नहमीं धामधम करीत असे. बाजीरावसाहेबांनीं कबूल केल्याप्रमाणें नीरा व वारणा यांमधला मुलूख सातार-कर महाराजांच्या हवाली करावा हा त्याचा आग्रह होता. साताऱ्याच्या दंग्याचा मुख्य प्रवर्तक तोच होता. त्याचा माधवराव रास्त्यांवर दांत फार होता. खुद्द त्याची म्हणण्याजोगी अशी सात आठशें स्वारांची टोळीच त्याजवळ होती. परंतु त्याचे ते लोक शूर व जिवास जीव देणारे विश्वासू होते; आणि तो स्वतः मोठा कर्तृत्वाचा हिम्मतबाज सरदार होता. करवीरकरांची कुमक त्यास वारंवार मिळत असे. त्यांच्याच मदतीनें त्यानें शिगळ्याहून साताऱ्या-पर्यंत पल्ला मारून ता० ६ जानेवारी रोजी रास्त्यांच्या फौजेवर छापा घालून तिची दाणादाण केली. तो प्रकार असा—

“ राजश्री चत्रसिंग भोसले दोन हजार फौज व पाचशें पायदळानिशी बत्तीसशिराळ्याहून निघोन सडे आले ते मंदवारीं मौजे चरेगांव येथें मुक्का-मास राहिले. काल रविवारीं तेथून निघोन मौजे पालीवरून दोन टोळ्या केल्या. रास्ते यांचा मुक्काम मौजे कोडवली नजीक पवई येथें होता. तेथें त्यांज-वर एक टोळी आली. एक जकातवाडीचे मार्गानें बाजारपेठेवर आली. रास्ते यांचे फौजेची काल सायंकाळच्या चार घटका दिवसास गोळागोळी होऊन रास्ते यांचा मोड जाला. तोफा टाकोन रास्ते यांची फौज पळोन लिंबावर

रातोरात गेली. श्री॥ राजश्री बाबासाहेबही पळोन रात्री मौजे पाडळी येथें आले होते, ते रातोरात निघोन वाईचे सुमारें गेले. चतरसिंग फौजसुद्धां शहरांत गेले. गडबड भारी जाली आहे. श्री॥ राजश्री माधवरावजी रास्ते आगोदरच वाईस गेले आहेत."

आपल्या फौजेची अशी दुर्दशा झालेली ऐकतांच माधवराव रास्ते वाईहून तातडीनें निघून साताऱ्यास आले तों चतुरसिंग तेथून निसटून शिराळ्याकडे परत गेला. खुद्द रास्ते व हरीपंतबाबा पटवर्धन यांनीं त्याचा पाठलाग केला व प्रतिनिधींची कऱ्हाडास फौज होती तीही त्याच्या पाठीस लागली होती. परंतु तो कोणासच सांपडला नाहीं. पुढें या चतुरसिंगानें साताराप्रांतीं फारच दंगाधोपा केला. त्याच्या दंग्याचा बीमोड करावा म्हणून रास्त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केले. परंतु ते सिद्धीस जाईनात. कारण बाजीरावसाहेब त्यांस अधिक फौज चाकरीस ठेवूं देईनात आणि चतुरसिंगाचा आसरा मोडण्यासाठीं शिराळ्याचें ठाणें काबीज करावें तर तेंही करूं देईनात! चतुरसिंगाच्या लहान सान टोळ्यांच्या रास्त्यांनीं वारंवार फन्ना पाडिला तरी त्यास करवीरकरांची चांगली कुमक असल्यामुळें त्याची धामधूम न मोडतां उलट पुष्कळ वेळां त्याचा लाग चांगलाच साधत गेला!

चतुरसिंग गांवोगांव खंडण्या घेत मार्च महिन्याच्या २७ व्या तारखेस देवरआष्टें येथें आला, व गावकरांजवळ खंडणी मागूं लागला. रास्त्याचे साडेतीनशें स्वार तेथून जवळच ४।५ कोसांवर एका गांवीं येऊन राहिले होते हें गांवकरांस माहीत होतें. गांवांतील एक प्रतिष्ठित भटजी व गांवचा कुळकर्णी यांनी रातोरात जाऊन रास्त्यांचे स्वार सूर्योदयापूर्वी चतुरसिंगावर छापा घालावयास आणिले. परंतु आपणापेक्षां चतुरसिंग जबरदस्त असून सावध आहे हें छापा घालणाऱ्यांच्या लक्षांत येऊन ते पोबारा करण्याचा विचार करूं लागले! तों चतुरसिंगानें एकदम चालून घेतलें तेव्हां ते पळूं लागले. तों वाटेंत खिंड लागली त्यामुळें त्यांस जलदीनें पळवेना! चतुरसिंगानें त्यांची बहुतेक घोडीं पाडून घेऊन त्यांची वाताहत केली. छाप्याच्या शिष्टाईस गेलेले भटजी त्याच गर्दीत त्यास सांपडले. मग काय विचारावें? त्यानें भटजीस तसदी देऊन त्यांजपासून पांच हजार रुपये उकळले व गांवकरांपासून दहा हजार रुपये खंड घेऊन शिवाय त्यांचा गांवही लुटला!

परंतु चतुरसिंगाचा हा उत्कर्ष फार वेळ टिकला नाहीं. त्याच्या पारिपत्यासाठीं स्वतः माधवराव रास्ते दोन तीन हजार फौज घेऊन जवळच आले

होते. त्यांनीं बातमी राखून न्हावीच्या घाटाखालीं वाठार येथें ता० २ एप्रिल रोजीं त्याशीं गांठ घातली व त्याचा पराजय करून त्याची सर्वच फौज लुटून फस्त केली. स्वतः चतुरसिंग मोठ्या आयासानें जीव बचावून शिराळ्यास परत गेला. त्या दिवसापासून त्याचा उपद्रव कित्येक महिने तरी बराच शांत झाला.

पृ० ५५७३-७४ टिपूवर स्वारी—करवीरच्या महाराजांचें सामर्थ्य बेताबाताचेंच होतें तरी आपलें महत्त्व वाढविण्याची संधि आली असतां ते ती केव्हांही व्यर्थ घालवीत नसत. सन १७९९ च्या प्रारंभीं इंग्रजांचे वकील पुण्यास येऊन पेशव्यांजवळ वाटाघाट करूं लागले कीं, पूर्वीच्या तहांत ठरल्याप्रमाणें तुम्ही. आम्ही व मोंगल मिळून टिपूवर स्वारी करावी. त्या संधींत महाराजाना पेशवे व इंग्रज यांसीं बोलणें लाविलें कीं, आम्ही या मसलतींत सामील होतों व तुमच्या कुमकेस फौज देतों. टिपूकडून मुलूख व खंडणी मिळेल तिचे वांटणीदार जसे तुम्ही तिघे तसे आम्ही चौथे !

पृ० ५५८१ काळे व थत्ते यांस कैद—सदरहू पृष्ठावर गोविंदराव काळे व शिवरामपंत थत्ते यांस पेशव्यानीं कैद केल्याचें लिहिलें आहे. त्या ठिकाणीं कैद केल्याची जागा व तारीख या दोनी बाबतींत चूक झाली आहे. पेशव्यानीं त्या दोघांस ता० १४ जानेवारी ( स० १७९९ ) दिवशीं विश्रामबागेंत कैद केलें, अशी तेथें दुरुस्ती पाहिजे. यासंबंधें मिरजकरांच्या वकिलाचें ता० १५ जानेवारीचें पत्र या प्रकरणांत छापिलें आहे तें पाहावें. तो वकील आपल्या धन्यास विश्रामबागेची माहिती देतो ती अशी—

" विश्रामबाग कोठें आहे हें वडिलांचें ऐकण्यांत नसेल. तरी शेषोपंत भिरडीकर यांचे उत्तरेकडील अंगें राजश्री हरीपंत तात्यांचा बाग होता—अजमासें क्षेत्र दीड बिघा आहे—तोच बाग श्रीमंतानीं घेऊन त्याचें नांव विश्रामबाग ठेविलें आहे. आठ चार दिवशीं स्वारी तेथें जात असती. नहराचें पाणी तेथें नेणार. पश्चिमेकडील आगखी जागा व उत्तरेकडील ( जागा ) बागांत घेणार असा विचार आहे. "

पुढच्या वर्षीं श्रीमंतानीं तेथें " दौलतखाना " म्हणजे राजवाडा बांधण्यास सुरुवात केली तोच विश्रामबागेचा वाडा होय.

पृ० ५५८३ करवीरकरांच्या दंग्याचा फैलावा—परशुरामभाऊ कर्नाटकांत गुंतलेसें पाहून करवीरकरांच्या फौजा मनोळीची बारी सोडून

अलीकडे आल्या व पटवर्धनांचे व रास्त्याचे यादवाड शहापूर गोकाक अथणी विजापूर वगैरे महाल लुटून ओस पाडीत सुटल्या. तेव्हा त्यांचा प्रतीकार करण्यासाठी भाऊनी थोडाबहुत यत्न केला. त्यांच्या उत्तेजनावरून अंकलीचे महादजी शितोळे व त्यांचे आप्त निपाणीचे शिदोजीराव निंबाळकर या दोघानीं हजार स्वार व हजार पायदळ मिळवून करवीरच्या राज्यांत दंगा आरंभिला. भाऊनी आपल्या लष्करांतून एक हजार पेंढारी पाठविले तेही अंकलीस राहून त्या दंग्यांत सामील झाले. भाऊंच्या लष्करापैकीं पांच चार हजार स्वार घेऊन यादवाडकर विठ्ठलराव पटवर्धन आले ते यादवाड तालुक्यांत येऊन राहिले. शितोळे व निंबाळकर यांस यादवाडकराकडून नेहमीं कुमक होत असे. परंतु इतकेंही होऊन शितोळे वगैरे सरदारांस करवीरकरांचा उपद्रव थांबवितां आला नाहीं.

प० ५५८४ कौतुक वाटण्याजोग्या गोष्टी—या प्रकरणांत डुकराची गोष्ट आली आहे ती पराकाष्ठेचें आश्चर्य वाटण्याजोगीच आहे. ती पंढरपूर येथें घडली असून तिचा वृत्तांत मंगळवेढ्याचे मामलेदार कृष्णराव मेघश्याम पटवर्धन यानीं मिरजेस लिहून पाठविला आहे तो असा—

"श्रीक्षेत्र पंढरपुरी कौतुकार्थ आश्चर्याची गोष्ट जाली आहे. ते सर्वत्र लोकानीं आपले दृष्टीनें पाहून आले. क्षेत्रीं वडरांचीं घरें आहेत त्याणी डुकरें बाळगिलीं आहेत. त्यांतून एक धाकटें दोन तीन महिन्यांचें डुकराचें पिलूं मार्गशीर्ष शुद्ध तृतीया सोमवारीं आपले कळपांतून निघोन चंद्रभागेत येऊन स्नान करून पुंडलीकाच्या देवळाभोंवत्या प्रदक्षिणा करावयास लागलें. तीं क्षेत्रस्थ लोकानीं पाहून त्यास धुडावून दिलें. त्यास धुडावल्यानें तें डुकर जाईना. बळेंच धरून डुकरांच्या कळपांत लावून दिल्याही तेथें जाईना! तेथून पळोन येऊन मागती देवळाभोंवत्या प्रदक्षिणा करूं लागलें. अन्न दूध लोकानीं पुढें ठेविल्यासही खाईना. प्रदक्षिणाच करावयाचा छंद. असे चार रोज प्रदक्षिणा केली. पांचवे रोजीं डुक्कर मृत्यु पावलें. उपरांत पुंडलीकाचे पुढें व वाळवंटीत क्षेत्रस्थ लोकानीं समारंभ करून पुरून टाकिलें. वडिलांस वर्तमान कळावें यास्तव लिहिलें आहे. स्त्रीजात डुकरी होता. ती अहिल्या बाई असा दृष्टांत जाला म्हणतात."

गोष्ट अद्भुत असून खरी घडलेली आहे यांत संशय नाहीं. कारण नीरा नरसिंगपूर, पुणें व खुद्द पंढरपूर येथून आलेल्या त्या वेळच्या पत्रांतून

ती नमूद झालेली आहे. पण या गोष्टींत अहिल्याबाईचें नांव आलें आहे तें कांहीं लोकांस मानवेल तर पुष्कळांस मानवणार नाहीं. ज्यांस तें मानवणार नाहीं त्यांचा अभिप्राय असा पडेल कीं, अहिल्याबाईचा पुण्यपराक्रम मोक्षसाधक असल्यामुळें तिला पुनर्जन्म प्राप्त होणें हेंच मुळीं संभवत नाहीं. मग सूकरासारख्या नीच योनींत जन्म पावण्याची गोष्ट बोलावयासच नको !

---

नं. ४४५९ ( पौष व० ८ शके १७१८–२० जाने० १७९७. )

राजश्री गंगाधररावजी गोसावी यांसी.

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव शिंदे. दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे. विशेष. कसबे तासगांव वगैरे राजश्री परशुरामपंत भाऊ यांजकडील फुटगांव सरंजामी आहेत त्यांची जप्ती राजश्री सखाराम घाटगे सर्जाराव यांजकडे सांगितली आहे. तरी हे भाऊकडील सरंजामी गांवांचा बंदोबस्त करितील. आपणाकडून येविशीं दिगर जाबसाल नसावा. रवाना छ० २१ रजब. बहुत काय लिहिणें लोभ असावा हे विनंती.

मोर्तब सुद.

नं. ४४६० श्री. ( २६ जाने० १७९८. )

पे॥ छ० १४ साबान. समान तिसैन. माघ.

विनंती सेवक बाबराव शिवाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान माघ शुद्ध॥ ९ पावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीक्षेत्रीं पंढरपुरीं माघ शु॥ सप्तमीस राजश्री सखाराम घाटगे यांजकडील स्वार व प्यादे सायंकाळीं क्षेत्रीं येऊन जप्ती केली. पुढें उपद्रव दोन चार स्थळांस करणार म्हणोन वदंता आहे. विदित होय. आज्ञा होईल त्याप्रमाणें करीन. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४६१ श्रीगजानन. ( ज्येष्ठ शु० १४–२८ मे. )

पे ॥ छ० २० जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. ज्येष्ट.

विज्ञापना. तागायत छ० ११ जिल्हेज. वडिलांविशींचें बोलणें रास्ते

---

१ हें व पुढच्या नंबरचें पत्र ही मागें योग्य स्थळीं छापावयाचीं राहिलीं तीं येथें छापिलीं.

बोलतात म्हणोन अफवा आहे. वृद्ध संकर्षण आले असें असतां अल्प आयासें कार्य होईल असें वाटतें. मग दैवयोग न कळे. येथील यजमानसाहेब दक्षिणेकडील खिडकींत सरकारचे वाड्याकडे तोंड करून बसले होते. तेथें श्रीमंतानीं दिवाणखाना बांधिला वैद्यखाना मोडून. तेंही त्या खिडकींत येऊन बसले. नजरानजर जाहल्यावर यजमानानीं उठोन नमस्कार केला. साहेबानीं उभे राहून नमस्कार घेतला. यजमान किंचित् उभे होते याजकरितां साहेबानीं सांगून हुजऱ्याबरोबर पाठविलें कीं नमस्कार तुमचा पावला. उभे राहूं नये, बसावें, असें सांगून पाठविलें. × × × कंपू बायांकडेस आहे निखालस असें म्हणतात. कळावें हे विज्ञापना.

नं. ४४६२　　( ज्येष्ठ व० ८—६ जून. )

विठ्ठलराव पांडुरंग यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र. पै ॥ छ० २० जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. —

" इकडील वर्तमान तर श्री ॥ राजश्री विनायकराव बापू व सौ ॥ वहिनीबाईसाहेब ऐसीं काल रात्रौ सुमुहूर्तें वाड्यांत आलीं. दौलतराव शिंदे यांजकडे स्वारांपैकीं कोणी राहिले नाहींत. झाडून फौज बायांकडे गेली.

---

१ परशुराममाऊ केदेंत होते त्यांच्या सुटकेविषयीं. २ बलरामाच्या 'संकर्षण' या नांवानें त्याचें दुसरें नांव 'बल' हें सूचित आहे. आणि 'बल' हें नांव सादृश्यानें ज्यांस लावतां येईल असे त्यावेळीं प्रसिद्ध पुरुष दोन होते. एक बाळाजीपंत नाना फडणीस आणि दुसरे बाळोबा तात्या पागनीस. त्यांत मानानें नानाफडणीस मोठे असल्यामुळें ते 'वृद्ध संकर्षण' ठरले. नाना सुटून आले असतां भाऊंची मुक्तता सुलभ होईल असा भाव लिहिणाऱ्याचा दिसतो. बाळोबा तात्या नानांपेक्षां वयानें मोठे होते, भाऊंची व त्यांची मैत्री होती, शिंदे बायांचे बंड शांत करण्याकरितां शिंदे बाळोबास केदेंतून सोडणार अशी बोलवा होती, या गोष्टींवरून 'वृद्ध संकर्षण' ही पदवी येथें बाळोबातात्यास लाविलेली आहे असेंही म्हणतां येईल पुढें पुष्कळ पत्रांतून संकर्षण हें सांकेतिक नांव बाळोबातात्यांस दिलेलें वाचकांच्या पहाण्यांत येईल. ३ विठ्ठलराव पांडुरंग पटवर्धन. ४ दाक्षिणेकडील खिडकींत सरकारचे वाड्याकडे तोंड करून बसले होते=सरकारचे वाड्याच्या दक्षिणेकडील खिडकीकडे तोंड करून बसले होते. पटवर्धनांचा ( सांगलीकरांचा ) वाडा शनिवार वाड्याच्या दक्षिणेस आहे. ५ बाजीरावसाहेब. ६ शिंद्याच्या पलटणांचा कंपू बायांस सामील झाला आहे. ७ कारकून बाळाजी गणेश जोशी हिंगणीकर याचें पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

पंधरा अठरा हजार तिकडे जमेंत दिसत आहे. कंपूचे सरदारांस जवाहीर दिलें शिंद्यानीं. त्यास कोणी म्हणतात कीं, तलबेंत दिलें, कोणी म्हणतात कीं बहुमान दिलें. असें म्हणतात. एकूण घाशीराम याचे तळ्यापासून कात्रजेपावेतों उतरला आहे. शिंद्याकडे निखालस आहे किंवा नाहीं हें न कळे. लोकवार्ता कंपूचे सरदारांचें लक्ष बायांकडेस पक्केपणानें आहे ऐसेंही बोलतात. लोहगडावर दोन पलटणें व तोफा शिंदे यांजकडील गेल्या होत्या त्या किल्लेकरांनीं लढाई देऊन तोफा पाडाव करून नेल्या. लग्नाचें लवकरच व्हावेंसें म्हणत आहेत. सामानाची तयारी जाहली. राजश्री केसोपंत काळे भीमातीराहून रास्ते यांजकडे आले होते. आज येऊन गेले. "

नं. ४४६३ श्री ( १० जून. )

पै॥ छ. २७ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन.

सेवेसी गोपाळ अनंत व बाबाजी विश्वनाथ. सा ॥ नमस्कार विज्ञापना तागायत जेष्ट व ॥ ११ रविवासर पावेतों यथास्थित असे. विशेष. मंदवारीं सायंकाळीं येथें आलों. वडिलांस आमांश होऊन दोन चार दिवस वाखा जाला होता. हल्लीं स्वस्थ आहे. शरीर फार अशक्त. त्यांत वीस पंचवीस वेळ शौचाचा उपद्रव दोन दिवस जाला. तिसरे दिवसापासून कमी निम्मे पहिल्या दिवसास जातात. प्रस्तुत दिवसेंदिवस कमीच जातात. ईश्वरें कृपा केली आहे. चिंता नाहीं. वरकड पुरवणी पत्रावरून विदित होईल. आतांच शिंदे यांचे लष्कराची बातमी आली जे, राजश्री दौलतराव यांची फौज व पलटणें माघारीं गोटास गेलीं. पाठीवर बायांकडील फौज आहे. बायांकडील फौज शिंद्यांच्या छावणीसमीपच उतरली आहे. उद्ईक प्रातःकाळीं लढाई होणार असें बोलतात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४६४ श्रीगजानन. ( ज्येष्ठ व० १३–१२ जून. )

पै॥ छ. २६ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. ज्येष्ठ.

विज्ञापना. श्री ॥ राजश्री अमृतरावसाहेब व मुशाफरखान बायांसुद्धा बोरघाट चढून राजेवाडीचे सुमारास मुक्काम जाहला. छ० २२ रोजीं हंगामा सुरू जाला. शिंद्याकडील तोफांची मारागिरी बहुत जाहली. नंतर शिंद्याकडील

१ पगारबटवड्यांत २ कोण उतरला आहे ! पलटणांचा कं ! ३ लोहगड नानाफडणीसांचा किल्ला. ४ चिमाजी आपाचें लग्न ५ पत्र मांडवगणाहून मिरजेस बाळासाहेबांस. ६ परशुरामभाऊंस. ७ कारकून बाळाजीपंत जोशी याचें पत्र पुण्याहून मिरजेस.

लोक माघारे येऊन लोणीस उतरले. येणेप्रमाणें बाजारी अफवा ऐकींव लिहिली आहे. सेवेशी विदित होय हे विज्ञापना.

नं. ४४६५ ( ज्येष्ठ व. १३–१२ जून. )

विठ्ठलराव पांडुरंग यांचें मिरजेस पत्र. पै ॥ छ० २६ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. ज्येष्ठ—

" श्रीमंत सोन्यांचे मंडपांत होते. स्नान करते वेळेस मी जवळ उभा होतों. पाण्याचा तांब्या भरून खाशांपुढें ठेविला. तेव्हां आज्ञा जाहली कीं हें काय ? त्यास जवळ शिष्ये होते त्यांणीं सांगितलें कीं, पाण्याचा कारखाना यांचा. तेव्हां विचारिलें कीं तुमचा कारखाना पाण्याचा की काय ? त्यास जवळ होते त्याणीं सांगितलें, यांजकडे कारखाना आहे. नंतर आज्ञा जाहली कीं, तुम्हीं पात्रावर बसावें. पांच सात पात्रें सोडून माझें पान होतें तेथें बसलों + + + श्री ॥ राजश्री आपासाहेब यांचे श्वशुरानीं सरकारांत पंचवीस हजार रुपयेचा हुंडा दिला. त्यानीं आपले शक्तीनुसार फार दिलें. "

नं. ४४६६ श्रीगजानन. ( आषाढ शु० ८–२१ जून. )

पै॥ छ० ११ मोहरम. सन तिस्सा तिसैन. आषाढ.

विज्ञापना. तागायत छ० ६ मोहरम. क्षेम असे. श्री॥ राजश्री नाना नगरच्या किल्ल्यांतून बाहेर निघाले. मोरोबादादाही लवकरच येणार. येथें शिंद्यांचें व बायांचें मिटत नाही. हंगामा सुरू होणार. श्रीमंतांचें व शिंदे यांचें वैमनस्य आलें ऐसेंही बाजार अफवा आहे. वडील भीमातीराहून × × × दर्शन घ्यावयास आले. श्री कृपा करील ऐसें लोक बोलतात. नानांजवळ जमेतही भारी जमली म्हणतात. काय घडेल तें खरें. श्री॥ राजश्री रावसाहेबांकडे तोफा वगैरे सरंजाम जात आहे. ईश्वरी सूत्र काय आहे हें समजत नाही. × × × कळावें. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४६७ श्री. ( आषाढ–जून. )

सेवेशीं विज्ञापना. अष्टयांतील कारकून व लोक गुरुवारीं रात्री निघून गेले. नंतर प्रातःकाळी इकडील लोक ठाण्यांत गेले. गांवांत लष्करचें माणूस कोणी जाऊं देत नाहीत. कारण गांव लुटावयाचा बेत अथवा चाळीस पन्नास

---

१ लमकार्यात पेशव्याच्या घरी पाणी पुरविण्याचे काम पटवर्धनाचें. २ चिमाजी आपाच्या. ३ कारकून बाळाजी गणेश जोशी याचे पत्र पुण्याहून मिरजेस. तसेच पुढच्या नंबरचे. ४ अमृतरावाकडे सरकारातून. ५ नारो हरी करंदीकर याचे करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

हजार रुपये घ्यावे असें आहे. कोणतें करितात पहावें. इकडील वर्तमान तपशीलवार लिहून जासूद जोडी आलेली रवाना केली. कळावें. काल्यांत ठाणें इकडील होतें. त्यास मनाचिठ्या उठान येणेंविशीं गेल्या असतां उठोन येत ना. मनस्वी उपद्रव करूं लागले. तेव्हां कऱ्हाडनें लोक येऊन प्याद्यांस मारामार केली. दहा पांच जायां जखमी जाले व शेंभरपर्यंत गावांत सांपडले. दाजी भिकाजी कारकून व कांहीं लोक पळोन आले. याप्रमाणें जालें. समडोळी पांढरे यांजकडे देविली. येक दोन मुक्काम तूर्त येथें आहेत. भडकंब्यास किरकोळ रोखे एक दोन जाले होते त्यास मनाचिठ्या देविल्या. एक दोन गांवकरी आणिले होते तेही सोडून देविले. परंतु आतां ऐवज घ्यावयाविशींचा रंग दिसतो. रोखे पत्र होणार. त्यास मी विनंती करीतच आहें, परंतु विश्वास काय? आणखी सुमार पाहोन कांहीं सामान कारण पाहोन देवितों. रोखे करून ऐवज घ्यावा असा बेत आहे. काय घडतें पहावें. सांबळवाडीस खंडणीकरितां पाटील कुळकर्णी आणविले आहेत म्हणोन चारशें रुपयेचा मसालारोखा गेला आहे. मनाचिठी देवितों. कळावें. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४६८　श्रीगणराज.　( आषाढ शु० ९—२२ जून )

पै॥ छ० ११ मोहरम सन तिस्सा तिसैन. आषाढ.

विज्ञापना. तागायत छ० ७ मोहरम. राजश्री मोरोबादादा फडणीस यांस आणावयास पांचशें स्वार श्रीमंतानीं पाठविले. शिंदे याणी राजश्री नानास आणविणार. तीन पलटणें आणावयास गेलीं म्हणोन बाजारी वर्तमान आहे. शिंदे यांची कही चाकणास गेली होती त्याजपैकीं मुजाफरखान याणीं मार्गी पाडून घेतली. घोडीं ४० उंट ६० व तोफा २ व बैल सर १५० व चार छकडे दारूगोळ्याचे आणिले ते श्री॥ राजश्री अमृतरावसाहेब यांजकडे रुजू केले. त्याणीं मुजाफरखान यासच घेणेंविशीं आज्ञा केली. याप्रमाणें बाजारी वर्तमान आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४६९　श्रीगणराज. ( आषा० शु० १३—२६ जून )

पै॥ छ० १५ मोहरम तिस्सा तिसैन.

अपत्यें विठोबानें दोन्ही कर जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० ११ मोहरम यथास्थित असे. विशेष. वडिलीं आशीर्वाद पत्र

---

१ विठ्ठलराव पांडुरंग पटवर्धन यांचें पत्र पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस, यातली फल्या घानलेल्या ठिकाणची अक्षरें फाटन गेली आहेत

छ० ५ मोहरमचें पाठविलें तें छ० ९ मिनहूस पावलें. लिहिला मजकूर कळला. "श्री॥ महाराज खासा बाहेर निघोन वारणा तांदुळवाडीजवळ उतरत आहेत. सातारियाकडे जाणार ऐसी वदंता आहे. राजश्री रत्नाकरपंत राजाज्ञा × × डून आणविलें;" म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. इकडील वर्तमान तर छ० ९ मोहरमीं श्रीमंत उभयेतां यजमानसाहेब श्रीदेवदेवेश्वराच्या[1] दर्शनास गेले होते. श्री॥ राजश्री रावसाहेब खडकीचे पुलावरून श्रीच्या दर्शनास आले. बरोबर मुजाफरखानही होता. शिंदे याजकडील छबिना होता. पठाण याजकडील शें दोनशें लोक वाढून छबिन्यावर चालोन गेले. मोहला जाहला. गोळागोळी जाहली. तेही सरकून राहिले. पठाणाकडील लोकही सरकून पर्वतीकडे आले. श्रीमंत उभयतां दोन घटका रात्रीस वाड्यांत दाखल जाहले. श्री॥ राजश्री रावसाहेब अर्धरात्रपावेतों पर्वतीस राहून नंतर स्वारी डेरेस दाखल जाहली. छ० १० रोज शु॥ एकादशी शिंदे याजकडील अलाव्याचे ताबूद नदींत टाकावयास आले होते. × × चार पलटणें × × सामानानिशीं नदीवर गेले. पठाणांची फौज व श्रीमंत बेहुशार होते. ताबूद टाकून तोफा सुरू श्रीमंतांचे गोटावर केल्या. नंतर गोटांत गलबल भारी जाहली. सडे तयार होऊन सरकून राहिले. बुणगेंही कांहीं निघालें. नंतर तळ शिंदे यांनीं घेतला. तळास आम दिली. डेरे, राहुटऱ्या वगैरे लूट जाहली. शिंदे याजकडील पलटणें व तोफा कांहीं फौज माघारी फिरली ते वेळेस मुजाफरखान याजकडील लोक पिच्छाडीवर धांवले. रामजी पाटील फौज घेऊन उभे होते. इकडून कुमक न पावे ऐसा बेत केला होता. होळकराचा मुक्काम श्रीमंतांजवळ असोन त्यास किमपि धक्का लागला नाहीं ! बुणगेंसुद्धां सांभाळून फासल्यानें उभे होते. तोफांचा मार श्रीमंतांचे गोटावर जाला. खराबीही बहुत सरकारची जाहली. छ० ११ मोहरमीं पठाण व श्रीमंतांची फौज तयार आहे. होईलतें मागाहून सेवेशीं लिहितों. आत्माराम तांबोळीचा लेक विठ्ठलवाडीस आषाढ शु॥ ११ दर्शनास गेला तेथून × × अफवा आहे. येणेप्रमाणें वर्तमान आहे. × × × × इकडे मार्ग चालत नाहीं. 'रास्ते यांजवर सातारेकर महाराजांचा छापा पडला. सांभाळून आल्याचें' लिहिलें तें कळलें. प्रस्तुत मुक्काम गोवें श्रीकृष्णा दक्षिणतीरावर आहे. महाराजांजवळ × × आहे असें ऐकण्यांत आहे. विठ्ठल शिवदेव यांचे नातू नरसिंगराव यांस वस्त्रें जवाहीर देऊन रवाना सरकारांतून केलें. श्री॥ प्रतिनिधीकडील फौज श्री॥ राजश्री रावसाहेबांजवळ होती त्यांचेही[2] गोटाची

---

१ देवदेवेश्वर पर्वतीचा. २ पुण्यांतून अमृतरावास.

तसनस जाली. श्री॥ सौ॥ वहिनीबाई व बापूसाहेब काल लष्करांत गलबल जाली तव्हां निघोन पाषाणास गेलीं. शिंदे यांजकडील लोक गोटास माघारे आले. शहरांतले तमासबीन शहराबाहेर उभे होते त्यांस कांहीं उपद्रव जाहला एकूण हंगामा बहुत जाहला. लोकवार्ता मिथ्या होत. × × शिंदे यांच्या तोफा व पलटणें संगमाजवळ नदी उतरून होळकराचे गोटाजवळून जाऊन तोफा सुरू केल्या. परंतु होळकराचे गोटास उपद्रव किमपि नाहीं. × × कळावें हे विज्ञापना.

नं. ४४७० श्री. ( आषा० शु० १४–२७ जून. )

पै॥ छ० १३ मोहरम तिस्सा तिसैन.

सेवेशीं येसाजी गोविंद सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० १२ मोहरम बुधवार मुक्काम बांबवडें. सात तास रात्र. वर्तमान यथास्थित असे. विशेष. सुरसिंगराव सावंत शिलेदार श्री॥ राजश्री आपासाहेब यांणीं पुढें लष्करांत रवाना केले होते ते पळुसांत राजश्री माणकोपंत यांजकडे गेले होते. त्यास पळुसांत आवई 'राजमंडळची कांहीं फौज बुरली अमणापुराजवळ आली.' हें वर्तमान येतांच सुरसिंगराव सावंत दहा पंधरा लोकांनिशीं तयार होऊन गोरे व वागमोडे शिलेदार आम्हांबरोबर आहेत त्यांजकडे ओळखीनें बांबवड्यास आतांच आले. त्याणीं आम्हांस येऊन वर्तमान सांगितलें कीं, आपण आलों. आवई आली. खरें लटकें न कळे. परंतु तयार असावें. त्यावरून तयार आपले जागां हुषार जाहलों. आम्हांबरोबर लोक घोरपडे यांचे लहानथोर पंचवीस तीस व गोरे व वागमोडे सात आठ इतके मात्र आहेत. मग कोणी आले नाहीं. त्यास मागील लोकांची वाट पहावी, किंवा कोठें जाऊन मुक्काम करावा, ही आज्ञा करावी. येथें कोणी म्हणतात, इस्यांकडून जावें. त्यास कोणत्या मार्गें जावें ही आज्ञा व्हावी. त्याचप्रमाणें जाऊं. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४४७१ श्रीगजानन. ( आषाढ शु० १४–२७ जून )

पै॥ छ० १५ मोहरम. तिस्सा तिसैन. आषाढ.

विज्ञापना. छ० १० मोहरमीं लढाई जाली ते दिवशीं अलिजाबहादर यांजकडील लोक शिलेदार चार पांचशें मातवर बायांकडे आले. श्रीमंतांस डेरेदांडे येथून रवाना जाहले होते. श्रीमंतानीं घेतले नाहींत. बाहेर उघडे

---

१ पत्र मिरजेस बाळासाहेबास २ याबेरीज. ३ चिठी कारकून बाळाजीपंत जोशी याची मिरजेस.

बसले आहेत. येणेप्रमाणें बाजार अफवा आहे. छ० १२ मोहरम. विदित होय. श्रीनें कृपा करावी मोठें संकट दिसत आहे. हे विज्ञापना.

नं. ४४७२ श्रीगणराज. ( आषाढ शु० १४–२७ जून. )

पै॥ छ० १५ मोहरम सन तिस्सा तिसेन.

विज्ञापना. तागायत छ० १२ मोहरम. क्षेम असे. विशेष. छ० ११ रोजीं शिंदे यांजकडील पलटणें पठाणावर चालोन गेलीं. पठाण व श्रीमंत हुशारीनें होते. गोळागोळी जाहली. अलिजाबहाद्दर यांजकडील पलटणें नदीपार उतरोन पैलतीरास गेलीं नाहीत. पठाणांची फौजही अलीकडे उतरली नाहीं. बाजारी अफवा ( आहे कीं, ) अलिजाबहाद्दर यांची रसद येत होती ती कांहीं पठाणानी वळवून नेली. पलटणांवर चालोन घेऊन दोन तोफाही पाडाव केल्या पठाणानीं. ऐसें लोक बोलतात. आज कांहीं तयारी नाहीं. × × × कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४७३ श्रीगणराज. ( आषा० व० ९–७ जुलै. )

पै॥ छ० २९ मोहरम. सन तिस्सा तिसैन. अधिक शु॥ १

अपत्यें विठोबानें दोनी कर जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० २२ मोहरम यथास्थित असे. विशेष. अलीकडे वडिलाकडून आठ रोज आशीर्वादपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं याजकरितां काशी पवार वडिलांकडे रवाना केला आहे. तर सविस्तर ल्याहावया आज्ञा केली पाहिजे. इकडील वर्तमान तर छ० १२ मोहरमीं बुधवारीं पठाण व बक्षी यांजकडील लोकांनीं रात्रौ अलिजाबहाद्दर यांचे गोटावर बाण टाकिले. त्याजवरून शिंदे यांजकडील कंपूनीं तोफांची सरबत्ती चहूं अंगांनीं केली. रात्रीचा विषय. गोळा कांहीं पठाणांचे लोकांस लागला नाही. मानाजी फाकडे यांचा गोट भवानी पेठेंत नजीक आहे त्याजवर दोन गोळे पडिले त्याजमुळें दोन माणसं फाकड्याची ठार जाली. नंतर सरकारच्या तोफा सुरू जाल्या. मग शहराकडे गोळे यावयाचे राहिले. त्याजपासोन रात्रौ पठाण दहापांच बाण टाकीत आहेत. शिंदेही बाणांचे रोख पाहून जंरबा सुरू करितात. या अन्वयें चाललें आहे. छ० १४ मोहरम भृगुवारीं श्रीमंतानीं वाड्यांत स्वारीबरोबर जावयास ( मला ) बोलाऊं पाठविलें. वाड्यांत गेलों होतों. नव्या आरसे महालांत बैठक जाली होती. श्रीमंतांजवळ पिंगळे, चक्रदेव,

१ पत्र विठ्ठलराव पांडुरंग पटवर्धन यांचें मिरजेस. २ तोफा.

आबा काळे ऐसे होते[1]. प्रथम श्रीमंतानीं गोष्ट काढिली कीं, "हरीपंत यांची कन्या कोणास दिली होती ?" तेव्हां मी विनंति केली की, 'काकांचे ज्येष्ठ पुत्रास दिली होती. त्यांचा काळ जाहला.' "बाबांची कन्या कोणास दिली?" 'चिंतामणराव आपा यास दिली. ती गुदरतां वारली.' "तिचें सार्थक तुम्हीच केलें कीं काय ?" त्यास 'मी केलें नाहीं.' "ठीक, त्यापक्षीं अधिकार तुम्हांस." उपरांत "श्रीपतराव पटवर्धन यांचें घर कोठें ?" त्यास 'मिरजेंत किल्ल्यांतच आहे.' "तुमचे चुलत बंधु ?" म्हणोन, त्यास 'चुलतचुलत बंधु' म्हणोन विनंती केली. "चिंतामणराव यांचें वय किती ? शरीर जाडेपणास कैसें ? गौरवर्ण ? मिशा किती मोठ्या ?" म्हणोन आज्ञा, त्यास 'वय स्वामींबरोबर. गौरवर्ण सामान्य बराच आहे.' "माझे इतका किंवा नारोपंत चक्रदेवाइतका?" ऐसी आज्ञा, त्यास चक्रदेवांनीं सांगितलें कीं, स्वामींपेक्षां गौरवर्ण अधिक. लढवाई चांगले. त्रिकाल स्नान. घोड्यावरील लढाईंत उत्तम. ऐसें त्यानीं सांगितलें. "गंगाधरराव यांचें शरीर मोठें आहे ऐसें ऐकण्यांत आहे. गंगाधरराव यांस पुत्र किती ? तुम्ही बंधू किती जण ?" ऐसें विचारिलें त्यास 'वडिलांस पुत्र चवघ जण, आम्ही उभयतां;' म्हणोन सांगितलें. चक्रदेवांना श्रीमंतांस विनंती केली कीं, विठलराव यांचें कुटुंब व मातुश्री येथें आहेत. त्यास खासे बोलले कीं "येथें मातुश्री आहेत ?" त्यास मी विनंती केली कीं, 'स्वामींचे पायांजवळ येथेंच वडील आहेत.' ऐसें सांगितलें. नंतर साहेबानींच गोष्ट काढिली कीं, "भाऊ शिपाई चांगले" त्याजवर प्रतिउत्तर आबा काळे यांनीं केलें कीं, भाऊंसारखा मर्द मनुष्य दृष्टीस पडावयाचा नाहीं. नंतर श्रीमंत बोलले कीं, "त्यांस जखम लागली आहे. खड्र्यांचे स्वारीस अघाडीस होते. ( लढाईचें ) तोंड त्याणीं लाविलें." ऐसें साहेब बोलले. त्याजवर गोविंदराव पिंगळे ( विनोदानें ? ) श्रीमंतांचे रुबरू बोलले कीं, उगीच पुढें दहा पांचांनिशी गेले. तिकडून पाच सात असामी आले म्हणोन मागें पळाले, तेव्हां जखम लागली. त्याजवर श्रीमंत बोलले कीं, "भाऊंसारखा शिपाई नाहीं. गोपाळराव यांचे पाठीमागें भाऊंनीं शिपाईगिरीनें नांव राखिलें" म्हणोन. त्याजवर विनंती केली कीं, 'शिपाई ऐसा नाहीं, आणि सरदार लोकांची

---

१ या पत्रांत पेशवे व विठ्ठलराव यांचे संभाषण आलेलें वर्णिलें आहे त्यांत दुहेरी अवतरणांतलें पेशव्याचें व एकेरी अवतरणांतलें विठ्ठलरावांचें भाषण समजावें. २ फडके. ३ गंगाधरराव गोविंद यांचे ज्येष्ठ पुत्र केशवराव यांस. ४ रामचंद्र हरि ऊर्फ बाबा फडके यांना.

बरदळ सोसावयाजोगा तोंडा भाऊंस नाही.' ऐसें म्हणतांच साहेब बोलले, "गोष्ट खरी. शिपाई चांगले. मिरजकरांस, कुरुंदवाडकरांस, पन्हाळेकरांची मसलत सांगत होते. त्यांचे हातून जाली नाहीं. यांचे घराण्यांत भाऊंसारखा शिपाई नाहीं." ऐसें भाषण साहेबानीं केलें. नंतर मला स्वारीबरोबर येण्याची आज्ञा जाली. श्री॥ राजश्री अमृतरावसाहेब यांजकडे स्वारी गेली. बरोबर जाऊन श्री॥ राजश्री रावसाहेब यांची भेट घेऊन चार घटका रात्रीस माघारे आलों साहेबानी आज्ञा केली कीं, "तासगांवास मिरजेस फासला किती ?" त्यास 'इकडील नऊ कोस आहे.' "भाऊंची व तुमची गांठ कधीं पडत होती? तुम्ही तासगांवास जात होतां कीं नाहीं ?" त्यानंतर मीं विनंती केली कीं, 'श्रीगणपतीचे उत्साहास जात होतों. वडीलही महिने दोन महिनेनीं मिरजेस येत होते. एखादे वेळेस आम्हींही वडिलांचे भेटीस जात होतों.' "तुम्हांस चुलते किती ? त्यांस अपत्यें काय ?" तदोत्तर श्रुत केलें कीं, 'वडील गोपाळराव. त्यांचे पोटीं एक कन्या. दुसरे वामनराव. त्यांस संतान दोन कन्या मात्र.' ऐसें निवेदन केलें मग साहेब बोलले कीं, "वामनराव यांची कन्या आमचे राव[1]साहेबांस देणार ऐसा बेत होता." चक्रदेव बोलले कीं, पांडुरंगराव हैदरखानाचे लढाईंत जखमा लागोन पाडाव जाहले. हैदरखान चाकरीस रहा म्हणत असतां राहिले नाहींत. तिकडेसच काळ जाहला. ऐसें म्हणाले. उपरांत साहेब बोलिले कीं, "हें वृत्त आम्ही ऐकिलें आहे." छ० १५ मोहरम रविवासरीं संकष्टचतुर्थीचे दिवशीं नदीपलीकडे दक्षिणतीरास श्री॥ राजश्री रावसाहेब यांचा मुक्काम होता. व बक्षी व पठाण बायांसुद्धां होते. तिकडून नदी उतरोन श्रीपर्वतीनजीक नदीकडील आंगें मुक्काम जाहला आहे. मागती परवां भृगुवारीही यजमानांचें बोलणें जालें. त्याची मागाहून विनंती लिहितों. कळावें विदित होय हे विज्ञापना.

नं. ४४७४ ( आषाढ व० १०–८ जुलै. )

नारो हरि करंदीकर यांचं पत्र मिरजेस बाळासाहेबांस अष्टयांहून करवीरकरांच्या लष्करांतून. पे॥ छ० २३ मोहरम.

"महाराजांस ठाणें अष्ट येथें घोडीं पन्नासपर्यंत सांपडलीं आहेत त्यांची किंमत आज मितीस पंधरावीस हजार रुपये होईल. वेशी बंद करून गांवचें एक माणूस देखील बाहेर जाऊं देत नाहीत. हुबळी गोकाकेस झालें त्याप्रमाणेंच येथें होत आहे. आकाराम यादवच अष्टयाच्या उद्योगास नेमिले आहेत.

---

[1] अमृतराव यांस

गाव अगदी लुटणार. सानाऱ्याहून आणखी उपाध्येबोवा आज मंदवारीं अष्टर्यांच्या मुक्कामास आले. कारण सत्वर येऊन पोंचावें, तूर्त हजार दोन हजार फौज पुढें रवाना करावी, या उद्देशें आले आहेत."

नं. ४४७५ श्रीगणराज. ( आषा. व. १२-१० जुलै. )

चि॥ राजश्री रामचंद्रपंत आपा यांसीं आशीर्वाद उपरी. आंधळीकर मान्यांनीं म्हातारी बायकोचा पोर जिवे मारिला. त्याचे चौकशीबद्दल मान्यांस रोखा केला होता. त्यास तुमचे सांगण्यावरून मनाचिठी दिली. परंतु अद्याप मान्ये येऊन जाबसाल जाहला नाहीं. तरी मान्यांस पाठवून द्यावें. म्हणजे चौघांस सांगोन मनास आणविण्यास येईल. रवाना छ० २५ मोहरम हे आशीर्वाद.

उ० फौजेस निरोप जाल्यामुळें माने गांवास गेले. येथें दृष्टीस पडते नाहींत. सायंकाळीं शोध घेऊन विनंती सांगून पाठवितों.

नं. ४४७६ श्री. ( आषाढ व० १३-११ जुलै. )

पै॥ छ० २७ मोहरम. तिस्सा तिसैन. आषाढ.

सेवेशीं येसाजी गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २४ मोहरम मुक्काम मालगांव वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ० २२ मोहरमचें पत्र पाठविलें तें छ० २४ मिनहूस पावलें. लिहिला मजकूर कळला. शिलेदारांचे रोजमरेच्या यादी दोन पाठविल्या त्या पावल्या. टकले मंडळीचा ऐवज राजश्री बाळाजीपंत याजवळ दिला म्हणोन लिहिलें तें कळलें. टकले व चोपडे रूपनवर यांची रवानगी पेशजीच जाहली आहे. त्यांचें चुणगेंही बाळाजीपंताबरोबर येईल. येथें आम्हांस छबिने वगैरे चाकरी नेहमीं येत्ये. टकले, चोपडे, रूपनवर हे श्रीमंतांजवळ उतरत आहेत. यास्तव त्यांस आम्हांकडे छबिना वगैरे चाकरी करीत जाणें म्हणोन अलाहिदा पत्र मर्जीस आल्यास पाठवावयाची आज्ञा व्हावी. निराळे तलाव्यास रास्ते यांची फौज जाती त्याजबरोबर आम्हांकडील दोनशें चारशें लोक कामकाजास पाठवीत असतात. त्यास दोन चार दिवस निराळी चाकरी येती. तेव्हां टकले व रूपनवर चोपडे यांस आज्ञा जाहलियास पाठवीत जाऊं. अगर राजश्री गणेश गोविंद तेथून

---

१ माने शिलेदार यांनीं खून केला सबब त्याचें पारिपत्य करावें म्हणून गंगाधरराव यांचा आग्रह. माने हे पदरचे शिलेदार, सबब त्यांचा बचाव करावा ही रामचंद्रपंत आपाची खटपट ( पहा नं. ४४७१ व ४४८० ). २ पत्र बाळाजीपंत माळ्यांस मिरजेस ३ परशुरामभाऊजवळ

चालते जाहले असलियास तेच आठ दिवसांत येतील. पण पत्राचें कारण नाहीं. येथें श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजवळ दीड हजारपर्यंत लोक जमले बरचेवर येतच आहेत. बोली होऊन गणती होत आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४४७७ श्री. ( अधिक श्रावण शु० ११–२३ जुलै. )

पे॥ छ० ९ सफर सन तिस्सा तिसैन अधिक श्रावणमास.

पै०॥ सेवेशीं विज्ञापना. पुण्याहून काल संध्याकाळीं माणूस आला. पत्रांतील मजकूर श्रीमंत राजश्री रावसाहेब फौजसुद्धां बक्षी व पठाणसह सिंहगडानजीक वडगांवावर आहेत. श्रीमंत राजश्री मोरोबादादा अद्याप जुन्नरास आहेत. श्रीमंतांचें पत्र गेल्यावर येणार. श्रीमंत राजश्री नाना आले, ते गारद्यांबरोबर अलीकडे पाटसास आले. स्वतंत्र नाहींत. शिंदे वानवडीवरच आहेत. तीन कंपू व दोन तीन हजार फौज आहे. तहाचें बोलणें लागलें आहे. परंतु बायांचें म्हणणें जे, "राजश्री बाळोबा यांस आणावें. त्यांचे विचारें तह व्हावा. ते सांगतील तें ऐकों," असें बोलणें लागलें आहे. बाळोबास आणावयास गेले म्हणतात, असें लिहिलें होतें. पुढें काय घडतें पहावें. आपणाकडे वर्तमान असेलच. त्यास आमच्या पत्रांत मोठेंमोठें असें लिहिलें होतें. आपणाकडे अधिकोत्तर असेल तें कळविलें पाहिजे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम मालगांवास आहे की पुढें आला हें लिहावया आज्ञा झाली पाहिजे. राजश्री नाना यांस शिंदे याणीं आणविलें. त्यांच्या लागावर पठाण यांजकडील कांहीं फौज आडवी गेली आहे असें लिहिलें होतें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४७८ श्री. ( अधिक श्रावण शु० ११–२३ जुलै. )

पो छ० ९ सफर सन तिस्सा तिसैन अधिक श्रावण मास.

[3]सेवेशीं विज्ञापना. तागायत रविवार प्रातःकाल वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल लष्करांतून काले येथील मुक्कामाहून शुक्रवारचें पत्र आलें. त्यांत मजकूर सातान्यास दोन हजार फौज पाठवणार. काल्याहून तीन कोस कोयना आहे तेथपावेतों खासा स्वारी जाणार. सातारेहून पांचशें स्वार कोयना उत्तर तीरास यावे म्हणजे इकडील फौज पलीकडे उतरून जावी असी बेत

---

१ महादाजी विठ्ठल, कारभारी सं. इचलकरंजी, याचें पत्र मिरजेस बाळासाहेबास. २ अमृतराव. ३ महादाजी विठ्ठल, कारभारी सं. इचलकरंजी यांचें इचलकरंजीहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

होत आहे. महाराज यांची स्त्री करवीरांस एक देवाज्ञा झाली. कालच वर्तमान आलें. याजमुळें आज मुक्काम आहे. पुढें जावयास सरदार कोणी पाय घेत नाहीं. सरनोबत यांस बरें वाटत नाहीं. दुसरा कोणी जात नाही. राजश्री नारायणराव घोरपडे यांस पाठवणार म्हणतात. करारांत नाहीं. फौज रवाना करून खासा स्वारी बत्तीस शिराळ्यास माघारे येणार असा मनसबा होत आहे. कराडकरांकडून कारकून बोलण्यास आला आहे. बोलणें मिटत नाही. कराडासही कांहीं फौज जमली आहे. काय घडतें पहावें. कालेकर गांवचीं घरें वांचवावयाकरितां पंधरा हजार रुपये देतों म्हणोन बोलतात. बोलणें लागलें आहे. याप्रमाणें वर्तमान आहे. पुढें काय घडतें पहावें. आपणाकडील-ही वर्तमान आलेंच असेल. देशमुखीविशींचा मजकूर राजश्री दादबानीं लिहिला आहे. राजश्री नारोपंत चक्रदेव यांचे विद्यमानें बोलणें करून ठरावांत आणिलें आहे. मागाहून सरकारचें पत्र घेऊन पाठवितों असें लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४७९ श्रीगणराज. (अधिक श्रावण शु० १३–२५ जुलै.)

चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा यांसीं आशीर्वाद उपरी. आंबळीकर बायको जिचें पोर माने यानीं मारलें, तिची समजूत काढली पाहिजे. अंतर यांजकडून पडलें हें आपल्या म्हणण्यांत आहेच. त्यास एकुलतें एक पोर मारलें गेलें, तेव्हां कांहीं त्यानीं आपले इनामपैकीं शेतभात तिजला द्यावें लागेल. सरकारचे गुन्हेगारीची वाट जाहली पाहिजे. समजूत कोणे तऱ्हेनें करावयाची त्यांसीं बोलोन ठरावांत आणोन कळवावें. छ. ११ सफर हे आशीर्वाद.

उ० धर्माजी माने यांचे घरीं गोष्ट घडली त्यांस इनाम नाहीं. म्हातारी-ची तोड नक्तीवरच काढावयास आज्ञा व्हावी. सरकाराविशीचा प्रकार तर माने बहुत दिवसांचे सोबती. सेवा चाकरीवर खर्च होतील.

नं. ४४८० श्रीगणराज. (अधिक श्रावण व० ३-३० जुलै.)

चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा यांसी आशीर्वाद उपरी. आंधळी-कर मान्यांचा मजकूर तुम्हीं लिहिला होता + + चें मूल तर म्हातारीचें यानीं मारलें खरें. "गुन्हेगारी माफ करावी, खुनाचा जाबसाल नक्तीवर ठरवावें. मान्यांस कांहीं इनाम जमीन नाहीं" म्हणोन लिहिलें, त्यास खुनाचे साडे तीनशें रुपये द्यावे ही चालच आहे. त्याप्रमाणें तोड करवावी. म्हातारीचा मूल एकच नाहक मारला गेला. गुन्हेगारी घेतल्याशिवाय पुढें मागें दहशत बसणार नाहीं. गुन्हेगारीचें ठरवावें. मान्यांचें म्हणणें समक्ष जालें जे, 'आम्हांकडे अंतर पोर

माग्ल्यांचें नाहीं. चौकशी करावी.' असें बोलत होते. त्यांचे सामिलातीत आणखी असाम्या आहेत असें ऐकण्यांत आहे. चौकशी मान्यांचे मतें करावी असें असल्यास तें ही + + अंतर मान्यांकडे चौकशीमुळें लागलें तर जाबसाल विचारावयास येईल. या मलईत जे आहेत त्यांसुद्धां गुन्हेगारीचा ठराव व्हावा. छ० १६ सफर. हे आशीर्वाद.

उ० मी तिसरे प्रहरीं येतों.

नं. ४४८१ ( अधिक श्रावण व० ५–२ आगष्ट. )

छ० १९ सफर सन तिस्सा तिसैन अधिक श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत राजश्री पंत प्रतिनिधि यांस पथकसुद्धां सरकारचा निरोप जाला. पुण्याहून निघाले. पांच चार रोजानीं कराडास येणार. श्रीमंत मातुश्रीनीं कराडास खुशालीच्या तोफा करविल्या. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४८२ श्री. (श्रावण शु० ६–१७ आगष्ट. )

पै॥ छ०५ रबिलावल. सन तिस्सा तिसैन. श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी डेऱ्यास असतां नागपंचमीच्या सणाकरितां करवीराहून कन्या उभयतां लष्करास आणविल्या. पर्जन्य बहुत. याजकरितां महाराजांची स्वारी शिराळेंच्या ठाण्यांत वाडा आहे तेथें रहावयास जावें या बेतानें काल गुरुवारीं पंचमीचे दिवशीं प्रहर दहा घटका दिवसास स्वारी ठाण्यांत जावयास निघाली. बरोबर खासबारदार व भालेबारदार मंडळी वीसपंचवीसपर्यंत होती. आणखी मागून लोक वरचेवर जातच होते. राजश्री बळवंतराव घोरपडे, कापसीकर सेनापती यांचे घराण्यांतील, हे आपले खासगत बोलणें पालखी धरून बोलत जात होते. इतक्यांत गुलाबखान म्हणोन रोहिला चाळीस लोकांचा जमातदार होता तो तलबेकरितां अगोदर पांचचार रोज खटला करीत होता. एक दिवस उपासीं बसला होता. त्या दिवशीं समजोन सांगोन लावून दिला. त्याजवरही एकदोन दिवस गेले. तत्राप त्याच्या तलबेची सोय निघाली नाहीं. याजकरितां जमातदार मजकूर याणें स्वारी जात असतां महाराजांचे पालखीवर चालोन घेतलें, आणि वार टाकिला तो पालखीच्या पिंजरीवर लागोन घोरपडे यांच्या खांद्यावर थोडासा वार लागला. इतक्यांत दुसरा वार चालविला तो घोरपडे

१ करवीरकराच्या लष्करांतून नारो हरि करंदीकर याची चिठी. २ ही बातमी उठलेली खोटी होती. पंताची पुण्याहून सुटका झाली नाही.

यार्णी जमातदार यास मिठी घालून खालीं पाडून वर आपणही पडले. यांत आणखी जमादार याचे हलके दोन तीन वार हातावर लागले. इतक्यांत खासबारदारांची मिठी पडली. इटेकरी स्वारीबरोबरचा होता त्याचा हात एक अगदीं उडाला तो जमादार याचे वारानें उडाला. जमादार यास तोडला दहा वीस वार गुलाबखानावर आले. त्या गडबडींत आणखी घोरपडे यांस उजव्या पायावर टाचेच्या वरता वार लागला. ती जखम भारी आहे. जमातदार प्रहरदीडप्रहरपर्यंत जीव मात्र होता. जाग्यावरच पडला होता. नंतर त्याचे बिरादरीची जप्ती करविली. तो लोक कांहीं पळोन गेले. पांच चार असामी सांपडले ते पहाऱ्यांत ठेविले. निशाण वगैरे चीजवस्त जप्त केली. जमातदार मेल्यावर महारांस सांगोन ओढून टाकिला. याप्रमाणें वर्तमान जाहलें. नंतर स्वारी वाड्यांत गेल्यावर खैर जाहल्याची खुशाली पांच तोफा करविल्या. वग्कड जमातदार व शिलेदार मंडळी यार्णी महाराजांचे मुजऱ्यास जाऊन आपले योग्यतेनुसार सतका खैर जाहल्याचा दोन चार दहा पांच रुपये याप्रमाणें जाहलें. दगाच झाला होता, परंतु ईश्वरें मोठी खैर केली. सेवेशीं कळावेंकरितां लिहिलें आहे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना. बळवंतराव घोरपडे यांस एक गांव द्यावयाची परवानगी झाली आहे हे विज्ञापना.

नं ४४८३ श्री. ( श्रावण शु० ७—१८ आगष्ट. )

छ० १० रबिलावल सन तिस्सा तिसेन. श्रावण.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक देवजी कृष्ण देशपांडे. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ५ रबिलावलपर्यंत स्वामींचे कृपें यथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान तर सावनुरीं राजश्री धोंडोपंतदादा गोखले आहेत. बाहर राजश्री आपा राजाज्ञा आहेत. दाणे वगैरे शहरांत जाऊं देत नाहींत याजकरितां सावनुरीं गोखले यार्णी पट्टी पळणी इत्यादि बहुत उपद्रव केले आहेत. हजरतपन्हा नबाब खैरामिय्यासाहेब यार्णी पेटकटारी करतमसर्यी (कट्यार) काढून घेतली. बेअब्रू केली. परंतु त्यांजकडे ऐवज खर्चास प्राप्त झाला नाही. गोखले यांस व त्यांचे पुतण्यास जखमा लागल्या आहेत. मागें लढाई जाली तें वर्तमान सेवेशीं विनंती लिहिलेंच आहे. कित्तूरकर देसाईकडे करवीरचे हुजरे "फौजसुद्धां करवीरास खुद्द येणें" म्हणोन आले आहेत. देसाई बाहेर निघत नाहीं. राजाज्ञांकडे कित्तूरकराचे राऊत व जमाव आहे त्यापैकीं जखमी

गोवगणा आले. सेवेसीं आढळलें वर्तमान विनंती लिहिलें आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४८४ श्री. ( श्रावण शु० ७–१८ आगष्ट. )

छ० ५ रबिलावल. सन तिस्सा तिसैन. श्रावण.

पु॥ विनंती सेवेशीं देवजी कृष्ण देशपांडे. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे. राजश्री धोंडोपंतदादा गोखले यांची व राजश्री आपा राजाज्ञा यांची लढाई झाली. गोखले यांचे पुतण्यास जखमा लागल्या आहेत. समानपक्ष युद्ध जाहलें म्हणोन वर्तमान आलें आहे. होंनलास राजश्री सरदेसाईस फौज जमावसुद्धां येणेंविशीं स्वार व कारकून राजाज्ञाकडील आले आहेत. कुंदरगोळें कारडगीचे आसपास लढाई झाली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. जखमा कोण लागल्या म्हणतात, कोण नाहीं म्हणतात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४८५ श्रीगजानन. ( श्रावण शु० १२–२३ आग. )

पै॥ छ० १५ रबिलावल सन तिस्सा तिसैन. श्रावण

श्रियासह चिरंजीव राजश्री बळवंतराव यांस। प्रती विनायक भास्कर व हरी भास्कर. अनेक आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागायत छ १० रबिलावलपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर गडाहून श्रीमंत महाराज आईसाहेब खालीं बोलावयास येणार. नंतर राजश्री माधवराव रास्ते याणीं जावें, उभयतांचें बोलणें झाल्यानंतर गडावर लोक द्यावे, असें होतें. तितक्यांत आईसाहेबांस चार दिवसांचा गुंता पडला यास्तव तूर्त राहिलें. मंदवासरीं येणार असें आहे. आल्यानंतर काय होईल तो समाचार मागाहून लिहून पाठवितों. चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा काल आले. ती॥ राजश्री भाऊ साहेबांच्या भेटी जाहल्या. अशीच आपली व तीर्थस्वरूपांची भेट होईल तो सुदिवस! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं ४४८६ श्रीगणराज. ( २७ आगस्ट. )

छ० १८ रबिलावल सन तिस्सा तिसैन. श्रावण मास.

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती विनायक भास्कर व हरी भास्कर. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत श्रावण वद्य प्रतिपदा मुक्काम सातारा[1] येथें सुखरूप असों. विशेष. शनिवारीं कूच करून किल्लेचे पूर्वेस एक कोसावर माहवलीचे वाटेस मुक्काम झाला आहे. तिकडे यावयाची मसलत

---

[1] साताऱ्याच्या किल्ल्यावरून.

दिसत आहे. पुण्याकडील वर्तमान तरी दुर्जोन यास शिंदे यानीं चवकींत ठेविला व लेखक यासही फिरून बंदोबस्त केला असें बाजार बोलणें आहे. परंतु खरेंच आहे. दाक्षिणेचें वर्तमान एकणेंत आलेंच असेल. श्रीमंतानीं शहरांतील सर्वांस निरोप दिला हेंही वर्तमान आहे. किल्ल्याचा बंदोबस्त करून येणें होईल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ४४८७ ( श्रावण व० २---२८ आगष्ट. )

व्यंकटराव भास्कर यांचें नरगुंदाहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० १५ रबिलावलचें---

" गोखले यांच्या जखमा हातावरील वगैरे बऱ्या जाल्या. तोंडावरील मात्र अद्याप आली आहे. आणखी आठ पंधरा रोजानी निःशेष बऱ्या होतील. नित्य ज्ञान होतच आहे. आंतही दम चांगला आहे. आंतील तलावा अर्धकोशपर्यंत यत आहे. तलावस उभयपक्षी गांड पडते. कोणीही हटत नाहीं. याप्रमाणें वर्तमान आलें तें विदित व्हावें म्हणून लिहिलें आहे. राजाज्ञा कारडगीवरच आहेत.'

नं. ४४८८ श्री. ( श्रावण व० २--२८ आगष्ट. )

पौ छ० २० रबिलावल तिस्सा तिसन श्रावण.

सेवेशी बाळकृष्ण हरी. कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत छ० १५ रबिलावल मुक्काम लष्कर नजीक सातारा वर्तमान स्वामींच्या कृपेकडून यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं कृपा करून पत्र पाठविलें तेथें 'वर्तमान लिहीत जावें' म्हणोन आज्ञा, त्यास साताऱ्याची पेठ हल्ला करून घेतल्याचें वर्तमान पेशजी सेवेशीं लिहिलेंच आहे. त्यावर श्रीमंत राजश्री बाबासाहेब फौजसह सडे स्वारीस कोयनेपावेतों गेले होते ते आठवे दिवशीं माघारे आले. गांवगन्नाचे लोक कांहीं राजश्रींकडे होते त्यांचे पत्ते लावून चाळीस पन्नास पावेतों घोडीं पागेस आणिलीं. साताऱ्याचे पेठेंत नाकेबंदी केलीच होती, व वरील बोलण्यासही येत होते. परंतु बोलणें नित्य नवें पडूं लागलें, याजकरितां मध्यें दोन दिवस विटण्यांत येऊन किल्ल्याभोंवत्याही चौक्या दिल्या. वर जाणार येणार अगदीं बंद केल्यानंतर मागतीं बोलणें लागोन ठरण्यांत आलें जे, वर शिबंदीचे लोक आहेत त्यांपैकीं दोनदोनशें लोक उतरून यावे. त्यांचे हिशेब करून रास्ते यांणीं ऐवज द्यावा. इकडून ऐवज पावला असतां बदल गोष्ट सांगितल्यास ऐवज माघारा घ्यावा. येविशीं परस्पर खातरजमा होऊन दोनशें लोक खालीं उतरले त्यांचा हिशेब करून ऐवज देऊन

हत्यारेंसुद्धां लाऊन दिले. आज आणीक दोनशें लोक उतरावे असें आहे. याप्रमाणें सारे लोक उतरावे असें ठरलें आहे; शेवटास जातें किंवा आणीक बदलतात हें पहावें. दोन दिवसांत उरकल्यास उत्तम. नाहीं तर दोन हजार गाडद् व पांचशें स्वार ( येथें ) ठेऊन गस्तेसुद्धां कृष्णाउत्तरतीरास यावें याप्रमाणें ठरलें आहे. शिंद्याकडील दुर्जन म्हणून कंपूचा सरदार होता त्यास मुकेरीच्या लेकानें धरला. श्रीमंतानीं शहरांतील लोकांस निघोन जाणें म्हणोन दौंडी फिरविली. याप्रमाणें वर्तमान आहे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब गणेश चतुर्थीच्या सुमारें तासगांव मिरजेच्या लगत्यास येणार. येतां येतां रहिमतपुरीं व वाटेगांवांत ठाणें घालावें असें ( ठरलें ) आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४८९ श्री ( श्रावण व० ९–४ सप्टें. )

पै॥ छ० २४ रबिलावल. सन तिस्सा तिसैन. श्रावण.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० २२ रबिलावल मुक्काम नजीक रहिमतपूर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. माहुलीचे मुक्कामावरून जासुदासमागमें पत्र पाठविलें आहे तें पावलें असेल. श्रीमंत राजश्री दाजीसाहेब यांस येथें फौज देऊन पाठविलें होतें. मागाहून आम्हांसही आज्ञा झाली. आम्हीं परवां येथें आलों. काल रहिमतपुरास गांवांत जाऊन दोन अडीच प्रहरपर्यंत गोळागोळी झाली. नंतर ठाण्यांत आरब व कारकून मानाजी शिंदे याजकडील होते त्यांनीं बोलणें लाविलें. सायंकाळीं इकडील दीडशें आरब व निशाण आंत घेतलें. काल सायंकाळ झाला याजमुळें बाहेर निघाले नाहींत. आज निघणार. ठाण्यांतील आरब पांच सात ठार व जखमी पांचसात जाहले. बाहेरील गाडदी लोक व लुगारे दहा पर्यंत ठार व जखमी चाळीसपन्नासपर्यंत आले. आमचे पथकांतील पांचसात असामी जखमी शिलेदार जाहले आहेत. त्यांची याद पाठविली आहे. सायंकाळपर्यंत मोर्चे बसले होते त्याजमुळें पेठ लुटली गेली. कांहीं घरें जळलीं. याप्रमाणें वर्तमान झालें. ठाणें राजश्री जनार्दनपंत यांचे स्वाधीन केलें. परंतु ठाणें राखलें पाहिजे. तूर्त आठ दिवस येथील गाडदी व स्वार ठेवितों. तेथून गाडदी पावणाशें शंभर पर्यंत चांगले एक महिन्याची रोजमरेची बेजमी करून पाठवून द्यावे. गाडदी चांगले असले पाहिजेत. गांवांतील लोकांस मानाजी शिंदे यांची व आरबांची दहशत आहे. व श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचे बोलण्यांत ठाण्यांत शिबंदी चांगली ठेऊन ठाणें रक्षावें याप्रमाणें आज्ञा आहे.

त्याजवरून सेवेशीं विनंती लिहिली आहे. तूर्त पन्नास स्वार गांवांत आठ दिवस तेथील गाडदी येईपर्यंत ठेवितों. श्रीमंत महाराज सातारकर किल्ल्यावरून काल खालीं येणार होते ते आले असल्यास श्रीमंत राजश्री भाऊसाहेब दर्शनास जाणार होते. आलेनंतर तेथून कूच करून दरमजल मिरजेमच येणार. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४५०　　　　श्री.　　　　( श्रावण व० १०—५ सप्टें. )

पे॥ छ० २४ रबिलावल. सन तिस्सा तिसैन. श्रावण.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० २३ रबिलावल मुक्काम नजीक पुसेसावळी येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. रहिमतपूरचें ठाणें घालावयाकरितां श्रीमंत राजश्री दाजीसाहेब आले होते. आमची फौज आली होती. परवां प्रातःकाळापासून तीन प्रहर पर्यंत ठाण्यांत आरब होते त्यांनी गोळी वाजविली. नंतर बोलणें लाऊन इकबील आरब होते त्यांचे वियमार्गे उतरले. ठाणें बसलें. मोर्चे बसले तेव्हां पेठ लुटली गेली. कांहीं घरें जळालीं. हें सविस्तर काल सेवेशीं लिहून पाठविलें आहे. ठाणें राजश्री जनार्दनपंत लागू यांचें स्वाधीन केलें. ठाणें राखलें पाहिजे यास्तव तूर्त दोनशें स्वार मरंजामी राजश्री भास्करपंत निसबत आपा बळवंत मंगळवेढेकर यांस बरोबर देऊन ठेविले. तेथून गाडदी आल्यानंतर स्वार मिरजेस येतील. स्वार ठेवावयाविशीं श्रीमंतांची आज्ञा झाली त्याजवरून ठेविले. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम माहुली नजीक होता तेथून काल कूच होऊन येथोन कोसावर उतरले. आज तेथून कूच होऊन येथें आले. मंदवारी मिरजेस येतील असें दिसतें. उदईक कोणत्या सुमारें मुक्काम होतो तें समजल्यावर लिहून पाठवितों. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४४५१　　　　श्री　　　　( श्रावण व० १०—५ सप्टें. )

छ० २५ रबिलावल तिस्सा तिसैन श्रावण.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं. अपत्यसमान जनार्दन रघुनाथ. दोनी कर जोडून शिरसा॥ नमस्कार विज्ञापना तागायत छ० २३ रबिलावल पावेतों मुक्काम रहिमतपूर. वडिलांचे आशीर्वादें वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल छ० २२ रोज श्रावण वद्य ९ सोमवारीं येथें ठाणें पडलें. सोमवारीं झाडून लोकसुद्धां दाजीसाहेब गेले. मारगिरी परस्परें फार जाली.

---

१ लागू.

जायां जखमी वीस पंचवीसपर्यंत जाहले. ठार पांच सात व जखमी दहा पंधरा याप्रमाणें जाले. गांवाचे खराबीत बाकी राहिली नाहीं. लुटून अगदीं फस्त जाहला. व घरें कुसवाशेजारची दहा बारा जळालीं. खराबींत कांहीं बाकी राहिली नाहीं. व शिवार लष्करचे मुक्कामामुळें झाडून गेला व घरेंही मोडून नेलीं. वडिलांचे आज्ञेप्रमाणें शंभर माणूस येथें ठेविलें आहे. व राजश्री आपाजी गोविंद यांजकडील स्वार दोनशें ठेवावयाविशीं सरकारची आज्ञा जाहली व मिरजेहून दोनशें गाडदी आणविले आहेत ते येतील म्हणोन वडिलानीं सांगितलें. त्याप्रमाणें दोनशें गाडदी रोजमरा देऊन पाठवावयाविशीं आज्ञा जाहली पाहिजे. गारदीं खराबी जाहली तत्रापि आंतील गृहस्थ पांडुरंगपंत कौल घेऊन जमात सुद्धां निघोन गेला त्याजमुळें गांवांत दहशत भारी. त्याची या प्रांतीं सर्वांस दहशत भारी. त्यांतील माहितगिरी सर्वांनीं समक्ष भाऊसाहेबांस निवेदन केली. परंतु धरिला नाहीं. त्यास येथें गांव भरोन रहावयाची निभावणी होणें कठीण आहे. तरी पदरचा खर्च चालवून ठाणें राखावें असा मजकूर आहे. आकारापेक्षां खर्च भारी दिसतो. पेठचा गांव लुटला गेला व घरें जळालीं त्यामुळें कांहीं शोभा राहिली नाहीं. पुढें जशी आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सर्वप्रकारें अभिमान वडिलांस आहे. सविस्तरें माझा मजकूर वडिलांचे ध्यानांत आहे. सूचनार्थ विनंती लिहिली आहे. दारूगोळी सुद्धां खर्चाची बगमी करून गाडदी दोनशें सत्वर रवाना जाहले पाहिजेत. तूर्त येथें कर्ज घेऊन शिबंदीखर्च चालवूं म्हटलियास कठीण आहे. कर्ज मिळावयाचेंच नाहीं. वडिलांचा आशीर्वाद पार पाडणार आहे. येथील बंदोबस्त करून राजश्री बाळाजीपंत यांस ठेऊन आठ दहा रोजांनंतर निघोन सेवेशीं येतों सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४९२ श्री

याद्री धनगर--

| | | |
|---|---|---|
| रूकडे. | सोनवणी. | गलांडे. |
| ठेले. | देवकांते. | आश्वले. |
| माहार्णवर | खलाटे. | खरात. |
| ठुले. | ढमढेरे. | सोनवलकर. |
| होळकर. | लांबहाते. | कोलेकर. |
| सिंगाडे. | ताकवणे. | ताटले. |

---

१ दामले.

| | | |
|---|---|---|
| शेलार. | मयाळ | दिघे |
| येमगर. | कोपनवर. | मान्ये |
| मदने. | वोलेकर. | मरक. |
| वागमोडे. | शेंडगे. | रूपनवर. |
| काठे. | सलगर. | कोकरे. |
| भिसे. | नारकडे | मिसाळ |
| हजारे | शेलके | हुं. |
| हळनवर. | होड. | कोकाटे |
| लोखंडे. | पांढरे. | वाभळे |
| कांबळे. | भायगुडे. | पारख्ये. |

नं. ४४९३　　श्रीगणपति　　( श्रावण व० ११–६ सप्टें. )

पै॥ छ० २८ रबिलावल. ।तस्सा ।तमन. श्रावण.

अपत्यें रामचंद्रानें दोनी कर जोडून ।शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. ।ागायत छ० २४ रबिलावलपावेतों वडिलांचे आशीर्वादें मुक्काम लष्कर नजीक ।चेठाण येथें सुखरूप असों. विशेष. मिरजेंत माझी राहुटी व चांदणी आहे. त्यास ।डिलीं उंट दोन देऊन मायणी इटेच्या सुमार रवाना करून यावयास आज्ञा ।केली पाहिजे. राहुटी चांदणी लष्करांत पोंचल्यानंतर उंटें माघारीं पाठवितों. ।० २५ रबिलावलीं कळंबीचे मुक्कामाहून वडील सडे होऊन तासगांवास जाव- ।ास निघणार. प्रतिपदा मंगळवारीं येऊन पोंचतील. आम्ही बुणगें फौज सुद्धां ।ायणीचे सुमारें येतां. वडिलांची व आपली भेट जाहलियानंतर मसलत ठरेल ।याप्रमाणें पुढें कर्तव्यता ( मला ) विदित व्हावयाकरितां विनंती लिहिली ।आहे. राहुटीवांचून फार खोळंबा आहे. न[१] भायग्याची राहुटी चांदणी ।ायवानदार आहे ती लौकर आली पाहिजे. ती॥ मातुश्री बयाबाईसही मी इकडे ।आल्याचें सांगावें. चि॥ राजश्री बाबा बाप स्वामींबरोबर आहेत चि॥ दादा ।फौजसुद्धां पुढें आहेत. हरबा आपा त्यांबरोबर आहेत. वडील भाद्रपद शु॥ ८ भौमवारीं प्रातःकाळीं श्रींचे दर्शनास तासगांवास येतात. कळावें विदित ।होय हे विज्ञापना.

नं. ४४९४　　श्री.　　( श्रावण व० १२–८ सप्टें. )

पै॥ छ० २६ रबिलावल सन तिस्सा तिसैन श्रावण.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना तागायत

---

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस २ भायगुडे.

छ० २६ रबिलावल मुक्काम बेलवंडें येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष, स्वामींनीं छ० २३ रबिलावलचें पत्र गोविंदा जासुदासमागमें पाठविलें तें काल पावलें. रहिमतपुरास ठाणें बसल्याचें व तेथें स्वार ठेविले हें सविस्तर सांडणी-स्वाराबरोबर मजकूर लिहून पाठविलाच आहे. व काल जासुदाबरोबर पत्र लिहून दिलें. इतक्यांत जासूद आला तोच पत्रें हल्लीं पाठविलीं आहेत त्याज-वरून सविस्तर विदित होईल. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा व दाजीसाहेब व व हरबा धायगुडे याम फौज देऊन मत करजगी विजापूर तिकोटें-कडे पाठविलें. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजवळ आमची फौज व त्याजकडील दोनतीनशें स्वार मात्र तूर्त आहेत. आज येथून कूच होऊन रामापूरचे सुमारें जाणार. प्रतिपदेस तासगांवास स्वारी जाणार. स्वामींची स्वारी प्रतिपदेस अथवा द्वितीयेस तासगांवास येईलच. साताऱ्याचें वर्तमान पांच असामी वर गेल्याचें श्रीमंतांनीं लिहिलेंच होतें. महाराज खासा खालीं येणार होते. येऊन बोलणें होऊन मग वर लोक जावयाचे होते. वर्तमान आल्यावर सेवेशीं लिहून पाठवितों. किल्यावर तीनशें लोक रास्त्यांकडील गेले. दरवाजा रास्त्यांचे स्वाधीन जाहल्याचीं पत्रें आलीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४९५ श्रीगजानन. ( श्रावण व० १४–९ सप्टें. )

छ० ९ रबिलाखर सन तिस्सा तिसैन भाद्रपद.

अपत्यें बापूजी त्रिंबक परचुरे. साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० २७ रबिलावलपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडे राजमंडळचा फार उपद्रव झाला आहे. राजश्री पांडोपंत गोखले फौजसुद्धां मावनुरांत शहर धरून आसऱ्यानें आहेत. राज-मंडळचा जमाव कारडगीवर आहे. दोन रोजांनीं हे चालून जाऊन लढाया होतात. आज दोन महिनेयांत दहा पंधरा लढाया झाल्या आहेत. गोखले दम धरून आहेत. अद्याप आयांस आले नाहींत. कहीकबाडावर हुल्लड करितात. गोखले यांस जखमा लागल्या होत्या. हल्लीं चांगल्या बऱ्या झाल्या. दमानें आहेत. खर्चाची वोढ पडली आहे. पुढें काय होतें पहावें. ईश्वरसत्ता प्रमाण. सेवेसीं विदित होय बहुत काय लिहिणें. कृपालोभ केला पाहिजे हे विज्ञापना.

नं. ४४९६ श्रीगणपति. ( १० सप्टेंबर. )

पै॥ छ० १ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन. भाद्रपद.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांगनमस्कार विज्ञापना. तागायत श्रावण

व॥ २० इंदुवारपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिली आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. दक्षिणावर्ती शंखाचा मजकूर कळला. वडिलांची स्वारी उदईक श्रींचे दर्शनास तासगांवास जाणार. उत्सव झालेवर मिरजेस येतील. आपली वडिलांची भेट तासगांवीं किंवा मिरजेस होईल ते आज्ञा व्हावी. पुढें मसलतीचा डौल आपले विचारें ठरणार ऐसें आहे. मी आज दिवाखेडी परगणे माईणी येथें आलों. उदईक मुक्काम करितों. पुढें घांटाखालीं जाणेविशीं आज्ञा झाली, त्यास बरडोलचे रोखें जावें किंवा प्रतिनिधीचिया तालुक्यात रहावें ते आज्ञा येईल तसें करीन. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळावें. वडिलांचे दर्शनाचे दिवशी मोठाच उत्साव होईल. ईश्वरें हे दिवस दाखविले. पुढें परिणाम त्याजकडेच आहे. मसलत कशी ठरली ते आज्ञा व्हावी. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४४९७ श्री. ( भाद्र० शु० १–११ सप्तंबर. )

पे॥ छ० २ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन. भाद्रपद.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशी.

अपत्यें समान जनार्दन रघुनाथ. करद्वय जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २९ रबिलावल मुक्काम कसबे रहिमतपुर वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री मानाजी फाकडे यांचीं पत्रें बायांकडे रहिमतपुराविशीं आलीं आहेत व राजश्री नारायणराव बक्षी यांजकडेही त्यांना बोलणें लाविलें आहे कीं, फौज पाठवून रहिमतपुर घेऊन यावें. आपणही पुण्याहून निघोन बायांकडे येणार अशी बातमी दाट आली आहे. आम्हीही माणसें बातमीस पाठविली आहेत. बातमी आली म्हणजे लेहून पाठवितों. शिंद्याकडून कांहीं घालमेल करवितील याजकरितां नारायणराव बक्षी यांचे नांवें पत्र पाठवून यावें म्हणजे मशारनिल्हेस पविष्ठ करितों. बक्षीस पत्र पाठविलें म्हणजे ते बायांचे लष्करांत लिहून पाठवून बंदोबस्त करितील. सरकारांत पुणियास लिहून मानाजी फाकडे यांस रहिमतपुरास परतोन उपद्रव करूं नये म्हणोन निक्षून ताकीद करविली पाहिजे. सूचनार्थ विनंती लिहिली आहे. गांवची खराबी फार झाली. पेठकरी उदमी परागंदा आहेत त्यांचे समजुतीस गांवकरी पाठविले आहेत. समजूत करून आणवितों. सराची घर जळाली त्यामुळें फार जाहली. सोईसोईनें जमा करतों. दोनशें गाडदी पाठवावयाविशीं पेशजी विनंती लिहिलीच आहे त्याप्रमाणें सत्वर दोनशें गाडदी पाठवावयाविशीं आज्ञा झाली पाहिजे. सातारा लुटिला व रहिमतपूर लुटलें त्यामुळें दारू करावयाचें सामान व गोळी अगदीं मिळत नाहीं. पुसे-

सावळीसही शोध घेतला. तेथेंही मिळत नाहीं. यास्तव सरकारांतून दारू वजन पक्के एक मण व शिसें अदमण पाठवावयाविशी आज्ञा झाली पाहिजे. सरकारचे गाडदी आले म्हणजे रयेतस भरंवसा येतो. याजकरितां मल्हार एकादा रोजमरा देववून पाठविले पाहिजेत. तूर्त या सार्या खर्चास येथें मिळत नाही म्हणून विनंती लिहिली आहे. एक रोजमरा द्यावयास आज्ञा होऊन दोनशें असामी लष्कर पाठविले पाहिजेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४४९८ श्री ( भाद्र० शु० १–११ सपट. )

पै॥ छ० ३ रबिलाखर सन तिस्सा तिसैन भाद्रपद.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री व्यंकटराव नरगुंदकर याणीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांजकडे पत्रें व वस्त्रें देऊन राजश्री तिमाजीपंत म्हणोन कारकून रवाना केला तो मार्गी येतांना वस्तीस यादवाडांत राहिला. तेथील मामलेदारानें कारकुनाची जप्ती करून सणगें वगैरे चीजवस्त व घोडीं दोन जप्त करून कारकुनास कैदेंत ठेविला. तो कारकून व सणगें व घोडींसुद्धां काल इंदुवारीं करवीरास आला. सणगें सातआठशें रुपयेचीं आहेत व घोडीं दोन मिळोन दोन तीनशें रुपयेचीं आहेत. येथें आल्यावरही कारकून चवकींत आहे. व बागलकोटकर सावकार याणीं शहापुराहून पोवळीं आठ मण व नक्त वगैरे जिन्नस मिळोन चोवीस हजारांचा व शिवाय पोवळीं होतीं तीं यादवाडांत सावकार लुटिला त्याजवळ जिन्नसांची याद सात हजारांची करून घेतली. पैकीं दरबारखर्चं कांहीं कांहीं जिन्नस तजावजा करून थोडेंबहुत देऊन पावती घेतली. त्यापैकीं पोवळीं वगैरे जिन्नस करवीरास आला. काल इंदुवारीं करवीरास आला. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४४९९ श्रीगणपति. ( भाद्र० शु०२–१२ सप्टें. )

चिरंजीव राजश्री गंगाधरराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहावें. विशेष. तुम्ही पत्र व श्रीच्या उत्सवाकडे भाजी पाठविली ती बीतपशील:–

| वजनी जिन्नस | | सुमारी जिन्नस | |
|---|---|---|---|
| ८१॥ | भेंड्या | १२५ | दोडके |
| ८।१ | मिरच्या | २६० | मेथी पुले. |

---

१ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून मिरजेस.

| | | | |
|---|---|---|---|
| ८।८ | संगा मोवाऱ्या | १५ | कोथिंबीर पुले. |
| ८२८९ | | १० | काळे भोपळे |
| | | ४१० | |

येणेंप्रमाणें जिन्नस पावला. रवाना छ० १ रबिलाखर बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ४५०० श्रीगणपति. ( भाद्र० शु० ४–१३ सप्टें. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ० २ रबिलाखरपावेतों यथास्थित असे. विशेष. श्रीची पालखी हस्तिदंती पेशजी करविली होती ती सामानसुद्धां हल्लीं मानाजी सुरच्याबरोबर पाठविल्याप्रमाणें पावली. बहुत काय लिहिणें. हे आशीर्वाद.

नं. ४५०१ श्रीगणपति. ( भाद्र० शु० २–१२ सप्टें. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत छ० १ रबिलाखर पावेतों उत्तम असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. श्रीच्या उत्सावाकरितां भाजी हरजिन्नस वजनी पक्के सतरा शेर व पुले सुमारी एकशेंएकसष्ट येणेंप्रमाणें पाठविली ते पावली. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० २ रबिलाखर सन तिस्सा तिसैन. भाद्रपद मास.

नं. ४५०२ श्री ( भाद्र ० शु ० ५–१४ सप्टें. )

पै ॥ छ० ४ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन.

[1]सेवेसीं विज्ञापना. कऱ्हाडकर व रास्ते यांची फौज व पायदळ मिळोन चारपांच हजार शिराळ्यास आले. त्याजवरून येथून राजश्री केदारजी मान्ये दोनतीनशें लोक घेऊन शिराळ्यास गेले होते ते व ठाणेंतील कांहीं शिबंदीचे लोक मिळोन बाहेर गेले होते. बाहेरच्या फौजेनें नेट केला ते समयीं मान्ये लोकसुद्धां ठाण्यांत निघोन गेले. बाहेरच्या फौजेनें शिराळ्याची पेठ जाळून ठाण्यास वेढा काल गुरुवारीं दिला. नंतर ठाण्यांतून एक प्यादा लंगोटी घालून निघाला तो आज भृगुवारीं प्रातःकाळीं आला. त्याणें जबानी वर्तमान याप्रमाणें सांगितलें. खेमलापुरास ठाणें घातल्याचें वर्तमान निलजी-करांनीं लिहिलें आहे. निलजीस राजश्री यशवंतराव घाटगे यांजकडून आज

१ पत्र नागो हरि करंदीकर याचें करवीराहून मिरजेस

पंचवीस तीस प्यादे निळजीच्या बंदोबस्ताकरितां रवाना जाले. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५०३ श्री. ( भाद्र० शु० ६–१५ सपटें. )

छ० ८ रबिलाखर. भाद्रपदमास. तिस्सा तिसैन.

तीर्थस्वरूपराजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें समान जनार्दन रघुनाथ. करद्वय जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ४ रबिलाखर मुक्काम कसबे रहिमतपूर वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री आपाजी गोविंद यांणीं कसबे मजकुरास स्वार ठेविले आहेत बीतपशील.–

५० म्हैसाळकर शिंदे.
५० मळणगांवकर शिंदे.
२५ कवठेंकर शिंदे.
१० कुमठेंकर घाटगे.
१० डुबल.
१५ गायकवाड.
१५ पागा मंगळवेढेकर.
२५ तुकोजी घोरपडे देशिंगकर.
२००

येणें प्रमाणें नेमणूक करून स्वार ठेविले त्यांपैकीं येथें निम्मेहीं चाकरीस नाहींत. खर्चास आम्हांपाशीं नाहीं म्हणोन काल स्वार उठोन मिरजेस येत होते. सरंजामी लोक यांणीं आपले गांवाहून खर्चास आणावें तें न करितां तंटा करून जाऊं लागले. त्याजवरून पन्नास पाऊणशें रुपये आम्हीं खर्चास देऊन राहून घेतले आहेत. पुढें आज्ञा येईल त्या प्रमाणें वर्तणूक करूं. स्वारांसही खर्चास आगऊन राहणेंविशीं आज्ञा झाली पाहिजे. मंगळवेढेकर यांची पागा व घाटगे कुमठेकर व मळणगावकर शिंदे यांस सरकारांतून रोजमरा पावतो. त्यांचें बोलणें पौर्णिमेपर्यंत बेजमी आहे. पुढें नाही. खर्चास आल्यास राहूं. नाही तर राहणार नाहीं. त्यास येथें रोजमरे याची सोई नाहीं. गांवांत उद्यमी नाहीं व हंगामाचे दिवस नव्हेत. याजकरितां तूर्त सरकारांतून बेजमी खर्चाची झाली पाहिजे. पुढें आज्ञेप्रमाणें खर्चाची सोई येथें करीन. आज्ञेप्रमाणें येथील बंदोबस्त करितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५०४  श्री.  ( भाद्र० शु० ६–१५ सप्टें. )

पै॥ छ० ५ रबिलाखर सन तिस्सा तिसैन भाद्रपद्मास.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव स्वामींचे सेवेसीं.

पोष्य नारायणराव व्यंकटेश. साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत. छ० ४ रबिलाखर मंद्वार संध्याकाळ वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लेखन करावें. विशेष. आतांच करवीराहून बातमीचें पत्र येथें आलें. शिराळ्यांस कराडकर व रास्ते यांची फौज येऊन गांव लूटून घरें जाळलीं. हें वर्तमान येताच हुजूरची स्वारी काल निघोन शिराळ्यांकडे जावयास पंचगंगा पार झाले. आज सातव्याचे मुक्कामास गेले. फौज पांचशें स्वार व कांहीं प्यादे खासबारदार आहेत. वरकड फौज सरनोबत वगैरे नेजेकडे गेले आहेत. याप्रमाणें वर्तमान आलें तें आपणास कळावयाकरितां लिहिलें आहे. आपली बातमी आलीच असेल. तासगांवासही येथून राजश्री दादबास लिहिलें आहे. तें राजश्री भाऊसाहेबांस सांगतील. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

नं. ४५०५  श्री.  ( भाद्र० शु० ६–१५ सप्टें. )

सेवेशीं विज्ञापना. शिराळ्याचें वर्तमान आलेवर श्री ॥ महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी निघावयाचा बेत जाला. आज भृगुवारी दोन प्रहरा करवीरानजीक पचगंगा खासा स्वारी उतरले. अद्याप लोक उतरले नाहींत. शंपन्नासांनिशीं मात्र महाराज पलीकडे गेले आहेत. आज वैधृत आहे व स्वाति आहेत. याच मुहूर्तावर स्वारी निघाली आहे. राजश्री रायाजी जाधव हे फौजसुद्धां सदलगेवर उतरत होते, त्यांस फौजसुद्धां जलद निघून येणेंविशीं आज्ञापत्र गेलें कीं, पंचगंगेच्या नावच्या उतारावर जलद येणें म्हणोन गेलें आहे. शिराळ्यांस स्वारी जावी असा बेत आहे. दुसरा बेत अंतर्यामींचा आहे कीं, फौज जात नाहीं याजमुळें आपण पलीकडे उतरोन जावें, म्हणजे फौज उतरोन येईल. नंतर फौजेची रवानगी करून आपण माघारे यावें. आज भृगुवारीं सायंकाळीं स्वारी माघारी यावी असाही बेत आहे. तूर्त तो स्वारी नदीपार जाहली आहे. याउपरांत जें होईल तें सेवेशीं लिहून पाठवितों. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ० ४ रबिलाखर तिस्सा तिसैन.

---

१ घोरपडे इचलकरंजीकर. २ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून मिरजेस.

नं. ४५०६    श्रीगणपति    ( भाद्र. शु ० ७-१६ सप्टें. )

चि॥ राजश्री बाळासाहेब यासी आशीर्वाद उपरी. तुम्ही इचलकरंजीहून यजमानांचें पत्र आलें तें पहावयास पाठविलें तें पाहून माघारें पाठविलें आहे. इकडेही बागणीहून वगैरे जागाजागाहून बातमी येत आहे. राजश्री माधवराव रास्ते सातारियाहून चालते जाहले किंवा कसें म्हणोन लिहिलें, त्यास अद्यापि तेथून चालते जाहालियाचीं पत्रें आलीं नाहींत. माणसें त्यांजकडे दोन चार जोडव्या गेल्या आहेत. रवाना छ० ५ रबिलाखर शिरोळेयाकडे त्यांणी शिलशिला लाविला खरा, परंतु गार्दे बसवूं नयेत म्हणजे बरें आहे. महाराजही पलीकडे उतरणार नाहींत. टोकरे वारणातीरचे फार करून फोडले आहेत असें वर्तमान आहे. आपण उद्ईक येतील ते समयीं आम्हांकडील नगारखाना समागमें जाणार म्हणोन कळलें, त्यास नगारखाना तूर्त स्वारीबराबर ठेवूं नये. आहे तेथेंच असावा. लोभ कीजे हे आशीर्वाद.

पे ॥ छ ० ५ रबिलाखर रविवार तिस्सा तिसैन.

नं. ४५०७    श्री    ( भाद्र. शु ० ७-१६ सप्टें. )

पे॥ छ० ६ रबिलाखर सन तिस्सा तिसैन. भाद्रपद.

सेवेशीं विज्ञापना. श्रावण वद्य १३ भृगुवारीं राजश्री राजाज्ञा यांची स्वारी बंकापुरास गेली होती ही बातमी राजश्री धोंडोपंत गोखले याणीं राखून त्यांचे गोटावर जाऊन गोट लुटावा ही मसलत केली. गोखले तयार होऊन गेले तों इतक्यांत राजाज्ञांची स्वारी माघारी आली. त्यांची यांची गांठ मार्गी पडोन लढाई झाली. वीस पंचवीस इकडील व सदरहूप्रमाणें तिकडील लोक जायां जाहले. येणेंप्रमाणें लढाई होऊन उभयपक्षीं समतुल्य होऊन गोखले सावनुरास गेले व राजाज्ञा आपले गोटास आले. याप्रमाणें काल मंदवारी पत्रें आलीं. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५०८    श्री.    ( भाद्र० शु० १०-१९ सप्टें.)

छ. ८ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन. भाद्रपदमास.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें समान जनार्दन रघुनाथ. करद्वय जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ० ८ रबिलाखर मुक्काम कसबे रहिमतपूर वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री पांडुरंगपंत निसबत मानाजी फाकडे कसबे

---

१ नारायणराव घोरपडे इचलकरंजीकर याचें. पटवर्धन हे घोरपड्यांचे उपाध्याय. २ पत्र करवीराहून नारो हरि करंदीकर याचें.

मजकुराहून गेले ते पुण्यास जाऊन पोंचले. तेथील बातमीस नेहमीं आठ माणसें ठेविली आहेत. आजच पुण्याहून बातमी घेऊन जासूद आला बातमी कीं, गांव घेतल्यापासून राजश्री मानाजी फाकडे सरकारच्या वाड्यांत श्रीमंतापाशीं बसले आहेत. बाहेर येत नाहींत. 'रहिमतपूर व मौजे ताठार व शिरवडें हे तीन गांव आम्हांकडे होते ते आमचे आम्हांकडे यावे' याप्रमाणें बोलणें घालून अडान बसले आहेत. श्रीमंत गांव देतों अथवा देत नाहीं यावें निक्षून बोलत नाहींत. परंतु श्रीमंतांची मर्जी पाहतां 'मानाजी फाकडे याणीं आम्हांसाठीं बहुत श्रम भोगले आहेत. याजकरितां यांस सरंजाम लावून द्यावयाचा आहे. रहिमतपूर वगैरे गांव हे मिरजकरांकडील. या गांवचाच आड घेण्याविशीं फाकडे यांचा आहे, त्यापेक्षां द्यावे न द्यावे' अशी मर्जी आहे. मानाजी फांकडे बोलतात कीं, सरकारची आज्ञा व्हावी; म्हणजे एक दिवसांत रहिमतपुरास जाऊन पोंचतों! याप्रमाणें पुण्याचें वर्तमान आहे. श्रीमंत काय आज्ञा करितील याचा भरवंसा येत नाहीं. मौजे कण्हेरखेड नजीक आहे तेथें फाकडे यांजकडील दहावीस घोडीं व माणसें आहेत. तेथें बातमी त्यांची येते. तेव्हां तीं माणसें आठ पंधरा दिवसांत रहिमतपुर घेतां म्हणून बोलतात. याजमुळें वाणी वगैरे उदमी परांगदा झाले आहेत ते गांवांत यावयास दहशत बाळगतात. रोज बातमी नाना प्रकारची बाजार आवाई येते. याजकरितां येविशीं श्रीमंतांस पत्र पाठवून फांकडे यांस सरकारांतून ताकीद झाली पाहिजे. मिरजेहून गाडदी रवाना झाले ते येऊन पावले. हजिऱ्या मागाहून पाठवून देतां. रोहिले अथवा आरब तेथें असल्यास पन्नास असामी पाठवून द्यावयाची आज्ञा व्हावी. दारू अथवा सामान इकडे मिळत नाहीं. याजकरितां आणखी दारू एक मण व गोळ्या अदमण आली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. येथें कमावीसदार पेशजी मानाजी फाकड्याकडील होता त्यानें आपले आरब वगैरे सरंजाम वेलीस (?) ठेऊन आपण सद्धा पुण्यांत गेला आहे. त्याची मसलत एक वेळ येथें यावें ही फार आहे. व मानाजी फाकडे येविशीं आग्रह करीत सरकारवाड्यांत उपाशी बसले आहेत. त्यांस अद्याप सनद दिली नाहीं याजकरितां पुण्यास सरकारांत लिहून सत्वर बंदोबस्त केला पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ४५०९ श्री. (भाद्र० शु० १०—१९ सपटें.)

छ. ८ रबिलाखर. भाद्रपदमास. तिस्सातिसैन.

अपत्यें समान जनार्दन रघुनाथ. करद्वय जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे, राजश्री आपाजी गोविंद याणीं दोनशें स्वार कसबे रहिमत-पुरी ठेविले होते त्यांस डोंगरांतून कुरणाचें गवत आणा म्हणत असतां आणीत नाहीत. आम्हांशीं जाबसाल करितात कीं, 'आमचे तट्टू कोणी पाडून नेले तर तुम्हीं भरून द्याल तर जाऊं. नाहीं तर जात नाहीं. याप्रमाणें जाबसाल करून रयतेचे शेताचे बांधाचें गवत कापीन कजिया करून स्वार न पुसतां उठोन गेले-

१० डुबल.

१५ गायकवाड.

१० घाटगे.

२५ तुकोजी घोरपडे देशिंगकर.

एकूण साठ स्वार निघोन गेले. दररोज गावचे रानांत वैरण आणीत. त्यांस समजाऊन गांवकरी यांस व स्वारांस सांगतच असोन– रयतेचे बांधानीं गवत आहे, कुरणें नाहीत,– याजमुळें रोज बोभाट येतात. त्यास समजाऊन सांगत असतां स्वार न पुसतां निघोन गेले. सेवेसी कळावयाकरितां लिहिलें आहे. श्रीमंत राजश्री बाबासाहेब तासगांवाहून संड पांचशें फौजेनिशी काल आरवीचे मुक्कामास आले. आज सातारियास जाणार. यांतील अर्थ समजत नाहीं. इकडे बाजारी बातमी नाना प्रकारची बोलतात. यास्तव विनंती लिहिली आहे. सविस्तर लिहावयास आज्ञा झाली पाहिजे. सेवेशी श्रुत हे विज्ञापना

नं. ४११० श्री (भाद्र० शु० १०–१९ सप्टें.)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री जनार्दनपंत स्वामीचे सेवेशीं

विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ ८ रबिलाखर जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. आपण बहुता दिवशीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. मानाजी फांकडे यांजकडील मजकूर तरी सध्यां ( त्यांस ) समाधान नाहीं. एक दोन दिवस सरकारचे वाड्यांत बसले होते. रास्ते यांस सरकारचें पत्र देणार कीं, भाऊंचा सरंजाम निवडून सुटे तों मानाजीबावांकडे ठाणें होतें तसें असों देणें. ऐसें पत्र सरकारचें घेऊन पाठविणार. त्यांजकडे गोविंदपंत शिरढोणकर कुलकर्णी ( आमचा ) स्नेही आहे. कच्चा पक्का शोध तेथें कळतो. आपण लिहिल्यावरून नेहमी कारकून पाठवून वर्त-मान आणवीत असतों. आपल्याकडील एक जोडीही येथें आहे त्यांस ही

---

१ पत्र बाळासाहेबास मिरजेस रहिमतपुराहून. २ हरि परशुराम.

ताकीद करून आम्हांस येऊन भेटत जावें ऐसी ताकीद केली आहे. चिरंजीव राजश्री तात्या घरीं आहेत. बारीक मोठा परामर्ष करीत जावा. आपल्याकडील देण्याघेण्याचा गुंता आहे, दोन सालें कसाल्याचा मजकूर आपणास समजलाच आहे, संभाळून सालमजकुरीं न्यावें. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ४५११ श्री. ( भाद्र० शु० १०–१९ सप्टें. )

पै॥ छ० ८ रबिलाखर सन तिस्सा तिसैन भाद्रपद मास.

विज्ञापना विशेष. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब व राजश्री नाना व राजश्री दौलतराव शिंदे यांच्या भेटी झाल्या म्हणोन वर्तमान इकडे दाट आहे, व शिंदे व बाया यांच्या भेटी होणार असें बोलतात. तेथें सविस्तर समजलें असेल. त्याहावयासी आज्ञा झाली पाहिजे. मानाजी फांकडे नारायणराव बक्षी यांजकडे कुमक मागतात व रहिमतपुरावर घासदाण्याचे रोखे करणार. बायांचे लष्करांत फत्तेसिंग माने पाटील कसबे मजकूर असतात त्यांस सांगोन गांवावर घासदाण्याचा रोखा करणार म्हणोन वर्तमान आहे याजकरितां विनंती लिहिली आहे. नारायणराव बक्षी यांस पत्र पाठविलें पाहिजे म्हणजे येथून रवाना करितों. मानाजी फाकडे यांस सरकारांतून ताकीद निक्षून आली म्हणजे इकडे उपद्रव करणार नाहींत. बातमीस माणसें पाठविली होती. आजपर्यंत मानाजी शिंदे पुण्यांतच आहेत. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५१२ श्रीगणपति. ( भाद्र० शु० १०–१९ सप्टें. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरि. चिरंजीव सौभाग्यवती रमाबाई मिरजेस येणार. त्यास पालखी पाहिजे. याजकरितां उदईक गुरुवारीं सूर्योदयापूर्वी पालखी येथें येऊन पोंचेल अशी पाठवून द्यावी. रवाना छ० ८ रबिलाखर बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ४५१३ श्रीव्यंकटेश. ( भाद्र० शु० १४–२३ सप्टें. )

पै॥ छ. २९ रबिलाखर तिस्सा तिसैन. भाद्रपद.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं

पोष्य व्यंकटराव भास्कर. साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम तागायत छ० १२ रबिलाखरपावेतों आपले कृपेकरून यथास्थित असे. विशेष.

---

१ जनार्दन रघुनाथ लागू यांचें रहिमतपराहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र.
२ भावे नरगुंदकर. पत्र नरगुंदाहून.

आपण पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री भाऊसाहेब यांची स्वारी तासगावास आलियावें कळोन संतोष पावलों. अलीकडे पुणेकडील वगैरे बेत ठरल्याचें सविस्तर निरोपावें. गोखले सावनुरीं आहेत. राजाज्ञा हुलगुरावर आहेत. उभयपक्षीं दररोज लढाई होत आहे. उभयपक्षीं दमही चांगला आहे. आणखी आठ चार रोजी एक युद्ध मातबर घडावें असा बेत दिसतो. श्रीसत्तेकडून घडेल तेंच प्रमाण. अलीकडील बेत ठरल्याचें व पुणेंकडील वगैरे सविस्तर निरोपिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा करावी हे विनंती.

नं ४५१४ श्रीगणपति. ( भाद्र० शु० १४-२३ सप्टें. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ० १२ रबिलाखर पर्यंत यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. "मौजे रेठरें येथें प्रतिनिधीकडून व रास्ते यांची फौज कराड प्रांतीं गेली आहे त्यांकडून उपद्रव लागतो. येविशीं प्रतिनिधींस व रास्ते यांस पत्रें लिहून इकडे पाठवावीं;" म्हणून लिहिलें तें कळलें. ऐसियास प्रतिनिधीकडील गांवांस इकडून चिठीपत्र होऊन उपद्रव लागतो, तेव्हां आम्हीं त्यांस पत्र दिलें असतां बंदोबस्त होणार नाहीं. याकरितां परभारें आपणच त्यांस लिहावें. रास्ते यांजकडील राजश्री निंबाजी कान्हो कराडप्रांतीं आले आहेत त्यांस परभारें येथून लिहून पाठविलें आहे. करकंबेहून राजश्री भगवंतराव यांचें पत्र आपणास आलेलें व त्यांचे नांवचें पत्र व देशपांडे यांचें पत्र एकूण तीन पत्रें मोंगलाचे लष्करच्या बातमीचीं आलेलीं पाहावयास पाठविलीं तीं पाहून पाठविलीं आहेत. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० १२ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन. भाद्रपद.

नं. ४५१५ श्रीगणपति. ( भाद्र० शु० १५-२४ सप्टें. )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसी आशीर्वाद उपरी. आपण चिठी पाठविली ते पावली. तोंडलीं व हदग्याच्या व शेवग्याच्या शेंगा पाठविल्याप्रमाणें पोहचल्या. रवाना छ० १३ रबिलाखर. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ४५१६ श्री. ( भाद्र० शु० १५-२४ सप्टें. )

पै॥ छ० १३ रबिलाखर. तिस्सा तिसैन.

[1]सेवेशीं विज्ञापना. इकडील वर्तमान तर वे॥ राजश्री रघुनाथभट वैद्य याणीं

---

१ नारो हरीचें पत्र करवीराहून मिरजेस. यातल्या पुण्याकडील बातम्या सर्व खोट्या आहेत.

राजश्री धोंडोपंत गोखले यांस पत्रें पाठविलीं होतीं त्याचें उत्तर आलें. सहा रोजांचें वर्तमान. (राजाज्ञा लिहितात कीं) अलीकडे लढाई वगैरे कांहीं नाहीं. शिलशिळा थोडाबहुत आहे. इतक्या सामानास धोंडोपंत मोजीत नाही. इकडील कुमकेची मार्गप्रतीक्षा फार करीत आहेत. भटजींसही लिहिलें आहे कीं, तुम्ही कुमकेविशीं विनंती करावी, असें लिहिलें आहे. पुण्याकडील वर्तमान शिंद्यांच्या व बायांच्या भेटी श्री॥ राजश्री अमृतरावसाहेब यांच्या विचारें जाल्या. श्री॥ राजश्री नाना कांहीं लोक ठेवावयाची योजना करीत होते त्यास ठेऊं नयेत येविशी सरकारांतून ताकीद जाली. सदरहू वर्तमान राजश्री रखमो रामचंद्र यांचा गडी पुण्याहून आला त्याचें वर्तमान आहे. तिकडे अधिकोत्तर असल्यास कळवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री काशीबा होळकर याजवळ फौज होती ती श्री॥ अमृतरावसाहेब यांजकडे राजश्री मल्हारराव होळकर याचे निसबतीस आली. काशिबाजवळ फौज नाहीं असेंही वर्तमान आहे. हे विज्ञापना.

नं. ४५१७　　श्री.　　( भाद्र० शु० १५–२५ सप्टें. )

पै॥ छ० १४ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन भाद्रपद.

सेवेशी गणेश गोविंद. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागायत छ०१४ रबिलाखर पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं काल जासुदाचे बरोबर पत्र पाठविलें तें पावलें. "रहिमतपुरास स्वार ठेविले होते त्यापैकीं डुबळ, गायकवाड, घाटगे व घोरपडे देशिंगकर चार असामीनीं तेथें वैरणीविशीं कजिया करून न विचारतां उठोन आले म्हणोन राजश्री जनार्दनपंत यांचें पत्र आलें. त्यास तेथें आले असल्यास ताकीद करून माघारे पाठवून देणें. तेथे आले नसल्यास परभारें घरीं गेले असले तर लिहिणें" म्हणोन आज्ञा, त्यास स्वार येथें येऊन चार दिवस जाले. परंतु त्यांचे बोलण्यांत आपण आलों, वरकडही मागाहून येत आहेत, ऐसें बोलले. तेव्हां सरकारचें पत्र गेलें असेल असें भासलें. हल्लीं स्वामींचें पत्र आलें त्याजवरून चौघांसही ताकीद केली. माघारे जातों म्हणत आहेत. आज अगर उद्ईक कांहीं निघोन जातील. घाटगे तर घरास गेले आहेत. म्हैसाळकर व मळणगांवकर व कवठेकर खासा कोणी चाकरीस येत नाहींत. येविशीं पेशजी स्वामींस विनंती लिहिली होती. स्वामींनीं त्यांजकडे पत्रें पाठविलींच असतील. अद्याप कोणी खासे चाकरीवर येत नाहींत. देशिंगकर घोरपडे, डुबळ, गायकवाड, घाटगे यांजकडील स्वार कांहीं आहेत निमेनिम्मे देखील चाकरी होत नाहीं.

आम्ही येथें ताकीद राज करितों, (त्यांचे दारीं) गाडदी बसवितों, परंतु उपाय चालत नाही. त्यास झाडून सरंजामी यांजकडे पत्रें व माणसें पाठवावीं. चाकरीवर येथें आल्याचें समजलें म्हणजे मग माणसानीं उठोन यावें. याप्रमाणें जाहल्यास कांहीं स्वार व खासे येतील असें दिसतें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५१८    श्रीगणपति.    ( भाद्र० व० १–२६ सप्टें. )

चि॥ राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. आपण पत्र पाठविलें तें पावलें. तोंडलीं व पोकळ्याच्या जुड्या पाठविल्या त्या पावल्या. कवलापूर वगैरे गांवीं कुरणें आहेत त्यांस कहीचा उपद्रव होऊं नये म्हणोन लिहिलें तें कळलें. गोटांत ताकीद निक्षूण करविली आहे. आपण रखवालीस राऊतही ठेवावे. रवाना छ० १५ रबिलाखर. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ४५१९    श्रीगजानन.    ( भाद्र० व० २–२७ सप्टें. )

पे॥ छ० २१ रबिलाखर. सन तिस्सा तिसेन. भाद्रपदमास.

अपत्यें बापुजी त्रिंबक परचुरे शिरसा॥ नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० १६ राबलाखर पावेतों ठाणें कुसेगल येथें वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. वडिलांकडून अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तर सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळ केला पाहिजे. यानंतर राजश्री धोंडोपंत गोखले फौजसुद्धां सावनुरास आहेत. राजमंडळकर फौजसह नजीक दोन कोसांवर कारडगीवर आहेत. यांच्या त्यांच्या दोन तीन दिवसानीं फौजेचे तलाब्यावर हिरिऱ्या होतात. पांच सात लढायाही जाहल्या आहेत. परंतु गोखले दमानें आहेत. राजमंडळकर यांची फौज भारी आहे म्हणोन समीप राहिले आहेत. राजमंडळकर यांनीं प्रांताप्रांतांत बहुत उपद्रव मांडला आहे. हुबळीस कांहीं घरीं राहिला पदार्थही लुटतात. व पेंढारी आणून घरंही खणतात. याप्रमाणें हुबळी वगैरे झाडून गांवोगांव मांडलें आहे. याप्रांतीं फौज येऊन बंदोबस्त होईल तेव्हां खरा. फौजा इकडे कधी येणार तें ल्याहावयास आज्ञा करावी. ती॥ राजश्री भाऊसाहेब श्रीचे उत्साहास आले, पुढें स्वारी या प्रांतीं कधी होणार ती आज्ञा व्हावी. सेवेशीं विदित होय. बहुत काय लिहिणें. कृपालोभ केला पाहिजे हे विज्ञापना.

नं. ४५२०    श्री.    ( भाद्र० व० ३–२८ सप्टें. )

सेवेशीं विनायक विश्वनाथ सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० १७ रबिलाखर मुक्काम सातारा. यथास्थित असे. विशेष. श्री॥ राजश्री बाबासाहेब येथून लौकरच माघारे यावे या बेतानें तासगांवाहून निघाले. परंतु रास्ते येथून पुण्याचे आज्ञेखेरीज कूच करून पुढें येत नाहीं आणि श्री ॥ राजश्री बाबासाहेबही रास्ते याणीं येथून कूच केल्याशिवाय येत नाहींत. त्यांचे विचारेंच करणार, यास्तव तूर्त राहिले आहेत. रास्ते यांजकडील वे॥ राजश्री बाबू भटजी जोग पुण्यास गेले आहेत ते आल्यावर काय तें ठरेल. शिलेदार मंडळी लौकरच माघारे जाणेंचें म्हणोन सडेच आले होते. इकडे पर्जन्य वळीव बहुत लागला आहे. पाल पडताळ देखील लोकांनीं आणिले नाहींत. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५२१ श्री. ( भाद्र० व० ५–३० सप्टें. )

पै॥ छ० १९ रबिलाखर तिस्सा तिस्सैन.

अपत्यें समान जनार्दन रघुनाथ करद्वय जोडून शिरसा॥ नमस्कार विज्ञापना ऐसी जे, म्हातारजी नाईक रामोशी सातान्यास श्री॥ राजश्री महाराजांपाशीं चाकरीस होता तो रहिमतपुरास आहे म्हणोन रास्ते याणीं स्वारी पाठविली. बराबर राजश्री बाबासाहेबांचें पत्र होतें तें आम्हांस अगोदर न दाखवितां आम्ही सातान्याहून रास्ते यांजकडील स्वार आहों म्हणोन सांगोन गांवांत शिरोन लुटालूट केली. नंतर पत्र आम्हांस दिलें ! गांवांत रामोशी मजकूरही नाहीं. त्याणीं चौकशी केली. तेव्हां आम्हीं त्यांस सांगितलें, तुम्ही रास्तेकडील लोक असतां सरकार कामास आल्यास आपले कामाची चौकशी करावी तें न करितां गांव लुटला हें काय आहे ? त्याणीं उत्तर केलें कीं, गांवाचा नागावा गेला आहे ( म्हणतां ) त्यास आमचे लोकांचा झाडा घ्यावा ! त्याचीही चौकशी करितां कांहीं पांघरुणें मात्र सांपडलीं ! आणखी कांहीं सांपडलें नाहीं. राऊत तेव्हांच घेऊन गेले. हजार दोन हजारांस गांव नागवून गांवचा रखवालीदार रामोशी होता त्याजकडे कंड्या आहे म्हणोन धरून घेऊन गेले. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५२२ श्री. ( भाद्र० व० ६–१ आक्टों. )

छ० २२ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन भाद्रपद.

---

१ चाफेकर. हरि परशुराम तासगांवाहून सातान्यास आले तेव्हां त्यांबरोबर मिरजकरांकडील स्वार होते त्यांवरचा हा कारकून. २ हरि परशुराम उर्फ हरिपंत बाबा पटवर्धन यांचें.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें समान जनार्दन रघुनाथ. करद्वय जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २० रबिलाखर मुक्काम कसबेर हिमतपूर वर्तमान यथास्थित असे. विशेष. पुण्याहून आतांच बातमी आली कीं, राजश्री मानाजी शिंदे रहिमतपुराबद्दल अडोन बसले होते. त्याजवरून सरकारची आज्ञा झाली कीं, रहिमतपूर द्यावयाचें नाहीं. दुसरा परगणा तुम्हांस देऊं. या प्रमाणें होऊन शंकराजी घोरपडे यांजकडे इंडी तांबें सरंजाम आहे तो द्यावा या प्रमाणें श्रीमंत बोलले. त्याजवरोन सरकार सरंजामी लोक सर्वत्र मिळोन अडोन बसले कीं, "बहुत दिवसांचे आम्हीं पदरचे असतां आज घोरपडे यांचा सरंजाम काढून दुसऱ्यास देणार. तेव्हां पुढें आमचे ही सरंजाम जाणार. त्यापेक्षां आजच आम्हांस विडे द्यावे" म्हणोन आड पडल्यामुळें तोंही मजकूर राहिला. तेव्हां फाकडे याणीं विनंती केली कीं, आमचें कांहींच बोलणें चालत नाहीं तेव्हां राहून तरी काय व्हावयाचें आहे ? या प्रमाणें बोलोन आम्हांस कळेल तिकडे जाऊं असें म्हणून शहराबाहेर कोतवालाच्या वाड्यानजीक ढाल देऊन पांच सातशांनिशी उतरले आहेत. त्यांजकडील कारकून पांडुरंगपंत येथें होते त्यांचें पत्र मौजे वाठार येथील मोकदमास आलें कीं, गांवचा वसूल देऊं नये. खलेल करावी, आठ चार रोजांत आम्ही येतों, म्हणोन आलें. व मौजे कनेरखेड येथें त्याची पागा वीसपंचवीस घोडीं व माणसें आहेत त्यांसही पत्र आठ चार रोजांत येतों म्हणोन आलें. याप्रमाणें वरच्यावर बातम्या येतात. यास्तव रयत परागंदा झाली आहे ती या धास्तीमुळें गांवांत येत नाहीं. येथें गाडदी व स्वार आहेत यांत समयास दम धरून लढाई मारी असा जमातदार वगैरे कोणी नाहीं. यास्तव मर्द माणूस समयास काम काज करी असा बरोबर पन्नास गाडदी चांगले देऊन पाठविला पाहिजे. विशेष स्वारांचें काम नाहीं. समयास निभावणी स्वारांची होतां कठिण, यास्तव पायदळ असावें यास्तव विनंती लिहिली आहे. गाडदी येथें आहेत ते जातों जातों म्हणतात येविशींची विनंती पेशजी लिहिली आहे. हें ठाणें लढाऊ नव्हे. सारी भिस्त लोकांवर आहे याजकरितां विनंती लिहिली आहे. सेवेसीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५२३ श्रीगणपतिर्जयति. ( १ आक्टोबर )

पे॥ छ० २० रबिलाखर. तिस्सा तिसैन. भाद्रपद.

अपत्यें चिंतामणीनें दोनी कर जोडून शिरसा॥ नमस्कार विज्ञापना.

---

१ निशाण रोवून. २ पत्र मिरजेस बाळासाहेबांस.

तागायत भाद्रपद वद्य ६ इंदुवासरपर्यंत वडिलांचे आशीर्वादें करून सुखरूप असे. विशेष. कै॥ नानासाहेबांचे पक्षाकरितां आजच येणार होतों, परंतु येथें कै॥ रामचंद्रपंत आपा यांचा पक्ष आजच. वडिलांचे हाताखालीं ब्राह्मणांची पूजा वगैरे करावयास पाहिजे, म्हणोन राहिलों. +ती राजश्री विठ्ठलराव काकी-हीं नाहींत म्हणून राहिलों. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५२४ श्री. ( भाद्र० व० ८–३ आक्टो. )

पै॥ छ० २४ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन भाद्रपदमास.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री रायाजी जाधव यांस अंकलीचे ठाण्याविशीं पेशजी आज्ञापत्र गेलेला मजकूर सेवेशीं लिहिलाच आहे. आज बुधवारी जाधव यांजकडे थोरली तोफ व मुसा इस्मिथ फिरंगी याजकडील लोक तीनचारशें रवाना होत आहेत. दानोळी कोथळीपासून भिडसगांवपर्यंत वारणा पैलतीरीं उतारानीं इकडील चौक्या बसविल्या आहेत. दुसरी गर्नाळ थोर पेशजी ओत-विली त्या प्रमाणें हल्लीं तयार होत आहे. वरकड सामान बंदुका व जेजाला वगैरे कारखाना चाललेला आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५२५ श्री. ( भाद्र० व० ९–४ आक्टो. )

सेवेसीं कृष्णाजी परशुराम गद्रे सा॥ नमस्कार विज्ञापना तागायत छ० २३ रबिलाखर गुरुवासर चार घटका दिवसपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ० २२ रबिलाखर रोज बुधवारीं करवीरकरांच्या फौजेबरोबर लढाई जाली त्याचा तपशील कलमें–

१ मंगळवारीं भोजनोत्तर सर्वत्र मानकरी भलेलोक व शिलेदार व गाड-यांचे जमादार व रोहिले व आरब वगैरे यांस बोलावूं पाठवून ती॥ राजश्री दादांनीं विचारलें कीं, "करवीरकर महाराज यांचे फौजेचें प्राबल्य होऊन दिवसेंदिवस बळावत चालली. सावनूरचे रस्ते बंद जाहले. दाणा मिळत नाहीं. खर्चाचा गवगवा, ( तुमची ) तलबही चढली आहे. आणि कृष्णराव देशपांडे कारडगीकर हे दक्षिणस्थांची फौज हरिहरानजीक आहे तेथें कुमक आणावया-

१ गोविंदहरी यांच्या. २ भाऊ अशक्त म्हातारे आणि त्यांची पितरें फार. तीमचार्लीस ब्राह्मण असले तर ऊठबस आणि सव्यं अपसव्यं करता करतां अर्धा जीव व्हावयाचा ! चिरंजीव मंडळीपैकीं कोणी हाताखालीं असला म्हणजे बरें ! ३ यादवाडकर. + येथून खास दस्तुर. ४ नारो हरि कार्दीकर यांचे पत्र करवीराहून मिरजेस. ५ पत्र सावनुराहून. ६ धोंडोपंत गोखले. ७ टिपूची फौज करवीरकरांच्या कुमकेस आणण्याकरिता.

बद्दल गेले आहेत. कुमक आल्यानंतर सर्वत्र एकमत होऊन शहरावर चालोन घ्यावें असा (शत्रूचा) बेत ठरावांत आला. सावनुरांत खैरुमियांचा आहे त्याचेंही संधान करवीरकराचे आहे हें पक्केंच समजणेंत आहे. त्यापक्षीं दिवस घेऊन परिणाम नाहीं. तूर्त मजजवळ पैसा नाहीं. परंतु माझ्या रक्षणार्थ श्रीमंतांचें पुण्य आहे तेंच पार पाडणार. तुम्ही सर्वत्रांनी मजवर कृपा करून करवीरकरांची फौज फार व आम्ही थोडे हें चित्तांत न आणितां मारुतीचें नांव घेऊन तीन टोळ्या करून लहान थोरानी एकसारखें चालोन घ्यावें. माझी जखम ओली आहे. परंतु श्रीमंतांचे कृपें या प्रसंगीं ती जखम ओली असें मला भासत नाहीं. सर्वत्रानीं कृपा केली असतां फत्ते होते. अगर दुसरें, सर्व संकटांतून दूर होतों! या रीतीनें दादानीं पदर पसरून सर्वत्रांस मागून घेतलें. तेव्हां सर्वत्रांनीं म्हटलें कीं, दादा, आपण धन्याच्या जागीं आम्हांस. आपण जी आज्ञा केली ती आम्हांस मान्य आहे. आपणास जखमा लागल्या त्या समयीं आम्हा सर्वत्रांची चाकरी घडली नाहीं. आमच्या चित्तांत आपली आज्ञा व्हावी इतकेंच मागणें आहे. सर्वांचें बोलणें एकच पडोन सर्वांस गोष्ट मान्य होऊन चालोन घ्यावयाचा निश्चय ठरला. कलम.

१ छ० २२ रबिलाखर रोज बुधवार बारा घटका दिवसास झाडून फौज व पायदळ व कवाइती व आरब तोफखानासुद्धां झाडून सलतनसुद्धां तयार करून खुद्द दादा पालखींत बसोन शहराबाहीर आले. तों करवीरकरांच्या व आपले लष्करच्या मध्यें ओढा आहे त्या अलीकडे इकडील फौज गेली. तंव पावेतों करवीरकरांच्या गोटाजवळ छबिनामात्र होता तो कांहीं अलीकडे येत नव्हता. राहिल्या जागींच उभा होता. तें पाहोन पायलोक आम्हांकडील पुढें घातले. त्यांचे पाठीवर दोनशें स्वार उभे केले. इतकेंत करवीरकरांकडील लोक ज्या ओढ्यांत होते त्याच ओढ्यांत येऊन पडले. इकडील पायदळास त्यांजकडील पायदळास गोळागोळी होत होती. हें त्याणीं पाहोन त्यांची फौज झाडून पांच सहा हजार खासे तयार होऊन फरा धरून उभे राहिले. तें दादानीं पाहोन पहिल्या संकेताप्रमाणें टोळ्या जाहल्या. उजवे बाजूस राजश्री बापूसाहेब यांचे मांडीस निव्वळ हजार खासे, डावे बाजूस राजश्री आपासाहेब यांचे मांडीस सातआठशें खासे, मध्यें पायदळ व तोफा व आरब. त्यांचे पाठीमागें खुद्द दादा. (याप्रमाणें) झाडून फौजसुद्धां तयार होऊन चालोन घ्यावयाची योजना करीत असतां इकडील डावे बाजूच्या तुकडीवर करवीरकरां-

१ सावनूरचा नबाब.

कडील दीड हजारपर्यंत खाशानीं चालोन घेतलें. ते बंदुकीच्या गोळीच्या टप्पेवर निकड करीत आले पाठीमागें त्यांची झाडून फौज तयार होऊन येत होती. इतक्यांत इकडील तोफेची मारगिरी व लयनांच्या[1] शिलका झडूं लागल्या. त्या त्यांणीं खातरेंत न आणितां सर्वत्र जथन निकडीनें घोडीं घातलीं. तेव्हां निकडीचा समय. या समयीं कमती जाली असतां थर बसणार नाहीं, हें समजोन दादा घोड्यावर बसोन श्रीमंतांचे चरण हृदयांत आणोन दोनी गोळ्यासुद्धां चालोन घेतलें. उभयपक्षीं खणाखणी अर्ध घटकापर्यंत मातबर जाहली. इकडील निकड विशेष जाहली त्यासमयीं करवीरकरांचा मोर्चा किंचित माघारा जाहला. तेव्हां सर्वत्रांनीं निकड करून पाठलागावरून त्यांच्या गोटांत शिरले त्यासमयीं त्यांच्यानें गोटांत निभाव न पडसें होऊन गोट सोडून निघाले. त्यांच्या पाठीस दोन कोशपर्यंत पाठलाग केला. इतक्यांत अस्तमान जाहला. दिवस असता तर आणखी पाठलाग होता. परंतु रात्र जाली दिसेनासें जाहलेमुळें माघारे फिरोन त्यांच्या तळावर येऊन मुक्काम केला व डेरे राहुट्या बाजारबुणगे वगैरे झाडून लुटलें गेलें लूट माफ म्हणोन चालोन घेते समयीं सर्वांस सांगितलें होतें. कलम.

१ त्याजकडील खास ठार व जखमी मिळोन चारशेंपर्यंत अजमासें होईल. मुख्य खद्द पांढरे सरदार व वेंकटराव घोरपडे व नीळकंठराव शिंदे मनोळीकर व मोंगलाकडील पठाण मातबर सरदार होता तो याप्रमाणें चार असामी ठार जाहले कोणी जखमी म्हणतात व हिमतबहादर यांस तीन जखमा लागल्या. याप्रमाणें मोड खावून कुंदगोळच्या मार्गानें गेले. कलम.

१ इकडील खासे पायलोक वगैरे सुद्धां दोनशें पर्यंत ठार व जखमी होतील. अद्याप गणती लागली नाहीं. मागाहून सविस्तर लिहितों. कलम.

१ सरकारांत करवीरकरांकडील हत्तीवरील साहेबनोबत व निशाणें दोन व तोफा दोन सरंजामसुद्धां व हत्ती व पालख्या वगैरे आलें. गणती जाल्यावर मागाहून कळवितों. कलम.

१ एकंदर लष्करांत लहानमोठे घोडे मिळोन पाच सातशें व उंटें पावणे-तीनशें व डेरे दोनसुद्धां व गुरें बकरीं वगैरे लूट भारी जाहली आहे. यांचें पक्कें समजेल तें मागाहून लिहितों. तूर्त जाहलें वृत्त समजलें तें जलदीनें कळावें म्हणोन लिहिलें आहे. कलम.

---

१ लयनाच्या शिलका = कवाइती पायदळाच्या बंदुकांची फेर. लयन अथव लेण हा Line या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश.

एकूण सहा कलमें लिहिलीं आहेत. सारांश श्रीमंतांच्या पुण्योदयेंकरून
िच्या कृपें मोठें यश आलें. अस्मानी फत्ते जाहली असें आहे. विदित
विज्ञापना.

४५२६ श्री. ( भाद्र० व० १०—५ आक्टो. )

पै छ० २४ रबिलाखर सन तिस्सा तिसैन भाद्रपद मास.

सेवेशीं विज्ञापना. वे॥ राजश्री रघुनाथभट वैद्य पुण्याहून करवीरास
ाहेत त्यांजकडील कारकून पुण्याहून करवीरास येऊन दोन रोज
त्याच्या सागग्यांत वर्तमान कीं, बाया फौजसुद्धां मलटण म्हणोन
ुण्यापासून सहासात कोसांवर आहे तेथें गेल्या. शिंदे तेथें बायांचे
जाणार. श्रीमंत राजश्री नानाही शिंदे बरोबर जाणार. श्रीमंत राजश्री
बसाहेबही जावयाचा बेत आहे. तेथें शिंद्यांस व नानांस कैद करावें
ेत योजून शहराजवळून फौजेचा गवगवा (बायानीं) दूर काढिला. हा
तर्यामी बायांचा व अमृतरावसाहेबांचा. बाह्यात्कारी बायांच्या भेटीस
च भाव. भेटी होऊन शिंदे बायासुद्धां पुढें निघोन जातें ऐसें बोल-
रंतु अंतर्यामींची न कळे. ऐसें वर्तमान आहे. भटजी गुरुवारीं
जाण्यास निघोन येणार. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांची भेट घेऊन
. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

४५२७ श्रीगजानन. ( भाद्र० व० ११—६ आक्टो. )

छ० ५ जमादिलावल. सन तिस्सा तिसैन. आश्विन.

अपत्यें बापूजी त्रिंबक परचुरे दोनी कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार
ना येथील क्षेम तागायत छ० २५ रबिलाखर मंदवारपावेतों वडिलांचे आशि-
रून सुखरूप असों. विशेष. इकडील वर्तमान राजश्री धोंडोपंतदादा गोखले
बुधवारीं सावनुराहून तयार होऊन करवीरचे सरदार रत्नाकरपंत वगैरे
र चालून जाऊन चांगली मातबर लढाई झाली. तीन टोळ्या करून
हरा कवाइती गाडदी व तोफा यांचा मार देऊन करवीरकरांचा मोड
नें झाला. बुधवारीं प्रहर सत्रीस मोड होऊन करवीरकर सरदार
रपंतसुद्धां प्रीतीगाव चव्हाण देखील सडेनिशीं दोन चारशें स्वारांनिशी
गीवरून कुंदगोळास आले. तेथें न राहतां नवलगुंदास गेले. धोंडोपंत
याणीं तोफा व हत्ती बुणगें तमाम लुटलें. बाजार झाडून लुटला. कांहीं
यांस आगी दिल्या. बाकीची तमाम लूट केली. करवीरचें हजार माणूस ठार

झालें. घोडे हजारपर्यंत गोखले यांचे लष्करांत पाडाव आले म्हणून वर्तमान आलें. पक्कें वर्तमान आलेनंतर सेवेशीं लिहितों. गोखले यांचीं ठाणीं सावनूर तालुक्याचीं पडलीं. नवी हुबळीकडे आज उद्यां फौजा येणार आहेत. त्यास नवे हुबळीच्या ठाण्याविशीं राजश्री धोंडोपंत गोखले यांस वडिलीं पत्र पाठविलें पाहिजे. करवीरची फौज नवलगुंदास एक दिवस राहून मनोळीस गेली. सेवेशीं कळावेंकरितां विनंती लिहिली आहे. विदित होय. बहुत काय लिहिणें कृपालोभ करावा हे विज्ञापना. करवीरचे फौजेंत तिळप्राय दम राहिला नाहीं. मनोळीचा आसरा धरावयासी गेले. हे विज्ञापना.

नं ४५२८ श्री. ( भाद्र० व० ११–६ अक्टो. )

पै छ० २६ रबिलाखर सन तिस्सा तिसैन. भाद्रपद

सेवेशीं विज्ञापना राजश्री रायाजी जाधव सदलग्यावर होते त्यांस अंकलीचा उद्योग करणेंविशीं आज्ञापत्र गेलें होतें. इतक्यांत गलगल्यावर निडगुंदीकडे कांहीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांजकडील फौज गेल्याचें वर्तमान आलें. त्याजवरून जाधव यांस आज्ञापत्र गेलें कीं, तूर्त अंकलीचा उद्योग राहून गलगलेकडे जावें. त्याजवरून जाधव फौजसुद्धां गलगल्याकडे जावयासी निघोन गेले. काल भृगुवारचा मुक्काम नसलापुरचा होता, याप्रमाणें वर्तमान आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. अंकलीचा उद्योग तूर्त राहिला. गलगल्याकडे फौज गेली तिजशीं जाऊन गांठ घालावी याउद्देशें गेले. बरोबर हजार फौज चांगली आहे. पांचशें सातशेंपर्यंत पायदळ आहे. कळावें हे विज्ञापना.

नं. ४५२९ श्री. ( भाद्र. व १२ ७ अक्टो. )

पै ॥ छ० २६ रबिलाखर. सन तिस्सा तिसैन. भाद्रपद.

सेवेशीं विज्ञापना. सुरापुरास कारकून व राचय्या सोंदेकर जंगम व गुरुअय्या ऐसे काल्यांच्या मुक्कामाहून कुमक फौज राजाजी यांजकडे न्यावयाकरितां पत्रें देऊन पाठविले होते. त्यांचें पहिलें पत्र आलें कीं, तीन हजार फौज तयार झाली. रवाना लौकरच होत्ये. दुसरें पत्र आलें त्यांत मजकूर फौजेची तयारी होत आहे. तिसरें पत्र आलें कीं, लाख रुपये फौजेच्या खर्चास पाठवावे ! अशीं तीन तऱ्हेचीं पत्रें आलीं. तिसरें पत्र आलें त्याजवर मागाहून उभयतां जंगम व कारकून सवेंच आले. त्यांस ( महाराजानी ) विचारलें कीं,

---

१ पत्र नारो हरीचें करवीराहून. २ शितोळ्यांकडून अकलीचें ठाणे घेण्याचा. ३ पत्र नारो हरी करंदीकर याचें करवीराहून.

कारची तुमची पत्रें आली तेव्हां प्रमाणता काय? परंतु अद्याप नाद
ा नाहीं. फौज लष्करास येऊन पोहोंचल्यावर लाख रुपये खर्चास द्याव-
ेतील अशीं पत्रें आणखी लिहून देऊन कारकून व जंगम पाठविणार. परंतु
ची कुमक येणें कळतच आहे. लटकीं राजकारणें करितात. उपयोग
राजाज्ञा यांजकडे विशाळगडकर प्रतिनिधी यांचें पथक पांचशें लोक व
ांचें पथक चार पांचशें लोकांचें आहे त्यांस खर्चास पावेना, याजकरिता
उठोन आलीं. मनोळीस आले अशी अवाई आहे. अद्याप खचीत वर्तमान
; आलें नाहीं. मागाहून सविस्तर लिहून पाठवितों. कळावें. सेवेशी
ाय हे विज्ञापना. राजश्री भवानराव भोंसले— महाराजांचे बंधु—-यांस
ाच्या सुमारें दोन चारशें लोक देऊन पाठवीत आहेत. आज उद्यां रवाना
ाचा बेत आहे. कळावें. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

४५३० श्री ( भाद्र० व० १३–७ अक्टो. )

आशीर्वाद उपरी. आपण काल पत्र पाठविलें तें पावलें. वेदशास्त्र-
राजमान्य राजश्री तपोनिधि दीक्षित स्वामीचे आशीर्वाद, महाफळ व
ऊन वे॥ राजश्री महादेवभट व शंकर पाठक आलीयाचें वर्तमान सविस्तर
ी तें कळलें. त्याजवरून बहुत संतोष झाला. या समयास त्यांचे परार्थ-
मदारक आहे. श्लोक-

ये स्तेयानृतहिंसाद्यास नदंभविवर्जिताः ॥
न तेषां सत्यशीलानामाशषोविफलाः क्वचित् ॥ १ ॥

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचें दर्शन गुरुवारी अस्तमानानंतर घटका
ाहलें. नंतर रात्रौ रहावयास कवठ्यास गेलों. द्वादशीस भोजन करून काल
ी तिसरे प्रहरी लष्करांत आपले गोटांत येऊन राहिलों आहों. यजमानांनीं
ायंकाळीं बोलाऊं पाठविलें होतें. गेलों होतों. परंतु क्षयतीथ काल याजमुळें
भोजनोत्तर यावें, मग चालें, असें सांगितलें. मग निघोन संध्यासमयास
आपणाकडून जासूद पत्रें घेऊन आला तेव्हां यजमानासंनिध आम्हीं
त्या समयीं यजमान व मी उभयतां मात्र होतों. पत्रें सारी वाचून पाहून
। गोपाळपंत गोवनी यांजकडे दिविलीं तुम्हीं वाचून निळोपंताचे
न करा म्हणोन सांगून पाठविलें. आज यजमानानींच स्मरण धरून
ऊं पाठविल्यास जातों. उदेक तासगांवास श्रीगणपतीच्या दर्शनास जाऊन
चे दिवशीं फिरून लष्करास येतों. थोरांचें आशीर्वादपत्र आलेलें यज-

मजकूर लिहिला तो कळला. रवाना छ० २९ रबिलाखर. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ४५३३ श्री. ( आश्विन शु० ३–१२ अक्टो. )

पै॥ छ० २ जमादिलावल. तिस्सा तिसैन.

बाळकृष्ण लक्ष्मण लाग यांचें शिरहट्टीहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र—

" उभयतांचे लष्करचे मुक्काम आपआपले ठिकाणीं आहेत. लढाई कांहीं जाली नाहीं. दोन चार रोजांत लढाई नेमिली आहे. याप्रमाणें वर्तमान आहे. मागाहून होईल ते विनंती लिहितों. करवीरकर अलीकडे महिनाभर स्वाऱ्या करीत नव्हते. परवा दोनशें प्यादे शंभर राऊत येऊन मौजे बालेहोसूर परगणे लक्ष्मेश्वर येथील गुरें बाहीर चारणीस रानांत गेले होते ते पांचशेंपर्यंत वळून नेत होते. इतक्यांत गांवांतून दौड जाऊन गुरें माघारीं आणिली. गांवकरांची त्यांची लढाई होऊन गांवचे प्यादे दोन तीन असामी ठार पडिले. दहा असाम्या जखमी जाले. आणखी स्वाऱ्या करणार याप्रमाणें वर्तमान आहे. तालुका त्यांचे लष्करास समीप, भोंवतीं महाल त्यांचे, सावनुरास लक्ष्मेश्वराच्या पेठेंतून रसद नेहमी दाणादुणा जाऊन पावतो यामुळें त्यांचा ( आम्हांवर ) मोठा द्वेश आहे. कोणे वेळेस काय करितील विश्वास नाहीं. याजकरितां बुधेहाळ + + व कळस व शिगली येथील ठाण्यांत + + प्यादे ठेऊन बंदोबस्त राखिला आहे. "

नं. ४५३४ श्रीगणपति. ( आश्विन शु० ३–१२ अक्टो. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत छ० २ जमादिलावलपर्यंत यथास्थित असे. विशेष. थोरात याचे दौलतसंबंधें देणें घेणें आहे त्याचा फडशा होई तोंपावेतों सरंजाम ठाणीं सुद्धां राजश्री वेंकटराव थोरात याजकडे असावा, याप्रमाणें पेशजी ठरोन त्या अन्वयें सरंजामाची वहिवाट मशारनिल्हे करीत असतां दरम्यान राजश्री कृष्णाजी थोरात यांणीं नवीन दिक्कत करून सरंजामाची वहिवाट आपण करूं लागले. त्याजवरून राजश्री माधवरावजी रास्ते यांचें पत्र आम्हांस आलें जे, "थोरात याचे सरंजामांत ठाणीं बसवून ठाण्यासुद्धां सर-

१ कारडगीची लढाई होण्यापूर्वीचें हें पत्र मिरजेस यावयास इतके दिवस का लागले समजत नाहीं. २ लष्करांतून मिरजेस हें पत्र पोंचण्यास अकरा दिवस लागले हे फार लागले.

जाम पहिल्या करारप्रमाणें व्यंकटराव यांचे स्वाधीन करावा." सबब या कामास स्वार वगैरे सरंजाम पाठविला आहे. हे ठाणीं बसवून व्यंकटराव यांचे स्वाधीन करितील. मशारनिल्हे येथें आम्हांजवळ चाकरीस आहेत. यांचा अगत्यवाद आपण धरून हरएकविशीं साहित्य करीत असावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पे॥ छ० १२ जमादिलावल. सन तिसा तिसेन.

नं. ४५३५ श्री. ( आश्विन शु० ४ –१२ अक्टो. )

पौ॥ छ० ३ जमादिलावल. सन तिस्सा तिसेन. आश्विनमास.

सेवेशी विज्ञापना. कऱ्हाडाकडे हुजूरची स्वारी गेली ( त्या ) समयीं वाड्यांतील अंबाबाईचे दागिने गहाण ठेऊन ऐवज घेतला होता. त्यास नवरात्राचे उत्साहांत देवीचे दागिने सोडविले पाहिजेत, व दुसऱ्यास कापड पाहिजे, तेव्हां चिक्कोडी मनोळी व गोकाक व राजाज्ञाचे चिरंजीव मिळोन सत्तर हजारांची वरात घातली. पैकीं राजश्री निंबाजी यादव याजकडे कापड पन्नास हजारांचे करार केलें व वीस हजार रुपये देऊन देवीचे दागिने सोडविले. करवीरकर पेठकर्‍यां याजकडून तो पंधरा हजार रुपये घेतले. शिराळेकडे व राजाज्ञाकडे स्वारीस पाठवावयास पाहिजे, तेव्हां रुप्याचे दागिने वगैरे, व तबकें व पराती व तांब्ये वगैरे दागिने आणून निंबाजी यादव यांचे विद्यमानें गहाण ठेविले, आणि कर्जाऊ ऐवज घेऊन काहीं शिराळ्याकडे पांच हजार व राजाज्ञाकडे दहा हजार तर्फ पाठविले. कळावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५३६ ( आश्विन शु० ४–१२ अक्टो )

बापूजी तीर्थी यांचें ३ जमादिलावलचें पत्र दोडवाडाहून मिरजेस बाळासाहेबांस--

" राजश्री धोंडोपंत गोखले याणीं फौजासुद्धां परवां नवलूर नजीक धारवाड येथें येऊन मुक्काम करून राहिले आहेत. कर्यात बेळवडी प्रांत कित्तूर येथें यावयाची आवई आहे. थोडी बहुत फौज नवलगुंदाकडे गेली आहे. अद्याप नवलगुंद ठाणें पडलें नाहीं. तडस व नवी हुबळी दोनी ठाणी गोखले यांचें पडलें. प्रस्तुत राजमंडळकरांची फौज संवदत्तीवर आहे. दोन हजार जमा जाहले आहेत. आणखी करवीराहून फौज गोकाकेच्या सुमारें आली आहे म्हणून बाजारी वर्तमान आहे."

---

१ पत्र नारो हरि करंदीकर यांचें करवीराहून मिरजेस.

नं. ४५३७ श्री ( आश्विन शु० ७—१६ अक्टे

पे॥ छ० १० जमादिलावल सन. तिस्सा तिसेन. आश्विन.

सेवेशी विनंती सेवक बापूजी तीर्थो. कृतानेक साष्टांग नम विज्ञापना. तागायत छ० ६ जमादिलावलपावेतों वर्तमान यथास्थित विशेष. राजश्री धोंडोपंत गोखले फौजसुद्धां धारवाडावरी मुक्काम आहेत. तेथून संवदत्ती व मुरगोड व येकुंडी ठाणी वसविणेकरितां दोन : राऊत हजार बाराशेंपर्यंत प्यादे ऐसे रवाना केले आहेत याच मार्गे ज ठाणी वसली नाहीत राजाडळकराची फौज संवदत्तीस जमली होती निधान मनोळीस गेली. आणखी वर्तमान येईल तें सेवेशी लिहून पाठ सेवेशी श्रुत होय. तडस व नवे हुबळी ठाणी पडली. जुने हु ठाणें पडलें म्हणोन बाजारी वर्तमान आहे. बातमीकरितां माणूस पाठ आहे. येनांच सेवेशी लिहून पाठवितो. राजश्री धोंडोपंत गोखले फौ मौजे दोडवाडच्या नळयास येऊन उतरोन कित्तूर प्रांतांत उपद्रव द म्हणोन वर्तमान आहे. त्यास येथें येऊन उतरलेनंतर जमिनींची खराबी होईल. त्यास गोखले यास पत्र पाठवून यावयास आज्ञा केली पा सेवेशी श्रुत होय बहुत काय लिहिणें हे विज्ञापना

नं. ४५३८ श्री ( आश्विन शु० ८—१७ अक्टो

पे॥ छ० ७ जमादिलावल. तिस्सा तिसेन आश्विन.

सेवेशी विज्ञापना कऱ्हाडकर यांची फौज झाडून कऱ्हाडास व रास्ते यांची फौज कृष्णा उतरोन मालाच्यास गेली. कऱ्हाडानजीक उ याचें कारण काय, तर पुण्याहून श्रीमंतांनीं पत्रास सांगितलें "तुम्हाकडील फौज शिराळ्याकडे जाऊन उपद्रव करितात याचें द काय? तर तिकडे उपद्रव करावयाचे कारण नाही झाडून फौज मा आणविणें." त्याजवरून गेलो तसीच रास्ते यांसही ताकीद उ याजमुळे दोनी फौजा माघाऱ्या गेल्या. सदरहू वर्तमान राजश्री जीपंत यांही शिराळ्याहून लिहिलें होतें. कळावें सेवेशी श्रुत हे विज्ञापना.

नं. ४५३९ श्री (आश्विन शु० ८—१७ अ

सेवेसीं विज्ञापना. विशाळगडकर पंत यास माघारे राजाज्ञा यां

१ पत्र नारो हरीचें करवीराहून. त्याच प्रमाणे पुढची चार पत्रें सर्व वि बाळासाहेबांस लिहिलेलीं.

जावयाची आज्ञा जाहली होती. पंतांचा मुक्काम जनवाड्यावर होता. त्यास लोकांनीं खर्चाकरितां अडाविलें. दोन चार रोज तेथेंच गवगवा पडला. नंतर पंत लोकसुद्धां जनवाडनें निघोन मंदवारीं करवीरास आले. पुढें खर्चाचा बंदोबस्त होऊन राजाज्ञा यांजकडे रवानगी होते किंवा करवीरींच राहतात, ठरेल तसें सेवेशीं लिहून पाठवीन. श्री॥ राजश्री पंतअमात्य यांच्या बाबतीचा ऐवज जप्त करून वसूल चालीस लाविला; याजमुळें अमात्यपंत करवीरास आले आहेत. कळावें. अष्टेकडे श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडील लोक आले, भिलवडीकडे फौज नदी उतरणार, अशी आवाई आली याजमुळें राजश्री जोशीराव व मानसिंगराव पाटणकर यांस शिराळ्यांस जावयाची आज्ञा जाली आहे. परंतु दसरा करून जातील. अगोदर जात नाहींत. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ० ७ जमादिलावल. तिस्सा तिसैन. आश्विन.

नं. ४५४० श्री ( आश्विन शु० ८–१७ अक्टो. )

सेवेशीं विज्ञापना. राजश्री दौलतराव घोरपडे हे राजाज्ञांचा निरोप घेऊन गलगलेकडे गेले, मागें राजाज्ञांचा गळाठा जाहला, याजकरितां घोरपडे यांजवर महाराजांची मर्जी रुष्ट जाली. त्यांजकडे सरंजामास गांव खोची व संगवडें वगैरे ऐसे तीन गांव नेमून दिले होते ते तूर्त जप्त केले. आणि तीन गांव मिळोन[1] अकरा हजार रुपये सालमजकूरचा वसूल घ्यावा येणेंप्रमाणें ठरोन ऐवज सदरहू पांढरे व फिरंगी यांजकडे नेमून दिला. घोरपडे यांजकडील कारकुनास सदरहू गांव ठेऊन ऐवजाची निशा मागतात. नाहींतर गांव दूर करून दुसऱ्याकडून निशा करवितों ( म्हणतात. ) त्यास घोरपडे यांजकडील राजश्री खंडेराव परभू आहे तो निशा द्यावयाची तजवीज पहात आहे. कळावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ० ७ जमादिलावल. तिस्सा तिसैन. आश्विन.

नं. ४५४१ श्री (आश्विन शु० ८–१७ अक्टो)

पै॥ छ० ७ जमादिलावल. तिस्सा तिसैन आश्विन.

सेवेसीं विज्ञापना. येथें पुण्याकडील बातमी आहे कीं, राजश्री आबा शेलूकर व नारोपंत चक्रदेव या उभयतांस बेड्या श्रीमंतानीं घातल्या

---

१ पलटणासहित मुसा इस्मित चाकरीस ठेविला होता तो.

याप्रमाणें आहे. व राजश्री मोरो बापूजी फडके यांजकडे ( कर्नाटकचा ) सरसुभा सांगितला. दसऱ्याचे मुहूर्तें निघणार. बरोबर सरंजाम फौज पांच हजार व गाडद दोन हजार व तोफा पांच याप्रमाणें नेमिला आहे. यांत खरें किंवा खोटें काय असेल तें असो. कळावें. शिराळ्यांस लोक होते त्यांपैकीं कदमाच्या कारकुनावर फितुराचें संधान आणिलें याजमुळें पथकच उठोन करवीरास आलें. शिराळयांवरील लोक पांचर्शेपर्यंत वडगांवच्या सुमारें आणविले. काल इंदुवारीं सायंकाळीं पत्र लिहिलें आहे. राजश्री यशवंतराव शिंदे मळणगांवकर हे राजाज्ञांकडून आले. फिरोन जावयाची आज्ञा जाली, ते जात नाहीं म्हणोन उत्तर केलें. व राजाज्ञा यांसही अधिक उणें भाषण केलें; याजमुळें महाराजानीं शिंदे यांस शिव्यागाळी व धक्काबुक्की करवून त्यांचीं घोडीं पांच सात होतीं तीं पागेस लाविलीं. याप्रमाणें जाहलें. इकडील फौज खर्चाविशीं बहुत बेदिल आहे. खर्चास नाहीं. राजश्री दौलतराव घोरपडे यांजकडील कारकुनास ऐवजाची निशा मिळेना. याजमुळें त्याजकडील गांव तिनी शिलेदारांकडे देविले. कळावें. करवीरांत भट ब्राह्मण बहुत गडबडले आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५४२ श्री. (आश्विन शु० ८–१७ अक्टो.)

पै॥ छ० ७ जमादिलावल. तिस्सा तिसैन. आश्विन.

सेवेशीं विज्ञापना. नेरलीकडे कुसाजी नलग्या जमाव करितो, भुदरगडचे संधान करीत आहेत, म्हणोन येथें बातमी कोणी सांगितलेवरून राजश्री नागोपंत आपाकडील कारकुनास ( महाराज ) रागें भरले व आपांसही वेडें वांकडें भाषण जालें. आणि किल्ल्याच्या बंदोबस्ताकरितां राजश्री नारायणराव रत्नाकर ( राजाज्ञा ) यांस काल मंदवारीं पाठविलें. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५४३ श्रीगणपति. (आश्विन शु० ९–१८ अक्टो.)

पै॥ छ० १२ जमादिलावल तिस्सा तिसैन आश्विन.

अपत्यें महादेवानें सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० ८ जमादिलावल पावेतों मुक्काम लष्कर नजीक सुरापूर वर्तमान यथास्थित असे. विशेष. पशमी रुमाल एक तांबडा खेत्रोजी शितोळे यांस द्यावयाकरितां आपलेकडील सांडणीस्वार याजबरोबर पाठविला आहे. त्यास शितोळे वडिलांजवळ लष्करांत

---

१ बातमी खोटी. २ दुश्चिन्हांमुळें. पहा नं. ४५४४. ३ परशुरामभाऊंजवळ. भाऊ मिरजेच्या आसपासच अद्यापि होते.

आहेत त्यांजकडे मुद्दाम जासुदाबरोबर रुमाल पोंचता करवून उत्तर आणवून पाठवून द्यावयाची आज्ञा करावी. फार करून तेथें वडिलांजवळ असतील. तेथें नसल्यास घरीं असतील. अथवा साताऱ्यास असतील. तेथें त्यास पावता करून त्यांस लिहिलें पत्र आहे त्याचें उत्तर घेऊन पाठवून द्यावें. सदैव पत्र पाठवून बालकाचा सांभाळ करीत गेलें पाहिजे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५४४ श्री. (आश्विन शु० ९–१८ अक्टो.)

पै॥ छ० ८ जमादिलावल तिस्सा तिसैन. आश्विन.

सेवेशीं विज्ञापना. श्री अंबाबाईच्या देवळांतील छप्परपलंगास अग्न लागली. नंतर जवळचे सेवेकरी याणीं अग्निशम केला. गांवांत भटाब्राह्मणांस नानाप्रकारचे दृष्टांत होतात. अशीं दुश्चिन्हें होऊं लागलीं आहेत. दसरा जाहलेवर मुख्य पर्वतास जाणार असें बोलतात. परंतु केवळ खचित नाहीं. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५४५ श्रीगणपति (आश्विन शु० १०–१९ अक्टो.)

पै॥ छ० १२ जमादिलावल. तिस्सा तिसैन. आश्विन.

अपत्यें रामचंद्रानें शिरसा॥ नमेस्कार विज्ञापना तागायत छ० ९ जमादिलावलपर्यंत यथास्थित असे. विशेष. गुरुवार दसरा म्हणोन (?) आज्ञा करून पत्र पाठविलें तें बुधवारीं पावलें. हल्लीं मुक्काम सुरापूरचे सरदेवर आहे. संस्थानांतून कारकून आले आहेत. लौकर फडशा करून देतों म्हणतात. तत्राप संस्थानाची चाल विदितच आहे. वडिलांस तीर्थरूपानीं बोलाविलें होतें. कृष्णा कोठें उतरावयाचें ठरलें तें आज्ञा केली पाहिजे. फौज मोठी. खर्चावांचून फुटून जाईल. उपोषणें करून परिणाम कसा लागेल? सोबतीस तरी उपयोग पडला पाहिजे. दीक्षितबावांचे व शामभटबावांचे क्षोभानें रत्नाकरपंताची दुर्दशा जाली. अशांत दुरोख शह जाला तर अनायासें ठिकाण सुटून येतील असें आहे. वडील सर्वजाण आहेत. मसलत ठरून आज्ञा जाली म्हणजे कृष्णातीरास येतों. पुण्याकडील (वर्तमान लिहिण्याची) आज्ञा करावी. चि॥ राजश्री बाबा फडणीस आले यांतील मजकूर (काय तो कळविण्याची) आज्ञा व्हावी. चि॥ राजश्री हरीपंतबाबा (साताऱ्याहून) दसरेस आले कीं नाहीं ते आज्ञा व्हावी. माझे पेटींत पशमी

---

१ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून. २ महाराज पन्हा

रजई व कडप्याचा कोरा साधा शेला १ व तिवट १ एक महबुल्लाखानानीं दिलें तें, ऐसें आहे. त्यास तेथें कारकून कोण असेल त्यास आज्ञा करून मजकडे पाठवावें. थंडी पडूं लागली आहे. मल्हारी खिजमतगारही घरीं गेला आहे. किल्या सखोजी जामदाराजवळ आहेत. आज्ञा करून आणून मजकडे पाठवावें. हलालीचा कारभार पक्का करितों. निशा ऐवजाची घेतों. अगर ठाणें आपाजी हरीकडे देतों. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळावें. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५४६ श्रीगणपति. (आश्विन शु० ११–२० अक्टो.)

चि॥ राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत छ० १० जमादिलावलपर्यंत यथास्थित असे. विशेष. वाळवें कसबा ठाण्यासुद्धां राजश्री व्यंकटराव थोरात यांचे स्वाधीन करण्याविशीं राजश्री माधवरावजी रास्ते यांचें पत्र आम्हांस आलें त्याप्रमाणें येथून सरंजाम पाठवून ठाणें मशारनिल्हे यांचे स्वाधीन करावयाचें, त्यास आम्ही दरकूच पुढें चाललों यामुळें इकडून सरंजाम पाठवावयाची सोय नाहीं. याकारितां आपणास लिहिलें असे. तरी आपण आपलेकडून शेंदीडशें गाडदी वाळव्यांस पाठवून ठाणें बसवून व्यंकटराव थोरात यांचे स्वाधीन करावें. दिवसगत लागों न द्यावी. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० १३ जमादिलावल तिस्सा तिसैन. आश्विन.

नं. ४५४७ श्रीसुब्रम्हण्य. (आश्विन व० १३–६ नोव्हें.)

राजश्री गंगाधररावदादा गोसावी यांसी.

दंडवत. विनंती उपरी. नीळ दोन आपणाकडे पाठविले आहेत. मातबर

---

१ हलाली व जिरें अंकलगी हे मोंगलाईतले दोन गांव जनार्दन शिवाजी म्हैसकर याजकडे मोंगलाकडून कमाविशीनें होते. तेथें त्यानें आपली सर्व चीजवस्तही नेऊन ठेविली होती. तो पटवर्धनांशीं वांकडा होता व स्वतःस परकी अमलांत निर्भय समजत होता. परंतु पटवर्धनांचें लष्कर या वेळीं आयतेंच जवळ गेल्यामुळें रामचंद्रपंतांच्या मनांत जनोबाचें चांगलेंच पारिपत्य करावयाचें आलें होतें. तो बेत त्यांनीं दोन्ही गांव लुटून सिद्धीस नेला. २ पत्र दौलतराव घोरपडे गजेंद्रगडकर यांचें गलगल्याहून. नीळ बाळगण्याचा उपयोग अन्नपरीक्षेसाठीं दौलतवंतांस फार असतो. कारण या जातीचीं वासरें ज्या अन्नाला विषाचा संपर्क झाला आहे त्या अन्नाकडे ढुंकूनसुद्धां पहावयाचीं नाहींत.

किल्ल्यांत असावे. दरवाजेंत ठेवावे. दूध पाजवीत जावयास सांगावें. रवाना छ० २७ माहे जमादिलावल. हे विनंती.

नं. ४५४८ ( आश्विन व० ३०–८ नोव्हें. )

गणेशराम पेठे यांचें परशुराम भाऊंचें लष्कर नजीक विजापूर येथून पत्र मिरजेस छ० २९ जमादिलावलचें—

" आज कूच होऊन विजापूरचे नजीक आलों. दरमजल कूच होत आहे. सुरापूरचे रोखें जातात. "

नं. ४५४९ श्री ( कार्तिक शु० ३–१० नोवेंबर. )

सेवेसीं विज्ञापना ' राजश्री बच्याजीपंत वाडीस आले आहेत. जातात किंवा राहातात पहावें, ' म्हणोन आज्ञा केली, त्यास राजश्री बुधवारीं करवीरास येऊन पावले. राजश्री बाबा काळे फडणीस शिरोळास येऊन उभयतांची भेट जाली. प्रथम दिवसीं फडाणिसानीं सांगितलें कीं, घर जाळून खराबी जाली आहे याबाबत ऐवज द्यावा आणि रहावयासीं जागा भूदरगड द्यावा, म्हणजे आम्ही कांहीं उपद्रव करावयाचे नाहीं म्हणोन. दुसरे दिवशीं बत्तिस कळमांची याद लिहून आणोन राजश्रींजवळ दिली ! "यादीप्रमाणें बोलणें फडशांत आल्यास शिलाशिला तुटेल. नाहीं त्यापक्षीं बोलणें समजतच आहे." याप्रमाणें सांगोन सामोपचाराचे बेत ठेवून निरोप घेऊन मिरजेस गेले. नंतर राजश्री दादाही निघोन आले. कलमबंदींत लिहिलेलीं कलमें— भूदरगडांतील ऐवज व चीजवस्त गेलेलें जराबाजरासुद्धां गड स्वाधीन करावा. गोकाक व मनोळी व यादवाड जमखिंडी व सदलगें वगैरे ठाणीं घेतलीं तेथील ऐवज व तसनस जाहली आहे त्या सुद्धां ठाणीं माघारीं द्यावीं. व चिकोडी व अकीवाट शिरोळचीं ठाणीं खराबीसुद्धां भरून द्यावीं. तासगांवचा वाडा जाळला आहे त्याचा ऐवज द्यावा. याप्रमाणें झाडून कलमें बत्तीस लेहून राजश्रींजवळ देतांच कांहीं एक न होतां याद घेऊन निघोन आले. नंतर राजश्री बाबूराव कागलकर यांस येणेंविशीं ( महाराजानीं ) आज्ञापत्र लिहून पाठविलें आहे. ते आले नंतर बोलणें कोणे रीतीनें पडतें पहावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ० १ जमादिलाखर. तिस्सा तिसैन. मय्या व अल्लफ.

नं. ४५५० श्रीगणपति. ( कार्तिक शु० ३–१० नवंबर )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांस परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. तुम्हीं पत्र गुरुवारचें पाठविलें तें भृगुवारीं संध्याकाळीं सारवाड पों विजापूर

येथील मुक्कामीं पावोन सविस्तर मजकूर कळला. पुण्याहून पत्रें आलेलीं पहावयास पाठविलीं तीं पाहिलीं. मजकूर समजला. श्री इच्छा प्रमाण ! मसुदेप्रमाणें पत्र लिहोन पाठविलें आहे व पत्रें पुरवण्यांसुद्धां पांच आलेलीं माघारीं पाठविलीं आहेत. पावतील. तुम्हीं आपले नांवें पत्र लिहावयाचा मसुदा पाठविला तो ही पाहून माघारा पाठविला आहे. उत्तम आहे. त्याजप्रमाणें लिहावें. आम्हीं आज विजापूरच्या नजीक मुक्कामास गेलों. येथून चिरंजीव सुरापूर तालुकियांत आहेत तेथें जातों. श्री इच्छेनुरूप घडेल तें खरें. बहुत काय लिहिणें. छ० १ जमादिलाखर. मंदवार. लोभ असों द्यावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० २ जमादिलाखर. रविवार. कार्तिकमास. सन तिस्सा तिसैन.

नं. ४५५१ श्री. ( कार्तिक शु० ८–१६ नवंबर )

राजश्री गंगाधरराव गोविंद स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. तुमचें प्रयोजन असे. तरी फौजसुद्धां चिठी पावतांच निघून हुजूर येणें. विलंब न करणें. जाणिजे. छ० ७ जमादिलाखर. हे विनंती.

पै॥ छ० १८ जमादिलाखर. सन तिस्सा तिसैन. कार्तिक वा॥ ४.

नं. ४५५२ श्रीगणपतिर्जयति. ( कार्तिक शु० १३–२१ नोव्हें. )

पै॥ छ० १२ जमादिलाखर सन तिस्सा तिसैन. कार्तिक मास.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें चिंतामणीनें दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १२ जमादिलाखर मुक्काम मल्लेवाडी येथें सुखरूप असे. विशेष. वडिलीं फिरंगूबरोबर मोर्तब १ व बैल सर ६ तट्टें ३ जाजम १ उंट २ शाईचा चंबू १ पायबंद १५ दवासनें ० येणेंप्रमाणें पाठविलें तें पावलें. व गाय सर १ वांसरासह पाठविली ती पावली. "बारगीर व स्वार उदईक पाठवितों. स्वार आलेवर कूच करावें" म्हणोन लिहिलें, त्यास आज्ञेप्रमाणें प्रातःकाळीं कूच करितों. सेवेसीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५५३ श्रीगणपतिर्जयति. ( कार्तिक शु० १४–२२ नोव्हें. )

पै॥ छ १३ जमादिलाखर. सन तिस्सा तिसैन. कार्तिकमास.

अपत्यें चिंतामणीने दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १३ जमादिलाखर मुक्काम मल्लेवाडी येथें सुखरूप असे. विशेष. आज कूच करून बेळोंखीस जातों. नूरमहमद भालदार याजबरो-

---

१ हे पेशव्यांचें आज्ञापत्र. हें पुण्याहून मिरजेस यावयास अकरा दिवस कशाकरिता लागले ?

बर स्वार पाठविले म्हणोन पत्रीं लिहिलें होतें, परंतु प्रहर दिवसपर्यंत आले नाहींत. स्वारी निघे तोंपर्यंत येतील. उद्ईक आमरणीचे मुक्कामास जातों. वडिलांस कळावें. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५५४ श्री. ( कार्तिक व० २–२५ नोव्हें. )

पै॥ छ० १६ जमादिलाखर. तिस्सातिसैन. कार्तिक.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांच्या स्वारीचा मुक्काम आज रविवारीं मौजे नेज येथें आहे. आज उद्यां येथें राहून फौजेचा जथ पाडून मग पुढें जावें असें आहे. याद्वाड गोकाक येथें ठाणीं घालावीं, राजश्री विठलराव याद्वाडकर पुढें आले आहेत त्यांस मागें सरकवावें, हा बेत आहे. राजश्री राजाज्ञा यांसही येण्याविशीं पत्रें गेलीं आहेत. येथून याद्वाड गोकाकेकडे फौज लावून देऊन खासा स्वारी माघारी करवीरास जावी असा बेत आहे. कोणता ठरतो पहावें. ठरेल तें लिहून पाठवीन. पीकपाणी तूर्त यांजकडे गांव आहेत तेथील पिकें दाणा वैरण शेकदार करितात. ( ? ) बंद नाहीं. पंत प्रतिनिधि मौजे कुटाळी कोथळी नजीक शिरगांव येथें आहेत. त्यांसही आणविले आहेत. आज येतील. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५५५ श्री. ( कार्तिक व० २–२५ नोव्हें. )

पै छ० १६ जमादिलाखर, तिस्सा तिसैन.

सेवेशीं विज्ञापना. महाराज करवीराहून निघाले ते गुरुवारीं नेरली तांबगांवच्या मुक्कामास होते तेथून कूच करून भृगुवारीं भोजेच्या मुक्कामास आले. मंदवारीं कूच करून कसबे नेज येथें आले. बरोबर लोक तीन चारशें-पर्यंत राऊत व हजार पर्यंत पायदळ आहे. भोजेच्या मुक्कामीं महाराजांची घोडी बसती महाराव घोरपडे मुधोळकर यानीं हुबळीच्या मुक्कामीं दिली होती ती भृगवारीं रात्रीं मृत्यु पावली. पारकिडे झाले. घोडी पांच हजार रुपयेच्या किंमतीची होती. इमारतीनेंही थोर होती. गुरुवारीं करवीराहून निघाले ते दिवशीं भरणी कृत्तिका नक्षत्र होतें. स्वारीस निघाले. शकुन चांगला झाला ! श्रीमंत बाईसाहेब यांचाही आग्रह स्वारीस निघों नये म्हणोन बहुतच पडला होता, परंतु राजश्री हिंमतबहाद्दर याणीं बाईसाहेबांजवळ करार केला कीं, महाराजांस पुढें नेत नाहीं, फौजेचा जथ पाडून फौज रवाना पुढें करून हुजूरची स्वारी माघारी पांच चार रोजांत करवीरास येईल. असा करार केला आहे. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ पत्र करवीराहून नारो हरि कारंदीकर याचें. तसेंच पुढच्या नंबरचें.

नं. ४५५६   श्रीगणराज. ( कार्तिक व० ४–२७ नोव्हें. )

राजश्री बाळाजी माहादेव भिडे व केसोकृष्ण काळे स्वामी गोसावी यांसीं.

सेवक गंगाधरराव गोविंद. नमस्कार. विनंती उपरी फौजेंतील लोकांची गणती सालमजकूरची तुम्हीं उभयतां मिळोन घेणें. असामदाराचें घोडें परिछिन्न लहान जमेस धरूं नये. चांगलें असेल तेंच यादीस लिहावें. तसेंच स्वाराचें घोडें कनिष्ठ असेल तें लिहावयाचें नाहीं. आमची सरदारी वोढगस्तीस पडली, परंतु पैका फौजेस द्यावा लागतो. मग चौकशीस कमती कां असावी ? येविर्शीचें राजश्री गणेश गोविंद यांस लिहिलें आहे. लिहिलेप्रमाणें गणती चौकशीनें घेऊन लिहोन पाठवणें. रवाना छ० १८ जमादिलाखर. सुरुसन तिस्सा तिसैन मय्या व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंति.

नं. ४५५७   श्रीगणपति.   ( कार्तिक व० ८–१ दिसें. )

आशीर्वाद उपरी. राजश्री मोरोपंतास पत्रें व तुळशी देऊन नानानीं निरोप दिला. मागाहून सविस्तर समजोन घेऊन लिहितों असें सांगोन लावून दिलें. तेव्हां पुढील आमचे बंदोबस्ताचे बोलण्याचा प्रकार मागाहून लिहितों याजवर खुटिवलासा दिसतो. त्यांचें आमचें सख्य झालें इतकें झालें. पुढें आमचे साहित्याचे पल्यावर ( त्यांनीं ) असावें, श्रीमंतांची कृपा व्हावी, हा यत्न करावयाचें उत्तेजन ( त्यांस ) द्यावयाकरितां कोणी पाहिजे. त्यास चिरंजीव राजश्री रामचंद्र श्रीधर काळे यास पाठवावा. तो तिकडील जाबसालास माहीतही झाला आहे. याजकरितां चिरंजीवास व मोरोपंत परांजपे या उभयतांस येथें पाठवावें. तेथील भाव सारे परांजपेकडून समजून घेऊन चिरंजीवास सांगून पुढें लेखकाकडे पाठवावयास येतील. छ० २२ जमादिलाखर. चिरंजीव राजश्री बाबाकाळे यांची रवानगी पुण्यास करावी म्हणजे ठीक पडेल. पंतास इकडे पाठवावें व काळे यांची रवानगी पुण्यास करावी. पुण्यांतील बोलणेंयाचे भाव सारे समजतील तसें पुढें करावयासीं येईल. हे आशीर्वाद.

पौ॥ छ० २४ जमादिलाखर. कार्तिकमास सन तिस्सा तिसैन.

नं. ४५५८   श्रीगणपति. ( कार्तिक व. ११–३ दिसें. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा यांजकडे ओझ्यास उंटें कमी, नित्य बिगारीच्या बैला-

---

१ पत्र परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस लष्करांतून मिरजेस. २ पत्र परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस.

वरून वोझें मजलीस जातें, याजकरितां सहा उंट खरेदी करून दिले. त्यांच्या किंमतीच्या ऐवजाची चिठी आपणावर करितों. त्याप्रमाणें त्यांस ऐवज पावावा. ऐवजास दिवसगत लागों नये. ऐवज चिठी पावतांच पावेल असा करार करून उंटवाल्यापासून उंटें घेतलीं आहेत. चिठी येऊन पोहचेल यास्तव आगाव सूचना लिहिली आहे. रवाना छ० २४ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें. ऐवज त्याचा तेथें चिठीप्रमाणें पावावा. दिवसगत लागूं नये. हे आशीर्वाद.

छ० २८ जमादिलाखर. कार्तिक. सन तिस्सा तिसैन.

नं. ४५५९ श्रीगणपति. ( कार्तिक व० १२–४ दिसें. )

आशीर्वाद[1] उपरी. वे॥ राजश्री दीक्षित जोग व मोरभट ढेकणे व मार्तंड चिमणाजी येथें होते. मागून राजश्री माधवरावजीचें पत्र आलें त्यांत "माघारीं येण्याचें करीत नाहीं. श्रीमंतानीं कृपा केली. तेथेंच वस्त्रें बहुमान पाठवितात. परंतु पेशजीचा ठराव झाला त्याचे द्विगुण[3] संख्येची निर्गत व्हावी. मसलत पडल्यास अवतार[4] पदरचे खर्च करावे." याजप्रमाणें भाव लिहिले. त्याजवरून "हें घडावयाचें नाहीं. फौजेचे खर्चाखालीं आलों. पुढें फौज फिटण्याच्या काळजींत पडलों. हें निभत नाहीं." असें बोललों तेव्हां दीक्षितांचें म्हणण्यांत "उभयें दौलती पेचांत येतील. ते पक्षीं पूर्वीं सातारियाचे मुक्कामीं ठरावांत आल्याप्रमाणें झाल्यास निर्गत करावी," असें बोलून निरोप घेऊन मलापहारीसंगमानजीकचे मुक्कामाहून गेले. काय करितात पहावें. फिरोन डोईवर वोझें बसवितात ! फौजेचा खर्च अनिवार. नित्य धरणीं पारणीं लागलीं आहेत. यापुढें कांहींच सुचत नाहीं. याचा विचार कसा करावा तें लिहिणें. कोणतेंही व्हावयाचें नाहीं, परंतु राजश्री नानानीं मनावर धरल्यास कांहीं होईल असें वाटतें. आमचें म्हणणें त्यांजवळ कीं, आम्हांस वस्त्रें द्यावीं. नंतर आम्हीं ठिकाणास येऊं. मग पुढें तुमच्या ऐवजाची सोईसोईनें वाट करूं. असें बोलिलों आहों.

---

१ पत्र परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस लष्करांतून मिरजेस. २ फौजेस निरोप देऊन पुण्यास भाऊनी यावें असें श्रीमंत म्हणत होते तें रहित करविलें. ३ साताऱ्यास गुन्हेगारीची रकम दहा लक्ष रुपये ठरली त्याची दुप्पट रकम सरकारांत द्यावी. ४ दहा लक्ष. सरकारांत वीस लक्ष द्यावयाचे त्यापैकीं दहा लक्ष रोख द्यावे. आम्ही मोहीम सांगूं तेव्हां फौजेच्या खर्चास दहा लक्ष रुपये पदरचे भरावे. सरकारांत ते मागूं नयेत. ५ रास्ते व पटवर्धन यांच्या.

वे॥ राजश्री बापू दीक्षितही त्या वाटेनें येत आहेत. आपणही त्यासीं गोड बोलून लावून द्यावें. छ० २५ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ २८ जमादिलाखर. कार्तिक मास सन तिस्सा तिसैन.

नं. ४५६० ( कार्तिक व० १२-४ दिसें. )

परशुरामभाऊंचें पत्र मिरजेस बाळासाहेबांस. छ० २५ जमादिलाखरचें—

" राजश्री दौलतराव शिंदे कार्तिक वद्य प्रतिपदेस मोसीचे रानांत शिकारीस गेले होते. तेथें बायांकडील पठाणानीं गांठलें; म्हणोन खबर मागें गोटांत येऊन गडबड जाली तें चार घटकानीं स्वस्थ जालें. मागील कुमक कंपूवाले याणी केली. एक रात्र तेथें गुद्रली. माघारे येतील. असा भाव एका गृहस्थानें लिहिले वरून लिहिलें." म्हणोन लिहिलें तें कळलें. खरें वर्तमान ( असतें तर ) दुणावलें असतें. तें नाही त्यापक्षीं कसें खरें म्हणावें ? "राजश्री नाना आपले वाड्यांत आले. सरकारचे वाड्यांत फराळ करून बेलबागेंत जावून देवदर्शन घेऊन मागती पेठेंत आपल्या ठिकाणास गेले" म्हणोन लिहिलें तें कळलें. आपले वाड्यांत येऊन राहणार, त्यास आवईच आहे किंवा ( खरोखरच ) आले हें लिहावें."

नं. ४५६१    श्रीगणपति.    ( कार्तिक व० १२-४ दिसें. )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसी प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. तुम्ही पत्रें छ० २१ जमादिलाखरची पाठविलीं तीं छ २३ मिनहूस पावलीं. लिहिला मजकूर सविस्तर कळला "राजश्री मोरो आपाजी तेरवां आले म्हणोन सांडणी स्वाराबरोबर पत्रें पाठविलीं आहेत त्याजवरून कळलेंच असेल. वडिलीं मशारनिल्हेस रास्ते यांचा बचाव व्हावा येविशीं सांगितलें होतें त्यावरून राजश्री नानांस कळविलें. उत्तर सांगितलें कीं, अत:पर त्याच उद्योगांत आहें. बचावही करितों व आपले साधनांत आहें असें सांगावें म्हणोन सांगितलेवरून लिहिलें आहे," म्हणून लिहिलें तें कळलें; व "करवीरचें तहाचें बोलणें ( पुण्यास सरकारांत ) लागलें आहे. तहाचे कागदपत्र मागील पाहिजेत म्हणोन ( नानानी ) सांगितलें, तेव्हां मोरोपंतानीं उत्तर केलें कीं, कागदपत्र जेथील तेथेंच राहिले. येथें जप्त होऊन सरकारचे वाड्यांत आले. तेथील करवीरकरानीं गुद्रल्यांत गेले. असें उत्तर सांगितलें. परंतु आपलेस वर्तमान कळावें" म्हणोन लिहिलें आहे (म्हणोन लिहिलें) तें कळलें. बहुतकरून राहिलेच नाहींत. मग संशय तो काय ? असें आहे. "शिंद्याचें व बायांचें मिटवावें याच योजनेंत आहें. मिटल्याखेरीज चैन पडत नाहीं." असें

तेथें ( नाना ) बोलत होते असें सांगितलेवरून लिहिलें तें कळलें. राजश्रींनीं मनावर धरल्यास ते म्हणतील तें करतील हा भरवसा पुरता आहे. आपण वरचेवर सुचवीत असावें अथवा आणखी आठ पंधरा दिवसानंतर मोरोपंत गेले तरी कार्यास येतील असें असेल तर रवानगी करावी. नाहींतर इकडे रवाना करावे. छ० २५ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

पै॥ छ० २८ जमादिलाखर सन तिस्सा तिसैन.

नं. ४५६२ श्रीगणपति. ( कार्तिक व० १२–४ दिसें. )

आशीर्वाद उपरी. राजश्री बाळकृष्णपंत बाळ यांची चिठी मोरोपंताबरोबर आलेली पाहवयास पाठविली ती पावली. पाहून माघारी परत पाठविली आहे. भाव कळला. उत्तम आहे. उभयतांची एकवाक्यता झाल्यास चालल्यास बहुतच उत्तम आहे. श्री इच्छा न जाणों. काय घडेल पहावें. चिरंजीव बाबा काळे यांस पाठवितों म्हणोन पेंडसे व परांजपे यानीं निरोप सांगितला त्याचें लेखकानीं उत्तर सांगितलें कीं, त्याचें जाणें येणें चहूंकडे; तूर्त प्रकार या रीतीचा; यास्तव पाठवूं नये, म्हणोन निरोप आला त्या वरून लिहिलें, ऐशास आपले ममतेचा व माहीत सारे व्यवस्थेचा असा दुसरा कोण आहे ? दरबारांत वाकबगार, दिवस या प्रकारचे, चहूंकडील वर्तमानें बारीक मोठीं माहितगिरी खेरीज कशीं कळतील ? हा प्रकार मनांत आणोन तुमचे विचारें चिरंजीव काळे यांसच पाठवावेसें जाहल्यास पाठवावें. बाबा काळ्याची रवानगी न झाल्यास कोणी तरी गुप्तरूपें पुण्यास बातमीस पाठवावा. या प्रांतीं पहिल्या प्रमाणें लागण भरलेला मुलुख असेल म्हणोन आलों, त्यास अगदीं पडक उजाडी. आज पांच सात वर्षांसही अधिकच आहे. बरें. गजानन काय परिणाम लावील तो खरा ! छ० २५ जमादिलाखर. मंगळवार बहुत काय लिहिणें. लोभ कीजे हे आशीर्वाद.

पै॥ छ० २८ जमादिलाखर. कार्तिकमास सन तिस्सा तिसैन.

नं. ४५६३ श्री. ( मार्ग० शु० २–९ दिसें. )

पै॥ छ० ६ रजब. शुक्रवार. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ३० जमादिलाखर यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री आपासाहेब[1] लष्करास मिळाले त्यापासून राजश्री जिवबाअण्णा यांस आज्ञा झाली कीं, नेहमीं राहुटीस येत जावें.

---

१ चिंतामणराव.

त्यापासोन येत असतात. काम कारभार करीत असतात. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडे एकांत बोलणेंविशीं नेहमीं जात असतात. राजश्री आपाजी गोविंद यांचा डेरा पहिला होत होता तेथें आपासाहेबांचे डेरे राहुट्या होतात. डावे बाजूस आपाजी गोविंद. याप्रमाणें मजकूर आहे. वे॥ राजश्री गोविंद भट गाडगीळ यांचे येथेंच अण्णा आहेत. फराळास दोन तीन वेळ होते. भोजन मात्र निराळें होतें. काम काज नेहमीं हेच करितात. एकांतही नेहमीं होतो. वरकड मजकूर-अधिकोत्तर नाहीं. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५६४ श्री ( मार्ग. शु० २–९ डिसें. )

पै॥ छ० २ रजब. सन तिस्सा तिसैन.

[1]सेवेशीं विज्ञापना. इकडील वर्तमान तर श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी हुणशाळच्या मुक्कामाहून कूच होऊन मौजे सुणदळीस गेली होती. तेथील विधि[2] उरकून दुसरे दिवशीं मौजे हुणशालास आले. गुरुवारीं तेथें मुक्काम होऊन भृगुवारीं भोजनोत्तर गचीकुरबेटास स्वारी गेली. तेथें गांव व ठाणें उजाड होतें. ठाणें राजश्री सेनाखासकील यांजकडे दिलें. तूर्त ठाण्यांत लोक त्यांजकडीलच आहेत. गांव दरोबस्त जाळून टाकिला. नंतर तेथून मंदवारीं कूच करून गोकाकेस येऊन मुक्काम झाला. आज रविवारीं ठाण्याचा बोलण्याचा संदर्भ आला. 'आजचा दिवसरात्र आम्हांस फुरसत द्यावी. आम्ही रात्रौ निघोन जातों. नंतर तुम्हीं ठाणें घालावें.' असें बोलतात. परंतु सत्य किंवा मिथ्या हें कळत नाहीं. निभावेल तें खरें. येथील कार्य उरकलेवर कोणीकडे जावें हा अद्याप निश्चय झाला नाहीं. ठरेल आणि समजण्यांत येईल तें सेवेशीं कळवीन. राजश्री दौलतराव हिंदुराव घोरपडे यांजकडील तिमापा शंभर दीडशें लोक घेऊन आले आहेत त्यांजकडून वरचेवर श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडील बातमी येथें येत असत्ये. तिकडील प्रतिकूलतेची बातमी सांगतात त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावा? थोराच्या पदरचे आणि सांगणार ही थोर आहेत ! कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. यादवाडास ठाणें इकडील पडलें. तीर्थापा निसबत देसाई याजला लोक देऊन पाठविलें होतें. कळावें. देसाई व त्याचा एक लेक स्वारीबरोबरच आहे. कळावें हे विज्ञापना. सुणदळीचे बंद ब्राह्मण कुलकर्णी वगैरे पंधरा वीस असामी व रयत शंभरपर्यंत वस्त्राविरहित लष्करांत बरोबर पहाऱ्यांत ठेविली आहे. गाडदी ओझीं

---

१ करवीरकरांच्या लष्करांतून नारो हरि करंदीकर यांचें पत्र. २ गांव लुटण्याचा व जाळण्याचा विधि ।

डोकीवर देऊन चालवितात. राजाज्ञा ब्राह्मणांस एक वेळ भोजनास घालितात कळावें हें विज्ञापना.

नं. ४५६५　　( मार्ग. शु० ९–१६ दिसें. )

बाळकृष्ण महादेव बाळ यांचें पुण्याहून पत्र मिरजेस बाळासाहेबांस छ० ७ रजबचें—

"श्री॥ राजश्री भाऊसाहेब फौजसुद्धां बागलकोटापलीकडे गेले व श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा कपाटसंगमापलीकडे फौजसुद्धां गेले आहेत. 'करवीरवासी महाराजानीं गोकाकेस तोफा लाविल्या होत्या' वगैरे मजकूर ( तुम्हीं ) लिहिला तो ( नानांस ) विदित केला."

नं. ४५६६　　श्री.　　( मार्ग० शु० ११–१८ दिसें. )

पै॥ छ ९ रज्जब तिस्सा तिसैन.

सेवेशीं विज्ञापना. गोकाक व पाछापूर व शाहापूर वगैरे प्रांतांतील सावकार वगैरे मंडळी गुर्लेस बेळगांवच्या आसऱ्यास आहेत हें वर्तमान यांसेंही समजलें आहे. मुल्याजवळ पांच चार मंडळी संनिधची बसली होती तेव्हां बोलणें बोलतां निघालें कीं, एखादी पेठ मातबर मारल्याशिवाय उठ-वण मोडत नाहीं. या प्रांतांतील काटक वगैरे माहीत यांस वाटेची व मुक्का-मांची माहीत पुसत होते. काय करतात पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५६७　　श्रीगणपति.　( मार्ग० शु० १३–२१ दिसें. )

पै॥ छ० १२ रज्जब तिस्सा तिसैन. मार्गशीर्ष.

अपत्यें कृष्णानें करद्वय जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना. श्रीक्षेत्र पंढर-पुरीं कौतुकार्थ आश्चर्याची गोष्ट जाली आहे ते सर्वत्र लोकानीं आपले दृष्टीनें पाहून आले. क्षेत्रीं वडरांचीं घरें आहेत त्यानीं डुकरें बाळगिलीं आहेत. त्यांतून एक धाकटें दोन तीन महिन्यांचें डुकराचें पिलूं मार्गशीर्ष शुद्ध तृतीया सोमवारीं आपले कळपांतून निघोन चंद्रभागेंत येऊन स्नान करून पुंडली-काच्या देवळाभोंवत्या प्रदक्षिणा करावयास लागलें. तों क्षेत्रस्थ लोकानीं पाहून त्यास धुडावून लावून दिलें. त्यास धुडावल्यानें तें डुक्कर जाईना. बळेंच धरून डुकरांच्या कळपांत लावून दिल्याही तेथें जाईना. तेथून पळोन येऊन मागती देवळाभोंवत्या प्रदक्षिणा करूं लागलें. अन्न दूध लोकानीं पुढें ठेविल्यासही खाईना. प्रदाक्षिणाच करावयाचा छंद. असे चार रोज प्रदक्षिणा केली. पांचवे रोजीं डुकर मृत्यु पावलें. उपरांत पुंडलीकाच्या पुढेंच वाळवंटींत क्षेत्रस्थ

---

१ पत्र नारो हरि करंदीकर यांचें करवीरकरांच्या लष्करांतून. २ महाराजांस.

लोकांनीं समारंभ करून पुरून टाकिलें. वडिलांस वर्तमान कळावें यास्तव लिहिलें आहे. स्त्रीजात डुकरी होती. ती अहिल्याबाई असा दृष्टांत जाला म्हणतात. सेवेशी श्रुत होय. कृपा लोभ करावा. हे विज्ञापना.

नं. ४५६८ श्री. ( मार्ग० शु० १३–२१ दिसें. )

चि॥ राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. आपण छ० ७ रज्जबचीं पत्रें पाठविलीं तीं छ० ११ मिनहूस पावलीं. करवीरकरांस बहुत मोकळीक फावली आहे याजकरितां चि॥ राजश्री विठ्ठलराव यांस या रोंखावर पाठवावें म्हणोन व राजश्री नागो शामजी मिरजेस पावलियाचें व चि॥सदोबा भाऊ यांच्या वाख्याचें वर्तमान लिहिलें तें कळलें. ऐसीयास चि॥ राजश्री विठ्ठलराव यांची रवानगी करावी तर ते गजेंद्रगडाजवळ आले. खर्चाचा गवगवा अतिशय. लोक ऐकत नाहीत. उपाय नाहीं. येथील वोढ तर कोठवर लिहावी ? श्रीनेंच पार पाडावें ! चि॥ राजश्री सदोबा भाऊ यांची प्रकृत कशी आहे हें ल्याहावें. रवाना छ० १२ रज्जब बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० २१ रज्जब. सन तिस्सा मार्गशीर्ष.

नं. ४५६९ श्री. ( मार्ग० शु० १४–२२ डिसें. )

पै॥ छ० ११ रज्जब. सन तिस्सा तिसैन. मार्गशीर्ष.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेश राम पेठे शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १३ रज्जब मुक्काम मंगळूर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. मौजे गुलनाल प्रांत कनकगीर येथें छ० ८ रज्जबी मुक्कामास स्वारी आली. त्या समयीं गांवाजवळ पेंढारी वगैरे गेले त्यांजवर गांवकरानीं गोळ्या टाकिल्या. दोन तीन माणसें जखमी झालीं. तें वर्तमान श्रीमंतांस कळलें तेव्हां मला बोलावून नेलें. आज्ञा झाली कीं, गांवास तोफा लावावयाच्या आहेत, त्यास जागा पाहून येणें. त्यावरून गेलों. जागा पाहून येऊन विनंती केली. तेव्हां आज्ञा झाली कीं, तोफा घेऊन व राजश्री हरबा आपा धायगुडे उभयतां जाऊन तोफा लागू करणें. त्यावरून तोफा तेथें नेतांच गांवकरानीं पंचवीस तीस गोळ्या टाकिल्या. पांच सहा असामी आरब यांस गोळ्या लागल्या. तोफेपुढें उभे होते. गांवांतून मारागिरी फारच होऊं लागली तेव्हां तोफा सुरू केल्या. दोन गोळे लागू झाले. बुरुजावरील सहा प्यादे ठार होऊन गोळे पार झाले. तेव्हांच गावांतून दोन असामी ब्राह्मण व दोन मराठे पळून येऊन बोलणें लागलें. परंतु आंतून मारागिरी होतच होती. तेव्हां आणखी दोन गोळे गांवावर टाकतांच गांव कौलास

येऊन चार हजार खंडणी झाली. सायंकाळीं तोफा घेऊन माघारें आलों. श्रीमंत राजश्री आपासाहेबांची फौज व दाजीसाहेब येथून दोन कोस पुढें आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५७० श्री. ( मार्ग० शु० १५-२३ दिसें. )

पै॥ छ० १४ रज्जब तिस्सा तिसैन. मार्गशीर्ष.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव. कृतानेक विज्ञापना. तागायत छ० १० रज्जब पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींस व श्री॥ राजश्री रघुनाथरावदादांस फौज सुद्धां यावें म्हणून सरकारचीं पत्रें पूर्वीं गेलीं आहेत. हल्लीं श्री॥ राजश्री नानास्वामींनीं आपणास लिहिलें आहे कीं उभयतांनीं फौज सुद्धां यावयाचें करावें व श्री॥ राजश्री भाऊसाहेब बहुत लांबत आहेत हें चांगलें नाहीं, म्हणून लिहिलें आहे. त्यास भाऊसाहेबांनीं लांब जाऊं नये. बागलकोटानजीक असावें. त्यांस वस्त्रें पावलियावर इकडे येण्याविशीं पत्रें जातील. याजकरितां लांब जावयाचें करूं नये म्हणून सूचना जावी. उभयतांस फौजसुद्धां यावयाचें, त्यास फौज चांगली सडे स्वारीचे सरंजामसुद्धां यावयाचें करावें. भाऊसाहेबांसही सूचना व्हावी. तेथून आज्ञा काय येते हा भाव एक वेळ श्री॥ नानांस लिहून पाठविला पाहिजे. भाऊसाहेबांचा भाव लिहूं नये. राजमंडळाचाही उपद्रव बहुत आहे. फौज इकडे आलियावर उपद्रव बहुत होईल, याचाही विचार केला पाहिजे. मूळ मिरज व सरंजामाचे महाल. विचार करून स्वामी करितील, परंतु सूचनार्थ विनंती लिहिली आहे. एकसालीचे ऐवजाकरितां स्वार गेले आहेत ते ऐवज घेतल्याशिवाय येणार नाहींत, उपद्रव करितील, याचाही विचार असावा. ऐवज द्यावाच लागतो. सर्वांनीं दिला आहे. हे विज्ञापना.

नं. ४५७१ श्री. ( मार्ग. व. ९-३१ दिसें. )

पै॥ छ० २९ रज्जब सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं विनंती. सेवक गोविंद शामराव. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० २२ रज्जब मुक्काम लष्कर नजीक कोपळ तीन कोस येथें वर्तमान सेवकाचें यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्र छ० १३ रज्जबचें पाठविलें तें छ० १८ रज्जबीं पावलें. इकडील वर्तमान नबाबाचे तालुकेंत घासदाणा घेत श्रीमंत चालले आहेत. दोन महिने याच प्रांतांत रहावें असा बेत दिसतो. रास्ते यांजकडील फडणीस व

१ पत्र पुण्याहून नानाच्या विश्वासू कारकुनाचें.

वे॥ राजश्री बाबूभट अद्यापि येथेंच आहेत. वस्त्रें रास्ते यांजकडे आलीं आहेत म्हणोन वर्तमान आलें, त्यास येथून श्रीमंतांची कराराची याद ( व ) ऐवजाची निशा रास्ते यांजकडे जावी तेव्हां तेथून वस्त्रें यावीं, ऐसें रास्ते यांजकडील फडणिसाचें बोलण्यांत आहे. येथून पुढें काय निश्चय ठरेल तो मागाहून सेवेशीं लिहितों. राजश्री धोंडोपंत गोखले धारवाडनजीक दोन कोसांवर आहेत. त्यांचे लष्करांतून कालच राजश्री बाळकृष्णपंत लागू येथें श्रीमंतांस भेटावयास आले. त्यानीं वर्तमान सांगितलें म्हणोन सेवेशीं लिहिलें आहे. करवीरकर महाराजांची फौज व राजश्री रत्नाकरपंत मनोळीचे बारीस आहे. इकडून पेंढारी वगैरे हजारपांचशें त्या लगत्यास एखादें गांव मारून आणावयाचे बेतानें गेले आहेत. येथून पुढें अघाडीस श्रीमंत राजश्री आपासाहेब चार हजार फौज व पायचें माणूस दोन हजार, येणें प्रमाणें चार कोसांचे तफावतीनें उत्तरतात. श्रीमंत राजश्री दाजी साहेब बाजूस दोन तीन कोसांचे तफावतीनें आहेत. तसेंच राजश्री विठलराव बाबाही निराळेच उतरतात. खाशांजवळ स्वामींचें पथक व राजश्री हरीपंत धायगुडे व हुजरात एकूण जमाव पांच सहा हजार पावेतों आहेत. राजश्री तिमराव पारसनीस ( मोंगलाकडे ) गेले ते अद्यापि आले नाहींत. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५७२ ( मार्ग० व० ९–२१ डिसें. )

गणेशराम पेठे याचें परशुराम भाऊंच्या लष्करांतून मिरजेस पत्र. छ० २२ जमादिलाखरचें––

"श्री॥ राजश्री भाऊसाहेब छ० १९ जमादिलाखरी श्रीकृष्णा उतरोन आले. नंतर छ० २० जमादिलाखरीं मलप्रभाही उतरले. आज तो मुक्काम आहे. उद्दैक तो कोणते रोखें जातात न कळे. राजश्री धोंडोपंत गोखले यांस मिळावयास जातात अशी आवई आहे. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा येथून पांच कोसांवर आहेत. कपाटसंगमतीरास आहेत. पुढें काय होतें पहावें. व दुसरी बाजार आवई मनोळीस जावयाचा बेत आहे असें बोलतात. कोणीकडे जातात पहावें"

नं. ४५७३ श्री. ( मार्ग व० ९–२१ डिसें. )

पै॥ छ २९ रज्जब. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० २२ माहे रज्जब मुक्काम मलीकसमुद्र नजीक येलबर्गे येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं जासुदाबरोबर पत्र पाठविलें तें

पावलें. खर्चास ऐवज पाठवितों म्हणोन लिहिलें, उत्तम आहे. रज्जब अखेरीस तरी रवानगी झाली पाहिजे. रज्जब अखेर जाहलेवर जमादिलावलचा आठवडा एक राहिला आहे तो व जमादिलाखरचे रोजमरे दिले पाहिजेत. कागदाच्या गड्ड्या दोन सांडणीस्वार येतात त्यांजबरोबर पाठवाव्या. येथें खोळंबाच झाला तेव्हां अर्धी गड्डी मिळाली ती पांच रुपये देऊन घेतली. तथापि कागद चांगले नाहींत. वरकड येथील वर्तमान तूर्त कांहीं विशेष नाहीं. नरगुंदचे रोखें लष्कर जात होतें, परंतु तो रोख सोडून तूर्त गदगचे रोखें जात आहेत. गदगाकडून सावनूर तालुक्यांत जातील. आज बेंदवटीचे मुक्कामास आले. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५७४   श्री.   ( मार्ग व० ९–३१ डिसेंबर. )

पै॥ छ० २२ रज्जब. सन तिस्सा तिसैन

सेवेशी विज्ञापना ऐसीजे, श्री॥ राजश्री नानांची भेट घेतली. सर्व मजकूर विदित केला. श्री॥ राजश्री बाळासाहेब यांचें पत्र प्रविष्ट केलें. नंतर विनंती केली कीं, "श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस वस्त्रें सरकारांतून कृपा होऊन रास्ते यांचे स्वाधीन झालीं. त्यास हा योग आपणच केला. त्यास श्री॥ राजश्री भाऊसाहेब याजविशींचा करारमदार सरकारांत ठरून याद ठरली आहे त्यास बेरीज किती ठराव केला? भाऊसाहेब यांजवर फौजेचा पेंच सातारेयापासून आज पावेतों किती आहे हा अर्थ सर्व आपले ध्यानांत आहे. त्यास बचाव हरएकविशीं[१] व्हावा. येविशीं श्री॥ राजश्री बाळासाहेब यानी बहुता प्रकारें श्रुत करावें म्हणून आज्ञा केली आहे, त्याजवरून विनंती करितों. मी आपणाजवळ येऊन आज्ञा घेऊन मिरजेस गेलों तव्हां ( आपली ) आज्ञा जाली की, याउपर इकडील वर्तमान होईल विचार तो राजश्री बाळासाहेब यास लिहून पाठवितों. तिकडून पुढें राजश्री भाऊसाहेब यांस ल्याहावें. तिकडून उत्तरें येतील तीं पाठवीत जावीं, म्हणून आज्ञा होती. त्यास आपलीं पत्रें यावीं ही मार्गप्रतीक्षा यजमान मिरजेस करीत होते. श्री॥ राजश्री भाऊसाहेब याणीं सुरापूर येथील कारभार उरकल्यानंतर श्री कृष्णा उतरोन दक्षणतीरास गेले. आपली आज्ञा काय होते याची मार्गप्रतीक्षा करितात. थोडे थोडे लांबत गेले. फौज पंचवीस हजारांचा सुमार. याजखेरीज पेंढार वगैरे. येक जागां राहून परिणाम नाहीं यास्तव इतके लांब गेले. याउपर जशी मर्जी असेल तसें करून जिकडे जाणें म्हणोन आपण सांगतील तिकडे जातील. करवीरवासी महा-

---

१ पत्र मोगे आपाजीचे परशराम भाऊस.

राजानीं प्रांतांत दंगा मांडला आहे. मनस्वी खंडण्या घेतात. ठाणींही बसवीत आहेत. प्रांतांत जीव राहिला नाहीं. त्यास महाराजांचे बंदोबस्तास जावें अशी आज्ञा जालिया पत्रें सरकारचीं व आपलीं द्यावीं म्हणजे तिकडे जातील." त्यावरून उत्तर कीं, "भाऊंविशी येथें मोठी अडचण पडली. श्रीमंतांची मर्जी कांही केल्यानें वळेना. रास्ते यास तगादा बहुत करावा ऐसा विचार दिसोन आला. तेव्हां दोन चार वेळां श्रीमंतांस सांगितलें कीं, भाऊंसारखे सरदार सरकार दौलतीमध्यें कोण आहे ? अंतरही पडलें आहे, परंतु तें सर्व विसरोन रास्ते यांस यश देऊन त्यांजवर कृपा व्हावी. नंतर हीं बोलणीं बोलोन ठरावही केला. दहा लक्ष रुपये व खंटणी चार लक्ष. त्यास वाइदा दोन वर्षांनंतर दोन सालांत द्यावे. याप्रों ठराव केला. भाऊंस मातबर मसलत दोन वर्षांचे आंत सांगितली तरी मग चार लक्ष रुपये मसलत संबंधें भाऊंस सोडावे. सरकारांत मागों नये. याप्रों ठरलें आहे. वरकड मंडळी भाऊंकडील त्यांचा खंड निराळा होईल. त्यांत असामी राजश्री चिंतोपंत, बाळाजीपंत, जयरामपंत हे त्रिवर्ग. वरकड याच बेरजेंत आहेत. पुढें भाऊंस सरकारांतून मातबर काम सांगावें याचीही योजना करीत आहों. भाऊ फार लांब गेले. पंचवीस हजार फौज धरली हें काय ? उगेच फौजेचे पेचांत आले ! इकडील जसा विचार ठरेल त्यासारखी जमा करावयास येती. कार्याकारण पांच सांत हजार फौज धरावयाची होती." त्यावरून विनंती केली कीं, करवीरवासी प्रबल जाले याचा बंदोबस्त कसा व्हावयाचा ? सरकार आज्ञा जाहल्यास त्यांचा बंदोबस्त करितील. त्यावरून उत्तर केलें कीं, भाऊंस थोडके मसलतीस गुंतवावयाचें नाहीं. त्यांस मोठेंच काम सांगावें हा विचार करीत आहों. ( टिपूविषयीं) इंग्रजांचें बोलणें लागलें आहे. ठरावांत यावें असा विचार आहे. जाहल्यास पाहतों. वरकड विषयीं भाऊंचे साह्य जेणेंकरून होईल तें करीत आहों. दुसरा अर्थ नाही. याप्रों सांगितलें. याउपर आणखी एकदोन वेळां बोलोन उत्तर काय होईल तें लिहून सेवेसीं पाठवितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५७५ श्री. ( मार्ग० व० १०-१ जाने. )

पै॥ छ० २९ रज्जब सन तिस्सा.

सेवेसीं विनंती सेवक बापूजी तीर्थो. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २३ रज्जब पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर राजमंडळकरानीं वेणूर, तालुका कित्तूरचें ठाणें परवां घेतलें. काल

---

१ चाकरीस ठेविली. २ दोडवाडच्या कमावीसदाराचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

संपगांव संगोली व हुबळीपर्यंत सडी स्वारी येऊन गुरें नेलीं. मौजे सुदगडे व आसुडी कर्यात एकुडी येथें गोखलेकडील कारकून दोन चारशें जमाव करून आज दोन महिने होते ते राजमंडळकरांचें उल्हाण पाहोन मूळजागा सोडून निघोन गेले. एकुडी व संवदत्तीस मनोळीकरानीं व तोरगलकरानीं जमाव मिळवून इकडे उपद्रव लाविला आहे. आज उद्यां नदीस येऊन उतरणार म्हणोन बहुत आवाई पडोन कित्तूर तालुक्यांतील लोक वगैरे तमाम पळोन जातात. राजश्री सरदेसाई कित्तूरकर आपले बायका वगैरे झाडींत लावून दिले. राजश्री व्यंकटराव असंगी यार्णी कित्तुरीं कारभार करितात हे आपलें कुटंब गुरेंढोर वगैरे सुद्धां निघोन धारवाडाकडे गेला. गोखलेनीं बरोबर बुनगें वगैरे एक दोन तोफा मिश्रीकोटेम पाठवून सडा होऊन धारवाडास आहे. किल्लेवाले व यांस बिघाड झाला आहे. किल्लेकरांचें व राजमंडळकरांचें एकसूत्र आहे म्हणोन लोक वार्ता आहे. दांडवाडास यावयाचीही दाट आवाई आहे. याजमुळें गोरगरीबांचे पाय ठरत नाहीं, आणि दंगेखोर, कांहींच समजत नाहीं. याजकरितां लोकांची जमियत करून बंदोबस्तीनें आहे. गोखले कित्तूरकर वगैरे यांस कांही सामील होणेचें सूत्र दिसत नाहीं. ऐन हंगामाचे वसुलाचे दिवसांत दंगा आला आहे. येथून नदी दोन कोस आहे. संवदत्ती एकुडी तेही दोन कोस आहेत. येथें जमाव मिळतील. वकुंदचे नदीस लष्कर खुद्द राजेसुद्धां येणार आहेत. आणखी होईल तें वर्तमान मागाहून सेवेशीं लिहून पाठवितों. येथून वेणूर सहा कोस आहे. सेवेशीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ४५७६ श्री. ( मार्ग. व० ११–२ जाने. )

पै॥ छ २६ रज्जब सन तिस्सा तिसैन. मार्गशीर्ष मास.

सेवेशीं[1] विनंती सेवक श्रीधर गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २४ रज्जबपावेतों यथास्थित असे. विशेष. थोराताकडील सरंजामाचे जप्तीस पुण्याहून राजश्री गणेशराव वाळवेस आले आहेत त्यानीं धामधूम फार आरंभिली आहे. इकडे भोवरगांवी, कडेगांव, वांगी वगैरे खेड्यास रोखे स्वार पाठवून हजार पांचशें रुपये गांव पाहून घेतात. आणखी पुण्याहून एक पलटण व पांचशें स्वार येत आहेत. काल कडेपूरचे मुक्कामास आले ते ही रोखे करतात. पुढें वाळवेंसच जाणार. रहदारी देवरअंष्ट्रेचे शिवारांतून पडली आहे. हरभरा कडबा वगैरे पिकास उपद्रव बहुत लागतो. येथें रोखा पत्र येणार

१ पत्र देवरअंष्टे येथील कमावीसदाराचें मिरजेस.

येविशींचा बंदोबस्त व्हावयास्तव सेवेशी विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५७७ श्रीगणपति. ( मार्ग. व. ११–२ जाने. )

पै॥ छ० २७ रजब सन तिस्सा तिसैन.

अपत्यें हरीनें[1] शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० २४ रजब सौम्यवार प्रातःकाळ पर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजी एक दोन वेळां गुप्त वस्त्रें गेल्याचा मजकूर लिहिला होता त्याचें उत्तर कांहीं समर्पक आलें नाहीं. पुण्याकडील बातमी पक्की खाचित गुप्त वस्त्रें दोन दागिने राजश्री मोरो आपाजी परांजपे यांजबरोबरच रवाना झालीं. समागमें एक पत्र श्रीमंतांचें व एक पत्र राजश्री नानांचें येणें प्रमाणें खाचित होतें यांत गुंता नाहीं. वडिलांस कळलें म्हणजे झालें. राजश्री मोरो आपाजी परांजपे यांस आपलें पत्र जावें कीं, वडिलांवर सरकारची बेरीज रास्ते यांचे विद्यमानें ठरावांत आली आहे तेव्हां सरकारची पद्धत पूर्वीपासून आहे ( कीं ) चार रुपये ठरावांत आलेनंतर जमीमध्यें नक्की ऐवज वगैरे जो जिन्नस घेतला आहे तो जगाबाजगा माघारा देतात. या प्रमाणें आहे. तो यावा. याशिवाय चिरंजीव राजश्री महादेवराव दाजींचे गोटांतील व पर्वतीजवळ गोट होते तेथील आमदारखान्याचीं घोडीं उंट वगैरे सरकारांत व शिलेदार व पागे यांजकडे गेलें आहे तें व जुन्नरावर वगैरे शिलेदार यांचीं घोडीं उंटें वगैरे गेलें आहे तेंही यावें. त्यावांचून शिलेदार यांची तोड पडावयाची एकंदर नाहीं. तूर्त चाकरीवर आहेत. अखेर साल आलें म्हणजे या गोष्टीचा मोठा घोळ पडावयाचा तेव्हां याची तोड निघाली पाहिजे. व सरकारांत कागदपत्रांचे रुमाल गेले आहेत ते यावे. राजश्री बापूजीपंत बापट यांजकडून लोकांस तगादे होतात ते होऊं नये व ते रुमालही यावे, हे सर्व प्रकार मशारनिल्हे यांस लिहावे. त्यांनी राजश्री नानांस विनंती करून नमुदांत आणावें व हल्लीं सरकारांतून राजश्री नानांकडील जें जप्तीनें गेलें होतें तें झाडून दिलें. कळावें. आम्हांकडे सरकारांतून सावनूर तालुका रद्दकर्जांत होता तो ( आमच्या कबजांत ) यावा तेव्हां सावकाराची थोडी बहुत तोड पडेल. सालमजकुरीं तालुकेयाची गोखले यांनीं व रत्नाकरपंत यानी कांहीं बाकी ठेविली नाहीं. पांच चार वर्षें लावणी व्हावयास पाहिजेत. परंतु ज्याचे चार रुपये देणें त्यास एक एक महाल लाऊन दिला असतां पुढें चार रुपये मागावयास जागा होतो. यास्तव साव-

---

[1] हरि परशुराम पटवर्धन यांचे सातान्याहून मिरजेस बाळासाहेयास पत्र.

नूर तालुका ( मोकळा ) करून घेणेंविशींही मोरोबास लिहावें. मागील कर्ज व हल्लींचा पैका म्हटलें असतां परिणाम कसा लागेल ? त्यास परांजपे यांस लिहून सावनूर तालुका आम्हांकडे झाला असतां कांहीं बचाव आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४५७८　　( मार्ग ० व० ११–२ जाने. )

आपाजी हरीकडून बाळासाहेबांस पत्र. रवाना छ० २४ रज्जबचें.–

"बेरडाची फौज दोन अडीच हजार व पायदळ दोन हजार याप्रमाणें सरंजाम इंडी व तांबें व अलमेलें व होर्ती चांदकवठें या महालच्या खंडण्या घेऊन मौजे डोमनाळ परगणे होर्ती येथें राहिले आहेत. विजापूर परगण्यावर स्वारी करून गुरें चार हजार नेलीं. बरडोल परगण्यावर स्वारी करावयाची उमेद आहे."

नं. ४५७९　　श्री　　( मार्ग० व० ११–२ जाने. )

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं

विनंती सेवक देवराव कृष्ण देशपांडे. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता॥ छ० २४ माहे रज्जबपर्यंत स्वामीचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान श्री॥ महाराज छत्रपति स्वामी यांचा मुक्काम नेसरीचे ओढ्यावर जाहला आहे. पेंढार वगैरे कडेगुदी ता॥ मजकूर येथपर्यंत आलें होतें. थोडीं बहुत गुरें घेऊन जात होते. बागीचे लोकानीं गुरें काढून घेतलीं. कित्तूर तालुक्याचें गुळें कडेगुदी व मारेहाळ येथें येऊन भरलें आहे. कांहीं केल्यास मागें जात नाहींत व इकडेही पोटचे गांवीं येऊन राहत नाहींत. कित्तूरकर देसाई याचें कुटुंब भीमगडास गेलें म्हणून वर्तमान आहे. कित्तूरकराचे तहाचें बोलणें ठरत नाहीं. काय घडतें पहावें. सुतकट्टें व नेसरीस आग घालून गांव जाळून खराबी केली. श्री॥ छत्रपति स्वामीचें म्हणणें कीं, ( कित्तूरकरानें ) सालगु॥ पैकीं दोन लाख रुपये द्यावे. रुपये न मिळतील तरी अघाडीस आपले जमाव पांच हजार प्यादे व राऊत पांचशें घेऊन सरकारची चाकरी करावी. गोखले वगैरेकडे मिळों नये. त्याजकडे पन्नास हजार रुपये सालमजकूर पैकी सरसुभ्यानिसबतीनें आदा जाहलेला ऐवज वजा होतो. साल गुदरतां समशेरजंगबहाद्दर किताब व राज्य हत्ती शिरपेंच वगैरे देऊन वाढविलें असतां स्वामिद्रोहपण केलें म्हणोन राग भारी आहे. मरदेसाई सडे हुबटीस आहेत. रा॥ व्यंकटराव रामचंद्र आसंगीकर

१ बरडोल परगण्याचा कमावीसदार.

रा॥ गोखले यांसीं बोलावणेंस्तव गेले आहेत. बुणगें सारें मिश्रीकोटाकडे पाठवून सडे आहेत. इकडे आम्हांस राजमंडळकर व कित्तूरकर मिळोन दंगा करतील हा संशय पडला आहे. संवद्त्तीमध्यें तोरगलकरानीं जमाव मिळविले आहेत त्याणीं येकुडीचे आश्रयानें तडका स्वाऱ्या करितात. दोडवाडचे बंदोबस्त करविले आहे. मलापहारीवर राजमंडळचे मुक्काम जाहल्यास आपोआप ठाणीं कित्तूर प्रांत वगैरे झाडून जातात. ईश्वरी भविष्य समजत नाहीं. रा॥ नारोपंत करंदीकर याणीं आतांच पत्र पाठविलें आहे कीं, बारीचे बंदोबस्त पक्के राखून कदाचित राऊत आल्यास बेमुलाहिजा ठोकावे म्हणोन सांगोन पाठविले आहेत. राऊत जमाव बारीसच ठेविले आहेत. कूच होते समयीं काय घडतें पहावें. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४५८० श्री ( मार्ग० व० ११–२ जाने. )

पै॥ छ० २८ रज्जब. सन तिस्सा तिसैन.

विज्ञापना ता॥ छ० २४ रज्जब गुरुवार. रा ॥ दौलतराव शिंदे यांजकडील पलटणें खानदेशांत बायांकडील यशवंतराव याचे पारिपत्याकरितां पाठविलीं होती. त्यास यशवंतराव नाशिकाकडे आले. पलटणें खानदेशांत होतीं तीं वऱ्हाडांत जाऊन दंगा करूं लागलीं. भोसले यांजकडील राजश्री विठ्ठलपंत याणीं फौज घेऊन येऊन पलटणें घेरलीं आहेत. इकडे येऊं देत नाहींत याप्रों बातमी आली आहे. श्री नाशीक क्षेत्रास पठाणानीं भारी उपद्रव केला. रा॥ माधवराव ओक कमावीसदार यानीं पहिल्यानें पंधरा हजार रुपये दिले असतां फिरोन तगादा लागला. तेव्हां पळोन गेले. नंतर हल्लीं त्यांचे वाड्यास पठाणानीं खणत्या लाविल्या आहेत. मोठा अनर्थ मांडिला आहे. सरकारांतून विठ्ठल शिवदेव, कांहीं पागा व शिंदे यांजकडील चार पलटणें व कांहीं फौज रवाना जाहली. खडकीवर मुक्काम जाहला आहे. पुढें कूच करून गेल्यावर मागाहून विनंती लिहितों. पठाणानीं अमर्यादा मांडली आहे. बायकांचा आब घेतात. शें दोनशें बायकानीं प्राणत्याग केले. आणखीही प्रलय मांडिला आहे. श्रीमंतांचे दौलतीपासून दक्षिणेंत या प्रकारचा अनर्थ जाहला नव्हता. ईश्वरी इच्छा प्रमाण! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५८१ श्री. ( मार्ग० व० १२–३ जानेवारी )

तालीक.

पै॥ छ० ११ साबान. पौष मास. सन तिस्सा तिसैन.

विज्ञापना ऐसी जे, तागायत छ० २५ रजब गुरुवासर क्षेम असों विशेष.

*रास्ते यांजकडील राजश्री बाबा फडणीस पुण्याहून श्रीमंत राजश्री आनंदराव दादा यांनीं श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडे रवाना केले आहेत. त्यास इकडे ढेकणे यांजपाशीं बोललों असतां यथास्थित जाला विचार सांगितला नाहीं. त्यास श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचें व ढेकणे यांचें बोलणें काय झालें आहे न कळे. लेखन करणार याचें व श्रीमंत राजश्री पंतप्रधान याचें यथास्थित मिळत नाहीं. लौकिकार्थ मात्र मिष्ट व्यवहार होतात. परस्परें सावधता आहे. त्यास न जाणो, हा विचार श्रीमंतांनी चित्तांत आणोन फडणीस गेले आहेत, त्यांजपाशीं एकादे अटकेस वडिलांस गुंतवावें असा प्रकार—न जाणो—जाला असेल. किंवा न कळे. त्यास सैन्यांतून वडिलांचीं पत्रें अलीकडे आलींच असतील. भाव ध्यानांत आला असल्यास आज्ञा जाली पाहिजे. तिकडून फडणीस आल्यानंतर ढेकणे वस्त्रें घेऊन वडिलांकडे जाणार. जाते समयीं कानांत गोष्ट सांगों त्या प्रमाणें भाऊनीं करावें. म्हणोन श्रीमंतांनीं सांगितलें, या प्रमाणें ढेकणें म्हणतात यांतील अर्थ कांहीं एक समजत नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५८२ श्रीगणपति. ( मार्ग० व० १२—३ जानेवारी. )

पै ॥ छ० २९ रज्जब. सन तिस्सातिसैन. पौष शु॥ १.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं अपत्यें कृष्णानें करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २५ रजबपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री आपाजीपंत बापट यांजकडील बातमीचें पत्र आलें कीं बेरडांची फौज मौजे डोकनाळ पो होर्ती येथें येऊन उतरली आहे. स्वार पायदळ मिळोन चार हजार आहे. मागाहून आणखी वरचेवर येत आहे. होती परगणेची खंडणी केली. याउपरी हलसंगी बरडोल परगण्यांत स्वारी करणार, मंगळवेढेपर्यंत येणार, अशीं पत्रें आलीं. शिवाय किरकोळ बातमीच्या चिठ्या ही आल्या आहेत. त्याजवरून वडिलांस कळावें यास्तव लिहिलें आहे. मशारनिल्हे यांजकडील बातमीखेरीज वाटसरू येणारांचे सांगण्यांत ही बरडोल

---

* मूळपत्र नाना फडणवीस यांचे कारकून बालकृष्णपंत भाऊचाळ यानी बाळासाहेबांस लिहिलें त्याची ही नक्कल. नानांविरुद्ध काही कारस्थान करावयाचें पेशव्यांच्या मनांत असून त्यांत भाऊंस आपणाकडे वचनानें बांधून घ्यावें हा तर पेशव्यांचा बेत नसेल ना, असा संशय हें पत्र लिहिणारा प्रकट करीत आहे. १ पत्र मंगळवेढ्याहून मिरजेस.

परगण्यावर व मंगळवेढें परगण्यावर स्वारी करणार अशी लष्करांत वदंता. याजप्रमाणें वर्तमान आहे. आणखी वरचेवर बातमी आणून सेवेशीं लिहितों. बरडोल परगणा लगत आहे. तूर्त तेथील बंदोबस्त जाहला पाहिजे. पागेची घाडी आगाऊ पाउणशें सुमार येथें आणिलीच होती. बाकीचीं आणावयासीं कारकून पाठविला आहे. या परगणेंत बेरडानें तोंड टाकिल्यास पुढें बंदोबस्ताची आज्ञा कोणे अन्वयें ती जाहली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४५८३ श्री. ( मार्ग० व० १२–३ जाने )

पै ॥ छ० १ साबान सन तिस्सा तिसैन पौषमास.

सेवेशी मोरो आपाजी परांजपे साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २५ रजब गुरुवासर सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर कलकत्तेहून इंग्रजाकडून पामर वकील आला आहे. इंग्रजाचें बोलणें बोलतो की, सरकारांतून मातबर सरदार फौजसुद्धां आम्हांसमागमें यावे. इंग्रजाचें व टिपूचें द्वंद्व अत्यंत वाढलें आहे. सरकारची फौज व जबाबाकडील फौज घेऊन जाऊन पारिपत्य करावें हा विचार बोलण्यांत आला आहे. सरकारांतून कबूल करावें असा बेत आहे. इंग्रजांनीं नबाबाकडे वकील पाठवून त्याजपाशी करार केला आहे. सरकारची फौज देणार. त्यास मसलती ठरावांत आल्यास हें काम श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस सांगावें हा विचार श्री॥ राजश्री पंतप्रधान यांजकडून व नानांकडून आहे. शिंदे यांचें व बायांचें मिटत नाहीं. मुशाफरखान मृत्यु पावला हें वर्तमान पेशजी विनंती पत्रीं लिहिलेंच आहे. अलीकडे गमजी पाटील बायांकडे बोलावयास गेले होते. कांहीं एक बोलणें न ठरे. घडी बिघडोन माघारे आले. येतेसमयीं हजार दोन हजार फौज तिकडून उठोन आली. राजश्री नारायणराव बक्षी यांस समाधान दहा पंधरा दिवस नाही. त्यांजकडे खर्चाचा मोठा गवगवा जाहला आहे याजमुळें लोक उठोन आले. आणखी येणार. शिंदे याणीं तिकडे लोक गेले आहेत त्यांस दिलासे दिले आहेत. आणखी लोक येतात की काय पहावें. राजश्री आबा चिटणीस यांस शिंदे यांजकडून आत्माराम तांबोळी आणावयास गेले. आबा आले. शिंदे सामोरे जाऊन गुलटेंकडीजवळ जाऊन मोठे सन्मानानें भेटले. कंठी मोत्याची तुरा चौकडा दिला. काल तृतीय प्रहरीं श्री॥ राजश्री पंत प्रधान यांचे भेटीस सरकार वाड्यांत आले. भेट झाली. सहा घटका खलबत झालें. नानांची ही भेट झाली. मशारनिल्हे शिंदे यांजकडे आले आहेत. पुढें काय विचार होतो

कळत नाहीं. शिंदे कूच करणार असा लौकिक आहे. उगाच नाद मात्र पैका काढावयाचा आहे. परंतु सुमार दिसत नाही. श्री॥ राजश्री पंतप्रधान यांचा व नानांचा एक विचार आहे असा अर्थ तिळप्राय नाही. लौकिक पाहतां नानांस हरएक विचार पुसल्याशिवाय करीत नाहीं. त्याणीं ही एकादी गोष्ट सांगितली असतां ऐकावयाची आहे ते मात्र ऐकावी. चित्तानें कर्तव्य नाहीं तें इकडून सांगितलें असतां हरएक पर्याय लावून सिद्धीस जात नाहीं. याप्रमाणें व्यवहार चालिले आहेत. कारखानामध्यें हरदमख्याली चक्रदेव आहेत. नाना त्यांची मुद्रारत बहुत करीत आहेत. परिणाम यथास्थित नाहीं. शिंदे याणीं कूच करून जावें, पैका निघेल तसा घ्यावा, येविशींचा चिमटा मुख्याकडे आहे असें दिसतें. असे बखेडे राज्यांत उत्पन्न जाहले आहेत. पुण्यांत दिवसाचें कोणाचें घर लुटलें असतां दाद नाहीं. नाशिकास पठाणांनी मोठा प्रलय मांडिला आहे. दहावीस ब्राह्मणस्त्रियांनी विहिरींत उड्या टाकून जीव दिले. हा प्रळय मांडिला आहे. शिंदे जात नाहीं हेंच खरें दिसतें. इंग्रजांनीं सरकारची फौज व नबाबाकडील फौज मदतीस न्यावयाचें कारण फरांशिस यांचा व टिपूचा करारमदार जाहला. उभयतां एकविचारें होऊन इंग्रज बुडवावे याप्रमाणें होऊन फरांसीस सरंजाम करीत आहेत. टिपचे लेंक डेरेदाखल जाहले. या प्रमाणें सरकारांत बातमी आहे. मुंबईस लढाईचा सरंजाम मोठा होत आहे. पामरांचें म्हणणें कीं, सरकारांतून सरदार मातबर यावा. त्यास श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस यावें म्हणोन म्हणतो. हें वर्तमान खचित आहे. राजश्री कृष्णाजीपंत ढकणे पुन्हा भेटले होते. बोलणें जालें. परंतु छ० २२ रजबीं पत्रीं बोलण्यातील अर्थ लिहिला तोच आहे. रास्त यांजकडून राजश्री लक्ष्मणपंत फडणीस वडिलांकडे सैन्यांत बोलावयास गेले होते. त्यांचे बोलणें वडिलांजवळ जालेंच असेल. वडिलांकडे येथील ठरावाची याद नेली किंवा नाही, काय बोलतात, हा विचार श्री॥ रा॥ भाऊसाहेब याणी स्वामींस लिहिलाच असेल त्यांतील भाव वडिलीं लिहिला पाहिजे. एक दोन दिवशीं श्रीमंत राजश्री नाना "तुम्हांजवळ बरीक हरएक विषयींचे बोलणें बोलणार आहों." म्हणोन बोलिले. त्यास काय बोलणें होतें त्याचें उत्तर सेवेशीं लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दिला पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ४५८४ **श्रीगणपति.** (मार्ग. व. १४—५ जानेवारी.)

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीप्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद

---

१ चिमटा मुख्याकडे आहे = शिंद्याचा तगादा पेशव्यास आहे.

उपरी. आपण छ० १३ रजबचीं पत्रें पाठविलीं तीं छ० १८ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराची उत्तरें बीतपशील. कलमवार.

राजश्री माधवरावजी रास्ते याच्या पत्राची नक्कल पहावयास पाठविली ती पावली. सरकारांतून कृपा केल्याचा मजकूर लिहिला तो कळला. श्री गजाननाच्या कृपेकरून घडेल तें खरें. कलम १

आमचा मुक्काम येलबर्ग्यानजीक मलिकसमुद्राजवळ आहे. तेथून गजेंद्रगड उजवीकडे चार पांच कोस आहे. चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा कोपळ तालुक्यांत किनाळाजवळ आहेत. त्यांचे आलीकडे चिरंजीव राजश्री महादाजीपंत दाजी दोन अडीच कोसांवर बदवटी व कुदरीमोती या दोहोंच्या दरम्यान आहेत. मुलूख वेंकजाचा नव्हे. याउपर सावनूरचा रोख धरितों. कलम. १

राजश्री नाना यांचें पत्र फौजेच्या मजकुराविशीं आलें त्याची नक्कल व आपण पत्र पाठविलें त्याची नक्कल व श्रीमंतांच्या पत्राची नक्कल व बाळकृष्णपंत याच्या पत्राच्या नकला पहावयास पाठविल्या त्या पावल्या. फौजेच्या मजकुराविशीं श्रीमंतास उत्तर लिहिल्याचा व मोरो आपाजी याची रवानगी केल्याचा मजकूर लिहिला तो कळला. कलम १.

एकूण तीन कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० २७ रजब. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

पे॥ छ० २९ रजब. सन तिस्सातिसैन पौष शु॥ १

नं. ४५८५ श्री. ( मार्ग० व० १४–५ जानेवारी. )

पे॥ छ० २७ रजब. सन तिस्सा तिसैन.

[1]सेवेशीं विज्ञापना ऐसी जे. राजश्री विठ्ठलराव अण्णा गोळे यांजविशीं श्री॥ राजश्री नानांस पत्र मजबरोबर दिलें होतें. व गोळे यांविषयीं बोलण्यास आज्ञा होती. व हल्लींचे पत्रांत एक पत्र गोळे यांजविशीं होतें. त्यास अण्णांविशीं दोन वेळां नानांस विनंती केली कीं, "राजश्री विठ्ठलराव अण्णा यांजवर आपण कृपा करावी. त्यांजपासून हरएकविषयीं अंतर पडलें असल्यास चित्तांत आणूं नये. त्यांजपाशीं काय अर्थ आहे नाहीं तो प्रकार आपणांस सर्व विदित आहे. चार लक्ष रुपये सरकारांत कर्ज जमा आहे. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडे तीन लक्ष रुपये आहेत. मशारनिल्हे यांची जप्ती जाहली ते समयीं कापड नक्त वगैरे मिळोन लाख पाऊण लाख रुपये याचा अजमास आहे. दोनचार लक्ष रुपये बूड कुळें. याप्रमाणें त्यांचा विचार आहे. हल्लीं त्यांस तसदी बहुत जाहली

---

१ मोरो आपाजी परांजपे वकील याचें मिरजेस पत्र.

आहे. त्यांचा बचाव जाहल्यास उत्तम. नाहीं तरी त्यांचे प्राणावर गोष्ट आली. इतकी तसदी त्यांस आहे. श्री॥ राजश्री बाळासाहेब यांणीं दोनतीन वेळां अण्णाविषयीं विस्तारेंकरून आपणांस लिहिलें आहे. त्या अर्थी यांस तसदी न होईल तो अर्थ केला पाहिजे." त्यावरून उत्तर जाहलें कीं, "मजकडून तिळभर त्याजवर राग नाहीं. श्रीमंतांची मर्जी त्याजविशीं फार क्रूर आहे. तिकडे रदबदली त्याणीं करावी. त्यांजपाशीं कांहीं नाहीं म्हणोन बोलतां, तरी पंचवीस लक्ष रुपये त्याचे अंगीं लावून देतों. कोण तुम्हांजवळ त्याजकडून बोलत असेल त्यास घेऊन या! खातरजमा करून देतों. त्याणीं रदबदली करून फल नाही. सरकारांत कांहीं तरी बोलोन फडशा करवा यांत उत्तम. नाहीं तरी तगादा मना होत नाहीं." याप्रमाणें बहुत रागानें बोलले. तुम्ही बोलत असल्यास बोलावें. त्यास मी सांगितलें की पैका त्याजपाशीं नाहीं. जीव मात्र हजीर आहेत. काय बोलावयाचें! याप्रमाणें उत्तर केलें. सविस्तर राजश्री अण्णांचे पुत्र अमृतराव यांस कळविलें. त्याणींही इतर द्वारें श्रीमंतांजवळ रदबदली लाविली आहे. मला सांगितलें. बहुतार्थी कांहीं एक (गोष्ट) दोन चार दिवसांत ठरेल ते मागाहून लिहून पाठवितों. पुन्हा अण्णांविषयीं स्वामींनीं नानांस लिहूं नये. मीच येथें सवड पाहून एक दोन वेळां पुसतों. हे विज्ञापना.

नं ४५८६ ( ५ जानेवारी )

गोविंद केशव काळे यांचें मोरोपंततात्यास पत्र. रवाना मार्ग० व० १४ मंदवारचें—

"पुण्याहून राजश्री नाना फडणीस यांचें पत्र सुगतवाला मोंगल आहे त्यास व जनार्दन शिवाजी म्हैसकर यांस आलें कीं, राजश्री बाळासाहेब यांजकडे दोन लक्ष रुपये येणें, त्याबद्दल करकंबचें ठाणें द्यावें. पुण्याहून त्रिंबकपंत कारकून मोंगलांकडे आला आहे. करकंबचें ठाणें द्यावयास चला म्हणून निकड करीत आहे. दुसरा मजकूर राजश्री शेषाद्रि सिंहराज वकील मोंगलांकडून पुण्यांत होते त्यांस मोंगलाकडे पाठविलें कीं, पंचवीस हजार फौज व दहा पलटणें घेऊन येणें म्हणोन राजश्री नानानीं पाठविला. तो मोंगलांची भेट वडधूलच्या मुक्कामीं घेऊन मोंगलाचा भाऊ व राजश्री भागानगरास गेले. त्यास सात आठ दिवस जाले."

नं ४५८७ श्री. ( मार्ग व० १४-५ जाने.)

पै॥ छ० २७ रज्जब सन तिस्सा तिसैन. मार्गशीर्ष.

विज्ञापना ऐसी जे आपणाकडील सरंजामाची फौज व श्री ॥ राजश्री[1]

---

१ मोरो आपाजी पराजपे याचें फिरजेम पत्र

भाऊसाहेब यांजकडील व दादांकडील फौज याप्रमाणें येथें यावी. पांच सहा हजारपावेतों ती फौज चांगली असावी. काम पडलें असतां दहावीस हजार फौजेस मोजावयाची नाहीं, याप्रमाणें येथें यावी; हे भाव (नानांच्या) बोलण्यांत आले आहेत. परंतु निश्चय होऊन काय आज्ञा होईल ती लिहून पाठवितों. करवीरवासी महाराज यांचा हरतऱ्हेनें समेट करावा, तूर्त प्रसंगीं मसलत लांबवावयाची नाहीं, येविशींची बोलणीं सरकारचीं येत येत आलीं आहेत. निश्चय जाला म्हणजे रा॥ शिवरामपंत थत्ते यांस करवीराकडे पाठवावें याप्रमाणें जालें आहे. निश्चयांत आल्यावर सांगतों म्हणोन (नानाची) आज्ञा जाली आहे. दहा लक्ष रुपये व आणखी चार लक्ष रुपये श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडील ठराव जाला आहे, त्यास भाऊसाहेब यांस मातबर मसलत सांगावी. त्या मसलतीस पैका लागेल त्यांत दहा लक्ष रुपये मजुरा द्यावे व चार लाख रुपये दोन वर्षांनीं द्यावयाचे तेहीं वजा घालोन बाकी ऐवज भाऊंस द्यावा, याप्रमाणें ठरावांत गोष्ट ठरविली आहे म्हणोन श्री॥ राजश्री नाना यांणीं सांगितलें आहे त्यावरून लिहिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५८८ श्रीगणपति. ( मार्ग व० ३० – ६ जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. आपण पत्र पाठविलें तें पावलें. सदोबाभाऊ वारल्याचें लिहिलें तें कळलें. येथें दहावे दिवशीं अस्तमानाचे पूर्वी पत्र पावलें. ईश्वर इच्छा प्रमाण ! मातुश्रीस वृद्धापकाळीं पर्वतप्राय दुःख झालें. भगवत्संकल्पास उपाय नाहीं. परम अनुचित गोष्ट झाली. रवाना छ० २८ रज्जब. बहुत काय लिहिणें. मातुश्रीस दुःख बहुत झालें. होणार त्यास इलाज नाहीं. आपणही वरचेवर समाधान करावें. चिरंजीव राजश्री दादा आबा अण्णा यांचेंही शांतवन करावें. चिरंजीव गंगाबाई व खंडेराव यांचें शांतवन करावें. ईश इच्छा प्रमाण. हे आशीर्वाद.

नं. ४५८९ श्रीगणपति. ( मार्ग व० ३०–६ जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. म्हैसकराचा मजकूर लिहिला तो कळला. ऐशियास त्याची रीत नीट असती तर असें कां होतें ? ते उगीच बोलण्यानें ताळ्यावर यावयाचे नाहींत. बंदोबस्त केला, बरें

---

१ शिव भास्कर. हा परशुराम भाऊ व बाळासाहेब या दोघांचाही चुलतभाऊ. २ भास्कर हरि यांची स्त्री सावित्रीबाई. ३ धोंडोबा दादा, विनोबा आबा व हरबा अण्णा हे तिघेही भास्कर हरीचे पुत्र व मयताचे बंध.

केलें! सारे फडशे करवावे. तपशील सांगतील तो ऐकावयाचा नाहीं. त्याणीं खेळ केले ते ध्यानांत आहेत; कागदोपत्रीं आढळांत येतात; असें असून भीड कां धरावी? ताव दिल्यावांचून त्यांस तरी काय गरज आहे, कीं लवकर उलगडा करावा! याजकरितां निकड चांगली असावी. त्यांची कोणाची गांठ पडों नये व निरोप जाऊं येऊं न द्यावेत असें असावें. रवाना छ० २८ रजब. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

छ० ५ साबान तिस्सा तिसैन, पौष.

नं. ४५९० श्री ( मार्ग० व० ३०–६ जाने. )

पै॥ छ० ५ साबान तिस्सा तिसैन. पौष मास.

सेवेशीं नीलकंठ आपाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २८ रजब पावेतों पावेतों स्वामीच्या कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावलें. सदोबा भाऊ बारल्याचें[1] लिहिलें तें श्रीमंतांस दहाने दिवशीं अस्तमानाच्या पूर्वीं कळविलें. इकडील वर्तमान तर येलबर्ग्यास मोर्चे बसले आहेत. हें काम झाल्यावर सावनूरचा रोख. येविशींचें श्रीमंतांनी लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. हे विज्ञापना

नं. ४५९१ श्रीगणपति ( मार्ग० व० ३०–६ जानेवारी. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. गजेंद्रगडच्या दक्षिणेस तीन कोसांवर येलबर्गे म्हणोन गढी आहे. तेथील अमील घांसदाण्याचे जाबसालाबद्दल लष्करांत येऊन जाबसाल न करितां निघोन गेला, आणि मार्गस्थांस लुटलें. बहुत आवाडाव करूं लागला. सबब मार्गशीर्ष वद्य द्वादशी गुरुवारी गढीस महसरा केला आहे. चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा व दाजी व विठलराव सारे येथेंच आहेत. गढीचें भिंताड चांगलें आहे. तोफांशिवाय काम झेंपत नाहीं. आपल्याकडील तोफा लागू केल्या आहेत त्यांपैकीं एक जय तोफ फुटली. यामुळें गजेंद्रगडाहून दोन तोफा आणविल्या आहेत. आल्यानंतर सुरुवात होईल. गढीवाल्याकडून बोलणेंही आलें आहे. परंतु प्रमाणांत नव्हे. रवाना छ० २८ रजब. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० ५ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

नं ४५९२ श्री. ( पौष शु० १–७ जाने. )

छ० २ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं बाळाजी महादेव दामले. साष्टांग नमस्कार विज्ञापना तागा

---

१ पांसे. भाऊंचा हुजर चिटणीस.

यत छ० २९ रज्जब पर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री चत्र-सिंग भोसले दोन हजार फौज व पांचशें पायदळानिशीं बत्तीस शिराळ्याहून निघोन सडे आले ते मंदवारीं मौजे चरेगांव येथें मुक्कामास राहिले. काल रविवारीं तेथून निघोन मौजे पालीवरून दोन टोळ्या केल्या. रास्ते यांचा मुक्काम मौजे कोडवलीनजीक पवई येथें होता. तेथें त्यांजवर एक टोळी आली. एक जकातवाडीचे मार्गानें बाजारपेढेवर आली. रास्ते यांचें फौजेची काल सायंकाळच्या चार घटका दिवसास गोळागोळी होऊन रास्ते यांचा मोड झाला. तोफा टाकून रास्ते यांची फौज पळोन निंबावर रातोरात गेली. राजश्री बाबासाहेबही पळोन रात्री मौजे पाडळी येथें आले होते ते रातोरात निघोन वांईचे सुमारें गेले. चत्रसिंग फौज सुद्धां शहरांत गेले. गडबड भारी झाली आहे. श्रीमंत राजश्री माधवरावजी रास्ते अगोदरच वांईस गेले आहेत. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५९३ श्रीगणपति. ( पौष शु० १ – ७ जाने. )

राजश्री अंताजी गोपाळ फडके स्वामी गोसावी यांसी

सेवक हरि परशुराम. नमस्कार. विनंती उपरी. आम्हीं काल रविवारीं सायंकाळीं साताऱ्याहून निघोन खटाव थोरलें येथें आलों. छत्रसिंग याणें रविवार सायंकाळीं रास्ते यांचे फौजेशीं गांठ घातली. खटपट भारी चांगली झाली. कोणं तेंही कांहीं राहिलें नाहीं. तुम्हांस पेशजी ‘ येणें ’ म्हणोन लिहिलें होतें त्याप्रमाणें थोरात व तुम्हीं बुनगेंसुद्धां पत्रदर्शनीं निघोन येणें. तुमची मार्गप्रतीक्षा करीत आहों. रवाना छ० २९ रज्जब. इंदुवार. चार घटका दिवस. प्रातःकाळ. हे विनंती.

नं. ४५९४ श्री. ( पौष शु० १–७ जाने. )

पौ॥ छ० ५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष मास.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० २९ माहे रज्जब मुक्काम येलबर्गे नजीक तीन कोस गजेंद्रगड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० १५ तारखेचें पत्र पाठविलें तें पावलें. ऐवज खर्चास रवाना लौकरच करितों म्हणोन लिहिलें, उत्तम आहे. आजपर्यंत हुंडी रवाना केलीच असेल. रोख ऐवज तेथून पाठवावयाचा ठीक नव्हे. मार्गाचें कठिण. येणार जाणारास मार्गीं लटतात.

---

१ बाबासाहेब वांईकडे गेल्याची बातमी खरी नाहीं. पुढच्या नंबरचें सुद्ध बाबासाहेबांचें पत्र पहा. २ रास्त्यांचें लष्कर लुटलें गेलें. कांहीं बाकी राहिली नाहीं.

येलबर्गेकरांनीं बहुत उपद्रव मांडला होता. लष्करचे येणार जाणारासही लुटलें, याजमुळें बंदवटीस ( श्रीमंत भाऊसाहेब ) येथून तीन कोस गेले होते तेथून फिरून माघारे येलबर्ग्यास परवां छ० २५ तारखेस येऊन मोच बसाविले आहेत. गांव थोर. पावणाशेंपर्यंत बुरूज आहेत. भिंताड उंच दहा बारा हात आहे. खंदक नाहीं. श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा व दाजी व विठ्ठलराव बाबा यादवाडकर झाडून फौजा येथें आल्या. तोफा लावल्या आहेत. तोफा मिरजेच्या त्याजपैकीं एक तोफ 'जय' काल प्रातःकाळीं बार होतांच फुटली. सविस्तर पत्र बाळाजी दामोदर यांनीं सेवेशीं लिहिलेंच असेल. गजेंद्रगडाहून चार तोफा आणविल्या. आणावयास गेले. राजश्री बहीरजी घोरपडे येथें होते तेच काल गजेंद्रगडास तोफा पाठवितों म्हणोन स्वार घेऊन गेले आहेत. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४५९५ श्री. ( पौष शु० १–७ जाने. )

पे॥ छ० ८ तिस्सा तिसैन. साबान. पौष.

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० २९ रज्जब पावेतों सर्व यथास्थित असे. विशेष. " राजश्री दौलतराव शिंदे यांची व बायांची समजी होते किंवा नाहीं व शिंदे हिंदुस्थानांत कधीं जाणार " म्हणून आज्ञा, त्यास बाया चांभारगोंद्यावर गेल्या. हिंदुस्थानांत शहा लाख फौजसुद्धां लाहुराअलीकडे आला आहे. राजश्री अंबोजी इंगळे व पिरू कंपूसुद्धां मथुरेहून पुढें तोंडावर जावयासीं गेले. त्यांचीं पत्रें शिंदे यांस सत्वर यावयाविशीं आलीं आहेत. यांचेंही मानस जलद जावयाचें आहे. परंतु घरांतील समजावीस होऊन जावें या विचारांत आहेत. सरकारांतून ही मध्यस्ती होत आहे, समजावीस सत्वर व्हावी आणि शिंदे यांस पस्तीस लक्ष रुपये द्यावे आणि रवानगी करावी या विचारांत आहेत. सात लक्ष रुपये रोख येथें द्यावे, आणि त्यानीं जांबगांवी जावें तेथेंही चार पांच लक्ष देऊन पुढें गेलेवरही कांहीं द्यावें व बऱ्हाणपुरास पोंचल्यावर येथुन तथपावेतों तेवीस लक्ष रुपये द्यावे आणि बारा लक्षांची वरात बुंदेले व झांसीवाले यांजवर द्यावी त्यास रोख ऐवज सरकारांत नाहीं. रास्ते यांचे विद्यमानें श्रीमंत भाऊसाहेबांचा ठराव झाला. वस्त्रें वगैरे रास्ते यांचे हवालीं झालीं आहेत. परंतु कांहीं जाबसाल उलगडावयाचें ठरत आहे. सत्वरच वस्त्रें तिकडे जातील. सांप्रत ( नाना ) शिंदे यांचे रवानगीचे व समजाविशीचे घोरांत रात्रंदिवस आहेत. समजावीस होऊन जातील तो सुदिन आहे ! प्रांताची खराबी कांहीं

लिहावी असा अर्थ राहिला नाहीं. पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रपावेतों हाहाःकार जाहला आहे तो पत्रीं काय लिहूं ? श्रीमंत ( नाना ) बहुत संकटांत आहेत. श्रीहरि पार पाडील तो सुदिन. हे विज्ञापना. राजश्री आबा चिटणीस आले आहेत. शिंदे त्यांस सर्व कारभार सांगणार असें आहे. बोलण्यासीं येऊं लागले आहेत. हे विज्ञापना.

नं. ४५९६ श्री. ( पौष शु० १–जाने. )

पै॥ छ० ६ साबान. तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं मोरो धोंडदेव कुंटे दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० २९ रज्जबपर्यंत मुक्काम येलबरगें नजीक गजेंद्रगड येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान येलबर्गेकरानीं कहीस व मार्गस्थ लोकांस उपद्रव करूं लागले याजमुळें श्रीमंतांची स्वारी माघारी छ० २५ रज्जबी येऊन ठाणें मजकुरास मोर्चे लाविले. तोफाही सुरू केल्या. नंतर दुसरे दिवशी तोफा सुरू झाल्या. दोन तीन बार झाले. चवथे बारास ' जय ' तोफ फुटून चार तुकडे झाले. माणसें जायां झालीं नाहींत. राजश्री गोपाळपंत सोनी यांस पहिले दिवशीं गोळी पायास गुढघ्याखाली लागली. धबका आहे. एक दोन रोज पाय थोडा सुजला होता. आतां बरे आहेत. श्रीमंत राजश्री आपासाहेब तासगांवकर मोर्चांत असतात. मोर्चे भिंतीनजीक शंभर सवाशें हातांवर आरब रोहिले यांचे गेले आहेत. ठाणेंस बुरूज पन्नासपर्यंत आहेत. गांव थोर आहे. आंत हजार पायदळ व दोनशें स्वार आहेत. आंत गुरें माणसें वगैरे गुळ्याचीं फार आहेत. पाणी विहिरीचें खारें आहे. खंदक नाहीं व तोफा जंबुरे कांहीं नाहींत. गोळीची मारगीरी होत्ये. आरबांचा जमादार व कवायतीपैकीं फिरंगी असे दोन माणसं ठार जाहलीं. आणखी एक दोन गारद्यापैकीं ठार झाले व कांहीं जखमी झाले. गांवांतून बोलावयास येतात परंतु त्यांचें बोलणें पांच दहा हजार रुपयांचें, व श्रीमंतांचें बोलणें एक लक्षपर्यंत; तेव्हां कसें ठरतें ? गजेंद्रगडाहून चार तोफा आणविल्या आहेत. आज उद्यां येतील. तोफांची मारगिरी भारी झाली म्हणजे भिंत पडेल तेव्हां बोलणें ठरेल. वरकड मजकूर अधिकोत्तर नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५९७ श्री. ( पौष शु० १–७ जाने. )

पै॥ छ० ८ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागा-

यत छ० २९ रज्जब पावेतों स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यस्थास्थित असे. विशेष. राजश्री मोरोपंत पराजपे यांची रवानगी आपण केली ते ( येथें ) येऊन पावले व पत्रें पाठविलीं ती पाहून बहुत संतोष झाला; व श्रीमंत राजश्री नाना स्वामीस पत्रें होतीं तीं प्रविष्ट करून सविस्तर विनंती केली. उत्तरें झाली तीं सेवेशीं मोरोपंतांनी व मी लिहून पाठविलीं तीं पावलींच असतील. हलीं छ० १६ रज्जबचें पत्र एक व छ० १७ रज्जबचीं पत्रें तीन श्रीमंत नानांस पाठविलीं व मोरोपंतासमागमें पत्र छ० ९ रज्जबचीं आलीं त्याचें उत्तर घेऊन पाठविलें आहे त्यावरून विदित होईल. व मजलाही पत्र आलें त्यांही मजकूर विदित केला. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब व श्रीमंत दादांस श्रीमंत नानानी पत्र लिहून पाठविलीं आहेत तीं पाहून रवाना करावीं. राजश्री बज्याबाकडील वरातेचा ऐवज द्यावा म्हणोन श्रीमंतांनीं लिहिलें आहे, त्यास एकदांच ऐवज मिळावयाचें संकट. याजकरितां दरमहा दहा पाच हजार रुपये द्यावयाचे ठरविल्यास बज्याबा ऐकतील. "करवीरकर महाराज स्वामी स्वारीस निघोन गोकाक वगैरे ठाणीं घेतलीं व शहापूरची खंडणी तीस हजार रुपये घेतली व पुढें बेळगांव व कित्तुराकडे जाणार. दंगा बहुत आरंभिला आहे. राजश्री धोंडोपंत गोखले धारवाडास आहेत त्यांजवरही चालोन जावयाचे विचारांत आहेत. गोखले यांचे हजार बाराशें स्वार हुबळी-वर आले आहेत. त्यास श्रीमंत राजश्री भाऊसाहेबानी सत्वर समीप यावयाचें करावें. सरकारचे किल्ले व ठाणीं जाणार नाहींत व महालही खराब होणार नाहींत. श्रीमंतानींही स्वामीस सूचना लिहिली आहे. जलद पत्रें वडिलांकडे रवाना करून समीप येत तो अर्थ झाला पाहिजे. स्वामीकडील व श्रीमंत दादांकडील फौज सरकारांत आणविली आहे ती दादासाहेबांसमागमें सत्वर पुण्यास यावी. फौज आली म्हणजे सर्व कामाचे उलगडे होऊन येतील. फौज सत्वर आल्यास बहुत उपयोग आहे. भाऊसाहेब समीप सत्वर येत अशी सूचना जलद जावी. समीप आले म्हणजे स्वामीकडील व दादांकडील फौज जलद येऊन पोंचावी. रहिमतपूरची घालमेल मानाजी शिंदे याजकडे होऊं देत नाहीं. राजश्री नारोपंतांसही आज्ञा झाली आहे ते श्रीमंतांस विनंती करीत आहेत. भाऊसाहेब जवळ आले म्हणजे महाराज माघार करवीरास जातील. करवीरकरांकडील ठराव होत आहे तो जाहल्यास सेवेशीं लिहून पाठवितों. करवीरकरांची मसलत समेटून थोरली मसलत

१ चक्रदेव यास रहिमतपुराविषयी नानाची आज्ञा.

करावयाची, त्याचा विचार होत आहे. परंतु चारी संधानें राखून सरकारचा दाब सर्वांवर राहून घाट चांगला उतरला पाहिजे. कैलासवासी हरिपंततात्यांनीं चारीं संधानें राखून सर्वांवर आपला दाब ठेऊन मसलत शेवटास नेली त्या अन्वयें जाहली पाहिजे; तेव्हां स्वामींस स्वारीस जावें लागेल. चारी संधानें राखून मसलत भाऊसाहेबांच्यानें शेवटास जाईल असें भासत नाहीं. कारण ते सरदार. स्वामी समागमें असले म्हणजे एक सिद्ध एक साधक, होऊन मसलतीचा घाट चांगला उतरेल. हा विचार वाडिलांस सुचवून तर्थील उत्तंं काय येतात व स्वामींचे विचारास कसें येतें हें लिहून पाठवावयाची आज्ञा होत असावी. स्वामींकडील व श्रीमंत दादाकडील फौज भाऊसाहेबांस समीप आणवून सत्वर सत्वर रवाना करावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४५५८ श्री. ( पौष शु॥ १–७ जाने. )

पै॥ छ० ५ साबान. सन तिस्सा तिसेन. पौष मास.

चिरंजीव राजश्री जनार्दनपंत पेठ्ये यांसीं प्रती गणेशराम पेठ्ये आशीर्वाद उपरी येथील वर्तमान ता. छ० २९ रजबपावेतों मौज येलबर्गे येथें सुखरूप असों. विशेष. अलीकडे तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी वरचेवर पत्र पाठवीत असावें. यानंतर इकडील मजकूर छ० २५ रजबी बदवटी येथून कूच करून येलबर्गे येथें दोनप्रहरां आलों. नंतर तोफा लावणेंविशीं आज्ञा जाहली. तोफा सुरू केल्या. दोन तीन बार जाहले. तिसरा बार होतांच बंद केल्या. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तोफा सुरू करणेंविशीं आज्ञा जाहली. तेव्हां सुरू करून दोन दोन बार जाहले. तिसरा बार तयार करून ठेविला. इतकेंत राजश्री रामचंद्रपंत आपा याणीं आपलेकडील गोलंदाज यास तोफेकडे लावून देऊन आज्ञा केली कीं, गोळा लावणें. तेव्हां त्यानें आपली डावी अंगठी सुरीनें चिरून रक्त तीन बोटें विजय तोफेच्या तोंडास लाविलीं. नंतर जय तोफेचा बार तिसरा भरून ठेविला होता त्यास वली महंमद दर्यावर्दी याणें बत्ती दिल्याबरोबर तोफ फुटोन सात तुकडे जाहले. डावे बाजूस उजवे बाजूस दोहींकडे दोन तुकडे दोन अडीचशें हातावर पडले. पुढे दोन. मागें एक. जाग्यावर दोन. याप्रों वर्तमान जाहलें. जखमी लोक शिलेमान नाईक जमादार यास डावे पायाचे नळ्यास तुकडा लागोन तीन बोटें लांबीस चिरलें. खोली थोडकी आहे. शेख वली यास बिराणे लागोन फार जखमी आहे. हुशार आहे. शिलेमान नाईक हुशार आहे. मोरच्यांत तोफेजवळ आहे. शेख मराद बाणदार यास बाण लावितां हातांत बाण फुटोन धक्का लागला

आहे. मग शिवाय कोणास जखम नाहीं. इमामखान गोलंदाज यास चार पांच बिराणे लागले आहेत. हलके आहेत. तोफेजवळ मोर्चीत असतो. अहंमदखान गोलंदाज खुशाल आहे. श्री॥ रा॥ रामचंद्रपंत आपाकडील गोलंदाज आला होता त्याणें विजय तोफेचे दोन गोळे लाविले. परंतु गांवावरून पार जाहले. मग त्याकरवीं पुरे केलें. आम्हांबरोबरचे गोलंदाज गोळे चांगले लावितात. फौज रामचंद्रपंत आपा, दाजीसाहेब, विठलराव बाबा, हरबा आपा वगैरे झाडून चोहों बाजूस उतरले आहेत. गांवावर हलऱ्याचा रोख आहे. शिडया करावयास सुतार गांवगन्नाचे आणविले आहेत. गजेंद्रगडाहून तोफा चार आणावयास गेले आहेत. आम्हांकडील गाडा एक बैल गाडीवानसुद्धां गेले आहेत. आम्ही मोरच्यांत उभयतां सांज सकाळ रात्रौ जात असतों. वरकड मजकूर मागाहून लिहितों. हीं पत्रें ती॥ राजश्री वासुदेवपंत मामांसें तुमच्या विचारास आलीयास दाखवावीं. विचारास आल्यास दाखवावीं म्हणोन लिहिलें तीं हस्तदोषानें चुकोन अक्षरें पडली आहेत. पत्रें पावतांच दाखवावीं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

चि॥ रा॥ त्रिंबक भट आले की नाहींत तें ल्याहावें हे आशीर्वाद.

नं. ४५९९ ( पौष शु० १–७ जाने. )

श्री. नक्कल.

राजश्री बालकृष्णपंत भाऊ स्वामीचे सेवेशीं

साष्टांग नमस्कार विनंती उपरी. "टिपूची मसलत करावयाची ती श्री॥ राजश्री भाऊसाहेबांचे हस्तें व्हावी या विचारांत श्री॥ रा॥ नाना आहेत. सर्व कारस्थानें राखून मसलत तर जाहली पाहिजे. करवीरवासी महाराजांकडील समेट करावा असा ठराव जाहला" म्हणोन लिहिलें, ऐसीयासीं करवीरवासी महाराज यांची चाल कोणे रीतीची हें राजश्री नाना यांसीं अविदित असा प्रकार नाहीं. ( त्यानीं ) आमचा सर्वस्वी नाश केला, तासगांवचें घर जाळलें, व मुलुख मारला, ऐवज घेतला, हुबळीची पेठ बहुता दिवसांची ( तेथें ) साडेतीन लक्ष रुपये घेतले ! परंतु सोनें हातानें अजमासें पांच तोळे सोनेस दोन तोळे असेल असें म्हणून ऐवज घेतला. दहा लक्ष रुपयेस पेठ बुडविली. ( हुबळी ) प्रांत जाळून लुटून वैराण केला. कौल दिलेविना लावणी होणार नाहीं; इत्यादि महालांची खराबी केली, ऐवज दोन दोन वेळ घेतला, शहापूर प्रांतीं घरें जाळलीं. बायकामुलें गाईसहवर्तमान कित्येक गांव याप्रमाणें जाळून नाश केला. विस्तारें कोठवर लिहावें ? ही सरंजामाची गत

झाली. यंदां राजश्री धोंडोपंत गोखले याणी घांसदाणे घेतले. शिबंदी दंग्यामुळें ठेवणें लागली. महालचा पैसा प्राप्त नाही. करवीरचा शेजार म्हणोन फौज नेहमी कर्ज घेऊन तीन वर्षे ठेविली. सरकारांत एकसालीस ऐवज म्हैसकर याचे विद्यमानें दिला तो उगवला नाहीं असें असतां शिराळेकर यांची वरात गैर-आदा होत नाहीं ! आम्हीं शिलेदार. आमचे पदरी पैसा नाहीं. फौजेचे पेंच, हें सर्व ( नानानीं ) ध्यानीं आणावें. आब रहावा तरच परिणाम. आम्हांस राजश्री नानाविना अवलंब कोणाचा आहे ? त्यांनीं रक्षावें. करवीरकर यांणीं सरकार तालुके, गोकाक आदीकरून वल्लभगड आदीकरून प्रांत घेतला. लोकांचा नाश वल्लभगडांत बहुत जाहला. सर्व विदित असेलच. राजश्री नानांवर गुदस्तां (कैद होण्याचा) समय गुदरला ते समयीं महाराज हुपरीचे मुक्कामीं होते. वर्तमान ऐकलें ते समयीं दोन प्रहरीं खुशाली करून चौघडा वाजविला. साखरा वांटल्या. यंदां राजश्री नाना ( कैदेंतुन सुटून ) आलेवरही पेढे वांटले !!! या प्रकारची रीत महाराजांची असतां समेट करावयाचा ठराव हुजूर ठरला, तेव्हां महाराजांचे ताले शिकंदर दिसतात ! टिपूची मसलत वडिलांस सांगणार ( तेव्हां ) करवीरवासी उगेच राहतील ही खातरजमा कशी होते ? आणि वडिलांस सरकारांतून घर बांधोन दिलेलें जाळलें, आणि त्यांची खबर घेतलेविना दुसरेकडे पाठविलेंतरी निष्काळजी होऊन सरदार कसे जातील, आणि आब कसा चढेल, हे अर्थ सर्व चित्तांत आणून गेलेले आब चढल्यास सरकारकामें होतील. सर्व प्रकारें श्रीमंतांची कृपा राजश्री नानानीं करवून. वडिलांस वस्त्रें देवविलीं, ( तीं ) अद्याप पुण्याहून चालतीं जाहलीं नाहींत ! पूर्वी सावनूर तालुका कर्जांत होता तसा असावा. हें करणें राजश्री नानानीं विनंती करून करावें. कालदेशवर्तमान, श्रीमंतांचे पदरीं मातबर किती आहेत, कोण प्रसंग कसा पडतो याची पैरवी राजश्री नाना याणीं केलीच असेल. राजश्री नानांचे व तीं॥ राजश्री भाऊसाहेबांचे विचारें जें ठरणें तें ठरावें. तसेंच घडेल. पूर्व सूचना तुम्ही केली तींच पत्रें वडिलांकडे पाठविलीं आहेत. छ० ३० रेजब[1]. इंदुवार. बहुत काय लिहिणें. लोभ करावा हे विनंती.

नं. ४६०० श्रीगणराज. ( पौष शु० २–८ जाने. )

पै॥ छ० १२ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

अपत्यें श्रीपतीनें[2] साष्टांग नमस्कार तागायत छ० १ साबानपावेतों

१ जंत्रीत रज्जबच्या तारखा २९ आहेत. २९ तारखेस सोमवार दिला आहे.
२ श्रीपतराव मोरेश्वर पटवर्धन.

मुक्काम जालेहाळ येथें सुखरूप असो. विशेष. वडिलांकडे जमखंडीहून पत्र पुढें चालते झालेवर पाठविलें व कोल्हारचे मुक्कामाहून पाठविलें तें सेवेशीं पावलेंच असेल. त्याअलीकडे वडिलांचे आशीर्वादेंकरून मुक्काममजकूरपर्यंत वाटेचे सुखरूप पावलों. वडिलांचा मुक्काम येलबुर्गे भागानगरकर यांजकडील गांव गजेंद्रगडापलीकडे चार कोसांवर आहे तेथें आहे. त्या गांवकरीयांनीं लष्करास जाणारास मार्गी बहुत उपद्रव केला, बहुत नाश झाला, यास्तव वडिलांची स्वारी माघारी येऊन कसबेमजकुरास वेढा दिला. ठाणें मोठें आहे. चाळीस पन्नास बुरूज आहेत आंत काटक ही सात आठशें आहेत. चारशेंपर्यंत घोडीं ही आहेत. यवनाकडील असदल्लीखान याचा भाचा आंत आहे. ठाणें आजपर्यंत नेटें दमानें लढत आहे. मिरजेहून तोफा गेल्या त्या लागू वडिलानी केल्या आहेत. ठाणें क्षेप निक्षेप घेणार दोन तोफांपैकी एक तोफ जायां झाली यास्तव किल्ले गजेंद्रगड येथील दोन तीन तोफा नेऊन ठाणें घेणार. याजप्रमाणें वडिलांकडून राजश्री दिनकरराम गोखले मला न्यावयास आले आहेत ते आज याच मुक्कामीं आले त्यानीं सांगितलें, व रास्ते यांजकडील कमावीसदार राजश्री बाळाजीपंत आहेत ते आले होते, त्यानीही सांगितलें. पुण्याहून राजश्री बाबा फडणीस आले ते वडिलापाशीच आहेत. व राजश्री बाबा फडणीस काल करवीरकर महाराजाकडे जाऊन बोलून आले ते येऊन वडिलांपाशी पोहचले. ठाणें ही हस्तगत सत्वरच होईल. जालेहाळ येथून इकडील कोस यलबरगें दहा कोस आहे. आज श्रवण नक्षत्र आहे यास्तव आज वडिलांचे सेवेशी जावें असा बेत आहे. काय घडतें पहावें. वडिलांपाशीं गेल्यावर सविस्तर समजेल तें सेवेशी लिहून पाठवितों. वडिलांकडे पत्रें पेशजी पाठविली तीं पावलींच असतील. थोरातांविशीं वडिलांनीं लिहून बंदोबस्त केला पाहिजे विशेष काय लिहूं ! सर्व आधार व भरंवसा वडिलांचा आहे. मर्जीस येईल त्याप्रमाणें आज्ञा केली पाहिजे. परंतु वडिलीं उपेक्षा केली तर आम्हीं बुडतों. मला कांहींच सुचत नाहीं. विदित होय. राजश्री गोपाळपंत सानी यांचे पायास गुडघेजवळ गोळी लागून चाटून गेली. मोर्चे समीप गेले. खंदक नाहीं. भिंताड मात्र मजबूद आहे. तोफा गेलेवर घेतात. सेवेशीं पुण्याकडील व सातारयाकडील वगैरे वर्तमान आलें असेल तें लिहावया आज्ञा दिली पाहिजे. राजश्री धोंडोपंत सडे होऊन धारवाडासमीप आहेत म्हणून वर्तमान आहे. करवीरकर महाराज यांस त्यांस दहा कोसांचें अंतर आहे. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

## श. १७२० परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ४६०१ श्री. ( पौष शु० २–८ जाने. )

पे॥ छ० ५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौषमास.

सेवेशी विनंती सेवक गोविंद शामराव. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे, येथील कुशल तागायत छ० १ माहे साबान मुक्काम येलबर्गे नजीक गजेंद्रगड येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्र छ० १६ रज्जबचें पाठविलें तें छ० २२ मिनहू पावलें. पत्रीं आज्ञा इकडील सविस्तर वर्तमान लिहीत जावें. त्याजवरून इकडील वर्तमान–श्रीमंत छ० २५ रज्जबी मार्गश्वर वद्य द्वादशीस बंदेवटीहून माघारे कूच करून मुक्काम मजकूरास आले येलबर्गे यास मोर्चे दिले आहेत. आंत जमाव एक हजार माणसपर्यंत आहे. शिवाय आसद अल्लीखान याची पागा घोडी सुमार दोन अडीचशेंपर्यंत आहे व सारवान सवदागर यांजकडील घोडी शंभर पावेतों आहेत. गांवचें बोलणें दहा हजार पावेतों बोलतात. श्रीमंताचें म्हणणें पाऊण लक्ष रुपये द्यावे असें म्हणणें आहे. ठरेल तें मागाहून सेवेशीं लिहितो. गावास मोर्चे वर्जीपावेतों गेले आहेत. हल्लेचें सामान शिड्या वगैरे तयारी होत आहे. मोर्च्यांत श्रीमंत राजश्री आपासाहेब व राजश्री हरिपंत धायगुडे आहेत. छबिन्यास श्रीमंत राजश्री दाजीसाहेब व राजश्री गणपतरावकाका व राजश्री विठलरावबाबा यादवाडकर हे रात्रीस पाळीप्रमाणें असतात. श्रीमंत संध्याकाळचे सहा घटका दिवसास मोर्चात निशाणाजवळ जाऊन येथील समाचार घेऊन अस्तमानीं स्वारी माघारी येती. बरोबर श्रीमंत राजश्री चिंतामणरावआपाही जात असतात. स्वामीकडील तोफा दोन बरोबर होत्या त्याजपैकीं एक तोफ पहिले दिवशींच चार बार होऊन पांचवे बाराम फुटली. एक तोफेनें मारागिरी होत आहे. गजेंद्रगडाहून तोफा तीन राजश्री बहिरजी घोरपडे यांजकडील आणविल्या आहेत. एकदोन दिवसानीं येऊन पावतील. कळावें. राजश्री नारायणराव पांढरे व यशवंतराव पांढरे शिरपरकर तीनशें लोकांनिशी आले. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४६०२ श्रीगणपतिर्जयति. ( पौष शु० २–८ जानेवारी. )

पे॥ छ० ५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशी.

---

१ पत्र इतकेंच अपुरें सांपडलें. हें चिंतामणराव पांडुरंग यांनी गंगाधरराव

## श. १७२० चतुरसिंगाचा रास्त्यावर छापा. इ. स. १७९९

अपत्यें चिंतामणीनें दोनीकर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० १ साबान भोमवार पर्यंत मुक्काम येलबर्गे-नजीक गजेंद्रगड येथें वडिलाचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. सदोबा भाऊ निवर्तल्याचें व छ० २० रज्जबचें अशी दान पत्रें पाठविली तीं पावली. मातोश्री सावित्री आजीबाईस वृद्धापकाळीं पुत्रशोक प्राप्त जाहला. ईश्वर इच्छेस उपाय नाहीं. इकडील मजकूर तर येलबर्ग्यास मोर्चे छ० २५ रज्जबी बसले आहेत. तोफा लाविल्या आहेत. जय तोफ छ० २६ रोजी प्रातःकाळी दोन बार काढिल्यावर तिसरे बागास फुटली. चार तुकडे जाहले. माणसें जायां जाहली नाहीत. एका आरबास व शिलेमान नाईक दर्यावर्दी यांस असे दोघांस—

नं. ४६०३ श्री. ( पौष शु० ३—९ जाने. )

छ० २ साबान सन तिस्सा तिसेन. पौष.

सेवेशी विनंती सेवक श्रीधर गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २ माबान पावतों यथास्थित असे विशेष. करवीर-करांकडील जमाव शिराळ्यास आहे त्यांत चतुरसिंग सातारेहून पळोन आलेला होता त्यानें हल्ली शिराळेहून हजार दोन हजार स्वार सडे घेऊन सातारेस जाऊन रास्ते यांजकडील फौजेवर छापा रविवारी घातला. बुनगे वगैरे लुटलें. दोन अडीचशें घोडे व पंचवीस उंट नेले. नाश बहुत झाला. रास्ते वाईस गेले होते त्यांस बातमी समजल्यावर आले. ते येतांच चतुरसिंग निघोन शिराळेस आला. गांठ पडली नाही. जाता येतां पलगांवावरून गेला आला. कराडकरांची ही गांठ पडली नाहीं. असें वर्तमान आहे. जोती घोरपडा कुंडलेवर उतरला आहे त्याजकडील कांही रोज रानात येते. पिकास उपद्रव लागतो. येथून सातारेस बातमीस ( जासूद ) पाठविला आहे. आल्यावर सविस्तर सेवेशीं लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६०४ श्रीगणराज. ( पौष शु० ३—९ जाने. )

पै॥ छ० २ साबान. सन तिस्सा तिसैन.

विज्ञापना. चतुरसिंग यानीं रास्त्यांचे फौजेवर दगाबाजी केली. मोठी

---

१ हे भास्कर हरी यांचे पुत्र परशुरामभाऊ व मिरजकर यांचे चुलत भाऊ. २ भास्कर हरी यांची स्त्री. ३ देवर असे येथील कानाविसदार यांचे हें पत्र मिरजेस बाळासाहेबास. ४ पत्र रघुनाथराव कुरुंदवाडकर यांचे मिरजेस बाळासाहेबास.

गोष्ट वाईट जाहली. वर्तमान तपशील आल्यावर त्याहावया आज्ञा करावी. हल्लीं सरकारांत धूम जशी करवीरकरानीं केली आहे अशी गोष्ट कोणीही केली नसेल. त्यांच्या आसऱ्यास राहोन ( चतुरसिंगानें ) ही गोष्ट दगाबाजीची केली. ते पक्षीं याच्या बंदोबस्ताची योजना जाहल्यावांचून राज्यस्थिति काही बाकी राहतां दिसत नाही. रवाना छ० २ साबान. मुलूख वगैरे त्यांनी पोहणारे राऊत येऊन परोट वगैरेकरून नागविले. असा राजमंडळकरांनी उपद्रव आरंभिला आहे. हे विज्ञापना.

नं. ४६०५ श्रीगणपति. ( पौष शु० ४-१० जान. )

नक्कल.

राजश्री सीताराम गोविंद स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. मजकूर बीतपशील—

"फौजेचा वगैरे बंदोबस्त कसकसा करून घ्यावयाचा व खासा कोण येणार त्यांची याद आणवावी," असें राजश्री रघोत्तमराव यांचें म्हणणें आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास याद नवी काय पाठवण्याची आहे ? तीर्थस्वरूप कैलासवासी गोपाळरावदादा पेशजी तेथें होते तेव्हां सारे बोलण्याचे दार मदार ठरलेच आहेत. आतां तसेंच ठरावांत आणावयाचें. दाखले काढून निश्चयांत आणोन उत्तर खातर दिवाणजींची भेट रघोत्तमराव यांच्या विचारें घेतली, खुलाशाची बोलणी झाली, म्हणोन लिहिलें तें कळलें. दिवाणजींची भेट घेतली, चांगलें केलें. कोणतें करणें तें रघोत्तमराव यांच्या इतल्ल्यानें करीत जाणें. कलम.

रघोत्तमराव यांचें पत्र पाठविलें तें पावलें. त्याचा जाब पाठविला आहे. पावता करणें. कलम.

इंग्रजांच्या मदतीस नबाबांनीं जमियेत सरंजाम रवाना केल्याचा

---

१ निजामअल्ली व इंग्रज टिपूवर मोहीम सुरू करणार होते त्यात पेशवे सामील होण्याचा संभव दिसत नसल्यामुळें मोहिमेंत मराठी फौजेची उणीव जागोजाग पडेल असें मशीर उलमुल्क यास वाटलें व परशुरामभाऊकडून काही फौज या मोहिमेपुरती हंगामी चाकरीस मिळण्याजोगी आहे की नाही याचा त्यानें आपला दिवाण रघूत्तमराव याच्या मार्फतीने शोध घेतला. त्या गोष्टीस मान्य होऊन भाऊनीं मोगलाच्या लष्करात कारकून पाठविला व पैका देण्याघेण्याच्या बाबतीत चर्चा करविली, त्या संबंधें हे भाऊचे पत्र.

जमेचें आलें म्हणजे त्यासारखें येथून ही खचीत लिहिलें जाईल. रघोत्तमराव पुरे माहीत व इकडील ममतेचे, त्या अर्थी येथून लिहिणें तें काय ? कैलासवासी दादा यांच्या कारकीर्दीपेक्षां कांहीं अधिकोत्तर असावें. कलम.

मजकूर लिहिला तो कळला. वरचेवर वर्तमान बारीक मोठें रघोत्तमराव यांस विचारून लिहित जाणें. नबाबाची व श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांची दोस्ती व घरोबा. नबाबाचा दरबार परकी वाटत नाहीं. कलम.

एकूण चार कलमें लिहिलीं आहेत त्यावरून कळेल रवाना छ० ३ साबान. सुरूसन तिस्सा तिसेन. मय्या व अलफ. याचीं उत्तरें सत्वर समर्पक पाठवावीं. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ४६०६ श्री ( पौष शु० ४-१० जाने. )

छ० ३ साबान. सन तिस्सा तिसेन. पौष.

सेवेशीं बाळाजी बाजी. साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ३ साबान वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री बाबासाहेबांकडून लखोटे ४ लष्करास जावयाचे व आपला मोकळा कागद १ येणेंप्रमाणें पाठविले आहेत. पावलियाचें उत्तर पाठवावयास आज्ञा व्हावी. श्रीमंत राजश्री बाबासाहेब माघारे निंबास गेले व चतरसिंग माघारा शिराळ्यास गेला. स्वामीस कळावें. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचे स्वारीचा मुक्काम कोणते ठिकाणीं आहे, करवीरकर महाराजांचा मुक्काम कोठें आहे तो लिहावयासीं आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६०७ श्री. ( पौष शु० ४-१० जाने. )

छ० ३ साबान. सन तिस्सा तिसेन. पौष.

सेवेशीं विज्ञापना. काल मंदवारीं योजना झाली "बंकापुराचा किल्ला बांधावा. जागा चांगली. एकसाला तिकडील प्रांताचा[1] वसूल तेथेंच खर्च करावा म्हणजे तो किल्ला झालेवर त्या प्रांताचा बंदोबस्त राहून फौजेस आसराही रहावयासी होईल." याप्रमाणें मसलत झाली. परंतु स्वारी हुजूरची जावी तेव्हां बंदोबस्त व्हावा ! याप्रमाणें मसलती करितात. कित्तूरप्रांतांत जावयाचा अभाव जाला असतां बंकापूरचा किल्ला बांधणार ! ! ! विलास-

---

१ पत्र तासगावाहून मिरजेस. २ नागो हरि करंदीकर याचें पत्र करवीरकराचे लष्करांतून मिरजेस तसेच पुढच्या नबरचे.

गड गोटखंडीजवळ स्वाधीन होणे तो किल्ला सिद्ध झाला, आता बंकापुरचा ! शब्देंकरून मन समाधान करून घेतात. बाळवंन्या जमीस फौज व तोफा पुण्याहून आल्या याचा तर्क येथे घेतात कीं, " बाळवंन्या जमीस इतके सामानाचें कारण नाहीं. बाळवेंनें नांव करून जथ पाडून मिरजेस जाणार ! कारण श्रीमंत राजश्री अमृतरावसाहेब यांजकडे (पेशव्यानी) मिरज दिली. असे नानाप्रकारचे तर्क निघोन बोलतात. कळावें हे विज्ञापना.

नं. ४६०८ श्री. ( पौष शु० ४–१० जाने. )

छ० ३ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष

सेवेशीं विज्ञापना. राजश्री धोंडोपंत गोखले यांच्या लष्करांतून दोन स्वार काल मंदवारी तिसरे प्रहरीं आले ते चार सहा घटका लष्करांत होते. सारे लष्करांत फिरोन लष्करचा भाव समजोन गेले. जातेसमयीं आणखी राऊत शेंपन्नास मार्गी होते ते व हे मिळोन कहींची नहें वीस पंचवीसपर्यंत व दोन उंटें घेऊन गेले याप्रमाणें जालें. गोखले यांचा दम एकदां या लष्करावर हुल्लड करावी असा बेत आहे काय घडतें पहावें. गोखले या बेतास चुकणार नाहीं असें वाटतें. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६०९ श्री. ( पौष शु० ४–१० जाने. )

पै॥ छ० ८ साबान. सन तिस्सा तिसैन.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं. विनंती सेवक मोरो अपाजी परांजपे साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ० ३ साबान सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर अलाहिदा पत्रीं सविस्तर विनंती लिहिली आहे त्यावरून श्रुत होईल. आपणाकडील व श्री॥ रा॥ दादांची फौज लौकर यावी हें वारंवार नानांची गांठ पडली असतां बोलणें होतें. आपले फौजेचा भरंवसा बलकट्टीस, हा भाव चित्तांतील आहे परंतु तिकडे गडबड करवीरस्वामी यांची. तशांतही दोन हजार फौज आली असतां इतक्या सामानानें काय व्हावयाचें, हें पाहा ध्यानात येत नाहीं ! आपलीं पत्रें इकडे येतील त्या पत्रीं फौजेचा मजकूर तूर्त काहीं एक लिहूं नये. मला पुसिलें असतां "आज्ञेप्रमाणें विनंती लिहिली आहे. मिरजेहून उत्तर येईल त्याप्रमाणें विनंती करीन म्हणोन बोलतों. असेंही असोन जर करितां एखादें कारण गुप्तरूपें सांगितलें असें जाल्यास तशी व विनंती लिहून पाठवितों ऐवजाविशीं पेशजी लिहिलें आहे त्याप्रों ऐवज रवाना जाहला पाहिजे. रा॥ केसोपंत दादांपाशीं बोलोन आलों होतों की, इकडून चिठ्या

करून ऐवज उजराबयाची सोय जाहल्यास करितों. परंतु इकडून कोणी चिठी घेत नाही. पशाजीही सूचना लिहिली आहे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६१०   श्री.   ( पौष शु० ४—१० जानेवारी )

पै॥ छ० ८ साबान. सन तिस्सा तिसैन. पौषमास.

विज्ञापना तागायत छ० ३ साबान गुरुवासर. सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस वस्त्रें सरकारांतून जाहलीं. एक मास जाहला राजश्री कृष्णाजीपंत ढेंकणे पांच सहा दिवसी वडिलांकडे निघोन जाणार म्हणोन मजपाशी बोलले आहेत. त्यास मशारनिल्हे वडिलांकडे जातील. वस्त्रें श्रीमंतांनी वडिलानी घेऊन मशारनिल्हे याजपाशी बोलावयाचें, त्यास मशारनिल्हे यांणी बंदोबस्त करून काय घेतले आहेत, बाकी राहिले लढते कोणते, ते कसे उलगड्यांत यावे, हा विचार मशारनिल्हेस पुसावा. वस्त्रें मात्र आली, सरंजाम मात्र मोकळा जाहला, इतकी गोष्ट जाहली आहे. बरकड कांही एक लढे बोलण्यांत आले नाहीं ऐसें असल्यास बंदोबस्त कांही झाला नाहीं. सावनूर तालुका रदकर्जास पेशजी लावून दिलाच आहे; व जागीचे तनातेस महाल नेमणूक करून दिली आहे; तो जाबसाल व पुण्यात जप्ती जाहली ते समयी वाड्यातील चीजवस्त नक्त वगैरे सरकारांत जमेस आलें आहे ते व वाडा मोकळा व्हावा. राजश्री बापूजीपंत बापट याजकडे कागद पत्र वगैरे जप्तीस काय आहे ते माघारे यावे. पैका बापट याणी कांहीं वसूल केला असेल तो हलीचे करारांत मजुरा पडोन कागद पत्र माघारे यावे. कर्गचे पुणतांबें व मोसी सरंजामांतील बेरजंत आहेत तेंही हवाली व्हावें ते समयी हल्लीं सरकारात करारमदार केला असेल तो सोईयुक्तीनें यावा. ढेंकण्याचे बोलण्यांतील भाव 'हे लढे कांहीं एक बोलण्यांत आणिले नाही. तूर्त मर्जी रक्षून वस्त्रें मात्र घेतलीं' असें आहे. परंतु कसें केलें आहे तें यथास्थित समजों देत नाहीं. याद येथें असल्यास पहावयास मागत होतो. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडे याद राजश्री लक्ष्मणपंत बाबा फडणीस यांजसमागमें पाठविली आहे असें ( ढेंकणे यानी ) सांगितलें. त्यास ढेंकणे सत्वरच वडिलांकडे जाणार. त्यास मशारनिल्हेजवळ वडिलानी सर्व मजकूर बोलावा. पूर्ववतप्रमाणें बंदोबस्त जाहल्याखेरीज पैकयाचा निर्णय होणार नाहीं. [१]कर्वीरवासी महाराज यांचा

१ पत्र मोरो आपाजी परांजपे याचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेबास.

तह हरकसें करून तूर्त प्रसंगी करून घ्यावा; लहान मसलतीस वडिलांस गुंतवावयाचें नाहीं,' असें श्री॥ राजश्री नानांचें बोलणें आहे. मसलत मातबर सांगणार. श्रीमंतांजवळ बोलोन तुम्हांस कळवितों. त्याप्रमाणें तुम्ही मिरजेस लिहिणें म्हणोन सांगितलें. तूर्त प्रसंगीं शिंदे यांचा पेच सर्वांस आहे. राजश्री आबा चिटणीस शिंदे याणीं आणिले. आठ दिवस होत आले. प्रथम दिवस! बायांचें परिछिन्न मिटत नाहीं. रायाजी पाटील बोलोन आले. बाया कूच करून श्रीगोंद्याचे सुमारें गेल्या. पुढें कोणी कडे जातात कळत नाहीं. शिंदे याणीं जावें हा विचार श्री॥ राजश्री नाना करितात. त्यास श्री॥ राजश्री पंत प्रधानही लौकर निघावें असें चक्रदेव यांस सांगतात. परंतु लौकिकांत शिंदे याणीं जावें असें चित्तांतून श्रीमंतांचे नाहीं. लोक बोलतात. प्रमाण कशावरून! श्रीमंतांजवळ मुखत्यार राजश्री नारोपंत चक्रदेव आहेत. आणखी कोणाची गांठ पडत नाहीं व जाबसालही होत नाहीं. या रीतीचा विचार चालला आहे. तेवीस लक्ष रुपये शिंदे यांस रोख द्यावे, बारा लक्ष रुपयांची बरात बुंदेले व झांशीवाले यांजवर द्यावी, येणेंप्रमाणें ठरलें आहे. तेविसांपैकीं सात लक्ष पुण्यांत द्यावे म्हणजे कूच करून जांबगांवास जावें. जांबगांवास चार लक्ष रुपयांचा भरणा जाहला म्हणजे पुढें गोदातीरीं कांहीं, कांहीं बराणपुरास, मिळोन तेवीस. याप्रमाणें यादी ठरल्या आहेत. हरिभक्ति याचा भाचा दुल्लभदास व राजश्री अन्याबा अभ्यंकर या उभयतांस पैक्याचे वोलीस शिंदे यांजकडे दिले. त्याणीं शिंद्यांसमागमें तेवीस लक्ष रुपये पटत तो पावेतों असावें या प्रमाणें ठरलें आहे. पालखी दुल्लभदास यास दिली. एवजाची तरतूद अडीच लक्ष रुपयांची जाली. आणखी चार लक्ष रुपये पदरीं पडल्यावर कूच करावें याप्रमाणें (ठरलें) आहे. लौकिकांत शिंदे कूच करून जातील हें कोणी एक म्हणत नाहीं. आठ चार दिवसांत सर्व कळलेवर विनंती लिहितों. राजश्री चिंतोपंत दादा लिमये छ० १ साबानी पुण्यास आले. रास्ते यांचे वाड्यांत श्रीमंत राजश्री जनोबा सुभेदार आहेत तेथेंच राहिले. जयरामपंत ही आले. राजश्री बाळाजीपंत रत्नागिरीस आहेत. तेथें सनद सरकारची आणावयाविशीं गेली आहे. दहा बारा दिवसात येतील. एक जागां सर्व मंडळी आहे. ढेंकणे लष्करांत जाऊन वडिलांकडून येत तोंपावेतों येथेंच सर्वांनीं असावें असें ढेंकणे यांचें म्हणणें आहे. राजश्री चिंतोपंत व जयरामपंत व बाळाजीपंत यांचा करार पंधरा लक्ष (परशुरामभाऊंनी द्यावयाचे) ठरले याजखेरीज व्हावयाचा, म्हणोन

---

१ सहस्रबुद्धे.

ढेंकणे बोलले; व श्रीमंत राजश्री नानांनीं ( सांगितलें कीं ) चौदा लक्षांचा ठराव जाहला आहे. परंतु रोखच घ्यावे असें नाही. ( भाऊंस ) मसलत सांगावी. त्यांत दहा लक्ष वजा करून घ्यावे, चार लक्ष रुपये राहिले ते मसलतीमध्यें घ्यावे, मसलत सांगितली नाहीं तरी दहा तूर्त घ्यावे चार लक्ष रुपये दोन वर्षांनंतर घ्यावे, असें ठरलें आहे म्हणोन सांगितलें. हे समयीं राजश्री बाल-कृष्णपंत बाळ सन्निध होते. हल्लीं ढेंकणे तिकडे जातात ते सविस्तर सर्व विदित करितील. परंतु सर्व बंदोबस्त जाहल्याखेरीज परिणाम नाहीं. निर्वाह होणें कठिण. यांतील अर्थ—वडील सर्वज्ञ आहेत. हल्लीं पत्र लिहिलें आहे. वडिलांस ही स्वामींनीं लिहिलें पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ४६११ श्री. ( पौष शु० ४–१८ जाने. )

पै॥ छ० ८ साबान सन तिस्सा तिसैन.

[१]सेवेशीं विज्ञापना ऐसी जे, श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचीं पत्रें दोन व श्री॥ रा॥ नानांचीं पत्रें दोन येणेंप्रों॥ फौज आपणाकडील व दादांकडील यावी म्हणोन गेलीं त्याचीं उत्तरें आलीं कीं, करवीरवासी महाराजांचा दंगा, प्रांतांत नित्य स्वाऱ्या शिकाऱ्या करितात, ये प्रसंगीं फौज पंचास आली असतां प्रांताची स्थिति रहाणार नाहीं, असा भाव दर्शविला आहे त्यास नानांनीं हल्लींही मला सांगितलें कीं, तुमची सरंजामाची फौज अगत्य आली पाहिजे. फौज चांगली असावी, आमचे उपयोगीं आहे, असा भाव बोलण्यांत आहे. त्यास हल्लीं ही पत्रीं फौज इकडे येण्याचा मजकूर लिहिला आहे. त्यास फौज इकडे आली असतां खर्चाचें तोंड. तिकडे राजे यांचा गडबड. दोन तीन हजार फौज आली असतां इतक्या फौजेनें येथील बंदोबस्त होते असा-ही भाव नाहीं. त्यास फौजेचा विचार वडिलांस सैन्यांत लेहून पाठविला पाहिजे. वडिलांची आज्ञा येईल त्याप्रमाणें इकडे वडिलीं मला मात्र ल्याहावें. मला लिहिलें असतां "लिहिलें आहे. आज्ञा येईल त्याप्रमाणें विदित करूं;" म्हणून बोलतों. उगाच नाद मात्र लावून ठेवावा. फौज येत नाहीं अथवा येते हें निश्चयांत आणावयाचें नाहीं. इतक्यांत इकडील डौल कसा होतो, शिंदे जातात किंवा जात नाहींत, करवीरवासी याचा तह सरकारांतून होतो तो होईल किंवा होत नाहीं, हेंही कळेल. आज्ञा येईल त्याप्रों॥ येथें बोलतों. श्रुत होय हे विज्ञापना.

१ तुम्ही परशुरामभाऊंस लिहिलें पाहिजे २ पत्र वकील मोरो आपाजी पराजपे यांचे पुण्याहून मिरजेस

## श. १७२० परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ४३१२ श्री. ( पौष शु० ५-११ जाने. )

सेवेशीं आपाजी हरी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० ४ साबानपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष मोंगलाची फौज भंडार कवठ्यावर येऊन उतरली. पांच सात हजारपर्यंत सामान आहे. हलालीचें व जिग अंकलगीचें ठाणें घेऊन आमचे तालुकियांत उपद्रव करणार असा मनसबा आहे. घडून येईल तें प्रमाण. मिरजेसही याप्रमाणें लिहून परभारें पत्रें रवाना करावीं. शिंदे व राजश्री यशवंतराव विठ्ठल उभयतां आहेत. अद्यावर्तानें तालुका खराब करतात. कांहीं गुंता नाहीं. कळावें. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती

नं. ४६१३ श्रीगणपति. ( पौष शु० ५-११ जाने. )

पै॥ छ० १० साबान. पौष मास. सन तिस्सा तिसेन.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ४ साबान पर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. इकडील वर्तमान कसबे येलबर्गेकरानीं कांहीं बदमामली करून लष्करच्या मार्गाची लुटालुट करूं लागले. याजमुळें कसबेमजकुरास आलों. तोफा लागू केल्या आहेत. बोलगेंही लागलें आहे. एक दोन दिवशी ठरेल. हल्लीं वडील येथेंच आहेत. गजेंद्रगडापासून तीन कोसांवर आहों. वडिली चार पाच पत्रें पाठविली ती पावली, परंतु मजकडून उत्तर न गेलें. त्याचें कारण वडिलांपासून पुढें कोपळाकडे गेलो. तिकडे बेवीस दिवस लागले. येथें आलों तों आज दहा दिवस मोर्चे लागले आहेत. वडिलांकडे ( येथून ) माणसें जातात तीं कळलीं नाहीं. सदोबा भाऊनीं कैलासवास केला ! लहान मुल, वृद्ध मातुश्री, त्यांजकडे ईश्वरें पाहिलें नाहीं ! पुण्याकडील वगैरे वर्तमानाचीं पत्रें आपण वडिलांस पाठविलेलीं पाहिली. वर्तमान कळलें. सदैव आशीर्वाद पत्रीं सांभाळावें. तिकडे फौजा लवकर याव्या म्हणोन मागें ( आपण ) आज्ञा केली होती, त्यास तूर्त करवीरवासीचा मुक्काम बारीचे अलीकडे आला तें पक्षीं मोकाबिल्यास हेंच जवळ; व त्याचे चित्तीं सख्य करावें हें फार, परंतु तेथील प्रामाणिकपणा विदितच आहे ! पुढें गेलेवर समजण्यांत येईल. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना.

---

१ बरडोल परगण्याचा कमावीसदार. त्यानें मगळवेढ्याचा मामलेदार यास पत्र लिहिलें त्याची ही नक्कल मंगळवेढ्याहून हुजूर मिरजेस आली. २ भाऊंच्या लष्करांतून रामचंद्र परशुराम यांचे मिरजेस बाळासाहेबास पत्र

नं. ४६१४　　　श्री.　　　( पौष शु० ६-१२ जाने. )

पौ॥ छ० ५ साबान. सन तिस्मा तिसैन पौषमास.*

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेशराम पेठे दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ० २५ रज्जबीं बेंदवटीहून कसबे एलबरगें येथें दोन प्रहरीं आलों. मुक्काम झाला. नंतर तोफा सुरू करणेंविशी आज्ञा झाली. तीन तीन बार झाले. नंतर बंद करविल्या. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सुरू करणेंविशीं आज्ञा झाली तेव्हां सुरू करून दोन दोन बार झाले. तिसरे बार भरून तयार केले. इतकेंत श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा यानीं आपलेकडील गोलंदाज लावून दिला तेव्हां त्यानें येऊन कोडें केलें. आपले डावे हाताची करंगुळी चिरून विजय तोफेच्या तोंडास तीन बोटें रक्त लाविलें. इतकेंत जय तोफेस इभ्रामखान गोलंदाज याणें बत्ती दिली. बार बरोबर तोफ फुटोन सात तुकडे झाले. उजवे बाजूस दोहींकडे दोन अडीचशें हातांवर तुकडे गेले. पुढ एक गेला. मागें एक. जाग्यावर दोन तीन. याप्रमाणें वर्तमान झालें. जखमी लोक शिलेमान नाईक दर्यावर्दी यास डावे पायेच्या नळ्यास तोफेचा तुकडा लहान लागोन पाय चिरला. जखम हलकी आहे. मोर्चांत तोफेजवळ आहे. हुशार आहे. शेख वली दर्यावर्दी तासगांवचा आला त्यास बिराणे फार लागले आहेत. गोटांत आहे. हुषार आहे. शेख मुराद बाणदार याणें बाण पहिले दिवशीं लाविले त्या समयीं बाण हातांत फुटोन भबका लागला आहे. हुशार आहे. इभ्रामखान गोलंदाज यास पांच चार बिराणे लागले आहेत. हुशार आहे. तोफेजवळच मोर्चांत आहे. गोळे लावीत असतो. शिवाय मग आणखी कोणास जखम नाही. श्रीमंत राजश्री आपाकडील गोलंदाज, त्यानें विजय तोफेचे दोन गोळे लाविले ते गांवावरून पार जाहले. आम्हांबरोबर गोलंदाज दोघेच आहेत. परंतु गोळे चांगले खाशांचे मर्जी-जोगते लावितात. जय तोफेचा गाडा धुरा तक्त मोडोन चूर झालें. ढलप्याच उडाल्या. चाकें ही थोड थोडीं जायां झालीं. व विजय तोफेचा धुरा मोडला. तोफ कोतवालगाड्यावर घातली. पहिले गाड्यास नवा धुरा घालून गजेंद्रगडास बैल गाडीवानसुद्धां रवाना केले. उद्ईक येतील. येथून तीन कोस आहे. गडाहून च्यार तोफा आणविल्या आहेत. यलबरगें गांव मातबर आहे. ऐंशी बुरूज आहेत. तीनशें घोडें गांवांत आहेत. पायचे लोक दोन हजार आहेत म्हणतात. गांवांत तोफ नाहीं. जेजाला सात आठ आहेत. गोळीचा मार बहुत

होत आहे. खासा श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा व दाजीसाहेब, विठ्ठलराव बाबा, रघुनाथ आपा वगैरे झाडून एकच झाल्या आहेत. चोहोंबाजूनें उतरल्या आहेत. रामचंद्रपंत आपा तोफेच्या मागें जवळच आहेत. राहुटी देऊन भोजन तेथे होत असते. तळ्याची तजवीज आहे. सुतार गांवगन्नाचे आणिले आहेत. शेंडाचे मांग वगैरे येऊन पडले आहेत. गाडदी लोक दहा पंधरा आज पावेतों ठार जाहले. आम्ही उभयतां तोफेजवळ मोर्चांत जात असतों. सर्व लोक सुद्धां क्षेम आहे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६१५ श्री. ( पौष. शु० ६–१२ जाने. )

छ० ५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष

सेवेसी विनंती सेवक श्रीधर गोविंद साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ५ साबानपावेतों यथास्थित असे विशेष. चतरसिंग सातारियाहून माघारा येताना श्रीमंत राजश्री बाबासाहेब पीछावर कराडपावेतों आले होते. परंतु चतरसिंग शिराळेस गेला यामुळें तेथून माघार सातारियाकडे गेले. गुरुवारीं मौजे शिरवडें येथें मुक्काम होता. रास्ते यांची फौज चतरसिंगाचे पाठलागावर दोन चार कोस आली होती. गांठ पडली नाहीं. मागती सातारेस गेली. चतरसिंगाचा ( सातारा ) शहराम व खेड्यांस वगैरे उपसर्ग लागला नाहीं. रास्ते यांचा तळ लुटून माघारा फिरला. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६१६ श्रीगणपति. ( पौष. शु० ६–१२ जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. आपण छ० २० रज्जबचीं व छ० २३ रज्जबचीं पत्रें पाठविली तीं छ० २६ मिनहूस पावलीं. "करवीरकराचा मुक्काम वणूराजवळ आहे. ठाण्यावर काट चालत नाहीं. कित्तूरकराचें संधान गोखले यांजकडे व करवीरकरांकडे आहे" म्हणोन लिहिलें ते कळलें. व राजश्री नाना हरी यांचें पत्र छ० १६ रज्जबचें पाठविलें तें पोहचलें. चिरंजीव सौभाग्यवती रमाबाई वाईस गेल्याचें कारण लिहिलें तें समजलें. रवाना छ० २८ रज्जब. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. दौलताबादी गळ्या सुमार १० दर साडेचार पांच रुपयेच्या किमतीच्या व दोन गळ्या कीर्दीच्या दर दहाबाराच्या अशा बारा गळ्या मुजरद सांडणी स्वाराबरोबर पाठवून द्याव्या. येथें कागद खर्ची व सामा मिळत नाहीं. लवकर पाठवाव्या. रवाना छ० मजकूर हे आशीर्वाद.

पौ॥ छ० ५ साबान सन तिसा तिसैन पौष.

---

१ पत्र परशुराम भाऊचें. अगदीं भिकार कागदावर लिहिलें आहे.

नं. ४६१७　　श्री　　( पौष शु ० ६–१२ जाने )

पौ॥ छ० ६ साबान. सन तिस्सा तिसैन.

सेवेशी विनायक विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ५ साबान यथास्थित असे. विशेष. स्वामींनी श्रीमंत राजश्री बाबासाहेबांचे पत्रीं नमस्कार लिहिले ते पावोन संतोष जाहला इकडील सविस्तर मजकूर श्रीमंतानी लिहिलाच आहे त्याजवरून विदित होईल आमचा मुक्काम प्रस्तुत उमरजेवर आहे व राव रास्ते मागें दोन कोसांवर आहेत. तेथे येऊन तीन दिवस झाले आज कर आहे त्यापेक्षां मुक्काम होईल. पुढे जाण्याची मसलत होत आहे जिल्हेचे गांवगन्ना वगैरे गोळा करून ऐवज व तोफेचे बैल वगैरे घेत आहेत श्रीमंत राजश्री बाबासाहेबा जवळ राजश्री अंताजी गोपाळ वगैरे दोन तीनशें स्वार येऊन पोहचले बाबासाहेब घोडीची वाट पहात आहेत. राजश्री केसोपंत दादा काळे यांणी घोडी स्वामीस दिलेली ती आमचे बेगमीची होती म्हणोन बाबासाहेब म्हणत होते. परतु ती घोडी प्रस्तुत मिरजेस नसेल. आपलेकडील लोकांस सरंजाम लवकरच रवाना होईल म्हणोन पत्री आज्ञा, त्यास लवकर पाठविले पाहिजे. पंधरा दिवस लोकांस पैका पावला नाही. या प्रसंगी जातां येत नाही म्हणोन लोक राहिले आहेत. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४६१८　　श्रीगनपति　　( पौष शु० ७–१३ जानेवारी )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. आपण छ० २६ रजबची पत्र पाठविलीं ती छ० २ साबानीं पावलीं. त्यांतील मजकुराची उत्तरें बीतपशील कलमवार

"वाळव्याचे ठाणें राजश्री गणेशराव यांणी वसावले थोरातास कैद केलें. मिरजप्रांती थोराताच्या नेमणुकेविशी रांगे करणार. चहूंकडून उपद्रव होतच आहे." म्हणोन लिहिलें ते कळलें. थोराताचा सरंजाम बहुता दिवसाचा होता. ईश्वराच्या इच्छेस आलें तें खरें!　　कलम १

"नबाबाची फौज परांड्याजवळ होती ते माघारी गेली मुशीरुन्मुल्काचा जमाव बादककल्यास आला. बरडोलाकडे जाणार अशी बातमी आहे," म्हणोन लिहिलें ते कळलें. चहूंकडे शिलशिला आहे प्रजेचा भाग्य म्हणोन!　　कलम १

चि ॥ राजश्री विठ्ठलराव बापू यांस समाधान नाही म्हणोन लिहिलें,

---

१ हरी परशुराम याच्या लष्करातून मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

त्यास त्यांचें पत्र पुण्याहून निघतों असें आलें होतें. आपणांस लिहिलेंच असेल त्यास सातआठ हजार रुपये खर्चास पाठविले पाहिजेत. येथें चि ॥ राजश्री चिंतामणराव आपाची निकड ( कीं ) त्यास आणवावें. शेवग्याच्या शेंगा व सुरण पांच शेर पाठविलें तें पावलें. कागदाच्या गड्ड्यांविषयीं पेशजी आपणास लिहिलें आहे त्याप्रमाणें गड्ड्या रवाना कराव्या कलम १

चिरंजीव राजश्री श्रीपतराव भाऊ येऊन पोंचले. त्यांजबरोबर आपण पत्रें दिलीं होतीं तीं त्याणीं पावती केलीं व वर्तमानही सांगितलें. कलम १

चि॥ राजश्री रघुनाथराव दादा मिरजेस आल्याचें व आपल्यास न भेटतां तसेंच माघारे गेल्याचें वगैरे लिहिलें तें कळलें. कलम. १

वांई प्रांतीं नक्षत्रवृष्टि पर्जन्यासारखी झाल्याचें व बैलानें भाषण केल्याचें व डुकराच्या कौतुकाचें वगैरे वर्तमान लिहिलें तें कळलें. ईश्वरी इच्छा काय आहे कळत नाहीं! कलम १

"सुरसुभ्याकडील सामान आलसंदच्या मुक्कामास आलें. अलमट्टी वगैरे ठाणीं घोरपडे यांजकडील घेतात अशी बोलवा आहे" म्हणोन लिहिलें तें कळलें कलम १.

वाळव्याच्या मजकुराविशीं सरकारचें पत्र आपल्यास आलें त्याची नक्कल व गणेशराव यांच्या पत्राची नक्कल पाठविली ती पावली. कलम १

चि॥ राजश्री हरिपंत बाबा यांजकडून लखोटे आले ते पाठविले ते पावले. कलम १

विश्वासराव रास्ते नवज्वरानें वारले म्हणोन लिहिलें तें कळलें. वाईट गोष्ट जाहली. श्रीसत्ता प्रमाण! बहुत वाईट जाहलें. क १

एकूण अकरा कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळलें. रवाना. छ०६ साबान. बहुत काय लिहिणें. आम्ही येथें टीकर च्या ( १ ) ठाण्यास उतरलों आहों. कधीं उलगडा होतो पहावें. येथील उलगडा जाला म्हणजे सावनूर प्रांतीं जाऊं म्हणतों. ईश्वराची इच्छा प्रमाण! लोभ असावा हे आशीर्वाद.

नं. ४६१९ श्रीगणपति. ( पौष शु० ७—१३ जान. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. राजश्री नाना

---

* मिरजेहून निघालेला जासूद भाऊंच्या लष्करास सहावे दिवशी पोंचला. त्याबरोबर मिरजेहून बाळासाहेबांनीं सुरण पांच शेर पाठविला तें असो पण शेवग्याच्या शेंगा पाठविल्या त्याचा ताजेपणा कितपतसा राहणार? अनेक पत्रांतील उल्लेखावरून शेवग्याच्या शेंगा हा भाऊंच्या आवडीचा पदार्थ असावा असे दिसते.

यांच्या पत्राची नक्कल व मोरो आपाजी परांजपे यांचीं अस्सल पत्रें आपणास आलीं तीं व बाळकृष्णपंत बाळ यांचें पत्र आलेलें पहावयास पाठविलें तें पाहून सारी पत्रें माघारीं पाठविली आहेत. पुण्याकडील वर्तमान व ढेंकणे यांच्या भाषणांचा चढ लिहिला तो कळला बरें! श्रीइच्छेनुरूप घडेल तें खरें! सर्व भार श्रीवर आहे. काळजी तरी कोठपर्यंत करावी? गोख्यांचा मजकूर लिहिला तो समजला. त्यांजविशीं राजश्री नानांस पेशजी पत्र पाठविलें आहे. पावलेंच असेल. छ० ६ साबान. लोभ करावा हे आशीर्वाद. चिरंजीव श्रीपतरावभाऊनीं आपले निरोप सांगितले तेणेंकरून बहुत संतोष वाटला. हे आशीर्वाद.

पै ॥ छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

नं. ४६२० श्री. ( पौष शु० ७–१३ जाने. )

पै छ० ६ साबान. सन तिस्सा तिसैन पौषमास.

[1]सेवेशीं विज्ञापना. उगरगोळच्या सुमारें खासा स्वारी राहून नवलगुंद व मोरब वगैरे आणखी ठाणीं घालावीं आणि हुबळीकडे फौज ( पाठवावी व ) कुंदगोळ वगैरे ठाण्यांचा बंदोबस्त करावा अशी ( येथील ) योजना आहे. आज बुधवारचा मुक्काम संवदत्तीवरच आहे. राजश्री धोंडोपंत गोखले यांजकडील फौज कित्तूर प्रांतांत होती ती धारवाडाकडे माघारी आली. कारण स्वारीचा रोख इकडे पडला याजमुळें कळावें. कित्तूरकर तूर्त काळीं बचत नाहीं असें सिद्ध आलें. या उपरी काय काय मसलत करितात पहावें. गोखले हल्लीं लष्कर आहे या सरदेस येणार अशी बोलवा आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६२१ श्री. ( पौष शु० ७–१३ जाने. )

पै॥ छ०६ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष मास.

सेवेशी विज्ञापना. आत्माराम भिवाजी इकडील बोलणें पुण्यांत बोलत आहेत त्याणी ठरविलें कीं, " तीन लाख रुपये सरंजाम नवा महाराजांकडे द्यावा. इकडील फौज सरंजामीदाखल चाकरीस पुण्यास असावी " हें वर्तमान राजश्री बळवंतराव खांडेकर याणीं हुजूर लिहिलें होतें. त्यास हल्लीं पुण्यांत मसलत टिपूवर जावयाची सिद्ध होत आहे. त्यास इंग्रज व मोगल व पेशवे त्रिवर्गांनीं जावें. त्यास आत्माराम भिवाजीचें बोलणें राहून इंग्रजांच्या मसलतींत टिपूवर जावयाचे त्रिवर्ग तसे हे चवथे, इकडील फौज असावी,

---

१ नारो हरी करंदीकरांचे पत्र करवीरकरांच्या लष्करांतून मिरजेस. २ नारो हरी करंदीकर यांचें पत्र करवीरकरांचे लष्करांतून मिरजेस.

हा मानस बळवंतराव खांडेकर यांचा. याजकरितां खांडेकर याणीं लिहिलें कीं, हुजूरचें आज्ञापत्र स्वदस्तुरचें आल्यास बोलून ठरावून घेतों. त्यावरून काल भागनारी स्वदस्तुरचें पत्र खांडेकर यांस गेलें त्यांतील मजकूर "खंडणी होईल ती चहू भागी यथाविभागें व्हावी, पांत सुटेल त्याची वांटणी चहूं भागी व्हावी. याप्रमाणें ठरावास आणावें, म्हणजे फौज कुमकेस देऊं याप्रमाणें लिहिलें आहे. श्रीमंत राजश्री "भाऊसाहेबांस वस्त्रें आलीं, परंतु रास्ते याणीं आपणाजवळ ठेऊन घेतलीं आहेत. एक वेळ भाऊसाहेबांनीं यावें असें रास्ते यांचें म्हणणें आहे. याजकरितां वस्त्रें ठेऊन घेतलीं आहेत." म्हणोन खांडेकर याणीं लिहिलें आहे कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४६२२ **श्रीगणपतिर्जयति.** ( पौष. शु० ८—१४ जाने )

पे॥ छ० ११ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें चिंतामणीनें दोनी कर जोडून शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० ७ माहे साबान पर्यंत मुक्काम येलबर्गे नजीक गजेंद्रगड येथें वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असे विशेष वडिली साहेब आप्पा यांजबरोबर छ० २७ रज्जबचें आशीर्वादपत्र पाठविलें तें छ० २ साबानी मुक्काम मजकुरीं पावलें "कागदाच्या गड्या शिलकेस नाहींत पुण्याहून आणविल्या आहेत, आल्यावर पाठवितों व चि॥ राजश्री आपस समाधान नाहीं याज यात. दीक्षितबाबाकडे कारकून पाठवितों म्हणून चिरंजीवानीं लिहिलें आहे," म्हणून वडिलीं लिहिलें, त्यास कारकून पाठवावयाची आज्ञा केली पाहिजे. राज्यांत दुर्भिक्ष जाहल्यामुळें श्रीमंतांनीं मुहमख शांत केली म्हणून लिहिलें तें कळलें. इकडील मजकूर तर ठाणें येलबर्गेस मोर्चे लागले आहेत बारा दिवस जाहले. तोफा मिरजेपैकीं एक व गजेंद्रगडपैकीं एक एकूण दोन तोफा सुरू आहेत मोर्चे तटानजीक गेले आहेत सुरुंगाचें काम लागलें आहे ठाण्यांतून बोलणें लागलें आहे आंत दोनशें स्वार आहेत त्यांस घोडी हत्यारसुद्धां सोडावें आणि वीस हजार रुपये व ठाणें द्यावें याप्रमाणें ते देतों असें बोलत होते. परंतु तो ठराव हजार दोन हजारांकरितां राहिला. आणखी काय असें पहावें. 'मलकापुरीची चाल सर्वत्र आहे. माणसानीं निकृत घेऊं नये' म्हणून लिहिलें, त्यास माणसाचें म्हणणें, रोजमरा घेतों. परंतु लष्करची महागाई, माप लहान, दोन रुपयानीं पोट भरत नाहीं. त्यास तैनातपैकीं दरमहा

अर्धे रुपया जाजती द्यावा याप्रमाणें म्हणतात. त्यास जाजतीची आज्ञा जाली पाहिजे. त्याखेरीज निभाव पडत नाहीं वडिलीं पौष अखेरपर्यंत खर्चाची बेगमी ( केली आहे ) म्हणून लिहिलें, त्यास लष्करांत महागाई; तेव्हां दरमाहा जाजती लागला व रोजमरेचा ऐवज पटाप्रमाणें येतो. त्यास मोतद्दार पाचसहा घोड्यांस अगदीं नव्हते ते नवे ठेविले व हत्तीकडे वैरणीस चार बैल भाड्याचे करणें म्हणून आज्ञा होती ते ठेविले आहेत. व आणखी किरकोळ परीट व भिड्यांकडील माणसें यांचा रोजमरा लिहून आला नाही. व सारवान वगैरे पांचचार माणसं नवी कार्याकारण ठेविलीं आहेत. यास्तव पौष अखेरपर्यंत ऐवज पुरणार नाही. ऐवज आला हा लोकांच मागील देण्यास व रोजमरेस होईल यास्तव आणखी या महिन्यास खर्चास पाठविलें पाहिजे. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४६२३ श्री. ( पौष शु० ८–१४ जाने )

पै॥ छ० ११ साबान. तिस्सा तिसैन, पौष.

विज्ञापना ऐसी जे. तागायत छ० ७ साबान सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींची पत्रें छ० ३० रजबची पाठविलीं तीं पावलीं. बाळकृष्णपंत भाऊंचें पत्र व पुरवण्या होत्या त्या प्रविष्ट केल्या. श्री॥ राजश्री नानांस पत्र नव्हतें. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचें पत्र छ० २२ रजबचें स्वामींस आलें, गेलबर्गे यास मुक्काम आला, म्हणोन लिहिलें, त्यास आज्ञेप्रमाणें श्री॥ राजश्री नानांस श्रुत केलें. मुसा प्र याणें अंजनीचे मुक्कामाहून रोरा जारसापुरास केला होता त्याची नक्कल पाठविली ती पावली श्री॥ राजश्री नानांस मजकूर विदित केला. त्याणीं आज्ञा केली की, कोण असेल त्याचे तोडांत देणें[1] सरकारतालुका खराब करणें हे गोष्ट काय ? इकडे बोभाट आला तरी पाहोन घेऊं. याप्रमाणें उत्तर केलें आहे. त्याजपाशीं सामान काय आहे हा सुमार पाहून पारिपत्य जाहल्यास फार उत्तम आहे. अगोदर एक वेळ सांगोन पहावें. न च ऐकिल्यास तोही विचार मर्जीस आल्यास व्हावा. तर्त प्रसंगीं कजिया बोभाट आला असतां येथें कोणी मनास आणीत नाही. शिंदे यांचे जाण्याचे गवगव्यामध्यें चूर आहेत. तिकडील तिकडे सुमार पाहून बंदोबस्त व्हावा. मंगळवेढें याजकडील बातमी असावी. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दिल्हा पाहिजे. हे विनंती.

---

१ मोरो आपाजी परांजपे यांचे पत्र पुण्याहून बाळासाहेबांस.

नं. ४६२४ श्रीगणपति. ( पौष शु० ८–१४ जाने )

पै॥ छ० ९ साबान. तिस्सा तिसैन. पौष.

अपत्यें हरीनें शिरसाष्टांग विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० ७ साबानपर्यंत मुक्काम कंबरज यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें पाठविली तीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. लष्करची पत्रें पावलीं. सातारेप्रकरणीं वर्तमान परवां सांडणीस्वार याजबरोबर लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. हल्लीं वडिलांकडे लष्करास पत्रें लिहोन लखोटे करून मुद्दाम जासूद जोडी पाठविली आहे. परंतु वडिलीं माहीतगार जासूद देऊन रवाना करावी. कागद निकडीनें पोचले पाहिजेत. मार्गानें कागद निभावून जातसें जाहलें पाहिजे. पुणेंकडील सर्व वर्तमान परांजपे लिहीतच आहेत. नानांस ज्वर येत असतो. राजश्री माधवरावजी या मुक्कामास आले आहेत. पुणेयास सातारेप्रकरणीं लिहिलें आहे. तिकडून लिहिलें येईल तसें करितील. पेंढारी वडिलांकडून चिकोडी तालुकेयांत आले आहेत म्हणोन लिहिलें तें कळलें. सध्यां महाराजांचा मुक्काम कोठें आहे, राजश्री धोंडोपंत गोखले कोठें आहेत, हेंही ल्याहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६२५ श्री. ( पौष शु० ८–१४ जानेवारी )

पै॥ छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

विज्ञापना. तागायत छ० ७ साबान इंदुवासर सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री नानांस वधू पाहण्याकरितां वेदमूर्ती राजश्री नारायण भटजी यांची रवानगी आजच केली. राजश्री बाळकृष्णपंत भाऊ यांची कन्या आहे. आणखी ही एक मुलगी पाहण्याची आहे. ईश्वरी

---

१ पत्र बाळासाहेबांस हरी परशुराम यांचें. २ मोरो आपाजी परांजपे वकील यांचें बाळासाहेबांस पत्र मिरजेस. ३ हे श्रीमंत राजश्री नाना म्हणजे नानाफडनवीस नव्हत. हे गोविंदराव गंगाधर पटवर्धन मिरजकर. यांस रामनराव आणि कृष्णराव असे दोन पुत्र झाले त्यानी पुढें मिरजजहागिरीतून निराळा हिस्सा तोडून घेतला तेंच संस्थान सोनी हें होय. मालक बेवारस वारल्यामुळें व ब्रिटिशसरकारांतून दत्तकाची परवानगी न मिळाल्यामुळें पुढें हें सोनी संस्थान खालसा झालें. ४ हे बाळकृष्ण महादेव बाळ, वास्तव्य कल्याण. नाना फडनविसांच्या विश्वासांतले कारकून. यांचीच कन्या गोविंदराव नानांस वधू नेमण्यांत येऊन पुढें दोन महिन्यांनी मिरजेस लग्न झालें. बाळ यांचे वंशज मिरज, सांगली व तासगांव येथें आहेत.

मूत्र असेल त्याचा निश्चय होईल; (असें) वडिलीं लिहिलें तें कळलें. राजश्री बाळकृष्णपंत पुसत होते कीं आम्हांस तुम्हांकडील जाबसाल समजावा. त्यावरून मशारनिल्हे यांस सांगितलें की, भटजी वधू पाहण्यास येत आहेत. तुमची कन्या आहे. आणखीही एक दोन वधू ऐकण्यांत आहेत. पाहून मिरजेस गेल्यानंतर निघावयाचें समजेल. भटजी दोनचार दिवसांत येतील. याप्रमाणें उत्तर केलें. श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ४६२६                    श्री.          ( पौष शु. ८–१४ जाने. )

पै॥ छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

[2]सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० ७ साबान इंदुवार वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री रामकृष्णराव गंगाधर भानु जांवई यांस तालुके विजयदुर्ग येथील सुभा सरकारातून सांगितला. सनदा जाहल्या. तालुकेयास ही रवाना जाहल्या. वडिलांस कळावें म्हणून लिहिलें आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६२७                    श्री.          ( पौष शु० ८–१४ जाने. )

[4]सेवेशीं आपाजी हरि. कृतानेक सा॥ नमस्कार विनंती येथील कुशल ता॥ छ० ७ साबान सोमवार प्रातःकाळ प्रहर दिवस मु॥ बावची पो करजगी येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान मोंगलांचे फौजेचा मुक्काम भंडारकवठ्यावर आहे. रवतगांवचें ठाणें यांणी हल्ला करून ठाणें घेतलें. जिरें अंकलगीस फौज गेली आहे. गोळी उडत आहे. बाहेरील लोक चार पांच जायांजखमी काल जाले. आज काय होतें पहावें. ( मोंगलाची ) दोन हजार फौज आहे. हजार गाडद आहे. कारभारी मनुष्य जनार्दन शिवाजी व शिंदे[5] आहेत. घासदाण्याविशीं वगैरे मनस्वी उपद्रव करणार. शिवाराची खराबी जहाली. गांव बेचिराख जहाले. दोन चार ठाणीं राहिलीं आहेत त्यांचा बचाव जाहला पाहिजे. विना सरकारचें सामान आल्याशिवाय बचाव होत नाही. सामान यावयाचा अवकाश

---

१ धोंडो बापूजी जोशी यांचे पत्र पुण्याहून मिरजेस    २ ज्यास पत्र लिहिलें त्यांचे म्हणजे गंगाधरराव गोविंद ऊर्फ बाळासाहेब यांचे जांवई    ३ नाना फडनवीस यांच्या भिडेमुळें सरकारातून सनदा झाल्या, परंतु अमल कधींच झाला नाही. सदर रामकृष्णराव हे मिरजेस सासुरवाडीस येऊन राहिले.    ४ हा बरडोल परगण्याचा मामलेदार. याचें हे मिरजेस बाळासाहेबांस पत्र.    ५ चव्हाणकर.

व मर्यादा राहिली नाही. येविशीची आज्ञा काय ते करावी. येथून लिहिण्याची मर्यादा राहिली नाही. मानूर शिरेढोण इकामलाद इतकी ठाणीं ( ? ) आहेत. तिकडून कामगारीस लोक गेले होते, आल्यानंतर रवाना होतील असें लिहिलें होतें, परंतु इकडील तालुक्याची आस्था आपण सोडली ! आज पावेतों शिंदे यास जरब स्वामींची होती त्याणीं यासमयीं आगरउचनाद्दार. ( ? ) विना शिंद्यास जरब बसोन रेवतगांवचें ठाणें घेतल्याची इरे असली पाहिजे. चढ्वाण घेतल्याशिवाय उसनें फिरत नाही. ठाणें घेतल्यानंतर या ठाण्याकरितां त्याची फौज कांही येत नाही. तत्राप आल्यास चिंता नाही. परंतु उसनें फिटेल. कांही सामान मागें विनंती लिहिली तेव्हां आलें असतें तर इतका प्रकार न होता. पारिपत्यास फौज आल्यास ऐवज उगवेल. यांत मर्जी जसी असेल तेसा वर्तणूक करूं. सेवेशीं श्रुत हे विज्ञापना.

नं. ४६२८ ( पौष शु० ८–१४ जान. )

पो॥ छ० ९ साबान. रवाना छ० ७ साबान.

" आज पहर दिवसानंतर कासेगांवास पठाण करोल आले होते त्यापैकीं दोनतीनशें पठाण मंगळवेढ्यास पंढरपूरचे वाटेनें येऊन गोळ्यांच्या टप्यावर उभे राहिले. आम्ही सावधच होतो. शेंदोनशें प्यादे व घोरपड्यांच्या पागेपैकी १५० राऊत वस्तीस रहावयास आले होते त्यांस मिळवून घेऊन व कासेगावचे पांचचारशे दांडग मिळवून आम्ही त्यांचे तोंडावर गेलों. दोन प्रहरपर्यंत ते तलाव करीतच होते. इकडील सामानाचा जथ पाहून मग ते माघारे माणेच्या पाण्यावर जाऊन उतरले. त्यांणी कारकून पाठविला कीं, "लवकर कोणी शहाणा माणूस पाठवून खंडणीचा जाबसाल उरकणें नाहींतर मागून चार हजार पठाण येणार. मग फार जड जाईल. " आम्हीं काहींच उत्तर केलें नाही. "[1]

नं ४६२९ श्री. ( पौष शु० ८–१४ जानेवारी. )

पो॥ छ० ११ साबान. सन तिस्सातिसैन. पौष.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ७ साबान पावेतों स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनी छ० २२ रजबचे पत्र एक व छ० ३० मिनहूची पत्रें तीन पाठविलीं तीं उमा

---

१ गोविंद केशव काळे याचें मोरोपंत तात्यास पत्र मंगळवेढ्याहून. २ पुण्याहून नानाच्या कारकुनाचें पत्र मिरजेस बाळामाहेबास.

समयीं पोहोंचोन संतोष जाहला. सविस्तर मजकूर श्रीमंत नानांस निवेदन केला. उत्तर मागाहून सेवेशीं पाठवितों. श्री॥ राजश्री नानानी छ० ५ साबानचें स्वामींस पत्र पाठविलें तें पावलेंच असेल. त्याअन्वयें उत्तरीं खचित वडिलांस सुचवून आणवून रवाना केलें पाहिजे. श्री॥ राजश्री नानांचे शरीरी शीतज्वराची पीडा जाहली आहे. औषधी व दैवी उपाय करीत आहेत. श्रीकृपेनें आरोग्य सत्वर होऊन येईल. शिंद्यांचे रवानगीचा विचार पडला आहे. जातील तो सुदिन. बायांचे समजाविशीचीं कारस्थानें चाललींच आहेत. समजी व्हावी असाही विचार आहे. सांप्रत कारभार शिंदे यांचा आहे. श्रीमंत राजश्री भाउसाहेबांनीं समीप यावें हें फारच चांगलं. करवीरवासी महाराजांकडील बोलणें होऊन " सरकारांतन चिकोडी मनोळी, शिवाय पावणे तीन लक्षांचे महाल द्यावे आणि राजानीं प्रांत घेतला असेल तो गोळी न वाजतां सरकारांत द्यावा; या प्रमाणें ठरोन राजाकडील बोलणार राजश्रीकडे गेले आहेत. राजश्री शिवरामपंत थत्ते ही मागाहून श्रीमंत पंतप्रधान रवाना करणार आहेत. महाराजानीं समेटून घेतल्यास उत्तम, नाहींतर[1] मसलत होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६३०   श्री.   ( पौष शु० ८—१४ जानेवारी )

पै॥ छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन पौष.

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० ७ साबान इंदुवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. लक्ष्मीबाई शिंदे यांचें व अलिजाबहादर यांचें कटाक्ष मिटत नाहीं. रायाजी पाटील बायांकडून जाऊन माघारे आले. बाया कूच करून श्रीगोंद्याचे रोखें गेल्या. येथें सरकारांत वहमा पडिला कीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचें त्यांचें सूत्र एक विचारें आहे. लोक मनस्वी बोलों लागले. श्रीमंत राजश्री नानांचेही चित्तांत संशय आला. छ० ५ साबानीं प्रातःकाळीं भेटीस गेलों होतों ते समयीं श्री॥ राजश्री नानानीं आपणांस पत्र[2] लिहिलें होतें तें मजपाशीं पहावयास दिलें. (मी) पत्र वाचून पाहोन दिलेवर लखोटा करून आपणाकडील दोन असामी प्यादे यांजबरोबर तिकडून रवाना जाहलें आहे. मला ही हा मजकूर मिरजेस लिहिणें म्हणजे राजश्री भाऊंस राजश्री गंगाधर रावजी लिहितील ( असें म्हणाले. ) पत्रांत हाच मजकूर

---

१ महाराजांवर स्वारी करण्याची. २ पत्र मोरो आपाजी परांजपे यांचे पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस. तसेंच पुढच्या नंबरचें.

आहे की "दौलतराव शिंदे यांचें व बायांचें मिटावें येविशीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान याणीं व दौलतराव याणीं सांगितलें होतें कीं तुम्ही एक विचा होय ते खटपट करणें. त्यावरून बहुताप्रकारें समजुती करीत होतों. परं ते गोष्ट जाहली नाहीं. हल्लीं कूच करून चांभारगोंद्याकडे गेल्या. कोणी म्हणतात कीं भाऊंकडे जाणार. परंतु आम्हास ते गोष्ट मनांत येत नाहीं परंतु तुम्हांस ही सूचना असावी." आपण वडिलांकडे लिहावें असा विचा लिहिला आ. छ० ५ साबानीं प्रहर दिवसास पत्र रवाना जाहलें आहे वडिलीं उत्तर यथास्थित पाठविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें. कृपा लो असों दिला पाहिजे हे विज्ञापना.

नं. ४६३१ श्री. ( पौष शु० ८–१४ जानेवारी.

पै॥ छ० ११ साबान. सन तिस्सातिसैन. पौष.

सेवेशीं मोरो आपाजी परांजपे साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाय छ० ७ साबान वर्तमान यथास्थित असे. विशेष. "राजश्री गणेशराव पें वाळवें येथें ठाणें घालावयाकरितां श्री॥ राजश्री रावसाहेब यांजकडून गेले त्याणीं वाळवें यांत ठाणें छ० २० रजबीं घातलें;" म्हणोन स्वामींनीं लिहि होतें. त्यास ही गोष्ट चांगली जाहली नाहीं. बहुता दिवसांचे राजपत्री सरंजाम नामांकित. त्यांजवर सरकारांतून गहजब जाहाला! येथें लोकांचें म्हणणें कं ठाणें बसतां संकट आहे. परंतु कांहीं एक जाहलें नाहीं याचा अर्थ काय ठाणें लढत असतें तरी बहुत चांगलें. सरकारांत ही बोलणें लागलें असत यथास्थित. तो प्रकार जाहला नाहीं. थोरात नामी असतां गाफीलपणा जाहला ईश्वरी इच्छा! अलीकडे कांहीं गडबड थोरातांनीं केली आहे म्हणोन बाजार बातमी आहे. परंतु राजश्री कृष्णाजी थोरात सांपडले आहेत. हें क घडेल? वडिलीं आज्ञापत्रीं लिहिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा लो असों दिला पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ४६३२ ( १५ जानेवारी. )

श्री. नक्कल.

विज्ञापना. तागायत पौष शु ९ भौमवारपर्यंत सेवकाचें वर्तमा यथास्थित असे. विशेष. इकडील मजकूर—

---

१ पत्र धोंडो बापूजी जोशी याचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस.

१ पौष शु॥ पंचमी गुरुवार सायंकाळी सहा घटका दिवसास टिपू-कडील वकिलाच्या भेटी जाहल्या. पोषाख व शिरपेंच व जेगा येणेंप्रमाणें दिलें. तिघांसही दिलें. खेरीज हत्ती एक मुख्यास.

१ लेखक यांस शीतज्वर फिरोन येऊं लागला. एक दिवसा आड पाळी आहे.

१ शिंद्यांकडील बाया यांजकडे फौज आहे त्या पैकी कांहीं फौज मोरे वगैरे शिंद्यांकडे उठोन आले. त्यांचीं घरें कोठें कोठें आहेत तेथें बायांकडील राऊत जाऊन घरें लुटून नेलीं. रायाजी पाटील यांचे घर खारीस आहे तेथें फौज ( बायांनी ) पाठविली आहे. येणेंप्रमाणें वर्तमान आहे.

१ पौष वद्य ६ गुरुवासरीं मुख्य, ज्येष्ठ व कनिष्ठ येणेंप्रमाणें प्रातःकाळीं तुळापुरास जाऊन तेथें स्नान संध्यादि भोजन करून सायंकाळचे सहा घटका दिवसास पुण्यात आले.

१ आबा चिटणीस एका दो दिवशी लेखकाकडे येत असतात. तेथून मग मुख्यांकडे जातात.

१ आबा चिटणिसाचा भाचा बायांकडे गेला आहे. दोहों चोहों दिवशी आबा जाणार म्हणोन वदंता आहे.

१ करवीरकर यांजकडील आत्मारामबुवा म्हणोन शेणवी वकिलीस हुजूर आले आहेत. ते शिवरामपंत थत्ते यांचे विद्यमानें सरकारांत बोलणें बोलोन कराराच्या यादी ठरल्या. त्यांतील भाव चिकोडी मनोळी दोनी ठाणी त्यांस देऊन खेरीज तीन लक्षाचा सरंजाम दिला. त्याणीं सरंजामांत चाकरी हुजूर करावी. याप्रमाणें बोलणें ठरलें. सरकारचा निरोप थत्ते यांचे विद्यमानें जाहला. लेखकाकडे जावयाचें, त्यास तें बोलणें शंकर जोशी यांचे विद्यमानें आहे. तेथें वकील गेले होते. सरकारचा करार मदार ठरला तो त्यांस सांगितला. शंकर जोशी यांसीं नाना बोलिले जे, "तुम्हांकडे याणीं चाकरी करावी तें राहिलें, आणि तुम्ही हुजूरची चाकरी करावी हें काय कबूल केलें ? असा. जें जालें तें बरेंच आहे. महाडचे मुक्कामीं दोन लक्ष रुपये तुम्हांस देविले ते वेळचें बोलणें असें नव्हतें." याप्रमाणें आहे.

---

१ टिपूच्या वकिलानी बाजीराव वगैरे तिघां बंधूंस पोषाख शिरपेच व जेगा असे प्रत्येकी दिले. शिवाय बाजीराव यांस हत्ती नजर केला. २ पेशवे, अमृतराव व चिमाजी आपा. ३ शिंद्याचे कारभारी. हे नानांकडे येत असतात. ४ पेशव्यांकडे.

१ पौष व॥ ८ इंदुवारीं सायंकाळीं सहा घटका रात्रीस गोविंदराव काळे व शिवरामपंत थत्ते हे उभयतां नजरबंद करून बेडया घातल्या. काळे यांस सिंहगडाकडे नेलें. थत्ते यांस कर्नाळा कल्याणाकडे कोकणांत आहे तेथें नेलें. कारण समजलें नाहीं.

१ या प्रकरणी आणीक गृहस्थ आहेत त्यांचा विचार होत आहे. मागाहून शोध घेऊन लिहितों.

१ कृष्णाजीपंत ( ढेंकणे ) आपलेकडे यावयास निघणार एका दोहों दिवशीं. सरकारांतून फार निकड आहे.

१ पौष वद्य ८ इंदुवारीं मुख्य व कनिष्ठ विश्रामबागेंत भोजनास गेले. सायंकाळ पर्यंत तेथें होते. प्रहर रात्रीस आले.

सदरहू अन्वयें मजकूर आहे तो लिहिला आहे. विदित होईल. धोंडोपंत गोखले यांस सरसुभा तुम्ही कर्नाटक प्रांतींचा करावा म्हणोन चक्रदेव याणीं पत्र लिहिलें होतें. त्याचें उत्तर त्यांचें आलें की आम्हांस सरसुभा नको म्हणोन. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४६३३ श्री. ( पौष शु० ९–१५ जानेवारी. )

पै॥ छ० ८ साबान. सन तिस्सा तिसैन.

सेवेशी विज्ञापना ऐसी जे, स्वामीकडून पत्रें आली ती ( नानांस ) प्रविष्ट केली. आज्ञेप्रमाणें सविस्तर श्रुत केलें. एकसालीपैकीं ऐवज यावयाचा नाही म्हणोन विनंती केली. बजाबानीं पत्र लिहिलें होतें त्याची नक्कल दाखविली. त्यावरून त्याणी सांगितलें कीं, सर्वांनीं ऐवज दिला. तुम्हांस द्यावा लागतो. पत्र त्यांजकडोन मीच लिहविलें म्हणोन सांगितलें. हल्लींही पत्रीं ऐवज द्यावा म्हणोन नानांनी लिहिलें आहे. ऐवज काढून द्यावा. ऐवज कोणास नको असें नाही. राजश्री बजाबानीं मात्र ' आम्ही नबाबाकडे वरात पाठविली आहे. तिकडून वसुलास परगणे मंगळवेढें व करकंबइकडे स्वार येतील म्हणोन सांगितलें. "असो. ते आल्यास ऐवज मिळावयाचा नाहीं" म्हणोन बोलिलों. कटकट मात्र होईल. आम्ही सांगत असतां आग्रह मात्र कराल. आम्हांकडे बदनामी मात्र येईल. इच्छा तुमची ! " म्हणोन सांगितलें आहे. त्यास तिकडील फौजेचा मजकूर उगाच धमकावण्यांचा

---

१ पत्र मोरो आपाजी पराजपे यांचें मिरजेस बाळासाहेबांस. नंतरच पुढच्या नंबरचे.

बोलिला कीं काय न कळे. बातमी असावी. आम्ही ऐवजाचा मजकूर बोलत असतां कटकट जाहली तरी सांगावयास येईल. स्वामींनी मात्र विचार करून आज्ञापत्र पाठवावें. त्याप्रमाणें येथें बोलण्यांत आणीन. कटकट केल्यास कसें हेंही चित्तांत आणून जावयाचें कदाचित् उगीच बजाबा बोलिले असें असल्यास सहजच राहिलें. या कामाकरितां मुद्दाम जासूदजोडी मंगळवेढ्याकडे पाठविली पाहिजे. तिकडेही कोणास लिहून हरद्र यावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६३४ श्री. (पौष शु० ९–१५ जाने.)

पै॥ छ० ८ साबान. भौमवासर. तिस्सा तिसैन.

सेवेशीं विज्ञापना ऐसी जे, श्री॥ राजश्री नानांस एकांत्रा ज्वर फिरोन आला. आज दुसऱ्या पाळीचा ज्वर आला. औषधी उपाय करीतच आहेत. आरोग्य होईल. मागाहून विनंती लिहितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६३५ श्री. (पौष शु० ९–१५ जाने.)

पै॥ छ ११ साबान. सन तिसा तिसैन पौष.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशी.

विनंती सेवक मोरो आपाजी परांजपे. शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ८ साबान मुक्काम पुणें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल दोन प्रहरीं इकडील सविस्तर लिहून खेमाजी देवापा जासूद वडिलांकडे रवाना केला आहे त्यावरून श्रुत होईल. काल छ० ७ साबान इंदुवारीं सायंकाळीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान याणी राजश्री गोविंदराव काळे व शिवरामपंत थत्ते यांस नजरबंदी करून सिंहगडावर काळे यांस काल रात्रौ रवाना केलें. थत्ते यांस किल्ले कर्णाळा येथें रवाना केलें. स्वारी श्रीमंतांची काल प्रातःकालींच विश्रामबागेमध्यें गेली होती. दोन प्रहरीं भोजन बागांतच झालेनंतर स्वारी तशीच होती. रात्रौ भोजन करून वाड्यांत आले. बागांत दोन घटका रात्रीस उभयतांस नजरबंदी करून भोजन झालेवर श्रीमंत आले. यांजकडे अपराध लौकिकांत की, राजश्री दौलतराव शिंदे यांचें त्यांचे मातुश्रीसीं कटाक्ष वाढविलें, हरएक तऱ्हेनें त्यांचे यांचें मिळों दिलें नाहीं, त्यांत हे उभयतां होते. आणखीही कोणी कोणी आहेत ऐसेंही बोलतात. सविस्तर वृत मागाहून सेवेशीं लिहितों. दोघेही गृहस्थ संभावित. ईश्वरें त्याजवर अरिष्ट आणिलें आहे यांतील प्रकार मागाहून सविस्तर विनंती लिहितों. सेवेशीं

श्रुत होय हे विज्ञापना. विश्रामबाग कोठें आहे वडिलांचे ऐकण्यांत नसेल तरी शेषोपंत भिरडीकर यांचे उत्तरेकडील आंगें राजश्री हरीपंत तात्यांचा बाग होता. अजमासें क्षेत्र दीड बिघा आहे. तोच बाग श्रीमंतानीं घेऊन त्याचें नांव विश्रामबाग ठेविलें आहे. आठ चार दिवशीं स्वारी तेथें जात असते. नहराचें पाणी तेथें नेणार. पश्चिमेकडील आणखी जागा व उत्तरेकडील बागांत घेणार असा विचार आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६३६ (पौष शु० १०–१६ जाने.)

पै॥ छ० ९ साबान.

"काल कासेगांवावर बायांकडील पांच सातशें पठाण व स्वार आले. ठाण्यांतील कारकून खंडणीचा मजकूर बोलण्यास म्हणून आणा शपथा करून नेले. लाख पाऊण लाखाची बेरीज बोलूं लागले तेव्हां ऐवज न देववे, सबब कारकुनास मारहाण बहुतच केली."

नं ४६३७ श्री. (पौष शु० १०–१६ जाने.)

पै॥ छ० १८ साबान तिस्सा तिसैन. पौषमास.

चि॥ राजश्री जनार्दनपंत पेठ्ये यांसी प्रती गणेशराम पेठ्ये आशीर्वाद उपरी येथील कुशल ता ॥ छ० ९ साबान पावेतों मु॥ येलबर्गे येथें सुखरूप असों विशेष. तुम्ही पत्र छ० २ साबानचें पाठविलें तें पावलें. कोकणचा मजकूर लिहिला तो व चि ॥ आऊबाईचे शेताचा मजकूर लिहिला तो कळला असेंच सदैव पत्र पाठवीत असावें. यानंतर इकडील मजकूर ती॥ राजश्री मामांस लिहिलें आहे त्यावरून कळेल. मदारभाई सांडणीस्वार याजबरोबर रुपये मळकापुरी ४८ व चांदवाडी रुपये २ एकूण पन्नास ५० पाठविले आहेत. पावतील. काल रवाना जाहले नाहीं. आम्हाबरोबरची जय तोफ फुटली. त्याचे मोबदला दुसरी गजेंद्रगडाहून आणिली आहे. त्या तोफेबरोबर नाहीं. सुमारांत आहे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद. आम्हांबरोबर पोरगा चाकरीस आहे त्याणें आपले आईस पत्र[१] दिलें तें कोनापा पाटोळा याजवळ द्यावें म्हणजे त्याचें आईस पावेल. हे आशीर्वाद.

नं ४६३८ श्री. (पौष शु० १०–१६ जानेवारी.)

ती॥ राजश्री मामा वडिलांचे सेवेशी. अपत्यें गणेशानें दोन्ही कर जोडून शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० ९ साबान मु॥ येल-

---

१ पत्र मंगळवेढ्याहून मिरजेस.

बर्गे येथें वडिलांचें आशीर्वादें सुखरूप असों विशेष. वडिलीं छ० २० रज्जबचें पत्र पाठविलें तें पावलें. तेथे लिहिलें कीं 'श्रीमंताचे मर्जीमाफक चाकरी करावी. माणसाकाणसांची अबरू राखोन चाकरी घ्यावी' म्हणोन लिहिलें, व लबाड असेल त्यास निषेध करीत जावें. बैलांची निगा रुबरू पाहून चांगली करीत जावी. दाण्याची सावधगिरी असावी' म्हणोन लिहिलें, व 'कामकाज पडल्यास अंगमेहनतीनें करावें. मुख्य श्रीमंताचे मर्जीमाफक जें करणें तें करावें.' म्हणोन आज्ञा, त्यास जें करणें तें श्रीमंतांस वरचेवर विनंती करून करीत असतों. बैलांचा दाणा नेहमी जवळ उभे राहून चारीत असतों. सरकार चाकरीस फौजेजवळ रात्रौ मोर्च्यांत जात असतों. येकादे दिवशीं राहुटीस राहतों ( तेव्हां ) बाळाजीपंत जातात. काल छ० ८ साबानीं रात्रीं गांवचे पश्चिमेस तोफ होती तेथून आणून दक्षिणेकडे लागू केली. तेथें मोर्च्यांत सगळी रात्र होतों. मोर्चा बांधोन सूर्योदयास जाहला तेव्हां तेथून आलों. श्री॥ रामचद्रपंत आपा तोफेचे मागें मोर्चांत नेहमी असतात तेथें नेहमीं जात असतों. तोफेचे बार करणें ते त्यांचे परावनगीनेंच करीत असतों. चाकरीस अंतर करावयाचें नाहीं. फल देता ईश्वर आहे. कारखान्यांतील लोकास रोजमरा रज्जबचा दिला. लिहिण्याच्या पद्धती जमाखर्ची मला तर ठाऊक नाहीं. परंतु समजेल तसें लिहून आणितों. हिशेब आकारून देणार वडीलच आहेत. वडिलांशिवाय दुसरा कोण आहे? संभाळून घेतलें पाहिजे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६३९　　श्रीगणपति.　　( पौष शु० १०–१६ जाने.)

छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

अपत्यें हरीनें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० ९ माहे साबानपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. वडिलीं छ० ५ साबानचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिले मजकूर कळले. वडिलांकडून लष्करचीं पत्रें छ० २८ रज्जबचें व छ १ साबानचें पत्र आलें त्यांतील वर्तमान लिहिलें तें कळलें. सध्यां रावेंजीसह उंब्रजेवर मुक्काम आहे. रावजींनी पुणेंस पत्रें पाठविली आहेत त्यांत करवीरकरांकडील मसलत करावयाचा प्रकार लिहिला आहे. तेथील आज्ञा आली तरी मसलत करणार आहेत. राजश्री कृष्णाजी

---

१ बैल तोफा ओढणारे. २ हरि परशुराम यांचें पत्र बाळासाहेबास. ३ माधवराव रास्ते यांसह.

पंत ढेकणे अद्यापि पुण्याहून निघोन आले नाहींत. करवीरकर महाराज संवदुत्ती नवलगुंद येथें आहेत. राजश्री धोंडोपंत गोखले यांजवर दृष्ट देऊन आहेत. पुणेंकडील वर्तमान येईल तें मागाहून लिहून पाठवितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६४० श्रीगणपति. ( १६ जाने. )

पे॥ छ० १५ साबान तिस्सैन पौष.

अपत्यें रामचंद्रानें[1] शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत पौष शु० १० बुधवार पर्यंत यथास्थित असे. विशेष. चिरंजीव राजश्री बाबा खटावचे मुक्कामाम आले तें पत्र पावलें. ईश्वरें रक्षण केलें. पुढें कसें झालें ते आज्ञा करावी. प्रस्तुत मुक्काम कोठें आहे ते आज्ञा झाली पाहिजे. येलबर्ग्यांचें बोलणें लागलें आहे. लवकरच आटपेल. करवीरवासींची फौज कांहीं नवलगुंदाकडे आली. जवळ पडेल याजकरितां जसें बनेल तसें गांवचें उरकून मोकळें होतों. तीर्थरूप राजश्री भाऊसाहेबांची प्रकृत बहुतच निःशक्त झाली. सामर्थ्य नाहीं. वांईकडील वैद्य आले त्यांचें हातें प्रकृतीस गुण पडत नाहीं. याजकरितां वेदमूर्ती राजश्री लक्ष्मीधर वैद्य यांचें येणें लवकर व्हावें. खर्चास पाहिजेसें असेल तर राजश्री विठ्ठलपंत फडके यांस आज्ञा करावी म्हणजे देतील. परंतु ( वैद्य ) लवकर आले पाहिजेत. रास्ते यांजकडील दीक्षित आदिकरून मंडळी[2] यांचें बोलणें ऐवज दिल्याखेरीज वस्त्रें यावयाचीं नाहींत. वडिलांचा आग्रह वस्त्रें आलेविना पैका नाहीं. तेव्हां निरोप घेऊन चालले. मग तोड पडली जे, वस्त्रें ( आणि ) मंडळी आणून साहूकाराजवळ द्यावी; त्यानें दोन लक्ष रुपयेचा भरणा करावा; असें ठरलें आज त्यांचींही पत्रें रवाना होतील. ते राहिले. पुढें कसें होतें तें पहावें. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४६४१ श्री. ( पौष शु० १०–१६ जाने. )

पे॥ छ० १५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं[3] विनंती सेवक बापूजी तीर्थो कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० ९ साबानपर्यंत स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान

---

१ रामचंद्र परशुराम यांचें पत्र बाळासाहेबास. २ रास्त्यांच्या ताब्यांत सरकारातून दिलेले बंदिवान चिंतोपंत लिमये व जनोबा सुभेदार वगैरे. ३ पत्र दोडवाडाहून मिरजेस बाळासाहेबांस.

यथास्थित असे. विशेष. श्रीमंत महाराज छत्रपति याणीं फौजेसुद्धां मौजे वटनहाळ व होसबाळ नजीक सवंदत्ती येथें मुक्काम करून राहिले आहेत. त्या पैकीं सडी फौज दोन हजारपर्यंत नवलगुंदपर्यंत स्वारी गेली होती ठाणें घालावें म्हणोन. तेव्हां नवलगुंदकर हुशारीनें होते. तें कार्य साधलें नाहीं त्याजकरितां स्वारी माघारी फिरून येते समयीं तालुकेमजकूर खेड्यांचीं गुरें वळून आणिलीं. तसेंच हाल कुसुगल खेडें मारून लुटून तेथील पाटील कुलकर्णी व रयत वगैरे यांस धरून लष्करास आणिलें. नंतर आणखी परवां सडी फौज दोन तीन हजारपर्यंत मौजे कळूर मुळूर तालुके नरगुंद येथें गेली आहे. त्यांचे बातमीकरितां माणसें येथून पाठविलीं आहेत. तिकडून बातमी येतांच सेवेशीं मागाहून लिहून पाठवितों. दोडवाडकर गांवकरी विनंतीपत्र लिहित आहेत त्याजवरून सविस्तर श्रुत होईल. सेवेशीं श्रुत होय बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ४६४२ श्रीगणपति. ( पौष शु० ११–१७ जानेवारी. )

चि॥ राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी

" करवीरकरांची मसलत म्हणजे थोडी असा समज हुजूर आहे. परंतु यांचा फैल उत्कृष्ट. राज्यांत बाकी राहिली नाहीं. यांची निशा जाल्या वांचून दुसरीकडे रोख जाला असतां दबदबा रहात नाहीं. " म्हणोन लिहिलें तें कळलें. आमच्याही ध्यानांत आहे. ठाण्याचा जाबसाल उलगडल्यावर मग विचार. कलम १.

राजश्री मोरो बापू पराजपे यांचीं पत्रें व बाळकृष्णपंत यांस आपण पत्र पाठविलें त्याची नक्कल पहावयास पाठविल्या त्या पावल्या. त्याजवरून सविस्तर समजण्यांत आलें. यास उत्तर कसें लिहावयाचें म्हणोन लिहिलें. त्यास मजकूर समजून जाब द्यावा. कलम १

एकूण दोन कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० १० साबान. बहुत काय लिहिणें. हे आशीर्वाद.

नं ४६४३ श्रीगणपतिर्जयति. ( पौष शु० ११–१७ जाने. )

पै॥ छ० १५ साबान सन तिस्सातिसैन. पौष.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें चिंतामणीनें दोनी कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० १० साबानपर्यंत मुक्काम येलबर्गे येथें वडिलांचे

## रा. १७२० परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. वडीलीं छ० २ साबानचें आशीर्वाद-पत्र पाठविलें तें छ० ७ साबानीं मुक्काममजकुरास पावलें. "कामाठी याचे रोजमुरे पत्राप्रमाणें यास बाकी अखरसालीं हिशेब पावेल. व जिलीबीचे प्याद्यांची अवमानीं तजा करण्याचा मजकूर मागाहून लिहितों." म्हणोन लिहिलें, व शिबंदीमध्ये आपुस घातक्षयाचा उपद्रव जाहला आहे म्हणून लिहिलें, त्यास श्री आरोग्य करील तेव्हां खरें. राजश्री माधवराव रास्ते वांईस गेले असता धोंडोपंत मातारेकर याणी शिराळेंहून येऊन छापा घातला. बहुत नाश जाहला. तीर्थस्वरूप रा॥ बाबा निघून खटावाचे मुक्कामास आले म्हणून लिहिलें, त्यास धनसिंगानें दग्याचें काम केलें. ईश्वर इच्छेस उपाय नाहीं. इकडील वर्तमान पाठविल्या त्या पत्रावरून विदित होईल. येलबुर्गेचें बोलणें एक दोन रोजांत फडशा होईल. करवीरकरांची फौज नवलगुंदच्या सुमारें आली आहे. या प्रमाणें वर्तमान आहे. तीर्थस्वरूप राजश्री विठ्ठलराव यादवाडकर यांस छ० ८ साबानीं मोर्च्यांत दक्षिणच्या अंगें तोफा लाविल्या होत्या तिकडे गेले होते तेव्हां गोळी आंगरखा फाडून पोटास लागली. हलकी जखम आहे. कळावें. वरकड मजकूर मदार याजबरोबर लिहिला आहे त्याजवरून विदित होईल. चिरंजीवाची प्रकृत ठीक नाहीं इतक्यास्तव वडिलांचे मर्जीस आल्यास लक्षमृत्युंजय अनुष्ठान करावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं ४६४४ श्री मारुति प्रसन्न. ( पौष शु० ११–१७ जाने. )

छ० १५ साबान सन. तिस्सा तिसैन. पौष.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्य नारायणाने दोन्हीं कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १० साबानपावेतों मुक्काम येलबर्गें येथें वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. स्वामीकडून पत्रें येऊन संभाळ होत नाहीं. त्यास असें न करावें. येणारासमवेत पत्र पाठवून सांभाळ करीत जावा. यानंतर आम्हांकडील वर्तमान तर येलबर्गे यास मोर्चे लावले आहेत. तोफांचीही मारगिरी वरचेवर होती, परंतु तहामध्यें आद्यापवत येत नाहीं. गावाचे पूर्वेस तोफा लाविल्या. भिंताड दोन हात पडलें. तदनंतर गांवाचे उत्तरेस लावल्या तिकडूनन मारगिरी चालेना. हल्लीं गांवाचे दक्षिणेस लावल्या आहेत परंतु गांव भरीव आहे. सुरंग लावावयाचे मसलतींत आहेत. राजश्री धोंडोपंत गोखले यांजकडून दोनशें स्वार रुसून राजश्री

---

१ परशुरामभाऊंच्या. २ लष्करांतून पत्र बाळासाहेबास मिरजेस. तसेच पुढच्या नंबरचे.

भाऊसाहेब यांजकडे चाकरीस राहाण्याच्या उद्देशें आले आहेत. मंगळूरकर व कोपळकर यांनीं पेंढारी पन्नास असामीपर्यंत पाठवून लष्करचीं दोन उंटें व सात आठ तट्टेंपर्यंत नेलीं. शोध लाविला. परंतु पेंढारी सांपडले नाहींत. राजश्री विठ्ठलरावबाबा यादवाडकर यांस गोळी पोटावर उजवे कुशीवर लागली. अर्धी अंगांत बुडाली. जखम लवकरच बरी होईल. चिंता नाहीं. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६४५ श्री. ( पौष शु० ११ [illegible] जाने. )

छ० १५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांगनमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागायत छ० १० माहे साबान मुक्काम येलबर्गे यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं मानाजी खिजमतगार याजबराबर छ० २ तारखेचें पत्र पाठविलें तें छ० ७ तारखेस पावलें. राजश्री माधवराव रास्ते वांईस गेले होते. चतुरसिंग सातारकर महाराजांचे बंधु शिराळेहून जमाव घेऊन जाऊन रास्त्यांची फौज साताऱ्यावर होती त्यांजवर छापा घातला. श्रीमंत राजश्री बाबासाहेब औंधचे पलीकडे खटावास आलीयाचें लिहिलें तें कळलें. रास्त्यांकडील बाबा फडणीस व वे॥ राजश्री बापू दीक्षित येथें होते ते निरोप घेऊन जात होते. इतक्यांत हें वर्तमान आलें, त्याजवरून तूर्त राहिले आहेत. सविस्तर श्रीमंतानीं लिहिलेंच असेल. येलबर्ग्यास मोर्चे बसले आहेत. गांवातील दम बराच आहे. बारा दिवस झाले. आणखी किती दिवस लागतात पहावें. येथील खर्चास ऐवज रवाना करितों म्हणोन लिहिलें. उत्तम आहे. मदार सांडणीस्वाराबरोबर विनंती लिहिली आहे त्याजवरून सविस्तर विदित होईल. राजश्री विठ्ठलरावबाबा यादवाडकर यांस पोटावर उजवेकडे गोळी लागली. झाडास गोळी लागून यांस लागली याजमुळें खेर झाली. सबब लागान कातडें गेलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६४६ श्रीगणराज. ( पौष शु० ११-१७ जाने. )

छ० १५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

अपत्यें श्रीपतीनें साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ० १० साबान पावेतों वडिलांचे आर्शीर्वादेंकरून सुखरूप असे. विशेष. वडिलांकडून पत्र छ०

१ श्रीपतराव मोरेश्वर यांचें पत्र बाळासाहेबांस.

२ साबानचें आलें तें छ० ८ साबानीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं इकडील सर्व वर्तमान वडिलांचे पत्रीं लिहिलें आहे व "रास्ते यांचे फौजेवर छत्रसिंग यानें छापा घातला. चिरंजीव राजश्री बाबा खटावास आले. त्यांच्या पत्रावरून कळलें" म्हणून आज्ञा, त्यास पुण्याचे पत्राचा वगैरे सविस्तर मजकूर समजला. इकडील वृत्त येलबरगें अद्यापि लढत आहे. आज बोलणें लागलें आहे. काय होतें पहावें. रास्ते यांजकडील वस्त्रांचा प्रकार पेशजी लिहिलें त्याअन्वयें येथेंच सावकारी चिठ्या दिल्या. दोन लक्षांच्या दिल्या. वस्त्रें व मंडळी आल्यावर यावें याप्रमाणें करार होऊन वे ॥ राजश्री बाबूभट जोग यांची पत्रें गेलीं आहेत. सर्व मंडळी जावी असें जाहलें होतें. त्यास मागती राहिले. वस्त्रें देऊन जाणार. करवीरकर महाराज फौजसुध्धां नवलगुंदापाशीं आले आहेत. फौज सात हजार आहे म्हणून बातमी आली आहे. येथें शहास फौज गुंतली आहे व फौजेस पैका नाहीं असें आहे. काय घडतें पहावें. वडिलांच्या पुण्याची सामग्री मोठी आहे. चिरंजीव राजश्री दाजीसाहेब यांस सडे होऊन येथून दोन तीन कोसां-वर पुढें पाठविले आहेत. येथील आटपून पुढें जाणार असें आहे. पुण्याकडील वृत्त अधिकोत्तर आलें असेल तें लिहावयास आज्ञा झाली पाहिजे. विदित होय हे विज्ञापना

नं. ४६४७ श्रीगणपति. ( पौष शु० ११-१७ जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. आपण छ० २ साबनचीं पत्रें पाठविलीं तीं छ० ७ मिनहूस पावलीं. यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशील कलमवार—

चिरंजी राजश्री विठ्ठलराव बापू यांची प्रकृत बहुत बिघडली आहे. पुण्यांतील हवा मानत नाहीं, परंतु तेथून निघत नाहीत, म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास पेशजीं चिरंजीवाचें पत्र 'पुण्याहून निघतों. उंटें वगैरे सामान पाहिजे'. असें आलें होतें त्याचा जाब दिला तो मजकूर आपणास लिहिलाच आहे. येविशींचें

नबाबाच्या फौजेंत म्हैसकर आहेत ते करकंब परगण्यांत धामधूम करणार असा रंग आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. अशास काय करावें ! रीतीचे नव्हेत. कलम १.

चापाच्या फतऱ्या पुण्याहून आल्या, मागाहून रवाना करितों, म्हणून लिहिलें तें कळलें. आज पावेतों रवाना झाल्या असल्यास बरेंच.

१ चिंतामणरावांचे धाकटे बंधु. बाळासाहेबांचे पुतणे.

चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा यांस सांगतों. आपलीं लिहिणीं जात असावीं. कलम १.

करवीरकर वणुराजवळ आहेत. याउपर माघारे फिरतात कीं काय पहावें. कित्तूरकरांचें बोलणें मिटलें नाहीं. खंडेरोव[1] घोरपडे कांहीं स्वार व पलटणचे लोक घेऊन मिरज प्रांतांत आले, उपद्रव मोठा आहे म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशियास करवीरकर बारीपार मलप्रभेच्या कांठीं एकुंडीजवळ आले. नवलगुंदास चौकी पाठविली व नवलगुंदच्या जिल्हेंत स्वाऱ्या करितात अशी बातमी आली. आम्ही येलबर्ग्याचें काम आटपतांच तोच रोख धरूं. कलम १.

जाल्या नसल्यास लवकर पाठवून द्याव्या. कलम १.

चिरंजीव राजश्री हरीपंत बाबा यांजकडून लाखोटा आलेला पाठविला तो पावला. त्याचीं उत्तरें पाठविलीं आहेत. रवाना करावीं. चत्रसिंग याणीं संधी पाहून काबू साधला. होणारास उपाय नाहीं. बाजी बिघडली. याउपर कसा सावर बसतो पहावें. कोण कोठें आहेत हें वर्तमान तपशीलवार आणवून लिहावें. जाब परभारें रवाना केले त्यानीं फिरोन जेथें माधवराव असतील तेथें जावें. कलम १.

सुरापूरकरांचा जमाव चांदकवठ्याजवळ आहे. बर्डोल परगण्यास उपद्रव करणार. त्यांजकडे पत्र पाठवून बंदोबस्त करवावा म्हणोन लिहिलें तें कळलें. कलम १.

एकूण सहा कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० १० साबान. बहुत काय लिहिणें. चिरंजीव राजश्री विठलराव बापूस पुण्यांत समाधान नाहीं यास्तव त्यांस श्री क्षेत्र पंढरीकडे आणवावयाची खर्चाची तरतूद करून पाठवावी. लोभ कीजे हे आशीर्वाद.

छ० १५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

नं. ४६४८　　श्री.　　( पौष शु० १२–१८ जाने. )

पै॥ छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं विज्ञापना. येलबर्ग्यास मोर्चे बसाविल्याचें सविस्तर जासुदाबरोबर सेवेशीं लिहिलेंच आहे. मोर्चे बसवून आज बारा दिवस जाले. मोर्चे समीप गेले आहेत. गांवांतील बोलणें चाललेंच आहे. दहा पांच हजार

---

[1] खंडेराव हा जातीनें परभु, परंतु घोरपड्यांचा कारकून असल्यामुळें त्यास त्याच्या धन्याचें आडनाव पडलें.

रुपये देऊं असं म्हणतात. परंतु गांवांत दोनशेंपर्यंत घोडें आसदअल्लीखान नवाबाकडील त्याचे पागेचें आहे त्याणीं लष्करचे मार्गाची लुटालूट बहुत केली यास्तव श्रीमंतांचे चित्ती घोडी तेवढी घ्यावीं असें आहे. गांव मजबूत. आंत पांच सातशेंपर्यंत जमाव आहे. तोफा लहान याजमुळें कारागिरी होत नाहीं. एक तोफ पहिली व एक गजेंद्रगडाहून आणिली आहे. काय घडतें पहावें. हे विज्ञापना गांवचें बोलणें ठरलें होतें. घोडी व हत्यारेंसुद्धां सोडून पार करून द्यावें, ठाणें घालावें, ऐसें बोलून गांवकरी गांवांत गेले ते दोन दिवस आले नाहीत. काय होतें पहावें. हे विज्ञापना.

नं. ४६४९ श्री. ( पौष शु० १२-१८ जाने. )

पे॥ छ० ११ साबान. तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं विज्ञापना. दोडवाडाहून राजश्री बापूजी तर्थी याचें पत्र आलें होतें. गोखल्याचा उपद्रव किरकोळ बहुत होतो. त्याजवरून येथून श्रीमंताचें पत्र गोखले यांस घेऊन पाठविलें. करवीरकरांची फौज चार हजारापर्यंत नवलगुंदचे सुमारें आली म्हणोन येथें वर्तमान आहे. नरगुंदाहून पत्रेंही आलीं. येलबर्ग्याचा अद्याप गुंता उरकला नाहीं. अलीकडे दोन दिवस गावचें बोलणेंही नाही. याप्रमाणें आहे. हे विज्ञापना.

नं.४६५० श्री. (पौष शु० १२-१८ जाने.)

पे॥ छ० ११ साबान. तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशी विज्ञापना. राजश्री बाळकृष्णपंत लागू येथें श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचे भेटीस आले आहेत. त्यांजवर आमचे यजमानानीं दोन हजार होन खर्चास द्यावे म्हणोन निकड लाविली आहे. त्याजवरून लागू याणी श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस विचारलें. त्याणी द्यावे असं उत्तर केलें. पुढें करें करावें म्हणोन लागू आम्हाजवळ बोलत होते त्याजवरून आम्हांस कळलें. मागाहून काय ठरेल तें लिहून पाठवीन. ऐकिलें तें सेवेशीं लिहिलें आहे. हे विज्ञापना.

नं. ४६५१ श्रीगणपति. ( पौष० शु० १२-१८ जाने. )

छ० ११ साबान तिस्सा तिसैन. पौष.

विज्ञापना. वडिलांची प्रकृत केवळ नाजूक जाली. वैद्य चांगला पाहिजे.

---

१ पत्र गणेश गोविंद याचे लष्करातुन बाळासाहेबास. तसेच पुढच्य नबरच.
२ चिंतामणराव आपा. ३ पत्र रामचंद्रपंत आपाचें बाळासाहेबांस लष्करांतून.

त्यास वे॥ लक्ष्मीधर वैद्य इस्लामपुरीं आहेत त्यांचें येणें हरकसेंही करून जालें पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ४६५२　　श्री.　　( पौष शु० १२–१८ जाने. )

पै॥ छ० ११ साबान तिस्सा तिसैन पौष.

विज्ञापना. "हरभऱ्याचे झाडासारखीं झाडें, पानेंही तशीच असतात. अशीं कोठें आढळल्यास ध्यानांत असावें" म्हणोन पेशजी स्वामींचें बोलण्यांत होतें. त्याजवरून येथें झाडें आढळलीं. खावून पाहिलीं. हरभऱ्यासारखी आंबट खारट आहेत. पानें हरभऱ्यासारखीं. येथें दहा पांचांस दाखविलीं. रानहरभऱ्याचें झाड असें सांगतात. त्याजवरून हल्लीं मिळालीं ती पाठविली आहेत. हीं कांहीं उपयोगी पडावयाचीं असल्यास आणखी आढळल्यास पाहूं. हे विज्ञापना.

नं. ४६५३　　श्री.　　( पौष शु० १२–१८ जाने. )

पै॥ छ० ११ साबान. मन तिस्सा तिसैन. पौष.

विज्ञापना. पंधरावीस दिवस जाहले. श्री नाशिकास गोदातीरीं घटका रात्रीस नक्षत्रवृष्टि दोन घटकापावेतों जाहली. गंगेस ब्राम्हण संध्या करावयास गेले होते त्याणी पाहिली. गांवातून ही सर्वांस दृष्टीस पडली हजार पांचशें नक्षत्रें पतन पावलीं. त्याच दिवशीं कृष्णातीरी वांईस नक्षत्रवृष्टि जाहली. दोनी वर्तमानें श्रीमंतास कळलीं, त्यावरून शास्त्रतः विचार करून अद्भुतशांत सरकारवाड्यांत केली. आठ दहा दिवस जाहले. नदी पलीकडे वृद्धेश्वर शिवालयासन्निध नदीतिरीं खडकावर ब्राम्हण उष्णामध्यें व पर्जन्यामध्यें सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत तपश्चर्या करीत होता. दहा वर्षें बारा वर्षें होत आलीं. हल्लीं श्री॥ राजश्री पंतप्रधान यांची स्वारी जाऊन पूजा करून हल्लींशिक्का रुपये १२००० हजार रोख दिले. शिवाय शालजोडी धोतरजोडा व पवित्रक वगैरे दिलें. आठ दिवस जाहले. त्याशिवाय आणखी ही परचुरे वगैरे लोकानीं मिळोन तीन हजार साडे तीन हजार पावेतो विषय दिला.श्रीमंतानी ब्राम्हणाचें दारिद्र (विछिन्न) केलें. वडिलांस कळावें. छफरबंदाचा व दौलतराव शिंदे यांचे सैन्यांतील पठाण यांचा छपराचे किमती-

१ पत्र गणेश गोविंद यांचे लष्करांतून बाळासाहेब यास. बाळासाहेब यांस दुर्मिळ मौल्यवान औषधें तयार करून संग्रही ठेवण्याचा नाद फार होता. औषध तयार करण्याच्या वनस्पति व जिन्नस मिळविण्याच्या तलासात ते नेहमी असत. त्याजवळ सालवादोर नांवाचा गोरा पोर्च्युगीज वैद्य होता तो ही औषधे तयार करी. तो शस्त्रवैद्यही चांगला होता. २ धोंडो बापूजी जोशी यांचें पत्र मिरजेस बाळासाहेबास.

वरून काजिया जाहला. पांच चार छपरबंद मिळोन मारामार केली. छपरबंदास ही ( पठाणानें ) कट्यारीनें जखमी केलें. सरकारवाड्यापुढें फिर्यादीस पठाण आला. प्रातःकालपासून तृतीय प्रहरपावेतों दाद लागली नाहीं. त्या रागानें आपला घोडा चारशें रुपयांचा होता त्याचे पाय मागील तोडले. तोंडावर जखम केली. घोडा पडला. पठाणास चौकींत बसविला. एक दिवस घोडा होता. हाल होऊं लागले. सरकारांतून आज्ञा होऊन जबे करविली. पठाण चौकींत आहे. काय शासन होतें न कळ. मागाहून विनंती लिहितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६५४ श्री. ( पौष शु १२–१८ जाने. )

पै ॥ छ० १५ साबान. सन तिस्सा तिसैन.

सेवेशी मोरो आपाजी परांजपे सा ॥ नमस्कार विज्ञापना. ता॥ छ० ११ साबान शुक्रवार अस्तमान. वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री कृष्णाजीपंत ढेकणे आज मुहूर्तेंकरून रास्ते याचे पेठेंत राजश्री आपाजीपंत फडणीस यांचे वाड्यांत राहिले. आज रात्रौ श्री॥ राजश्री आनंदराव दादा यांजपासी बोलोन उद्दईक स्वार होणार. श्री॥ राजश्री माधवराव रास्ते व श्री॥ राजश्री बाबासाहेब उमरजेचे मुकामीं आहेत तेथें भेटोन पुढें जाणार. श्री॥ राजश्री नानांचा निरोप प्रातःकाळीं सात घटका दिवसास घेतला. भोजनोत्तर श्री॥ राजश्री पंतप्रधान यांचा निरोप घेतला. उद्दईक चालते होतात. म॥निल्हेची माझी गांठ नानांचे वाड्यांत पडली. नानानीं आज्ञा काय केली म्हणोन पुसिलें. त्यावरून ( त्यानीं ) उत्तर केलें कीं, "तुम्हीं श्री॥ भाऊसाहेब यांजकडे जाऊन येथील विचार बोलोन ( भाऊनीं ) श्रीमंतांचे पायांजवळ लक्ष राखोन बोलोन निश्चयांत गोष्ट येईल. नंतर माझें पत्र श्रीमंतांस येईल ते समयीं सर्व बंदोबस्त करून देतों" म्हणोन श्रीमंताची आज्ञा जाहली आहे. त्याप्रमाणेंच नानानींच सांगितलेस योग्य. मंडळी घेऊन जावयाचें म॥निल्हेजवळ बोलिलों, परमाणगी होत नाहीं. जाबसाल उरकोन पाठवावा म्हणोन आज्ञा होते म्हणोन बोलिलं. उद्दईक निश्चयें निघणार. श्री॥ राजश्री बाबासाहेब यांजकडे उमरजेस पत्रें लिहून आजच रवाना केलीं. राजश्री दौलतराव शिंदे जाण्याविशीं सरकारांतून पैका द्यावयाचा करार ठरल्याचा मजकूर पेशजी विनंती लिहिली आहे. त्यास बोलीप्रमाणें आठ दिवसांअलीकडे दहा लक्ष रुपयांची निशा पटली. आज श्रीमंतांचे निरोपास आले. त्रिवर्ग श्रीमंत

---

१ नुकतेच कैदेतून सुटलेले चिंतोपंत लिमये वगैरे मंडळी.

एकत्र होते. निरोपमसयीं जवाहीर कंठी शिरपेंच व पोषाख दिला. सरकारवाड्यांतून आज्ञा घेऊन श्री॥ राजश्री नानांकडे निरोपास आले. नानांचा निरोप घेतला. नानानीं कंठी शिरपेंच व पोषाख दिला. सरकारवाड्यांत चार घटका बसले होते. नानांकडे अर्ध घटका बैठक जाहली. गोटास अस्तमानीं गेले. उदईक तीन कोसांचा मुक्काम नेमिला आहे. राजश्री आबा चिटणीस कारभार कांहींसा शिंदे यांजकडे करूं लागले आहेत. उदईक बहुता अर्थी कूच होईल असें दिसतें. याउपर न कळे. कूच करितील असें जाहल्यास फार गोष्ट उत्तम जाहली. मागाहून विनंती लिहितों. पेशजी येथील फितुराचा मजकूर राजश्री गोविंदराव काळे व राजश्री शिवरामपंत थत्ते यांस कैद केल्याचें वृत्त लिहिलेंच आहे. त्यास फितुरांतील अर्थ "श्री॥ राजश्री नाना फडणीस व राजश्री नारोपंत चक्रदेव या उभयतांस कैद करावें म्हणजे तुमचें बायांचे सरूग करून देतों. चाळीस लक्ष रुपये देतों. तुम्ही उभयतांस आमचे स्वाधीन करून जावें. सरकार दौलतीमध्यें चित्त कांहींएक घालूं नये. कूच करून हिंदुस्थानांत जावें." याजप्रमाणें बोलणें शिंदे यांजकडे लाविलें. त्याणीं बोलणें कबूल केलें, परंतु यांत कोण कोण आहेत त्यांची नांवनिशी लिहून देणें म्हणोन सांगितलें. त्याजवरून राजश्री शिवरामपंत याणीं याद लिहून दिली त्यांत सुर्धेचे नांव लिहून दिलें म्हणोन लोक बोलतात. नीळकंठराव बायांकडील वकील येथें बोलणें बोलत होता त्यास छ० ८ साबानीं शिंदे याणीं बुधवारांत कैद केला. पालखींत बसोन जात होता. मार्गींच धरिला. आपले गोटांत नेला. छ० ६ साबानीं काळे व थत्ते यांस विश्रामबागांत नजरबंदी केली. सिंहगडास काळे यांस पाठविलें. थत्ते यांस किल्ले कर्नाळा कोकणांत पनवेलीनजीक चार कोसांवर आहे तेथें पाठविलें. राजश्री गोविंदराव याणीं श्रीमंतांस निरोप पाठविला त्यावरून आचारी ब्राह्मण, वैद्य, खिजमतगार दोन असामी, व पोषाख येणेंप्रमाणें सिंहगडास पाठविलें चौकशी चालली आहे. शिंदे यांचें व बायांचें हरएकाविशीं मिटों देऊं नये, याप्रमाणें आंतून फिसालती होत्या. पुढें काय होतें ते विनंती लिहितों. राजश्री कृष्णाजीपंत यांचें बोलण्यांतील वारंवार भाव पहातां "श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडे जातों. इतका कारभार केला आहे. भाऊसाहेब याणीं मात्र मला यश यावें म्हणजे

---

१ अमृतरावाचे २. शागीर्द. फितूर अमृतरावानीं केला. श्रीमंत बाजीरावानी कांही केला नाही. मग त्यांना गुन्हेगाराची इतकी बरदास्त कां ठेवावी ?

लक्ष पुरले;' हें म्हणतात. त्यांस बहुतां प्रकारें भाव पुसत होतों, परंतु अर्थ समजों देतना, असें समजोन पुसावयाचें सोडिलें. त्यास मा। निल्हे वडिलांकडे जातात. यांजपाशीं वडिलाचे बोलणें होईल तें यथास्थित असल्यास वडील कबूल करितील. नाहीं तर कांहीं एक लढे उरकले नसतां मान्य करणार नाहींत. राजश्री पंत ढेकणे यांची गांठ पडल्यानंतर वडिलानीं यांजपासीं नेटानें बोलावें, हा विचार स्वामींचे चित्तास आल्यास सैन्यांत वडिलांस सूचना लिहिली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६५५ श्रीगणपति. ( पौष शु० १२–१८ जाने. )

पै॥ छ० १२ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष मास.

अपत्यें हरीनें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० ११ माहे साबानपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल मिरजेहून माणसें आलीं त्यांचे सांगण्यांत येलबरगें यास मोर्चे लाविले होते. गांवांतून ( गांवकरी ) बाहेर पडले. खटपट काहीं जाहली. राजश्री गोपाळपंत सोनी यांचे पायास गोळी चाटून गेली. याप्रमाणें सांगणेंत आहे. त्यास वडिलाकडे पत्रें आलीं असतील तरी सविस्तर लिहावयासी आज्ञा करावी. आमचा मुक्काम रावजींसह उंब्रजेनजीक आहे. करवीर तालुकेयांत पेंढारी आले आहेत. दहा पांच गांवच्या गुराची वळती केली हें ऐकणेंत आहे. लष्करची वगैरे बातमी काय आली आहे ती लिहावी. मोठी चिंता लागली आहे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

अपत्यें केसो सदाशिव काळे साष्टांग नमस्कार.

नं. ४६५६ श्री. ( पौष शु० १२–१८ जाने. )

छ० ११ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशी विज्ञापना. राजश्री मानसिंगराव पाटणकर शिराळ्याकडे होते ते गुरुवारीं लष्करास संवदत्तीच्या मुक्कामास येऊन पावले. लोकसुद्धां आले. वाळवें-वरची फौज पुढें आली. आणखी पुण्याहून फौज दहा हजार पर्यंत पुसेसावळी-वर आली असें वर्तमान पांढरे यांचा गडी मिरजेहून आला त्याणें सांगितलें. व यादवाड तालुक्यांतील हुणशाळ येथें राजश्री विठ्ठलराव यादवाडकर पांच हजार फौज व दोन तोफा इतक्या सरंजामानें आले म्हणून यादवाडाहून वर्त-

---

१ हरि परशुराम यांचें पत्र बाळासाहेबांस. २ रास्ते माधवराव यासह. ३ भाऊंच्या लष्करचे पेंढारी. ४ पत्र नारो हरी करंदीकर याचें करवीरकरांच्या लष्करांतून मिरजेस.

मान आलें व राजश्री महादजी शितोळे यांणीं हजारपर्यंत राऊत व प्यादा हजार पर्यंत जमाव करून चिकोडी तालुक्यांत दंगा मांडिला आहे. दहा पांच गांव लुटले व जाळले. नसलापूर पांढरे याजकडे आहे तेथें गुळें पांच चार गांवचें आहे. त्या गांवासही उपद्रव केला आहे कीं, ठाणें स्वाधीन करावें. नाहीं तर गुळें लुटितों.. याप्रमाणें शितोळे यांजकडील वर्तमान आहे. संवदत्तीच्या मुक्का-मापासून वैरणीचा अभाव आहे. पुढें नवलगुंदाकडे ही वैरणीचें तसेंच आहे. लष्कर पुढें गेल्यास निभाव पडणें कठिण आहे. काय करितात पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६५७ **श्रीसुब्रह्मण्य.** ( पौष. शु० १३–१९ जाने. )

पै॥ छ० १९ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

राजश्री गंगाधरराव दादा गोसावी यांस——

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव हिंदुराव घोरपडे. दंडवत. विनंती येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष. आमची शरीरप्रकृत यथास्थित असे. आपणाजवळ फिरंगी वैद्य आहे म्हणोन कळलें, त्यास येथपर्यंत अगत्यरूप पाठवून द्यावें. अंजन व तेल हे दोनी त्याजबरोबर देऊन पाठवावें. म्हणजे परीक्षा करून सवेंच येईल. दादा ! मजविशीं केवळ आपणास अगत्य, त्याअर्थी पत्र विशेष ल्याहावेंसें नाहीं. फिरंगीविना शरीरभावना परीक्षा करणार येथें कोणी वैद्य नाहीं यास्तव लिहिलें आहे. तर आपल्या आशीर्वादें शरीरीं उपशम जाहल्यास ( हें शरीर ) आपल्याच सेवेशीं येईल. सदैव पत्रानें चित्त संतोषवीत जावें. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे हे विनंती.

नं. ४६५८ **श्रीगजानन.** ( पौष शु० १३–१९ जाने. )

पै॥ छ० १५ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

[1]विज्ञापना ता॥ छ० १२ साबान शनिवार. अलिजाबहादर भृगुवासरीं सरकारवाड्यांत येऊन निरोप घेतला. जवाहीर वस्त्रें दिलीं. श्री॥ राजश्री नानांच्या वाड्यांत आले. तुरा शिरपेंच वस्त्रें दिली. जाणार ही वदंता आहे. वद्य पंचमीस चालते होणार. धराधर तूर्त बंद आहे. म्हैसकर मशीराची फौज आणोन करकंबें बरडोलाकडे उपद्रव करणार ही वदंता आहे. म्हैसकर मशीराकडे वकिलीस श्री॥ नानांकडून आहेत अशी अफवा आहे. खरें लटकें

---

१ कारकून बाळाजी गणेश जोशी याचें पत्र मिरजेस.

नकळे यजमानांची प्रकृति ठीक नाहीं. दोन दिवस चांगली, दोन दिवस बिघडते, ऐसें आहे खंडेराव रास्ते कैद केला नाही असेंही म्हणतात. वरकड राजश्री मोरोपंती लिहिलें असेल त्याजवरून कळेल. खाडीलकर कल्याणास गेले. सेवेसीं विदित होय हे विज्ञापना

नं. ४६५९ श्रीगणपति. ( पौष शु० १४–२० जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. राजश्री भुजंगराव घोरपडे यांचा मजकूर लिहिला तो कळला. त्यांच्या तीर्थरूपांच्या सांगण्यांत भुजंगराव यांची वर्तणूक गैरराहा दिसते. समजून करावें. ( ते ) करवीरकरांकडे जाणार असें ही आहे. पुरता शोध असावा. तिमाजी रंगो याचीं मुलें माणसें अंजनीत आहेत त्यांच्या जमीविशीं पेशजी लिहिलें होतें त्याचा जाबच नाहीं, याजकरितां हल्लीं लिहिलें असे. तर पेशजी लिहिल्याप्रमाणें करावें. रवाना छ० १३ साबान बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद

पौ॥ छ० १८ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

नं. ४६६० श्रीगणपति. ( पौ. शु० १४–२० जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. छ० ७ साबानची पत्रें पाठविलीं तीं छ० ११ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशील कलमवार.

चिरंजीव राजश्री गोविंदरावनाना यांच्या लग्नाची योजना करून वधूच्या शोधास ( कारकून ) पाठविला आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास शोधास गेले ते आलेच असतील. वधूचा निश्चय कोणाकडील हें लिहावें. लग्न नंतर करावें.

कलम १

राजश्री नारो हरि करंदीकर यांचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारी पाठविलीं आहेत. मशारनिल्हेकडून येथें ही पत्रें आलीं होतीं. करवीरकर अवरवादी जवळ मलप्रभेच्या किनाऱ्यास आहेत. नरगुंद तालुक्याची खराबी बहुतच झाली. गांवास आगी देतात.

---

१ विठ्ठलराव पांडुरंग पटवर्धन यांची · काळे व थत्ते यांनी केलेल्या फितुरांत खंडेराव रास्ते सामील होतेसें दिसतें. ३ मुली पहाण्याकरिता मिरजेहून आलेले खाडीलकर भटजी बाळ यांची मुलगी पहाण्याकरितां कल्याणास गेले. ४ पत्र परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस. तशीच पुढची दोन पत्रें.

पेंढारी अंकलीजवळ राहून करवीरकरांच्या मुलखांत स्वांऱ्या करितात, त्यास याणें मार्गास मात्र पेंच; याजकरतां त्यांस संवद्तीकडे फिरावयाविशीं पत्र पाठविलें पाहिजे, म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास पत्र पाठविलें आहे. आपणही ताकीद करावी. कलम १

चिरंजीव राजश्री रघुनाथराव दादा याणीं तेरदाळच्या वाटणीचा खटला काढून जमीदाराची जप्ती केल्याचा व त्याजविशीं आपण सांगोन पाठविलें असतां त्याणी दिगर उत्तर केल्याचा मजकूर व पुढें कसें करावें म्हणून लिहिलें तें कळलें. एशियास चीरंजीव नवा खटला करितात, आपण ऐकितात, हें काय ? कलम १

आम्ही येलबर्ग्याचा गुंता उरकला म्हणजे त्याच रोंखावर जाऊं. कलम १

मंगळवेढ्याहून चिरंजीव राजश्री कृष्णराव यांचीं पत्रें आपणास आलीं त्याच्या नकला व म्हैसकरानी चिरंजीवांस उत्तर लिहिलें त्याची नक्कल पहावयास पाठविली ती पाहिली. वर्तमान समजलें. म्हैसकरांची मुलेंमाणसें मंगळवेढ्यांत आहेत तीं तेथून काढविल्यास वाटेची निभावणी पडेल न पडेल, परगण्याभोंवतें अरिष्ट आलें आहे, म्हणोन लिहिलें तें कळलें. म्हैसकरांचीं मुलेंमाणसें काढविलींच असतील. परगण्याचा भोग आहे। कलम १

एकूण पांच कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल रवाना छ० १२ साबान. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

छ० १८ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

नं. ४६६१ श्रीगणपति. ( पौष शु० १४–२० जाने. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. राजश्री चिंतोपंत लिमये व जयरामपंत जोशी पुण्यांत रास्ते यांच्या वाड्यांत येऊन पोंषल्याचें, व हुपरीकर प्रगट होऊन भाषण केल्याचें, व राजश्री गणेशराव वाळव्याच्या बंदोबस्तास आले आहेत त्यानीं मिरंज प्रांतीं थोराताच्या नेमणुकीविशीं वगैरे उपद्रव दिल्याचें, व त्यांस आपण उत्तर दिल्याचें, व कुरलेकरांची मुलेंमाणसें पुण्यास गेल्याचें, वगैरे वर्तमान पुण्याकडील, व चतुरसिंग याणें रास्ते यांच्या गोटावर गडबड केल्याचा व माघारा निघोन गेल्याचा मजकूर लिहिला तो कळला. प्रस्तुत रास्ते यांचा मुक्काम कोठें आहे व तिक-

डील वर्तमान काय तें लिहावे. चिरंजीव राजश्री हरीपंतबावा यांचा लखोटा पावला. त्याचा जाब पाठविला आहे. त्यांजकडे रवाना करावा. चिरंजीवाचें पत्र आपणास आलेलें पाहून माघारें पाठविलें आहे. चहूंकडे शिलशिला, त्या पक्षी कांहीं सामान जवळ पाहिजे, याची उपेक्षा करूं नये, म्हणोन लिहिलें, त्यास हुशारी तितकी कामाचीच आहे. अशा कामाची उपेक्षा कोण करील ? येलबर्ग्याचें काम उरकल्यांत आलें. आतां इकडे काम दुसरें नाहीं. लवकरच कूच करून त्याच रोखें येतो. मग सारे शिलशिले आपोआप मागें सरतात. रवाना छ० १३ साबान. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

छ० १८ साबान. सन तिस्सा तिसैन पोष.

नं. ४६६२ श्री. ( पोष शु० १५--२१ जाने. )

पै॥ छ० २२ साबान. सन तिस्सा पौष

सेवेशीं बाळकृष्ण लक्ष्मण. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १४ माहे साबान पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. अलीकडे स्वामींकडून पत्रें येऊन वर्तमान कळत नाही. तरी वरचेवर लिहिणेंस आज्ञा झाली पाहिजे. यानंतर इकडील मजकूर तरी राजमंडळची फौज आलगवाडी, हाल कुसेगल, तालुके नवलगुंद येथील गुरें वगैरे नेऊन गांव लुटून हल्ली उगरगोळावरून कोणुराकडे गेले. पेशजी स्वामींची आज्ञा आली होती कीं, 'शिबंदी नेमणुकी ठेवणें' म्हणोन, परंतु अद्यापि शिलशिला मोडला असा नाहीं. नवलगुंद तालुक्यांत आले तेव्हां शिरट्टीस जवळ; याजकरितां कांहीं कुमकी शिबंदी ठेवावी लागते, यास काय आज्ञा? गोखले सडे धारवाडावर आहेत बुनगें मिश्रीकोटावर आहे. गोखल्यांचे चित्तांत आतां राजमंडळकराशीं तोंड लावावयाचा सुमार दिसत नाही राजमंडळकरांचा दम लढाई द्यावयाचा बहुत आहे. पुढें ईश्वर काय करितो पहावें. जवळ शिलशिला आला असतां शिबंदी ठेवावी लागेल स्वामीस कळावयाकरिता विनंती लिहिली आहे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचा मुक्काम येलबुरगें येथें आहे. येलबुर्ग्याचा तह जाला. एक दोन दिवसांत कूच व्हावयाचा सुमार आहे. कूच कोणते रोखें होतें तें सेवेशीं लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६६३ श्री ( पौष व० १--२२ जाने. )

पै॥ छ० १५ साबान. सन सिस्सा तिसैन पौष.

---

१ लागू. मामलेदार परगणे लक्ष्मेश्वर. २ हंगामी शिपाई ठेविलें असतील ते दूर करावे. बारमहाच्या नेमणुकीचे ठरलेले आहेत तेवढे मात्र ठेवावे.

## श. १७२० करवीरकरांशीं समेट होण्याचा मजकूर. इ.स. १७९९

सेवेसीं विज्ञापना. राजश्री बाबा काळे यांचें पत्र राजश्री बचाजीपंत यांचे नांवें इकडील जासूद काळे यांचे बरोबर दिले होते त्यांजबरोबर आलें. त्यांतील मजकूर इकडील वृत्त सविस्तर भाऊसाहेबांस निवेदन केलें. मर्जी बहुत रुष्ट. उत्तर यथास्थित होईना. दोन चार तऱ्हेचे मजकूर समजाविले. त्यास काल रात्री मात्र उत्तर जालें कीं, जें करणें ते समजोन करावें. इतकें उत्तर जालें. त्याजवरून बोलण्याचा संदर्भ बोलावा असें वाटतें. त्यास आम्ही मिरजेस जाण्याकरितां नरगुंदास येतों. तुम्ही मनोळीस यावें. आम्ही ही बोलावल्यास मनोळीस येऊं. बोलणें होऊन महाराजांस विनंती करावयाची असल्यास तुम्ही जाऊन करावी. एक दोन गोष्टींचे तोटे सोसल्यास पुढें नफा होईल. येथें फौज वीस हजार व पायदळ सात आठ हजार येणेंप्रमाणें आहे. तुम्हांकडील जासुदानी पाहिलीच आहे हेंच पत्र जोशीराव यांस दाखवावें. " एकच पत्र होतें. इतका मजकूर पत्रांत आहे. माझेही पत्रांत हाच अन्वय आहे. भाऊसाहेबानीं लिहिलें आहे कीं, येलबर्ग्यांचें ठाणें लढत आहे. सुरू ( ? ) जाले नंतर लवकर स्वारी किनूरच्या सरदेस येणार म्हणोन लिहिलें आहे. जासूद जबानी सांगत होता की एक तोफ भाऊसाहेबांकडील जायां झाली. कळावें हे विज्ञापना.

नं. ४६६४ श्री. ( पौष व० १–२२ जाने. )

पै॥ छ० १[१] साबान सन तिस्सा तिसेन. पौष.

सेवेसी विज्ञापना महाराजाचा मुक्काम मलप्रभातीरी हंपीहोळीनजीक आहे. रामदुर्गचे बारीनजीक बारीचा बंदोबस्त रामदुर्गकरी करितील यास्तव महाराजांनीं आपणाकडील तीन चारशें लोक बारीत घातले आहेत. दोन चार मुक्काम नदीवर पडावे असें आहे. नरगुंद प्रांतांत राजाज्ञा तलाव्यास जात असतात. जातां येतां गांव लागतील ते जाळतात. व मळे तळे यांची बहुत खराबी होते. प्रांत तो उजाड आहे. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. एक दोन मुक्काम येथें नदीवरच व्हावे असें आहे. हे विज्ञापना.

नं. ४६६५ श्रीगणपतिर्जयति. ( पौष व० १–२२ जाने. )

पै॥ छ० १८ साबान. सन तिस्सा तिसेन. पौष.

अपत्यें चिंतामणीनें दोन्ही कर जोडून शिर सा॥ नमस्कार विज्ञापना.

---

१ नारो हरी करंदीकर यांचें पत्र करवीरकर महाराजाचे लष्करातून बाळासाहेबांस मिरजेस २ पत्र नारो हरी करंदीकर याचे करवीरकर महाराजाच्या लष्करातून.

येथील कुशल ता॥ छ० १५ साबानपर्यंत वडिलांचे आशीर्वादें करून मु॥ येलबर्गे येथें सुखरूप असे. विशेष. वडिलीं मखदुम सांडणीस्वार याजबरोबर--

कागद कोरे

२ थोर गड्डीचे दस्ते दोन. कापूर. वजन पक्के ८८।.

१ लहान गड्डी एक. पावशेर.

३

येणेंप्रमाणें सामान पाठविलें तें पावलें. वडिलीं ऐवज मागाहून पाठवितों म्हणून लिहिलें, त्यास खर्चाची ओढ फार आहे. ऐवजाची तरतूद व्हावी. सेवेसीं विदित होय. हे विज्ञापना.

नं४६६६ श्री. ( पौष व० १–२२ जाने. )

पै॥ छ० १५ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेसी विज्ञापना. पाछापूरचें ठाणें महाराजानीं घातलें. नंतर पुण्यास पत्रें श्रीमंतांस व नानांस पाठविलीं कीं, "हुजूरची स्वारी कित्तूर प्रांतांत जावयाकरितां आली. स्वारीचा मुक्काम पाछापुरावर जाला. रात्री मामलेदार लोकसुद्धां ठाणें मोकळें टाकून गेला. सरकारचें ठाणें मोकळें पडलें यास्तव ठाणें घालणें प्राप्त. आपणास कोणी वाका व गैरवाका लिहून पाठवितील याजकरितां लिहिलें आहे." ( तीं ) पत्रें राजश्री बळवंतराव खांडेकर यांणीं श्रीमंतांत प्रविष्ट केलीं. श्रीमंतानी नानांकडे लावून दिलीं. पत्रें सरकारचीं व आपलीं अवलोकन करून खांडेकर याजवळ ( नानानीं ) उत्तर केलें कीं, "सरकारच्या ठाण्यास दुसरे कोणी उपसर्ग दिला असल्यास महाराजानीं कुमक करावी, तें एकीकडे राहून महाराजच सरकारची ठाणीं घालावयास लागले ! हा वाका, आणि मामलेदार लिहितील तो गैरवाका ! असा मजकूर असोन पत्रें पाठवितात हेंच आश्चर्य आहे. असो. चिंता काय आहे ! महाराजांचे मर्जीस येईल तें करोत" याप्रों उत्तर जालें व पत्रांतही हाच अन्वय आहे. व श्री॥ राजश्री भाऊसाहेबांस सरकारांतून वस्त्रें व जवाहीर व पूर्ववत प्रमाणें बंदोबस्त होऊन सरंजाम जाला व मंडळी सुटली त्यांस बहुमान करून रवानगी केली; हे वर्तमानाची येथें खातरजमा नव्हती. परंतु हल्लीं खांडेकर यांणीं सदरहू वर्तमान लिहिलें आहे त्याजवरून खातरजमा जाली. कळावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. मुजफरखान बायांकडील मृत्यु पावला व लखबा लाड यांणीं उज्जनीचे ठाणें बायांकडून घातलें तें हल्लीं अंबोजी इंगळे यांणीं

१ नारो हरी करंदीकर याचे पत्र करवीरकर महाराजाचे लष्करातून.

शिंदे यांच्या निसबर्तानें घातलें. बायांची तूर्त उत्कर्षता नाही. शिंदे लौकरच हिंदुस्थानांत जाणार. गिलच्या दिल्लीवर चढाई करून आला हें वर्तमान येथें आहे. या पत्रांतील वर्तमानाची पत्रें विसावे रजबचीं आहेत. कळावें. हे विज्ञापना.

नं ४६६७ श्रीगजानन. ( पौष व० १-२२ जाने. )

पै॥ छ० १५ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

विज्ञापना तागायत छ०१५ साबान मंगळवार श्री मंत यजमानांच्या दुखण्याची प्रकृत तर वैद्याचे औषधास चार रोज गुण येतो. चार रोज प्रकृत बिघडते. क्षयाची भावना म्हणतात. त्यास कोंकणांत राजश्री सदाशिवभट लागवणकर म्हणोन आहे तो औषध चांगलें देतो. चिकित्सक चांगला त्यास त्याजकडे पत्र पाठवून तो येत असल्यास उत्तम. किंवा येत नाही हा शोध आणवून लिहावयास आज्ञा केली पाहिजे. नाशिकचा वैद्य अद्याप आला नाहीं. श्रीमंतांस किंचित् भ्रांत ही पडते. असा प्रकार दुखण्याचा आहे. कळावेंकरितां विनंती लिहिली आहे वेदमूर्ति शिवरामभट इसलामपुरकरांचे चिरंजीव ही चिकित्सक आहेत एकूण चार वैद्य मिळवून चांगलें औषध देविलें पाहिजे. सेवेसी विदित होय. हे विज्ञापना.

नं. ४६६८ श्री. ( पौष व० १-२२ जाने. )

सेवेशी विज्ञापना. काल बुधवारी तिसरे प्रहरी हंपीहोळीच्या मुक्कामानें नवलगुंदास स्वारी जावयाचा निश्चय जाला. पुढे राजाज्ञा यांस जावयासी सांगितलें. मागून हुजूरची स्वारी जावी असा बेत जाला. राजाज्ञा निघोन चालले तों बरोबर दोनशें पर्यंत राऊत निघाले वरकड कोणी निघेनात. हुजूरची ही स्वारी डेऱ्यापासून पावकोशावर गेली तेथें राजश्री धोंडोपंत गोखले मोरबेस आल्याची बातमी आली याजमुळें नवलगुंदास जावयाची मसलत राहिली. खर्चाच्या गवगव्यामुळें लोकांस चार वेळ ताकीद जाली तत्राप तयार होत नाहीत ! गोखले नरगुंदास येणार असें आहे. नरगुंदास आलेवर मलप्रभेवर महाराजांचा मुकाम ठरेल असें दिसत नाहीं. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं.४६६९ श्रीगणपतिर्जयति ( पौष व० १-२२ जाने. )

पै॥ छ० १८ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

---

१ बाळाजी गणेश जोशी कारकून याचें पुण्याहून पत्र. २ विठ्ठलराव बापू यांची. ३ नारो हरी करंदीकर यांचें पत्र करवीरकर महाराजांचे लष्करांतून.

अपत्यें चिंतामणीनें दोनी कर जोडून शिरसाा नमस्कार विज्ञापन यथील कुशल ता॥ छ० १५ माहे साबानपर्यंत वडिलांचे आशीर्वादेंकरून मु॥येलबर्गे येथें सुखरूप असे. विशेष. वडिलीं छ० ७ साबानचें पत्र पाठविलें ते छ० १२ साबानीं पावलें. "करवीरकर महाराज सवदत्ती मनगोळीची बारीपार होऊन गोखले याजवर जाणार" म्हणोन लिहिलें, व "रास्ते फौजेंत येऊन अवसान बसलें, व चि॥ राजश्री बाबा तिकडे गेले असतील. नबाबाकडील फौज मंगळवेढेनजीक भंडारकवठेवर आली आहे" म्हणोन लिहिलें, व "चि॥ राजश्री नानासाहेबांचे लग्नाची योजना आहे निश्चय जाहलेवर लिहितों," म्हणोन आशीर्वादपत्री लिहिलें, त्याजवरून संतोष जाला. असेंच सदैव पत्री सांभाळ केला पाहिजे. इकडील वर्तमान काल इंदुवारीं सायंकाळीं चार घटका दिवसास वडिलानीं कूच करून येलबर्गेच्या पश्चिमेस पाव कोसावर मुक्काम जाला. मोर्चेही उठले. खंडणीवर जाबसाल उरकला. करवीरकर यांची फौज बागलकोट तालुकियांत आहे. राजश्री धोंडोपंत धारवाडास आहेत. पुढें वडिलांची स्वारी कोणत्या गेसें जाते पहावें. वरकड सर्व मजकूर वडिलांच्या पत्रावरून विदित होईल. वडिलीं रविसंक्रमणाचे तिल शर्करा( युक्त ) पाठविले ते छ० १४ साबानीं पावले सेवेसी विदित होय हे विज्ञापना.

नं ४६७० श्री. ( पौष व० १–२२ जाने. )

पै॥ छ० १९ साबान तिस्सा तिसैन पौष.

विज्ञापना. तागायत छ० १५ साबान. सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ० १३ साबानीं श्री॥ राजश्री नानानीं जनार्दन शिवाजी म्हैसकर याजविशीं सांगितलें की " म्हैसकर याजकडे तुमचे पंधरा हजार रुपये होते ते तुम्हीं घेतले. हल्लीं त्याच्या मुलामाणसांस नानाप्रकारें उपद्रव लाविला आहे. पंधरा हजार रुपयेपावेतों त्याची चीजवस्त जप्त केली. हल्लीं बाबूराव यांस किल्यांत ठेविला. पागेंत ठेविलें आहे. हें काय ? तुमचे ( ते ) शरीरसंबंधी. त्यांच्या अवस्था याप्रकारच्या तुम्हीं केल्या हें चांगलें की काय ? त्यास याचा जाबसाल सांगणें. त्यावरून उत्तर केलें कीं " पंधरा हजार रुपये घेतले नसतील. जे तफावत करून आपणांस ऐवज दिल्हा म्हणोन सांगोन ऐवज मध्येंच तफावत केली त्याविशींची आज्ञा राजश्री बाळकृष्णपंत यांस जाहली कीं, ऐवज आम्हीं घेतला नाहीं. त्यावरून जो ऐवज त्याणीं मध्यें तफावत करून ठेविला होता तितका मात्र घेतला. हल्लीं बाबूराव किल्यांत

---

१ पत्र मोरो आपाजी परांजपे याचें बाळासाहेबास. तसेंच पुढच्या नंबरचें.

मोकळे आहेत. तसदी नाहीं. वरकड त्याणी जीं कर्मे केली आहेत, आम्हांस सर्वप्रकारें पेचांत आणावें याप्रमाणें करीत होते, त्या प्रकरणीं उभयतांचे दस्तऐवज आहेत. आपण पाहिले असतां त्यांचें मुखावलोकन करणार नाही! याप्रमाणें मला यजमानानी सांगितलें आहे." त्यावरून "त्याचे काय दस्तऐवज आहेत ते दाखविणें" म्हणोन बोलले आहेत. त्यास येविशीं आज्ञा काय ? कांहीं दस्तऐवज दाखवावे ऐसें असल्यास तेथें जें पत्र आहे त्याची नक्कल पाठविली पाहिजे. अथवा आज्ञा काय तें लिहिलें पाहिजे. त्याप्रमाणें येथें बोलोन उत्तर होईल ते विनंती लिहितों. जनार्दनपंत याणी मोठा प्रत्न मांडिला आहे. राजश्री दाजीबा लिमये येथें आले आहेत त्याणी सांगितलें की, "राजश्री चिंतोपंत लिमये यांची मुलें माणसं मंगळवेढ्यांत आहेत. तीं आमचे स्वाधीन करावीं म्हणोन जनार्दनपंत याणी पत्र मंगळवेढ्यास पाठविलें आहे ! त्यास हा मजकूर श्री॥ राजश्री बाळासाहेब यांस लिहून पाठविणें." त्यावरून विनंती लिहिली आहे. मंगळवेढें ठाणेंयांत शेंपन्नास प्यादे जाजती मिरजेहून लौकर रवाना जाले पाहिजेत. म्हैसकर याचीं पत्रें मंगळवेढेयांस त्यांचे घरीं येतात. घरचीं पत्रें त्यांजकडे नेहमीं जात असतात. त्या तेथें चौकी पहारा चांगला असावा. त्यांचें माणूस बाहेर जाऊं देऊं नये. बाहेरून आंत येऊं नये. श्री॥ राजश्री कृष्णरावजी याणी कारकून नेहमीं तेथें ठेवावा. काय लागेल तें द्यावें. याची बंदोबस्ती बहुत जाली पाहिजे. याउपर विनातावाखेरीज सांधत नाहीं. जनार्दनपंत परगणा खराब करणार. ( म्हणोन ) वाडिली लिहिलें तें कळलें. याउपर श्री॥ राजश्री नानांस स्पष्ट विनंती करितों. जनार्दनपंतांनी लिहिल्यावरून परगणा खराब नबाबाकडील फौजेनें करावा याप्रमाणेंच मर्जी असल्यास विदित पुन्हा करीत नाहीं म्हणोन ( नानांस ) सांगतों. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४६७१　　श्री.　　( पौष व० १-२२ जाने )

पै॥ छ० १९ साबान. तिस्सा तिसैन. पौष.

सेवेंशी विज्ञापना. तागायत छ० १५ साबान भौमवार प्रातःकाळ सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री दौलतराव शिंदे यांचा करारमदार पैका द्यावयाचा सरकारांतून ठरला. शिंदे याणीं कूच करून जावें याप्रमाणें पेशजी विनंती लिहिली आहे. हल्लीं शिंदे यांस पैका दहा लक्ष सावकारी निशा जाहली. राजश्री शिंदे याणी सरकारचा निरोप शुक्रवारी

१ मोरो आपाजी पराजपे याचे पत्र मिरजेस बाळासाहेबांस पुण्याहून.

घेतला. निरोपसमयीं पोषाख व शिरपेंच कंठी दिली. त्याप्रमाणें नानानीं दिल्हें. मंदवारीं कूच करून तीन कोशांवर ××××× खेडेंयावर मुक्काम केला. रविवारीं एक कंपू शिंदे यांजपाशीं गेला. एक मागें राहिला आहे. पुण्यापासून आठ कोशांवर जाऊन पंधरा दिवस रहावें याप्रमाणें करार आहे. 'माघ शु॥ प्रतिपदा अथवा द्वितीयेस सडे येऊन निरोपाचे विडे घ्यावे. तूर्त निरोप दिला आहे, परंतु मध्यें अस्त आहे. अस्त सरल्यानंतर फिरोन सड येऊन विडे घेऊन जावें,' याप्रमाणें करारांत आहे. तूर्त सरकारांतून बहुमान थोडका जाला. पुढें देणें तें माघ शुद्धांत देऊन रवानगी होणार. तूर्त पैका दहा लक्ष पटला. आणखी पैका द्यावयाचा आहे तोही तरतूद होतच आहे. शिंदे जातात ऐसें श्री॥ राजश्री नानांचें म्हणणें खचित आहे. बाजार बातमी पैका मात्र निघावा हा मजकूर आहे ! शिंदे जात नाहीं हेंही लोक बोलतात. पुढें एक दोन दिवसांत कवडीस मुक्काम जाणार. राजश्री आबा चिटणीस यांणीं बायांकडे बोलावयास पाठविलें होतें तिकडून बोलणें समेट व्हावा ऐसें लौकिकांत लोक बोलतात. एक मजल बाया माघाऱ्या आलियाचें वर्तमान आहे. मागाहून होईल तें विनंतीपत्रीं लिहितों. पेशजी फितुराप्रकरणींचा मजकूर लिहिला आहे त्याअलीकडे कोणास कैद केलें नाहीं व फारशी चौकशीही नाही सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

नं. ४६७२ श्री. (पौष व० १–२२ जाने.)

पै॥ छ० १५ साबान. तिस्सा तिसैन. पौष

सेवेशीं विज्ञापना. नवलगुंदाकडे जावयाची मसलत व्हावयाचें कारण त्या प्रांतीं चाऱ्याचा व पाण्याचा अभाव व महाराजांची कीर्त ऐकोन तालुक उजाड जाले[1] नवलगुंदच्या ठाण्यांत प्यादे वगैरे बंदोबस्त आहे. दोन चार रोज शह पडल्यास गोखले धारवाडनजीकच आहेत. आणि ठाणें घातल्यानें बंदोबस्त रहातो असाही अर्थ नाहीं इतके अंदेशे चित्तांत आणून तिकडे जावयाचा मनसबा मोडला. हल्लीं दोन तीन मसलती चालल्या आहेत. माचनूरचें ठाणें महाराव यांजकडे आहे. हल्लीं शंकराजी घोरपडे यांजकडे यावें असें राजश्री तिमापा निसबत राजश्री दौलतराव हिंदुराव हे बोलतात परंतु जातांच ठाणें येतें असें नाहीं शहास गुंतावें तर श्री॥ राजश्री भाऊसाहेबांकडील फौज येलबर्ग्यावर आहे. तेव्हां शहास गुंतणें ठीक नव्हे. एक दोन

१ करवीकराच्या लष्करांतून नारो हरि कर्दीकर यांचें पत्र बाळासाहेबास. २ घोरपडे मधोळकर. ३ घोरपडे गजेंद्रगडकर.

राजांत हल्ला करून कडनिकडीनें घ्यावें तर फौजेंत खर्चाची ओढ भारी. तेव्हां लोक हल्ला करीत नाहींत. याजमुळें माचनुराकडे जावयाचा अभाव दिसतो. बागलकोटाकडे जाणार. तिकडे गेलेवर आणखी आसमंतात भागीं कोणाकोणास उपसर्ग लागतो पहावें. फिरते वेळेस माचनूर, जमखिंडी तेरदाळ प्रांतांतून करवीरास जावें असें म्हणतात. वाळवेंकडे गणेशराव आहेत. अंकलीस शितोळे यांणीं जमाव करून चिकोडी तालुक्यांत दंगा मांडिला आहे. चहूंकडे फौजा जमत चालल्या. यास्तव करवीरासच जावें अशीही मसलत घाटत आहे. कोणती सिद्ध होते पहावी. जसें आढळेल तसें सेवेशी लिहून पाठवीन. एक दोन मुक्काम मलप्रभेवरच व्हावे असें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४६७३  श्रीगणपति  ( पौष व० ३—२४ जाने. )

'चि॥ राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. छ०९ साबानचीं पत्रें पाठविलीं तीं छ० १४ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशील. कलमवार.

राजश्री नाना यांचें पत्र आम्हांस आलेलें पाठविलें तें पावलें. त्याचा जाब पाठविला आहे. तसेंच राजश्री बाळकृष्णपंत बाळ यांचें उत्तर पाठविलें आहे. राजश्री मोगे आपाजी यांचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. त्यांतील आशय समजला.  कलम १.

"शिंदे यांच्या बाया कर्नाटकांत आपल्याकडे येतात. त्यांजकडे कारकून ( आपणाकडून ) गेला असें ऐकण्यांत येतें. भागानगराकडील वर्तमान काय तें लिहावें" म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐसीयास शिंदे यांच्या बाया आम्हांकडे येतात ही गोष्ट बातल व येथील कारकूनही गेला नाहीं. भागानगरचें वर्तमान विशेष कांहीं नाहीं. जमीयत सरंजाम इंग्रजाच्या मदतीस रवाना जाला अशी खबर आहे गुरमकोंड्यानजीक गेला.  कलम १.

"चि॥ राजश्री चिंतामणराव आपा कर्नाटकचे महालकरी याजवळ ऐवज मागतात त्यांस मागों नये असें सांगितलें पाहिजे," म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशीयास आपलें पत्र यावयाच्या पूर्वी कांहीं ऐवज घेतला व आणखी मागतात. काय सांगावें?  कलम १.

चि॥ राजश्री कृष्णराव यांचीं पत्रें मंगळवेढ्याहून ( व ) रा॥ भगवंतराव वहिरव यांचीं पत्रें करकंबाहून आलेलीं पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. "वरातेच्या ऐवजासाठीं परगण्याची खराबी होते. राजश्री

१ पत्र परशुराम भाऊचें

नाना यांस लिहिलें असतां मनाईचा सुमार दिसत नाही. कसें करावें?" म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशीयास वत्सासारखें पहावें (?) इलाज काय? दाब राखोन करणें तें करावें. परगण्याचा बचाव व्हावा. गरम नरम पहावें.
कलम १.

चिरंजीव राजश्री हरिपंत बाबा यांजकडून पत्रें आलेलीं पाठविलीं तीं पावलीं. त्यांचीं उत्तरें त्यांजकडील जोडीबराबर दिलीं आहेत. "राजश्री चिंतोपंत लिमये व जयरामपंत जोशी पुण्यांत रास्ते यांच्या वाड्यांत आले. सहस्रबुद्धे यावयाचे आहेत." म्हणोन व लिमये यांचा नमस्कार लिहिला तो पावला.
कलम १.

येलबुर्ग्याचा गुंता उरकोन छ० १५ साबानीं तेथून कूच करून कुकनूरच्या नजीक आलों हळू हळू दरकूच गदगच्या मार्गे करवीरकरांच्या रोखावर येत आहों.
कलम १.

करवीरकरांच्या लष्करांत बातमी असावी म्हणून लिहिलें तें कळलें. बातमीस माणसें ठेविलीं आहेत.
कलम १.

एकूण सात कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल रवाना छ० १७ साबान. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पे॥ २३ साबान सन तिस्सा. पौष वा॥ ९ सौम्यवासर.

नं ४६७४ श्री. ( पौष व० ३-२४ जाने. )

पे॥ छ० २३ साबान. सन तिस्सा तिसैन पौष

सेवेशीं विज्ञापना तागायत छ० १७ साबान गुरुवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजीचे पत्रीं शिंदे कूच करून तीन कोसांवर गेले म्हणून लिहिलें आहे. त्यास मांजरीवर शिंदे तीन कोसांवर गेले. एक कंपू तेथें गेला दुसरा ही कंपू आज उद्यां जाणार. लष्करची तयारी निघावयाची जाहली शिंदे जातात असें दिसोन येतें. सरकारांतून पैक्याचा ठराव केला तोही भरणा होत चालला. राजश्री आबा चिटणीस आल्यापासून फार करून लुच्यांच्या चाली होत्या त्या कमी जाहल्या. शिंदे यांस हिंदुस्थानांत लवकर जाण्याचें काम. तिकडे शहाचे फौजेनें दंगा मांडिला. दिल्लीसमीप फौजा आल्या. मोठा पायबंद त्यांस तिकडे लागला आहे. सहसा गोष्टींनीं जातातसें दिसतें. लोक कोणी जात नाही हें ही म्हणतात. माघशुद्धांत फिरोन श्रीमंतांचें दर्शन घेऊन बहुमान वगैरे काय देणें तो देऊन विदे

१ मोगे आपाजी परांजपे यांचें पत्र पुण्याहून मिरजेस.

घ्यावे, निरोप घेऊन जावें, या प्रमाणें ठरलें आहे. तों पावेतों पुण्यापासून आठ दहा कोसांवर जाऊन रहावें, जाण्याचा सरंजाम करावा, याप्रमाणें करारांत आलें आहे. एकदोन दिवसांत कूच करून पुढें कवडीस अथवा कोरेगांवास जाणार. याप्रमाणें तहकीक आहे. कंपूमध्यें व लष्करांत जाण्याची तयारी होत आहे त्या अर्थी जातील असें दिसतें. आजचा मुक्काम मांजरीस आहे. पुढें कूच करून गेल्यानंतर विनंती लिहितों. बायांचें हरतऱ्हेनें मिटावें येविशी आबा चिटणीस याणी खटपट मांडिली आहे. आपले भाचे यांस बायांकडे पाठविलें होतें. एक वेळ बोलोन आले. फिरोन तिकडे पाठविले आहेत. बायानीं प्रांताची खराबी केली तें पत्रीं लिहितां येत नाही. नाशकाकडे हजार पठाण गेले आहेत. नाशिकापासून सहा लक्ष रुपये खंडणी मागतात. मोठा प्रळय त्याणीं केला आहे. मार्ग चालत नाही. पुढें आढळेल तें विनंती पत्रीं लिहोन पाठवितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६७५  श्री. ( पौष व० ३–२४ जानेवारी. )

छ० २३ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

[1]सेवेशीं बाळाजी दामोदर व गणेशराम पेठे दोन्ही कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १७ साबान मुक्काम लष्कर सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील मजकूर येलबर्गे येथील मोर्चे छ० १४ साबानी सायंकाळीं सूर्य अस्तमान झाला त्या समयीं उठले तोफाही त्याच समयीं गांवाजवळून माघाऱ्या आणून लागलेंच कूच अदकोसाचें जाहलें. त्यासमयीं सरंजामसुद्धां तोफा मुक्कामास सहा घटका रात्रीं आल्या. खंडणीचा मजकूर तीस हजार नक्त व + चार या प्रमाणें दिलें व गुरें घोडीं वगैरे येलबर्गेकरांनीं नेलीं होतीं तीं झाडून सोडून दिलीं. गजेंद्रगडाहून तोफ आणिली ती स्वारीबरोबरच आहे. त्या तोफेचे गोळ आणखी आणविले आहेत. येलबर्गे येथें दारूगोळा खर्च दारू वजन पक्के पावणे एकुणीस मण पांच शेर व गोळे सुमार दोनशें सत्याहत्तर याप्रमाणें खर्च झाला. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६७६  श्री. ( पौष व० ३–२४ जान. )

पै॥ छ० २३ साबान. सन तिस्सा. पौष.

सेवेशीं विनंती. सेवक गोविंद शामराव साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० १७ साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित

---

१ पत्र बाळासाहेबांस.

असे. विशेष श्रीमंत येलबुरगें याची खंडणी घेऊन सावनूर तालुक्यांत जावें असा बेत ठरवून कूच करून चालले. श्रीमंत राजश्री आपासाहेब व दाजीसाहेब व विठ्ठलराव बाबा व हरीपंत धायगुडे असे एकंदर श्रीमंतांबरोबरच आहेत स्वामीस कळावेंकरितां विनंती लिहिली आहे. येलबुरगें याची खंडणी तीस हजार रुपये ठरवून दोन गांव वीस हजार रुपयेंत गहाण घतले बाकी दहा हजार रुपयेची निशा थोंडोपंत बापू यांची घेतली कहींची घोडी व गुरें व गवळी यांच्या म्हशी वगैरे जें नेलें होतें तें सोडून दिलें. करवीरकर रामदुर्गानजीक आहेत बागलकोट तालुकियांत दंगा करावा असें वर्तमान आलें आहे. रास्ते याजकडील वे॥ राजश्री बाबूभट व राजश्री लक्ष्मणपंत बाबा फडणीस गेले म्हणोन पेशजी स्वामींस लिहिलें होतें, त्यास सातारियाकडील वर्तमान चतरसिंग यानीं दंगा केला म्हणोन स्वामींनीं लिहिलें होतें; तें वर्तमान त्यांस कळल्यावर मशारनिल्हे राहिले. पूर्वेकडे तिमराव पारसनीस गेले ते अद्यापि आले नाहींत. [1]...... ...................... ..... सेवेशी विदित होय हे विज्ञापना.

नं. ४६७७ श्रीगणराज. ( पौष व० ३–२४ जाने. )

पे॥ छ० १७ साबान. तिस्सा तिसैन. पौषमास.

विज्ञापना. [3]वाडीहून समस्त ब्रह्मवृंद निघोन आज[4]यांस आले. तेथून पाच ब्राह्मण वडिलांस पत्र व मला पत्र घेऊन आले ते हली वडिलांकडे आले आहेत. ही गोष्ट अघटित झाली आहे त्यास या गोष्टीचा साभिमान धरल्याखरीज ब्राह्मणांचा निर्वाह नाहीं. न धरलिया स्थलभ्रष्ट होतात यांत गुता नाहीं. सर्व प्रकारें बंदोबस्त जाहला पाहिजे. रवाना छ० १६ साबान. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ४६७८ श्री. ( पौष व० ५–२६ जानेवारी. )

पे॥ छ० २१ साबान. सन तिस्सा पौष.

सेवेशीं विज्ञापना. बटकुरकीहून काल भृगुवारीं भोजन करून लष्कर[5]चें कूच होऊन घटप्रभातीरीं मौजे जमगी व मुदापूर तालुके मुधोळ येथें

---

१ येथें लष्करच्या धारणीचे भाव लिहिले आहेत तो मजकूर गाळला आहे २ रघुनाथराव कुरुंदवाडकर यांचें स्वदस्तुरचें पत्र बाळासाहेबांस. ३ सावंतवाडीहून. ३ तुम्हांस. ४ पत्र नारो हरी करंदीकर याचे करवीरकरांचे लष्करांतून मिरजेस. तसेंच पुढच्या नंबरचें.

मुक्काम झाला. राजश्री महाराव घोरपडे यांजकडील कारकून राजश्री शेषगीरपंत घासदाण्याचा जाबसाल बोलावयास आले. त्यास गुदस्तां महाराव चाकरी आले होते. सालमजकुरीं आले नाहींत. " माचनूर तुम्हांस गुदस्तां दिलें असतां ( तुम्ही ) मवासगिरी करावी कीं काय ? त्यास माचनूरचा किल्ला सोडून देणें. नाहीं तर आम्हीं घेतों. व घासदाण्याचा जाबसाल बोलावा. नाहींतर तालुका खराब होईल. व चाकरीस यावें. हें महाराजांचें बोलणें ऐकोन मशारनिल्हे महाराव यांजकडे काल भृगुवारी रात्रौ गेले. आज मंद-वारीं सायंकाळपावेतों ( त्यांनीं ) याच मुक्कामीं यावें असा करार आहे. मुधोळ तालुक्यांतील गुळें जालें नाहीं. मुक्कामनजीकचे गाव थोडे बहुत ( या लष्करानें ) लुटोन नेले. महाराव यांजकडील घासदाण्याचा जाबसाल उरकल्यावर बागलकोटाकडे जावें असा एक मनसबा आहे. व येथील जाबसाल उरकणेंत आलेवर येथून माघारें फिरावें, जमखिंडी तेरदळ कृष्णातीरानें जावें, असेंही आहे. अद्याप दोहींतून एकही निश्चय नाहीं. जसें ठरेल तसें सेवेशीं लिहून पाठवीन. हे विज्ञापना.

नं. ४६७९ श्री. (पौष व० ५–२६ जानेवारी.)

पै॥ छ० २१ साबान. सन तिस्सा. पौष.

सेवेशीं विज्ञापना. मुधोळकरांकडील घासदाण्याचा जाब सालमजकूर घासदाणा देऊं नये. राजश्री महाराव याणी भेटीस यावें व राजश्री मालोजी घोरपडे यांचे स्त्रीनें भेटीस यावें, असा ( मुधोळकरांचा ) भाव आहे. त्यास इकडील उत्तर झालें कीं महाराव याणीं घासदाण्याचा जाबसाल उरकून यावें. बाईनें यावें, तर करवीरास जावें. तेथें त्याणी बोलावें. बायकांनीं आम्हांजवळ बोलणें काय आहे ? असें उत्तर झालें. पुढें काय होतें पहावें. होसकोटच्यास अथवा माचनुरास जावें, तर दोन्हीं ठाणी बळकट. यास्तव महालिंगपुरास अथवा मुधोळास जरब द्यावी असा बेत आहे. उदईक रविवारी कूच होणार असें आहे. बागलकोट तालुक्यांत रोखे लिहिले आहेत. रवाना होणार. आज राजश्री नारायणराव पाटणकर बागलकोट तालुक्यांत एक दोन गांवांस जाऊन वेढा देऊन बसणार, म्हणजे सहजच गांवचें बोलणें लागेल, असा बेत करून आजच जाणार. कळावें. मागाहून सविस्तर लिहितों. कळावें सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६८० श्री. ( पौष व० ५–२६ जाने. )

छ० २१ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशी विज्ञापना. राजश्री राजाज्ञा नवलगुंदाकडे संवदत्ताच्या मुक्कामनें गेले होते. त्यास हंचनाळाजवळ जाऊन उभे राहिले. हंचनाळास वीस पंचवीस प्यादे ठाण्यांत होते ते निघोन गेले. ठाणें राजाज्ञा याणी घातलें. तेथून नवलगुंदाकडे निघोन गेले. नवलगुंदच्या अलीकडे अडीच कोस तीन कोस राजाज्ञा उभे राहून राजश्री विश्वासराव सर्ज्याराव घाटगे पुढे तलाव्यास शेंदोनशें राऊतांनिशीं गेले. तों नवलगुंदाहून बैल चारशें भरताड सुपारी व मिरीं हावेरीकडून भरून आलेले सांगोलेंकर व कासेगांवकर व पंढरपूरकर सोलापूरकर ( वाणी यांचे ) होते. राऊत पाहून ओढ्यांत वाणी बैलसुद्धां दबून राहिले. बैलांवर निशाणें होती तीं घाटगे यांणी पाहिलीं आणि तर्क केला कीं, निशाणें दिसतात तेव्हा फौज गावल्याची अथवा कोणाची तरी आली ! असें समजून राजाज्ञा यांजकडे सांगोन पाठविलें. तों राजाज्ञांची भोजनाची तयारी होत होती तीं भाडी लवंडून देऊन तसेच घोड्यावर बसून आपले निसबत लोक व पागा वगैरे पांचशें लोकांनिशीं तेथून निघोन माघारे हंचनाळास आले. पांढरे व कदम व पवार हे बोलले कीं फौजेची आवई आल्यास पुढें जावें ते माघारे जातात हें काय ? असें म्हणाले: आणि त्रिवर्ग आपले लोकसुद्धां तेथेंच राहिले तों इतक्यात वाण्यांचे बैल म्हणोन दुसरी बातमी आली घाटगे याणीं चारशें बैल लुटून आणिले नंतर हंचनाळाहून राजाज्ञा आणखी पांढरे वगैरे होते तेथें आले सर्वांच्या मतें नवलगुंदास जावयास सिद्ध होऊन आलों. त्यास नाना काय जावें काय म्हणतात हें समजेल, नंतर माघारे जावें; असें सांगत असता ते न एकोन लष्करास माघारे जावयाची मसलत करून गुरुवारी रात्रीं लष्करास नवदत्ताच्या मुक्कामीं आले. नवलगुंद बैल आणिले तेथून दीड कोस राहिले होते या-प्रमाणें वर्तमान झालें दोन रोजांत एक बेल भोजन ! सार फौज सुद्धां राजाज्ञांसही सदरहूप्रमाणेंच जाहलें. घाटग्यांस मात्र दहा बारा हजारांचा विषय मिळाला. वरकड गेले तसे आले. कळावे सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६८१ श्री ( पौष व० ५—२८ जाने )

पै॥ छ० १९ साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

विनंती विशेष पुण्याचें पत्र आलें, आज पांचवा दिवस, ते पहावयास पाठविलें आहे. पाहून परतून पाठवावें. आणखी एक पत्र तीन दिवस जाले,

१ नारो हरी करंदीकराचे पत्र करवीरकराचे लष्करातून मिरजेस २ नारो हरी करंदीकर याचे पत्र करवीराहून मिरजेस

आलें त्यांत लिहिलें होतें जे, श्री॥ राजश्री नानांजवळ आत्माराम शेणवी बालप्यारा करवीरकरांकडून होता. त्यास नानांनीं ताकीद जहाली जे, “आजपर्यंत तुम्हीं आवाडाव केली ते बरीच. इतक्याउपर तिकडील बोभाट आला अथवा करवीरास न येतां दरम्यान महाराज राहिले असतां श्रीमंतांस राग येऊन बरें होणार नाहीं. शिंदेही गेले येथील गोंधळ तुटला. मग माझ्यानें आवरणार नाहीं. आजपर्यंत मिळविलें तें गमावाल. परिणाम पहावा.” त्याजवरून आत्माराम बावा म्हणोन होता त्याणें करार केला जे, आज्ञेप्रमाणें मी जाऊन ( महाराजांस ) परतून आणवितों. तो करवीरास ही आला असें चार दिवस ऐकत होतों आज करवीरवासी रामदुर्गावरून परतून येऊन दरकूच करवीरास आले म्हणतात. त्याजवरून तेथील लिहिणेंस गांठ पडली असें दिसतें. न होऊन दुसरी निकट दिसत नाहीं. दुसरें, लष्करांत लोक नाहींते, राजश्री भाऊंनीं फितविले, विलग पडले, यास्तव आले, असें येथें सांगतात. दोनी भाव आपणास कळावयाचे तेव्हां पक्कें समजेल. कृपा करावी हे विनंती.

नं. ४६८२ ( पौष व. ५–२६ जाने. )

मोरो आपाजी परांजपे याचें पत्र पुण्याहून मिरजेस. पौ॥ छ० १९ साबानचें.

भाऊसाहेब यांचा मुक्काम येलपर्गे याजवर आहे करवीरवासी महाराजांचा मुक्काम मोदगेयावर आहे. हात फावेल तेथवर स्वाऱ्या शिकाऱ्या करितात ” म्हणोन आपण लिहिलें तें वर्तमान श्री॥ राजश्री नानांस विदित केलें “ फौज इकडे यावयाविशीं फार सांगणें वारंवार होतें, त्यास फौज इकडे आली असतां तिकडे स्थीत रहाणार नाहीं ” ( असें बोललों. ) पुनः विचारलें असतां “ फौज तिकडून आली असतां प्रांताची स्थीत रहाणार नाहीं. सरकारचा ( मिरज ) किल्ला नामी स्वाधीन आहे. करवीरवासी महाराजांची फौज श्रीकृष्णापार स्वांऱ्याशिकाऱ्या नित्य करितात ” याप्रमाणें विनंती करावयास लिहिलें आहे म्हणून बोलतों. ”

नं. ४६८३ श्री. ( पौष व० ६–२६ जानेवारी )

पौ॥ छ० १९ साबान. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं विज्ञापना. स्वामीचीं पत्रें छ० ५ साबानचीं आलीं तीं पावलीं. त्या पत्रा करवीरवासी यांचा मुक्काम मलप्रभातीरीं येकुंडीवर आहे. पुढें पुढें जाणार असें आहे, अथवा माघारें मुधोळ जमखिंडीकडे येणार असें आहे. हें वर्तमान श्री॥ राजश्री नानांस विदित केलें. अलीकडे वडिलांचीं पत्रें छ० १०

१ मोरो आपाजी परांजपे याचे पुण्याहून मिरजेस पत्र.

## श. १७२० परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

साबानचीं आली त्यांत करवीरवासी महाराजांचा मुक्काम संवदत्तीवर आहे म्हणोन वडिलीं लिहिलें तेंही श्रुत केलें. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६८४ **श्रीगणपति.** ( पौष व० ७–२८ जाने. )

पै॥ छ० २२ साबान. सन तिस्सा तिसैन. पौष.

अपत्यें हरीनें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० २१ साबान इंदुवासर प्रातःकाळपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं छ० १९ साबानचीं पत्रें सांडणीस्वाराबरोबर पाठविलीं तीं छ० २० साबानीं काल दोन प्रहरीं पावलीं. लिहिला मजकूर विस्तारें कळला. त्याचीं उत्तरें बीतपशीलवार.

राजश्री माधवरावजींचें पत्र रावजीस प्रविष्ट केलें. उत्तर दिलें तें पाठविलें आहे त्यावरून कळेल रत्नाकरपंत आले नव्हते. माने आले आहेत. पुढें चाल कोणीकडील धरतात पहावें. वरचेवरी बातमी येत असावी.

राजश्री कृष्णाजीपंत ढेकणे येथें आलेचे पेशजी लिहिलेंच होतें. काल सायंकाळीं रविवारीं रावजींचा निरोप घेऊन गेले. दरमजल अथणीवरून जात आहेत. संतोषाचें वर्तमान कळावयाकरितां लिहिलें आहे.

"नबाबाकडील फौज बरडोल तालुकेची खंडणी घेऊन पुढें सिदापूर परगणे मंगळवेढें येथें आली. त्याजमध्यें जनार्दन शिवाजी आहेत. पुण्यास लिहिलें, परंतु त्या गोष्टीचा विचार लेखकाकडून होत नाहीं" म्हणोन लिहिलें तें कळलें.

लष्करचीं पत्रें वडिलांकडील लाखाटे पाठविले ते पावले. वडिलांची प्रकृत नाजूक झाली आहे. हे चिंता लागली आहे. श्रीगजानन कृपा करील. चिंता नाहीं. वैद्यबाबा निघतात हेंही समजतें. मी रावजीस निघोन येणेचें विचारितों. काय म्हणतात तें सेवेशीं लिहितों.

भाजी हर जिन्नस पाठविली तीं व चर्मी सामान व रेशीम, काळी सखलादीचीं पानें आठ पाठविलेप्रमाणें पावलें.

तीं॥ राजश्री बळवंतराव दीक्षित यांचे पत्राचें उत्तर पाठविलें आहे. प्रविष्ट करावें.

सावंताचे वाडीहून कराडे ब्राह्मण पत्र वडिलांस व आपणास घेऊन आले याचें लिहिलें तें कळलें. बहुत ब्राह्मणांचा कारभार. सावंतानीं

१ पत्र हरि परशुराम याचें उंब्रजेहून बाळासाहेबांस. २ पेशव्यानी सरंजामाची वस्त्रें परशुराम भाऊंस देण्याकरितां ढेकणे याजबरोबर पाठविली हें संतोषाचें वर्तमान.

राजश्री माधवरावजींजवळ सामान आहे तें ध्यानांत आहेच. जास्ती फौज ठेवीन म्हणाल्यास सरकारची आज्ञा व त्यांचे वडिलांची आज्ञा त्यास येत नाहीं. ईश्वर इच्छा प्रमाण बहुत निकसी केली. काय होतें पहावें.

कलम.

आठ कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६८५   श्रीशंकर प्रसन्न.   ( पौष व० ७–२८. )

पै॥ छ० २२ साबान. तिस्सा तिसैन. पौष मास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर रावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० २१ साबानपावेतों यथास्थित असे. विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें. " वडिलांकडून येलबर्ग्याचे मुक्कामचीं पत्रें आलीं. तेथील जाबमाल उरकला. तेच दिवशीं पाव कोसाचें कूच केलें. दुसरे दिवशीं तीन कोसांचा मुक्काम नेमिला होता. करवीरकर तालुके नरगुंद येथें मलप्रभातीरीं आहेत. वडिलानीं तोच रोख धरिला आहे. याउपरी ठरतात किंवा माघारे निघतात पहावें. राजश्री रत्नाकरपंत दोन हजार फौजसुद्धां करवीरास जलद आले. " येविशींचा मजकूर लिहिला व राजश्री हरीहररावबाबा यानीं सांगितल्यावरोन सविस्तर कळलें. ऐशियास राजश्री भाऊनीं करवीरकरांवरचा रोख धरला आहे त्यापक्षीं तेथें ठरून राहणें ( त्यांस ) दुरापस्त आहे. करवीराकडे फौज आली याचा भाव काय हा पक्केपणें शोध आणवून लिहावें. इकडूनही बातमी ठेवलीच आहे. आपणाकडूनही वर्तमान वरचेवर येत असावें. पुण्याकडील वर्तमान तर शिंदे कूच करून मांजरीवर गेले आहेत. शुक्रोदय जाहलियानंतर मागती श्रीमंतांचें दर्शन घेऊन जावें असाही बेत आहे. बायांचा समेट जाला नाहीं. दोन गृहस्थ[1] पर्वतारूढ केलियाचें पेशजीच्या पत्री लिहिलेंच आहे. आणखी मागाहून पुण्याहून वर्तमान येईल त्याअन्वयें लिहावयास येईल. वस्त्रें व बहुमान पुण्याहून आणवून राजश्री कृष्णाजी

---

१ काळे व थत्ते यांस श्रीमंतानी कैद करून किल्ल्यावर पाठविल्याचें.

अनंत ... काल छ० २० साबान पुढें रवाना केले. सत्वरच जाऊन पोंचतील. बहुत काय लिहिणें. कृपालोभ करावा हे विनंती.

नं. ४६८६ श्री. ( पौष व० ११—३१ जाने. )

सेवेशीं विनंती सेवक अण्णाजी रामचंद्र कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २४ साबान चार तास दिवस मु॥ मौजे नागराळें स्वामीचे कृपावलोकनें यथास्थित असे विशेष. वाळव्यांहून आतांच येथें आलों. तेथील वर्तमान तर पहाटचे प्रहररात्रीस राजश्री गणेशराव व जोत्याजी घोरपडे शेंदोडशें स्वार घेऊन बहादुरवाडीपावेतों जातों म्हणोन तलाव्यास गेले होते, त्याची बातमी करवीराकडील मानसिगराव पाटणकर व चतुरसिंग यांस कळली. त्यांचा मुक्काम बहादुरवाडीनजीक भादुल्यावर आहे. तेथून तयार होऊन हजार दीड हजार फौज यांजवर यावयास निघाली अशी बातमी यांस कळल्यावर पुढें स्वार तोफखान्यात पाठविला कीं, ‘ करवीरकरांची स्वारी आली. तुम्ही सावध रहाणें ’ म्हणोन सवेंच मागाहून आपणही गोटास आले तिकडील फौज माघारी गेली की येणार या तहकीक समजलें नाहीं, याकरितां गोटास येऊन अद्याप घोड्यावरून उभे आहेत स्वामीस विदित व्हावयाकरितां विनंती लिहिली असे. करवीरकरांचे लष्करांतील बातमी खामखां याजवर आज उद्यां येणार याजप्रमाणें आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६८७ श्री. ( पौष व० ११—३१ जाने. )

पा॥ छ० २८ साबान. तिस्सा तिसैन

विज्ञापना. ता॥ छ० २४ साबान गुरुवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. टिपूकडील वकील सरकारांत बोलणें बोलतात. श्री॥ राजश्री नानांकडे येण्याजाण्याची चौकशी आले होते. इंग्रज याजकडीलही बोलणे लागलें आहे उभयतांचेंही म्हणणें सरकारची फौज कुमकेस यावी म्हणोन आहे. परंतु अद्यापवत कोणाचें बोलणें ठरावांत आलें नाहीं. मागाहून लिहून पाठवितों. राजश्री दौलतराव शिंदे यांचा मुक्काम मांजरीवर आहे कूच दोनचार दिवसांत होणार असें आहे. पुण्याजवळ मुक्कामीं अद्यापवत निम्मे सिम्मे सलतनत राहिलेंच आहे. कंपू काहीं गेला. कांहीं पांच सात पलटणें आहेत. बाजारही थोडा बहुत गेला. बाकी येथें आहे. माघ शु॥ प्रतिपदा द्वितीयेचे सुमारें फिरोन सरकार वाड्यात निरोपास येणार. निरोप झाल्यावर मग दरकूच जाणार असें ठरलें म्हणोन बातमी आहे. जातील तेव्हां खरे ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ धोंडो बापूजी जोशी याचें पत्र पुण्याहून मिरजेस.

नं ४६८८ श्री. ( पोष–जानेवारी )

पै॥ छ० २७ सन तिस्सा तिसैन मया व अलफ.

सेवेशी विज्ञापना ऐसी जे, "सालगु॥ एकसाली बद्दल वरात पाऊण लाख रुपयांची रा॥ बजाबा शिराळेकर यांची जाहली होती त्यापैकी सतरा हजार रुपये पावले आहेत. हल्लीं वरातेचा मजकूर बजाबानी मिरजेस लिहिला, त्यास हल्लीं श्री॥ रा॥ बाळासाहेब याणीं आपणास पत्र लिहिले आहे. करवीरवाल्यांसी महाराजानी प्रांत उध्वस्त केला. पैशास थांग नाही. एकसारखी फौज तीनचार वर्षे (बाळगलेली) आहे. (मिरज हा) सरकारचा नामी किल्ला. गडबंदीमुळें शिबंदीस जाजती खर्च प्राप्त जाहली आहे. आजपावेतों कर्ज सावकारांचे काढून चालले. आठ दहा महिने फौजेस अथवा लोकांस रोजमरे नाहीत. याप्रमाणें प्रसंग जाहला आहे. त्यास सालगु॥ सतरा हजार रुपये सावकारांचे घेऊन दिले तेच फिटले नाहीत. त्यास वरात गैरआदा व्हावी, फेरफार आणखी नाही असा विचार करावा. बजाबानी पत्र श्री॥ रा॥ बाळासाहेब यांचे लिहिले त्याची नक्कल आणली आहे. पहावी." म्हणोन (नानांस) पत्राची नक्कल दाखविली. त्यावरून त्यानीं उत्तर केलें कीं, "नक्कल काय पहावी! तीन पत्र याप्रमाणें लिहविलें आहे. ऐवज द्यावा लागता. एकसाली कोणासही सुटली नाही. तिकडे पायमल्ली करवीर महाराजांची जाहली म्हणतां, तरी इकडे चालीस लक्षास कोशाध्यें जो विचार जाहला आहे तो तुम्ही पहातच आहा! असे असतां ऐवज कोणास सुटला आहे? ऐवज द्यावा लागतो. गैर आदा वरात होत नाही." याप्रों राजश्री बाळकृष्णपंत भाऊ असतां उत्तर जाहलें. मज करितां भाऊ यांणीही पुसिलें, तत्रापि त्याप्रां उत्तर होत. रा॥ बजाबाची गाठ नानाचे वाड्यांत पडली. जवळ राजश्री भाऊ होते. त्यासी बोलला कीं, हा उगाच वरातेचा सटला आहे. वरातेचा ऐवज द्यावयाचा नाही. मा॥निल्हेनी सांगितले कीं, परभारें वरात बजाबाकडे दिली आहे. वरातेच्या वसूलास फौज निघाली आहे. आज तागाईत मंगळवेढें येथें आली असेल याप्रा॥ बजाबा बोलला. याप्रां॥ आलें वृत्त सेवेशीं विनंती लिहिली आहे. आणखीही विनंती एक वेळां करितों. उत्तर येईल तें मागाहून लिहितों हे विज्ञापना.

---

१ वकील मोरो आपाजी परांजपे याचे पत्र पुण्याहून मिरजेस.

## श. १७२० परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ४६८९ ( माघ—फेब्रु. )

नारो हरी यांचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.—

" रामचंद्र जोशीराव व आबाजीराम व बचाजी बल्लाळ व निंबाजी यादव हवालदार याणीं खंडणी ठरविली ती—कवठें पिरान ७५८५ दुधगांव ( चिंतामणरावापैकीं ) ७६०० रुपये. मिळून १५१८५

नं ४६९० ( माघ—फेब्रुवारी. )

श्री. अनवा.

विशेष. चितपावन व कऱ्हाडे ब्राह्मण यांचा वृत्तीविषयीं कलह पडोन निवाडा होईपर्यंत अन्नव्यवहार होऊं नये असा तट होऊन खटला वाढला त्यास ब्राह्मणाचा खटला पुरतेपणें समजोन घ्यावा, अथवा वाजवी मनास आणून निवाडा व्हावा, तें न होय तर 'परस्थळीं जाऊन निवाडा करून आणावा, त्याप्रमाणें आज्ञा करावयास येईल.' याप्रमाणें ( तुम्हाकडून आचरण) व्हावें ते गोष्ट न होतां चितपावन ब्राह्मण यांस मसाले वगैरे उपद्रव होऊन तीन रोजांत घाट चढोन जाणें म्हणोन ताकीदपत्र जाहलें त्यावरून समस्त ब्राह्मण घाट चढोन इकडे आले. व कांहीं पुण्यास ही गेले आहेत. त्यास आजपर्यंत देवब्राह्मणांचें राज्य असें तुम्ही म्हणवीत असतां अशा गोष्टी होऊन येथपर्यंत येऊं नयेत. परंतु आल्या ! असो. येथील तेथील दुसरा विचार नाहीं. शेंदोनशें ब्राह्मण घरदार टाकून येथें आले आहेत याजकरितां हें पत्र आपणांस लिहिलें आहे. तरी ब्राह्मणांची उत्तम प्रकारें वाजवी समजूत होऊन स्थलाची स्थलास स्थापना होय तो अर्थ व्हावा म्हणजे उत्तम आहे. सविस्तर पत्राचें उत्तर पाठवावें. म्हणजे त्यासारखाच येथून विचार करितां येईल.

नं. ४६९१ श्री. ( पौष व० १२—१ फेब्रुआरी. )

पै॥ छ० ३० साबान सन तिस्सा तिसैन. पौष.

सेवेशीं बालकृष्ण महादेव. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २५ साबानपावेतों स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० ३० रजबचीं तीन पत्रें पाठविलीं तीं पावलीं व छ० ५ साबानचें पत्र पाठविलें तें ही पावलें. सविस्तर मजकूर श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे कानावर घातला. राजश्री मोरोपंत परांजपे यांस पत्रें आलीं

१ गंगाधरराव गोविंद यानी मिरजेहून सावंतवाडीकर देसाई यास पत्र लिहिलें त्याचा हा मसुदा.

होती ती मजकुरें मोडून केली व श्रीमंत नानास पत्र आलें तें पाविष्ट करून उत्तर घेऊन पाठविलें आहे त्यावरून विनंति केली " राजश्री जनार्दनपंत म्हैसकर यांचा वर्तमान एक वीस हजारांचा मौजे हलाली येथून नेली आहे ती माघारी द्यावी व राजश्री बाबराव म्हैसकर यास तसदी बहुत होत आहे ती होऊं नये, व सरंजामगांवासहीं उपद्रव होऊं नये म्हैसकर ( आपले ) शरीरसंबंधी. अपराधी असल्यास इतकी तसदी नसावी सेवक लोकांपासून अंतर पडलें असल्यास विचार करून फडशा करून घ्यावा. केवळ अब्रू घ्यावी असें नसावें, " म्हणून श्रीमंत नानांनीं मजला सांगितलें त्यावरून सेवेशीं लिहिलें आहे म्हैसकर याजकडे स्वामीचे लढे काय असतील ते श्रीमंत नानास लिहावे व म्हैसकर याचे लढे स्वामीकडे असतील ते आपणास श्रीमंत नाना कळवितील नंतर ध्यानांत येईल त्या अन्वयें फडशा व्हावा. तों पर्यंत म्हैसकर यास उपद्रव कांहीं मात्र होऊं नये असें घडावें. नबाबाकडील मौजे हलाली व मौजे जेर अकलगी दोन गांव श्रीमंत भाऊसाहेब यांणीं घेतले ते माघारे द्यावे म्हणून आपणास पत्रेंही गेलें असतां गांव हवालीं जाहले नाहींत व रयतांपासून मनस्वी वसूल घेतला आहे तो माघारा द्यावा. कजिया वाढवूं नये, म्हणून श्रीमंत नानांनीं सांगितलें त्यावरून लिहिलें आहे नबाबाकडील फौज करकंबें मंगळवेढें याजसमीप आली आहे स्वामीकडील सरंजामाचे महालास उपद्रव करून वसूल घेतील व गांव घेतले आहेत ते ही घेतील व पर्शरामभाऊ यांस पावणे दोन लक्षांची वरात दिली होती त्यांपैकीं सव्वा लक्ष रुपये मशारनिल्हे यांस स्वामीकडून पावले. बाकीचे पन्नास हजार रुपये, व्याज व मनोती व बट्टा येणें राहिला त्याजविषयीं नबाबाकडील फौज उपद्रव करितील याजकरितां त्याचा फडशा पडावा व राजश्री बजाबा याचे वरातीपैकीं सत्रा हजार रुपये पावले आहेत. बाकीचे येणें रुपये राहिले आहेत. द्यावयाची आज्ञा व्हावी. राजश्री दौलतराव शिंदे मुहूर्तकरून हिंदुस्थानांत जावयाकरितां निघोन तीन कोस मांजरीवरी गेले आहेत. बायांची मर्जी होणें तिचा विचार होत आहे कर्दारवाली महाराज स्वामी स्वारीस निघोन सर्व प्रांतांत उपद्रव बहुत जाहला आहे याचा बंदोबस्त व्हावा या विचारांत सरकारची मर्जी आहे. राजश्री मान्य जाहल्यास सत्वरच बंदोबस्त होईल. नाहीं तरी दुसरे रीतीनें बंदोबस्त होईल. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब समीप आले असतां सरकारचे किल्ले व महालाचा बचाव होईल. त्यांचे येणें मात्र सत्वर जाहलें पाहिजे.

येविषयींची सूचना स्वामीनीं लिहिलीच असेल. राजश्री गोविंदराव काळे व शिवरामपंत थत्ते यांजवर सरकारचा पेंच आला म्हणोन कैद करून किल्यावर रवाना जाहले. वरकड सविस्तर राजश्री मोरोपंतानीं सेवेशीं लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६९२ श्री. ( पौष व० १२—१ फेब्रु. )

पै॥ छ० ३० साबान. तिस्सा तिसैन.

सेवेशीं विज्ञापना. ता॥ छ० २५ साबान मंदवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री कृष्णाजीपंत ढेकण वस्त्रें घेऊन मुहूर्तेंकरून स्वार जाले तेच दिवशीं म॥निल्हे [1] यांची भेट घेतली. त्याणीं मजकूर सांगितला कीं, श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजपासीं जावें, त्यांजपासीं बोलावें, त्यांचा निखालसपणा जाला, तुमचें पत्र आलें, म्हणजे बंदोबस्त सर्व होईल; म्हणोन ( श्रीमंतानीं ) सांगितलें आहे. श्री॥ राजश्री नाना व श्रीमंतानी सांगितल्याप्रमाणें म॥निल्हे बोलले त्यावरून श्री॥ राजश्री नानांस दुसरे दिवशीं विनंती केली की, ढेकणे तिकडे गेले आहेत. आपणाजवळ विनंती करून गेले? आपली आज्ञा काय जाली आहे? त्यावरून सांगितलें की, “ निखालसपणाचें बोलणें भाऊंचे होऊन खातरजमा जाली, (असें) तुमचें पत्र आल्यावर सर्व बंदोबस्त होतील” म्हणोन सांगितलें आहे व भाऊंस पत्रही दिलें आहे त्यांत सविस्तर कृष्णाजीपंत सांगतील त्यावरून कळेल म्हणोन लिहिलें आहे; म्हणोन उत्तर जालें. फिरोन पुसिलें की म॥निल्हेची भेट श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांची जाहल्यावर त्यांजपासीं कसें काय बोलावें याची आज्ञा जाहल्यास लिहीन. त्यावरून सांगितलें कीं, निखालसपणाचें बोलोन खातरजमा करावी. याप्र॥ उत्तर जालें ते विनंती पेशजी लिहिली आहे. हल्लीं नानांचे पत्रीं तोच भाव लिहिला आहे. आणखीही फिरोन मला सांगितलें कीं, तुम्हांस सांगितल्याप्र॥ लिहिलें की नाहीं? लिहिलें असल्यास आणखीही पुन्हा लिहिणें श्री॥ राजश्री बाजीरावसाहेब मुख्य यांची खातरजमा जशी कृष्णाजीपंत म्हणतील त्याप्र॥ भाऊंनी करावी याप्र॥ लिहिणें. त्यावरून विनंती लिहिली आहे. सैन्यांत वडिलाकडे लिहून पाठविलें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ मोरो आपाजी परांजपे याचें पत्र मिरजेस बाळासाहेबांस.

नं. ४६९३　　श्री.　　( पौष व० १३-२ फेब्रुवारी. )

पै॥ छ० ३० साबान. सन तिस्सा.

श्री॥ राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक मोरो आपाजी परांजपे सा॥ नमस्कार विज्ञापना. ता॥ छ० २६ साबान मंदवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींचीं पत्रें श्री॥ राजश्री नाना यांस छ० २३ रज्जबची चार पत्रे व छ० ५ साबानचें एक पत्र एकून पांच पत्रें प्रविष्ट केलीं व राजश्री बाळकृष्णपंत भाऊ यांस पत्रें हातीं तीही प्रविष्ट केलीं. हल्ली श्री॥ राजश्री नानांचे पत्राचें उत्तर घेऊन पाठविलें आहे. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचे पत्र श्री॥ राजश्री नानांस छ० १५ रज्जबचें होतें. राजश्री विठ्ठलराव गोळे यांजविशीं लिहिलें होतें. त्याचेंही उत्तर घेऊन पाठविलें आहे. स्वामींनी पाहून सैन्यांत वडिलांकडे रवाना करून दिलें पाहिजे. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६९४　　श्री.　　( पौष व० ३०-४ फेब्रुवारी. )

सेवेशी विनंती सेवक अण्णाजी रामचंद्र. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २८ साबान मु॥ मौजे घोगांव स्वामींचे कृपावलोकनें यथास्थित असे. विशेष. काल राजश्री गणेशराव तोफखाना वगैरे घेऊन शिराळ्यास ठाणा बसवावयाकरिता गेले. तेथें एक प्रहरपर्यंत तोफेचे गोळे चालविले. स्वार व प्यादे यानीं कांहीं गांव लुटला. जिभीपावेतों लोक गेले. नंतर ठाण्यांतील लोकानी मारागिरी केली. बाहेरील एक गोलंदास ठार केला. कांहीं लोक जायां-जखमी जाले. बाहेर येऊन मावार घालविले व दारूगोळाही सरला, त्यामुळें तेथून निघून वाळव्याचे मुक्कामास संध्याकाळचे चार घटका दिवसास आले. स्वामीस विदित होय हे विज्ञापना.

नं. ४६९५　　श्री.　　( माघ शु० १-५ फेब्रु. )

श्री॥ राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक मोरो आपाजी परांजपे सा॥ नमस्कार विज्ञापना. ता० छ० २९ भौमवासरे मु॥ पुणें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींचीं पत्रें छ० २३ साबानचीं जासुदाबरोबर आलीं तीं पावलीं. पत्री आज्ञा जे, "रा॥ कृष्णाजीपंत ढंकणे चालते जाले. श्री॥ राजश्री भाऊसाहेब येलबर्गे मुक्कामी होते तेथून कूच जालें. सावनूर तालुक्याकडे जाणार," म्हणोन लिहिलें तें कळलें. वडिलांविशीं श्री॥ राजश्री नानांस विनंती वरचेवर करीत जाणें म्हणोन आज्ञा आहे त्याप्रमाणें विनंती करितों. सावनूर तालुका रदकर्जास

पेशजी सरकारांतून दिलाच आहे. पेशजी वडिलांवर श्रीमंतांचा रोष जाला होता तोही रोष दूर होऊन श्रीमंतानीं कृपा करून वस्त्रें दिलीं. पांच रुपये करार मदार केला तो पैका सरकारचा आगें मागें द्यावा लागेल त्या अर्थी सावनूर तालुक्यांत वडिलांची स्वारी जात आहे हें फार उत्तम आहे. सरकारांत बोलावयास जाबसाल उजू आहे. करवीरवासी महाराज रामदुर्गची बारी उतरोन पलीकडे मुक्काम केला होता. येलबर्गे येथें वडिलांचा मुक्काम होता. तेथील गुंता उरकल्यानंतर कूच होतांच महाराजानीं कूच करून मुधोळाकडे जमखिंडीच्या रोखें आले. पाठ दिली. महाराज वाटेन जाऊन सहजांत गांठ पडती तरी फार चांगलें जालें असतें. हल्लीं वडिलांस व महाराजांस अदमासें चाळीस कोसांचें अंतर जालें. हरकसें करून करवीरवासी यांचा तह करून घ्यावा हा मानस श्री॥ राजश्री नानांचा. त्यांतील कारण महाराजास असतां वचन दिलेवरून महाराजानी फौज भरून दंगा मांडिला याची निभावणी आम्ही करूं याप्रों करारमदार जाला आहे. यास्तव एक वेळा वचन दिलें तें एक वेळा पार करावें हें चित्तांतून. परंतु ते महाराज आहेत ! कोणाचेंही चित्तांत आणणार नाहींत. राजश्री कृष्णाजीपंत वडिलांकडे गेले आहेत. वडिलांची गांठ पडल्यानंतर म॥निल्हे वडिलांजवळ विनंती काय करितात, वडिलानीं बोलण्यांत मजकूर काय आणिला, तें स्वामीस तिकडून पत्र येईल तो भाव सूचना लिहिली पाहिजे. पुण्यांत आबालवृद्धांचे चित्तांत भाऊसाहेब याणीं महाराजांचा बंदोबस्त करावा याणें आहे. श्रीमंत त्रिवर्गांचे चित्तांतही असेल. श्री॥ राजश्री आपासाहेब याची पूर्ण कृपा वडिलांवर आहे. बारकाईनें बातमी लागली आहे. असो.त्याचा विचार काय ! वडिलानी पेशजी सरकारचे कराराप्रों तमाम ठाणीं घालावीं हा विचार वडिली केलाच असेल. वस्त्रें मात्र तेथें पोंहचल्यानंतर पुढें तोच उद्योग व्हावा. इकडील राजकी वृत्त तरी राजश्री दौलतराव शिंदे कूच करून माजरीचे मुक्कामीं गेले बारा चौदा दिवस जाले. तेवीस लक्ष रुपये बऱ्हाणपूर पावेतों रोख द्यावे असा करार. बारा लक्षांच्या वराता. त्यास "तो पैका तेवीस येथेंच दिल्याविना निर्वाह नाहीं. फौजेंत व कंपूमध्यें गवगवा पडला आहे. त्यास हरकसें करून तेवीस कृपा करून द्यावे म्हणतात ! येथें बारा लक्ष द्यावे, गंगेवर गेल्यावर तीन लक्ष द्यावे, पुढें बऱ्हाणपुरास बाकी द्यावे" असें आहे, परंतु येथील फौजेंतील लोकांस देणेकरी याणीं अडविलें व कंपूची तलब चार महिन्यांची तटली याचा फडशा आला पाहिजे, म्हणोन विनंती करितात. बारा लक्ष तेरापावेतों एवज पटला.

आणखी तरतूद होतच आहे. सुमार तेवीस लक्ष रोख देतील असें दिसतें. नंतर कूच श्री इच्छेनें होईल तें खरें ! असो. बायांचे फौजेनें प्रांतांत प्रलय मांडला आहे. नाशिकास खंडणी तीन लक्ष रुपये मागतात. बायकांवर पठाणानीं अनर्थ केला आहे. शेंपन्नास बाईकानीं खेड्यापाड्यानीं प्राणत्याग केले. कांहीं स्थीत राहिली नाहीं. श्रीमंतांचे पुण्यप्रताप थोर त्या योगें असे अनर्थ होतात ! बायांचे पारपत्याकरितां विंचूरकर यांचें पथक व पागा व शिंदे यांजकडील फौज दोन हजार व तीन पलटणें रवाना जाली. एक मजल गेलीं आहेत. मुक्काम करून आहेत. मागाहून विनंती लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६९६ श्री. ( माघ शु० १–५ फेब्रुवारी. )

विज्ञापना. तागायत छ० २९ साबान. भौमवार वर्तमान क्षेम असे विशेष. शिंदे यांचा मुक्काम मातागिवर आहे. माघ शु॥ ५ पंचमीचे सुमारे कूच व्हावें असें म्हणतात. परंतु तेवीस लक्ष रुपये पटल्याखेरीज कूच होत नाहीं हा त्याचे घरीं विचार आहे पुढें ही कूच होईल असें पुण्यांत कोणी म्हणत नाहीं. या प्रमाणें बातमी आहे. श्री॥ राजश्री नानांच्या मतें कूच करितात असें आहे. आठचार दिवसांत तेंही कळेल. मागाहून होईल तें वर्तमान विनंती लिहितों. सेवेशीं श्रुत होय ही विज्ञापना.

नं. ४६९७ श्री. ( पौष–जाने. )

विज्ञापना. “ श्री॥ रा॥ भाऊसाहेब यलबगे येथील खंडणी घेऊन मावनूरचे रोखें जाहले हें वर्तमान करवीरवासी यांस कळतांच रामदुर्गचे बारीपलीकडे होते तेथून मुधोळ जमखिंडीकडे आले. रत्नाकरपंत करवीरास जाऊन तोफा दोन तीन मोठ्या बाहेर काढल्या व चतुरसिंग याणें रास्ते यांचें फौजेवर मागें गलबल केली आहे त्याप्रों करणार अशी बातमी आहे म्हणोन दोन पुरवण्या माझे नांव होत्या त्या ( नानांस ) दाखविल्या. त्यावरून बोलिले कीं, रास्ते यांचे फौजेवर ( चतुरसिंगानें ) गलबल केली. तुमची फौज नजीक असतां रास्ते यांची ( व ) फौज तुमची मिळोन पारिपत्य करावें तें करीत नाहीं हें काय ? वारंवार लिहितात, ‘ परिपत्य करावें! याप्रों उत्तर जाहलेवर कांहीं बोललों नाहीं. दोनही पुरवण्या श्रीमंतास दाखवून उद्ईक तुम्हाजवळ देतों म्हणोन बोलले. पुरवण्या भाऊ बाळ यांचे

---

१ मोरो आपाजी पराजपे यांनील याचे पत्र मिरजेस. २ वकील मोरो आपाजी पराजपे याचे पत्र पुण्याहून मिरजेस.

विचारें दाखविल्या. उद्ईक माघाऱ्या घेतों. मुख्य गोष्ट श्री॥ रा॥ नानांचें बोलणें कोणते समयीं कसें होईल याचा भरंवसा धरावयाचा नाहीं. सारा दिवस बोलत असतां दस्तऐवज बोलण्यांत सांपडावयाचा नाहीं, या चाली बोलावयाच्या आहेत ! काम लागलें असतां साखरेपेक्षां गोड बोलावयास उशीर नाहीं. काम जाहल्यानंतर त्या गांवचे देखील नव्हेत ! येथील विचार असा आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६९८ श्री. ( माघ शु० २–६ फेब्रु. )

पै॥ छ० ३० साबान. तिस्सा तिसैन.

सेवेसीं विज्ञापना ऐसी जे, श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजविशीं श्रीमंतांची खातरजमा व्हावी म्हणजे श्रीमंत सर्व बंदोबस्त करून देतात हें चित्तात नाभीपासून आहे. परंतु "त्यांचें बोलणें येथें कोणीं बोलत नाही. त्याचें चित्तातील भाव कसा समजावा ? " याप्रों एक दोन वेळां बोलले. हे बातमी राजश्री विठ्ठलराव अण्णा गोळे यांस कळली. त्यावरून मला सांगितलें. मी हीं याप्रों एक दोन गृहस्थांचे मुखें ऐकलें. वरकडविशीं तूर्त दौलतीमध्यें भाऊसाहेबांसारखें कोणी नाही. विना त्यांचें चित्त मिळाल्याखेरीज इकडे दाबही बसत नाही. चित्तांतून घोळतें. परंतु निखालसपणा मात्र कळला म्हणजे खातरजमा इकडील होते, ऐसा भाव आहे. मागें चार महिन्याचें पूर्वी रागें भरावें, सहजांत अधिकउणें बोलावें, असें होतें तें सांप्रत तिलप्राय नाहीं. करवीरवासी महाराज याणीं दंगा माडिला त्यांचें पारिपत्य श्री॥ राजश्री भाऊनी करावें हें चित्तांतून आहे. हा भाव बोलण्यांत श्रीमंतांचे आहे. असलेलें वर्तमान लिहिलें आहे. अण्णा गोळे याणीं सांगितलें कीं, श्रीमंतांकडे तुम्ही जात असतां कीं नाहीं ? त्यावरून सांगितलें कीं, तिकडे जावयाचा राबता नाहीं आणि आज्ञाही नाहीं. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांच्या मध्यस्तीमध्यें रास्ते आहेत. त्यांजखेरीज दुसऱ्याकडून बोलावयाचें नाहीं याप्रों निश्चय आहेत. कृष्णाजीपंत गेले आहेत. सर्व विचार बोलणें तो वडील सैन्यांत बोलतील. याप्रों उत्तर केलें. असलेलें वर्तमान विनंती लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४६९९ श्री. ( माघ शु० २–६ फेब्रु. )

पै॥ छ० ३० साबान तिस्सा तिसैन.

विज्ञापना. श्री॥ राजश्री नाना महाडास गेले ते समयीं करवीरवासी महाराज यांजकडे नानांचें संधान राजकारणाचें होतें. त्यांचे सांगितल्यावरून करवीरवासी महाराजानीं दंगा फौज धरून केला तो आजपर्यंत

चाललाच आहे. हल्लीं श्री॥ राजश्री नानांचें म्हणणें वारंवार पडलें कीं "पांच चार ( लक्ष ) कमी ज्यास्ती करून तह करावा. तूर्त मसलत लहान येथें राजश्री भाऊनीं गुंतावयाचें नाहीं. मातबर काम भाऊंस सांगावयाचें" म्हणतात. त्यास नानांचें वचन महाडास असतां करवीरवासी यांणी घेतलें आहे असें दिसतें. त्यांकडून इतका अपराध जाला, आणखी होतच आहे, असें असतां राग येत नाहीं याचा विचार वचन दिलें आहे असें दिसतें. रामदुर्गचे बारीपलीकडे महाराजांचा मुक्काम जाला. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस अंतर अठरा वीस कोसांचें आहे. माझे पत्रीं इतकाच मजकूर होता ते चिट्टी ( नानांस ) दाखविली. पाहून चिट्टीची नक्कल करून दिली. त्याचें कारण कीं त्यांजकडील येथें बोलणें कोणी बोलतात त्यांस दाखवावयाकरितां नक्कल घेतली असें दिसतें. अथवा श्री॥ राजश्री पंतप्रधान यांस दाखवावी. हे दोन तर्क दिसतात. पहिल्यानें स्वामीनीं लिहिलें होतें कीं, साडेपांच सहा गांवचें अंतर आहे म्हणोन लिहिलें ते समयीं श्रुत केलें. उत्तर केलें कीं, पुढें जातात त्यांचा मृत्यु आला असेल! भाऊंजवळ सरंजाम भारी आहे. पारिपत्य होईल. असें बोलले होते. विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७०० श्री. ( माघ शु० २–६ फेब्रु. )

छ० ३० साबान. राजश्री बाळकृष्णपंत बाळ यांस पत्र पाठविलें त्याची नक्कल.

विनंती उपरी. राजश्री खेम सावंत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ यांच्या प्रांतांत वेदशास्त्र संपन्न राजमान्य राजश्री चितपावन ब्राह्मण व वेदशास्त्र संपन्न रा॥ रा॥ कऱ्हाडे ब्राह्मण यांचा वृत्तिविषयक कलह लागोन सरदेसाई यांजकडे चितपावन फिर्याद गेले. त्यांचें मनास न आणितां कऱ्हाडे यांच्या समजावणेंवरून चितपावन मंडळींतील ब्राह्मणांजवळ गुन्हेगारी घेतली. नंतर ही सरदेसाई यांजवळ समस्त चितपावन जाऊन "आपले घरचीं प्रयोजनें वृत्तीच्या कलहामुळें राहिलीं. उभयतांचें वाजवी मनास आणावयाविषयीं परस्थळ नेमून द्यावें;" म्हणोन सरदेसाई यांस सांगितलें. दोन तीन महिने पर्यंत वाडीस ब्राह्मण बसले. तथापि निर्णय न जाहला. तेव्हां "आमची पंचाईत न होय. कार्य प्रयोजनें राहिलीं. अतःपर कऱ्हाडे यांसीं अन्नव्यवहार वर्ज करितों" म्हणोन सरदेसाई यांस राजश्री धोंडोपंत लेले यांजकडून सांगविलें. व राजश्री सोम सावंत देसाई यांजवळ ब्राह्मणानीं सांगितलें. कऱ्हाडे

यांस वृत्तीचा जाबसाल विचारिला असतां तुम्ही आपल्या कन्या द्याल तर वृत्ती देऊं अशीं उत्तरें चित पावनांस केलीं. शेणव्यांचे घरीं जाऊं नये असा कऱ्हाडे यांणीं कट केला त्यांत चित्पावन ब्राम्हण समस्त यांचे संमत घेतलें नाहीं. पूर्ववतप्रमाणें शेणवी यांचे घरीं दानप्रतिग्रहास चितपावन जातच होते. त्यांतील ब्राम्हणांस कऱ्हाडे यांणीं पंगतीतून उठवून त्या ब्राम्हणांस प्रायश्चित दिलें. असे चितपावन ज्ञातीचे अपमान व वृत्तीचा उच्छेद होऊं लागला यामुळें समस्त चितपावन प्रांत मजकूर यांणीं आपले ज्ञातीत कट केला जे, आपला व कऱ्हाड्यांचा वृत्तिविषयक कजिया तुटे तोंपर्यंत कऱ्हाड्यांसीं अन्नव्यवहार करूं नये, असा कट करून आपआपल्या घरास गेले. त्याउपर कऱ्हाडे यांणीं सरदेसाई यांस सांगोन समस्त चितपावन यांस मसाले करून गुन्हेगाऱ्या हजारों रुपये लावून दारीं चौक्या बसविल्यावरून समस्त चितपावन वाडीस गेले. ते वेळेस तरी उभयतां ब्राम्हणांस परस्थल नेमून देऊन पंचायतीस पाठवावें तें न करितां " कऱ्हाडे यांसीं कट केला आहे तो मोडणें. नाहीतर तीन दिवसांत आपले राज्यांतून कुटुंब सुद्धां निघोन जाणें, राहिल्यास राजदंड व ब्रम्हदंड घेतला जाईल " म्हणोन सरदेसाई यांणीं चिठी पाठविली. तेव्हां उभयतांस स्थळ नेमून द्यावें म्हणत असतां ते न करून गुन्हेगारी मसाले घेतले. शेणवी यांच्या खटल्याबद्दल कऱ्हाडे यांणी कट केला त्यांत समस्त चितपावन यांचें संमत नसतां शेणवी यांचें घरीं चितपावन दक्षिणेस गेले यास्तव पंगतीतून उठवून कऱ्हाडे यांणीं प्रायश्चित्त दिलें याचा विचार ( सरदेसाई यांणीं ) न केला. वृत्तीचा जाबसाल कऱ्हाडे यांस पुसत असतां कन्या मागों लागलें व अनेक प्रकारची दुर्भाषणें केलीं, याचा विचार न पाहतां कऱ्हाडे यांच्याच सांगण्यावरून समस्त चितपावन यांस मसाले व गुन्हेगारीचे तगादे लाविले ! इतकेंही असोन " कट मोडणें. नाहींतर तीन दिवसांत देशांतरास कुटुंबसुद्धां जाणें. न गेल्यास राजदंड व ब्रम्हदंड घेतला जाईल, " म्हणोन चिठ्ठी पाठविली तेव्हां "कऱ्हाडे समजावितात तसेंच होतें. याउपर आपला परिणाम नाहीं" असें भय प्राप्त होऊन सडे ब्राह्मण चितपावन वाडीस गेले होते तसेच परभारें घांट चढोन दोन तीनशें ब्राह्मण आले. मागाहून वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री कृष्ण दीक्षित रानडे येत होते. त्यांचे वस्तु चालवेना म्हणोन माघारे राहिले. राजश्री धोंडोपंत लेले यांस मागाहून कांहीं बोलाययाचें आहे म्हणून फिरवून ( कऱ्हाड्यानीं ) वाडीस नेल्यानंतर लेले यांचे घरीं कऱ्हाडे

ब्राम्हण जमा होऊन दीक्षित व लेले यांस "कट मोडिला म्हणोन लिहोन देणें व आमचे पंक्तीस भोजन करणें," म्हणोन उभयतांस उपोषित बसविलें. त्या समयीं दीक्षितानीं उत्तर केलें जें, समस्त चितपावन ब्राह्मणांनी कट केला तो आमचे एकट्याचे लिहिण्यावरून कसा मोडेल ? तथापि कऱ्हाडे यांचा निग्रह, सरदेसाई यांचा कऱ्हाडे यांजकडे पक्षपात, जाणोन कऱ्हाडे यांणीं अनेवा करून दिला त्याप्रमाणें दीक्षित व लेले याणीं ज्ञातीस पत्र लिहोन दिलें. व दीक्षितांचे चिरंजीव आणि लेले याणीं कऱ्हाडे यांचे पंक्तीस भोजन केलें. नंतर लेले युक्तीनें निघोन ब्राह्मणसमुदायांत आले. दीक्षित वृद्ध, येववेना, सबब राहिले. याप्रमाणें ब्राह्मणांनीं मजकूर निवेदन केला त्याजवरून लिहिला असे. हा मजकूर पुण्यास जावोन निवेदन करावा म्हणोन ब्राह्मण जात होते त्यांस चार गोष्टी विचाराच्या सांगोन येथें ठेवून घेतले आहेत. ऐसीयास हा मजकूर राजश्री नानांस एकांतीं श्रुत करून श्रीमंतांस विदित होय असें करावें. श्रीमंत ब्राह्मणप्रतिपालक. समुद्रवलयांकित पृथ्वी श्रीमंतांची. ब्राह्मणांवर असा समय गुदरला आहे. श्रीमंतांविना निराधारी यांस आधार दुसरा कोण आहे ? वाजवी सवाल जबाब असोन सरदेसाई याणीं कऱ्हाडे यांचा पक्ष स्वीकारून सहस्रावधि कुटुंबें वृत्तीचा उच्छेद करून घांटावर लावून दिलीं आहेत. याचा विचार राजश्री नाना याणीं करून सरकारांत विनंती करून ब्रह्मप्रतिष्ठा राही असें करावें. कीर्ति दिगंती होईल. श्रीमंतांसारखे समर्थ असोन चितपावन ब्राह्मण देशांतरास गेले असें होऊं नये. राजश्री नाना यांस पत्र तुम्हांस सविस्तर लिहिलें आहे. ते विनंती करितील म्हणोन विनंती लिहिली आहे. पत्र प्रविष्ठ करून समर्पक उत्तर राजश्री नाना यांचें घेऊन पाठवावें. आपलें येणें पुण्याहून जालें असल्यास दोनी पत्रें पुण्यास पाठवून उत्तर येई असें करावें. ब्राह्मणाचे कार्य आहे. आपणास लिहावें असा अर्थ नाही. बहुत काय लिहिणे. लोभ करावा हे विनंती.

नं. ४७०१[१]  श्री.  ( माघ शु० २–६ फेब्रु. )

पै छ० ३० साबान. सन तिस्सातिसैन. पौष.

विज्ञापना[२]. स्वामीनीं छ० ९ साबानचीं तीन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. सविस्तर मजकूर श्रीमंतांस विदित केला. "नबाबाकडील फौजेंत राजश्री जनार्दनपंत म्हैसकर व त्रिंबकरावजी निसबत शिराळेकर हे आहेत. ते श्रीमंतांचें आज्ञेवरून आमचे महालांस उपद्रव करणार; व श्रीमंत भाऊ-

---

१ मसुदा. २ नानांचा कारकून बाळकृष्णपंत बाळ याचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

सांहेब बागलकोटापलीकडे तेरा चौदा कोसांवर आहेत; करवीरवासी महाराज संवदत्तीवर गेले आहेत. त्यांची व भाऊसाहेब यांची चोवीस कोसांची तफावत आहे. भाऊसाहेबांवर जाणार असेंही आहे. त्यास भाऊसाहेब लांब गेले याजमुळें राजश्रीनीं त्या प्रांतीं उपद्रव बहुत केला. सरकारचे किल्ले व महाल खराब जाले. नबाबाकडील हलाली व जिरेंअंकलगी दोन गांवें आपण घेऊन वसूल वगैरे वस्तभाव नेली आहे. ती गांवसुद्धां माघारी द्यावी म्हणजे नबाबाकडील फौज आपले तालुक्यास उपद्रव करणार नाहीं. याकरितां हरदू गांव वसूलसुद्धां माघारा देविले पाहिजेत. श्रीमंत नानानीं जनार्दनपंत म्हैसकर व त्रिंबकराव यांस व नबाबाकडील फौजेस आज्ञा करून आमचे महालांस उपद्रव करणार; " म्हणून लिहिलें, त्यांत अशी गोष्ट श्रीमंतांकडून घडावयाची नाहीं ही खातरजमा आपणास आहेच. आपले ठाई श्रीमंतांचा दुसरा विचारच नाहीं. आणि आपण कशावरून लिहिलें हेंच अपूर्व आहे. राजश्री बाबूराव म्हैसकर यांस पुणेंयास आणवावें म्हणून श्रीमंत राजश्री नानानीं मजला सांगितलें त्यावरून लिहिलें आहे. तर मशारनिल्हेस पुणेंयास पाठवावें. त्यांजकडे स्वामीचे काय लढे असतील ते लिहून पाठविले पाहिजेत. व म्हैसकर यांचे लढे आपणास कळवूं. आपलेकडील मोरोपंत येथें आहेत त्यांचे विद्यमानें ठराव ठरवूं. तोंपावेतों म्हैसकर यांचे मुला माणसांस उपसर्ग होऊं नये. आपली व श्रीमंत दादांची फौज समीप असतां रास्ते यांचे फौजेवर चतुरसिंग याणीं दंगा केला आणि माघारे गेले. त्याजवर फौज पाठवून आपण उलट दंगा न केला हेंच अपूर्व श्रीमंतांस वाटतें. बाबूराव म्हैसकर याची मोकळीक करून पुणेयास येऊं द्यावें. त्याजकडे दोष काय असतील ते व दस्तैवजी कागदपत्र असतील ते पाठविले पाहिजेत. तींच पत्रें स्वामींस दाखवीन म्हणजे श्रीमंतांची खातरजमा काय ते होईल. तोंपर्यंत होत नाहीं. हे विज्ञापना. चाकर लोकांपासून अंतर पडलें असल्यास इतकी तसदी न द्यावी. स्वामींकडील अर्थ समजल्यावर सविस्तर कळेल. हे विज्ञापना. हलालीहून म्हैसकर यांची वस्तभाव वगैरे नेलें असेल तें माघारें द्यावें म्हणून श्रीमंत नानांचें मानस आहे. तर वस्त भाव वगैरे देविली पाहिजे हे विज्ञापना.

नं. ४७०२ श्री. ( माघ शु० ३–७ फेब्रु. )

पै॥ छ० ५ रमजान. तिस्सा तिसैन. माघमास.

सेवेशीं विज्ञापना ता॥ छ० १ रमजान सेवकाचें वर्तमान यथास्थित

---

१ मोरो आपाजी परांजपे याचें पत्र बाळासाहेबांस.

असे. विशेष. स्वामीनीं पत्र श्री॥ राजश्री नानांस छ० २४ साबानचें पाठविलें तें प्रविष्ट करून जाब घेऊन हल्लीं पाठविला आहे. खास दस्तुर दोन ओळी ( अक्षरें ) खालीं लिहिलीं आहेत. येथील मर्जी आपणाकडील फौज व श्री॥ राजश्री दादांकडील फौज व रास्ते यांस घेऊन चतुरसिंग याचें यथासांग पारिपत्य करावें हें चित्तांत आहे. एक दोन वेळां मजपाशींही सांगितलें. सेवेसीं श्रुत होय. बापू खिजमतगार हल्लीं स्वामीनीं पाठविला त्याजबरोबर श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचे सैन्यांतील व करवीरवासी महाराजांची बातमी वगैरे लिहिली त्याप्रों श्री॥ राजश्री नानांस श्रुत करितों. मागाहून उत्तर काय काय होईल ते विनंती लिहितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७०३   श्री.   ( माघ शु० ४–८ फेब्रु. )

पै॥ छ० २ रमजान. तिस्सा तिसैन. माघमास.

सेवेशीं विनंती सेवक अण्णाजी रामचंद्र कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञाता॥ छ० २ रमजान मु॥ मौजे नागराळें स्वामीचे कृपावलोकनें यथास्थित असें. विशेष. राजश्री गणेशराव तोफखाना शिराळ्यास घेऊन गेले ते दिवशीं तोफेस जुंपावयाकरितां मौजे मजकूरचे रानांतून खळ्यांतील दहा बारा बैल कारखान्यांतील माणसें येऊन नेऊं लागले, याकरितां गांवचीं माणसें बैल सोडवावयास गेलीं; त्यांजवर बंदुकीचा बार एक काढिला. गोळी चुकली. दुसरा बार भरतेसमयीं येथील मखदूम यानीं त्यास धरून बंदूक हिरावून घेतली. चाळीस पन्नास माणूस जमा होऊन बैल माघारे फिरवून गांवास आणिले. तेव्हां गलबा फार जाल्यामुळें लष्करांत आवाई पडोन स्वांर वगैरे तयार जाले. गणेशराव यानीं मेस्तर टोण यांस मेजवानी केली होती. ते जेवावयास बसले होते. इतक्यांत बोभाट आला. मी वाळव्यांतच होतों. रोखापत्र नसतां रानांतील बैल आणीत होतें असें समजून सांगितलेवर मेस्तर टोण यानीं आपले लोकांस ताकीद केली. 'कोणाचे सांगण्यावरून गेलां' असें शिपाई यांस त्यांनीं विचारिलें. सरकारचा हुजऱ्या आहे त्याचे सांगण्यावरून गेलों असें सांगतांच हुजऱ्यास फिरंगी यानीं तसदी केली. गणेशराव यानीं सांगितलेवरून बंदूक माघारी नेऊन दिली. त्याजवर च्यार पांच दिवस उपद्रव नव्हता. परवां हुजऱ्यानीं बरोबर कारखान्यांतील तबकदार वगैरे दहा वीस माणसें आणून कोळशाकरितां लांकडें पाहिजेत म्हणून मनस्वी दंगा करून गांवांतील आवर्ते नेऊं लागले, यास्तव गांवकऱ्यांनीं दहा रुपये दिले. शिवाय च्यार बाभळी तोडून नेल्या. याकरितां काल वाळव्या-

स गेलों. गणेशरावही तिसरे प्रहरीं कालच रास्ते याचे लष्करांतून आले. त्यांस हें वर्तमान सांगितलेनंतर त्यानीं कारखान्याकडील महादाजीपंत करंदीकर यास बोलावून विचारलें. त्याचें म्हणणें " कोळसे वगैरे सामान पाहिजे. पैका हुजऱ्यांनीं घेतला असल्यास चौकशी करून माघारा देऊं. परंतु सध्यां कामाचा खोळंबा आहे. तुम्ही देत असल्यास पंचवीस झाडें बाभळीचीं व गोंवऱ्या दहा गाडे व सुतार लोहार बेगारी यांचें वगैरे सामान आणवून देणें. नसल्यास आम्ही कारखान्यांतून माणसें पाठवून आणवूं. त्यास रावजींस विचारल्यास 'आपला उपाय नाहीं. थोडें बहुत लाकडें कोळशाचे उपयोगी वगैरे सामान देविणें ' म्हणोन बोलले. याकरितां विनंती लिहिली आहे. 'मिरजेहून सरकारची आज्ञा आल्याखेरीज द्यावयाचें नाहीं. उत्तर येईल तें कळवितों' असें बोलोन आलों. येविशीं उत्तराची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. गणेश बाजीराव कुरलेकर यानीं गणेशराव यांसीं मेजवानी केली. देवरअष्टेविशीं गुदस्तां सरकारची सनद आणिली ती त्यास दाखविली. ठाणें बसवून द्यावें असें बोलणें जालें आहे. " सरकारची सनद असतां त्याजकडे गांव काय निमित्य चालवीत नाहीं. आपण त्यास ठाणें बसवून देणार असे गणेशराव बोलले. त्यास सरकारचें पत्र ठाणें बसवून देणेंविशीं आहे कीं काय म्हणून विचारलें. त्यास मागाहून आणवून देतों असें कुरलेकर बोलले आहेत. परंतु स्नेहाची जागा, येविशीं मिरजेहून आपल्यास आज्ञा येईल तसें करूं; याप्रों बोलले. तिसरा मजकूर मिरज तालुक्यातील थोरात यांचे नेमणुकीचें उत्तर सनदेविशीं पुण्यास रावजीनीं पत्र पाठविलें होतें त्याचें उत्तर सरकारची सनद देऊन कारकून मिरजेस रवाना केले त्यास फार दिवस जाले असें लिहिलें आहे. विदित होय. करवीरकरांची फौज परवां तिसरे प्रहरीं वाळव्याचे शिंवेपावेतों तलाव्यास आली होती. रानांतील गहूं हरभरेच्या राशी भरून नेल्या. गणेशराव रास्त्यांकडे व कऱ्हाडास गेले होते. काय करून आले समजलें नाहीं. शिंदे यांजकडील बायांची फौज कसबें औंध येथें आली असें त्यानीं सांगितलें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७०४ **श्रीशंकर प्रसन्न.** ( माघ शु० ४-८ फेब्रु. )

पै॥ छ० ४ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

राजश्री गंगाधर रावजी स्वामींचे सेवेशी.

विनंती उपरी. राजश्री गणेशराव व फिरंगी व जोती घोरपडे तोफांसुद्धां

---

१ माधवराव रास्ते यांचें पत्र.

शिराळीयास जाऊन तोफा लाविल्या आहेत म्हणून येथें वर्तमान आलें. त्यास "आपलें जाणें तिकडे होईल किंवा कसें ? चत्रसिंग पाटणकर कुमकेस येतील त्याची बातमी असावी;" म्हणून लिहिलें तें कळलें. ऐसियास गणेशराव तोफा पलटणें घोरपडे सुद्धां छ० साबान शनवारीं प्रहर रात्री आवशीस निघून पहांटे घटका रात्रीस शिराळीयास दाखल होऊन गोळागोळी जाहली. एक प्रहर तेथें ठरून होते. नंतर गांवाची झांबडाझांबड करून रविवारीं अस्तमानीं माघारे वाळव्यास आले. पाटणकर व चत्रसिंग अद्यापि शिराळ्यास आले नाहींत. येणार अशी वदंता आहे. रत्नाकरपंत मांगल्यावर येणार या प्रमाणें आवई आहे. गणेशपंत वाळव्यास आल्यावर इकडे छ० ३० साबानीं सौम्यवारीं येथें फौज कुमकेस द्यावी, आणखी मुकाबिला करूं, म्हणोन आले होते. त्यास येथून पुढील शिलशिला करावा न करावा याचीं पत्रें पुण्यास पाठविलीं. उत्तरें यावयाचीं आहेत. कारकुनाजवळ बोलण्यांत आलें जे, तूर्त पुढें न जाणें. हा मजकूर त्यांसही सांगितला. निरोप घेऊन गेले. पुढें विचार करणें तो सरकारची आज्ञा घेऊन व तोफा सरंजाम करून यावें. उतावळी केली असतां ठीक नाहीं. त्यांसही सांगितलें आहे. घडेल तें खरें. रवाना छ० २ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४७०५ श्री. ( माघ शु० फेब्रु० )

वडिलांचे सेवेशीं अपत्यें विनायक बचाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती ऐसी जे, पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर अक्षरशः कळों आला. बायांचा मुक्काम निंब साखरेनजीक आहे तेथेंच आहे. अद्याप कुचाचें वर्तमान खचीत आलें नाही. रोंख कोणीकडे जातो हे तहकीक बातमी फुटत नसती. सांगतात रोख एक. जातात एकीकडे ! असें आहे. पठाण बावड्यावर पांच सातशें जमले. त्यांची वाट झाली. (?) गांवकरी यांचें एक माणूस ठार झालें. पांच सात जखमी झालें. नंतर जाऊन आपले गोटांत सायंकाळीं उतरले. दुसरे दिवशीं तयार होऊन चार टोळ्या करून भिंतीचे सभोंवते उभे राहिले. तेथें तहाचें बोलणें लाविलें. पांच हजार खंडणी घेतली म्हणोन वर्तमान खचितात. मग दोन रुपये कमजास्ती असले तरी असतील. येथें यावयाची बातमी खचीत. परंतु सावधता भारी होऊन जमाव झाला तेव्हां गफलत करणार. आज बुधवारीं दोन प्रहरां कूच करून नरसीपूरचे नजीक गेले ही बातमी आताच आली. दररोज आवशी पहाटे मध्यरात्री किल्लेचे बुरुजावरील तोफा सुरू करीत असतों. दहा पांच बार करितों. गावकुसूं बळावून चौकी पहारा

चांगला होत आहे. गांवाबाहेर पाऊणशें स्वार व प्यादे व दोन तोफा व हत्ती इतके तयार होऊन उभे असतों. सारांश तहास अटकून पडूं नये, गफलतीनें करणें तें करावें, म्हणोन टाळा देऊन गेले आहेत. यांत श्रीहरि पार पाडील तें खरें. नरसिंहपूर पंढरपूर यांस उपद्रव करूं नये या प्रमाणें लष्करांत पठाणांस ( सरकारांतून ) समक्ष ताकीद झाली हें त्या वेळचें लिहिणें. आम्हांकडील कारकुनाचें पत्र आलें, सरकारी हुकूम मानावयाचा त्यांचा शिरस्ता नाहीं! नरसिंहपुरावर गेले तेव्हां ठीक दिसत नाहीं. आठ दहा कोस आहेत तों सूचना पाठवावी म्हणोन लिहिलें, त्यास ते आठ दहा कोस आहेत तों पुढें दहा वीस कोस उजाड होतील ! मनुष्य सांपडलें असतां कांहीं ठीक नाहीं. इंदापूरकर भगवंतभट पिंगळे यांचे मेहुणे एक सांपडले आहेत त्यास बत्तीस हजार रुपये मागतात. सोळा हजार खंडणी करून त्यापैकीं बारा हजार पहिले पठाण घेऊन गेले. भटास सोडीत नाहीं. बायांचे सर्व लष्करची व मोंगलाई फौजेची दहशत बाळगीत नाहीं इतकी पठाणांची रयतेस दहशत आहे हें प्रसिद्धच आहे. नरसिंहपूरची दशा काय होती हें उदईक शुक्रवारीं लेहून पाठवितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७०६ ( पौष व० २–२३ जाने. )

नारो हरी यांचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस. पै॥ छ० १८ साबानचें.—

"रामदुर्गच्या बारींतून राजश्री रत्नाकरपंत राजाज्ञा तावडतोब करवीरास गेले म्हणून वर्तमान आलें. त्यास राजाज्ञा आले ते स्वस्थ बसावयाचे नव्हत. यास्तव राजश्री माधवराव रास्ते यांजकडे वर्तमान पाठविलें. सावधता झाली."

नं. ४७०७ श्री. ( माघ शु० ४–८ फेब्रु. )

सेवेशीं बाळाजी महादेव दामले साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २ रमजानपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. इंदापुरानजीक मौजे सावरगांव येथें बायांचा मुक्काम आहे. तेथें खंडेराव गौळी व धारराव शिंदे यांचा लेक नरसिंगराव शिंदे व जोतीबा जामदार वगैरे अशीं पांच पथकें दोन हजार फौज वरघाटीं आली आहे. दरूज वडूज वगैरे गांव येथें राहून तमाम वरघाटप्रांतीं मौजे पुसेसावळीपर्यंत रोखे करून गांवगन्ना राऊत बसले आहेत.

---

१ पत्र रहिमतपुराहून मिरजेस जनार्दन रघुनाथ लागू यांस. पत्र लिहिणार। लागू यांच्या पदरचा.

मारामारी करून ऐवज घेतात. याप्रमाणें झालें आहे. यास्तव या प्रांतींही गडबड फार झाली आहे. वांई प्रांतांतही रोखे येणार म्हणोन मौजे साप येथें जामदार यांणीं सांगोन पाठविलें आहे. त्याजमुळें इकडील गांव पळतात. रहिमतपुरांतही गडबड झाली आहे. परंतु येथें स्वार व शिबंदी आहे. याजमुळें रयत तजावजा होऊं दिली नाहीं. धीर भरंवसा देऊन चौकी पहारा करून हुशारीनें आहों; याजमुळें रयतेसही भरंवसा वाटतो. ऐशास काल मिरजेकडील वर्तमान आलें कीं, रहिमतपूरचे स्वार मिरजेस आणविले आहेत, यास्तव स्वार जाणार; असी बोलवा होऊं लागली याजमुळें गांव गडबडला. आम्हांस गांवकर विचारूं लागले. आम्हीं सांगितलें कीं, स्वांर जात नाहींत. आवाया घालूं नका. स्वस्थ असावें. याप्रमाणें सांगितलें आहे. अशा गडबडेंत स्वार नेल्यास गांवास धीर निघणार नाहीं. 'बायांकडील रोखापत्र येणार म्हणोन स्वांर गेले' असें होऊन गांव तजावजा होईल हें ठीक नाहीं. स्वार न्यावयाचा मजकूर सरकारांतून असल्यास विनंती करून येथें आहेत तसे असों द्यावे. स्वांर गाडदी आहेत यांणें चहूंकडे दहशत आहे. बायांकडील रोखापत्र आल्यास कसें करावें येविशीं विनंती सरकारांत करून कशी आज्ञा होते तें लिहून लवकर पाठवावें. सेवेशीं श्रुत होय विज्ञापना.

नं. ४७०८ श्रीशंकर प्रसन्न. ( माघ शु० ४-८ फेब्रु. )

पै॥ छ० ४ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० २ रमजानपावेतों यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. आपण छ० २२ व छ० २८ साबानचीं दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. "करवीरवासी महाराज यांणीं वडिलांचा रोख इकडे जाहला हें समजून कूच करून माघारे आले, मुधोळ तालुक्यांतून बागलकोट तेरदळ, जमखिंडी वगैरे प्रांतांत दंगा करावा व अथणीकडे जावें अशी बोलवा आहे, व राजश्री रत्नाकरपंत करवीरास आले आहेत," व चत्रसिंग व पाटणकर यांजबरोबर जमियतीचा मजकूर प्रथमपत्रीं व दुसरे पत्रीं "महाराज यानीं मुधोळानजीक येऊन घासदाणा दहा हजार रुपये घेऊन तेथून गलगल्याचे मुक्कामास भृगुवारीं आले. कृष्णाथडीनें अथणी तालुक्यांत उपद्रव करावा असें वर्तमान आहे. लष्करास वडिलांकडेसही लेहून पाठविलें आहे. मोंगलाचीही फौज मंगळवेढें तालुक्यांत आली होती. परंतु प्रस्तुत भीमातीरानें करकंब

तालुकियांत गेली. व पुण्याकडील अधिकोत्तर कळवावें " म्हणून द्रुपत्रीं मजकूर लिहिला तो कळला. ऐशियास करवीरवासी प्रांतांत दंगा करितात. त्यांचे बंदोबस्ताचा विषय मुळीं कितेक आहे तें ध्यानांतच आहे. प्रस्तुत त्यांस मोकळेपण सांपडलें आहे. न करावयास प्रतिबंध काय आहे ? राजश्री रत्नाकरपंत व पाटणकर चत्रसिंग यांची बातमी येथें ही ठेविली आहे. राजश्री भाऊंकडील पत्रें येतच असतील. वरचेवर लिहीत जावें. पुण्याकडील वर्तमान तर श्रीमंतांची प्रकृत बेदिल आहे. ज्वर येत असतो. शिंदे बाया शंभुमहादेवानजीक आल्या आहेत. पुढें ज्योतिबास यावें असें बोलतात. त्यांजवर शिंदे यांजकडून पांच चार हजार फौज व पांच पलटणें फलटणचे सुमारें आल्याची बातमी आली आहे. शोधास माणसें पाठविलीं आहेत. पक्केपणीं वर्तमान येईल तसें लेहून कळवूं. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४७०९ श्रीगणपति. ( माघ शु० ४-८ फेब्रु. )

पै॥। छ० ४ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

अपत्यें हरीनें शिर साष्टांगनमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २ रमजान भृगुवासरपर्यंत मुक्काम नजीक उंबरज कृष्णा उत्तर तीर यथास्थित असे विशेष. वडिलीं पत्रें छ० २८ साबानचीं पाठविलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर विस्तारें कळला. राजश्री माधवरावजींचीं पत्रें त्यांस प्रविष्ट केलीं. पेशजीचे पत्राचें व हल्लींचे पत्राचें उत्तर घेऊन पाठविलें आहे. परवांचे पत्रीं बायांनें लष्कर औंधचे सुमारें आलें म्हणोन लिहिलें, त्यास अद्यापि महादेवाचे अलीकडे आलीं नाहींत. करवीरकर महाराजांचा मुक्काम मुधोळ प्रांतांत आहे. त्याणीं तिकडे बागलकोटपर्यंत उपद्रव लावला आहे. इकडे येऊं लागले तरी अथणी जमखंडी तेरदाळ इकडेही उपद्रव होईल. प्रांत वोस झाला. मंगळवेढेंकडील फौज भीमातीरानें करकंबेचे सुमारें यावयास गेली. चिरंजीव राजश्री नानाचे लग्नाचा सुमार पौर्णिमेचे सुमारें योजिला आहे.( म्हणून लिहिलें तें कळलें. ) रावजींचा साडणीस्वार गेला आहे. परंतु उत्तर कांहीं आलें नाहीं. आमचीं घरचींही पत्रें आलीं नाहींत. कळावें. इकडील वर्तमान तरी सरकारचीं पत्रें आपलें नांवचें एक व तीर्थस्वरूप राजश्री रघुनाथराव दादांचे नांवचें एक आलीं आहेत. फौज रावजींकडे यावी म्हणोन पत्रांत आहे. येतील. शिंदे अद्यापि मांजरीवर आहेत. ऐवजाचा भरणा होतच आहे. जातील तेव्हां खरें. याप्रमाणें लोक म्हणतात. लष्करास

---

१ बाजीरावसाहेबांच्या मनांत.

वडिलांकडे पाठवावयाचे लाखोटे पाठविले आहेत. पुढें रवाना व्हावे. वैद्याची रवानगी पुढें वडिलांकडे जाहली असेल. नसल्यास करावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७१० श्री. ( माघ शु० ४–८ फेब्रु. )

पै॥ छ० ७ रमजान. सन तिस्सा. माघमास.

सेवेशीं विनंती सेवक बापूजी तीर्थो कृतानेक सांष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २ रमजान भृगुवार प्रातःकाळपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपा स्वामी यांजकडे शाखभाजी वगैरे जिन्नस पाठविले होते ते घेऊन तिकडोन पत्र आलें त्याची नक्कल सेवेशीं विदित होय म्हणून पाठविली आहे. त्याजवरून निवेदन होईल. येविशींची आज्ञा काय ते निरोप होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. ऐवजाविशीं दोडवाड व बेहट्टी दोहीं गांवचा तगादा भारी जाहलो आहे. अब्रू राहतां दिसत नाहीं. सेवेशीं श्रुत होय. काल गुरुवारीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेब मोरबेवरून कूच करून बेटगिरीनजीक पूर्व भागास येऊन उतरले. श्रीमंत राजश्री आपासाहेब सावनूर तालुक्याचे व जुने हुबळीचे बंदोबस्तास्तव गेले ते बेहट्टीवरी एक दोन मुक्काम पडोन जर्भान वगैरेची खराबी जाहलेचें वर्तमान बेहट्टीचें पत्र आलें होतें तेंच बजिन्नस सेवेशीं पाठविलें आहे. त्याजवरून मजकूर विदित होईल. अशांत दीड हजार होनांचा तगादा झाला आहे. सेवेशीं इकडील सविस्तर विदित होय म्हणोन विनंती लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ४७११ श्रीगणपति. ( माघ शु० ४–९ फेब्रु. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. आपण छ० साबानचीं पत्रें पाठविलीं तीं छ० मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशीलवारः—

"चिरंजीव राजश्री विठ्ठलराव बापू यांची प्रकृत फारच बिघडली आहे, परंतु पुणें सुटत नाहीं;" म्हणोन लिहिलें तें कळलें व या मजकुराचीं पत्रें बाळाजी गणेश व मोरो आपाजी यांचीं आलेलीं पहावयास पाठविलीं कुडाळ प्रांतींचे समस्त ब्राह्मण यांचें पत्र पाठविलें तें पावलें. कऱ्हाडे यांजशीं खटला जाल्याचा मजकूर व वाडीकर सावंतांस पत्र पाठवावें म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास ब्राह्मणांच्या पत्राचें उत्तर पाठविलें

१ पत्र दोडवाडाहून कमाविसदाराचें. २ तगादा चिंतामणराव आपांकडून.

त्याजवरूनही समजलें. पत्रें पाहून माघारीं पाठविलीं आहेत. जोशी यांच्या लिहिण्यांत प्रकृत अधिक उणी दिसते. बरें. श्री इच्छा! चिरंजीव राजश्री चिंतामणरावआपा याकरवीं चिरंजीवास लिहिवितों व आम्हीं लिहितों. आपलीं लिहिणीं जात असावीं.

"बारामतीहून चिरंजीव बयाबाई यांस बोलावणें आलें आहे. रवानगी करावी कीं काय," म्हणोन लिहिलें तें कळलें. रवानगी करावी. तोंडलीं व शेवग्याच्या शेंगा व कढीनिंब पाठविला तो पावला. कलम १

"राजश्री गणेशराव याणीं व न्यामतखान याणें मिरज प्रांतीं बहुत उपद्रव दिला आहे" म्हणोन लिहिलें त्यास यापुरतें सामान आपल्याजवळ नाहीं कीं काय? कलम.

"करवीरकरानीं मुधोळ तालुक्यांत मोठी धूम मांडली आहे. जमखंडी तेरदळ येथें उपद्रव करतील असें दिसतें. राजश्री रत्नाकरपंत करवीरास जाण्याकरितां गेले" म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास प्रस्तुत करवीरकर बागलकोटच्या सरदेस आले. आवाडाव भारी आहे. आम्हीं याचे पैरवीत आहों. कलम.

आहे. वाडीकर केवळ पत्रावर ऐकावयाचे नव्हत. आपलें पत्र त्यांस गेलेंच आहे. त्याचा जाब काय येतो पहावें. मग समजून करणें तें करावयास येईल. ब्राह्मणांनीं हुजूर सरकारांत जावें हें बरें. कलम

"कागद गड्डया पेशजी नऊ पाठविल्या असतां आठांची पावती आली आहे. त्यास नऊ गड्डयांची व चापाच्या फतऱ्यांची पावती यावयाची राहिली आहे ते पाठवावी" म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास सांडणी स्वारानें आठ गड्डया आणोन दिल्या तितक्यांचीच पावती पाठविली. याचा शोध सांडणी स्वाराजवळ घ्यावा. चापाच्या फतऱ्यांची पावती पाठविली आहे. कलम १

करकंब मंगळवेढ्याकडे शिंदे ++ आहे. घासदाणा मागतात. याचा बंदोबस्त कराविला आहे. रेवतगांवचें ठाणें घातलें होतें तेंच कबूल करवून गांवकरांच्या हवालीं केलें आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. अजमास पाहून करणें तें करावें. कलम.

"इसलामपूरकर वैद्य तूर्त येत नाहींत. त्यांच्या स्त्रीस समाधान जाहल्यावर निघणार" म्हणून लिहिलें तें कळलें. कलम १

एकूण आठ कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० ३ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० ९ रमजान सन तिस्सा.

नं. ४७१२ श्री. ( माघ शु० ५-१० फेब्रु. )

छ० ५ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्येंसमान जनार्दन रघुनाथ. चरणांवर मस्तक ठेवून शिर साष्टांग-नमस्कार विज्ञापना तागायत छ० ४ रमजानपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं आज्ञापत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं, " सरंजामी स्वांर रहिमतपुरीं आहेत ते मिरजेंत आणविले आहेत, तर पाठवून द्यावे " म्हणोन आज्ञा, ऐशास शिंद्याच्या बायांचा मुक्काम श्रीशंभुमहादेवापलीकडे आहे. तेथून वरघांटीं घासदाण्याचे रोखे करून दोन हजार फौज घाटमाथां आली आहे. गांवगन्ना राऊत बसोन मारामारी करून ऐवज घेतात. याजमुळें या प्रांतांतही दहशत पडोन गांव खेडीं गडबडलीं आहेत. कसबेमजकुरीं स्वांर आहेत व शिबंदी दीडशें पावणे दोनशेंपर्यंत आहे याजमुळें हा गांव गडबडों दिला नाहीं. धीर भरंवसा देऊन रयत राखली आहे. धारराव शिंदे यांचे लोक मौजे कनेरखेडास आले आहेत. या प्रांतीं रोखे होणार म्हणोन वर्तमान आहे. रहिमतपुरावर वीस हजारांचा रोखा जाहल्याचें वर्तमान आहे. येथें स्वांर शिबंदी आहे ही आवई पुण्यापर्यंत आहे याजमुळें चहूंकडे दहशत आहे. बायांचे रोख्यांची दहशत फार पडली आहे. अशांत स्वांर नेल्यास गांवास धीर निघत नाहीं. गडबडीचे दिवस आहेत. स्वांर आज्ञापत्राप्रमाणें मिरजेस जाण्यास तयार झाले आहेत. ' तीन दिवसांत विनंती करून मनाचिठी आणवितों, नाहीं तर जावें ' म्हणोन करार केला आहे. तरी स्वांरांस येथेंच रहावयाविशीं आज्ञापत्र द्यावयास आज्ञा व्हावी. आतांच स्वांर गेल्यास गांवास धीर पुरत नाहीं. गांव गडबडेल यास्तव विनंती लिहिली आहे. बहुत काय लिहिणें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७१३ श्री. ( माघ शु० ५-१० फेब्रु. )

पै॥ छ० ७ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं नारो हरी करंदीकर दोन्ही कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० ४ रमजान रविवार पावेतों मुक्काम लष्कर[1]

---

[1] लष्कर करवीरकरांचें.

कृष्णातीर नजीक जैनापूर येथें यथास्थित असे. विशेष. काल पत्रें पाठविलीं त्यांत राजश्री छत्रसिंग व मानसिंगराव पाटणकर यांस आज्ञापत्रें पाठविलीं म्हणोन लिहिलें आहे. त्यास पत्रांत लिहिलें, परंतु ताकीदपत्रें हातास आलीं नव्हतीं याजमुळें राहिलीं. हल्लीं उभयतांस आज्ञापत्रें घेऊन पाठविलीं आहेत. पाव-तील. उभयतांकडे रवाना व्हावयाची आज्ञा व्हावी. बेलवत्तीहून लष्करचा कूच होऊन ममदापुरास मुक्काम जाणार म्हणोन लिहिलें. परंतु तिकडे लष्कर गेलें नाहीं. बेलवतीनजीक कृष्णापार होऊन काल मंदवारीं कृष्णातीरास जैना-पूरचे मुक्कामास आले. येथून गलगलें दोन कोस आहे. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. जैनापूर हा गांव कोल्हार कर्यातीचा फडके यांजकडेच आहे. कळावें हे विज्ञापना. रास्ते शिराळयास आले. राजाज्ञा सातवेंवर फौजसुद्धां गेले. नंतर रास्ते वाळवेंवर जाऊन उतरले, असें वर्तमान आहे. कळावें. आज रविवारीं येथून कूच व्हावें, म्हमदापुरास जावें, असें आहे. तो गाव तोफखाने-कडे आहे. अथणीकडे जावें असा राजश्री हिंमतबहादर यांचा बेत बहुत आहे. विजापुराकडे जावें म्हणतात. परंतु तिकडे पाणी नाहीं याजमुळें जाण्याचा अभाव दिसतो. हे विज्ञापना.

नं. ४७१४ श्री. ( माघ शु० ६-११ फेब्रु. )

छ० ७ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं विज्ञापना. आज इंदुवारीं जैनापुराहून लष्करचा कूच होऊन उपलदिनीवर मुक्काम होणार. रोंख विजापूरचा आहे. तेथून विजापूर सात आठ कोस आहे. विजापुरास जावें, तेथील घासदाणा घ्यावा, ( तेथील किल्ल्यांतून ) एक दोन तोफा थोर काढाव्या, असा मानस आहे. गेल्यावर घडेल तें लिहून पाठवितों. गोटें वगैरे तालुक्यांचीं बोलणीं आलीं आहेत, जसें उरकेल तसें लिहून पाठवितों. ममदापूर नि॥ तोफखाना येथील ऐन चार हजार व दरबार खर्च एक हजार एकूण पांच हजार ठरले. शिवाय एक तोफ द्यावी असा करार झाला. कळावें. मागाहून सविस्तर लिहून पाठवितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७१५ श्रीगणपति. ( माघ शु० ६-११ फेब्रु. )

छ० ५ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

पु॥ अपत्यें कृष्णरायानें दोनी कर जोडोन शिर साष्टांग नमस्कार

---

१ नारो हरी करंदीकराचें करवीरकरांचे लष्करांतुन मिरजेस पत्र. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

विज्ञापना. इकडील वर्तमान शिंद्याचे बायांचा मुक्काम निंबारें येथें आहे. बावडेकरांपासून दहा हजार रुपये घेतले. आठ दिवस खटला पडला होता. दहा वीस माणूस जायां झालें. काल नरसिंगपुरास हजार राऊत आले. पंढरपुरींही चोर पाळतीनें पन्नास पाऊणशें पठाण आले आहेत. जिन्नसखरेदी करणार असें म्हणतात. परंतु आंतील भाव थोर थोर असाम्यांचा पत्ता लावून मागाहून हजार पांचशें सामान घेऊन धराव्या असा बेत आहे. राजश्री गोपाळरावभाऊ आबा चिटणीस यांचे बंधु सहा पलटणें व तीन हजार फौज घेऊन निघाले. समागमें सरकारची पांच सात हजार फौज बज्याबा शिराळेकर व चिमणाजी खंडेराव वगैरे पथकें निघालीं आहेत. जिकडे बाया जातील तिकडे तिकडे त्याणीं जावें असें वर्तमान पंढरपूरचें ऐकण्यांत आलें म्हणोन सेवेशीं लिहिलें आहे. ती॥ मातुश्री काकूसही क्षेत्राहून आणविली. आंबेकरांचींही मुलें माणसें येणार. वडिलांस कळावयास्तव लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४७१६ ( माघ शु० ४–९ फेब्रु. )

पै॥ छ० ६ रमजान.

"मातुश्री लक्ष्मीबाई शिंदे यांचा मुक्काम फौजेसह पळसदेवावर होता तेथून कूच करून निंबसाखरेनजीक दहींगाव नीरातीरास मुक्काम केला. फौजेंत खर्चास नाहीं. पठाण अनिवार आहे. तो पळसदेवाचे मुक्कामाहून लष्कर सोडून तमाम गावोगांव खंडण्या घ्यावयास लागला. परगणे इंदापूर येथें बायानीं दोन वेळ पंचवीस हजार रुपये खंडणी घेतली असतां पठाणानें गांवांत शिरोन मारामार करोन सोळा हजार रुपयेचा ठराव करून देशमुख देशपांडे व गोविंदराव पिंगळे यांचे कारकून वोलीस धरून नेले. शिवाय गांवोगांव खंडण्या घेतल्या. मौजे टणू परगणे इंदापूर, इनामीगांव, तेथील कुळकर्ण्यास धरून झाडास टांगून मार दिला. सातशें रुपयें मागों लागले. पैसा मिळेना, तेव्हां गांवांतील रयतानीं वस्तवानी भरीस घातली. तत्रापि सहाशेंची भरती जाली. मग शंभराच्या रकमेकरितां शेखदार ओलीस राहून कुळकर्णी सोडविला. ब्राह्मण मरेल किंवा वांचेल हा भरंवसा नाहीं. पठाणानें कर्यात बावडें येथें पांच हजार रुपये घेतले व नरसिंगपूर येथून सहाशें घेतलें. देवजी गौळी याचे स्वांर भालवणी येथें चिठी घेऊन गेले तेव्हां वंगोजी नाईक याचे दोघे पुतण्ये कांहीं जमावानिशीं बाहेर पडले. लढाई जाली. वंगोजी नाईकाच्या पुतण्यांस जखमा लागोन ते गांवांत पळाले. मागून गौळी याचे स्वांर जाऊन

कांहीं घरें जाळलीं व लुटलीं. वंगोजीचा वाडा अद्यापि लढत आहे. भाऊसाहेबांकडून राजश्री मुकुंदपंत भिडे बायांकडे बोलावयाकरितां आले आहेत."

नं.४७१७ ( १० फेब्रु. )

भगवंत बहिरव यांचें करकंबेहून पत्र मिरजेस. रवाना माघ शु० ५चें—

" मोंगलांचा मुक्काम येथून दोन कोसांवर मेंढापुरास आहे त्याजकडे स्वामींच्या आज्ञेप्रमाणें बोलण्यास गृहस्थ पाठविला. त्यास त्याजकडील बोलणें जे, बजाबा शिराळेकर याची मिरजेवर चाळीस हजारांची वरात आहे तो ऐवज देणें. बहुत निग्रहाचें भाषण करितात. उपाय नाहीं. ऐवजाकरितां गांवगन्ना व कसबेंत मारामारी करीत आहेत. रयतेजवळ पैसा नाहीं व कोणी कर्ज तर देईना, अशी अवस्था जाली आहे. शिंद्यांच्या बायांच्या लष्करचे पठाण सात आठशें निघोन गांवगन्ना खंडण्या घेतात. ते पंढरपुरास येणार हें वर्तमान क्षेत्रस्थांस कळतांच ब्राह्मण मेंढापुरास मोंगलांच्या लष्करांत म्हैसकर आहेत त्यांजकडे आले. क्षेत्र उध्वस्त जालें. परंतु पठाण अनिवार, देवाची रखवाली पाहिजे, म्हणोन बहुत प्रकारें बोलले. त्यावरून छ० ३ रमजानी कूच करून गुरसाळयाच्या उत्तरेस मुक्काम करून तेथील खराबी केली. यवन लोक अनिवार. चाळीस पन्नास गोवध जाले. जनार्दनपंतास वरचेवर कळवितों' परंतु ब्राह्मण होऊन चित्तावर घेईनात ! मोठा अनर्थ जाला आहे. "

नं. ४७१८ ( माघ शु० ७–१२ फेब्रु. )

नारो हरी यांचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

पै।। छ० ८ रमजान——

"आज गुरुवारीं लष्करचें कूच होऊन तेलसंगानजीक मुक्काम होणार. अथणी कोकटनूर व होनवाड हे तालुके रास्त्यांकडील व विजापूर तेलसंग प्रतिनिधीकडील, येथील घासदाण्याचें बोलणं करण्याकरितां कारकून आले आहेत. जतेकडे जाण्याचा बेत आहे. इकडील तमाम तालुक्यांची बोलणीं आलीं आहेत. "

नं. ४७१९ श्री. ( माघ शु० ७–१२ फेब्रु. )

पै।। छ०९ रमजान तिस्सा तिसैन.

सेवेसीं मोरो आपाजी परांजपे सा।। नमस्कार विज्ञापना ता।। छ० ६ रमजान सोमवार. क्षेम असो. विशेष. राजकी वर्तमान तर राजश्री दौलतराव शिंदे मांजरीवर आहेत. आद्यापवत् कूच जालें नाहीं. बायांचा मुक्काम श्रीमहादेव नजीक आहे. नाशिकाकडे देवजी गौळी वगैरे बायांकडील

आहेत त्यांणीं मोठा अनर्थ मांडला आहे. नाशिकास वेढा घातला आहे. ब्राम्हणांच्या बायकांच्या अबरू घेतात. कांहीं घरें लुटलीं. खणली. पांच सात ब्राम्हण मृत्यु पावले. दहा बारा असामी जखमी जाहले आहेत. कांहीं बायकानीं प्राणत्याग केला. याप्रों क्षेत्रास उपद्रव जाला आहे. शेंदोनशें ब्राम्हण हत्यारें धरून गंगातीरीं बसले आहेत. ' लुटतात, मारितात त्या अर्थी मरोन जावें ' म्हणोन कट करून बसले आहेत. परंतु परिणाम लागणें कठिण ! ईश्वरें क्षोभ केला आहे. कालच पत्रें पुण्यास पांच चार गृहस्थांची आलीं. बायांचा शिंदे यांचा कलह मिटत नाहीं. सरकारांतून व शिंदे यांजकडून फौजा रवाना होणार. नेमणूक जाली आहे. परंतु फौज जाऊन परिपत्य होणें संकट आहे, त्या अर्थी प्रजेचा संहार मांडला आहे. जिकडून बायांचा संचार होतो तिकडे कांहीं राहत नाहीं. शिंदेही कूच करून जातात हा विचार घडणें दुरापस्त आहे. श्री॥ राजश्री पंतप्रधान यांस उपशमन ज्वरास जालें होतें. त्यास फिरोन दोन तीन दिवस ज्वरांश जाला आहे. कोणाचें दर्शन होत नाहीं. इकडील कितेक मजकूर सेवेसीं भेटीअंती निवेदन करीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७२०　　　　श्री.　　( माघ शु० ८–१३ फेब्रु. )

सेवेसीं विनंती सेवक आण्णाजी रामचंद्र. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० ७ रमजान पांच घटका दिवस संध्याकाळचा मु॥ मौजे अंधळी स्वामीचे कृपावलोकनें यथास्थित असे. विशेष. देवरअष्टें येथें रोखा जाला होता, त्यास मनाचिठ्ठी घेऊन दिली त्यावरून काल तोफखान्याकडील लोक उठोन गेले. या सरदेच्या आणखी एखादे गांवास रोखा केला असेल म्हणून गणेशराव यांजकडे शोध केला. परंतु त्यांणीं शपथ वाहिली. याकरितां येऊन देवरअष्टेंत राहिलों होतों. मौजे मजकुरास रोखा जाला आहे असें एकदोन प्रहरानंतर कळलें. त्यावरून आतांच येथें आलों. गणेशराव वांगीवरून पुढें इट्याकडे गेले याकरितां येथें लोक आले होते त्यांस धुडावून लावून द्यावें म्हणोन आलों. मी यावयाचे पूर्वीं स्वामीचे आज्ञापत्रावरून गांवकर जमा होऊन धुडकावून लावून दिले. विदित व्हावयाकारितां विनंती लिहिली असे. करवीरकरांकडील स्वारी काल रात्रीं बुरली अमणापूर पावेतों येऊन गांवकरी धरून नेले. श्री॥ राजश्री बाबासाहेब यांची स्वारी आज तासगांवचे मुक्कामास गेली. गणेशराव यांचे म्हणणेंत आपण माघारे पुण्यास जात नाहीं. खर्चाची ओढ फार याकरितां आठ चार दिवस इटें भाळवणीकडून फिरोन माघारे

वाळव्यास येतों. याप्रों बोलले. त्यांस स्वामींनीं लग्नपत्र पाठविलें तें प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठविलें आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७२१ श्रीगणपति. ( माघ शु० ८–१३ फेब्रुवारी )

पै॥ छ० ९ रमजान सन तिस्सा. माघ मास.

पुरवणी. अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ७ रमजान बुधवार प्रहररात्र वडिलांचे आशीर्वादें यथास्थित असे. विशेष. आज प्रहरा दिवसानंतर कासेगांवास पठाण करोल आले होते त्यांपैकीं दोन तीनशें पठाण मंगळवेढ्यास[1] पंढरपूरचे वाटेनें तोफेच्या गोळ्याचे टप्यावर आले. आमची बातमी अगोदरच आली. सावध होतों. तेव्हां किल्ल्यांतून शेंदोनशें प्यादे व घोरपड्यांकडील अकस्मात दीडशें राऊत व एक हत्ती वस्तीस रहावयास आले त्यांस ही बातमी येतांच त्यांजकडे आम्हीं बोलणें लावून त्यांची बोली करुन ठेविले. ते हे मिळोन कांहीं गांवचे दांडगे हजार पांचशें असे मिळाले. त्यांजकडील लोकांचे तोंडावर जाऊन उभे राहिले. दोन प्रहरपर्यंत ते तलावे करीतच होते. इकडील सामानाचा जथ पाहून ते माघारे मानेच्या पाण्यावर जाऊन उतरले. त्यांजकडील कारकुनानें पत्र पाठविलें जे, कोणी शहाणा पाठवून बोलणें करून घेणें. नाहींतर मागाहून चार हजार पठाण येणार. मग जड जाईल. असें लिहिलें. आम्हीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. प्रसंग असा पडला. उदईक कसें होतें पहावें. त्याजकडे कोणी शहाणा पाठवावा तर कासेगांवीं कारकून बोलावयासीं गेला त्यासच तसदी मनस्वी करूं लागले. असे अविविकी आहेत. यास्तव येथें दोनशें स्वार ठेविले आहेत. वडिलांकडून गाडद व तोफा सत्वर रवाना जाल्या पाहिजेत. सेवेशीं श्रुत होय. यवनांचें[2] लष्कर क्षेत्राचे रखवालीस्तव गुरसालेवर येऊन राहिलें आहे. कृपा लोभ करावा. हे विज्ञापना.

नं. ४७२२ ( माघ शु० ८–१३ फेब्रु. )

नारो हरी यांचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस. पै॥ छ० ९ रमजान.—

“रत्नाकर अण्णाजी पुण्याहून आले. वामनराव गोखले निसबत सरकार बरोबर घेऊन आले आहेत. गोखले हे सरकारांत बोलणें करून आले कीं, हुजुरची स्वारी करवीरास जावी. फौज आपले तालुक्यांत असावी. चिकोडी मनोळी दोनी तालुके महाराजांकडे रहावे. शिवाय अडीच लाख रुपये प्रांत

---

१ मंगळवेढ्याहून पत्र कृष्णराव मंगळवेढकर याचें. २ मोंगलाचें.

द्यावा. पैकीं दरबारास पन्नास हजारांचा सरंजाम द्यावा. बाकी दोन लाख रुपये महाराजानीं घ्यावा. असा ठराव करून आले आहेत. त्यास वामनराव हुजूरची स्वारी माघारी जात नाहीं, दिवसें दिवस सरकार तालुक्यास उपद्रव होतो, याजमुळें रुसवा करून जात होते. त्यास आज समुच्चयेंकरून काय तें सांगतों असा करार केला आहे. स्वारी माघारी जावी, सरकार तालुक्यास उपद्रव करूं नये, असें जाल्यास वामनराव चार दिवस राहून निरोप घेऊन जातील. नाहीं तर उठोन जातील. हुजूरची स्वारी करवीरास जावी, फौज शिरोळच्या घुमटास ठेवावी, असाही मनसबा आहे. अथणी जत वगैरे इकडे जावें असें बोलतात. मनोळीकडे जावें असेंही म्हणतात. परंतु मनोळीकडे जातच नाहींत."

नं. ४७२३ श्रीगणपति. ( माघ शु० ८–१३ फेब्रु. )

पै॥ छ० ९ रमजान. सन तिस्सातिसैन. माघमास.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें कृष्णानें चरणांवर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ७ रमजान प्रातःकाल वडिलांचे आशीर्वादेंकरून क्षेम असों. विशेष. शिंद्याकडील बायांची फौज भालवणीस आल्याचें कालचे पत्रीं सेवेशीं लिहिलेंच आहे. काल कासेगांवावर पांच सातशें पठाण व स्वांर आले. ठाण्यांत कारकून आहे. खंडणीचा मजकूर बोलण्यास कारकून कासेगांवकर यानीं त्यांजकडे आण शपथ त्यांजकडून घेऊन पाठविलेवर बोलणें लागलें. मनस्वी बेरीज लाख पाऊण लाख बोलों लागले. तितकी बेरीज कबूल न करीत. तेव्हां कारकुनांस मारहाण बहुतच केली. त्यांतील एक असामी पळोन आले त्याणीं मजकूर सांगितला. लष्करची वर्तणूक मनस्वी बोलतात. येथें उपद्रव करावा हें दाट वर्तमान आहे. चोंहींकडील गुळें येथें झालें आहे. मागें फौजेचा भर. कोणी बोलण्यास गेला असतां त्याची अब्रू रहात नाहीं. याउपर होईल वर्तमान तें वरचेवर लिहितों. संकट प्राप्त जाहलें. ईश्वर निवारण करील तेव्हां खरें. या प्रसंगीं कांहीं तरी स्वांरांशिवाय येथें बचाव होणार नाहीं. यास्तव स्वांर पाठवावयासीं आज्ञा झाली पाहिजे. येथें ही ओळखीचे स्वांर कांहीं मिळाल्यास ठेवितों. वडिलांचे आशीर्वादें संकट निवारण होईल तेव्हां खरें ! सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

---

१कृष्णराव मेघश्याम पटवर्धन यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र मंगळवेढ्याहून.

नं ४७२४ श्रीगणपति. ( माघ शु० ९-१४ फेब्रु.)

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. मजकूर बीतपशील कलमवार.

" करवीरकर माघारे फिरणार असें वर्तमान आहे त्यांजकडील किरकोळ जमाव ऐतवडें वगैरे जागां फिरत आहे. राजश्री गणेशराव शिराळयांवर गेले होते तेथें काट चालला नाहीं. माघारे येऊन सडे कऱ्हाडास गेले " म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐसीयास करवीरकर माघारे फिरले ऐसी येथें आवई आहे परंतु कागदोपत्रीं लिहिलें आलें नाहीं. ते आपला अजमास पाहूनच आहेत. श्रीइच्छेनें घडेल तें खरें. कलम १

चिरंजीव राजश्री विठलराव बापू यांचें पत्र आम्हास आलें तें पावलें. त्याचा जाब पाठविला आहे. आपल्यास पत्र होतें तें पाहून माघारें पाठावलें आहे. राजश्री कृष्णाजीपंत ढेकणे बदामीस आले. एक दोन रोजांत येतील. कलम १

आमचा मुक्काम उपिनबेटगिऱ्यानजीक दोन कोसांवर होंगल म्हणून गांव आहे तेथें आहे. राजश्री धोंडोपंत गोखले जवळच उतरले आहेत. चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत अपा व महादाजीपंत दाजी सावनूर तालुक्यांत ठाणीं बसवावयास गेले आहेत. कांहीं ठाणीं बसलीं. लवकरच तिकडील काम आटोपल्यावर पुढील रोंख धरावयाचा. येविषयींचा बेत ठरत आहे.

एकूण तीन कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना. छ० ८ रमजान. बहुत काय लिहिणें. राजश्री कृष्णाजीपंत ढेकणे आज येथून दोन कोसांवर आले. कळावें लोभ करावा आशीर्वाद

पै॥ छ० १५ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ

नं. ४७२५ श्रीगणपति. ( माघ शु० ९-१४ फेब्रु. )

पै॥ छ० ८ रमजान. तिस्सा तिसैन. माघ.

तीर्थस्वरूप राजश्री काका साहेब वडिलांचे सेवेशीं. अपत्यें कृष्णरायानें दोन कर जोडून चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० ६ रमजानपर्यंत वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेष. शिंद्यांकडील बायांची फौज वणगोजी नाईक निंबाळकर यांचे भालवणीस आली. त्यांची त्यांची गोळागोळी होऊन दहा वीस माणूस जायांजखमी

१ पत्र परशरामभाऊंचें बाळासाहेबांस मिरजेस.

जाहलें. निंबाळकरांकडील दोन खासे त्यांनीं पाडाव धरून नेले. येथून भालवणी बारा कोस आहे. कासेगांवकर कमावीसदार राजश्री दाजीबा आठवले काल सोमवारीं प्रातःकाळीं येथें आले. भालवणीची पेठ लुटली व जाळली, याप्रमाणें कासेगांवकर आले त्याणीं सांगितलें. येथून बातमीस माणसें पाठविलीं आहेत. बायांचे लष्करांत अघाडीस पठाण आहेत. भालवणीस त्याणीं फार अनाहूत केलें या धास्तीमुळें पंढरी, कासेगांव अगदीं वोस जाहलें. सांगोलें ही फुटलें. पुढें कोणीकडे जातात समजत नाहीं. बायांकडे करकंबेहून राजश्री बाबूराव राम पागे गेले म्हणून आयकिलेवरून त्यांजकडे ही पत्र पाठविलें आहे: वडिलांस कळावें यास्तव विनंती लिहली आहे. सेवेशीं श्रुत होय. कृपा लोभ करावा. हे विज्ञापना

नं ४७२६ ( माघ शु० १०–१५ फेब्रु· )

नारो हरी याचें करवीकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस. पै॥ छ० ११ रमजान.—

अलीकडील तालुक्यांचे घांसदाण्याचा जाबसाल उरकला बितपशील—

| | ऐन | दरबारखर्च |
|---|---|---|
| परगणे विजापूर नि॥ प्रतिनिधि. | १५००० | २००० |
| हुकळी (?) मनगोळी नि॥ रास्ते. | ३०००० | ३००० |
| मोडवाड नि॥ रास्ते. | ८००० | २००० |
| होनवाड नि॥ रास्ते. | २५००० | ५००० |

येणेप्रों बोलणीं उरकलीं. अथणी कोकटनूर तेलसंग यांचा जाबसाल ठरल्यावर लिहून पाठवितों. तेलसंगकर वांगीकर याणीं कांहीं कहीर्चीं तट्टें पाडून नेलीं सबब त्यांजवर मर्जी रुष्ट आहे. वीस हजार रुपये त्यांस मागतात. अद्यापि जमखिंडीस वेध लागला नाहीं. राजश्री दौलतराव घोरपडे लष्करांत आले होते. शरीरेंकरून फारच अशक्त. कमरेखालीं जीव नाहीं. आजच निरोप घेऊन गलगलेस गेले."

नं. ४७२७ श्रीशंभुः ( माघ. शु० १०–१५ फेब्रु. )

छ० १२ रमजान सन तिस्सा तिसैन. माघ मास.

राजश्री गंगाधरराव गोसावी यांसीं —

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित राजे खेम सांवत भोंसले बहादर. सरदेसाई प्रांत कुडाळ व महालानिहाय. रामराम विनंती उपरी

१ मंगळवेढ्याहून

येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. "चिरंजीव राजश्री गोविंदपंतनाना यांचे लग्नाचा निश्चय माघ शुद्ध दशमीस केला आहे. शरीरसंबंध राजश्री बाळकृष्णपंत बाळ यांची कन्या नेमस्त केली असे. तर आपण सहकुटुंब सहपरिवारें येऊन मंडप शोभिवंत केला पाहिजे;" म्हणून लिहिलें, उत्तम आहे. सदैव पत्रद्वारें स्नेह घरोब्याची अभिवृद्धि होई तें करावें. रवाना छ० ९ माहे रमजान. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

(पार्शी शिक्का)



नं. ४७२८ श्रीगणपति. ( माघ शु० १०-१५ फेब्रु. )

छ० ११ रमजान सन तिस्सा तिसैन. माघमास.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं--

अपत्यें कृष्णरायानें दोनी कर जोडून चरणांवर मस्तक ठेवून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० ९ माहे रमजान अस्तमानपर्यंत वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासीं आज्ञा केली पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान तर शिंद्यांचे बायांकडील पठाण याणीं घरनिरखीप्रमाणें माणेच्या तीरीं कासेगांवाहून येऊन राहिले. छ० ७ रमजानीं गांवापासून एक कोसावर तळ्याव्यास उभे राहून गेले. काल छ ८ रमजानीं खंडणीच्या बोलण्यास कारकून पाठवावा म्हणोन दोन तीन चिठ्ठया त्यानीं पाठविल्या. त्यास त्यांजकडे कारकून पाठवावा तरी कासेगांवच्या ठाणेंतील त्यांजकडे कारकून गेला त्यास अडकावून हाणमार करूं लागले, या अर्थी 'कारकून पाठवितां येत नाहीं. तुम्हांकडील कोणी पाठवून द्यावा.' म्हणून त्यास उत्तर लिहून दिलें. तदनंतर त्यानीं काल सायंकाळीं नरसिंगराव देशमुख कुपसंगीकर याजसमागमें दोन भले माणूस पाठविले. त्यांचें बोलणें तीन लाख रुपये खंडणी द्यावी! आम्हीं त्यांस उत्तर केलें कीं, तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब बाळासाहेब यांजकडे महाल सरंजामास आहे. त्यांचा व बायांचा स्नेह. हे तुम्हीं खंडणी मागूं नये. कांहीं मेजवानीदाखल घासदाणा घेऊन जावें. असें म्हटल्यास माघारे गेले. आज प्रातःकाळीं चालोन आले. त्यांजकडील सामान चार पांचशेंपर्यंत होतें. आम्हांकडील राऊत दीडशें

१ पत्र मंगळवेढ्याहून बाळासाहेबांस.

ावणे दोनशेंपर्यंत होते व प्यादे दोनशेंपर्यंत त्यांचे तोंडावर गेले. त्यांची गांची लढाई प्रातःकालच्या सहा घटकांपासून दोन प्रहरपर्यंत जाहली. यांजकडील सामान चांगलें, आम्हांकडील सामान नवें, याजमुळें तोंडावर ठरले नाहींत. सरकत सरकत माघारे गांवांत आले. त्यानीं गांवाभोंवताला तलावा करून माघारे गेले. लढाई चांगली झाली. कदीम हशमांतील सात आठ असामी ठार व जखमी दहा बारा व शिलेदारांतील चांगला एक भला माणूस ठार झाला. इकडील एक घोडी त्यानीं पाडून नेली. तिकतील दोन घोडीं इकडे शिलेदारांकडे पाडाव आलीं. तीर्थस्वरूप राजश्री गणपतराव यांजकडील उंट नफर २ परवांचे दिवशीं त्यानीं नेले. घोरपडे म्हणून शिलेदार आहेत त्यांजकडील दोन असामी जखमी झाल्या. गांवकीपैकीं कुणबी चार असामी ठार व कुलकर्णी शेषो गोपाळ ठार व आणखी एक दोन कुलकर्णी यांस जखमा लागल्या आहेत. वरकड सविस्तर लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७२९ श्री. ( माघ शु० १०–१५ फेब्रु. )

छ० १२ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक देवराव कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० ९ माहे रमजानपर्यंत स्वामींचे कृपेकरून यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपा यांनी तिमाप्पा वड्ड व रघुनाथसिंग पेंढारी यांसीं पत्र देऊन येथें पाठविलें आहे. त्यास मी सांगितलें, यमकनमुरडीकरानीं जमाव करून काल बोरबाग गांव जाळून गुरें व नागावा घेऊन गेले. गांवकर दोघे तिघे ठार झाले व जखमी झाले. त्यानीं बारींत लोक घातले आहेत. त्यास तुम्ही या प्रांतीं राहून यमकनमुरडी वगैरे तालुक्यांत स्वारी करून येऊन येथें राहणार. तेव्हां बारींतून पार होऊन जाणें कठीण. तत्राप गेलां आणि माघारे येतांना बारींत सांपडल्यास कसें होईल ? झाडीचें रान. येथें राहून परिणाम लागणार नाहीं. मैदान रानांत जाऊन केल्यास ठीक होईल. " म्हणून सांगितलें. इतक्यांत राजश्री बळवंतराव पाच्छापूरकर यानीं पाच्छापूरचें ठाणें घ्यावयाची मसलत करून जमाव मिळविला आहे. पेंढारी आले आहेत यांसीं त्यानीं बोलून पाच्छापूर तालुक्यांत जावें; आम्हीं बरोबर येतों, असा करारमदार होऊन आज रात्रौ जावयास सिद्ध झाले आहेत. किल्याचा आसरा तुम्हांस देऊं असें बोलून करार झाला. प्रांतमजकुरीं वर्दळ पडून खेडीं खराब होतील

या अंदेशामुळें पेंढारी यांस सांगितलें; व श्रीमंताचे पत्राचें उत्तर लिहून पेंढारी यांजपाशीं दिलें त्याची नक्कल बजिन्नस पाठविली आहे त्याजवरून विदित होईल. किल्यांतील दारू गोळा वगैरे सामान घेऊन जातात. ईश्वरइच्छेनुसार घडेल. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबानीं पाठविलें असतां आम्ही माघारे नामोहरम होऊन जाणार नाहीं म्हणोन पेंढारी पाच्छापुरकरांबरोबर जातात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७३० ( माघ शु० १३–१८ फेब्रु. )

रामाजी अनंत यांजकडून तेरदाळाहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० १२ रमजानचें—

"श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांजकडील दोन हजार फौज जाऊन पाच्छापुरांत ठाणें घातलें."

नं. ४७३१ श्री. ( माघ शु० १३–१८ फेब्रु. )

पै॥ छ० १५ रमजान. सन तिस्सातिसैन. माघ.

सेवेशीं गणेश गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १२ रमजान मुक्काम नजीक दोडवाड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं पत्र पाठविलें तें पावलें. "बायांचा मुक्काम कातरखटावचे सुमारें आला. औंदास आज उद्यां येणार. मागाहून त्यांचे पाठीवर पलटणें येणार. पुण्यास वऱ्हाडी यांस आणावयास पाठविलें आहे. कसें सुरक्षित येण्याचें होतें नकळे;" म्हणोन लिहिलें, त्यास स्वामीनीं बक्षींकडे पत्रें पाठवून मार्गाचा बंदोबस्त करविलाच असेल. वराडी येऊन लग्नाचा निश्चय कधीं तें ल्याहावयास आज्ञा करावी. सरकारांतून श्रीमंतांकडून वस्त्रें राजश्री कृष्णाजीपंत ढेंकणे यांजबरोबर आलीं तीं आज श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस प्रातःकाळच्या बारा घटका दिवसास दिलीं. मोत्यांची कंठी व शिरपेंच दिला. श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा व बाबासाहेब व दाजी व बापूसाहेब यांस ही वस्त्रें व शिरपेंच आले आहेत. सेवेशीं श्रुत होय. सावनूर तालुक्याचीं ठाणीं घालावयास फौज गेली ती हावेरीवर आहे. झाडून ठाणीं बसल्यानंतर येथून कूच होणार हे विज्ञापना.

नं. ४७३२ श्री. ( माघ शु० १३–१८ फेब्रु. )

राजश्रिय विराजित राजमान्य राजश्री परशुराम रामचंद्र स्वामी गोसावी यांस

पोष्य बाजीराव रघुनाथ प्रधान. नमस्कार. विनंती उपरी. येथील कुशल

जाणोन स्वकीय लिहीत जावें. विशेष. चितपावन ब्राह्मण व कऱ्हाडे ब्राह्मण प्रांत कुडाळ, यांचा वृत्तीसंबंधाने वगैरे कजिया लागोन राजश्री राजे खेम सावंत भोसले बहाद्दर सरदेसाई प्रांत मजकूर वगैरे महालानिहाय यांजकडे फिर्याद गेले. त्याणीं त्यांचें मनास न आणितां कऱ्हाडे यांच्या समजाविल्यावरून चितपावन यांजपासून मसाले व गुन्हेगाऱ्या घेऊन उपद्रव केला आहे म्हणोन हुजूर विदित जालें. त्यावरून प्रांतमजकूरचे उभयतां ब्राह्मणांस इनसाफाकरितां तुम्हांकडे पाठवून द्यावयाविशीं सरदेसाई यांस आज्ञा करून हें पत्र लिहिलें आहे. तर तुम्ही त्यांचें वर्तमान वाजवी मनास आणून कजिया विल्हेस लावणें. जाणिजे. छ० १२ रमजान. सन तिस्सा तिसैन. मय्या व अलुफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ४७३३ श्री. ( माघ शु० १५–२० फेब्रु. )

छ. १५ रमजान सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं विनंती सेवक महादाजी विठ्ठल साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १४ रमजान बुधवार प्रथम प्रहर रात्रपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजमंडळाची फौज वडगांवावर होती ती आज निघोन शिरोळास जाऊन उतरली. दोनशें स्वार आहेत. आणखी मागून छत्रसिंग दोन तीनशें स्वारानिशीं शिरोळास येऊन राहणार. महाराजही मिरज प्रांतांतून येऊन शिरोळास मुक्काम करणार अशी वदंता आहे. आपणाकडे ही वर्तमान असेलच. मिरज प्रांतांतून घांसून येतात, तेव्हां शेर होतील याचा विचार आपण योजिलाच असेल. पुढें आम्हांस बुद्धिवाद काय? येथें आम्हीं आपल्या आधारावर स्वस्थ आहों. बचाव व्हावयाची पैरवी असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७३४ श्री. ( माघ व० १–२१ फेब्रु. )

पै॥ २३ रजमान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं बालकृष्ण महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १५ रजमानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० २० साबानचें पत्र एक स्वदस्तूरचें पाठविलें तेथें आज्ञा जे, "वाडी प्रांतींचे चित्तपावन ब्राह्मण व कराडे ब्राह्मण यांचा वृत्तीविशीं कजिया लागोन राजश्री खेम सांवंत भोसले यांजकडे फिर्याद गेले. त्यानीं

---

१ दातार फडणीस यांचें इचलकरंजीहून बाळासाहेबांस पत्र. २ बाळ. नाना फडणिसांचे कारकून. यांचें हें बाळासाहेबांस पत्र.

कऱ्हाडे यांचा पक्ष करून चित्तपान ब्राह्मणांस मसाले व गुन्हेगारी लावून राज्यांतून जावें म्हणोन सांगितलें. त्या वरून ब्राह्मण दोन तीनशें मिरजेस आले आहेत. येविशीं राजश्री नानांस पत्र लिहिलें आहे. सविस्तर तुम्हांस पत्र लिहिलें आहे तें श्रीमंतास दाखवून मनसुफी तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेबांकडे नानांस विनंती करून घ्यावी. " त्यावरून श्रीमंतांस विनंती करून श्रीमंत नानांकडून श्रीमंतांकडे विनंती करवून खेम सांवत भोसले यांस व व श्रीमंत भाऊसाहेबांस सरकारचीं पत्रें घेऊन पाठविलीं आहेत त्यावरून विदित होईल. व श्रीमंत नानांस पत्रें पाठविलीं तीं प्रविष्ट करून उत्तरें घेऊन पाठविलीं आहेत त्यावरून निवेदन होईल.[1] राजश्री मोरोपंत परांजपे यांस आज्ञेप्रमाणें (इकडून) रवाना केलें. त्यांची रवानगी सत्वरच करावयाची आज्ञा व्हावी. लग्नकार्य सिद्धीस गेलेंच. पांच सात रोज समारंभ करून तीर्थस्वरूप राजश्री दादाची व सर्वांची रवानगी मोरोपंतांसमागमें देऊन करावी. फाल्गुन मासांत मुलांचीं लग्नें करून घ्यावयाचीं आहेत. मार्गांत दंगा आहे. रवानगी सावधपणें झाली पाहिजे. व छ० ६ रमजानचीं पत्रें ( आपण ) पाठविलीं ती पावलीं व मोरोपंतास पत्रें पाठविलीं तीं श्रीमंतांस दाखविलीं. शिंदे यांचे बायांचें श्रीमंत भाऊसाहेबांचें संधान नाहीं म्हणोन श्रीमंतांचे पत्रीं दर्शविलें, त्यास येविशींचा बंदोबस्त स्वामीकडून चांगला असावा. मोरोपंतास येथील आज्ञा देविली ते समयीं श्रीमंत नानानीं आपणांस निरोप सांगावयाचे ते सांगितले आहेत. त्याणीं विदित केलेच असतील. राजश्री कृष्णाजीपंत ढेकणे सरकारचीं वस्त्रें वगैरे श्रीमंत भाऊसाहेबांस ( घेऊन ) गेले आहेत त्यांचें उत्तर आलें नाहीं. आल्यावर भाऊसाहेबांस मसलतीविशीं पत्रें सरकारचीं जातील. करवीरची मसलत भाऊसाहेबांस सांगत नाहींत. टिपूकडील ठरावांत येईल असें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७३५ श्रीगजानन. ( माघ व० १–२१ फेब्रु. )

पै॥ छ० २० रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

विज्ञापना तागायत छ० १६ रमजान गुरुवासर दोन प्रहर. क्षेम असो. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री रावसाहेब बाहेर डेरे दाखल होणार होते ते राहिले. अलिजाबहादर याणीं तूर्त बाहेर जाऊं नये ऐसा निरोप पाठ-

---

१ कारकून बाळाजीपंत जोशी यांचें पण्याहून मिरजेस पत्र.

विला म्हणोन राहिले. श्रीमंत राजश्री येजमान साहेब बांबवडें येथील हणमंतास सेवा करीत आहेत. उभयतां मिळोन करतात. राजश्री बाळाजी नाईक भिडे यांचे नातवाचें लग्न होत आहे. गोंधळेकर आपाजीपंत यांची कन्या निश्चय जाहला. आज आमचे वाड्यांत गडगनेर आहे. सणगें खर्च होतील त्याची याद मागाहून सेवेशीं लिहून पाठवितों. सेवेशी विदित होय हे विज्ञापना. सर्व मजकूर नाईक सांगतां विदित होईल. हे विज्ञापना.

नं. ४७३६ श्री. ( माघ व० १–२१ फेब्रु. )

पै॥ छ० २३ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० १५ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री दौलतराव शिंदे यांची व बायांची समजी जाहल्याविना शिंदे जातात असें होत नाहीं. मांजरीवर आहेत. जातील तो सुदिन ! सांप्रत कंपूवाले यांचे हातून समजी व्हावी असाही विचार होत आहे. घडेल तें खरें. श्रीमंत प्रधानपंत खासा नानांकडे एकटे आले होते. बरेंच आहे. श्रीमंत अमृतराव संगमनेराकडे जाणार होते ते शिंदे याणीं राहून घेतले आहेत. चांगले दिवस नाहींत. हे विज्ञापना.

नं. ४७३७ श्री. (पौष व० ३–२४ जाने०)

पै॥ छ० २३ साबान. तिस्सा तिसैन.

सेवेशीं मोरो आपाजी परांजपे सा॥ नमस्कार विज्ञापना छ० १७ साबान गुरुवासर. सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. "करवीरवासी महाराजांचा मुक्काम संवदत्तीवर आहे. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचे सैन्यास सहा गांवांचें अंतर आहे. महाराज यांची कस्त भाऊसाहेब यांचें सैन्यावर चालोन जावें अशी आहे" म्हणून स्वामीनीं लिहिलें त्यावरून श्री॥ राजश्री नानांस श्रुत केलें. त्यावरून उत्तर केलें कीं, "त्याचा मृत्यु आला असेल म्हणोन अशी बुद्ध धरिली ! राजश्री भाऊंजवळ सामान भारी. गांठ पडली असतां पारिपत्य होईल." म्हणोन उत्तर केलें. त्यावरून "महाराजांची वर्तणूक कशी आहे हें सर्व ध्यानांत आहे. आपण नगराकडे गेलां ते समयीं साखरा वाटल्या. तिकडून फिरोन पुण्यास येणें जाहलें तेव्हां पेढे वांटले. खुशाली केली. या तऱ्हेची वर्तणूक राजश्रींची असतां सरकारांतून तह होतो ! श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांस सरकारांतोन वाडा बांधोन दिला तो त्यांणीं दग्ध

१ विठ्ठलराव पांडुरंग पटवर्धन. २ पतिपत्नी. ३ बाळकृष्णपंत बाळ यांचें मिरजेस पत्र.

केला. वाड्यानें महाराजांचें काय केलें होतें ? प्रसंग सर्वांवर येतो. वाडा जाळिला हा लौकिक जाहला आहे. सर्वप्रकारें तीन वर्षें सरंजामाची खराबी मांडिली. रास्ते यांचे फौजेवर दगा करून गडबड केली. हल्लींही महाराजानीं हुबळीची पेठ मारिली, दहा लक्षांची मत्ता नेली. हातानें सोनें वजन अदमासें घेतलें. पुढें साधेल तें करीतच आहेत. सरकारांत तो बोलणें तहाचें लाविलें आहे, परंतु त्यांचें बोलणें ठरावयाचें नाहीं. तूर्त प्रांताचा मात्र भोग आहे. आपली आज्ञा पेशजी जाहली कीं, तूर्त प्रसंग पाहून तहच करावा. पांच रुपये कमी ज्यास्तीकडे पहावयाचें नाहीं. या कामास भाऊंस गुंतवावयाचें नाही. त्यांस मातबर काम सांगावें या योजनेंत आहों. त्यास हा विचार मी मिरजेस लिहिला होता. तिकडून आज्ञा आली कीं, 'महाराजांची वर्तणूक याप्रकारची असतां सरकारांतून तह होतो ! वडिलांची मर्जी राहणार नाहीं. याप्रमाणें लिहिलें आहे. त्यास याचा विचार करणें तो केला पाहिजे. सर्व प्रकारें खराबीखालीं आलों. हल्लीं पांच रुपये सरकारांत रास्ते यानी करार केला असेल त्याचा निर्गम कसा होतो ? सहा महिने आठ महिने फौजेचा पेंच मोठा आहे. ईश्वर पार पाडील तेव्हां खरें. सर्व काळजी आपणांस असावी. " त्यावरून उत्तर आलें कीं, " भाऊंचा वाडा जाळिला ( तें आम्हीं ) महाडास ऐकोन हे गोष्ट वाईट केली म्हणोन त्यांस सांगितलें हें सर्वांस ठाऊक आहे. हल्लींही त्यांचें बोलणें होत आहे. परंतु त्यांचें एक पत्र मला आलें आहे कीं, येथें त्यांजकडील बोलणें बोलतात याणीं तिकडे लेहून पाठविलें होतें त्याचें उत्तर लिहिलें आहे कीं, हें बोलणें आमचें नाहीं ! याप्रों उत्तर आलें त्यावरून संशयांत पडलों. इकडे बोलतात हें काय ? त्यांचें पत्र आलें त्यांत कबूल नाहीं म्हणतात ! त्यास कसें होतें पहातों. शेवट विचार कळतच आहे. " याप्रों उत्तर जालें. " फौजेचा पेंच भारी म्हणोन तुम्ही म्हणतां, गोष्ट खरी. परंतु इतकी फौज याचें काम तूर्त नसतां ठेविली ! मागेंपासून आम्ही* सांगतच आलों. राजश्री बाबा काळे याजपाशीं एकदोन वेळां ( बोललों कीं ) फौज फार ठेऊं नये. आपले बचावापुरती फौज ठेऊन स्वस्थ असावयाचें होतें. तुम्हाजवळही मागें सांगितलेंच होतें. हल्लीं तुम्ही म्हणतां फौजेचा पेंच थोर ! उगेच खर्चाखालीं यावें हें काय ? " याप्रों उत्तर जालें. मागाहून सविस्तर विनंती लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

* नानी

नं. ४७३८ श्रीगणपति. ( माघ व० ३–२२ फेब्रु० )

चिं॥ राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. राजश्री धोंडोपंत गोखले यांची गांठ पडोन पुढील इत्यर्थ काय ठरावांत आला हें लिहावें म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐसीयास लौकरच पुढील इत्यर्थ ठरावांत येईल. मग आपल्यास लिहून पाठवूं. रवाना छ० १६ रमजान. बहुत काय लिहिणें. हे आशीर्वाद.

नं ४७३९ श्रीगणपति. (माघ० व० ४– २३ फेब्रु.

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. आपण छ १० रमजानचीं पत्रें पाठविलीं तीं छ० १५ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशील कलमवार.

राजश्री नाना व राजश्री मोगे आपाजी यांचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारी पाठविलीं आहेत. कलम १

"वराडी कोलापुरास आले. पौर्णिमेचा मुहूर्त निश्चयांत आणिला आहे" म्हणोन लिहिलें तें कळलें. कार्यसिद्धि जाहलीयाचें लिहावें. कलम १

" मोंगलाकडील फौजेचा दंगा करकंबेकडे व पठाणांचा दंगा मंगळवेढेकडे बहुत आहे. ऐवज मागतात" म्हणोन लिहिलें तें कळलें. परगण्याचा भोग आहे ! या मजकुराचीं पत्रें दोहों महालकरी यांचीं आलेलीं पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. कलम १

चि॥ राजश्री रामचंद्रपंत आपा व महादाजीपंत जमीयतानिशीं सावनूर तालुक्यांत ठाणीं बसवावयास गेले आहेत. हावेरी वगैरे ठाणीं बसाविलीं. कांहीं बसावयाचीं राहिलीं आहेत. तिकडील कामें आटोपलीं म्हणजे इकडे येतील. कलम १

" करवीरकर अथणीनजीक आले. तालुक्यांत दंगा भारी मांडिला आहे. गणेशराव वाळव्यांहून वांगीकडे गेले " म्हणून लिहिलें तें कळलें. कलम १

" चिरंजीव राजश्री बळवंतराव दिक्षित यांच्या कन्येचें लग्न जालें. चि॥ राजश्री रघुनाथ राव दादा मिरजेस आले आहेत. चि॥ राजश्री हरिपंतबाबा तासगांवीं आले;" म्हणून लिहिलें तें कळलें. संतोष जाहला. चिरंजीव तासगांवाहून मिरजेस आलेच असतील. त्यांचे लखोटे पाठविले ते पावले. कलम १

राजश्री कृष्णाजीपंत ढेंकणे लष्करांत येऊन पोहोचले. वस्त्रांचा समारंभ

---

१ पत्र परशुराम भाऊंचें.

माघ शुद्ध त्रयोदशीस जाहला. येविषयींचें मुजरद खिजमतगाराबरोबर लिहिलें आहे. पत्रें पावलींच असतील. कलम १

एकूण सात कलमें लिहिलीं आहेत त्यांजवरून कळेल. रवाना छ० १७ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० २० रमजान तिस्सा तिसैन. माघ वद्य सप्तमी. भौमवार अस्तमानचा दोन तास दिवस.

नं.४७४० श्रीगणपति ( माघ व० ४–२३ फेब्रु. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी राजश्री हरबाआपा धायगुडे यांस वायूचा उपद्रव जाहला आहे. याजकरितां वायुहारक तेल आपल्या संग्रहीं असल्यास पाठवून द्यावें. सालवादोर किरिस्तांव याजपाशीं तेल आहे म्हणोन कळलें. त्याकडून आणवून पाठवावें. रवाना छ १८ रमजान. बहुत काय लिहिणें. फारच हैराण आहेत. यास्तव लौकर पाठवावें. लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० २० रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ ७ भौमवासर अस्तमान दोन तास दिवस.

नं.४७४१ श्री. ( माघ व० ४–२३ फेब्रु. )

पै॥ छ० २० रमजान सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान तागायत छ० १७ रमजान मुक्काम नजीक दोडवाड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं दोडवाडकरांबद्दल दोन पत्रें दहावे अकरावे तारखेचीं पाठविलीं तीं पावलीं. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचीं पत्रें प्रविष्ट केलीं. उत्तरें दिलीं तीं हल्लीं पाठविलीं आहेत. सविस्तर सर्व लिहिलेंच असेल त्याजवरून विदित होईल. "मंगळवेढें करकंबें पंढरपूर येथें बायांचा बहुत उपद्रव जाहला. करवीरकर महाराज तेलसंगांवावर आहेत. रत्नाकरपंत चिंचणीवर होते. महाराजांची आज्ञा जलद येणेंविशीं आली त्याजवरून निघोन गेले. अथणी वगैरे रास्त्यांचे तालुक्यांच्या खंडण्या घेत आहेत. पुढें कोणते मार्गें जातात पहावें. या समयीं फौज इकडे आल्यास उत्तम. नाहींतर प्रांताची खराबी होते" म्हणून लिहिलें तें कळलें. प्रस्तुत तिकडे फौजेचा जमाव नाहीं त्यापक्षीं कसें पडतें न कळे. फौजेविशीं श्रीमंतांस स्वामींनीं लिहिलें होतें त्याचें उत्तर त्यांनीं लिहिलेंच असेल. सावनूर तालुक्याचीं ठाणीं लौकर बसतीं म्हणजे स्वारी बारीपार लौकर येती. परंतु

सावनूर तालुक्यांतील मातबर ठाणीं बसावयाचीं आहेत. गोखल यांजबरोबर आणखी कांहीं फौज देऊन रवाना केले आहेत. परंतु त्यांचीं बोलणीं ठरत आहेत. गद्गाकरितां परवां रुसून कूच करून दोन तीन कोस मोरबचे मुक्कामास गेले होते. मागाहून राजश्री सदाशिवपंत मनोळीकर व गोपाळपंत सोनी यांस पाठवून गोखले यांस माघारे आणिले. खासा धोंडोपंत नरगुंदास मातुश्रीचे भेटीस गेले आहेत. चार दिवसीं येतील. नंतर रवाना करितात. काय घडतें पहावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४७४२　　( माघ व० ६–२५ फेब्रु. )

नारो हरी याचें करवीरकरांचे लष्करांतून पत्र मिरजेस पै॥ छ० २१ रमजान—

" बाहिरजी घोरपडे–मालोजी घोरपडे यांचे नातू–व ज्योती घोरपडे छपरबंद दोनशें लोकांनिशीं चाकरीस राहण्याकरितां काल रात्रीं येथें आले. छत्रपति महाराज यांस काल बायांकडून पत्र आलें कीं परशुरामपंत भाऊकडून कारकून बोलावयास आला आहे. त्यास सख्य करून घ्यावें यांत उत्तम आहे. आम्हांकडून कारकून बोलावयाकरितां भाऊंकडे जात आहे. हें बायांचें लिहिणें महाराजांच्या मर्जीस आलें नाहीं. ढालगांव कर्यात व धुळगांव व रांजणी येथील लोकांस गुरेंढोरें काढून जतेकडे जाण्याविशीं मी चिठ्या पाठविल्या आहेत. लष्करचा मुक्काम वेळुगावरच आहे. "

नं. ४७४३　　( माघ व० ६–२५ फेब्रु. )

नारो हरी याचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस. पै॥ छ० २१ रमजान—

" बायांच्या व यांच्या भेटी जालेवर मिरजप्रांत वगैरे याची नासाडी करावी हा मानस खचित आहे. साधलें असतां मिरजेची पेठ मारावी असाही मानस आहे. येविशीं पूर्वी एकदोन वेळ सूचना केली आहे. सावधतेविषयीं विलंब व्हावयाचा समय नव्हे. सर्व स्वामींच्या ध्यानांत आहे. लष्करच्या सपीम गांव लागले त्यांचा बचाव होणें कठिण आहे. मजकडून होईल तितकी विनंती करून खटपट करीत आहें. परंतु येथील भरंवसा कांहीं येत नाही.

नं. ४७४४　　( माघ व० ६—२५ फेब्रु. )

नारो हरी याचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस. पै॥ छ० २१ रमजान.—

" हुजूरच्या स्वारीचा मुक्काम आज इंदुवारी बेळूर परगणे येथेंच आहे. बायांचा मुक्काम जतेपलीकडे चार कोसांवर आहे. काल रविवारीं इकडील तलावा डफळापुराकडे गेला होता त्यांची व बायांकडील चार पांचशें लोकांची भेट जाली. "

नं. ४७४५ श्री. ( माघ व० ७–२६ फेब्रु. )

पै॥ छ० २५ रमजान. सन तिस्सा. माघ.

सेवेशीं आपाजी हरी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० २० रमजान दोन प्रहरपावेतों स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. शिंद्यांचे बायांचें लष्कर जतेवर आहे. जत व करजगीची खंडणी मागतात. जतेसभोंवते उतरले आहेत. करवीरकरांची खंडणी तीस हजार डफळ्यानीं कबूल करून त्याची तरतुद करून गांवगन्ना आपले तालुक्यानी चिठ्ठ्या करितात. महाराजांची फौज जिरग्याळावर जते नजीक तीन कोस आहे. बायांची फौज जतेवर. यांस त्यांस तीन कोसांचें अंतर आहे. येथील खंडणीचा जाबसाल उरकोन हलसंगीकडे येणार अशी आवई दाट बोलतात व चडचण तालुक्यास येणार हें ही वर्तमान आहे. कदाचित या रोखें माघारें आल्यास रेवतगांव वगैरे आमच्या तालुक्यास उपद्रव होईल. लष्करांत कांहीं कैद नाहीं. त्यास या रोखें लष्कर कदाचित आल्यास श्रीमंत राजश्री कृष्णरावजींस पत्र पाठविलें पाहिजे जे, आमचें पत्र कुमकेविशीं आलियास कुमक करणेंविशीं आज्ञा व्हावी. अनायासें जमाव आहे. दाबही बसेल. विदित होय हे विज्ञापना.

नं ४७४६ श्री. ( माघ व० ९–२८ फेब्रु. )

पै॥ छ० २५ रमजान. तिस्सा तिसैन. माघ मास.

विनंती सेवक रामाजी दामोदर. दोनी कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २३ रोज गुरुवार प्रातःकालपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील मजकूर लष्करचा कारभार बहुत अनिवार. बोलणेंत धर नाहीं. काल राजश्री नारायणराव यानीं " मिरज तालुक्यांत कहीचा वगैरे उपद्रव लागों देत नाहीं. जवळ गांव कोणते असतील त्यांस स्वार घेऊन रखवाली करा " असें सांगोन स्वार दिले असतां मागती खेड्यांवर कही जाऊन मौजे घोरपडी येथील पेवें काढलीं. ती फिराद सांगावयास गेले तर

---

१ बरडोल परगण्याच्या मामलेदाराकडून बाळासाहेबांस पत्र. २ बायांच्या लष्करचा ३ बक्षी.

'आज तिकडे जाणार नाहींत' असें म्हणतात. परंतु बंदोबस्त कांहीं होत नाहीं. लष्करचे मुक्काम अजोनी किती आहेत समजत नाहीं. महाराजांकडील वकील बचाजीपंत काल बोलणेंस आले आहेत. त्यानी "येथून कूच करोन कटी बागेवाडीचे मुक्कामास येणें. तेथें भेटी होतील." असें बहुत प्रकारें बोलणें लावलें आहे. परगणे जत येथें स्वारी गेली होती. नऊ हजार रुपये खंडणी घेतली. अथणीस स्वार गेले आहेत. विजापुरासही फौज खंडणी घेण्याकरितां जाणार आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.



# परशुरामभाऊंची शेवटची स्वारी.

## उत्तरार्ध.

### ( स. १७९९ मार्च ते सप्तंबर अखेरपर्यंत. )

या प्रकरणांत मेअखेरपर्यंतचीं पुष्कळशीं पत्रें बायांच्या दंग्याबद्दलचींच आहेत. हीं पत्रें निराळीं काढून त्यांचें वेगळेंच प्रकरण बनवावें असें मनांत आलें होतें; परंतु त्यांतून इतर मजकुराची इतकी गुंतागुंत झालेली आहे कीं तीं निराळीं काढणें अशक्य दिसून आलें. सबब निरुपायानें असल्या पत्रांचा समावेश याच प्रकरणांत केला आहे.

प्रस्तुत प्रकरणांतल्याच काय, पण वसईच्या तहापर्यंतच्या बहुधा सर्व प्रकरणांतल्या पत्रांविषयीं एक विशेष सांगावयाचा आहे. तो हा कीं, त्यांतलीं शेंकडा पाऊणशें पत्रें तरी लुटीच्या मजकुरानें भरलेलीं सांपडतील. नुसतें चालू प्रकरणापुरतें पाहिलें तरी करवीरकर, शिंदे, त्यांच्या बाया, त्यांचे सरदार मराठे, पठाण व शेणवी, निजामअलीचे सरदार पंढरपुराकडे आले होते ते, या सर्वांचा धुमाकूळ या पत्रांतून मुख्यत्वें वर्णिलेला आहे. ज्याचा त्याचा नेहमीं रयतेवर हात उगारलेला ! जो तो खंडणी मागतो, गांव लुटतो, जाळतो, कत्तल करतो, गुरें वळून नेतो. बायकापोरें धरून नेतो, प्रमुख रयत पकडून ओलीस म्हणून लष्कराबरोबर हिंडवतो, असे प्रकार एक ना दोन ! सर्व पत्रांमधून तोच तोच कंटाळवाणा मजकूर ! असले अत्याचार परशुरामभाऊंच्या लष्करानें केल्याचीं पत्रें या पुस्तकांत सांपडत नाहींत एवढ्यावरून या दोषापासून तें लष्कर अलिप्त होतें असें मात्र कोणीं समजूं नये ! भाऊंच्या लष्करानें परमुलखांत लूट केली तिचा तपशील त्या त्या मुलखांत कोठें कागदपत्र असतील तर त्यांतून सांपडेल. पटवर्धनांच्या दप्तरांत तो कोठून मिळणार ? असो. हें लुटालुटीचें व जाळपोळीचें महाभारत यापुढें प्रत्येक प्रकरणांत पत्रांच्या रूपानें वाचकांच्या नजरेस आणणें जरी आमच्या नशीबीं आलें आहे, तरी प्रस्तावनांतून ती करुण रसाची कहाणी तपशीलवार सांगत बसणें आम्हांस भाग नाहीं. थोडक्यांत ठोकळ गोष्टी सांगत गेलों तरी चालण्याजोगें आहे व आम्ही तसेंच करणार आहों.

शिंद्यांच्या बाया फेब्रुवारीच्या अखेरीस विटें भाळवणीपर्यंत आल्या होत्या त्या तशाच पुढें सरकून मिरज वीस पंचवीस कोसांवर पश्चिमेस टाकून चाल करीत जतेवर जाऊन उतरल्या. करवीरचे शिवाजी महाराज विजापूर बागलकोटाकडे स्वारी करून अथणीवर आले होते तेही बायांच्या भेटीकारितां तसेच कूच करून जतेच्या आसपास गेले. गेल्या पांच महिन्यांत महाराजानीं पटवर्धन रास्ते व प्रतिनिधि यांच्या महालांतून खंडणी वसूल केली तिची बेरीज तीन लक्ष पस्तीस हजार रुपये झाली असा तपशील या प्रकरणांतल्या एका पत्रांत दिलेला आहे. मात्र खंडणी वसूल होतांना या रकमेच्या दसपटीनें रयतेच्या मालमत्तेची नासाडी झाली असली पाहिजे हें वाचकांनीं तर्कानें जाणावयाचें आहे.

हीं दोन लष्करें पाऊण महिना जतेच्या आसपास होतीं; त्या अवधींत परस्परांच्या भेटी होण्याविषयीं महाराजांनीं बायांस अगत्यवाद दाखविण्याची पराकाष्ठा केली. मिरजकरांचा कारकून जतेच्या मुक्कामीं बायांकडे आला तो महाराजांची भेट घेऊं नये म्हणून बायांस सांगत होता. त्यावर बायांचे कारभारी बक्षी कदम व घोइटे त्या कारकुनास बोलूं लागले कीं, आम्ही भाळवणीच्या मुक्कामास आल्यापासून तुम्हांकडून कोणी गृहस्थ भेटीस येईल म्हणून वाट पहात होतों, ते आतां तुम्ही दृष्टीस पडतां आहां! परशुरामभाऊ थोर सरदार, वडील माणूस, त्यांच्या विचारें शिंद्यांचा व आमचा तंटा मिटवून घ्यावा या उद्देशानें त्यांजकडे जाण्यास आम्ही निघालों आहों. अशा स्थितींत तुम्हांस शत्रुस्थानीं असलेले करवीरकर महाराज यांस आम्ही भेटूं नये हें खरें, परंतु याबद्दल तुमचें आमचें बोलणें आधींच व्हावयास पाहिजे होतें. आतां महाराज समीप आले, त्यांची आमची सोइरीक होणार, त्यानीं भेटीविषयीं इतकी गळ घातली असतां न ऐकावें तर वाईट दिसेल. इतकें असूनही आम्ही त्यांस भेटूं नये असें अजूनसुद्धां तुम्ही खात्रीनें सांगत असाल तर आम्ही भेट घेत नाहीं. या बोलण्यांतलें तात्पर्य असें होतें कीं, महाराज आम्हांस फौजेच्या खर्चाकरितां तीन लक्ष रुपये देतों म्हणतात. तीच रक्कम तुम्ही देत असाल तर आम्ही त्यांच्या भेटीचा संदर्भ तोडून टाकितों! यावर त्या कारकुनानें काय बोलावें? बायांचें लष्कर अनिवार, तें कैद कानू कांहीं एक जाणीत नाहीं, हें तो दररोज पहातच होता. रक्कम देऊन सुद्धां आपल्या मुलखाचा लुटीपासून बचाव होईल हा भरंवसा त्यानें कोणत्या आधारावर मानावा? तो स्वस्थ राहिला,

आणि बाया व महाराज यांचा भेटीचा समारंभ घडून आला. मार्च महिन्याच्य सातव्या तारखेस—

"देवजी गौळी बायांकडील काल गुरुवारी सायंकाळच्या दोन तास दिवसास बेळूरच्या मुक्कामीं आले. पुढें हैबतराव गायकवाड सरखवास आणाय्रासीं गेले होते. गौळी याजबरोबर पांच चारशें लोक आले आहेत. हुजूरच्या डेऱ्याजवळ गोळीच्या अंतऱ्यानें पायउतारा होऊन डेऱ्यास येऊन मुजरे करून कांहीं वेळ स्वल्प बसून सवेंच विडे जाले. नंतर उतरावयास जागा दाखविली व सरंजाम पाठविला, तेथें जाऊन उतरले. हुजुरून मेजवानीबद्दल तीनशें रुपये नक्त पन्हाळी व मलकापुरी पाठविले. राजश्री बच्याजीपंत इकडून गेले तेव्हां तिकडून त्यांस १०० रुपये चांदवडी मेजवानीबद्दल बायांनीं दिले होते. बायांच्या लष्करांत रोज धरण्यापारण्याचा प्रकार आहे."

नंतर त्याच महिन्याच्या तेराव्या तारखेस महाराज बायांच्या भेटीस आले होते. "सौम्यवारीं तिसरे प्रहरीं महाराज मातुश्री बायांचे डेऱ्यास आले होते. दोन बैठका केल्या होत्या. महाराजांस वस्त्रें व शिरपेंच व घोडा व हत्ती येणेंप्रमाणें दिल्हे. मंडळीस वस्त्रें दिलीं नाहींत. एक बैठक बाडाचे बाहेर केली होती. एक बाडाचे आंत बायांजवळ बसले तेथें केली होती." या प्रसंगी फौजेच्या खर्चाकरितां महाराजानीं बायांस एक लक्ष रुपये दिले.

यानंतर बायांपैकीं थोरली लक्ष्मीबाई एप्रिलच्या आठव्या तारखेस महाराजांच्या भेटीस गेली तो वृत्तांत—"मातुश्री लक्ष्मीबाई काल इंदुवारीं महाराजांकडे गेली होती ती सायंकाळीं दोन घटका दिवसास स्वांरी मुक्कामास आली. महाराजानीं फराळाचें साहित्य केलें होतें. त्यास बाईनीं सांगितलें जे, आम्ही तुमचे घरीं कन्या दिली आहे. फराळ करीत नाहीं. इंदुवारीं संध्याकाळीं भोजन करीत असतात. निरशन उपोषण असतें. राजश्री बाळाभाऊ व महादजी भोइटे व सुभानराव कदम हे त्रिवर्ग काल स्वारीबरोबर आले नाहींत. तेथेंच राहिले आहेत."

"काल मातुश्री बाई महाराजांकडे गेली होती. निरोपसमयीं तिघी बाईस पातळें दिलीं व एक घोडा व हत्ती येणेंप्रमाणें महाराजानीं बहुमान केला."

याप्रमाणें महाराजानीं बायांस मिळवून घेतलें खरें, पण त्यांच्या राजकारणापैकीं कोणतीच गोष्ट बायांस पसंत पडेना. तुम्ही आम्ही मिळून परशुरामभाऊंवर चाल करून जाऊं या असें महाराजानीं बोलणें लाविलें तेव्हां बायानीं

साफ उत्तर दिलें कीं. भाऊ हे सरकारचे चाकर, आम्हीही सरकारचे चाकर. त्यांचा आमचा भांडण तंटा कोणत्याही प्रकारें नाहीं. जे तुमचे वैरी ते आमचे वैरी असावे असें तुमचें बोलणें आहे. परंतु जे सरकारचे सरदार आहेत त्यांशीं तुम्हांकरितां शत्रुत्व करणें आमच्यानें होणार नाही. " बायांचें लष्कर आपण लगामीं लावून घेतलेंच आहे. आजच त्या आपलें ऐकणार नाहींत तरी पुढें कांहीं दिवसाना ऐकतील. हें काम थोडें दमानेंच घेतलें पाहिजे. " असें समजून महाराज त्यावेळीं स्वस्थ राहिले. कांहीं दिवस गेल्यावर पुन: बायांशीं त्यांचीं बोलणीं निघालीं कीं, तुम्ही आम्ही मिळून मिरज प्रांत मारावा आणि लुटीची निम्मेनिम वांटणी घ्यावी. मिरजेपासून दहा लक्ष रुपये मागावे. ते न मिळतील तर शहर लुटावें. बायांचे कारभारी शेणवीमंडळी होती तींत दुफळी होती. मुख्य कारभारी नारायणराव बक्षी यांस हें बोलणें रुचलें नाहीं तथापि बाळाभाऊ व दुसरे कित्येक कारभारी होते त्यांच्या मनाला महाराजांची शक्कल मानवल्यासारखी दिसूं लागली. मिरजेपासून तीन मैलांवर कृष्णातीरीं मार्कंडेश्वराचें देवालय आहे तेथें दोन्ही लष्करांनीं येऊन उतरावें असाही एकादां बेत ठरला होता ! परंतु या मसलतीस बायांचे लष्करांत शिंदे, कदम, भोईटे वगैरे मराठे सरदार होते ते नाकबूल झाले. त्यांचें म्हणणें स्वतःच्या पोटासाठीं स्वराज्यांतसुद्धां गांवगन्ना चार रुपये घासदाणा घेत फिरण्यांत दोष नाहीं; पण तीच गोष्ट करवीरकरांच्या संगतींत राहून केल्यानें सरकारशीं बेइमानी केल्याचा दोष येतो ! महाराजांच्या नादीं लागून आज आम्ही मिरज प्रांत लुटला आणि पुढें परशुरामभाऊंस तोंड दाखविण्याचा प्रसंग आला तर कसें करावें ? मसलत अंगावर आली तर बाया करवीरास जाऊन बसतील. हे कोंकणे कारभारी खांद्यावर धोतर टाकून घाटाखालीं निघून जातील. पण आमचीं बायकापोरें पुणें नगरप्रांतीं आहेत तीं मारलीं जातील याची वाट काय ? तात्पर्य बायांस लाख रुपय दिल्यासारखें त्यांजकडून शत्रूवर दावा उगविण्याचें काम करून घ्यावें हा जो महाराजांचा हेतु, तो सफळ होण्याचें फारसें चिन्ह दिसेना ! तुमच्या हातून आमच्या मनाजोगें कांहींच होत नाहीं तर परशुरामभाऊंचा आणि आमचा समेट तरी करून द्या असें महाराजांचें अखेरचें बोलणें पडलें. तेव्हां त्या बाबतींत मात्र बक्षीनें मनापासून प्रयत्न करण्याचें कबूल केलें.

बाया जरी पटवर्धनांस विरुद्ध नव्हत्या, तरी त्यांचें व महाराजांचें ऐक्य झालें, दोन्ही लष्करांचें कूच मुक्काम एकमेकांच्या संगनमतानें होऊं

लागले, आणि ते दिवसेंदिवस मिरजेच्या जवळजवळ पडूं लागले, दोघांची मिळून वीस बेवीस हजार बुभुक्षित फौज प्रांतांत घिरट्या घालूं लागली, हीं लक्षणें मिरजकर बाळासाहेबांस फार काळजी उत्पन्न करणारीं होतीं. केव्हां काय घडेल याचा भरंवसा त्यांस वाटत नव्हता. बायांच्या लष्करचे पठाण मिरजप्रातांतून गांवोगांव खंडणी उक्ळीत सुटले होते ते बायांचासुद्धां हुकूम मानीनात ! प्रांत बचावण्याची फारशी आशा बाळासाहेबांनीं धरली नव्हती. किल्ला व शहर एवढ्याचें तरी रक्षण व्हावें एवढी त्यांची इच्छा होती. त्यांनीं कुरुंदवाडाहून रघुनाथराव नीलकंठ यांस कुमकेस बोलावून आणिलें होतें. दोघांची मिळून चार पांच हजार फौज शहराजवळ तळ देऊन राहिली होती. तथापि एवढ्यावर न विसंबतां बाळासाहेबांनीं परशुरामभाऊंस फौजेसह लवकर मिरजेच्या आसपास येण्याविषयीं वारंवार पत्रें लिहिलीं. आणि सरकारांतून या संकटाचें निवारण व्हावें म्हणून नाना फडणवीस यांची वारंवार प्रार्थना केली. त्यावरून महाराज व बाया यांचें पारिपत्य करण्याविषयीं नानांनीं सरकारांतून परशुरामभाऊंस आज्ञापत्रें लिहविलीं, आणि मंगळवेढ्याकडे शिंद्यांचीं पलटणें होतीं तीं आणि निजामअलीची फौज पंढरपुरावर होती ती अशा दोन्ही फौजा भाऊंच्या कुमकेस नेमिल्या. पटवर्धनांच्या महालांवर नानांनीं मोंगलांस वरात दिली होती तिच्या वसुलाकरितां त्या प्रांतीं मोंगलांची फौज आली होती. बायांकडील पठाण नाशिकाप्रमाणें पंढरपूरचा विध्वंस करितील यासाठीं क्षेत्राच्या बचावाकरितां म्हणून नानांनीं ती मोंगल फौज पंढरपुरास कांहीं महिने ठेविली होती. शिंद्यांचीं पलटणें व फौज अशाच एका वरातीच्या वसुलीकरितां मंगळवेढयाकडे फिरत होती. या दोन फौजांस भाऊंच्या मदतीस जाण्याविषयीं पत्रें लिहूनच नाना स्वस्थ बसले नाहींत. विंचूरकर, रास्ते व प्रतिनिधि व धोंडोपंत गोखले यांसही परशुरामभाऊंची कुमक करण्याविषयीं त्यानीं सक्तीचीं आज्ञापत्रें सरकारांतून लिहविलीं. हा सारा कागदोपत्रीं व्यवहार झाला. या प्रमाणें अंमलबजावणी होती तर परशुरामभाऊंजवळ पन्नास हजार फौज जमा झाली असती ! मग कुठच्या बाया आणि कुठचे बाबा ! सर्व दंगेखोरांचा चुराडा झाला असता ! पण १७९५ मधले नाना निराळे आणि १७९९ मधले निराळे ! इतके कागदी घोडे त्यांनीं नाचविले तरी खरोखरीचा एकसुद्धां घोडा जाग्यावरून हालेल तर शपथ ! नाहीं म्हणायला गोखले मात्र परशुरामभाऊंस येऊन भेटले. त्याविषयीं पुढें उल्लेख येईलच.

हिंदुस्थानांत जाण्याच्या उद्देशानें दौलतराव शिंदे जानेवारीच्या अखेरीस पुण्याहून निघून मांजरीच्या मुक्कामीं गेले तरी पैका देण्याघेण्याच्या बाबतींत त्यांचें व नानांचें न बनल्यामुळें त्यांचा पुन्हा परत पुण्यास येण्याचा डौल दिसत होता हें मागच्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. ( पृ. ५५७५ ) सर्जेराव कैदेंत पडल्यानंतर कित्येक महिने आबा चिटणीस यांनीं शिंद्याचा कारभार कसाबसा संभाळला.हा कारभार म्हणजे कोठून तरी पैसा उत्पन्न करून शिंद्यांची फौज व पलटणें यांचा निर्वाह चालविणें हाच होता ! अखेरीस पैसा पुरवितां पुरवितां आबा चिटणीस टेकीला आले व त्यांच्या दारांत फौजेचीं धरणीं नेहमीं बसूं लागलीं. असल्या एका प्रसंगीं फौजेंतल्या पठाणांनीं आबांस पकडून पहाऱ्यांत बसविलें व ते निसटून जाण्याचा यत्न करीत असतां पठाणांच्या जमादारानें त्यांवर बेशक वार टाकिला ! तें पहातांच आबाचा भाऊ कृष्णराव यानें मारेकऱ्यावर लगट केली. तेव्हां त्याजवरही पठाणांनीं वार करून त्यास घायाळ केलें ! त्या गर्दीत आबा व कृष्णराव यांचे प्राणच जावयाचे, परंतु दौलतराव शिंदे ऐनवेळीं मध्यें आले आणि पठाणांची थोपवाथोपव करून उभयतां बंधूंस हातीं धरून आपल्या डेऱ्यास घेऊन गेले.याप्रमाणें अबाच्या कारभाराचा बोजवारा झाल्यामुळें दौलतराव शिंद्यांस नवीन कारभारी नेमणें आवश्यक झालें. सर्जेराव आणि बाळोबा तात्या हे दोन कारभारी कैदेंत होते त्यांपैकी एकास किंवा दोघांस सोडावें, कीं कसें करावें, हा विचार दौलतरावांच्या मनांत घोळूं लागला. कारभारी कैदेंतून सोडण्याचा हा कारभार मोठा अडचणीचाच होता ! सर्जेरावाला सोडावें तर नाना फडनवीस नाखूष होणार. आणि बाया व शेणवी मंडळी अधिकच फिसकणार ! बाळोबाला सोडावें तर बाजीरावसाहेब त्रागा करणार !

बायांचा दंगा शांत करण्याचें अगत्य पेशवे अथवा नाना यांपेक्षां शिंद्यांसच अधिक होतें हें सांगावयाला नकोच. बायांनीं करवीरच्या महाराजांचा आश्रय करून आपली बाजू बळावली असें पहातांच या बंडाचा कांहीं तरी सोक्षमोक्ष केल्याखेरीज आपणास हिंदुस्थानाकडे कूच करून जातां येत नाहीं हें निमित्त करून शिंद्यांची स्वारी मांजरीहून निघून परत वानवडीस आली. तें त्यांचें निमित्त खरेंच होतें. त्यांचीं पांच चार पलटणें व चार हजार फौज मंगळवेढ्याकडे होतीच. आणखी फलटणें व तोफा व दहा हजार स्वार असा सरंजाम त्यानीं गोपाळराव चिटणीस व बाबूरावमामा आंग्रे यांच्या हाताखालीं देऊन त्यांची रवानगी दक्षिणप्रांतीं केली. या दोघांनीं व मंगळवेढ्याच्या फौजेनें

एकत्र होऊन 'बायांशीं गांठ घालावी. प्रथम सामोपचारानें त्यांची समजूत करण्याचा यत्न करावा. त्या न ऐकतील तर बेमुरवत लढाई मारून त्यांचें पारिपत्य करावें' असा या सरदारांस शिंद्यांचा सक्तीचा हुकूम होता. आंग्रे व चिटणीस पुण्याहून निघाले ते नीरेपर्यंत बऱ्याच त्वरेनें आले. पण खंडण्या उकळून फौजेचें पोट भरावयाचें काम त्यांसच करावयाचें असल्यामुळें त्यांचें पाऊल अथातच रेंगाळलें !

बाया व महाराज यांच्या फौजांमुळें मिरजेवर जें अरिष्ट गुदरणार होतें त्याच्या निरसनार्थ नाना व शिंदे यानीं योजिलेल्या तजविजीचा प्रकार कितपत उपयोगीं पडण्याजोगा होता हें वर दर्शविलेंच आहे. आतां मिरजकरांस केवळ परशुरामभाऊंच्या लष्कराखेरीज कोणी त्राता राहिला नाहीं. त्या लष्कराच्या येण्याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. त्याप्रमाणें बाकीचीं कामें बाजूस ठेवून परशुरामभाऊ मिरजेच्या रोखानें यावयास निघालेही होते. पण अखेरीस त्यांचेंसुद्धां वेळेवर येणें होऊन ते उपयोगीं पडतील असें लक्षण दिसेना ! अशी स्थिति होण्याचें कारण समजण्यास भाऊंच्या मार्गांत काय अडचणी येत होत्या याचा खुलासा केला पाहिजे.

फेब्रुवारीअखेरपर्यंत परशुराम भाऊंचा मुक्काम दोडवाड येथेंच होता. तेथें असतां मिरजेकडे निघून येण्याविषयीं त्यांस बाळासाहेबांची निकडीचीं पत्रें दररोज येऊं लागलीं. सबब कर्नाटकची मुलुखगिरी तहकूब करून मार्च महिन्याच्या पहिल्या तारखेस ते परत येण्यास निघाले. येतां येतां मिश्रीकोट व बेटगिरें येथें ठाणीं बसवून ते गुर्लहोसुरावर आले. आणि तेथून एकोडीच्या मुक्कामास आले तों त्या महिन्याच्या अठरा तारखा लोटल्या. त्यांची प्रकृति आतिशय क्षीण व नाजूक झाली होती. त्यांत कर्नाटकचा उष्णकाळ, त्यामुळें कधीं कधीं 'एक कोसाचीसुद्धां मजल होण्यास मारामार पडे. त्यांच्या सैन्याच्या मंदगतीस द्रव्याच्या तुटवडा हेंहि एक जबरदस्त कारण होतें. द्रव्याच्या बाबतींत हा नन्नाचा पाढा त्या काळच्या सर्व मराठी सैन्यांतून वाचला जातच होता; परंतु त्या पाढ्याचीं असंख्य पारायणें परशुरामभाऊंस दररोज करावीं लागत असल्यामुळें त्यांची दैन्यावस्था विचित्र बनली होती. ज्यांनीं सरंजामाच्या मोकळचिठ्या व सरदारीचीं वस्त्रें पेशव्यांकडून भाऊंकरितां आणिलीं, ते रास्त्यांचे कारभारी सरकारांत भरणा करण्याकरितां आतांच आम्हांस नऊ लक्ष रुपये द्या म्हणून कानीं कपाळीं ओरड करीत बसले होते. तीन आठवडे घोळ घातल्यावर त्या लोकांस

भाऊंकडून एक चतुर्थांश रक्कम प्राप्त झाली आणि तीही मिरजकरांवर वगैरे चिठ्ठ्याचपाट्या देऊन परभारें! रोख पैसा न देतां त्या लोकांस याप्रमाणें कसें तरी मागस्थ करतां आलें. पण शिलेदार शिपाई पगाराची बाकी चुकविण्याकरितां अडून बसत तेव्हां त्यांस रोख पैसा दिल्याखेरीज त्यांची समजूत कशी व्हावी! ते लोक भाऊंच्या द्वारांत धरणीं देऊन बसत व त्यांस उपोषणें पाडीत आणि लष्कराची हालचाल दोनदोन तीनतीन दिवस तटवून पाडीत!

एकोडीजवळ मुरगोड म्हणून गांव आहे येथें चिदंबर दीक्षित नांवाचे साधु रहात होते. पटवर्धन, रास्ते, गोखले, नरगुंदकर भावे, इत्यादि सरदार व त्यांच्या पदरचे लोक या साधूचे निस्सीम भक्त बनले होते. त्याशिवाय मिरजेंत शामभटबावा म्हणून साधु होते. त्यांच्याही भजनीं सर्व पटवर्धन मंडळी लागली होती. त्याकाळचे तिसरे साधु सिद्धेश्वरबावा हे कऱ्हाडाजवळ कोळें नरसिंगपूर येथें रहात असत. कऱ्हाडचे प्रतिनिधि व दुसरे हजारों लोक त्यांच्या भक्तमंडळांत समाविष्ट झालेले होते, आणि करवीरच्या महाराजांनीं तर त्यांचा उपदेशही घेतला होता. या तिघाही साधूंचा राजकारणी पुरुषांशीं संबंध जडला असल्यामुळें त्यांचीं नांवें त्या वेळच्या कागदपत्रांतून वारंवार येतात.

हल्लीं परशुराभाऊ एकोडीस आले होते त्यांत त्यांचा इरादा चिदंबर दीक्षितांचें दर्शन व समागम घडावा हाच होता. त्याप्रमाणें त्यांनीं मुरगोडास जाऊन दीक्षितांचें दर्शन घेतलें. शेजारच्या एका ओढ्यावर त्यांचें लष्कर उतरलें आणि स्वतः ते मुरगोडच्या गढींत राहिले. तेथें पांच सहा मुक्काम होऊन दीक्षितबावांच्या सहवासांत त्यांचा काळ अत्यंत सुखाचा गेला. वर्षप्रतिपदेच्या मुहूर्तावर बावांचा निरोप घेऊन ते मलप्रभातीरीं वकंद प्रांत कित्तूर येथें मुक्कामास आले आणि सावनुराकडून रामचंद्रपंत आप्पा फौजेसह यावयाचे होते त्यांची वाट पहात तेथें राहिले.

वकुंदच्या मुक्कामीं लष्कर उतरलें असतां धोंडोपंत गोखले आपली फौज घेऊन परशुरामभाऊंच्या भेटीस आले. तेव्हां भाऊनीं त्यांस शिरपेंच कंठी व वस्त्रें देऊन यांचा गौरव केला. बाया व करवीरकर यांशीं भाऊंच्या सैन्याची लढाई व्हावयाची होती त्यामुळें पेशव्यांच्या आज्ञापत्राप्रमाणें ते भाऊंच्या कुमकेस आले होते. परंतु तो युद्धप्रसंग तूर्तच प्राप्त नसल्यामुळें भाऊनीं त्यांस करवीरकरांकडून सौंदत्तीचें ठाणें घेण्याची कामगिरी सांगितली. तिकडे जाऊन गोखल्यानीं तें ठाणें काबीज केलें तों बाया पुण्याकडे निघून

चालल्या. त्यामुळें भाऊंच्या लष्कराकडे न येतां गोखले गदग नवलगुंदाकडे कूच करून गेले.

सावनूर प्रांतांतलीं ठाणीं बसविण्याच्या उद्योगांत रामचंद्रपंत दोन अडीच महिने गुंतले होते. तिकडची सर्व ठाणीं स्वाधीन झाल्यावर ते हुबळीस आले. तेथें धारवाडच्या सरसुभ्यानें ठाणें घातलें होतें तें आपासाहेबांच्या हवालीं करण्याचें त्यानें नाकारिलें. या स्वारींतल्या एक दोन गोष्टींवरून बाजीराव साहेबांच्या अमदानींत पेशवे सरकारचा दरारा व प्रतिष्ठा किती हीनावस्थेला पोंचली होती हें चांगलेंच दिसून येतें. सरंजामावरची जप्ती उठवितांना सावनूरचे महाल मजकडे कजात लावून दिलेले आहेत तेही सोडा ह्मणून, परशुरामभाऊंनीं आर्जवें केलीं असतांही श्रीमंतानी सरंजामावरची जप्ती उठविली तरी ते महाल सोडिले नाहींत. मग भाऊंनीं रामचंद्रपंतांस पाठवून जबरदस्तीनें ते महाल घेतले. या बंडखोरपणाबद्दल भाऊंचें शासन होण्याचें दूरच राहो, पण एका शब्दानें निषेधसुद्धां झाला नाहीं! बरें, श्रीमंतानी सरंजामाचा सर्व मुलूख भाऊंच्या हवालीं करण्याविषयी आपल्या अधिकाऱ्यांस आज्ञापत्रें लिहिलीं तेव्हां इतर ठाण्यांबरोबर हुबळीचें ठाणेंही भाऊंच्या हातीं यावयास पाहिजे होतें. आणि तें घेण्याकरितांच रामचंद्रपंत फौजसुद्धां आले होते. तथापि धारवाडचा सरसुभा पेशव्यांच्या आज्ञापत्रास जुमानीना आणि रामचंद्रपंताच्या फौजेसही जुमानीना! हुबळी लढून घेण्याच्या भरीस पडावें तर तितकी फुरसत आपणास नाहीं असें पाहून तें ठाणें घेण्याचा मजकूर तितकाच टाकून रामचंद्रपंत निघाले ते एप्रिलच्या दहाव्या तारखेस भाऊंच्या लष्करास येऊन मिळाले. ते येतांच बारी ओलांडून गोकाकेच्या मैदानांत येण्याची भाऊंच्या सैन्याची सिद्धता झाली व त्याप्रमाणें हळू हळू उपक्रम होऊं लागला.

बायांच्या पारिपत्याकरितां निघालेले चिटणीस व आंग्रे सालप्याचा घांट चढून आले आणि चिंतो आत्माराम याची फौज मंगळवेढ्याहून निघून सांगोल्याअलीकडे आली. हें पहातांच बायांनीं त्या फौजांवर चालून जाऊन लढाई मारण्याचा इरादा धरिला. करवीरचे महाराज आणि परशुरामभाऊ या दोघांकडूनही आपणास मदत मिळावी अशी त्यांची अपेक्षा होती. परंतु त्या दोघांत माजलेलें वैर शांत झाल्याखेरीज ही गोष्ट कशी घडावी? त्या दोघांत समेट घडवून आपला कार्यभाग सिद्धीस न्यावा या उद्देशानें बायांचे कारभारी नारायणराव बक्षी व यशवंतराव शिवाजी हे परशुरामभाऊंच्या

लष्कराकडे निघाले. त्यांत बक्षी गोकाकेजवळ राहिले आणि यशवंतरावें मात्र भाऊंच्या भेटीस गेले. त्या भेटीत यशवंतराव याणी बायांच्या तर्फेनें तीन मुद्दे मांडिले. १ महाराजांचे व तुमचें सख्य व्हावें. २ आम्ही तुमच्या भेटीस येतों. तुमचें आमचें ऐक्य असावें. ३ आम्ही पलटणांशी लढाई मारणार याकरिता दहा पांच हजार फौज आमच्या कुमकेस द्यावी. यावर भाऊनी उत्तरें सांगितलीं कीं, महाराजानीं आमचा जेवढा मुलूख घेतला आहे तेवढा परत द्यावा, व नुकसान केलें आहे तें सर्व भरून द्यावें, म्हणजे सख्य होईल. पलटणांशीं लढाई देण्याच्या भरीस तुम्ही पडाल तर त्यांत तुमची खराबी होईल. याकरितां लढाईचा नाद सोडून द्यावा. दौलतरावाचें व तुमचें सख्य करून देण्याबद्दल आम्ही आधीं श्रीमंतांस पत्र लिहितों त्याचा काय जबाब येतो तें पाहून पुढच्या मसलतीचा विचार ठरवावयास येईल. तेथपर्यंत भेटीस येण्याची गडबड करूं नका. याप्रमाणें उत्तरें देऊन यशवंतराव यास भाऊनीं निरोप दिला. व कबूल केल्याप्रमाणें या प्रकरणांत मन घालून खटपट करण्याविषयीं श्रीमंतांस व नानांस अगत्यवादाचीं पत्रें लिहिली. त्या पत्रांचा उपयोग जरी श्रीमंतांच्या दरबारांत फारसा झाला नाहीं, तरी दौलतरावाच्या मनावर त्याचा परिणाम झाला तो मात्र अनपेक्षित होता.

दौलतरावांचा इरादा बायांशीं लढाई करून त्यांचें पारिपत्य करण्याचा होता. परंतु पुढें बायांस परशुरामभाऊ मिळणार व कदाचित् करवीरचे महाराजत्या मसलतीत सामील होणार असा संभव त्यांस दिसूं लागला; व हा मनसबा लढाईनें आटोपणार नाहीं, बायांची समजूत घालण्याचा मार्गच कांहीं काढला पाहिजे, असें त्यांस वाटूं लागलें. बायांशीं समेट करावयाचा तर त्यांच्या विश्वासांतला कारभारी बाळोबा तात्या यास आधीं कैदेंतून सोडून कारभाराचीं वस्त्रें दिलीं पाहिजेत व या प्रकरणांत त्यास मध्यस्थीस घातलें पाहिजे. इतकं घडल्याखेरीज हा समेट बनून येणं अशक्यच होतें. बाळोबाची मुक्तता केल्यास दिनचर्येपुरती थोडीबहुत रक्कमही त्याजकडून मिळण्याची शिंद्यांस आशा होती. आबा चिटणीस व आंग्रे मामा यानींही शिंद्यांस हाच सल्ला दिल्यावरून त्यानीं ता० ७ एप्रिल रोजीं बाळोबा तात्यांस आणण्याकरितां यादवराव भास्कर यास दोन पलटणें बरोबर देऊन नगरास पाठविलें.

बाळोबा तात्या कैदेंतून सुटणार आणि पुन्हा शिंद्यांचे कारभारी होणार

हें पहातांच बाजीरावसाहेबांची घाबरगुंडी उडाली ! शिंद्यांच्या दौलतींत बाळोबातात्या सर्वाध्यक्ष झाल्यावर त्याचा हात धरणारा राज्यांत कोण आहे ? त्यांत त्याचा जुना स्नेही परशुरामभाऊ त्यास सामील होणार ! मग काय विचारावें ? आजपर्यंत झालेल्या गोष्टींचें पारडें उलट फिरून आपणास पुनः कारागृहवास प्राप्त होणार, आणि चिमणाजी माधवराव याची पेशवाईच्या पदावर पुन्हा स्थापना होणार, हे सोहळे त्यांस एव्हांपासूनच दिसूं लागले ! आजपर्यंत उपेक्षेस पात्र झालेले नाना फडनवीस मात्र या संकटांतून आपला बचाव करितील असें श्रीमंतांस वाटूं लागलें आणि त्यानीं त्यांची मनधरणी जारीनें सुरू केली. म्हैसुरावर स्वारी करण्याकरितां परशुरामभाऊंची रवानगी करावी असें नानांचें म्हणणें होतें तें त्यांस खूष करण्याकरितां श्रीमंतानीं यावेळीं मान्य केलें. त्यांत नानांच्या द्वारें भाऊंस आपल्या लगामीं लावून घ्यावें असा श्रीमंतांचा इरादा स्पष्ट दिसतो. कसेंही असो. या प्रसंगीं श्रीमंतानीं परशुरामभाऊंवर कृपेचा वर्षाव केला तो कांहीं अतोनातच ! म्हैसूरच्या स्वारीचा कुलअखत्यार त्यानीं भाऊंवर सोंपविला व मुतालिकीची शिक्केकट्यार व मोर्चेल व वस्त्रें व जवाहीर वगैरे बहुमान त्याजकडे पाठविला, आणि मुलेंमाणसें ठेवण्याकरितां म्हणून धारवाडचा किल्ला त्याच्या हवाली करण्याचा ठराव केला. याशिवाय श्रीमंतानीं असेंही ठरविलें कीं, भाऊनी सरकारांत चौदा लक्ष रुपये गुन्हेगारी द्यावयाची ती देऊं नये. ती रक्कम त्यानीं म्हैसूरच्या स्वारीवर नवी फौज ठेवावयाची तिच्या खर्चास लावावी. म्हणजे ही रक्कम भाऊंस माफ झाली असेंच म्हटलें पाहिजे. दर्शी करवीरकर व बाया वगैरे बंडें आहेत त्यांच्या बंदोबस्ताकरितां भाऊंची स्वारी इकडेच राहिल्यावांचून परिणाम नाहीं, याकरितां म्हैसूरच्या स्वारीस भाऊनीं स्वतः न जातां रामचंद्रपंत आपास पाठवावें असें नानांचें म्हणणें पडलें तेंही श्रीमंतानीं मान्य केलें.

बाळोबातात्या व त्यांचे बंधु धोंडीबादादा आणि मोदी वगैरे आणखी तीन असामी कैदेंतून मुक्त होऊन एप्रिलच्या बाविसाव्या तारखेस वानवडीच्या मुक्कामीं दाखल झाले. त्याच दिवशीं दौलतराव शिंद्यानीं समारंभानें त्यांच्या भेटी घेतल्या. आणि शिरपेंच कंठ्या वस्त्रें वगैरे बहुमान सवास योग्यतेनुसार दिला; आणि आपल्या दौलतीचा कारभार बाळोबातात्यांच्या हवालीं केला. सरकारची परवानगी न घेतां आपण केलेलें हें कृत्य सरकारांतून मंजूर व्हावें आणि श्रीमंतानीं बाळोबातात्यांचे मागचे अपराध विसरून त्यांची भेट घ्यावी असा दौलतराव शिंद्यानीं अर्ज केला, पण बाजीरावसाहेबांस तो कसचा

गोड लागतो ? ते अतिशय भेदरून गेले होते, आणि क्रोधानें संतप्तही झाले होते ! शिंद्यांच्या छावणींत बाळोबातात्या आल्याची वर्दी येतांच त्यानीं शहरची नाकेबंदी केली आणि गुलटेंकडीपासून नदीपावेतों गारद्यांच्या रांगा उभ्या केल्या ! जणु काय शिंद्यांची फौज शहरांत शिरून त्यांस पकडून नेणार होती ! पुढें कसें करावें, आतां आपली गत कशी होईल, या चिंतेपुढें त्यांस कांहीं एक सुचत नव्हतें. नानांस विश्रामबागेंत बोलावून न्यावें, आणि खलबतें करून नानाप्रकारच्या मसलती घाटाव्या, यांतच त्याचा काळ जाऊं लागला. असें होतां होतां बाळोबाविषयींचें त्यांचें भय महिना पंधरा दिवसांत कमी झालें. पण राग मात्र कमी झाला नाहीं. नुसती भेट घेण्यापुरतासुद्धां राग कमी व्हावयाला पांच सहा महिने लागले !

शिंद्यांचा कारभार हातीं येतांच बाळोबातात्यानीं बायांच्या प्रकरणांत मन घातलें. या कामांत शिंद्यांकडून तात्यांस कुलमुखत्यारी मिळाली होती. आबा चिटणीस व आंग्रेमामा हे त्यांचे सल्लागार होते तेही बायांच्या विश्वासांतलेच होते. या तिघाही कारभाऱ्यानीं बायांस पत्रें लिहिलीं कीं, यापुढें तुम्हीं कोणताही विकल्प मनांत न धरितां परत यावें. ज्या ज्या वाजवी गोष्टी आहेत त्या सर्व तुमचे मनाप्रमाणेंच घडून येतील. त्या बाबतींत आम्ही तुमच्या आज्ञेबाहेर नाहीं. तीं पत्रें जातांच बायांस भरंवसा उत्पन्न होउन त्यानीं पुण्याकडे जाण्याचा विचार ठरविला. अर्थात् त्यांस आतां करवीरकर अथवा परशुरामभाऊ यांच्या कुमकेची जरूर राहिली नाहीं, आणि त्यांच्या तंटेभाडणांत पडण्याचें कारणही राहिलें नाहीं. महाराजांच्या समजुतीकरितां त्यांस बायांचे कारभारी बोलत कीं, आपण तुमच्या बाजूस आहों आणि तुम्हांकरितां भाऊंशीं लढण्यास तयार आहों. पण हें सर्व बाह्यात्कारी ढोंग होतें

परशुरामभाऊ वकुंदच्या मुक्कामाहून निघाले ते एप्रिलच्या पंधराव्या तारखेस पाच्छापूरच्या बारीस आले, व ती बारी ओलांडून आपण अलीकडे येणार असा त्यानीं पुकारा केला. पण त्यांचा खरा रोख गोकाकेकडे होता व तिकडे शत्रूनें कुमक पाठवूं नये एवढ्यापुरतीच ती हुलकावणी होती. पाच्छापूरच्या बारींत एक दोन मुक्काम झाल्यावर ते अकस्मात् गोकाकच्या बारींत शिरून तेथें तळ देऊन बसले व गोकाकेस वेढा देण्याकरितां त्यानीं पुढें फौज पाठविली. त्या फौजेंत रामचंद्रपंत आपा व महादेवराव दाजी मुख्य सरदार होते. ता. २४ रोजीं गोकाकेस मोर्चे बसून तोफांचा मारा सुरू झाला. त्या ठाण्यास बसलेला वेढा उठवावा आणि भाऊंची फौज बारीपार

हुसकून लावावी म्हणून करवीरच्या महाराजानीं पुष्कळ खटपट केली. त्यांच्या कुमकेस बायानीं फौज द्यावयाचें कबूल केलें होतें त्याप्रमाणें त्या वागल्या असत्या तर महाराजांचे यत्न निष्फळ झाले नसते. परंतु बायांजवळ दहा बारा हजार फौज असतां महाराजांस तिचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं ! गोकाकेस चार दिवस लढाई होऊन पांचवे दिवशीं म्हणजे ता. २९ एप्रिल रोजीं तें ठाणें रामचंद्रपंत आपानीं काबीज केलें. नंतर भाऊंच्या फौजेनें पंधरा दिवसांत कोटबागी, हुकेरी, घोडगिरी, यमकनमुर्डी वगैरे तमाम ठाणी घेतलीं व मेच्या २५ व्या तारखेस बागेवाडीस मोर्चे बसविले. याच वेळीं चिकोडीकडे तळाव्यास वगैरे त्या फौजेच्या टोळ्या नेहमीं जात असल्यामुळें त्याही ठाण्यास वेध लागला होता. त्या टोळ्यांपैकीं २०० स्वारांची एक टोळी करवीरकरांच्या झपाट्यांत सांपडून तिचा विध्वंस झाला व तींत विष्णुपंत पटवर्धन यादवाडकर होते ते जखमा लागून शत्रूकडे पाडाव सांपडले. त्या त्वेषानें रामचंद्रपंतानीं जाऊन चिकोडीची पेठ हल्ला करून जाळून टाकिली. मेच्या तिसाव्या तारखेस बागेवाडी काबीज झाली. तें पहातांच चिकोडीकर भयग्रस्त होऊन दुसऱ्या दिवशीं ठाणें टाकून पळाले. तेंही महत्त्वाचें ठाणें अनायासें परशुरामभाऊंच्या हातीं लागलें.

याप्रमाणें मेअखेरपर्यंत भाऊंच्या युद्धनीतीचा उत्कर्ष होत गेला तो येथवर वर्णन केला. पण या मुदतींत त्यांचें शरीर केवढ्या भयंकर संकटांत सांपडलें होतं हें आतां सांगितलें पाहिजे. एप्रिल व मे महिन्यांत सैन्याच्या हालचाली व ठाणीं घेण्याचा धूमधडाका सुरू होता आणि त्याच वेळीं त्यांच्या दुखण्यासही पराकाष्ठेचा भर आला होता ! त्यांची प्रकृति नाजुक व क्षीण झाली होती एवढें आम्हीं सूत्रप्राय पूर्वी सांगितलेंच आहे. उत्तम वैद्यानीं उत्तम उपचार केले असतांही रोग्याची प्रकृति सुधारत नाहीं असें पाहून सर्वांनीं सिद्धांत ठरविला कीं, भाऊंचा व्याधि शरीरगत नसून ही परकृत पीडा आहे म्हणजे कोणा शत्रूनें यांवर जारणमारणाचा प्रयोग केला आहे ! रामचंद्रपंत आपांच्या ता. १४ एप्रिलच्या पत्रांत या कल्पनेचा पहिला उल्लेख स्पष्टपणें झालेला आहे.

"वडिलांची प्रकृत बहुतच क्षीण झाली आहे. पंडितरायांचा ( औषधी ) उपाय चालला आहे. दीक्षित बाबांच्या आशीर्वादें आरोग्य होईल..... वडिलांचें सामर्थ्य अगदीं राहिलें. स्नानसंध्या निजूनच करितात. श्रीचें

अर्चन मात्र सांग होतें. सारांश रोग नाहीं परकृत पीडा आहे. काळजी मोठी आहे."

याप्रमाणें रोगाचें निदान ठरल्यावर त्यावर दैवी उपायांची योजनाच करणें तेवढें हातीं राहिलें, आणि ते उपाय म्हणजे जप, तप, मंत्र, तंत्र, देवसेवा, नवस वगैरे जारीनें सुरू झाले. त्या स्थितींत भाऊंच्या बुद्धीस भ्रंश होणार अशीं चिन्हें मधून मधून निदर्शनास येऊं लागलीं होतीं; तथापि जवळ असणाऱ्या चाणक्ष माणसांनी त्याची परिस्फुटता होऊं दिली नव्हती. शेवटीं भाऊंची स्वारी गोकाकच्या मुक्कामास आली त्या दिवशीं हा बुद्धिभ्रंश तमाम लष्करांत जाहीर होण्याजोगा प्रकट झाला. त्याचा तपशील—

"श्री ॥ राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम गचीकुरबेटावर होता तेथून कूच करून छ० २६ रोजीं गोकाकचे मुक्कामास आले. ते दिवशीं प्रदोष होता. मजलीस येतांच गंजिफा खेळत बसले. सायंकाळ झाला तरी स्नानास उठेनात. खेळ पुरे होईना. सर्वांनी स्नानास उठावें, प्रदोष आहे, ह्मणों लागले तेव्हां उत्तर जालें जे, अद्याप बारा घटका दिवस आहे! आतांच उठावयाचें नाही! ह्मणोन तसेंच दोन तास रात्रपर्यंत खेळ जाला. मग खेळ पुरे केला. तथापि स्नानास उठेनात. मनास येईल तसें भाषण करूं लागले. प्रकृतीस कांहीं वायूचा विकार जाहलासा जाला. तेव्हां तसेंच चारी प्रहर रात्र उपवासी. सर्वांसही उपोषण जालें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं स्नान करून भोजन केलें आणि निजले ते तिसरे प्रहरपर्यंत निजले. जवळ श्री ॥ राजश्री आपासाहेब व बाबासाहेब नेहमीं एक जण असतात. जवळ दाटी होऊं देत नाहींत. याप्रमाणें भ्रांत पडली आहे. प्रयोग अगर पित्तप्रकोप वायु असेल असें दिसतें. आठा दिवसांपासून प्रकृतीस भेद कांहीं पडला. परंतु लौकिकांत आलें नाहीं."

हा प्रकार पहातांच सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें! दीक्षित बावांच्या आशीर्वादावर आपासाहेबांचा जरी भरंवसा पूर्ण होता, तरी तेवढ्यावरच न विसंबतां बावास घेऊन येण्याकरितां त्यांनीं मुरगोडास कारकून पिटाळले. यापुढचा भाऊंच्या दुखण्याचा वृत्तांत निवेदन करणें तें आपासाहेबांच्या पत्रांतूनच थोडा थोडा मजकूर तारीखवारीनें उतरून घेऊन केलेलें बरें. हीं पत्रें त्यांनीं आपले चुलत चुलते बाळासाहेब मिरजकर यांस लिहिलेलीं आहेत.

( ९ मे. ) "सर्वांचें दैवत वडील, तेथें अशी गोष्ट झाली! ईश्वरेच्छा प्रमाण! दिक्षितबावांचा आशीर्वाद पूर्ण आहे. वडिलीं चिंता करूं नये.

कांहीं दिवस क्लेश आहेत ते भोगणें प्राप्त आहे. वडिलांचा दम मोठा. उठवत बसवत नाहीं तरी पुढें कूच करून जावें हाच ध्यास ! आज मोठ्या बलात्कारें मुक्काम जाला. बावा आज येत आहेत. दर्शन जालेवर सर्व कळवीन. ईश्वरीपुरुष ( शामभट ) बावाही तेथें आहेत त्यांसही विनंती केली पाहिजे. मोठें संकट आहे. परिहार जाला पाहिजे."

( १० मे ) "वडिलांची प्रकृति तर रोगाची भावना अगदीं नाहीं; परंतु परकृतेंकरून व्यापून गेली. याचा उपाय वे॥ शा ॥ सं॥ शिवशास्त्री आदिकरून ब्राह्मणांस गुप्तरूपें विचारणा होऊन लौकर जाला पाहिजे. ( येथें वडिलांचें ) उपोषण सुटावयाचें नाहीं, शरीरसामर्थ्य अगदीं नाहीं, आणि अनास्या फार ! यानें परिणाम कसा लागेल श्रीगजानन जाणे ! दीक्षितबावा येतात, मुक्काम करावा, म्हटलें तर होईना ! गांठ पडों देत नाहींत असें जालें."

( ११ मे ) "चिदंबरदीक्षितबावा यांस लष्करांत आणण्याचा प्रकार बावा आज सूर्योदयाचे पूर्वीं घटका रात्रीस येऊन वडिलांस दर्शन दिलें; हा सर्वांस संतोष जाला तो पत्रीं कोठवर ल्याहावा? बावानीं वडिलांस दर्शन देऊन कृपादृष्टीनें पाहून शरीरावरून हात फिरविला. वडिलानीं साष्टांग नमस्कार घातला. हें संतोषाचें वर्तमान कळावें. वे॥ राजश्री शामभटबावा यांस वारंवार विनंती करून कृपा होय असें जालें पाहिजे. बावा मुरगोडाहून आले. महापुण्योदय जाणावा. अभय पूर्ण आहे."

यापुढें महिनाभर दीक्षितबावा भाऊंच्या संगतीस होते. परंतु लष्करांत राहिल्यानें 'संपर्कदोष व दुष्टध्वनिश्रवण' होतें, सबब तेथें न राहतां ते जवळच कोठें खेड्यापाड्यांत रहात. केव्हां भाऊ त्यांच्या दर्शनास जात तर केव्हां बावाही यांच्या भेटीकरितां लष्करांत येत. उभयतांचा नित्य प्रहर दोन प्रहर सहवास घडला तर प्रकृति लवकर सुधारेल असें सर्वांस वाटत होतें. पण लष्करी कामाच्या गडबडीमुळें म्हणा, अथवा भाऊंच्या स्वच्छंदीपणामुळें ह्मणा, ती गोष्ट घडून आली नाहीं.

( १५ मे ) "वडिलांची प्रकृत दिवसेंदिवस बरी आहे. 'मुंचामि त्वा'चा जप करावयाचें ( आपण ) लिहिलें त्याप्रमाणें करितों."

'मुंचामि त्वा ' हें पांच ऋचांचें सूक्त ऋग्वेदाच्या आठव्या अष्टकांत आठव्या अध्यायांत आहे. दररोज शिवालयांत या सूक्ताचा त्रिवार जप केल्यानें मनुष्य शतायुषी होतो असें ऋग्विधानांत सांगितल आहे.

( १६ मे. ) " कवठ्यांत महाबळेश्वरकर दीक्षित आहेत त्यांस आणून विचारणा करून संख्या किती, किती दिवस, तें यथास्थित करून अनुष्ठान चालतें व्हावें. "

( १८ मे. ) "वडिलांची प्रकृति अजून नीट नाहीं. दैवी उपाय लौकर जाले पाहिजेत. दीक्षित बावांचा पूर्ण आशीर्वाद आहे. ' किंचित् शरीरभोग आहे, धैर्य धरा, ईश्वर कल्याण करितो. ' असें त्यांचें वारंवार दृढ म्हणणें आहे. चिंता नाहींच. परंतु धैर्य होत नाहीं ! "

( १९ मे. ) " दीक्षितबावा आलेपासून वडिलांची प्रकृत किंचित् बरी आहे. अनुष्ठानासही बावानीं आज्ञा केल्याप्रमाणें ( ब्राह्मण ) लाविले आहेत. ( वडिलानीं ) बावांच्या दर्शनास जाऊन चार सहा घटका समागम घडावा हें घडत नाहीं. बावा देवपूजेच्या वेळेस येतात. कृपा पूर्ण आहे. ' कल्याण होतें, सर्व विषयीं चिंता नाहीं. कतबा लिहून देतों'. म्हणतात ! "

( २० मे. ) " वडिलांची प्रकृत नीट नाहीं, याजमुळें कामास व लौकिकास कमी पडतें. विशी बेविशी मात्र आहे. श्री आराध्य कृपा करील तव्हां खरें ! "

याप्रमाणें परशुरामभाऊंच्या तब्येतींत चढउतार होतां होतां पंधरा जूनच्या सुमारास ती कांहींशी ताळ्यावर येण्याच्या मार्गास लागली, असें पाहून दीक्षितबावा लष्कराबरोबर हिंडत होते ते मुरगोडास निघून गेले. भाऊंस हा कितपत गुण आला होता हें त्यांची समक्ष गांठ घेतलेल्या एका गृहस्थाच्या पत्रावरून दिसून येईल--

" सैन्याधिकारी यांची तीन दिवस प्रकृत पाहिली. त्यास बुधवारीं बोलें भस्मलेपन बहुत होतें. संध्याकाळचें भोजन तीन घटका दिवस. गुरुवारीं ( सायंकाळच्या ) घटका दिवसास भोजन. भस्मधारण निम्मे. भृगुवारीं भस्मधारण पूर्ववत्. भोजन घटका रात्र. बोलणेंही प्रथम दिवशीं एक जाबसाल. दुसरे दिवशीं दोन. तिसरे दिवशीं भृगुवारीं पांच जाबसाल पुसिले. सारांश बावांचे कृपेकरून आठ चार दिवसांत प्रकृत यथास्थित होईल. "

त्या काळच्या लोकांचा भाविकपणा दाखविण्यास इतके उतारे बस्स आहेत. शेवटच्या उताऱ्यावरून पाहिलें तर परशुरामभाऊ कांहीं चालचलाऊ मात्र बरे झाले होते, परंतु त्यांच्या शरीरास निःशेष आरोग्य झालें नव्हतें; असेंच वाचकांस दिसून येईल. इतका गुण आला हा तरी दीक्षितबावांच्या कृपेचा व

अनुष्ठान वगैरेचा महिमा होय असें त्या वेळच्या सर्व लोकांस वाटलें. परंतु सांप्रतचे लोक ही गोष्ट मान्य करितीलसें वाटत नाहीं. कारण मूठमारी जादू मंत्र तंत्र यांवर आतां कोणाचा विश्वास नाहीं. या हकीगतीतला ग्राह्यांश सांप्रतचे श्रद्धाशून्य लोक इतकाच मानितील कीं, रोगी पराकाष्ठेचा अशक्त झाला आणि उन्हाळा असह्य झाल्यामुळें त्याची बुद्धि चळली. हवेंत थंडपणा आल्यावर तीच बुद्धि पूर्व स्थितीस येऊं लागली ! यासंबंधें मोठी आश्चर्याची गोष्ट आम्हांस वाटते ती ही कीं, आजाराच्या मुदतींत परशुरामभाऊंनीं बाळासाहेबांस लिहिलेलीं बरींच पत्रें आम्ही या प्रकरणांत छापिलीं आहेत. त्यांतलीं कांहीं पत्रें शेवटीं दोन चार ओळी स्वदस्तुरच्या लिहून पुरीं केलीं आहेत आणि कांहीं तर सबंध स्वतःच लिहिलेलीं आहेत. पण त्यांत भ्रांतीचा लवलेशही कोठें दिसून येत नाहीं !

या प्रकरणांत ता. १५ एप्रिलच्या एका पत्रांत परशुराम भाऊनीं मिरजेहून 'चहा व बुंद व चहादाणी' मागविली आहे. दुसऱ्या एका पत्रावरून त्यावेळीं चहा तयार करण्याचें पात्र रुप्याचें करीत असत असें दिसतें. आणखी एक दोन पत्रांवरून नाना फडनवीस यांस तपकिरीचें व्यसन होतें असें निश्चयात्मक ठरतें. ही माहिती वाचून चहाकाफीचे व 'नासाग्रगामिनी'चे भक्त साभिमान संतोष पावतील !

महादजी शिंद्यांस दासीपासून एक कन्या झाली होती. तिचें करवीरकर महाराजांचा दासीपुत्र यासीं लग्न ठरलें होतें असा मागें एक दोनदां उल्लेख आला आहे. बायांस पुण्याकडे जाण्याचा वेध लागला तेव्हां हें लग्न उरकून घेण्याविषयी त्यानीं महाराजांस विनंती केली. ती विनंती मान्य करून महाराज कृष्णातीरीं अकीवाटच्या ठाण्याजवळ येऊन उतरले. पलीकडच्या तीरावर बायांचा मुक्काम आला. नंतर वै ॥ शु ॥ १० ( १४ मे ) रोजीं लग्न झालें. लग्नाकरितां महाराजानीं घाटगे व निंबाळकर यांच्या घरीं दिलेल्या आपल्या दोघी कन्या व विश्वासराव घाटगे सर्जीराव यांची स्त्री व सिद्राम भोसले यांची स्त्री यांस करवीराहून मुद्दाम आणविलें होतें. लग्न लष्करांत झाल्यामुळें थाटमाट अगदींच बेताचा झाला. दहा हजार रुपयांच्या आंतबाहेर रक्कम खर्चास लागली व तो खर्चही महाराजानींच केला. त्या मानानें अकीवाटच्या ठाण्यांत ब्राह्मणांस देकार झाला तो उत्तम झाला. तशा धामधुमींत दोन अडीच हजार ब्राह्मण दक्षिणेस जमले होते व दक्षिणेची प्रत एकपासून पांच रुपयेपर्यंत होती.

हा लग्नाचा समारंभ आटपतांच पुण्याकडे जाण्याकरितां बाया निघाल्या त्या हरिपुर ब्रह्मनाळावरून मायणीपर्यंत गेल्या तरी त्यांच्या फौजेपैकीं यशवंतराव शिवाजी व सतारखान वगैरे पठाण सरदार कऱ्हाड, मलकापुर पन्हाळ्यापर्यंत निरनिराळ्या टोळ्यानीं खंडण्या घेत फिरतच होते. कोळें नरसिंगपुरास सिद्धेश्वरबावा रहात होते ते याप्रसंगीं पठाणांच्या तावडींत सांपडले. तेव्हां करवीरचे महाराज व औंधचे प्रतिनिधि हे सत्पुरुषाच्या रक्षणाकरितां त्या वेळेपुरतें शत्रुत्व विसरले! औंधकरांचे कारभारी व करवीरचे रत्नाकरपंत यानी धांवणी करून बावांस सोडविलें. नंतर ते बावा करवीरास रहावयास गेले. मराठी राज्य हें देवब्राह्मणांचें राज्य असा आजपर्यंतचा लौकिक असतां त्या राज्यांत सिद्धेश्वरबावासारख्या विरक्त व पूज्य पुरुषाची विनाकारण अमर्यादा कशी झाली याचें कोणास आश्चर्य वाटावयास नको. कारण देवब्राह्मणांविषयींचा पूज्यभाव बाजीरावींत मावळत चालला होता. नाशीकच्या ब्राह्मणांची पठाणानीं वगैरे काय दुर्दशा केली हें मागें सांगितलेंच आहे. त्यांच्या कचाट्यांतून पंढरपुर मोठ्या शर्तीनें बचावलें गेलें, तरी माहुली व वांई या क्षेत्रांचा त्यानीं विध्वंस केलाच! या प्रकरणीं आणखी ठळक उदाहरण म्हटलें तर नीरानरसिंगपूरच्या देवाचें देतां येईल. तें नृसिंहाचें जागृतस्थान प्रसिद्ध आहे. त्या देवाजवळ सोंवळ्या ओंवळ्याचा विचार बारकाईनें होत असतो व त्या कामीं दुर्लक्ष होईल म्हणून लोक थर्र भितात. असें असतां शिंद्याकडील कृष्णाजी हुजऱ्या यानें देवास बेलाशक स्पर्श करून त्याच्या अंगावरचे वस्त्रालंकार काढून घेतले! तोच प्रसंग पंढरपूरच्या देवावर यावयाचा; पण गोपाळराव चिटणिसानीं वेळींच विशेष बंदोबस्त केल्यामुळें त्या संकटाचा परिहार झाला!

साताराचा दंगा मोडल्यापासून चतुरसिंग करवीरकरांचा आश्रय करून दिवस कंठीत होता. तरी रास्त्यांची फौज साताराप्रांतांतून हुसकून लावून तेथें साताऱ्च्या महाराजांचा अंमल कसा बसवितां येईल ही त्याच्या जिवाची तळमळ अजून चाललीच होती. यावेळीं बायांची फौज कुमकेस मिळवून आपला मनोरथ सिद्धीस न्यावा अशी योजना त्यानें केली होती. ती त्याची योजना सिद्धीस गेली नाहीं; तरी तिचा वृत्तांत वाचकांस मनोरंजक वाटेल असें समजून त्या संबंधाचा एक उतारा आम्ही देतों. नारो हरि करंदीकर हा मिरजकरांकडून करवीरच्या दरबारांत वकील होता त्याच्या पत्रांतला हा उतारा आहे.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

"राजश्री चतुरसिंग ( येथें करवीरकरांच्या ) लष्करांत आहेत, त्यास येथील भरंवशाची खातरजमा त्यांची होऊन गेली! लौकिकांत मात्र ( येथें ) महाराजांजवळ आहेत, परंतु येथें खर्चास पावत नाहीं; अथवा कारण पडलें असतां इकडील कुमक होणें हा विचार अभावाचा; यास्तव हल्लीं चतुरसिंग यांनीं मसलत केली कीं, येथें राहून परिणाम नाहीं. येथून जावें तर जावयास ठिकाणा नाहीं. सर्व शत्रुस्थानीं. याजकरितां राजश्री फत्तेसिंगराव माने रहिमतपुरकर हे बायांच्या लष्करांत आहेत त्याजकडे संधान केलें कीं, 'बायांकडे आमचा मजकूर समजावून आम्हांस कुमक देवावी. म्हणजे थोडा बहुत आपला जमाव कुमक जाऊन रास्ते यांचा समाचार घ्यावा असा मानस आहे.' येविशीं चतुरसिंग यांचें व माने यांचें इमानप्रमाण जालें आहे. बायांस लाख रुपये द्यावयाचा करार करावा, त्यास 'तूर्त ऐवज नाहीं. सातारकर महाराजांचे चरण आपणास दाखवावे; म्हणजे तेथें दागिने आहेत, लाख रुपये ( चे ) दागिने देतों.' तेव्हां दागिने व महाराज किल्यावर. महाराजांचे चरण कसे दृष्टीस पडतात ? तेव्हां चतुरसिंग याणीं उत्तर केलें कीं, 'रास्ते यांस फौजसुद्धां ( साल्प्याच्या ) घांटपार करून द्यावें, म्हणजे किल्यावर रास्ते यांजकडील कारकून राजश्री पद्माकरपंत गोखले आहेत त्यानीं आपणाशीं करार केला आहे कीं, रास्ते यांस घांटपार करून द्यावें म्हणजे किल्ला आपल्या स्वाधीन करितों. असा करार केला आहे म्हणोन सांगतात. किल्यावरील बातमी कशी येते ? तरी महाराजांकडील वाड्यांतील कुणबिणी आहेत त्यांस दरवाजांत जाण्यायेण्याची मोकळीक आहे; व त्यांची झाडाझडती घेत नाहींत. तेव्हां इकडून कोणी तरी शहरांत जातात. कुणबिणीच्या हातून बातमी पोंहचते. ( महाराज ) कांहीं खर्चासही त्यांचे हातून चतुरसिंग यांस पावतें करितात."

बायांच्या भेटीकरितां बाळोबातात्या व आबाचिटणीस बरोबर दोन हजार स्वांर, दोन पलटणें व पांच तोफा घेऊन पुण्याहून आले त्यांची व बायांची सापच्या मुक्कामीं गांठ पडून समेटाचें बोलणें सुरू झालें. त्यांत बायानीं प्रथम सवाल टाकिला कीं, नगरच्या किल्यांत आमची वस्त आहे ती आमच्या हवालीं करावी. ही वस्त म्हणजे दुसरी तिसरी कोणची नसून बायांची सर्वांत धाकटी सवत भागीरथीबाई ही होय ! तिनें दौलतराव शिंद्याशीं म्हणजे आपल्या दत्तक पुत्राशीं अश्लाघ्य संबंध ठेवल्याचा पुकारा बायानीं केला होता, व दौलतरावाकडून तिला नगरच्या किल्यांत कैदेंत

ठेवविलें होतें. हल्लीं ती आमची सवत आमच्या हवालीं करा असा आग्रह बायानीं कां धरिला होता हें समजत नाहीं. परंतु त्यांचा तो आग्रह मान्य करण्याचें बाळोबातात्यानीं नाकारिलें एवढें मात्र खरें. याप्रमाणें बोलण्यांत प्रथमच तट पडला, आणि मागून बक्षी आणि मराठे सरदार यांजकडूनही चढेलपणाचीं एक एक कलमें निघूं लागलीं, त्यामुळें महिनाभर घोळ पडला. शेवटीं समेट घडवून आणण्यांत बाळोबातात्यांस यश आलें; तें बहुतांशीं बायांच्या समंजसपणाचेंच फळ होय ! समेटाची याद दहा पंधरा कलमांची होती. त्यांत सात कलमें मुख्य होतीं तीं अशीं:—

" ( बायांस ) अशेरी किल्ला द्यावा. २ ( बायांस ) सरंजाम रुपये दहा लक्षांचा द्यावा व त्यांत बऱ्हाणपुर, जैनाबाद व अशेरी तालुका त्याशिवाय दहा लक्षांची भरती स्वदेशीं करून द्यावी. ३ पुण्यांत पोंचल्यावर ( बायांच्या ) फौजेची तेरीख चालती करावी, गणती घ्यावी, ऐवज चांदवड ( नाण्याचा ) फौजेस द्यावा. ४ बायांकडे बक्षी पठाण व मराठे मिळाले यांच्या अब्रूस खत्ता होऊं नये. सर्वांस शिंदे याणीं ठेवावें. यास जामीन आबा व राजश्री बाळोबातात्या. ५ ( बायानीं ) पुण्यास लवकर जावें. तेथें गेल्यानंतर फौजेचा सुमार पाहून दौलतरावबाबा फौज ठेवितील. बाकीच्यांस निरोप होईल त्यांनीं जावें. छावणीस फौज बहुत ठेवणार नाहींत. ठेवतील त्याणीं रहावें. ६ सखाराम घाटगे सर्जेराव यास दौलतराव बाबा याणीं आपणाजवळ ठेऊं नये. पाहिजे तर एक दोन गांव बक्षीस द्यावे. त्यानीं तेथें असावें. ७ बायांकडे खासगतखर्च आजतागायत जाला आहे. लोकांचें सावकारी देणें कर्ज केलें आहे. तो ऐवज द्यावा. उभयतां कारभारी पैसा नाहीं म्हणतात परंतु कांहीं लाख दोन लाख रुपये द्यावे लागतील. "

याप्रमाणें समेटाचीं कलमें मुकरर करून बाळोबातात्या व आबा चिटणीस पुण्यास आले. मागून बाया आल्या त्या जेजुरीवर राहिल्या. त्यांची व दौलतरावांची भेट व्हावी ह्मणून कारभाऱ्यानीं फार फार यत्न केला, परंतु भेट घेण्याचें बायानीं साफ नाकारिलें. त्यांचें कर्ज फेडण्याकरितां बाळोबातात्यानीं पांच लक्ष रुपये देऊं केले होते ते हातीं पडतांच आगस्ट महिन्याच्या अखेरीस त्या बाया जेजुरीहून निघून परभारें जांबगांवास गेल्या. या सुमारास त्यांची सवत भागीरथीबाई मरण पावली त्यामुळें तें एक तंट्याचें मूळ नाहींसें झालें. तरी समेटाचीं बहुतेक कलमें अद्याप उलगड्यांत यावयाचींच होतीं. मुख्य गोष्ट दहा लक्षांचा सरंजाम देऊं केला त्यांत दौलतरावांचीं ठाणीं होतीं

र्तीं उठून बायांचीं ठाणीं बसावयाचीं, तें अवधीचें काम होतें. आमच्या सरंजामांत आमचीं ठाणीं बसतपर्यंत आम्ही दक्षिणेंतून हालत नाहीं असें सांगून बायांनीं जांबगांवासच मुक्काम तूर्त कायम केला. त्यांच्या फौजेपैकीं बहुतेक मराठे व पठाण त्यांजवळच राहिले. नारायणराव बक्षी व यशवंतराव शिवाजी व देवजी गवळी हे मात्र बाळोबातात्यांच्या विश्वासावर शिंद्यांस येऊन भेटले. व त्यांच्या फौजेची गणती घेऊन शिंद्यानीं त्यांस पूर्वींप्रमाणें चाकरीस ठेविलें.

म्हैसूरच्या स्वारीवर परशुरामभाऊनीं आपल्या तर्फेनें रामचंद्रपंत आपास मोठी फौज बरोबर देऊन पाठवावें असा पुण्याच्या दरबारांत सिद्धांत ठरला, आणि त्याप्रमाणें मुतालिकीची शिक्केकट्यार आणि जवाहीर पोषाख वगैरे बहुमान भाऊंकडे रवाना झाला, हें मागें लिहिलें आहे. भाऊंचा मुक्काम खरोशी येथें असतां पुण्याहून शिक्केकट्यार व बहुमान ता० २४ मे रोजीं त्यांच्या लष्करांत येऊन पोंचला, व त्याचा त्यानीं समारंभानें स्वीकार केला. परंतु त्यानीं म्हैसूरच्या स्वारींत सामील होण्याचें प्रयोजन यापूर्वींच इंग्रजानीं टिपूचें राज्य बुडविल्यामुळें अजीबात नष्ट झालें होतें ! नेहमींच्या पद्धतीप्रमाणें ही स्वारी वर्ष दोन वर्षें तरी चालेल असा मराठी मुत्सद्यांचाच काय, पण सर्व लोकांचा अजमास होता तो खोटा ठरला ! इंग्रजानीं आपल्या फौजेची तयारी उत्तम प्रकारची केली होती व निजामअल्लीकडून त्यांस कुमकही चांगली मिळाली होती. यामुळें मराठ्यांच्या कुमकेची अपेक्षा न बाळगितां ते आपल्याच पराक्रमावर टिपूचें राज्य भराभर आक्रमीत सुटले. टिपूनें वारं-वार मर्दुमीनें लढाया दिल्या तरी दर लढाईत त्याचा पराजय होत गेला. शेवटीं एप्रिल महिन्यांत इंग्रजांनीं श्रीरंगपट्टणास येऊन मोर्चे दिले. एक महिनाभर लढाई चालून ता० ७ मे रोजीं इंग्रजांनीं हल्ला करून श्रीरंगपट्टण घेतलें. त्या लढाईत टिपू मारला गेला आणि मुलेंमाणसें सुद्धां त्याची सर्व दौलत इंग्रजांच्या हातास लागली. म्हैसूरचा राजा टिपूच्या कैदेंत होता त्यास इंग्रजानीं मुक्त करून फक्त म्हैसूरप्रांत त्याच्या हवालीं केला. आणि बाकी राज्य स्वतः घेतलें व कांहीं निजामअल्लीस दिलें. टिपूचें राज्य बुडाल्यावर त्याच्या अनुयायांपैकीं बऱ्याच लोकांची इंग्रजानीं सोय लाविली. ज्यांची सोय लागली नाहीं असे कित्येक असंतुष्ट लोक मोंगलाई व पेशवाई राज्यांत हिंडत होते. पूर्वीं आम्हीं यंव होतों, त्यंव होतों, आतां तुमच्या औदार्यावर भरंवसा टाकून तुम्हांकडे आलों, आम्हांस

मदत कराल तर इंग्रजांशीं लढून टिपूचा सूड उगवितों, असें सांगत फिरणें हा या लोकांचा पोट भरण्याचा धंदा होऊन बसला होता !

इंग्रजानीं टिपूस बुडविल्याची वार्ता पुण्यास येतांच तेथलें दरबार आश्चर्यानें व भयानें स्तब्ध झालें ! श्रीमंतानीं इंग्रज वकिलाजवळ बाह्यात्कारें मोठा आनंद प्रदर्शित केला व खुशालीच्या तोफा मारविल्या. त्या वकिलाच्या सांगण्यावरून म्हैसुराकडे रामचंद्रपंतास पाठवूं नये असें पत्रही त्यानीं परशुरामभाऊंस तत्काळ लिहिलें. पण त्याच वेळीं म्हैसूरच्या सरहद्दीस मराठे सरदार होते त्यांस आंतून तांतर्डीनें पत्रें लिहिलीं कीं, इंग्रजांचा अंमल बसला नाहीं तों तुम्ही सोंदें व बिदनूर प्रांतांत घुसून जितका मुलूख हाताखालीं घालतां येईल तितका घालावा ! हीं पत्रें जातांच धोंडोपंत गोखले व धारवाडचा किल्लेदार बापू शिंदे व लक्ष्मेश्वरचा मामलेदार बाळकृष्णपंत लागू यांनीं स्वाऱ्या करून सोंद्यांच्या व बिदनूरच्या हद्दींतलीं खेडीं दररोज लुटून आणण्याचा सपाटा चालविला. सुमारें दोन महिनेपर्यंत याप्रमाणें त्यांची चंगळ चालली. पण पुढें इंग्रजांनीं पुण्यास फारच गिल्ला केला व त्यांची फौजही त्या सरदेस येऊं लागली तेव्हां मराठी सरदारांस हळू हळू काढता पाय घेणें भाग पडलें !

बिदनूरच्या मुलखांतून मराठी सरदारांचा पाय निघतो न निघतो तोंच तेथील रयतेवर धोंडजी वाघाचें अरिष्ट येऊन गुदरलें. या धोंडजीस दंगेखोरपणाबद्दल टिपूनें श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें होतें. इंग्रजानीं तें शहर घेतलें तेव्हां सर्व बंदिवान मुक्त केले त्यांबरोबर धोंडजीही सुटला. सुटका होतांच तो बिदनुराकडे आला व आपले जुने सोबती गोळा करून दंगा करूं लागला. हां हां ह्मणतां त्याजवळ सात आठ हजार लुटारू शिपाई गोळा झाले. त्यानें होळेहोन्नुर, शिमोगा, शिकारपूर, उडगणी, चंद्रगुत्ती वगैरे ठाणीं भराभर ताब्यांत घेतलीं व आणखी फौज चाकरीस ठेवून तो इतका बलाढ्य होऊन बसला कीं, त्याच्या परिपत्याकरितां इंग्रजांस जनरल वेलस्ली याजबरोबर आठ दहा हजार फौज रवाना करावी लागली ! त्या फौजेनें येऊन दोन तीन लढायांत वाघाचा धुव्वा उडविला व त्याचीं सर्व ठाणीं घेऊन त्यास तुंगभद्रेच्या पलीकडे मराठी मुलखांत हुसकून लाविलें. आणि पुन्हा त्यानें बिदनुराकडे येऊं नये म्हणून इंग्रजांनी जागोजाग पलटणें ठेऊन बंदोबस्त केला. त्याच वेळीं मराठी हद्दीवर हल्याळ येथें त्यांच्या दोन तीन पलटणांची छावणी पडली.

शिंद्यांच्या कारभारांत बाळोबातात्या आल्यापासून श्रीमंतानीं नानांची

अनेकप्रकारें मनधरणी केली तरी ते त्यांच्या मनांतलें वैषम्य घालवूं शकले नाहींत. ' यांचें आमचें जन्मांत पटावयाचें नाहीं ' हें नानांचें बोलणें अजून कायमच होतें. पण चमत्कार हा कीं, तुमची आमची मैत्री असावी असा बाळोबा तात्याकडून संदर्भ आला तेव्हां तो मान्य करणें नानांस जड वाटलें नाहीं ! मात्र त्यानीं एवढीच अट घातली कीं, तुमचा आमचा स्नेह व्हावयाचा तो परशुरामभाऊंच्या मध्यस्थीनें व्हावा; आणि इतउत्तर राज्याच्या कल्याणासाठीं व उत्कर्षासाठीं जी मसलत करणें ती तिघानीं एकरूप होऊन करावी. तात्यांचा व नानांचा स्नेह जोडून देणें परशुरामभाऊंस आवश्यकच होतें. त्यानीं तात्यांविषयीं नानांस खात्री दिल्यावरून तात्या, नाना, व भाऊ या तिघांची एक जूट झाली. तों आगष्ट महिना संपत आला.

मराठी साम्राज्यांतील या जुन्या तीन प्रधान पुरुषांची मैत्री बनून येणें हें बाजीरावसाहेबांस धूमकेतूप्रमाणें भयंकर दुश्चिन्ह भासत होतें. त्यांचें मन भयानें व चिंतेनें व्यग्र झालें होतें तरी दौलतराव शिंद्यांचा त्यांस भरंवसा होता. तोच भरंवसा उराशीं घट्ट धरून ते दिवस कंठीत होते. त्या दिवसांत अशी भुमका उठली होती कीं, नानासाहेब पेशव्यांचा वंश लुप्त होऊं द्यावयाचा नाहीं हें बोलणें नानानीं पुन्हा उपस्थित केलें आहे; आणि त्यास अनुसरून त्यानीं असा मनसबा ठरविला आहे कीं, बाजीरावसाहेबांस पदच्युत करावें; आणि यशोदाबाईच्या मांडीवर अमृतरावाचा पुत्र विनायकराव यास देऊन या ' विनायकराव माधवाची ' पेशवाईच्या गादीवर स्थापन करावी ! या मनसब्यांत बाळोबातात्या व परशुरामभाऊ व दुसरे मुत्सद्दी व सरदार सामील झाले आहेत इतकेंच नव्हे, तर म्हणे खुद्द बाजीरावसाहेबानीं हें असेंच व्हावें म्हणून कबुली दिली आहे ! ही नुसती बाजारअफवा होती. यांतलें एकही अक्षर जबाबदार मुत्सद्यांच्या तोंडून बाहेर निघालें नसेल. पण असल्या अफवा उठणें सुद्धां बाजीरावसाहेबांस पराकाष्ठेचें कुपथ्य होतें. या संधींत मी तुमच्या भेटीस येतों असें बाळोबातात्यानीं सांगून पाठविल्यावर नको म्हणण्याची छाती श्रीमंतांस कोठून होणार ? त्यानीं गणेशचतुर्थीचें निमित्त करून बाळोबातात्या व त्यांचे अनुयायी सर्व शेणवी सरदार मुत्सद्दीमंडळी यांची समारंभानें भेट घेतली.

"श्री॥ राजश्री पंतप्रधान याणीं श्री॥ राजश्री अमृतराव यांस दौलतराव यांजकडे श्रीगणपतीचे उत्साहाकरितां बोलावयास पाठविलें होतें. यावयाचा करार केला. त्यास नवमीचे दिवशीं येतों म्हणोन सांगितलें, परंतु ते दिवशीं आले नाहीं. दशमीस आले, बारा घटका दिवसास आले. वाड्यांत दोन घटका

श्रीचे दिवाणखान्यांत बैठक जाली. राजश्री बाळोबातात्या, धोंडीबादादा, आबा चिटणीस, गोपाळराव भाऊ, बाबूराव आंगरेमामा, बाणाजी शेट्याकडील विठ्ठलपंत व बाजीबा मोदी याप्रमाणें सर्व मंडळी आली होती. श्री॥ राजश्री पंतप्रधान अलिजाबहादूर यांस वस्त्रें देत होते, परंतु घेतलीं नाहींत. राजश्री बाळोबातात्यांस वस्त्रें, कंठी, शिरपेंच दिला, व मोदी यास वस्त्रें, येणेंप्रमाणें आणखी दोन तीन असामी दौलतराव याणीं पेशजी अटकेंत ठेविले होते त्यांस दिलीं. अलिजाबहादूर यांची स्वारी निघोन गेली. नंतर राजश्री बाळोबातात्या व वरकड मंडळी राजश्री नाना यांजकडे आली. नानांचे दिवाणखान्यांत बैठक जाली. दोन घटका सर्व मंडळीसुद्धां एक जागां होते. नानानीं बाळोबातात्या यांस कंठी शिरपेंच दिला. परस्परें शरीरप्रकृति पुसिल्या. नंतर मोदी वगैरे आणखी तीन असामींस नानानीं वस्त्रें दिलीं. नंतर निरोप घेऊन निघोन गेले. ”

गेल्या दोन वर्षांत इंग्रजांनीं निजामअल्लीशीं मैत्रीचा तह करून त्याचें राज्य व्यापिलें आणि टिपूची दौलत अजीबात बुडविली. हा जो इंग्रजी सत्तेचा एकदम कल्पनातीत उत्कर्ष झाला त्याचें पर्यवसान शेवटीं मराठी राज्याच्या उच्छेदांत होणार, या गोष्टीची मराठी मुत्सद्यांस पराकाष्ठेची चुटपुट लागून राहिली होती. तात्या व नाना व नारोपंत चक्रदेव वगैरे मुत्सद्दी मंडळी याउप्पर इंग्रजांवर नक्ष राखून आपल्या राज्याचा बचाव कसा करितां येईल याबद्दलची वाटाघाट करण्यांत गुंतली होती. त्या वाटाघाटीपासून एखादी मसलत सिद्ध होती तर राज्याचा बचाव होण्याचा पुष्कळ संभव होता. बाळोबातात्यांच्या हुकमांत शिंद्यांचीं पलटणें वागणार, मराठी शिलेदारांच्या फौजा परशुरामभाऊंच्या हुकमतींत रहाणार, आणि राज्यरक्षणाच्या कामीं या दोघांस नानांच्या विशाळ बुद्धीची प्रेरणा मिळणार ! इतकें झाल्यावर मग आणखी काय पाहिजे ? शिवशाहीकडे वक्रदृष्टीनें पाहण्याची मग कोणा शत्रूची छाती होती ? याप्रमाणें राज्यास बरे दिवस येण्याची आशा लोकांच्या मनांत अंकुरित होऊं लागते न लागते तोंच नाना, तात्या व भाऊ या त्रिपुटीपैकीं भाऊंची असामान्य व्यक्ति या दृश्य जगांतून अकस्मात् नाहींशी झाली ! शिवशाहीच्या या तीन प्रमुख आधारस्तंभांपैकीं तो दक्षिण दिशेचा स्तंभ अकस्मात् ढांसळून पडला ! ता० १६ सप्टेंबर रोजीं पट्टणकुडी येथें करवीरच्या महाराजांशीं परशुराम भाऊंची लढाई होऊन तींत ते मारले गेले; हीं वार्ता वज्राघाताप्रमाणें अकस्मात् लोकांच्या कानावर येऊन आदळली !

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

मे महिन्याच्या अखेरीस परशुराम भाऊनीं चिकोडीचें ठाणें घेतलें असें आम्हीं मागें सांगितलें. तेथपासून ज्या लढाईत ते मारले गेले त्या पट्टणकुडीच्या लढाईचा दिवस उगवेपर्यंतचा त्यांच्या लष्कराचा तीन साडे तीन महिन्यांचा वृत्तांत सांगावयाच', आणि पट्टणकुडीच्या लढाईचें वर्णन द्यावयाचें, एवढ्या दोनच गोष्टी आतां करावयाच्या राहिल्या, त्या थोडक्यांत उरकून आम्ही हें प्रकरण संपवूं.

बायांचें लटांबर दक्षिण महाराष्ट्रांतून निघून गेल्यावर करवीरकर व परशुरामभाऊ या दोघांमध्यें चालू असलेल्या संग्रामाचाच तेवढा निकाल लागावयाचा राहिला. चिकोडी काबीज झाल्यानंतर सबंध जून महिना भाऊंचा मुक्काम खरोशी येथें होता. प्रकृति नीट नसल्यामुळें त्यानीं विश्रांती-साठीं मिरजेस यावें असें बाळासाहेबांनीं सुचविलें होतें. त्यावर रामचंद्रपंतानीं उत्तर लिहिलें कीं “ वडिलानीं रहावयास मिरजेस यावें, त्यास ही फौज पैक्यावांचून वडिलांकडे पाहून राहिली आहे. आज वडील येथून गेले म्हणजे ( फौजही ) झाडून उठून जाणार. तेव्हां इतके दिवस केलें तें व्यर्थ गेलें ( असें होईल. ) याजकरितां गोकाक अगर बागेवाडी येथें वडिलीं राहावें. कांहीं फौज चिक्कोडीस ठेऊन येथील बंदोबस्त करावा, छावणींत मनोळी वगैरे खेडीं घटप्रभेपलीकडील झाडून घ्यावीं, पुढें जसा सुभत्ता पडेल तसें करावें, असें योजिलें आहे. ” रामचंद्रपंतानीं ही मसलत योजिली होती ती चांगली होती. परंतु जुलईत पहावें तों भाऊनीं हें सर्व बाजूस ठेऊन पुन्हा चढावाचेंच धोरण स्वीकारलें, आणि आधींच गळाठलेली आपली फौज-आणखी ठाणीं काबीज करण्यांत शिणवून अधिकच कमकुवत केली, याचा परिणाम चांगला झाला नाहीं.

मिरजकरांच्या घराण्यांत गंगाधरराव व चिंतामणराव यांचें भांडण आजपर्यंत आपसांत धुमसत होतें त्याचा जून महिन्यांत चांगलाच स्फोट झाला. गंगाधरराव ऊर्फ बाळासाहेब हे चुलते आणि चिंतामणराव हे पुतणे म्हणजे वडील बंधु पांडुरंगराव गोविंद यांचे पुत्र. वडीलकीचा मान चिंतामण-रावाचा आणि सरदारीही त्यांच्याच नांवानें चालत होती. अगदीं न्यायच पाहूं गेलें तर सरंजामाचे धनी चिंतामणराव यानीं व्हावें आणि गंगाधरराव यांस पोटगीदाखल कांहीं उत्पन्न मिळावें. परंतु गंगाधररावानीं तरी बेवीस वर्षें हुशारीनें कारभार हांकून आपली पात्रता सिद्ध करून दाखविली होती. केवळ पोटगीवरच त्यांचा तंटा बिल्हेस लागला नसता. सरंजामाचा कांहीं तरी हिस्सा

त्यांस देणें सरकारास प्राप्त होतें. गंगाधरराव हे फार धोरणी असल्यामुळें ते मूळपासून नाना फडनवीस व परशुरामभाऊ यांची मर्जी तत्परतेनें राखीत आले होते. हेतु एवढाच कीं, कधीं तरी हें घरगुती भांडण जेव्हां उपस्थित होईल तेव्हां त्या दोघांनीं चिंतामणरावास जरबेंत ठेवून सरंजामाचा उपभोग आपणाकडे यथापूर्व चालू ठेवावा ! परंतु बाळासाहेबांवर भाऊ व नाना यांचें किती प्रेम असलें तरी त्या दोघांस हें भाऊबंदकीचें भांडण तोडण्याची वेळ आली तेव्हां उघड पक्षपात अर्थातच करितां येईना ! चिंतामणरावानीं भाऊंस विनंती केली कीं, आज दहा महिने मी तुम्हांबरोबर लष्करांत हिंडत आहें व माझ्या तक्रारीची दाद द्या असा वारंवार अर्ज करीत आहें; आणि तुम्ही सर्वांस वडील असतां ही गोष्ट कांहींच मनावर घेत नाहीं याचा परिणाम काय ? चुलत्यास पोटगी देऊन दौलतींतून बाहेर काढावें असेंही मी म्हणत नाहीं. मी वडील भावाचा मुलगा व सरदारीचा मालक हें लक्षांत धरून सरंजामाची काय वांटणी चुलत्यास द्यावयाची ती त्याला द्या आणि बाकीचा सरंजाम माझ्या हवालीं करा. चुलत्याच्या भिडेनें आजपर्यंत तुम्ही मला थोपवून धरिलेंत, परंतु आतां आपल्यां हातून दम निघत नाहीं. माझ्या तंट्याचा निकाल आजच्या आज झाला पाहिजे. याप्रमाणें चिंतामणराव अगदीं निकरावर आलेसें पहातांच यांची तूर्त कांहीं तरी समजूत काढा असें बाळासाहेबांस भाऊनीं वारंवार लिहून सुचविलें. परंतु वेळ किती बाणीवर आली हें न ओळखितां बाळासाहेब नेहमींप्रमाणें कालहरणाच्या गोष्टी बोलूं लागले ! तेव्हां भाऊ मोठ्या अडचणींत सांपडले. त्यांचा वडीलपणाचा बोज चिंतामणरावास आवरून धरण्यास असमर्थ झाला. चिंतामणरावानीं अखेरचा एकच जाबसाल सांगितला कीं, मिरजकरांचें पथक चार हजार स्वारांचें असून त्याच्या खर्चाकरितां बारा लक्षांचा सरंजाम सरकारांतून चालत आहे. त्यापैकीं तीन हजार स्वारांचा सरंजाम म्हणजे नऊ लक्षांचा मुलूख मजकडे चालावा, त्यांत मिरजप्रांतीं सांगली आदिकरून चार लक्षांचा मुलूख माझ्या वाटणींत असावा. बाळासाहेबानीं मिरजेचा किल्ला मला द्यावा अगर मोबदला नवीन किल्ला बांधण्यास एक लक्ष रुपये द्यावे. या गोष्टी बाळासाहेब अमुक मुदतींत मान्य करीत असतील तर ठीकच आहे. तसें न होईल तर मग मी कोणाचा कोणी नव्हे ! जिकडे वाट फुटेल तिकडे निघून जाईन ! याप्रमाणें तुटक जाबसाल बोलून दिलेली मुदत संपल्याबरोबर चिंतामणरावानीं भाऊंच्या लष्कराशेजारीं जुलैच्या अक-

राव्या तारखेस आपला निराळा गोट थाटला. आणि पांचशें स्वार आणि तीन साडेतीनशें पायदळ गोळा केलें. इतकें झाल्यावरही त्यानीं भाऊंच्या आग्रहावरून आणखी पंधरा दिवस वाट पाहिली. शेवटीं कांहींच तडजोड होईना तेव्हां ते कूच करून प्रथम तेरदळास गेले. तेथील देसाई त्यांस अनुकूळ झाला होता. त्याच्या द्वारानें त्यानीं तेरदळचें ठाणें काबीज केलें; आणि लगेच सड्या स्वारीनें जाऊन मंगळवेढें जबरदस्तीनें घेतलें. तेव्हांपासून मिरजकरांच्या घराण्यांत हा भाऊबंदकीचा वणवा दिवसेंदिवस वृद्धिंगत होत चालला. या प्रकरणांत परशुरामभाऊनीं आपली उपेक्षा केली अशी बाळासाहेबांची समजूत होऊन त्यांचें मन फार खट्टू झालें आणि भाऊंचे पुत्र रामचंद्रपंतआपा व हरिपंत व महादेवराव यानीं आपल्या पुतण्यास आंतून भर देऊन कलहास प्रवृत्त केलें असावें असा त्यांस जबर संशय आला. वास्तविक हे आरोप अन्यायाचे असून त्यांत भाऊंची, अथवा त्यांच्या मुलांची कांहीं एक चूक नव्हती.

जुलै महिन्यांत ठाणीं काबीज करण्याचा क्रम भाऊनीं पुन्हा चालू केला आणि आगष्टअखेरपर्यंत भोज, एकसंबें, सोलापूर, गलदगें व खडकलाट हीं ठाणीं घेतलीं. चिकोडी व मनोळी हे दोनी तालुके आतां पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत आले. करवीरकरांपासून आतां शिरोळ व अकीवाट हीं ठाणीं आणि भूदरगडचा किल्ला घ्यावयाचा, आणि तासगांवच्या वाड्याचें नुकसान भरून घ्यावयाचें, एवढ्याच गोष्टी राहिल्या. एखाद्या लढाईत महाराजांस जबर ठोकर लागली असतां समेट होऊन हें नुकसान भरून निघेल असा रंग दिसूं लागला. कैदेंतून सुटल्यापासून एक वर्षभर भाऊंचा उत्कर्ष होत गेला त्याची आतां परमावधि झाली हें या वर्षांतल्या त्यांच्या पराक्रमांचा आढावा घेतला असतां कळून येतें. कैदेंतून सुटतांच त्यानीं साताऱ्याच्या मोहिमेंत यश मिळविलें, सुरापूरच्या संस्थानिकास नम्र केलें, कर्नाटकची मुलुखगिरी केली, सावनूरचे महाल सोडविले, सरंजामापैकीं यादवाड व गोकाक परगण्यांत करवीरच्या महाराजांचा अंमल बसला होता तो उठविला आणि महाराजां, देखदेखत त्यांपासून चिकोडी व मनोळी हे तालुके हिसकून घेतले, सरंजामावर सरकारची जप्ती होती ती उठविली, चौदा लक्ष रुपयांची गुन्हेगारी माफ करून घेतली, मुतालिकीची शिक्केकट्यार मिळविली, नाना फडनवीस व बाळोबातात्या यांच्या कूटांत सामील होऊन आपलें वजन जबरदस्त वाढविलें, अशी ही त्यांच्या एक वर्षांतल्या प्रतापांची परंपरा आहे. या प्रतापां-

बद्दल त्यांची चोहोंकडे वाहवा होत होती तरी त्यांस प्राप्त झालेली श्री अधोमुख होती हें कोणी जाणलें नाहीं ! त्यांच्या वैभवाचा डोलारा इतका टोलेजंग दिसूं लागला तरी त्याला आंतून भयंकर पोखरणी लागल्यामुळें तो ढांसळण्याच्या बेतांत आला होता हें कोणासच समजलें नाहीं !

परशुरामभाऊ व करवीरकर महाराज यांमध्यें जें हें युद्ध जुंपलें होतें त्यांत भाऊंस यश यावें व महाराज चिरडले जावे अशी बाजीराव साहेब व नाना फडनवीस यांची इच्छा मुळींच नव्हती. याचें कारण भाऊंपासून महाराजांचा बचाव करण्याविषयीं दोघेही आगाऊच वचनबद्ध झाले होते, याबद्दल पूर्वीं लिहिलेंच आहे. अर्थात् पुणेंदरबाराकडून भाऊंस सैन्याची अथवा द्रव्याची मदत होण्याचा तिळमात्र संभव राहिला नव्हता. बरें, भाऊबंदांकडून त्यांस कुमक मिळावी तर तीही आशा खुंटली होती ! भाऊंशीं कुरुंदवाडकर अगदीं फटकूनच होते. मिरजकर बाळासाहेब मात्र बोलण्याचालण्यांत आदर, प्रेम व ऐक्यभाव दाखवीत, पण तो सगळा देखावा वरपांगी होता. कुरुंदवाडकर व मिरजकर यांचा आतून महाराजांशीं मिलाफ होता. आणि भाऊंची कुमक केल्यास महाराजांचा नाश होईल आणि त्या योगानें पेशवे व नाना यांची मर्जी आपणावर नाखूष होईल हें त्यांस भय होतें. भाऊंच्या लष्करांत कुरुंदवाडकरांचा एकही स्वार नव्हता. मिरजकरांचे दीड हजार स्वार मोहिमेच्या सुरुवातीस सामील झाले होते त्यांतले हजार बाराशें असामी भाऊंकडून पोटास मिळत नाही या सबबीवर तीन चार महिन्यांपूर्वींच लष्कर सोडून मिरजेस आले होते. कांहीं थोडे राहिले ते चिंतामणरावानीं लष्कर सोडिलें तेव्हां त्यांजबरोबर निघून गेले. एतावता एकट्या परशुरामभाऊंवर ही लढाई पुढें चालविण्याचें जोखीम पडलें. जून अखेरीपासून बाळासाहेबांस भाऊ वारंवार लिहीत गेले कीं, फौज ताजी तवानी करून तिची नवीन तयारी करण्याकरितां आम्हांस मिरज तासगांवाकडे छावणीस येणें आवश्यक आहे. तसें करूं जावें तर मार्गांत करवीरकरांची फौज आहे ती दूर सरली पाहिजे. तुम्ही व कुरुंदवाडकर इचलकरंजीकडे स्वारी कराल तर शत्रूस मागून पायाबंद बसल्याप्रमाणें होऊन हटावें लागेल. आणि त्या योगानें मिरजेकडे येण्याचा आमचा हेतु सिद्ध होईल. परंतु या लिहिण्याकडे दुर्लक्ष करून कुरुंदवाडकर व मिरजकर भाऊंच्या इच्छेप्रमाणें कांहींएक यत्न न करितां तिऱ्हाइताप्रमाणें लढाईची मौज पहात आपल्या जागीं स्वस्थ राहिले !

आपणास कांहीं कुमक मिळावी म्हणून भाऊंनीं बाळोबातात्यांस लिहिलें

असतां तिकडूनही त्यांस नकारच मिळाला. तात्यानीं साफ लिहिलें कीं, शिंद्यांच्या घरांत बैदा माजला असल्यामुळें आम्हांस एकही माणूस तुम्हांकडे पाठविण्याची सोय नाहीं. त्यांतून बायांशीं आमचा करारनामा ठरला आहे त्यांत शिंद्यानीं महाराज व भाऊ यांत समेट करून द्यावा असें एक कलम आहे. यामुळें तुम्हांस आम्हांकडून कांहीं एक मदत मिळावयाची नाहीं.

चिकोडीचें ठाणें भाऊंच्या हवालीं झालें तेव्हां करवीरचे महाराज बेडख्याळ येथें होते. भाऊंच्या लष्करची हालचाल होत गेली त्या अनुरोधानें महाराजांच्याही सैन्याचे मुक्काम बारवाड, कोण्णूर, सदलगें, असे बदलत गेले. शत्रूच्या सैन्यापासून सात आठ कोसांच्या अंतरावर राहून आपला लाग केव्हां साधेल ही संधी पहात बसावें हें धोरण महाराजानीं धरिलें. भाऊंप्रमाणें त्यांच्याही फौजेची फार हलाखी होती. सबब शत्रूची एकदम गांठ घातल्यास काय परिमाण होईल, याचा भाऊंप्रमाणें त्यांसही भरंवसा नव्हता. त्यामुळें तलावे करितां करितां एकदोन वेळां उभय सैन्यें अर्धकोसाच्या टापूंत येऊन परस्परांची दृष्टादृष्ट झाली तरी युद्धप्रसंग घडून आला नाहीं. भरपावसाळ्यांत छावणीच्या कष्टांस न जुमानतां महाराज याप्रमाणें तीन साडेतीन महिने सैन्यांतच राहिले होते. मध्यंतरी कारणपरत्वें त्यांस करवीरास जावें लागे तेव्हां तितक्यापुरतें जाऊन ते परत येत. गोकुळाष्टमीच्या उत्सवाकरितां व गोसाव्यांच्या संतर्पणाकरितां व त्यांचे गुरु सिद्धेश्वरबावा यांच्या घरीं श्राद्ध होतें त्या निमित्तानें ते करवीरास आले होते. यासंबंधें मिरजकरांचा वकील नारो हरि करंदीकर याच्या पत्रांतील उल्लेख—"काल गुरुवारीं वे॥ शा॥ संपन्न राजमान्य राजश्री भटजीबावा नरसीपूरकर यांचे घरीं श्राद्ध झालें. हजार बाराशें पात्र ब्राह्मणांचें जालें. व मराठे मंडळी अडीचशें तीनशेंपर्यंत जाली. सर्व साहित्य श्री॥ महाराज राजश्री छत्रपति याणीं केलें. व भटजीबावा नरसीपूरकर करवीरास आलेपासून दररोज दोनशेंचा शिधासरंजाम देत असतात. वाड्यांतच रहावयास जागा दिली आहे. महाराजांची स्वारी लष्करास सत्वरच जाणार."

परशुरामभाऊंची प्रकृति पूर्वीप्रमाणें चांगली झाली असें जवळ रहाणारे लोक बोलत, पण तसें असतें तर एवढ्या सेनापतीचें कांहीं तरी कौशल्य लष्करच्या हालचालींत व करामतींत दिसून आलें असतें. तसें न होतां सर्व कारभार भाऊंच्या मुलांच्या हातीं राहिल्यानें सैन्याची शिस्त बिघडून त्यांत ढिलेपणा उत्पन्न झाला होता असाच प्रकार दिसतो. याला उदाहरण सेंडूर म्हणून

एक लहानसें ठाणें होतें त्याला भाऊंचे दोन हजार स्वार व हजार पायदळ वेढा देऊन बसलें, आणि त्यानें गांव जाळून ठाण्याच्या खंदकापर्यंत मोर्चे नेले. सूर्यास्तानंतर ठाण्यांतल्या पन्नास पाऊणशें प्याद्यांनीं येऊन मोर्चांवर हुल्लड केली आणि पंचवीस माणूस ठार व पंचवीस जखमी केलें. त्याबरोबर त्याच रात्रीस ती सारी फौज मोर्चे सोडून निमूटपणें गोटास परत आली !

वेदगंगेच्या अलीकडे महाराजांचें सैन्य होतें तेथून पलीकडे राहिलेल्या भाऊंच्या लष्करास उपद्रव देणें मुष्किलीचें होतें. तथापि कांहीं किरकोळ धाडसी लोक नदीपलीकडे केव्हां केव्हां चोरपाळतीनें जाऊन त्या लष्करचीं माणसें मारीत व गुरें तट्टें वगैरे वळवून आणीत. परंतु एकदां असली एक तीनशें पेंढाऱ्यांची टोळी पलीकडच्या फौजेनें गांठून मारून टाकिली तेव्हांपासून अलीकडच्या फौजेंत दहशत बसली; आणि पलीकडे जाण्यास कोणी धजेनासें झालें. आगष्ट महिन्याच्या अखेरीस प्रतिपक्षाच्या सैन्याचा जोम व संख्या अगदींच खालावली आहे असें निदर्शनास आल्यावरून महाराज पलीकडे जाऊन लढाई देण्यास उत्सुक झाले. परंतु त्यांच्या सरदारांपैकीं कोणीही नदी उतरण्यास पाय घेईना, व स्वतः पलीकडे जाऊन बसावें तेव्हां सैन्य बरोबर येणार अशी स्थिति प्राप्त झाली. अखेरीस महाराज हिंम्या करून ता० २ सपटेंबर रोजीं वेदगंगा उतरून पलीकडे गेले आणि हमीदवाडा येथें डोंगराच्या आसऱ्यानें फौज उतरवून राहिले. भाऊंच्या सैन्याप्रमाणें त्यांच्याही लष्करांत पळपुटे लोक पुष्कळ होते त्यानी पळून जाऊं नये म्हणून महाराजानीं नदींतले टोकरे काढून ठेविले व नदीतीरीं जागोजाग चौक्या बसविल्या.

हमीदवाड्यापासून दोन कोसावर पट्टणकुडी येथें परशुरामभाऊंच्या लष्करचा मुक्काम होता. मोहिमेच्या भर उमेदींत त्यांचें सैन्य पंचवीस हजार होतें त्याची संख्या आतां सुमारें पांच हजार स्वार, दीड दोन हजार पायदळ व दोन तोफा एवढीच राहिली होती. महाराजांचें सैन्यही इतकेंच, किंबहुना हजार पांचशानीं कमीच असावें. शत्रु समीप आल्याचें पहातांच त्यास 'अंगावर घेऊन मोहला पावावा' अशी भाऊनीं मसलत योजिली ती त्यांच्या मोडकळीस आलेल्या फौजेच्या सामर्थ्यास झेंपण्याजोगी होती. शत्रु अंगावर आला असतां मागें हटून पळतोंसें दाखवून त्यास अडचणींत ओढून न्यावें आणि मागून एकदम चोहोंकडून गर्दी करून बुडवावें, हा लढाईचा डाव

शिवाजीच्या वेळेपासूनचा आहे. या तऱ्हेची लढाई झाली असतां कदाचित् यश न आलें तरी फौजेचा नाश होण्याचें तरी भय नसतें. भाऊनीं प्रथम ठरविलेला हा बेत रहित होऊन समोर तोंड देऊन लढण्याची मसलत कशी मुकरर झाली हें समजत नाहीं.

परशुरामभाऊंवर आलेल्या संकटाचा परिहार करण्यासाठीं मिरजकर व कुरुंवाडकर यानीं प्रयत्न केला असता तर तो साधला नसतासें नाहीं. कुरुंदवाड व मिरज येथें त्यांची फौज स्वस्थ पडून होती. पांच हजार स्वार, दोन हजार पायदळ व मिरजेच्या किल्यांतल्या लागतील तेवढ्या तोफा, एवढें सामान स्वारीकरितां पाठविण्यास त्यांजवळ केव्हांही तयार होतें. रघुनाथराव कुरुंदवाडकर हे मोहिमा केले संवरलेले शूर सरदार होते. ते जर फौज घेऊन करवीरकरांच्या पिछाडीवर येते तर किती नामी काम झालें असतें ! पण त्यानीं तसें कां करावें ? बाळासाहेबांच्या मनांत पुतण्या चिंतामणराव यास वांटणी द्यावयाची नव्हती. आणि रघुनाथराव यांच्या मनांत चुलतभाऊ गणपतराव कोन्हेर यास वांटणी द्यावयाची नव्हती. घरगुती भांडणांत भाऊंनीं आपला कैवार घेतला नाहीं म्हणून त्यांवर दोघांचाही रुसवा होता. पुणें दरबार व करवीरचे महाराज यांची मर्जी प्रसन्न राखणें दोघांसही अगत्याचें होतें. त्यानीं भाऊंच्या बचावासांठीं काय ह्मणून हातपाय हालवावे ? अखेरीस हे दोघे कांहींच करीत नाहींतसें ठरलें तेव्हां चिंतामणरावानीं हिय्या धरून हजार बाराशें स्वार गोळा केले आणि तशा पावसाळ्यांत कृष्णा उतरून आळत्याच्या ठाण्यावर चाल केली. परंतु त्यांचा जमाव थोडका आणि स्वारीचा उद्योगही फार उशीरानें म्हणजे लढाईपूर्वी चार दोन दिवस झाला. त्यामुळें त्याचा राजकारणावर कांहीं परिणाम झाला नाहीं.

दहा बारा दिवस दोन्ही सैन्यें इतकीं जवळ राहिलीं असतां कहींकबाड पाडून नेण्यापलीकडे कोणाच्याही अपकाराची मजल गेली नाहीं. लढाईची कुरापत प्रथम कोणीं काढावी हा निश्चय दोहोंतून कोणाचाही होईना. अखेरीस महाराजानीं सिद्धांत ठरविला कीं, ' आपण निपाणीस तोफा लावून गांव घेणार. तेथेंच त्या लष्कराची परीक्षा पहावी. निपाणीस तोफा लाविल्या असतां तिकडील कुमक न झाली तर त्या लष्करचा दम समजला. मग बेजरब लढाई द्यावी. " या बेतास अनुसरून भाद्रपद वद्य तृतीयायुक्त चतुर्थी मंगळवार ता. १७ सपटेंबर या दिवशीं सकाळच्या प्रहर दिवसास महाराज लढाईच्या तयारीनें फोजेसुद्धां गोट सोडून निघाले. तें वर्तमान येतांच

परशुरामभाऊनींही युद्धाची तरतूद केली. ती तरतूद अशी कीं, सुमारें एक हजार स्वार जवळ ठेऊन ते गोट संभाळण्याकरितां जाग्यावर राहिले; आणि बाकी सैन्याच्या दोन टोळ्या करून त्यानीं शत्रूच्या मुकाबल्यास पाठविल्या. एका टोळींत रामचंद्रपंत व दुसऱ्या टोळींत महादेवराव दाजी मुख्य सरदार होते. शत्रूशीं गांठ पडली तेव्हां प्रथम चार सहा घटका उभयपक्षीं तोफांचा मारा व पायदळाची लढाई सुरू होती. सायंकाळच्या प्रहर दिवसास करवीरकरांची फौज एकवटून रामचंद्रपंताच्या टोळीवर तुटून पडली. तेव्हां रामचंद्रपंतानीं पराकाष्ठेची जवामर्दी करून शत्रूस मागें हटवून हुसकून लाविलें. पुन्हा करवीरकरानीं सांवरासांवर करून महादेवराव दाजी यांच्या टोळीवर तितक्याच आवेशानें हल्ला केला. तेव्हां ती टोळी कच करून पळूं लागली. त्यामुळें लढाईची शिस्त बिघडून रामचंद्रपंतासही मागें हटावें लागलें. ही पिच्छेहाट होत असतां रामचंद्रपंतानीं स्वतः जखमी असतांही मोठा प्रयास करून आपली टोळी व्यवस्थेनें थोपवीत थोपवीत चालविली होती. परंतु संध्याकाळ होत चालला तसतसा तिचाही धरबंद सुटला. रामचंद्रपंतानीं गोट हालवून कूच करण्याविषयीं भाऊंस निरोप पाठविला व त्याप्रमाणें ते पालखींत बसून निघाले होते. गोटही लादालाद करून निघण्याच्या तयारीत होता. इतक्यांत महाराजांची सर्वच फौज येऊन गोटावर आदळली. लढाईत तोफा गमावणें आणि डोळ्यांदेखत शत्रूस गोट काबीज करूं देणें हें सेनापतीच्या नालायखीचें लक्षण समजलें जातें. गेल्या चाळीस वर्षांत हैदर, इंग्रज, टिपू यासारख्यानीं छाप्याचे प्रसंग आणिले असतां जी नाचक्की भाऊनीं करून घेतली नाहीं, ती ते असल्या क्षुद्र व कच्च्या दुस्मानाकडून करून घेतील हें अशक्यच होतें. ते पालखींतून उतरून घोड्यावर बसले आणि जेवढे लोक जवळ होते तितक्यांनिशींच लढाईस उभे राहिले. कोणी म्हणतात कीं, वीरश्रीच्या धुंदींत पुढचा मागचा विचार न राहिल्यामुळें ते लढून मरायला तयार झाले. कोणाचें म्हणणें कीं, गोट निघून जाण्यास अवसर सांपडावा म्हणून शत्रूस तोंड देणें हें सरदाराचें कर्तव्य त्यानीं केलें. दोहोंपैकीं कोणताही हेतु असला तरी तो भाऊंच्या एकंदर चरित्रास अनुरूपच आहे. मात्र इतकें जिवावर उदार होऊन लढल्यासारखें त्यांस कांहींच यश मिळालें नाहीं. शत्रूच्या पहिल्या धडकीसरसे जवळचे सर्व लोक पळून गेले व भाऊंस तीन जखमा लागून ते विश्वासराव घाटगे सर्जाराव यांच्या हातीं पाडाव सांपडले. भाऊंच्या अन्नावर वाढलेले व त्यानीं नांवलौकिकास चढवि-

लेले इतके शिपाई हजर असतां एकानेंही त्यांचा जीव वांचविण्यासाठीं हत्यार चालविलें नाहीं ! एवढा मोहरा जेथें पाडाव झाला तेथें त्याच्या बचावासाठीं झगडणाऱ्या हजार पांचशें राहो, पण शेंपन्नास तरी योद्ध्यांचे मुर्दे नजरेस पडावे ! पण मरणाच्या वेळचा सोबती भाऊंस एकही भेटला नाहीं ! या प्रसंगासंबंधें मागें या पुस्तकाच्या पांचव्या भागांत ( पृ. २५४५ ) एकानें मराठी फौजांचें विनोदात्मक लक्षण दिलें आहे त्याचें वाचकांस स्मरण द्यावेंसें वाटतें. तें लक्षण असें– " जर करून पोकळ लागल्यास मर्दपणास चुकावयाचे नाहींत. जरा तसा विचार दिसला तरी झाडास बांधिल्यानें झाडाचें झाड घेऊन जातील ! मग सरदारांची वाट पहाणें कळतच आहे ! " याप्रमाणें वाताहत झाल्यावर करवीरकरानीं भाऊंचा गोट हत्ती, घोडे वगैरे सर्व दौलतीसुद्धां लुटून फस्त केला हें निराळें सांगावयास नकोच !

परशुरामभाऊ जखमा लागल्यामुळें घोड्यावरून पडतांच विश्वासरावांच्या स्वारांनीं त्यांस आपल्या घोड्यावर उचलून घेऊन महाराजांपुढें नेलें तेव्हां ते आसन्नमृत्यु होते. त्यांस पहातांच महाराजांनीं त्वेषानें ' मारा ' म्हणून सांगितलें. त्या क्षणीं विश्वासरावानें भाऊंस घोड्यावरून ढकलून दिलें आणि महाराजांजवळ शिलेदारमंडळी होती त्यांनीं तरवारीचे वार करून भाऊंचें शरीर छिन्नविछिन्न केलें ! याप्रमाणें महाराष्ट्राच्या या प्रसिद्ध सेनापतीचा एका भिकार खेड्यावरच्या भिकार लढाईत अशा अधम प्रकारानें शेवट झाला ! समरांगणांत चतुर्थीच्या दिवशीं पतन पावल्यामुळें त्या विख्यात गाणपत्याचें वीरव्रत सिद्धीस जाऊन त्याच्या कीर्तीस भूषण झालें. बाकीचा प्रकार मात्र त्याच्या शत्रूंच्या कीर्तीस दूषणास्पद झाला.

महाराज गोटास परत आल्यावर त्यानीं परशुरामभाऊंचा वध करविल्याची गोष्ट दाजीबा लिमयानीं ग्रांट डफ् साहेबांस सांगितली ती खरी नसून भाऊंस महाराजानीं भरलढाईच्या गर्दींत मारविलें हें या प्रकरणांतल्या कागदांवरून स्पष्ट होत आहे. पण तेवढ्यानेंसुद्धां महाराजांच्या नांवाला कमीपणा हा येतोच. परशुरामभाऊंस मारावें हा आवाज कित्येक महिने करवीरच्या दरबारांत घुमत होता. तो अशा रीतीनें शांत करण्याचें अपेश महाराजांनीं घेतलें नसतें तरी परशुरामभाऊ जगले असते असें नाहीं. जखमांनीं घायाळ झाल्यामुळें ते आपोआपच मृत्युपंथास लागले होते. असें असतां महाराजानीं त्यांस मुद्दाम मारवून विनाकारण दुष्कीर्ति संपादन केली ! हे करवीरचे शिवाजीमहाराज मोठे शूर, धोरणी व धार्मिक वृत्तीचे होते, व त्यांचें खासगी वर्तन अत्यंत निर्मळ होतें. असें

असतां आपल्या प्रतिस्पर्ध्याचा खून करविल्याचा डाग त्यांच्या निष्कलंक चरित्रास लागावा हा प्रारब्धयोग !

परशुरामभाऊंविषयीं महाराजांचा द्वेष इतका निस्सीम होता कीं भाऊंचें प्रेत लढाईंत पडलें होतें त्याचें दहन व्हावयास पाहिजे या गोष्टीची त्यांस पर्वा अथवा इच्छाही नव्हती. परंतु मिरजकरांचा वकील नारो हरि करंदीकर यानें महाराजांची परवानगी मिळवून हमीद्वाडा येथें भाऊंचें प्रेत नेऊन त्यास अग्निसंस्कार केला. मागून दहनाच्या जागीं महाराजानीं समाधि बांधवून तेथें पूजाअर्चा नित्य चालावी अशी तजवीज केली. शिवाजी महाराजांस त्यावेळी पुत्र नव्हता व आपला वंशविस्तार व्हावा अशी त्यांच्या जीवास तळमळ होती. आमच्या मतें भाऊंची समाधि बांधविण्याचें हें कृत्य महाराजांच्या पश्चात्तापाचें निदर्शक होय.

पट्टणकुडीच्या लढाईंत परशुरामभाऊंच्या फौजेनें कसाही कुचरपणा केलेला असो, पण त्यांचे पुत्र व भाऊबंद यानीं आपलें सरदारीचें कर्तव्य बहुत मर्दुमीनें बजाविलें, याची साक्ष त्यांस झालेल्या जखमाच देत आहेत. या लढाईंत रामचंद्रपंत आपांच्या उजवे हाताच्या दंडास गोळी लागून पार झाली व त्याच हाताच्या अंगठ्याजवळ तरवारीची पुतळी लागली. विठ्ठलराव यादवाडकर यांचे डावे मांडीस गोळी लागून पार झाली. बळवंतराव दीक्षित यादवाडकर यांस कराचलीची जखम, हरीपंतबाबा यांच्या उजवे हातावर व विनायक भास्कर यांस डोचकीवर, हनुवटीस, गालावर व मानेवर अशा तरवारीच्या जखमा होत्या. लढाईंतून काय निभावले तेवढे लोक बरोबर घेऊन भाऊंचें पुत्र मध्य रात्रीस शितोळ्यांचे गांव अंकली व मांजरी येथें आले व तेथून मिरजेस आले. बाकी फौज वाट फुटेल तिकडे निघून गेली. लढाई झाल्याबरोबर महाराजानीं रत्नाकरपंत राजाज्ञा यांस दोन हजार स्वार, हजार पायदळ व दोन तोफा देऊन चिकोडी वगैरे ठाणीं घेण्याकरितां पाठविलें. त्यानीं पंधरा दिवसांत चिकोडी व मनोळी तालुक्यांतलीं सर्व ठाणीं काबीज केलीं. लढाईची अनिष्ट वार्ता ऐकतांच चिंतामणराव अळत्यांहून घाईघाईनें रातोरात निघून वारणा व कृष्णा उतरून सांगलीस आले. करवीरच्या गांवखेड्यांतील लोकानीं रात्रीच्या वेळीं लष्करावर दाटी केल्यामुळें त्यांची बरीच तारांबळ झाली.

याप्रमाणें परशुरामभाऊंच्या शेवटच्या स्वारीचा शेवट झाला. हा शेवट अशा अकल्पित प्रकारें होईल ही कोणासच अटकळ नसल्यामुळें भाऊंच्या मृत्यूची वार्ता ऐकतांच मिरज, कुरुंदवाड व पुणें वगैरे ठिकाणच्या

लोकांच्या मनास जबरदस्त धक्का बसला. मराठी राज्याचा भावी नाश सुचविणारे तीन अनर्थ गेल्या पांच वर्षांत घडून आले ते सर्व अकस्मातच घडून आले. सवाई माधवराव यांचा मृत्यु, टिपूच्या राज्याचा नाश व परशुरामभाऊंचा मृत्यु हे ते तीन अनर्थ होत. जणु काय भवितव्यतादेवीनें तीनदां ढोल पिटून सर्वांस जागें केलें कीं, मराठी साम्राज्य नष्ट होणार ! होणार ! होणार !

---

नं. ४७४७ श्रीगणपति. ( २१ फेब्रुवारी. )

पै॥ छ० ४ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत माघ वद्य प्रतिपदा युक्त द्वितीयापर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. आम्ही इकडे सावनुराकडे आलों. बहुतकरून ठाणीं पडलीं. एक मात्र राणेबिन्नूरचे राहिलें आहे तेथें आज मुक्काम गेला आहे. पांच चार रोज लागतील. आंत जमावही बराच पांच चारशें लोकांचा आहे असें ऐकण्यांत आहे. तेथें ठाणें पडल्यानंतर एक दोन लहान ठाणीं आहेत तीं वरचेवर घालून लवकरच वडिलांकडे जातों. येथील सरसुभा राजश्री बाळकृष्णपंतभाऊनी केला आहे तें आपणांस कळलें असेल. हावनूर ऐरणी दोन ठाणीं आहेत हीं हातास येतांच इकडील काम आटपलें. मग वडिलांजवळ येतों. पुण्याकडील कांहीं कळत नाहीं. वस्त्रें वडिलांजवळ येऊन पावलीं. इंदुवारीं त्रयोदशीस समारंभ होणार म्हणून लिहिलें होतें. मोठी गोष्ट झाली. चिरंजीव राजश्री नानाचें लग्न कार्यसिद्धि झालीच असेल. आज्ञा व्हावी. उमेदसिंगाचे बंदुकांचा मजकूर लिहिला, त्यास फाजील त्याजकडे येणें आहे सबब माल अडथळला आहे. हिशेब हीं पाठवितों. अजमासें कमकसर पांचशें रुपये मलकापुरी होतील. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४७४८ श्री. ( फाल्गुन–मार्च )

विज्ञापना. श्रीमंत मातोश्री बायांजवळ करवीरकरांचें बोलणें जे, श्री॥ रा ॥ भाऊसाहेबांचा आपला सलूख करून घ्यावा. वांकडें बोलणें नाहीं. सलूख न बने, आणि बायांचा व शिंदे यांचा समेट श्री ॥ रा ॥ भाऊसाहेबांच्या हातें न होय, तरी वांकडा प्रकार पडेलसा दिसतो. इतकीं बायांचीं बोलणीं दर्शवितात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ रामचंद्र परशुराम यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र. २ चिठी बायाच्या लष्करांतून कारकून बाबाजी विश्वनाथ चाफेकर याची मिरजेस बाळासाहेबांस.

नं. ४७४९ (माघ व० १०–१ मार्च.)

दौलतराव हिंदुराव घोरपडे यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० २२ रमजानचें—

मंगळवेढें प्रांतीं बायांची फौज येऊन फार दंगा झाला म्हणून कळलें. अंजनींत श्री देव सामान वगैरे आहे. फारच गडबड झाल्यास देव आपणापाशीं आणवून ठेऊन घ्यावे. ( बायांचें ) लष्कर कोणे रोखें जाणार हें सविस्तर लिहावें. आमची शरीर प्रकृत यथाप्रकार आहे."

नं. ४७५० श्री. (माघ व० १०–१ मार्च.)

छ० २६ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० २३ रमजान मुक्काम नजीक दोडवाड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं कृष्णा डास याजबरोबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. त्याचीं उत्तरें लिहून गोविंद जासूद याजवळ दिली आहेत. उदैक येथून कूच होऊन एकोडीचे मुक्कामास जाणार. राजश्री विठलरावबाबा यादवाडकर यांची फौज मिश्रीकोटाचें ठाणें घालायाकरितां कालच रवाना झाली. ठाणें बसल्यानंतर त्यांजकडे मामलत होणार. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७५१ श्रीगणपति. (माघ० व० ११– २ मार्च.)

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं आशीर्वाद उपरी. चिरंजीव राजश्री आपा फौज घेऊन कोठें मुक्काम आहे तें लिहावें म्हणोन लिहिलें, त्यास उभयता चिरंजीव फौज घेऊन सावनूर तालुक्यांतील ठाणीं बसवीत आहेत. राणेबिदनूर, हावनूर, व ऐरणी हीं तीन ठाणीं बसावयाचीं राहिलीं आहेत. इकडे हुबळींत मिश्रीकोट आहे. आमचा मुक्काम बेटगिरेनजीक आहे. तिकडून ठाणीं बसवून फौज आली म्हणजे बारीपार गोकाकचे नदीवर यावें असा बेत आहे. मिश्रीकोट्याचें ठाणें घ्यावयास चिरंजीव राजश्री विठलराव फौज देऊन आज पाठाविले आहेत. ढेंकणे यांणीं वस्त्रें बहुमान आणोन दिल्याचा मजकूर पेशजी लिहिलाच आहे. "करारप्रमाणें ऐवज द्यावा. कंपूची वरात पांच लक्षांची ( आम्हांवर ) जाली आहे. याजखेरीज चार पदरचे भरले आहेत." असे नऊ लक्षांच्या तरतुदेविशीं मोठे निकडीस आले आहेत. वेदमूर्ति राजश्री दीक्षित व फडणीस सारेच येथें घोळ घालीत बसले आहेत. कामकाजें म्हणावीं तरी "मंगलसूत्र बांधलें. याजउपरी त्यांच्या तुम्ही मर्जीनें चालावें. सारें मनोदयानु-

---

१ पत्र परशुरामभाऊंचें मिरजेस.

रूप सोईसाईनें करून घ्यावें. होईल." असे भाव सांगून पैक्याची जकड बसवितात ! येथील विचार या तऱ्हेचा. फौजेनें पोटासाठीं मोठें बजार केलें याची तोड व फौजेची तोड हीं मोठीं संकटें प्राप्त जाहलीं आहेत. लिहावयाची बाकी नाहीं. पुढें श्रीनें परिणाम काय योजिला असेल तो नकळे. छ० २४ बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद. पै॥ छ० २६ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ व॥ १३ इंदुवार. दोन प्रहर तास दिवस.

नं. ४७५२ श्री. (माघ व० ११–२ मार्च.)

पै॥ छ० २६ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

राजश्री गंगाधरराव गोसावी यांसीं

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित चतरसिंगराव राजे भोसले. दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. कसबे डिगरज व मौजे समडोळी येथें स्वारी करून घोडीं व गुरें व गांवकरी धरून नेले व हिंमत बहादर यांजकडील लाडखान धरून नेला म्हणोन लिहिलें, ऐसियास आम्हांकडील स्वारी गेली नाहीं व गुरें घोडीं हीं आणिलीं नाहींत; व वोली ही इकडे आणिल्या नाहींत. आपण कशावरून लिहिलें हें नकळे. जिकडून उपद्रव झाला असेल तिकडे शोध करून लिहावें म्हणजे उपद्रव होणार नाहीं. आम्हांकडून हरएकाविशीं उपद्रव व्हावयाचा नाहीं. रवाना छ० २४ रमजान. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४७५३ श्री. (माघ व० ११–२ मार्च)

पै॥ छ. २८ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ वद्य ३०

विज्ञापना. तागायत छ० २४ रमजान पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० १५ रमजानचीं तीन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. तेथें लिहिलें कीं, " करवीरकर महाराज याणी बागलकोटापासून महालोमहालांच्या खंडण्या घेत अथणीपासून दोन कोसांवर आले आहेत. येथून बारा चौदा कोसांवर आले आहेत. व शिंदे यांच्या बायांकडील कारकून महाराजांकडे आले आहेत. यांच्या व त्यांच्या भेटी व्हाव्या, मुलुख मारावा, मिळेल तें निम्मेनिम वांटून घ्यावें, याप्रमाणें घाटत आहे. उभयतां मिळोन वडिलांवर जाणार अशी वार्ता आहे. काय घडेल तें नकळे. वडील धारवाडाअलीकडे बेटगिऱ्यानजीक आहेत. अलीकडे पांच सात दिवस पत्र आलें नाहीं. बायां-

१ बाळकृष्णपंत बाळ याचें पत्र बाळासाहेबांस.

कडील फौज कांहीं मंगळवेढ्यास आली. छ० ९ रमजानीं गांवावर चालोन आले तेव्हां लढाई झाली. आम्हांकडील बारा पंधरा असामी जायां व जखमी झाले व त्यांचेही झाले. मनस्वी खंडणी मागतात. अलीकडे पत्रें आलीं नाहींत. करकंबेस तर मोंगलाचे फौजेचा वेध लागला आहे. तीस हजार रुपये घेतले. खेरीज कहीकबाड मनस्वी उपद्रव होत आहे. बाकी ठेविली नाहीं." करकंबेहून व मंगलवेढ्याहून पत्रें उपद्रवाचीं आलीं त्याच्या नकला सहा पाठविल्या त्या पावल्या. "शिरोळ येथें काल करवीराहून दोनशें स्वार आले. चतरसिंगही येणार. ठरतात किंवा जातात हें मागाहून लिहितों;" म्हणून लिहिलें, त्यास पत्रें व पत्रांच्या नकला श्रीमंत राजश्री नानास्वामींस दाखविल्या. आज्ञा झाली कीं, बाया व राजश्रींच्या भेटी खचीत होतात असें असल्यास बातमी वरचेवर यावी. करकंबेस नबाबाकडील फौजेनें तीस हजार रुपये घेतले म्हणून लिहिलें, त्यास राजश्री बजाबा शिराळेकर याची वरात आपले सरंजामावर पाऊण लक्षाची होती त्यापैकीं सतरा हजार रुपये पहिले पावले. अठ्ठावन हजार राहिले त्याजपैकीं वीस हजार रुपये करकंबेचे महालाकडून घेतले व दहा हजार रुपये आपण पहिलेच राजश्री जनार्दनपंत म्हैसकर यांस सरकारचे भरण्यास देविले होते त्यापैकीं दोन हजार रुपये पावले होते. आठ हजार रुपये राहिले होते ते व्याजसुद्धां व मनोतीसुद्धां मशारनिल्हेनीं घेतले असतील. नबाबाकडील फौजेनें घेतले नाहींत. फौज आल्यामुळें कहीचा मात्र उपद्रव झाला असेल. बजाबाचे वरातींपैकीं अठ्ठावीस हजार बाकी राहिली ती पेस्तर सालचे ऐवजीं देविल्यास महालकरी देतील. अथवा स्वामींनीं देविल्यास महालास उपद्रव होणार नाहीं. याचा विचार काय तो लिहून आला पाहिजे. नकला पाठविल्या त्या पाहून माघारा पाठविल्या आहेत. चतरसिंग भोसले शिराळ्यास आले न आले हें लिहून पाठविलें पाहिजे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब प्रस्तुत कोठें आहेत हें वरचेवर लिहून येत असावें. व शिंदे यांच्या बायांचा मुक्काम कोठें आहे, राजश्रींस व बायांस अंतर किती आहे, हें लिहून येत असावें. राजश्री जनार्दनपंत म्हैसकर याणीं मंगलवेढ्यास नबाबाकडील कुमक केलीच असेल. हें कांहींच लिहून आलें नाहीं व हल्लीं छ. १८ रमजानचीं पत्रें व बातमीचे पत्रांच्या नकला आल्या त्याचीं उत्तरें मागाहून रवाना करतों. राजश्रींनीं सर्व प्रांतांत उपद्रव बहुत केला आहे त्याचा विचार सरकारांत होत आहे. बंदोबस्तही होईल. आपली व श्रीमंत दादांची

फौज मिरजेजवळ असावी. बातमी वरचेवर येत असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७५४ श्री. ( माघ व० ११–२ मार्च. )

पै॥ छ० २६ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं विज्ञापना. बायांचा मुक्काम मंद्वारीं जतेस येणार होता परंतु आला नाहीं. जतेपलीकडे चार कोस बायांचा मुक्काम आहे. अद्यापि बच्चाजीपंत आले नाहींत. बायांकडील मेव्याचे जिन्नस वगैरे मिठाई दहा पंधरा करंड्या भरून महाराजांकडे आल्या. काल बायांचे लष्कराचीं तट्टें दहा वीस व उंट पंचवीस तीसपर्यंत कहीस गेलीं होतीं तिकडून नेलीं. येथें आवाई तिम्मा वड्डु याणें नेलीं असें बोलतात. बायांचा यांचा संगम न व्हावा असें फार करून दिसतें. इतक्या उपर काय होतें पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. बायांकडील रोखा होनवाड निसबत रास्ते येथें होऊन गांवास वेढा देऊन खंडणी घेतली. रास्ते यांचे तालुक्यास इकडील तिकडील दोन्हीकडील उपद्रव झाले आहेत. फारच खराबी झाली. कळावें हे विज्ञापना.

नं. ४७५५ श्री. ( माघ व० १२–३ मार्च. )

पै॥ छ० २५ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ मास.

राजश्री गंगाधरराव गोसावी यांसीं.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित नारायणराव पाटणकर सरलष्कर ठाणें शिराळें. दंडवत. विनंती येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. तेथें लिहिलें कीं, मौजे रेटरें खुर्द हा गांव आपणाकडे आहे. त्यास ठाणें मजकुराकडून रोखेपत्र होऊन उपद्रव होतो असें दर्शविलें, त्यास सालमजकुरीं सरकारांतून ठाणें इकडे स्वाधीन केलें. त्यास मुलुख उजाड पडला आहे. शिबंदीचा पेंच भारी. प्रत्यहीं शिलशिला चालला आहे. याजकरितां ठाणें निसबत मिरज महालचा ऐवज यावयाचा त्याची परवानगी होऊन गांवगन्ना ताकीद झाली पाहिजे. सेवेशीं कारकून पाठवावयाचा, त्यास आपलें उत्तर आलेनंतर येईल. परस्पर स्नेह रक्षावयाचा त्या अर्थें संशय धरूं नये. तूर्त गांवास मनाचिठी दिली आहे. उत्तर येईल त्याजप्रमाणें कर्तव्यता घडेल. उत्तर पाठवावें. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

१ नारो हरि करंदीकर यांचे करवीरकरांच्या लष्करातून मिरजेस पत्र.

नं. ४७५६ श्री. ( माघ व० १२–३ मार्च. )

पै॥ छ० २५ रमजान. तिस्सा तिसैन.

विज्ञापना. अलीकडे पंधरा दिवस रा॥ बाळाजी विष्णु यांचें व श्री॥ राजश्री नाना यांचें खलबत होतें. एक दोन दिवसानीं घटका दोन घटका बोलणें होतें. त्यांतील भाव जे, रा॥ बाबा काळे मिरजेंत स्वामींजवळ बोलिले तो आहे. ध्यानांतच आहे. राजश्री बाळाजीपंत शिंदे याचे गोटांत दोन वेळां राजश्री बाळोबातात्यांकडे गेले होते. बोलणें जाहलें. नंतर पत्रें लिहून राजश्री मोरोपंत साठे याजपाशीं दिलीं. म॥निल्हे आज अथवा उद्यां निघोन श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडे येतात. वडिलांस इकडील विचारानें बाळाजीपंतीं लिहिलें आहे. तेथें मोरोपंत याणीं सैन्यांत जाऊन तेथें बोलण्यांत जो विचार घडेल तो निश्चयांत येईल. परंतु येथें उभयतांचे चित्तांत एक विचार व्हावा असें आलें आहे. वडिलांकडे मोरोपंत जाऊन आल्यानंतर काय तो ठराव होईल असें निश्चयांत कळलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७५७ श्री. ( फाल्गुन शु० ६–४ मार्च. )

[a]सेवेशीं नारो हरी करंदीकर दोनी कर जोडून शिरसा॥ नमस्कार विनंती विज्ञापना ता० ४ रमजान मंदवार पावेतों मु॥ लष्कर नजीक बागणी यथास्थित असे. विशेष. बागणीच्या खंडणीचा मजकूर तर पन्नास हजारांवर ठराव जाहला. यास ऐवज पंचवीस हजारांचें कापड व पंधरा हजारांचे दागिने व रोख दहा हजार येणे प्रों फडशा जाहला. शिवाय बागणीच्या दोनी वाड्या दरोबस्त लुटून जाळून टाकिल्या. उंसाचे फड कांहीं लुटले. कांहीं जाळले. याप्रों वर्तमान जाहलें. राजश्री नारो तुकदेव शिराळेकर याणीं पेशजी महाराजांस जमखिंडी वगैरे ठाणीं घालून द्यावीं. त्याजबद्दल साठ हजार रुपये करार केले तो ऐवज पावला नाहीं, यास्तव अष्टें व समडोली वगैरे जागीं उपद्रव होणार. आजचा दिवस बागणीवर लागेलसा दिसतो. इतक्यांत नारोपंत याजकडील बोलणें न आल्यास स्वारी होणार याप्रों बेत आहे. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७५८ श्रीगणपति. ( माघ व० १३–४ मार्च. )

छ० २८ रमजान. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

---

१ मोरो आपाजी परांजपे यांचें पत्र बाळासाहेबांस मिरजेस. २ नाना व बाळोबातात्या यांच्या मनातून परशुरामभाऊंच्या मध्यस्थीनें परस्पर स्नेह व्हावा. ३ हें सन १७९७ मधलें पत्र येथे चकून लागलें आहे.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं

अपत्यें कृष्णरायानें करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २६ रमजानपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. पठाणांच्या खंडणीचें बोलणें पेशजी दहा हजारांचें लागलें होतें. ते राजश्री श्रीनिवासराम यास जतेस घेऊन गेले. मग येथून त्यांजकडे भला माणूस पाठविला त्यानें साडेसात हजारांवर करार ठरावून आला. "येथून जवळपास ऐवज पाठवावा. त्यानीं जतेहून श्रीनिवासराम यास जवळपास पाठवावें. इकडे त्यांजकडील घोडीं पाडाव आलीं असतील तीं द्यावीं. त्यानीं येथून काय नेलें असेल तें द्यावें." असें ठरलें. त्यास येथें ऐवजाची तरतूद करीत आहों. ऐवज कर्जी कोठें मिळत नाहीं. त्यास होईल तशी त्याची तरतूद करून ऐवज पठाणाकडे पावता करितों. वडिलांची आज्ञा घासदाण्याचा ठराव सर्वांचा जाबसाल एके जागांच व्हावा अशी आहे, त्यास बायांच्या फौजेंत एकांत एक मिळत नाहीं. कोणी बोलावयास पाठवावा त्यासच कैद करून हाणमार करितात; तेव्हा तिकडे जावयास कोणी धजत नाहींत. अशीं संकटें प्राप्त झालीं आहेत. पठाणांचा प्रकार अनिवार म्हणोन खंडणी केली. मागाहून आणखी फौज बायांचे कुमकेस जाणार अशीं वर्तमानें येतात. त्यास राजश्री यशवंतराव शिवाजी पांच सहा हजार फौजेनिशीं बायांकडे जावयाकरितां येत आहेत. हिंगणगांव परगणे इंद्रापूर येथें माघ वद्य एकादशीस त्यांचा मुक्काम झाला म्हणोन राजश्री भगवंतराव आपा यानीं आजच पत्र पाठविलें तें येथें आलें त्या वरून विनंती लिहिली आहे. येविशीं राजश्री जनार्दन शिवाजी म्हैसकर यांचें पत्र आलें त्याची नक्कल करून पाठविली आहे त्यावरून सर्व विदित होईल. राजश्री यशवंत शिवाजी मोठा अनिवार आहे. श्रीनासिक क्षेत्राची दुर्दशा केली. येथें शिलकेस पैसा नाही. पेशजी मोंगलाचे फौजेनें खराबी केली आणि खंडणीही घेतली. पठाणांनीं खेडीं लुटून नाश बहुत केला. कसबेचा शिवार जाळून पोळून टाकिला. नित्य शिबंदीचा गवगवा पडतो. कर्जाशीं संबंध पडला आहे. तें ही या प्रसंगीं कोणी देत नाहीं; तेव्हां याचे परिणामाची आज्ञा येईल त्या प्रमाणें करीन. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४७५९ श्री. ( माघ व ० १३ – ४ मार्च. )

पै ॥ छ० २८ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ वद्य अमावास्या. विज्ञापना. तागायत छ० २६ रमजान इंदुवासर. रविवारीं लष्करचें कूच

जाहलें तें मौजे रेवनाळ व कट्टी नजीक जत दोन कोस येथें मुक्काम जाहला. मुक्कामास आलियावर बक्षीकडे गेलों. पत्रें प्रविष्ट केलीं. तों इतकेंत राजश्री मुकुंदपंत भिडे ही आले. तदोत्तर बोलणेंकरितां महादजी भोईटे व सुभानराव कदम हे दोघे जण बोलावून आणिले. आणि प्रत्येक बसोन बक्षी व दोघे मराठे यांणीं मजजवळ व राजश्री मुकुंदपंत यांजवळ बोलणेंस प्रारंभ केला कीं, राजश्री बाबा काळे यांस समाधान नाहीं तेव्हां निरुपाय गोष्ट. त्याणींच यावयाचें होतें. आह्मी भाळवणीचे सुमारें आलों तेव्हांपासून तुम्हांकडील मातबर कारकून येईल असें होतें ते ही गोष्ट न जाहली. पुढें दरमजल आलों. तों करवीरकरांनीं संधान आह्मांकडे लाविलें. हल्लीं राजे यांजकडील भेटीचे संधानास कारकून आठ दिवस येऊन बसले आहेत. येविषयींचीं बोलणीं बहुत जाहलीं तीं कोठपावेतों लिहावीं ? सारांश त्यांणीं सांगितलें जे, करवीरकर समीप आले यांची भेट घ्यावी कीं न घ्यावी, हें काय तें सांगावें. तेव्हां मी व राजश्री मुकुंदपंत बसोन विचार करून उत्तर केलें जे, आपण भेटीचा निश्चय केला किंवा आठ चार दिवसांचा अवकाश आहे ? अवकाश असलियासीं आपणाकडील शहाणा खातरजमेचा गृहस्थ द्यावा. आम्ही उभयतां त्रिवर्ग मिळोन मिरजेस जातों. भेट घ्यावी किंवा कसें तें तेथें निश्चय होईल. त्यास त्याणीं उत्तर केलें कीं, इतका अवकाश नाहीं. भेट न घेतली तर वाईट दिसतें. तुम्ही खातरजमेनिशी नको म्हणाल तरी आम्ही घेत नाहीं. तेव्हां उत्तर केलें जे, तुम्ही व करवीरकर समीप आलां; भेट न घेतलीयासीं वाईट दिसतें असे तुमचे बहुत अंदेश. मग आम्हांस विचारणें तें काय ? करवीरकरांची व आपली भेट जाहलीयावर त्यांचे चित्तांत मिरज प्रांत मारावा, श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांसीं ही बिघाड करावा, असे त्यांचे पल्ले आहेत. त्यास भोईटे व कदम व बक्षी यांणीं उत्तर केलें जे ही गोष्ट कदापि होणार नाहीं. खातरजमा

नं. ४७६०     श्री.     ( माघ व० १३–४ मार्च. )

पै॥ छ० २८ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

विज्ञापना तागायत छ० २६ रमजान इंदुवासर यथास्थित असे. विशेष. मालगांवास गुरुवारीं आलों तेथून सेवेशीं पत्र लिहिलें होतें. त्याचें उत्तर आलें तेंही पावलें. भृगुवारीं ढालगांवास आलों. मंदवारीं लष्करांत सिगनहळ्ळीचे मुक्कामास आलों. तेच दिवशीं बक्षीची भेट घ्यावी, त्यास त्याचे डेऱ्यांत

---

१ कारकून बाबाजी विश्वनाथ चांफेकर याचें शिंदे बायांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस पत्र. हे इतकेंच अपुरें सांपडलें.

लोकांचें धरणें बसलें होतें. गांठ पडली नाहीं. रविवारीं प्रातःकाळींच भेट घेतली. लष्करचेंही कूच जाहलें. कांहीं लोक तळावर रुसून राहिले होते त्यांचे समजुतीस बक्षी गेले. मला सांगितलें जे आज मजलीवर बोलणें होईल. दोन घटका बोलावयाचें आहे. असें उत्तर जाहलियावर मी निरोप घेऊन राहुटीस आलों. लष्करांत कैदेची जात नाहीं ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७६१ श्री. ( माघ व १३–४ मार्च. )

पै॥ छ २८ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २६ रमजान इंदुवासर मुक्काम मौजे रवनाळ परगणे जत. यथास्थित असे. विशेष. लष्करची कही आज मिरज प्रांतांत थोडी बहुत गेली. उद्ईक येथून रामतीर्थचे सुमारें कूच करावें या प्रयत्नांत आहों. हल्लीं येथें फौज पांच सहा हजार आहे. करवीरकरांकडील राजश्री बाजीपंत व बच्चाजीपंत बरोबर आहेत. भेटीचा निश्चय प्रतिपदेस दिसतो. येथून कूच जालियावर मिरज प्रांताची सरहद्द चुकते. करवीरकर अनंतपूरचे सुमारें कूच करणार. वरकड मजकूर मागाहून लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७६२ श्री. ( माघ व० १३–४ मार्च. )

पै॥ छ० २८ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ मास.

विज्ञापना. करवीरकरांची मसलत ऐनापूर येथें मुक्काम करून भेटी घ्याव्या व लग्नाचा समारंभ तेथें करावा अशी बाजार आवई आहे. हें न जाहालियासीं रामतीर्थानजीक जाऊन तेथें भेटीचा समारंभ करावा असें-ही बोलतात. येथें मराठेशिवाय मनसबा नाहीं ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४७६३ श्री ( फाल्गुन–मार्च. )

सेवेशीं विज्ञापना. मातुश्री लक्ष्मीबाई शिंदे मौजे शिगनहळ्ळी परगणे जत येथें फौजसुद्धां आहेत. पठाण दोन हजार फौजेनिशीं जतेवर येऊन उतरला आहे. गवळी एक हजार फौजेनिशीं जतेवरून कलवडेस जाऊन घासदाणा सात हजार रुपये घेऊन पुढें कसबे होनवाडास जाऊन गांवानजीक विहिरीवर मुक्काम केला आहे. लष्करांत कैद कांहींच नाहीं. महाराजांची

---

१ कारकून बाबाजी विश्वनाथ चांफेकर यांचें बायाच्या लष्करांतून पत्र मिरजेस.
२ बाबाजीपंत चांफेकर यांचें पत्र मिरजेस.

फौज बरी असें म्हणविलें ! डफळे यांजकडील घासदाणा पंचवीस हजार ठरवून घेतले. नंतर पठाणानीं जतेस येऊन घासदाणेकरितां गांवासभोंवता छबिना उभा करून गांव लुटूं लागले. तेव्हां जतकर ( पठाणांस बोलले कीं तुम्हीं ) महाराजांचे गळीं पडले असतां या गोष्टीस आम्ही मदत होत नाहीं. खर्चाच्या ऐवजीं पांच हजार रुपये देतों. बायांकडील जाबसाल तुम्ही उरकोन घ्यावें, म्हणोन सांगितलें. पठाणानीं जतेचे पेठेस जाऊन गावास आग लावावयासीं प्रवर्तला. तेव्हां डफळे याणीं चाळीस हजार रुपये घासदाण्याचे कबूल केले. पठाण बायांचेही कह्यांत नाहीं. अनाहूत कारभार आहे. प्रांतांत घासदाणा घेत फिरत आहेत. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७६४   ( माघ व० १४–५ मार्च. )

नारो हरि करंदीकर याचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

पै॥ छ० २९ रमजान.—

" जतेची खंडणी बायांकडील पठाण याणीं चाळीस हजार केली. त्यास ( पठाण खंडणींत ) कापड घेईनात. रोख ऐवज मागों लागले. डफळे यांचा कारभार ओढगस्त. पैसा उत्पन्न व्हावयाचा नाहीं. दोन रोज गांवांत मारामार फार केली. दोन हजार रुपये वसूल जाले. माणसांचे तोंडास मशाली देखील लाविल्या ! तगाद्याची बाकी राहिली नाहीं. तिसरे दिवशीं पठाणानीं ठाण्यावर हल्ला केली. गांवांत व ठाण्यांत हजारपर्यंत प्यादा आहे त्याणीं ठासून रोखिलें. मार मारिला. पठाण पांच असामी ठार जाले. वरकड माणसें वीसपर्यंत ठार जालीं. गांवाजवळून खिदडून पठाणांस काढिलें. नंतर बोलणें ठरलें कीं, कापड घ्यावें. ओली दिल्या होत्या त्या सोडिल्या. कापड घेण्याचें ठरलें. जतकरानीं मर्दुमी चांगली केली. "

नं. ४७६५   श्री.   ( माघ व० १४–५ मार्च. )

छ० २७ रमजान. सन तिस्सा तिसैन. माघ.

सेवेशीं विज्ञापना. बायांचा मुक्काम कंटी बागेवाडी परगणे जत येथें मंदवारीं आला. राजश्री बच्चाजीपंत आज सायंकाळपावेतों तिकडील कोणी संभावित गृहस्थ घेऊन येणार आहेत. ते येऊन बोलणें झालेवर भेटीचा निश्चय होणार. अमावास्या होऊन भेट होणार अशी बोलवा आहे. जसा निश्चय ठरेल तसें सेवेशीं लिहून पाठवीन. बायांचे लष्करांत बारभाईचें म्हणोन पथक हजार दीड हजार लोक आहेत त्यांचीं घरें कांहीं गंगातीरास व कांहीं देशांत आहेत.

---

१ कारकून बाबाजीपंत चाफेकर याचें पत्र बायांच्या लष्करांतून मिरजेस.

त्यांच्या मुलामाणसांचा बंदोबस्त करावा असें पुण्यास ठरलें. त्याजवरून त्या लोकांचा बैदा दोन चार ( दिवस ) पडला. याजमुळें बायांच्या येण्यास दिवसगत लागली. त्यांची समजून बायांनीं तूर्त काढली कीं, येथून कांहीं लोक देतों, व खानदेशांत गोपाळ यशवंत कांहीं फौज घेऊन आम्हांकडे येत आहे त्यांस पत्रें देतों. ते तुमचीं कुटुंबें घेऊन येतील अथवा बंदोबस्त राखतील असें सांगोन समजूत केली. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७६६ श्रीगणराज. ( माघ व० १४–५ मार्च. )

विज्ञापना. पुण्याहून पत्रें सरकारचीं देसाई यांस आलीं म्हणोन आज्ञा, त्यास हल्लीं देसाई याणीं ज्यांचा पक्षपात धरला आहे त्यांनीं गांवोगांव समाराधना करोन चितपावन ज्ञातीस आमंत्रण करावें, न आलिया गुन्हेगारी घ्यावी, असा इत्यर्थ केला आहे. यास्तव राजश्री मोरोपंतासमागमें विनंती सांगोन पाठविल्याअन्वयें आपलें पत्र देसाई यांस जावें. सरकारांतून पत्रें आलीं आहेत, त्यास वडिलीं बळ पाडिलें पाहिजे. नाहींतर चितपावन ज्ञातीचा अपमान होतो. ब्राह्मण प्राणत्याग करितात. असा प्रसंग येथें प्राप्त जाहला आहे. प्रथम यांनीं राज्य व्यापिलें आहे. आपण साभिमान धरोन केल्यास निर्वाह होऊन आपणास यश येतें. नाहींतर ब्रह्मवृंदाचा अपमान झाला असतां पुढें कालकाला दोष या कुळास लागला असें जालें. हल्लीं कऱ्हाडे प्रत्यक्ष म्हणतात जे, तुमच्या मुली आमचे येथें द्या ! हीं अक्षरें लघु नव्हत ! प्रथम द्रव्यवान, लाघवी, देवता अनुकूल ! चितपावनांस इतक्या ही गोष्टी प्रतिकूल आहेत. आपण साभिमानी आहेत. पत्र विसर्जन करावया आज्ञा झाली पाहिजे. रवाना छ० २७ रमजान. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना. राजश्री नाथबुवा आलेच आहेत. राजश्रींनीं सर्वही वृत्तांताची विनंती केलीच असेल. आपलें पत्र पूर्वीं जावें देसाई यांस, असा आशय येथील ब्रह्मवृंदाचा आहे. हे विज्ञापना.

नं. ४७६७ श्री. ( फाल्गुन–मार्च. )

पु॥ श्री० राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशी

राजश्री वेदमूर्ति नारायण भटजी व राजश्री बाळाजीपंत आहेत. व हल्लीं मोरोपंतास स्वामींची आज्ञा जाहली. त्यावरून श्री॥ राजश्री नानांची

---

१ रघुनाथराव कुरुंदवाडकर यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र. २ कऱ्हाड्यांनीं सावंतवाडीचें राज्य. ३ पत्र बाळकृष्णपंत बाळ नि॥ नाना फडनवीस यांचें मिरजेस बाळासाहेबांस.

आज्ञा घेऊन रवानगी केली आहे. विनंती करितील. सेवकास स्वामी विश्वकुटुंबी पदरीं घेतलें. सर्व गोड करून कार्यसिद्धि करणार स्वामी वडील आहेत, तेथें सेवकानें विस्तारें काय विनंती लिहावी ? सर्व प्रकारें सेवकास स्वामींचे पाय आहेत. कृपाळू होऊन सर्व समारंभ करून घ्यावा. आणि पांच दिवस सोहळा करून वडील बंधूंची व सर्वांची व मोरोपंताची रवानगी करावी. वाडीकर ब्राह्मणांची पंचाईत श्रीमंत भाऊसाहेबांकडे नेमून घेतों. वाडीकरांस व श्रीमंत भाऊसाहेबांस सरकारची पत्रें घेऊन मागाहून सत्वर पाठवितों. श्रीमंत भाऊसाहेबानीं महाराजांचे रोखें यावयाचें करावें म्हणजे राजश्री माघारे निघोन करवीरास जातील. मार्गे नच सरत तर रेंच चांगला मोडल्यावर दावही चांगला बसेल. हे विज्ञापना.

नं. ४७६८ श्रीगणपति. ( फाल्गुन शु० १—७ मार्च. )

छ० ३० रमजान सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें कृष्णरायानें करद्वय जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २९ माहे रमजानपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. पठाणांचे उपद्रवास्तव मोंगलाचे फौजेपैकीं आरब लोक दोनतीनशें कुमकेस आणविले होते त्याजवरून पठाणांचा शह खंडणी पतकरून दूर केला. डफळेचे परगणेंत जतेवर कूच करून पठाण गेले. नंतर आरब लोकांस चार रुपये पतकरले होते तेही दिल्हे. निघून जा म्हणून सांगितल्यास दिनमेकावर घालोन दोन दिवस मुक्काम करून राजश्री जनार्दनपंत लिमये यांजवर राजश्री नरसिंगराव तुकदेव यांजकडील भतगुणकीचे मामलतीबद्दल दहा हजार रुपयेची वरात नरसिंगराव यांचे नांवें आणोन किल्ल्याचे दरवाजास पन्नास आरब वरातेच्या जाबसालास येऊन बसले. एक संकट निवारण झालें तों दुसरें उभें राहिलें. तेव्हां ते दिवशीं पांचशें रुपये लिमये याणीं देऊन पंढरीस मोंगलाची फौज आहे तेथें राजश्री त्रिंबकराव साठे निसबत बजाबा शिराळेकर यांकडे कारकून राजश्री लिमये यानीं पाठवून वरातेचा जाबसाल करून तोड केली. नंतर आरबांस मनाचिठी आल्यावरून छ० २६ रमजानीं कूच करून आरब निघून गेले. हा मजकूर एकवेळ छ० २७ तारखेस लिहून माणसें पाठविलीं

१ पत्र लिहिणाऱ्यानें बाळासाहेबांचा पुत्र गोविंदराव यास मुलगी दिली, लग्नसमारंभ चालू होता, त्यास अनुलक्षून हें लिहिणें.

होतीं. परंतु मार्ग चालेना यास्तव माघारीं आलीं. हल्लीं जासूद सोबतीस देऊन रवाना केले आहेत. यानंतर मिरज प्रांतांत ही महाराजांचे फौजेचा दंगा भारी आहे असें लोक मनस्वी बोलतात. यास्तव वरचेवर सरकारचे ही जासूद इकडे रवाना झाल्यास दोहींकडील वर्तमान कळेल. एखादें निकडीचें वर्तमान आम्हीं लिहितों, परंतु मार्गाचा पेंच पडतो; यास्तव विनंती लिहिली आहे. वडिलांशिवाय आमचा समाचार घेणार दुसरा कोण आहे. ? सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं ४७६९ ( फाल्गुन शु० १–७ मार्च )

नारो हरि करंदीकर याचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

पै॥ छ० १ सवाल.—

" बायांकडून देवजी गौळी व गणोबातात्या आले त्यांची व महाराजांचीं बोलणीं होऊन आजच प्रहर दिवसास भृगुवारीं निरोप घेऊन गेले. इकडून हिंमतबहादर बापू व बचाजीपंत व बाजी रामचंद्र ऐसे आतांच निघोन बायांच्या लष्करास गेले. इकडील बोलण्याचा भाव कीं, तुमचे शत्रु ते आमचे शत्रु, आमचे शत्रु ते तुमचे, असा एक विचार व्हावा. त्यास येविशींचा निश्चय येथें आलेल्यांकडून जाला नाहीं. यास्तव हिंमतबहादर आज आणखी बोलावयाकारितां गेले आहेत. लष्करचा कूच आज बेळुराहून होऊन जतेजवळ गढी पंतरायाची ( ? ) आहे तेथें जाणार. जतकरांकडून ऐवज आला नाहीं सबब जाणार. तेथें गेल्यावर बायांस व यांस दीड कोसाची तफावत राहते. "

नं. ४७७० ( फाल्गुन शु० १–७ मार्च. )

नारो हरि करंदीकर याचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

पै॥ छ० १ सवाल.—

"देवजी गौळी बायांकडील काल गुरुवारीं सायंकाळच्या दोन तास दिवसास बेळूरच्या मुक्कामीं आले. पुढें हैबतराव गायकवाड सरखवास आणावयासीं गेले होते. गौळी याजबरोबर पांच चारशें लोक आले आहेत. हुजूरच्या डेऱ्याजवळ गोळीच्या अंतऱ्यानें पायउतारा होऊन डेऱ्यास येऊन मुजरे करून कांहीं वेळ स्वल्प बसून सर्वेच विडे जाले. नंतर उतरावयास जागा दाखविली व सरंजाम पाठविला तेथें जाऊन उतरले. हुजुरून मेजवानीबद्दल तीनशें रुपये नक्त पन्हाळी व मलकापुरी पाठविले. राजश्री बच्चाजीपंत इकडून गेले तेव्हां तिकडून त्यांस १०० रुपये चांदवाडी मेजवानीबद्दल बायानीं दिले होते.

बायांच्या लष्करांत रोज धरण्यापारण्याचा प्रकार आहे. राजश्री बाळाभाऊ येणार होते त्यांचें येणें गवगव्यामुळें शेवटीं जालें नाहीं. मग देवजी गौळी आला तो दोन तीन रोज निघतां निघतां गुरुवारीं आला. महाराज व बाया मिळोन प्रांतास उपद्रव करावा हा मानस बायांकडील कारभाऱ्यांचा नाहीं. आपण स्वतः निराळें राहून पोटास मेळविल्यास सरकारची बदमामली नाहीं. इकडे मिळोन प्रांतांत खंडणी घेतली असतां बदलामी येते असे भाव बोलण्यांतील दिसतात. ”

नं. ४७७१ (फाल्गुन शु० १–७ मार्च)

नारो हरि करंदीकर यांचें करवीरकरांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

पै॥ छ० १ सवाल.—

“बायांकडील बोलणें (करवीरकरांस आहे कीं) तुम्ही व आम्ही मिळोन प्रांताची खराबी करावयाची नाहीं, व भाऊसाहेबांसींही विरुद्ध करावयाचें नाहीं. ते सरकारचे चाकर व आम्ही सरकारचे चाकर. तुमचा आमचा शरीरसंबंध होणार त्यापेक्षां आम्हांकडील मंडळीचीं मुलें माणसें ठेवावयासीं जागा द्यावी. त्यास इकडील बोलणें वल्लभगड रहावयासीं जागा देतों. त्यांजकडील मागणें भूदरगड अथवा रांगणा, दोहींतून एक द्यावा. इकडील मानस हरकसेंही करून आपण व बायानीं एक व्हावें आणि गोंधळ घालावा; याअर्थी लटकें बोलावें, जें म्हणतील तें कबूल करावें, परंतु संधान मेळवावें. काय घडतें पहावें. ‘तोरगलास (भाऊसाहेबांचा) लाख रुपयांचा रोखा जाला आहे. शंभर राऊत व पन्नास गाडदी येऊन बसले आहेत’ असा सेनाखासखेल याणीं बोभाटा आणिला. व पेंढारी याणीं सामानगडाकडे धुमाकुळ मांडिला म्हणोन इकडून राजश्री नारायणराव पाटणकर यांची फौजेसह त्या सरदेस रवानगी होणार आहे. ”

नं. ४७७२ श्री. (फाल्गुन शु० १–७ मार्च)

पै ॥ छ० २९ रमजान. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं विज्ञापना. बायांचा मुक्काम बागेवाडीवर आहे. राजश्री बच्चाजीपंत अद्याप आले नाहींत. आज बुधवारीं भोजनोत्तर राजश्री बाळाराम भाऊ व देवजी गवळी उभयतांस घेऊन यावें. ते येऊन बोलणें होऊन नंतर भेटीचा निश्चय ठरणार. बायांकडून दारूगोळीविषयी पत्र आलें होतें

१ करवीरकर महाराजांचे लष्करांतून नारो हरी करंदीकर यांची चिठी मिरजेस बाळासाहेबांस.

त्याजवरून पांच मण दारू व दोन मण शिसें काल भौमवारीं रवाना जालें. श्री॥ राजश्री भाऊ साहेबांचा मुक्काम येकोडीनजीक सुतकट्टेवर नदीवर आहे म्हणोन मनोळीची पत्रें आलीं त्यांत लिहिलें होतें. करवीराहून दारू व गोळे मनोळीस रवाना होणेंविषयीं आज्ञापत्र गेलें आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

नं. ४७७३ श्रीगणपति. ( फाल्गुन शु० ३–९ मार्च. )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांस आशीर्वाद उपरी. तुम्ही छ० २२ रमजानचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. "लक्ष्मीबाई शिंदी यांजकडून रा॥ हरि जगन्नाथ कारकून आला. त्याबरोबर बायांचें पत्र व बक्षींचें पत्र मला आलें. त्याची नक्कल करून पाठविली आहे त्यावरून कळेल. त्यांतील अर्थ श्रीमंतांचे व नानांचे आज्ञेखेरजि ( आपण ) नाहीं. परंतु श्रीमंत राजश्री भाऊसाहेब थोर सरदार व वडील. त्याप्रमाणें त्यांजकडे जातों. त्यानीं सरकारांत बोलून ( आमचें भांडण ) मिटवून द्यावें; असे भाव आहेत. वडिलांकडे निघोन येणार. गेल्यावर मला पत्र आलें ( म्हणजे ) तेंच पत्र राजश्री नानांकडे पहावयास पाठवितों. आणि वडिलांस लिहितों" म्हणून लिहिलें तें कळलें. बायांकडील कारकून आल्यावर सारे भाव समजतील. "बाजारी आवाई वडिलांचे लिहिण्यांत बाया व महाराज एक होणार. तेव्हां यास त्यास कांहीं मिळत नाहीं. असो. श्रीइच्छा प्रमाण. श्रीनें योजिलें असेल तसें घडेल." ( म्हणून लिहिलें, ) त्यास नाइलाज. सावनूर तालुकेंत फौज गेली आहे. दोन चार ठाणीं बसावयाचीं आहेत. आरंभिलें तें कार्य शेवटास नेल्याखेरीज सोडतां नये. लौकरच आटपून येणेंविषयीं लिहिलें गेलें आहे. हुबळींत सरंजाम पोक्त आहे. ठाणें मजबूद. तूर्त येथें गुंतत नाहीं. बाकीचीं सारीं आठचार दिवसांत उलगडून फौज आणवितों. आल्यानंतर गोकाकचे नदीवर यावयाचें करितों. बाया महाराज एक होऊन चालणें अवघड परंतु श्रीइच्छा न कळे. त्यांचे पाठीवर पिच्छा आहे, तेव्हां पूर्व दिशेसच गमन करितील. मिरजेकडे रोंख करणार नाहींत. तत्रापि तुम्ही सावधतेनें बंदोबस्त राखावा. छ० १ सवाल. बहुतकाय लिहिणें. लोभ कीजे हे आशीर्वाद.

नं. ४७७४ श्री. ( फाल्गुन शु ० ३—९ मार्च.)

पै ॥ छ ० ७ सवाल सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ०

---

१ पत्र परशुराम भाऊंचे. २ चिठी बायांच्या लष्करांतून मिरजेस.

६ सवाल गुरुवासरपावेतों मुक्काम मौजे रवनाळ यथास्थित असे. विशेष. आज कूच करणेंचा आग्रह करवीरकरांचा होता परंतु कूच झालें नाहीं. आज हिंमतबहादर वगैरे कारभारी कूच करणेंच्या ठरावास येणार आहेत. काय तो निश्चय होईल. नाथाजी साळोंखे वे शिलेदारांचीं चार घोडीं यांची सुटका जाहली नाहीं. पैकेचा जाबसाल मनस्वी बोलतात. कांहीं खर्च पडेल असा दिसतो. रिकामी सुटका होत नाही. बक्षीस एक रुपयाचे जानवीं जोडे पाठवावया आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७७५　　　श्री.　　　( ११ मार्च )

पै॥ छ०६ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत फाल्गुन शु॥ ५ प्रातःकालपावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. राजश्री आबा चिटणीस यांजला शिंदे याणीं बोलावून नेलें. आणि आज्ञा केली कीं फौजेचा गवगवा लोकांचा आहे याचा बंदोबस्त करणें. असें सांगितलें. त्याजवरून राजश्री आबा व गोपाळराव व कृष्णराव या त्रिवर्गांस लोकांनीं बसविलें. बोलण्यामध्यें कज्या होऊन आबांस गाज्याची व पुतळीची अशा दोन जखमा तरवारीच्या लागल्या. हें शिंदे यांस कळलें. नंतर त्याणीं भले लोकांस सांगून आबांस आपले डेऱ्यास घेऊन गेले. याजप्रमाणें काल चतुर्थीस जालें; असें वर्तमान दाट बोलतात. सर्जेराव बापू व राजश्री बाळोबा यांजला शिंदे सोडणार. बाळोबाकडे पत्रें शिंदे याणीं पाठविलीं. याजला रुकार सरकारांतूनही आहे अशी बाजार बातमी आहे. फौजेचा गवगवा. आबाच्यानें बंदोबस्त न होय, तरी मग शिंदे अथवा कंपू खडकीचे मुक्कामावर येणार अशी ही बोलवा आहे. सरकार वाड्याचे पश्चिम आंगें लक्कडखाना आहे तो मोडून चौफेर पागा बांधणार. दगड पायाचे येऊन पडले. राजश्री मोरोबादादाचे पुत्र ( आपल्या ) वडिलांचे भेटीस जुन्नरास गेले. आठ रोज जाले. श्रीमंत राजश्री नानांची प्रकृत निखालस अशी बरी जाहली असें नाहीं. कधीं कांहीं कधीं होत आहे. हल्लीं आज चार रोज कान दुखत आहे अशी आवाई आहे. कळावें बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७७६　　　श्री.　　　( १३ मार्च )

पै॥ छ१० सवाल. सन तिस्सा तिसैन.

---

१ नारायणराव बक्षी यांजकरितां. २ पत्र बाळासाहेबांस मिरजेस. तसेंच पुढच्या नंबरचें.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत फाल्गुन शु॥ ७ वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. राजश्री आबा चिटणीस यांजला लोकांनीं बसविलें होतें. गवगवा भारी केला. तेव्हां आबा पळूं लागले. ते समयीं पठाणानीं गलबल केली. तेव्हां राजश्री कृष्णराव याणीं पठाणांस धरिलें. तेव्हां कृष्णाराव यांजला पुतळी हाताचे बोटास लरगली व आबांस कुशीस लागलें. थोडेंच आहे. नंतर शिंदे याणीं आबांस आपल्या डेऱ्यास नेलें, व गोपाळराव व कृष्णराव यांजला शिंद्यानीं आणिलें. पठाण पळोन गेले. येविशयींचा मजकूर मागें पत्रीं लिहिलाच आहे त्याजवरून कळों येईल. राजश्री कृष्णराव चिटणीस नानांकडे काल आले होते. राजश्री बाळोबा तात्यांस नगरास शिंद्यांकडून पत्रें गेलीं आहेत. आबाचेच विद्यमानें गेलीं आहेत अशी बाजार बातमी आहे. सर्जेराव सुटले, दोन रोज जाले, अशी बातमी बोलतात. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७७७ श्री. ( फाल्गुन शु० ७–१४ मार्च )

पै॥ छ० ६ सवाल. तिस्सा तिसैन. फाल्गुन.

विज्ञापना. श्री॥ राजश्री अमृतरावसाहेब माघ शु॥ १३ बाहेर ( आपल्या ) लष्करास निघणार होते. डेरेही जाले होते. सौभाग्यावती बाईसाहेब बाहेर दशमीस गेल्या होतीं. स्वारी त्रयोदशीस तेरा घटका दिवसास जाणार होती. घटकापूजन केलें. आठ घटका जाल्या होत्या तेव्हां शिंदे यांजकडील सांडणस्वार आला कीं, सध्यां लष्करास जावयाचें प्रयोजन नाहीं. बाया वगैरे सर्वांचा आमचा मिलाफ करून द्यावा. मग कोठें जाणार तें जावें. त्याजवरून राहिले अशी बातमी आहे. सखाराम घाटगे यांस सोडावें ऐसें आहे. शिंदे फिरोन ( पुण्यास ) येणार ही बातमी खचित आहे. हे विज्ञापना.

नं. ४७७८ श्री. ( फाल्गुन शु० ७–१४ मार्च )

पै॥ छ० ७ सवाल सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

विज्ञापना. तागायत छ० ६ सवाल गुरुवासरपावेतों यथास्थित असे विशेष. सौम्यवारीं तिसरे प्रहरीं महाराज मातुश्री बायांचे डेऱ्यास आले होते. दोन बैठका केल्या होत्या. महाराजांस वस्त्रें व शिरपेंच व घोडा व हत्ती येणेंप्रमाणें दिलें. मंडळीस वस्त्रें दिलीं नाहींत. एक बैठक बाडाचे बाहेर केली होती.

---

१ धोंडो बापूजी जोशी याचे पत्र मिरजेस बाळासाहेबांस. २ चाफेकर कारकून याचें बायांच्या लष्करांतून पत्र मिरजेस.

एक वाडाचे आंत बायांजवळ बसले तेथें केली होती. राजश्री नारोपंत करंदीकर आले होते. भेट झाली. आज कूच करावें म्हणोन महाराजांचा आग्रह होता, परतु कूच झालें नाहीं. मिरज प्रांतांत रोखे करणेंविशीचा आग्रह राजश्री रत्नाकरपंत यांचा आहे. महाराज माघारे गेलियावर सायंकाळीं भोइटे यांजकडे गेलों होतों. त्यांचें म्हणणें महाराज आपण होऊन भेटीविशी गळीं पडले म्हणोन आम्हीं भेटी घेतल्या. आम्हांस गरज करवीरकरांचे भेटीची नाहीं. आम्हीं इतके लांब श्रीमंत राजश्री भाऊंचे भेटीस्तव आलों. मीं उत्तर केलें जे, तुमच्या भेटी झाल्या म्हणोन करवीरकरानीं मिरज तालुकेंत रोखे केले याचा बंदोबस्त करून द्यावा लागेल. लाख रुपये करवीरकरानीं देणेंचा करार केला आहे. बायांस ऐवज देतात. रास्ते यांजपासून कांहीं ऐवज घेतात. रास्त्यांचे कारकून येथें आले आहेत. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७७९   श्री.   ( फाल्गुन शु० ८—१५ मार्च )

पै ॥ छ० ७ सवाल. सन तिस्सा तिसेन. फाल्गुन.

विज्ञापना. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडून कांहींच पत्रें येत नाहींत यास्तव मातुश्री बायांचे कारभारी यांचें बोलणें पहिलें तें नाही. त्याहीमध्यें ( महाराजांच्या ) भेटी झाल्या याजमुळें ही तिकडून प्रेष होतो. याजमुळें बोलणेंत बहुत अंतर दिसतें. मिरज प्रांतांत कूच करावें येविशीं बहुतच आग्रह दिसतो. भोईटे यांचें बोलणेंत मिरज प्रांतांत आह्मी कूच करणार नाही असें बोलतात. खरेपणा दिसत नाहीं. कूचमुक्कामाचा निश्चय ठरेल तो लिहून पाठवितों. जलद् वर्तमान कळावें लागतें म्हणोन सांडणीस्वार ठेऊन घेतला आहे. मिरज प्रांतांतील खेडीं बहुतच गडबडलीं आहेत. मुधोळचे सुमारें अगर मुचंडीचे सुमारें दरीदेवाजवळ वोढा आहे तेथें मुक्कामास जाणार असें ही बोलतात. दोहीं लष्करांत मनसबा चांगलाच आहे ! बोलणेंची प्रामाणिकता बहुतच आहे ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७८०   श्री.   ( फाल्गुन शु० ९–१६ मार्च. )

सेवेशीं विज्ञापना. उदईक रविवारीं कूच करून कृष्णातीरास जाऊन-तेथून राजश्री आपा राजाज्ञा यांसमागमें हुजूरची फौज व बाया शिंदे यांजकडील सरंजाम ऐसे दहा हजार फौज देऊन श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडे पाठवून द्यावे. हुजूरची स्वारी कृष्णेवर राहून लग्न करावें. नदीतटाकीं आठ

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र चाफेकराचें मिरजेस. २ चांफेकर कारकून याचें पत्र बायांच्या लष्करांतून.

दहा मुक्काम करावे. मिरज वगैरे तालुकेचा घासदाणा द्यावा. पुढें मसलतीसारखें हुजूरची स्वारी जाईल. याप्रमाणें आजचे बोलणेंत ठरवून उदईक कूच नेमलें आहे. परंतु आणखी काय मसलत करतात पाहों. होईल तो मजकूर सेवेशीं विनंती लेहून पाठवितों. बारा भाईची फौज काल ऐनापुरावर येऊन उतरली आहे. लष्कर अनिवार. कैद नाहीं. एकाच्या गोष्टींत एक नाहींत. बायांच्या गोष्टी कोणी ऐकत नाहींत. प्रांताची बुडवण परिछिन्न झाली. बाकीस कांहीं रहात नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७८१ श्री. ( फाल्गुन शु० ९–१६ मार्च )

सेवेशीं विनंती × × × मातुश्री यमुनाबाई शिंदे फौजसुद्धां खटाव लिंगनुराकडे गेली होती ते शनवारीं संध्याकाळीं फौजसुद्धां मातुश्री लक्ष्मीबाई शिंदे यांच्या फौजेंत येऊन केकतीचे मुक्कामीं मिळाली. बारा भाई मात्र त्यांतून फुटून ऐनापुरावर गेले श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७८२ ( फाल्गु० शु० ११–१७ मार्च )

बाबाजी विश्वनाथ चांफेकर याचें बायांच्या लष्करांतून पत्र मिरजेस. पै॥ छ० ११ सवाल.—

“भाऊसाहेबांचा फौजसुद्धां मुक्काम गोकाकेवर होईल तर कांहीं बचाव होईल. नाहीं तर निरुपाय गोष्ट दिसत्ये. कहीचे रोखे जाले व मिरज प्रांतांत मुक्काम नेमिला. येथें राजश्री बाळाभाऊ हा बायांच्या लष्करांत मुख्य. त्यास महाराजांकडील बोलणार जसें सांगतील त्याप्रमाणें भाऊ करितो. मग इलाज काय ? माझे हातून होईल तो प्रेत्न करीत आहें. मिरज प्रांत रहात नाहीं. कहीचा बंदोबस्त होत नाहीं.”

नं. ४७८३ श्रीगणपति. ( फाल्गुन शु० १२–१८ मार्च )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. आपण छ० ४ सवालचीं पत्रें पाठविलीं तीं छ० ८ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशील.—

“चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत काळे पुण्यास जावयाकरितां गेले. बायांकडील कारकुनाची भेट जालीच असेल. त्यास तुटक सांगों नये” म्हणोन व गोगटे यांच्या पत्रांतील भाव चिरंजीव राजश्री केसोपंत काळे याणीं सांगितल्यावरून लिहिला तो कळला. बायांकडील कारकुनास आपण लिहिल्याअन्वयेंच समर्पक सांगितलें आहे. गोगटे यांचीं पत्रेंच येथें आलीं होतीं त्याजवरून तिकडील वर्तमान सविस्तर समजण्यांत आलें. श्रीनें परिणाम लावावा ! कांहीं सुचत नाहीं. कलम१.

करकंब व मंगळवेढें येथील वगैरे जाग्याहून पत्रें वगैरे आलेलीं पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. करकंबेकडे म्हैसकराचा उपद्रव फार दिसतो. राजश्री नाना यांस वरचेवर लिहीत असावें. मंगळवेढ्याचा बंदोबस्त चांगला करवावा. ते आपल्या मुलांमाणसांविशीं फंद करावयास चुकणार नाहींत. हुशारी असावी. आणखी पाषाणनामकाप्रकरणीं वगैरे उपांस जें आढळलें तें त्याणीं लिहिलें आहे. बरें ! गजाननाचे कृपेंकरून घडेल तें खरें. कलम१.

सावनुरकर नबाबाच्या पुत्राच्या सुटकेचा मजकूर लिहिला तो कळला. गोखले यांस रुबरू सांगितलें आहे. हल्लीं ते नरगुंदास आहेत. सबब त्यांजकडे या कामाबद्दल मुजरद पत्र पाठविलें आहे. कलम १

आमचा मुक्काम गुर्लहोसुराजवळ होता तेथून कूच जहालें. मुरगुडास बावांच्या दर्शनास जावयाकारितां येकुडीजवळ आलों. हळूहळू जाऊं. प्रकृत नीट नाहीं याजमुळें कोसाची मजल करावी लागते. कलम १

रास्ते यांजकडील मंडळीस छ ० ९ सवालीं निरोप दिला. छ ० १० रोजीं मेजवानी जाहली. येथून निघोन गेले. कलम१

"पत्रांच्या रवानग्या वरचेवर होतात. एकाचाही जाब येत नाहीं. माणसांची गत काय जाली तें कळत नाहीं. जागां जागां फौजा जमत चालल्या. मिरज प्रांतीं रोखे होण्याची सीमा जाहली. चर्या एक प्रकारची दिसते. स्वारी या रोखावर आली असतां बचाव आहे. दिवसगत जालिया परम कठिण आहे. उपेक्षा करूं नये. अनूवर येऊन बनलें आहे. कोणताही महाल उपद्रवावांचून राहिला अशी गोष्ट नाहीं. बेजार आहों. कित्येक गोष्टी पेशजी दोन महिन्यांखालीं लिहिल्या होत्या त्यांचें स्मरण राहिलें नसेल असें वाटतें. त्रासून लिहितों. चितांत आणून बचावाची गोष्ट करावी;" म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐशीयास आपल्याकडून पत्रें येऊन पोंचतात. त्यांचे जाब द्यावयाचे राहिले नाहींत. रवानग्यांचा छडा काढावा. माणसें मार्गीं थकलीं असतीं तर बोभाट होता. फौजा जमत चाललियाचा तर्क चालत नाहीं. कोणी कांहीं म्हणतात. ईश्वर जाणे! तूर्त तालुक्यास मात्र अरिष्ट आलें

---

१ पाषाण नामक कोण ? धोंडोपंत गोखले ! २ सावनूरच्या नबाबाचा मुलगा धोंडोपंत गोखले याणी कैदेंत ठेविला होता त्यास सोडून देण्याविषयीं. ३ चिदंबर दीक्षित.

आहे. उपद्रवाची जात ऐकण्यांत येते त्याजवरून असें वाटतें कीं आपल्या सोसण्याची शर्थ आहे. बरें ! सर्व भार श्रीवर आहे. आपली उपेक्षा करितों असें आपणास वाटलें यास उपाय नाहीं. आपल्या घरची उपेक्षा कोणी करील कीं काय ? कंटाळ्यानें लिहिलें, चिंता नाहीं. सावनूर तालुक्यांतील बंदोबस्ताकरितां गुंतल्यामुळें तिकडे शत्रूस फावलें. नाइलाज आहे. आपण घाबरें होऊं नये. इकडील काम आटोपल्यावर नंतर दुसरा ध्यास नाहीं. पेशजी कित्येक अर्थ लिहिले ते स्मरणांत आहेत. विसर कसा होईल ? काळजी करूं नये. कागदोपत्रीं चहूंकडे शिलशिला राखोन बातम्या ठेऊन जरबेची गोष्ट राखावी. जें येईल त्याचें निवारण केलेंच पाहिजे. कलम १

येणेंप्रमाणें सहा कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ ० १० सवाल बहुत काय लिहिणें लोभ असावा हे आशीर्वाद.

पै ॥ छ ० १३ सवाल. सन तिस्सा. फाल्गुन मास. आवशीची तास रात्र.

नं. ४७८४ श्रीगणराज. ( फाल्गुन शु० १३–१९ मार्च)

चिरंजीव राजश्री रघुनाथराव दादा यांसीं आशीर्वाद उपरी. मौजे देवर-अष्ट्यांहून पत्र आलें त्याची नक्कल पहावयास पाठविली आहे. माणसांचे सांगण्यांत रास्त्यांकडील चाळीस पन्नास घोडें चतुरसिंगाकडे पाडाव आलें. पंचवीस असामी ठार झाले. बहुत खराबी जाली. एक पाग्या सरदार व दोन कार-कून पाडाव सांपडले आहेत असें जबानी सांगतो. शिंदे बायांच्या लष्करांतून पत्रें काल आलीं व आजही आलीं. रा॥ नारायणराव बक्षी व यशवंतराव शिवाजी व देवजी गौळी असे वडिलांकडे गेले. कारण करवीरकरांच्या भेटी जाल्या येविशीं संशय आला, त्याविशीं खातरजमा करावयास गेले म्हणोन लिहिलें आहे. रा॥ छ० ११ सवाल लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ४७८५ [1] श्रीगणपति. ( फाल्गुन शु० १३–१९ मार्च )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. वस्त्रें व बहुमान आल्यावर दोन लाख रुपये देऊं असें वेदमूर्ति राजश्री बापू दिक्षीत जोग यांसीं बोलिलों होतों. व हल्लीं रास्ते यांचीं पत्रें कंपूची वरात जाहली, निकड बसली, अशीं वरचेवर येत आहेत. हें जाणून दोन लाख रुपये पोतेंचाल व वीस हजार रुपये मालगांवीं फौजेचे खर्चास घेतले होते ते, ऐसे द्यावे म्हणून चिरंजीव राजश्री हरिपंत बाबाचें नांवें चिठ्या देऊन दीक्षित

---

१ पत्र बाळासाहेबांचें मिरजेहून.

व ढेंकणे वैगेरे मंडळीस निरोप देऊन पाठविलें. बाकीचे ऐवजाची हप्तेबंदी करून देऊन समजूत करून तूर्त लावून दिलें आहे. तूर्त ऐवजाच्या चिठ्या केल्या, त्याची तरतूद जाहली पाहिजे. इकडील अडचणी तरी या प्रकारच्या. त्यास वचन गुंतलें तें तर पार केलें पाहिजे. वस्त्रें येऊन आज महिना जाला, त्यांची निकड, फौजेचा गवगवा, याजपुढें कोणतेंही सुचेना असें जालें. सदरहू तूर्त द्यावयास केलें त्याचा निर्वाह तुम्ही व चिरंजीव बाबा याणीं हरतऱ्हा करुन तरतूद करुन द्यावी. पहिली साताऱ्याचे मुक्कामीं तरतूद केली होती ती आहे. बाकीची भरती सव्वा दोहोंची जाली पाहिजे त्याची करावी. रवाना छ० ११ सवाल. भौमवार. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० १६ सवाल. फाल्गुन. सन तिस्सा तिसैन.

नं. ४७८६ श्री. ( फाल्गुन व० १—२२ मार्च )

सेवेशीं जनार्दन शिवाजी. कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १४ सवालपावेतों मुक्काम क्षेत्र पंढरपुर भीमा उत्तरतीर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. करवीरवासी व बाया[1] मिरज प्रांतीं गेल्या. स्वामींशीं कांहीं खटला करावा अशी दुर्बुद्धि करून यशवंतराव शिवाजी व बाळाजी कृष्ण यांसीं जलद बोलावणें बायानीं पाठविलें अशी वार्ता बाजारी ऐकिली. त्यास येविशींचा पर्याय श्रीमंत नानांस लिहिला आहे. त्यांचींही उत्तरें येतील. सविस्तर राजश्री मोरो शंकर याणीं लिहिलें आहे. चित्तांत संशय कोणता न आणितां प्रसंग तसाच दिसोन आल्यास लिहून पाठवावें. समय वारंवार येत नाहीं. मर्जीस आल्यास उत्तर पाठवावयाची आज्ञा व्हावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७८७ श्री. नक्कल. ( २२ मार्च )

पै॥ छ० १६ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशी विनंती. सेवक मोरोशंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत फाल्गुन वद्य प्रतिपदा मुक्काम श्रीपंढरपुर स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री महाराज व बाया शिंदे असे एकत्र होऊन मिरजेवर दंगा करणार हें वर्तमान ऐकिलेवरून राजश्री जनार्दनपंत भाऊ बहुत श्रमी जाहले. त्यास येथें नबाव बंदेगान अल्ली यांची फौज व शिंदे यांजकडील पलटणें तोफखाना फौज सरंजाम

---

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

दोन्हीकडील मिळोन पंधरा सोळा हजारपावेतों जमाव आहे. आणखी जमाव बंदेगान अल्ली यांजकडील वरचेवर येत आहे. स्वामींवर संकट आलें त्या पक्षीं उभयतांनीं कुमक करावी म्हणोन राजश्री जनार्दनपंत भाऊनीं येथील आधिकारी यांस विनंती केली. त्यांचें बोलणें पडलें कीं, कुमक करण्याविषयीं श्री॥ राजश्री नाना यांचें पत्र नाहीं. आपलें ही पत्र नाहीं. आम्ही कोणाच्या पत्रावर कुमकेस जावें? याप्रमाणें बोलले. त्यावरून सेवेशीं राजश्रीनीं विनंती लिहिली आहे. तर स्वामीनीं कृपा करून येथील फौजेंतील अधिकारी यांस पत्र व जनार्दनपंत यांस पत्र कुमकेविशीं पाठवावें. म्हणजे सरंजामसुद्धां दरकूच येऊन पोहोंचतात. स्वामीनीं श्रीमंत राजश्री नानांस पत्रें पाठवून या फौजेस पत्रें आणवावीं. येथून पत्रें मुकीरास राजश्री जनार्दनपंत भाऊनीं लिहिलीं आहेत. स्वामीचें पत्र गेल्यानें लौकर उत्तरें येऊन कुमक होईल. स्वामीनीं इकडे पत्रें रवाना करून त्यांस ही पत्रें रवाना करावीं. ( मिरजेचा ) किल्ला मजबूत. सरंजाम पोक्त. चिंता नाहीं. परंतु पाणी कमी म्हणोन भय वाटतें. ( तुमचें ) इकडील पत्र पोहचतांच जलद येऊन पोंचतील. सुचला प्रकार सेवेशीं विनंती लिहिली आहे. स्वामीच्या प्रतापें अरिष्ट निवारण होत असल्यास फार चांगलें. सेवेशीं श्रुत होय. कृपा करणार स्वामी असत. हे विज्ञापना.

नं. ४७८८ श्री. ( फाल्गुन व० १–२२ मार्च )

पै॥ छ १४ सवाल. सन तिस्सा तिसैन.

विज्ञापना. मुजफरखानाकडील पठाणांचा कांहीं फितूर समजला. इंग्रजांसँ पत्रें जात होतीं तीं सांपडलीं. याजमुळें घालमेल आज गुरुवारीं दिसते. राजश्री दौलतराव शिंदे यांचीं पलटणें जवळ आलीं आहेत असें ही बोलतात. आज रात्रौ कूच करावें असें ही आहे. कोणतें ही प्रमाण नाहीं. पठाण यांचा मुक्काम आगळगांवावर आहे. यशवंतराव शिवाजी आज प्रहर रात्रौ कूच करून आले. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ म्हैसकर जनार्दनपंत याणी. २ चिठी बाबाजी विश्वनाथ चांफेकर याची शिंदे बायांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस. ३ शिंद्याच्या पलटणांवरील इंग्रज अंमलदार कर्नल ब्राऊनरिग याजकडे बायांच्या पक्षांतल्या पठाणांचीं पत्रें जात होतीं.

नं. ४७८९   श्री.   ( फाल्गु० व०१–२२ मार्च. )

पै॥ छ० १४ सवाल. सन तिस्सा तिसैन.

विज्ञापना. राजश्री बाळाभाऊ यांच्या बोलण्यांतील भाव "श्रीमंत राजश्री भाऊसाहेबानीं करवीरकरांसीं सलोखा केलियासीं उत्तम. नाहीं तरी आम्ही व राजे पहातच आहों. जोर बेजोर सल्ला करवावा. नच जाहलियासीं प्रांताची बाकी ठेवीत नाहीं." असे आवाज निघतात. राजश्री बाळा भाऊ व मातुश्री बाई यांचें चित्त एक व बक्षी व मराठे मंडळी एक. मराठे म्हणतात, "तुम्ही राजासीं मिळोन सरकारचा प्रांत मारितां, व मिरजकरांचा तालुका मारितां; तेव्हां आमचीं रांडा पोरें मारिलीं जातील ! ( ते ) बक्षींस म्हणतात जे, समय पडेल तेव्हां तुम्ही धोतर खांद्यावर घालून घांटाखालीं जाल[2]. मातुश्री बाई करवीरास जाऊन बसतील. आमची गत काय ? राजाबरोबर फिरोन परिणाम नाहीं" असें बोलतात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७९०   श्री.   ( फाल्गुन व ० १–२२ मार्च. )

पै ॥ छ ० १४ सवाल. सन तिस्सा तिसैन.

विज्ञापना. काल सौम्यवारीं करवीरकरांकडील चव्हाण व घाटगे मातुश्री बाईचे डेऱ्यास आले होते ते समयीं होनवाडकरांकडील राजश्री लखबा म्हणोन कारकून गांव खेड्याचे रदबदलीस्तव चव्हाण व घाटगे यांजवळ बोलत होता. तेव्हां उभयतांनीं सांगितलें जे, रास्ते व मिरजकर व भाऊसाहेब व कुरुंदवाडकर यांचे गांव आह्मांस राखावयाचे नाहींत. असें साफ उत्तरें जालें. (येथें) कोणे गोष्टीचा भरंवसा नाहीं. काल कूच ठरलियावर महाराजांकडून दोनप्रहर रात्रीचे सुमारें बाजीपंत आले. त्यांच्या बोलण्यांत क॥ मनेराजोरी येथें कूच करून जावें. एक दोन मुक्काम करून दोन हजार स्वांर मिरजेस पाठवून दहा लक्ष रुपये मागावे. न दिलियासी शहरास उपद्रव करावा. अशीं बोलणीं बोलतात. कोणे गोष्टीचा भरंवसा नाहीं. असा प्रकार आहे. रास्ते यांजकडील कारकून येथें आहेत त्यांस पन्नास हजारांची निकड लाविली आहे. कसें होतें पहावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७९१   श्री   ( फाल्गुन व० ३–२४ मार्च. )

सेवेशीं विज्ञापना. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांची स्वारी मुरगोडास आली,

---

१ कारकून शिलेदार बाबाजी विश्वनाथ चाफेकर यांचें पत्र शिंदे बायांच्या लष्करातून. तसेंच पुढच्या नंबरचें. २ कारण तुम्ही कोंकणचे राहणार ।

तोरगल तालुक्यांत रोखे केले आहेत; म्हणोन आजी रविवारीं पत्रें आलीं. त्यावरून राजश्री सेनाखासकील हुजूरची आज्ञा घेऊन तोरगलास गेले. राजश्री आपा राजाज्ञा तूर्त यादवाड तालुक्यांत जाऊन राहणार. बाया शिंदे व महाराज हे कृष्णातीरीं रहावें असा निश्चय जाला आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७९२ श्री. ( फाल्गुन व० ४– २५ मार्च. )

पै॥ छ० १७ सवाल. सन तिस्सा तिसैन फाल्गुन.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब साहेबांचे सेवेशीं.

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित मुर्तजखान पठाण व लाला दयाराम कसमिरे मुक्काम लष्कर. दंडवत विनंती विज्ञापना येथील कुशल जाणून स्वामींनीं लेखन करावयासीं आज्ञा केली पाहिजे. विशेष आम्हीं उमेद्वार आहों. साहेबांची नौकरी करावी असें मनांत आलें याजकरितां बडेखान बारगीर आपणांकडे विनंती करायासीं पाठविले आहेत. उत्तर आलेवर आज्ञेप्रमाणें बरकंदाज सरंजाम हजारपर्यंत घेऊन येतों. आपली नौकरी करावी ऐसें मनांत आणून पत्र लिहिलें आहे. इतके दिवस मुजफरखान पठाण यांचे रिसालेंत नौकरी केली. हल्लीं त्याचा काल झाला. श्रीमंत लक्ष्मीबाई शिंदे याणीं मुलुख मारावयासीं परवानगी दिली, परंतु याणें आमचा परिणाम लागत नाहीं; आणि हें कर्म आमच्यानें होत नाहीं. दखणेंत येऊन आपली नौकरी करावी ऐसे मनोदय, यास्तव खुलासा उत्तर यावें. म्हणजे आपणापाशीं येऊन पोचतों. आपले मनास शंभर लोकांपासून पांच हजारपर्यंत आहों, जितकेनिशीं येणेंची आज्ञा येईल त्याप्रमाणें येतों. आपण इकडील कोणताही अर्थ चित्तांत न आणावा. सर्व मजकूर बडेखान व दलेलखान विनंती करितील त्याजवरून कळेल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.+

नं. ४७९३ श्री. ( फाल्गुन व० ४–२५ मार्च. )

पै॥ छ० २२ सवाल. सन तिस्सा फाल्गुन मास.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक देवराव कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० १७ माहे सवालपर्यंत स्वामींचे कृपें यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान श्रीमंत राजश्री भाऊसाहेब फौज

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. + यापत्राखालीं तीन ओळी मजकूर याच अभिप्रायाचा पारशी भाषेंत आहे.

सुद्धां हसूर इचल येथें आहेत. उद्ईक मुरगोडास श्रीदीक्षित स्वामी यांचे दर्शनास येणार असें वर्तमान आहे. राजश्री हरबाआपा धायगुडे यांस कांहीं फौज व पेंढार देऊन हुकेरी तालुक्यांत रवाना केलें हें वर्तमान मिरजेहून जासूद लष्करास गेले होते ते येथें आले त्यांनीं हें वर्तमान सांगितलेवरून भिकन ढालाईत याजबरोबर मल्हारी पवार दोडवाडकर याजबाबत मोर्ती वगैरे जिन्नस देऊन रवाना केला होता तो स्वार पाठवून माघारा आणवून घेतला. मार्ग ठीक नाहीं. पातळें वगैरे रवाना करून दोन दिवस झाले. मार्गी सांपडतात किंवा सुखरूप जातात पहावें! हल्लीं भिकन ढालाईत यास पाठविलें आहे. गडबडीकरितां चार दिवस ठेऊन घेतला होता. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञप्ति.

नं. ४७९४    श्री.    (फाल्गुन व० ५—२६ मार्च.)

पै ॥ छ ० १९ सवाल. सन तिस्सा तिसैन. प्रातःकाळ.

सेवेसीं जिवाजी गोपाळ मुक्काम बोरगांव. कृतानेक सा॥ नमस्कार विनंती विशेष. ता ॥ छ. १८ सवाल रोज भौमवार रात्र एक प्रहर पर्यंत स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री चतुरसिंग भोसले यांच्या लष्कराचे मुक्काम बहेंबोरगांवावर होता तेथून कूच होऊन शिरगांव व रामापुर देवरअष्टेनजीक मुक्काम झाला आहे. तेथें आज प्रातःकाळीं सूर्योद्यास रास्तेकडील लोक ( आले होते ते ) निघोन कऱ्हाडास गेले याप्रों वर्तमान आहे. आणखी बातमीस पाठविलें आहे. काय वर्तमान येईल तें मागाहून लेहून पाठवितों. नजीक येऊन कोसीं दोन कोसीं उतरले आहेत. रोखापत्र होणार. त्यास स्वामींची आज्ञा येईल त्याप्रों वर्तणक करूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७९५    श्री.    ( फाल्गुन व० ५—२६ मार्च. )

सेवेशीं जिवाजी गोपाळ मु॥ बोरगाव कृतानेक सा॥ नमस्कार विनंती विशेष ता॥ छ० १८ सवाल रोज भौमवार. राजश्री चतुरसिंग भोसले यांच्या लष्करचा मुक्काम बहेंबोरगांवावर होता तेथून कूच होऊन शिरगांव व रामापुर देवरअष्टेनजीक मुक्काम जाला. तेथें प्रातःकाळीं सूर्योदयास रास्त्यांकडील छापा आला. त्यास उभयतांची गोळागोळी जाली. तेव्हां रास्त्यांकडील लोक निघून कऱ्हाडाकडे गेले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७९६ श्री. ( फाल्गुन–मार्च. )

यादी[1] हुजूरची स्वारी निघालेतागायत घासदाण्याचा ऐवज उत्पन्न झाला—

| | ऐन | दरबार खर्च |
|---|---|---|
| परगणे पाच्छापुरपैकीं | ३२००० | ५००० |
| चीजबस्त व मामलत ७००० | | |
| शेख मिरा देसाई याजकडे दिली त्या संबंधें. २५००० ५००० | | |
| परगणे शहापूर | २०००० | ५००० |
| मुद्दापूर तालुके मुधोळ गांव निसबतदेसाई | १०००० | २००० |
| मुधोळ व ढवळेश्वर व जमगी तिन्ही कर्याती मिळोन निसबत मालोजी घोरपडे. | १०००० | २००० |
| चिकलमुर्डी परगणे मुधोळ निसबत देसाई रास्ते यांचे रद्कजात | ४००० | १००० |
| गांव पो बागलकोट | ३७००० | ७००० |
| १२००० का कलादगी<br>१०००० २०००<br>२५००० पों एकंड (?)<br>२०००० ५०००<br>३७००० | | |
| रामदुर्ग तालुका | ४००० | १००० |
| को कोल्हार नि० फडके. | ७००० | १००० |
| चिमलगें नि० घोरपडे | ७००० | १००० |
| बाणी रहदारीचे यांचे | ३०००० | ० |

१ करवीरचे महाराज. त्यांच्या लष्करांतून नारो हरि कर्गदीकर याणें यादी तयार करून मिरजेस पाठविली.

| | | |
|---|---|---|
| बैल ४०० माल भरताड सुपारी व मिरीं लवंग जायफळ वेलदोडे व नक्त वगैरे मिळोन राजगुळी.......... | १२००० | १००० |
| | १५५००० | २६००० |
| | १८१००० | |
| पाो ममदापुर | ४००० | १००० |
| पाो विजापुर | १५००० | २००० |
| उकळी मनगोळी. | ३०००० | ३००० |
| मोलवाड. | ८००० | २००० |
| होनवाड नि० रास्ते. | २५००० | ५००० |
| अथणी. | ५०००० | १०००० |

नं. ४७९७　　श्री. ( फाल्गुन व ० ५—२६ मार्च. )

छ ० १९ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ. साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा छ ० १८ सवाल भौमवासरपावेतों मुा मौजे केकती यथास्थित असे. विशेष. आज लष्कराचा मुक्कामच आहे. मातुश्री बाईकडून व माधवराव लक्ष्मण यांजकडून लखोटे तीन आले ते हल्लीं पाा आहेत. राा बाळाजीपंत यांचें पत्र ऐनापुराहून आलें होतें त्याजवरून पंधरा स्वार रखवालीस दिले व बलमदार तीन येणेंप्रमाणें दिले. श्रीमंत राा दादासाहेबांकडील महाराजांचे लष्करांतून राा सखोपंत रखवालीचे बंदोबस्तास काल आले होते, त्यास स्वार पंचवीस व बलमदार सहा असामी येणेंप्रमाणें घेऊन गेले. महाराजांचे लष्करांत आज कुचाचा नगारा जाहला आहे. आज मातुश्रीबाईचा मुक्काम पंचमीचे रंगामुळें जाहला. राा साबाजी नारायण यास बोलीविशीं व कूच करून चिकोडी तालुक्यांत अथवा मुधोळ गोकाक इकडे जाणेंविशीं पत्र लिहावें. मातुश्रीबाईस वरियांचे तांदूळ पायलीभर पाहिजेत व हातपंखा वाळ्याचा एक येणेंप्रमाणें पाठवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४७९८　　श्री. ( फाल्गुन व ० ६—२७ मार्च. )

सेवेशीं रामाजी रंगनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० १९ सवालपावेतों स्वामींचे कृपेंकरून यथास्थित

---

१ बाबा शिंदे यांच्या लष्करांतून मिरजेस गंगाधरराव गोविंद यांस पत्र.
२ गणेशवाडीहून रघुनाथराव कुरुंदवाडकर यांस पत्र.

असे. विशेष. पठाणाकडील फौज तीनशें स्वार व हत्ती दोन येणेंप्रमाणे कनकेश्वरानजीक राहून गणेशपुराकडे पन्नास स्वार पुढें चालून आले. तेव्हा गणेशपुरांतील शिलेदार मंडळी गाढवेकडील स्वांर व जोतीबा बचे वगैरे वीस पंचवीस स्वांर व पायदळ शंभर पुढें चालून गेले. यांची त्यांची बोलाबोली झाली. इकडील जमियत पाहून आपले लोकांत जाऊन मिळाले आणि बोलले जे, आम्हीं तुमचे वाटेस जात नाहीं. तुम्हीं आम्हांवर येऊं नये. असे बोलून जमियतसुद्धां निघून नरवाडचे मार्गें माघारे गेले. गणेशपुरीं गाढवे मंडळी व बचे व खरात उमरखान येथें आहेत. बारगीरमंडळीसुद्धां गोविंदराव घोरपडे कागवाडीं आहेत. त्यास पठाणांचा तलावा याच रोखें येतो. म्हैसाळचे पलीकडे रानांत नागावा घेऊन जातात. त्यास दाईगडे मंडळी शिलेदार कुरुंदवाडीं आहेत ते सडेनिशीं गणेशपुरास यावयाविशीं आज्ञा व्हावी. समयविशेषीं लोकांची जमियत येथें असावी. रातबिरात चौकी पहारो गस्त हुशार आहों. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना. भालेकाठ्या सुमार पंचवीस तयार झालेल्या असल्यास काठ्या पंचवीस पाठविण्यास आज्ञा व्हावी. हे विज्ञापना.

नं. ४७९९ श्री. ( फाल्गुन व० ६–२७ मार्च. )

सेवेसीं विनंती सेवक श्रीधर गोविंद. कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना तागायत छ० १९ सवालपर्यंत यथास्थित असे. विशेष. ... रास्ते यांजकडून तीन साडेतीनशें स्वांर दोन तास दिवसास सोनसलच्या खिंडीनें पुढें देवरअष्टेसमीप आले. उभे राहून योजना होत होती. पावकोसाचे तफावतीने उभे होते. तों चतुरसिंगाची स्वारी तयार होऊन यांवर चालोन आले. दोन बाण टाकतांच—बाणाच्या अंतऱ्यानें उभे होते—सिंगावर चालोन जावें ते माघारे पळों लागले. तेव्हां सिंगानें पाठीस लागून घोडीं पाडाव केलीं. लोक ठार जाले. पुढें डोंगर लागला, पळावयास जागा नाहीं, अशा अडचणींत दगा झाला. रास्ते यांचे लोकांनीं उभे राहून किमपि धीर धरला नाहीं. त्यास पहातांच पळूं लागले. रास्ते यांचे स्वारांचा फडशा जालेनंतर चतुरसिंग माघारा फिरतांना ' देवरअष्टेकरानीं स्वांरी आणिली, गांव लुटावा, असा बेत करून चालून येऊं लागले. तेव्हां वे।। रा।। सदाशिव दीक्षित चिपळोणकर माहुलीकर वगैरे चार गांवकरी बोलावयास गेले. त्यांचीं चिरगुटें पांघरुणें घेतलीं आणि देवडच्यापुढें ( ? ) घालून मुक्कामापावेतों नेले. रास्त्यांकडील दोघे गृहस्थ पाडाव आले त्यानीं सांगितलें कीं अष्टेकरानीं

आमची फौज आणविली ! त्यावरून माहुलीकर वगैरेस बहुत तसदी केली ते पत्रीं लिहितां नये ........ तूर्त दहा हजार रूपये कबूल करविले. अद्यापि फडशा जाला नाहीं. ही मोठी वाईट गोष्ट झाली आहे. गांवकऱ्यांचे सुटकेचा प्रकार हरतऱ्हेनें होय तो अर्थ त्वरित झाला पाहिजे. गृहस्थ बसवून पैका मागतात, आणि गांवही लुटणार ! गांवांत कोणास धीर निघेना. अवसान धरून कोणी उभा राहत नाहीं. कालची लढाई गांवकुसाजवळच झाली. ती पाहून गांवचे कांहीं लोक गेले. हा मजकूर कालच लिहावा, परंतु येथें आठ प्रहर उभे होते. बाहेर माणूस ही कोणी जाईना. कालच्या मंगळवारचा प्रसंग लिहिनां नये. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८००  श्री.  ( फाल्गुन व० ६–२७ मार्च. )

चिं॥ राजश्री दादा यांसीं आशीर्वाद उपरी. संगमेश्वराकडे पलटणें आलीं आहेत त्यांचे बातमीस माणसें पाठविलीं होतीं तीं कालच आलीं. संगमेश्वराजवळच मुक्काम आहे. धारवाडचे स्वारीस वडिलांबरोबर लिटली आला होता तोच आहे. दोनशें गोरे, तेवीसशें माणूस दुसरें कवाइती, सात तोफा, ( याप्रमाणें फौज आहे. ) चार उंटें, २५ घोडीं, ५० बैल येणेंप्रमाणें सरंजाम मिळवीत आहेत. दरमहा दहा रुपये देऊन बैल मिळवितात. काल वडिलांकडून धायगुड्यांचें पथक चि॥ बाबांकडे आलें. राजश्री बाबाजी विश्वनाथ याचीं पत्रें इंदुवार सायंकाळ चार घटका दिवसाचीं किल्ल्यांत कालचे प्रहर दिवसास आलीं.[१] पूर्वी केला विचारच प्रमाण आहे. राजश्री रत्नाकरपंत कृष्णातीरास गेले. मग अर्थ काय असेल श्री जाणे ! सर्व पत्रें आलेलीं काल रवाना चांफेकराकडे[२] केलीं. ऐनापुरास पठाणाकडील लोक गेले, व महाराजांचा वीस हजार रुपयांचा रोखा जाहला आहे. श्रीसत्तेकरून घडेल तें खरें. राजश्री आनंदरावभाऊ यांचे पुत्राचें लग्न काल अकरा घटका दिवसास जालें. कळावें र० छ० १९ सवाल. बुधवार. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० १९ सवाल सन तिस्सा तिसैन.

नं. ४८०१  श्री.  ( फाल्गुन व. ६–२७ मार्च. )

पै ॥ छ० २२ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

ती ॥ राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेसीं.

---

१ पत्र बाळासाहेबांचें मिरजेहून कुरुंदवाडास. २ हुपरीकर जोशी.

## श. १७२० परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

अपत्यें कृतानेक चरणावर मस्तक ठेऊन सा ॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० १९ सवाल वडिलांचे आशीर्वादें करून क्षेम असे. विशेष. राजश्री चिंतो आत्माराम पागनीस निा शिंदे यांचा फौजेसह मुक्काम पळसी सुंदली येथें आहे. तेथून आज स्वार शंभर देशमुख देशपांडे यांचे नांवें रोखे घेऊन आले आहेत. "घासदाण्याच्या चुकोतीस लष्करास येणें. स्वारास रोज दोन रुपये प्रमाणें दर असामीस व खुराक व चंदी वगैरे देत जाणें." याप्रमाणें लिहिलें आहे त्याची बजिन्नस नक्कल करून पाठविली आहे. गांवानजीक येऊन उतरले. रोखा ठेवून घेऊन स्वारास पोटगी व चंदी चार रोज दिलें. याउपर कसबेकर जमीदार बोलण्यास पाठवितों. काय ठरतें पहावें. अशा वरचेवर फौजा येतात. त्यास खंडणी देऊन परिणाम नाहीं, न दिलेस फौजेची बळजोरी ! असें उभयपक्षीं संकट आलें आहे. पार पाडणार वडिलांचे पाय समर्थ आहेत. गवळी यांचें कूच होऊन माणेवर येणार. एक दो दिवशीं येतील असें आहे. होईल तें मागाहून सेवेशीं लिहितों. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४८०२ श्री. ( फाल्गुन व ०६—२७ मार्च. )

चि॥ राजश्री दादा यांसीं आशीर्वाद उपरी. जिवाजी गोपाळ याचें पत्र आलें. चतुरसिंग याची व रास्ते याचे लोकांची गोळगोळी जाली हें लिहिलें आलें त्याची नक्कल तुम्हांस पहाण्यास पाठविली आहे त्यावरून कळेल. आणखी बातमी येईल ती मागाहून लिहून पाठवूं. रवाना छ० १९ सवाल. लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ १९ सवाल. सन तिस्सा तिसैन. मय्या व अल्लफ.

नं. ४८०३ श्री. ( फाल्गुन व ६—२७ मार्च. )

पै॥ छ० २२ सवाल. तिस्सा तिसैन. फाल्गुन.

ती॥ राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेसीं.

अपत्यें कृष्णानें दोनी कर जोडून चरणावर मस्तक ठेऊन शिरसा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० १९ सवाल पावेतों वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री श्रीनिवासराम पठाणाकडे गुंतले आहेत, त्यास त्याचे करारप्रमाणें ऐवज त्याजकडे पाठविला आहे. परंतु त्याचा भरंवसा येत नाहीं. येविशीं राजश्री बाबाजीपंत चांफेकर यांस लिहून ब्राह्मणाची सुटका होय तो अर्थ केला पाहिजे. नबाब निजामजंग

१ कृष्णराव मेघश्याम याचें पत्र मंगळवेढ्याहून मिरजेस.

फौजेसुद्धां पंढरीवर आहेत. त्यांजकडून आरब पन्नास असामी रवाना जाहल्या यापैकीं.

नं. ४८०४　　श्री.　　( फाल्गुन. व० ६–२७ मार्च. )

पै॥ छ १९ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

विज्ञापना. चतुरसिंग याणें सतारखान पठाण याजकडे बोलणें लाविलें आहे जे, तुम्ही आम्हाकडे यावें. तुमचा बंदोबस्त करून देतों. त्यावरून पठाण यानें सांगोन पाठविलें जे, चार लक्ष रुपये तूर्त खर्चास पाठवून यावे आणि बोलीचालीचा ठराव करावा म्हणजे आम्ही येतों. असें बोलणें लाविलें आहे. राजश्री नारोपंत चक्रदेव यांसीं कैद केलें असें महाराजांच्या लष्करांत बोलतात. श्रीमंत रा ॥ भाऊसाहेबांचा रोख कडकोळ येथें आला. हें वर्तमान महाराजांस कळलेवर येथून तोरगलकरांस रवाना करणार. रामतीर्थाहून ब्राह्मण पंचवीस असामी येत होते त्यांची मार्गीं वस्त्रें हरण जाहलीं. बक्षीचे डेऱ्याजवळ ( त्या ब्राह्मणांचें) एक उपोषण जाहलें. काल समजूत जाहली. पंचवीस रुपये दिले. काल राजश्री रत्नाकरपंत याणीं हुलकबाळी जाळून टाकिली. अथणी तालुकेंतील गांव दोन चार जाळून नाश केला. स्वामींची सेवा करूं लागालियावर शिंदे, होळकर, सरकार फौजा, व इंग्रज इतके पाहिले. परंतु ही रीत कोठें पाहिली नाहीं! कैदेची जात ठाऊकच नाहीं! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८०५　　श्री　　( फाल्गुन व०६–२७ मार्च. )

छ० २१ सवाल[३]. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशीं गणेश गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १९ माहे सवाल मुक्काम इंगळगी परगणे मुरगोड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. बाळू व येसू खिजमतगार यांजबरोबर पत्रें पाठविलीं आहेत. पावलीं असतील. राणेबिन्नूरचें ठाणें बसलें. ऐरणीस फौज गेली आहे. हावनूर व ऐरणी ठाणीं बसलीं म्हणजे फौज येणार. तोंपर्यंत येथेंच मुक्काम होतील असें दिसत आहे. वरकड सविस्तर श्रीमंतानीं लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ हें पत्र मंगळवेढयाहून आलेलें इतकेंच अपुरें सांपडलें.　२ बाबाजी विश्वनाथ थाफेकर कारकून शिलेदार याचें शिंदे बायांच्या लष्करांतून पत्र मिरजेस बाळासाहेबांस.　३ पत्र बाळासाहेबांस मिरजेस भाऊंच्या लष्करांतन.

नं. ४८०६ ( फाल्गुन व० ६–२७ मार्च. )

ता॥ मोकदमानी क॥ मंगळवेढें प॥ मजकूर सु॥ सन १२०८ आंकी क॥ मजकूरची रखवालीबद्दल शिदी आंबर जमादार यास वरात रुपये १५००० पंधरा हजार देविले असे. तर देखत चिठी जलद रुपये आदा करणें. जाणिजे. छ० १९ माहे सवाल. मोर्तबसूद.

नं. ४८०७ श्री. (फाल्गुन व० ७–२८ मार्च. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री परशुराम रामचंद्र
स्वामी गोसावी यांसीं

पोष्य बाजीराव रघुनाथ प्रधान. नमस्कार. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. बाया शिंदे यांची समजूत जाहल्याशिवाय राजश्री दौलतराव शिंदे अलिजाबहाद्दर हिंदुस्थानांत जात नाहींत. त्यास बायांचा समेट जाला पाहिजे. बाया करवीरकरांस मिळाल्या. करवीरकर सरकारासीं नीट नाहींत. बायांचा समेट सरकारांतून करून द्यावा असें येथें बोलण्यांत आलें आहे. याजकरितां बायांस करवीकरांसीं मिळूं देऊं नये. करवीरकर व बाया एक जाहल्यास जमाव भारी पडून मसलत लांबेल. समेट लौकर होणार नाहीं. याजकरितां बायांस तुह्मी आपल्याकडे मिळवून घेऊन करवीरकरांचा बंदोबस्त करावयाची शक्कल कशी याचा विचार करून तपशीलवार लिहून पाठवावें. आणि समेटाचे अर्थ बायांजवळ बोलून लिहून पाठवणें. जाणिजे. छ ० २० सवाल. सन तिस्सा तिसैन मय्या व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ४८०८ श्री. ( फाल्गुन व० ७–२८ मार्च. )

पै॥ छ २१ सवाल. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ सा ॥ नमस्कार विज्ञापना तागायत छ २० सवाल गुरुवार मुक्काम मौजे तावसी व केकती यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं मानाजी सुर्व्या व गोविंदा जासूद याबरोबर छ० १८ मिनहूचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांचीं व आपलीं व हरि जगन्नाथ याचीं अशीं पत्रें मातुश्रीबाईस व बक्षी यांस होतीं तीं काल सौम्यवारीं सायंकाळीं प्रविष्ट केलीं. उत्तरें देतों म्हणोन सांगितलें. काल महाराजांचें कूच होऊन हंचनाळावर मुक्कामास गेले. राजश्री रत्नाकरपंत हुलुकबाळीवर होते तेथून पुढें

---

१ या चिटीवर पांच ओळी मजकूर याच अभिप्रायाचा उर्दू लिपींत आहे. ही पठाणांची रोखाचिठी मंगळवेढ्यावर. २ पत्र मिरजेस बाळासाहेबांस.

कोठें गेले हें समजलें नाहीं. राजश्री रामाजी दामोदर यासीं इकडे येणेंविशीं आज्ञा जाली पाहिजे. येथें आलीयास चिंता नाहीं. बरोबर पोहोंचावयास स्वार द्यावे. मातुश्रीबाईच्या व बक्षीच्या पत्राचीं उत्तरें आलीं म्हणजे सेवेशीं पाठवितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८०९    श्री    ( फाल्गुन व० १०–३० मार्च )

पै॥ छ० २२ सवाल. सन तिस्सा तिसैन. मंदवासर.

विज्ञापना. मुस्तजबखान पठाण व लाला दयाराम कसमीरकर यांचें पत्र आलियाचा मजकूर लिहिला, त्यास येथें शोध केला. मुजफरखान याचे रिसाल्यांतील येथें त्याचे कोणी नाहींत. राजश्री गणोबातात्यांस विचारलें. त्याणीं सांगितलें जे, तूर्त पठाणांचा नाद ठेऊं नये. आपणास ठेवावयाचे असलियासीं पाहून देऊं. हल्लीं पत्र आलें आहे हे निभावयाचे नाहींत. बक्षीचा मुक्काम गुरुवारीं मौजे शिरपूर येथें होता. भृगुवारीं कूच करून मोरबेचे सुमारें गेले. काल सायंकाळीं राजश्री बाळाभाऊ मला म्हणत होते जे राजश्री बक्षीनीं तुम्हांस बोलाविलें आहे. रातोरात जावें म्हणोन सांगितलें. त्यास मी उत्तर केलें जे, आमच्या वोलीं सुटत नाहींत. पठाण रोखे करीतच आहेत. तेरदळ व ऐनापूर दोन परगणे संनिध लागले आहेत. मी कसें जावें? राजश्री मुकुंदपंत यांसीं पाठवावें म्हणोन सांगितलें. येथून कूच जाहालियावर शिरगुरावरून पुढें मोरबेवर जावें असें सांगितलें. परंतु करवीरकर सांगतील तें त्यांस प्रमाण! बोलणेंत मात्र बहुत स्नेह दाखवितात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८१०    श्री. ( फाल्गुन व० १०—३० मार्च. )

पै ॥ छ २२ सवाल सन तिस्सा तिसैन मंदवासर.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ. साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ० २२ सवाल मंदवासर मुक्काम मौजे हल्लीहाळ कृष्णा उत्तर तीर यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ ० १९ मिनहूचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. "पठाणांचा उपद्रव कोठवर सोसावा? मातुश्री बाईस व बक्षीस श्रुत करून मनाया परभारें पाठवून माघारें नेववावें. राजश्री साबाजी नारायण यांसीं पत्र लिहिलें आहे. पावतें करणें." ह्मणोन आज्ञा, त्यास बक्षी सौम्यवारीं रात्रौ चंद्रउदय जाहालियावर श्रीमंत राजश्री भाउसाहेबांकडे गेले. मातुश्री बाईस विनंती केली. त्याजवरून आपले खास निशाणांच्या चिठ्या बाराभाई ऐनापुरावर उतरले

१ चांफेकर कारकून यांचें बायांच्या लष्करांतून मिरजेस पत्र. त्याचप्रमाणें पुढच्या नंबरचें.

आहेत त्यांस व सतरखान पठाण व हुसेनखान पठाण या तिघां जणांस दिल्या. 'बोली सोडून देणें, मिरज तालुकेंत रोखा पत्र करूं नये,' असें निक्षून लिहिलें आहे. जासूद मागोन घेऊन त्याजबरोबर पाठविल्या. प्रयत्न करावयासीं अंतर नाहीं. राजश्री बाळाभाऊ येथें आहेत त्यांस रोखेपत्राविशीं बहुत प्रकारें सांगतों; परंतु त्यांचे गांवी तो प्रकार नाहीं. आज मुक्कामच आहे. महाराजांचें कूच झालें आहे. नगारा मात्र झाला आहे. काल अथणी तालुक्यांतील एक गांव मारिला. प्रांताची बाकी रहात नाहीं. महाराजांचे मनसबेंत जमखंडीकडे जावें असें आहे. कोणीकडे जातात पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८११ श्रीगजानन. ( फाल्गु० व० १०—३० मार्च )

चिरंजीव राजश्री दादा यांसीं आशीर्वाद उपरी. मंगळवेढ्याहून पत्रें आलीं त्यांच्या नकला पहावयास पाठविल्या आहेत त्यावरून कळेल. करकंब व मंगळवेढ्याची वस्ती उठली. बरडोलही बाकी राहिली नाही. श्रीइच्छा-प्रमाण ! चतुरसिंग याचा मुक्काम × × × नजीक आहे. प्रतिनिधि तालुक्यांत घासदाणे घेत आहेत. लिटली यास वडिलानीं आणिलें असलेस इकडे आणावें म्हणोन लिहिलें, त्यास त्याजला वडिलानीं आणिलें असें नाही. तसें-असतें तर सरकारांतून लिहिलें येतें व वडीलही लिहिते. तो इंग्रजांचे कुमकेस जाणार असें ऐकणेंत आहे. रवाना छ० २२ सवाल. इंग्रजाचे कुमकेस सरकारांतून फौजा रवाना होणार त्यांजबरोबर लिटली जाणार अशी वदंता आहे. वडिलानीं आणविला असता तर आजवर समजतें. तो प्रकार नाहीं. वडिलांकडे काल सातवे तासीं जासूद माणसें जवळचे मार्गें पाठविलीं. कागद निभावले नाहीं तर पठाण बक्षी ( मिरजेवर ) येतात हें सांगावें असें सांगून रवाना केलीं. कळावें. चि ॥ राजश्री बाबा यास जाऊं नये, चोहूंकडे तुम्ही जाणार ही आवई पडली आहे, गडबडीचे दिवस, निभाव पडणार नाहीं असें सांगत आहों. त्यांचे विचारास आल्यास राहतील. ठरलेवर लिहितों. आज लष्करांतून शिंद्यांचे पत्र चाफेकरांचें आलें नाहीं. आलेवर लिहितों. आपणाकडे येईल तें वर्तमान कळवावें. राजश्री रत्नाकरपंत कोठें आहे तें वर्तमान काय तें ल्याहावें. लोभ करावा हे विनंती.

नं ४८१२ श्री. ( फाल्गुन व ११—३१ मार्च )

पै॥ छ० २४ सवाल. सन तिस्सा तिसैन फाल्गुन मास.
राजश्री गंगाधरराव गोसावी यांसी.

---

१ पत्र बाळासाहेबांचें मिरजेहून कुरुंदवाडास २ हरि परशुराम.

छ९ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित चतरसिंगराव राजे भोसले दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. "देवरअष्टेहून वे॥ राजश्री सदाशिव दीक्षित चिपळोणकर व नंदो शिवराम कुलकर्णी आले असतां त्यांस बसाविले आहेत. त्यांस उपद्रव हरएकविशीं लागों न देतां निरोप द्यावा." म्हणून लिहिलें, ऐशियास हे गृहस्थ आपल्याकडील किंवा सुखवस्तु हें माहीत नाहीं. परंतु यांणीं देवरअष्टेचे मुक्कामीं आम्हीं आलों ते समयीं रास्ते यांस पत्र लिहून छापा घालावयाचा बेत करून रातोरात फौज दोन हजार आणविली तीं दोन घटका दिवसास लष्करानजीक येऊन पोचले-नंतर आम्हीं तयार होऊन तोंडावर गेलों. लढाई झाली. त्यांचा मोड होऊन पळोन गेल्यानंतर हे उभयतां मार्गांत सांपडले ते लष्करांत आणल्यानंतर त्यांच्या अंगीं मुद्दा शाबूत झाला. याजमुळें बंदोबस्तांत ठेविले आहेत. बोलणें ही होत आहे. जाबसाल उगवून झाल्यांतच आहे. निरोप द्यावयास येईल. आपलेविशीं इकडून दुसरा अर्थ नाहीं. रवाना छ० २३ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ४८१३ श्री. ( फाल्गुन व० १२—१ एप्रिल. )

पै॥ छ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

सेवेशीं बालकृष्ण महादेव कृतानेक सष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ०२४ सवालपावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० २५ रमजानचीं व छ० ८ सवालचीं पत्रें मजला व श्रीमंत राजश्री नाना स्वामींस पाठविलीं तीं पावलीं. "महाराज व बायांच्या भेटी जाहल्या. मिरज प्रांतांत दंगा बहुत आरंभिला आहे. मिरजेवर यावें अथवा वडिलांवर जावें असा विचार आहे. आतां उपेक्षा करवावयाची नाहीं. सरकारांतून तोफखाना वगैरे रवानगी श्रीमंत नाना करितील. तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेबांस इकडे यावयाविशीं सरकारचें व श्रीमंत नानांचे पत्र सत्वर यावें," म्हणून वगैरे तपशीलवार लिहिलें त्यावरून श्रीमंत पंत प्रधान स्वामींनीं व नानांनीं विचार करून महाराजांचा बंदोबस्त करावा ह्मणून श्रीमंत भाऊसाहेबांस सरकारचें पत्र तयार जाहलें. व श्रीमंत-नानानींही पत्र लिहिलें आहे तें सत्वरच रवाना करितों. पत्राचे जाबही पाठवितों. भाऊसाहेबांच्या सामलातीस नबाबाकडील फौज व शिंदे यांजकडील चार

---

१ पत्र पुण्याहून बाळासाहेबांस मिरजेस.

पलटणें तोफांसुद्धां यावीं असें ठरोन सरदारांस पत्रें परभारें रवाना होत आहेत. व राजश्री धोंडोपंत गोखले व स्वामीस व श्रीमंत राजश्री दादांस व माधवराव रास्ते व प्रतिनिधि यांस पत्रें सरकारचीं रवाना होत आहेत. सर्वांनीं मिळोन महाराजांचा बंदोबस्त करावा याप्रमाणें ठरलें आहे. शिंदे मांजरीवर होते ते वानवडीवर आले. वर्षप्रतिपदेचे मुहूर्तावर निघोन जावयाचा विचार आहे. ( इंग्रजाचीं ) दोन पलटणें टिपूचे मसलतीवर जावयास आंबेघांटानें वरती आलीं तीं टिपूचे मसलतीवर जातील. स्वामींनीं किल्याचा बंदोबस्त करून रात्रंदिवस बहुत हुशार राहून बातमी वरचेवर येत असावी. हे विज्ञापना. मजला आरोग्य जाहलें. विज्ञापना.

नं. ४८१४ श्री. (फाल्गुन व ० १२—१ एप्रिल )

पै॥ छ० २४ सवाल. इंदुवार. प्रहररात्र. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

श्री॥ राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेसीं—

विनंती सेवक लक्ष्मण कृष्ण दातार सा॥ नमस्कार विज्ञापना. ता॥ छ० २४ माहे सवाल इंदुवार पयत मु॥ बालेहाळ पा॥ अथणी येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं कृपा करून पत्र पाठविलें तें पोंचून संतोष जाहला. वरकड इकडील वर्तमान सविस्तर राजश्री बाबाजीपंत चांफेकर यांणीं पत्रीं विनंती लिहिली आहे त्याजवरून विदित होईल. काल राजमंडळचें कूच होऊन ऐनापूरचे सुमारें गेले. येथून हें लष्कर कूच होऊन जाणार होतें, त्यास मुक्काम जाहला. राजमंडळचे मनांत आपलें लष्कर व यांचें मिळोन सौदीवरून जमखिंडी परगण्यांत मुक्काम करून खराबी करून तेथून मुधोळचे मुकामास जावें ऐसें होतें. त्यास आम्ही व राजश्री बाबाजीपंत व विष्णुपंत भिडे ऐसे मिळोन मातुश्री बाईजवळ व राजश्री बाळाभाऊ व देवजी गवळी यांसीं जाऊन बोलिलों कीं, ( तुम्ही ) श्री॥ राजश्री भाऊसाहेबांसीं संधान रक्षोन राजमंडळचें व श्री॥ राजश्री भाऊंचे रहस्य करून देणार; त्यास जमखिंडी परगण्यांतून गेल्यासीं मग रहस्यास कमी यावें. बोलतां एक, आणि कर्तव्य एक, असें घडल्यास आमचें वकिलांचें येथें राहण्याचें कारण काय ? ऐसें कितेक प्रकारें भाषण जालें. त्याजवरून त्यांणीं रा॥ बाळा भाऊ यांस महाराजांकडे परवां मंदवारीं पाठविलें. यांणीं सांगितलें परंतु त्यांचे विचारास आलें नाहीं. ते रुसोन कूच करून निघोन गेले. आणि यांचें थोडेंसें वांकडें आलें आहे. हें वर्तमान रा॥ बाबाजीपंत यांणीं लिहिलेंच आहे. जमखिंडीस लक्ष रुपयेचा रोखा व मसाला पांच हजार

( रुपयांचा ) आहला आहे. तेथें दंगा भारी मांडिला आहे. बाळाभाऊबरोबर आम्ही कारकून दिला होता. त्यास काल बचाजी बल्लाळ याणीं सांगितलें कीं, मनाचिठी जमखिंडीस पाठवून देतों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८१५　　श्रीगणपति.　　(फाल्गुन व० १२–१ एप्रिल)

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रति परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. आपण छ० १९ सवालचीं पत्रें पाठविलीं तीं छ० २३ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बीतपशील कलमवार—

राजश्री बाबाजी विश्वनाथ यांचीं पत्रें व जनार्दन शिवाजी यांचें पत्र व त्यांस जाब पाठविला त्याची नकल व मोरो शंकर सहस्रबुद्धे यांचें पत्र अशीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. कलम.

करकंब मंगळवेढें येथें शिंदे यांजकडील व नवाबाकडील फौजेचा उपद्रव अतिशय झाला आहे व मिरज प्रांतीं करवीरकरांचा व बायांचा दंगा भारी माजला आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. सर्व ध्यानांत आहे. इकडील कामकाजामुळें नाइलाज आहे. लवकरच त्या रोखावर येण्याची तरतूद होत आहे. कलम.

राजश्री हरि जगन्नाथ निसबत बाया यांच्या नांवचे लाखोटे पाठविले ते त्यांस पावते करविले. कलम.

चिरंजीव राजश्री त्रिंबकरावआपा समुदायसह मिरजेवर कुरुंदवाडाहून आलियाचें व इचलकरंजीकर यजमानांचें लग्न झाल्याचें लिहिलें तें कळलें. कलम.

"करवीरकरांकडील कांहीं फौज हुलुगबाळीस गेली. रंग कृत्रिम दिसतो. पठाण मिरजेंत कांहीं तरी निमित्तानें यावें हा उद्योग पहातात, परंतु दरवाजास परवानगी दिली नाहीं;" म्हणोन लिहिलें तें कळलें. बरें केलें. दरवाजावर चवकशी चांगली असावी. भीड धरूं नये. कलम.

एकूण पांच कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० २४ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

छ० २७ सवाल सन तिस्सा तिसैन. फाल्गुन वद्य अमावास्या गुरुवार.

नं. ४८१६　　श्री. (फाल्गुन व० १२–१ एप्रिल.)

पै॥ छ० २४ सवाल. इंदुवार. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

विज्ञापना. स्वामींनीं पंखे दोन व वरियांचे तांदूळ पाठविले ते पावले.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र चांफेकर कारकून यांचें बाळासाहेबांस मिरजेस. तसेंच पुढच्या नंबरचें.

आज्ञेप्रमाणें श्रीमंत बाईस पंखा एक व तांदूळ प्रविष्ट केले. मातुश्री यमुनाबाईचा पंखा प्रविष्ट करावयाचा आहे. गांठ पडली नाहीं. आज उद्यां प्रविष्ट करितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८१७ श्री. (फाल्गुन व० १२–१ एप्रिल.)

पै ॥ छ ० २४ सवाल. इंदुवार सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

विज्ञापना. मराठे मंडळींचें लक्ष श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडेस आहे. राजश्री बाळाभाऊंचें व बक्षीचें चित्त शुद्ध नाहीं ह्मणोन येथील मंडळीचे बोलण्यांत आहे. तेरदळास आज रखवालीस राऊत पाठवून देतों. महाराज येथून बिघडोन गेलियावर मिरज प्रांतांत उपसर्ग करितील असें वाटतें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४८१८ श्री. (फाल्गुन व० १२–१ एप्रिल)

छ० २७ सवाल सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक देवजी कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० २४ सवालपर्यंत स्वामींचे कृपे सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान तर आज श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामींची स्वारी मुरगुडास आली. चेलकोपच्या ओढ्यावर फौज उतरली आहे. खासे गांवीं आहेत. श्रीमंत राजश्री आपासाहेब सावनूर प्रांतांतून येईपर्यंत मुक्काम येथेंच होईलसें दिसतें. कही आज आमच्या तालुक्यापर्यंत येईलसें दिसतें. पहावें. म्हैसाळपयत मातुश्री शिंदे बाई यांची व राजमंडळची फौज आली म्हणोन बाजारी वर्तमान ऐकून चित्त स्वस्थ होत नाहीं. सेवकानें स्वामींस वर्तमानाविशीं विनंती लिहूं नये, परंतु चित्त स्वस्थ होत नाहीं. क्षणास एक वर्तमान उठतें. याजकरितां विनंतीपत्र पाठविलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८१९ श्री. (फाल्गुन व० १२–१ एप्रिल.)

पै॥ छ० २४ सवाल इंदुवार. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

विज्ञापना. राजश्री नारायणराव बक्षी घटप्रभेच्या तीरास मुक्काम करून राहिले आहेत. तेथून पुढें श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडे पत्रें पाठविलीं आहेत. उत्तरें येतील त्याप्रमाणें कूच होणार. राजश्री दौलतराव शिंदे यांजकडून पलटणें गारदींचे सुमारें आलीं म्हणोन वर्तमान आहे. सरकारची बातमी मांजरीवर

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

गल्याची आहे. मातुश्री बाईचे व बाळाभाऊंचे बोलणेंत येथून चिकोडीचे ह्कामीं जावें, तेथें बुनगे ठेऊन पलटणांवर सडे होऊन जावें, असें आहे. पुणें फलटण देशींचे शिलेदार आहेत त्यांचे मुलांमाणसांस शिंदे यांजकडून बहुत उपद्रव झाला आहे म्हणोन ( त्यानीं ) माघारे फिरणेंविशीं निकड केली आहे. कूच होऊं देत नाहींत. बाराभाई शिलेदार मंडळी आहे त्यानीं पांच दिवसांचा वायदा केला होता तोही भरत आला. यास्तव त्यांचीही निकड आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८२० श्री. ( चैत्र – एप्रिल. )

विज्ञापना. राजश्री हरि जगन्नाथ याजकडून पत्रे आलीं त्यांचें उत्तर देणेंविषयीं मोठा मनसबा पडला होता. मराठे मंडळीचें बोलणें एक, व राजश्री बाळाभाऊ वगैरे या मंडळीचें एक, असें पडलें होतें. परंतु काल सायंकाळीं मराठे व बाळाभाऊ एक होऊन पत्रांची उत्तरें दिलीं. महादजी भोईटे अद्यापि रुसलेच आहेत. राजश्री बाळा भाऊ याची ओढ महाराजांकडे आहे. दरमजलीस पंचवीस हजारांची निशा करवीरकर देतात. मराठे मंडळीचें म्हणणें बाई भाऊंकडे जाणार; भाऊसाहेब सांगतील त्याप्रमाणें चालावें; असें बोलतात. आणि “ मिरजप्रांत मारून जाळून रोखे करून खराबा केला. श्रीमंत राजश्री भाऊ साहेबांची आमची गांठ पडलेवर आम्हांस काय म्हणतील ? आम्हांस निरोप द्यावा ” असें म्हणतात. मराठे मंडळीचीं मुलें माणसें राजश्री दौलतराव यांणीं धरून नेलीं त्याजबद्दल दंगा करितात. येथील प्रकार राज्यानिराळा आहे ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं.४८२१ श्री. ( फाल्गुन व० १२–१ एप्रिल. )

पै॥ छ २४ सवाल सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

सेवेशीं विनंती सेवक श्रीधर गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २४ सवालपावेतों यथास्थित असे. विशेष. वे॥ राजश्री सदाशिव दीक्षित यांजविशीं राजश्री चतरसिंग यांस पत्र पाठविलें होतें तें प्रविष्ट केलें. त्यानीं उत्तर दिलें. दीक्षितांस सोडलें नाहीं. पैका मागतात. चितळी वाईणीनजीक दोन मुक्काम होते. काल येथून आऊंधकडे गेले. दीक्षितांची सुटका व्हावयाची दिसत नाहीं. पांच हजार रुपये मागतात. मराठ्याचा कारभार ! विवेकी माणूस कोणी नाहीं. पैका मागों नये येविशीं दुसऱ्या पत्राची आज्ञा झाल्यास ऐकतील असें वाटतें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ शिंदे बायांचे लष्करांतून बाबाजी विश्वनाथ चाफेकर याचें पत्र मिरजेस.

नं. ४८२२ श्रीगणपति. ( फाल्गुन व० १२–१ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. मजकूर बीतपशील.—

सावनूर तालक्यांतील ठाणीं बसलीं. मिश्रीकोटाचें ठाणें बसावयाचें. चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा तेथें आले असतील. अगोदरच ठाण्यास मोर्चे बसाविले आहेत. फौजेच्या दबदब्यानें लवकरच उलगड्यांत येईल. जुनी हुबळीमात्र राहिली त्यास गिर्दनवाईस फौज ठेवावी असें केलें आहे. चिरंजीव लवकरच आम्हांजवळ येतील. कलम १.

सावनूरकर नबाबाच्या चिरंजीवाविशीं आपण पेशजी लिहिलें होतें त्याजवरून गोखले यांस लिहिलें होतें. चवकी उठविली म्हणोन त्यांचा जाब आला. मशारनिल्हे येथें आलियावर लिहून पाठवूं. कलम. १

वेदमूर्ति राजश्री दीक्षित बावांच्या दर्शनोद्देशें मुरगडास दशमी रविवारीं आलों. दर्शन झालें. गढींत राहिलों आहें. प्रकृत बहुत अशक्त आहे. त्यांत उष्ण काळ. यामुळें सुखास येत नाहीं.

बायांकडील गृहस्थ येथें यावयास निघोन गोकाकेनजीक आले. मागाहून बायांचें कूच झालें त्यांचाही मुकाम तेथेंच आला असें वर्तमान आहे. चिरंजीव राजश्री हरिपंतबाबा यांस तूर्त येऊं नये असें काल लिहिलें आहे, त्यास येथें फौजेंत कोणी नाहीं; यांच्या येण्याची निकड दिसते, याजकरितां चिरंजीवास येण्याविशीं लिहिलें आहे. आपणही सांगावें. एक मजल लांब करावी. चालते झाल्याची खबर फुटूं नये अशा तरतुदीनें रवानगी करावी. कलम १

एकूण कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० २४ सवाल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

छ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन वा अमावास्या. गुरुवार.

नं. ४८२३ श्रीगणराज. ( फाल्गुन व०१२–२ एप्रिल )

पै॥ छ० २९ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

विज्ञापना. बावडेकर टोपेजवळ पांचशें राउतांसुद्धां उतरले आहेत त्याणीं सावळवाडीस रोखा केला होता तो गांवकरानीं मावारा टाकिला म्हणून बावडेकरांनीं सावळवाडी लुटली; या प्रमाणें येथें बातमी आली ती लिहिली आहे. वडिलींही वर्तमान आणवावें. पांचशें गोरे फिरंगी शिराळ्याचे मार्गें

१ पत्र पुनाथराव कुरुंदवाडकर यांचें मिरजेस बाळासाहेबांस.

करवीरास गेले. पुढें महाराजांकडे येणार. महाराज काल दोहीं उगारचे मध्यें मुक्कामास आले. उभय कृष्णातीर एकसारखें करावें असा निश्चय करोन विचार चालला आहे. पठाणही पुढें गेले. मंगसोळीहून बायांस महाराजांस अंतर पडेलसें वाटतें. बक्षी गेल्याउपर वर्तमान आलें असलिया लिहावया आज्ञा करावी. रवाना छ० २५ सवाल विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८२४ श्री. ( फाल्गुन व० १२–२ एप्रिल )

पै ॥ छ० २६ सवाल. सन तिस्सा. फाल्गुन मास.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचें सेवेशी.

विनंती सेवक रामाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २५ सवालपर्यंत स्वामींचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. महाराज फौजसुद्धां करवीरास जावयाकरितां कसबे ऐनापूरचे मार्गे गेले. कसबे मजकूरची खराबी फार झाली हें वर्तमान सेवेशीं विदित जाहलेंच असेल. बाया शिंदे फौजसुद्धां हल्याळचे मुक्कामीं आहेत. आणखी एक दोन मुक्काम तेथें होतील असा सुमार दिसतो. लष्कराहून राजश्री बाबाजीपंत यानीं ठाणेंचे रखवालीस स्वार बारा असामी पाठविले आहेत त्यांस ठेऊन घेतलें. राउतीं अडीच रुपये रोज प्रमाणें नक्त रुपये तीस शिवाय पोटगी व दाणा द्यावयाची याद लिहून आली आहे त्या प्रमाणें देत असतों. लष्कर मुधोळास कोणत्या मार्गें जातें पहावें. साविस्तर वर्तमान सेवेशीं कळावें करितां लिहिलें असे. सारांश स्वामींचे पुण्यप्रतापें ठाणेंतील सर्वांचा बचाव जाहला. बहुत काय लिहिणें सेवशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८२५ श्री. ( फाल्गुन व० १२–२ एप्रिल. )

छ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशीं नीळकंठ आपाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २५ सवालपावेतों स्वामीच्या कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. 'मुलुख ताराज जाला. बाकी राहिली नाहीं. परिणाम लागणें कठीण आहे' म्हणोन लिहिलें, त्यावरून श्रीमंतांस विनंती केली. इकडील कामें झाल्यावांचून तिकडील रोख नाहीं. आपलीं पत्रें वरचेवर निकडीचीं येतात. येथें तर फौज कामास गुंतली. यामुळें यजमान बहुत फिकीर करितात. स्वामींवर तवाई मोठी गुदरली आहे. महाल गेला, शिबंदी ठेवणें प्राप्त

---

१ पत्र परशुराम भाऊंचें बाळासाहेबास.

असा समय आला, हें सर्व यजमानांच्या ध्यानांत येतें व बोलोन दाखवितात. संकट परिहार होईल तेव्हां खरें ! विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८२६ श्रीगणपति. ( फाल्गुन व० १२–२ एप्रिल )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी आपण छ० १२ सवालच्या चिठ्या दोन स्वदस्तूरच्या बारीक दोन पाठविल्या त्या छ०२३ सवालीं अस्तमानीं पावल्या. त्यांचा जाब माणसें थकलीं सबब येथील जोडी-बरोबर छ० २४ रोजीं पाठविला आहे. पावला असेल. तिकडील दंग्याचा वगैरे मजकूर लिहिला तो कळला. इकडील कामें निकडीनें आटपून येत आहों. बायांकडून बक्षी वगैरे गृहस्थ येथें यावयाकरितां गोकाकेनजीक आले. मागा-हून बायाही तेथेंच आल्या म्हणून वर्तमान आहे. बक्षी यांस सडे येण्याविशीं येथून लिहिलें आहे. ते आल्यानंतर ठरेल तें लिहून पाठवूं. रास्ते यांचा मुक्काम कोठें आहे, पलटणें घांटाखालीं आहेत किंवा वरती आलीं, हें लिहावें. बातम्या चहूंकडे आसाव्या. तालुकियास मोठें अरिष्ट आलें आहे. कधीं निवारण होतें पहावें. आपण हुशारीस कमी करूंनये. चिंरजीव राजश्री हरीपंतबाबा याणीं आपल्या जवळ फौजसुद्धां रहावें असें ठरून लिहिलें होतें त्यास बायांच्या येण्याची तांतड दिसते, फौजेंत कोणी पाहिजे, याजकरितां त्यांची रवानगी व्हावी. त्यांसही येण्याविशीं लिहिलें आहे. रवाना छ० २५ सवाल. भौमवार. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

पै॥ छ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन फाल्गुन वद्य अमावास्या गुरुवार.

नं.४८२७ श्री. ( फाल्गु. व० १२–२ एप्रिल. )

पै छ० २९ सवाल. सन तिस्सा तिसैन.

सेवेसीं बाळकृष्ण महादेव. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २५ सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींकडून अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. त्यास सविस्तर लिहून आलें पाहिजे. छ० २४ सवालचें पत्र स्वामींस पाठविलें तेथें लिहिलें कीं, “ श्री॥ राजश्री भाऊसाहेबानीं महाराजांचा बंदोबस्त करावा म्हणून सरकारांत ठरलें आणि पत्रें तयार जालीं आहेत तीं परभारें भाऊंकडे जातील. भाऊसाहेबांचे सामला-तीस नबाबाकडील फौज व शिंदे यांजकडील चार पलटणें तोफांसुद्धां जमा होत आहेत. ” त्यास तो विचार राहून हल्लीं विचार ठरला कीं, बाया व राजे एक जाहले त्याचा बंदोबस्त होणें, याजकरितां राजश्री दौलतराव शिंदे यांजकडील राजश्री बाबराव आंगरे व गोपाळराव चिटणीस वगैरे सरदार

फौजसुद्धां व पलटणें तोफांसुद्धां रवाना होत आहेत. नबाबाकडील फौज रवाना होत आहे त्यांतील सरदारांस पत्रें रवाना होत आहेत. व श्री॥ भाऊसाहेबांस पत्र रवाना होत आहे. यांच्या व त्यांच्या विचारें ठरेल त्याअन्वयें बंदोबस्त करावा असें ठरोन पत्रें येत आहेत. याजकरितां स्वामींनीं दोन तीन हजार आपली व श्री॥ दादा फौजसुद्धां मिरजेजवळ असावे. आणि शहरचा व किल्याचा बंदोबस्त सर्व सरंजामानिशीं करून रात्रंदिवस हुशार राहून महाराजांची व बायांची व श्री॥ भाऊंकडील बातमी वरचेवर कोणते मुक्कामीं कोण तें लिहून सत्वर येत असावी. शिंदे याच्या मतें बायांची समजी जाहल्यास करावी, नाहींतर लढाई द्यावी आणि बंदोबस्त करावा याप्रों आहे. शहरचा बंदोबस्त होत नसल्यास शहरास निरोप द्यावा आणि किल्याची हुशारी करून बहुत बहुत सावधतेनें असावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८२८  श्री.  ( फाल्गुन व० १२—२ एप्रिल. )

पै ॥ छ ० २५ सवाल. सन तिस्सा तिसैन. पांच तास रात्र.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २५ सवाल भौमासर मुक्काम ऐनापुर यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० २४ मिनहूचें पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री हरि जगन्नाथ यांचें पत्र मातुश्री बाईचें नांवाचें पाठविलें तें प्रविष्ट केलें. आज हल्याळाहून कूच होऊन ऐनापुरचे श्रीरामलिंगापासून कृष्णातीरानें कुडचीचे गड्ड्यापावेतों लष्कर उतरलें आहे. इकडे येणेंचा मनसबा नव्हता, परतु काल इंदुवारीं राजश्री बचाजीपंत व बाजीपंत आले त्यांचे मनसबेनें हा मजकूर घडला. ते उभयतां मिरज प्रांतांची नासाडी करणें बद्दल उद्विग्नच[1] आहेत. ऐनापुरास मुक्काम आला ते समयीं कहीवाले गांवांत शिरोन नासाडी केली. गांवांत कोणीच नाहीं, आग लावतील, हें समजोन मी बाईचे स्वारीकडे आडवा गेलों. स्वारी राजश्री त्रिंबकराव टकले याणीं मळा केला होता तेथें विहिरीवर उतरले होते. तेथेंच राजश्री बाळभाऊंकडे गेलों. त्याणीं पंचवीस स्वार गौळी यांजकडील दिले ते व मजबरोबर स्वार होते ते व रामाजी दामोदर यांसीं व नाथाजी साळोंखे ऐसे गांवाचे रखवालीस पाठविले आणि बाईकडे गेलों. तेव्हां बाई पालखींत बसोन स्वारीसमेत गांवांत आली. कहीवाले व पाहुणे लुटारू यांसीं समक्ष मारामारी केली. घटकाभर स्वारी गांवांत उभी राहून मग गोटास आली. बरोबर मी होतों. गांवाचा तसनस महाराजानीं केलाच आहे. परंतु घरें व पेवें

---

१ येथे उद्विग्न म्हणजे उद्युक्त असा अर्थ ।

राहावीं एतद्विशींचा प्रयत्न करीत आहें. चार रुपये खर्च पडलियासीं कबूल करणें प्राप्त आहे. गांवांतून आतांच चिठी राजश्री रामाजी दामोदर यांची आली ती सेवेसीं पाठविली आहे. घरांविशीं व पैंवांविशीं प्रयत्नास चुकत नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८२९ श्री. ( फाल्गुन व० १३–३ एप्रिल. )

पै ॥ छ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास. प्रहर रात्र.

विज्ञापना. राजश्री हरि जगन्नाथ यांचें पत्र येथें छ० २३ सवालचें आलें त्यांतील मजकूर जे, श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचें कूच झालें. प्रतिपदा झाल्यावर बक्षीची भेट घ्यावी असा मनोदय होता, परंतु जवळ आले त्या अर्थी आज सौम्यवारीं भेट बक्षीची होणार. करवीरकर महाराजांचा मुक्काम मौजे उगार येथें आहे. आज सौम्यवारीं देवजी गौळी व तुकोजी थोरात व सुभानराव कदम जाणार आहेत. राजश्री बचाजीपंत व बाजीपंत आले आहेत तेच घेऊन जाणार. राजश्री बाळाभाऊचे बोलणेंत श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांची भेट झाली म्हणजे आम्हीं माघारे फिरणार. पलटणें समीप आलीं आहेत. इतःपर पुढें गेलियानें ठीक नव्हे असें हीं म्हणतात. बाजीपंत निसबत करवीरकर यांचें बोलणेंतील भाव बाईनीं आमचें व भाऊंचें नीट करून देणें हा विचार समजलाच आहे ! हे माघारे फिरले तरी आम्ही सातारेकडे जाणार. सप्तसागर मारून फौज ताजी केली उशीं एक दोन ठिकाणें चांगलीं पाहून मारून फौज सावध करूं असे बोलणेंचे आवाज निघतात. इतःपर त्यांची नजर ठीक नाहीं. मातबर गांवानीं सूचना असावी. बाईचे लष्करांत गांवास आग लावणार माणसें तीस पंचवीस करवीरकरांकडील आहेत म्हणोन राजश्री तात्या फोंडेकर सांगतात. सतारखान पठाण यानें कोकलेचे ओढेवर बुनगें टाकून सडे होऊन पलटणें आलीं आहेत त्यांजवर गेले म्हणोन येथें वर्तमान आहे. वोली अद्याप सुटल्या नाहींत. खटपट करीतच आहों. सोडितों असें म्हणतात परंतु सुटत नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८३० श्री. ( ३ एप्रिल )

पै ॥ छ २८ सवाल सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक रामाजी मल्हार व आपाजी राम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना येथील कुशल तागायत फाल्गुन वद्य १३ मुक्काम

करकंब येथें स्वामींचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. येथील वर्तमान तरी प्रथमतः राजश्री जनार्दनपंत भाऊ मोंगलांचे फौजे बरोबर आले त्याणीं शिराळेकरांचे वरातेबद्दल रुपये वीस हजार, व खासगत आठ हजार त्याचें व्याजसुद्धां साडेनऊ एकूण साडे एकुणतीस हजार घेतले. शिवाय गांवगन्ना वसुलास स्वार गेले त्याणीं खर्च मनस्वी घेतला. कमपेश सद्दतीस अडतीसाचे सुमारास आलें. खेरीज मेंढापुरीची समग्र खराबी झाली. पुढें राजश्री बळवंतराव कृष्ण निसबत लक्ष्मीबाई शिंदे आले त्याणीं खंडणी-करितां पत्र व पन्नास स्वांर पाठविले त्यांस धुडावून लावून दिलें. त्याणीं परभारें गांवगन्ना रोखे व स्वांर पाठवून आठ नऊ गांवच्या वोली धरून नेल्या. त्यापैकीं कांहीं गांवकरानीं पैका देऊन वोली सोडविल्या. पांच सहा गांवच्या वोली तशाच आहेत त्यांची सुटका व्हावयाचा सुमार पाहतां दहा हजारांची बेरीज होईल. मागाहून राजश्री चिंतो आत्माराम नि ॥ राजश्री दौलतराव शिंदे हे फौजसह आले त्याणीं तालुकेंत मुक्काम केला. खंडणी मागूं लागले. त्यांस होय नव्हे म्हणावें तरी सरंजाम पोक्त तोफा पलटणें. फौजेंत कैद नाहीं. खंडणी न करावी तरी तालुका लुटणार. कस-ब्याशीं गांठ घालणार. हा निकर्ष पाहून वीस हजार रुपये ऐन व दरबार खर्च एक हजार असे एकवीस हजार ठरविले. गांवगन्ना स्वांर वसुलास गेले त्यांचा खर्च रोज व खुराकी व किरकोळी फर्मासी वगैरे पांच हजार, एकूण पंचवीस हजारांचा सुमार जाहला. ते रुपये वसूल देतां तमाम गांव वोस झाले. दोन हजार रुपये देणें राहिले त्याबद्दल वोली गुंतून राहिल्या आहेत. भरणा करतां प्राण कंठास आला. कोठवर पैका द्यावा? त्राण राहिला नाहीं. गांव उध्वस्त झाले. प्रस्तुत मोंगलांचा मुक्काम पंढरपुरीं आहे त्याणीं सात हजार रुपयेचा रोखा घासदाणेचा करून स्वांर पाठविले. सेवेशीं श्रुत होय. कृपावंत स्वामी समर्थ असत. हे विज्ञापना.

नं. ४८३१　　श्रीशंकरप्रसन्न. (फाल्गुन व० १३–३ एप्रिल)

पै ॥ छ ० २९ सवाल. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

पुं ॥ राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेसीं—

विनंती उपरी. राजश्री भाऊ अलीकडे मुरगुडानजीक आल्याचें व "राजश्री रामचंद्रपंत आपा पुढें गेले होते तिकडील गुंता उरकला. आतां इकडीलच रोख आहे;" म्हणोन व "शिंदे बायांचा व करवीरकर यांचा

---

१ माधवराव रास्ते यांचें पत्र मिरजेस.

उपद्रव बहुत जाहला. गांवगन्नाची कांहीं बाकी राहिली नाहीं. मुक्काम हल्याळा वर हलुकबाळीनजीक गेला. रत्नाकरपंत याणीं हुलुकबाळी दग्ध केल्याचें व बक्षी तीन हजार जमियतीनिशीं खातरजमा करावी याअर्थें (भाऊसाहेबांकडे) गेल्याचें लिहिलें तें कळलें. त्यास शिंदे बायांच्या येथें बहुनायकी दिसती. स्वज्ञात एकबुद्धीने एकत्र होऊन चालतात. त्यांची त्यांची गांठ तोडून मग भाऊनीं भेटी घेतल्यास उत्तमसें दिसतें. त्यांत तिकडून खातरजमा जाहल्याशिवाय कोण ती गोष्ट होणार नाहींच. परंतु येकजात आहेत. प्रस्तुत सत्य किती आहे, त्यांत करवीरीं किती राहतें, हे अनुभव आहेतच. म्हणोन सुचला विचार लिहिला आहे. खातरजमा करावयास गेले हें उत्तमच आहे. भाऊंकडून या मजकुराचा आम्हांस काहीं इतल्ला नाहीं. आपलेकडून कळतें. त्यापक्षीं लिहिल्यांत येत नसेल. रवाना छ० २६ सवाल बहुत काय लिहिणें. पुण्याकडील वर्तमान रा॥ दौलतराव शिंदे पूर्वस्थळास मुक्कामास आले. मागती सांप्रदा-यानुरूप निरोप घेऊन जाणार असें म्हणणें आहे. घडेल तें खरें ! लोभ करावा हे विनंती.

नं. ४८३२ श्री (फाल्गुन व० १३—३ एप्रिल)

पै॥ छ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन.

सेवेशीं विनंती सेवक श्रीधर गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञा-पना तागायत छ० २६ सवाल दोन प्रहरपावेतों यथास्थित असे. विशेष. लक्ष्मी-बाई शिंदे यांजकडील स्वार मौजे आळसंद येथें होते ते काल अकरावे तारीं मौजे देवरअष्टें नजीक वोढ्यावर येऊन उतरले आहेत. देवर अष्टेंवर रोखा होता त्याची नकल सेवेशीं पाठविलीं आहे. काल रोजाबाबद व घोड्यांस दाणा वैरण व स्वारांची पोटगी मिळोन पस्तीस रुपये घेतले. आज मसाल्यापैकीं तीस रुपये घेतले. रोखा माघारा टाकावा तर घरें जाळतात ! मौजे तडसर येथें खटला झाला. दहापांच माणूस ठार झालें. घरें दारें जाळलीं. असें शिवेशे-जारी झालें ते पक्षीं रोखा टाकून परिणाम नाहीं. आणखी आठचार दिवस येथें मुक्काम आहे. पायदळ वरचेवर नवें ठेवीत आहेत. मौजे बोरगांव चिट-णिसांचें येथें ठाणें बसाविलें. हे ऊठोन तिकडेच जाणार असें बोलतात. रास्ते यांची व चतरसिंगांची मंगळवारीं न्हावीचे घाटाखालीं वाठारानजीक लढाई झाली. चतरसिंगाचा मोड झाला. उधळोन पुन्हां वाळवेवर गेला असें वर्तमान आहे. पुढें बातमीस पाठविले आहेत. अद्याप आले नाहींत. वे॥ राजश्री सदाशिव दीक्षित चिपळूणकर चतरसिंगानें नेले होते. औंधाचे मुक्कामीं तजावजा झाले.

नंदो शिवराम कुलकर्णी त्यांचे कैदेंत होते ते काल गडबड झाली ते समयीं निघाले किंवा काय झालें हें कळत नाहीं. त्यांचे ही शोधास गेले आहेत. आल्यानंतर सविस्तर लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८३३ श्री. ( फाल्गु. व० १४–४ एप्रिल. )

पै॥ छ०८ जिल्काद. तिस्सा तिसैन. चैत्र शु॥ ९ रविवासर.

सेवेसीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २७ सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० २५ रमजानचीं पत्रें व छ० ८ सवालचीं पत्रें मजला व श्री॥ नानांस पाठविलीं तीं पावलीं. “ महाराज व बाया शिंदे यांच्या भेटी जाल्या. वडिलांवर जाणार अथवा मिरजेवर येणार. बायानीं महाराजांस एक हत्ती व घोडा शिरपेंच व वस्त्रें दिलीं. व महाराजानीं लाख रुपये बायांस दिले आणि सर्व प्रांतांत व मिरजप्रांतांत रोखे होऊन अनेक प्रकारचा उपद्रव जाला आहे. आतां उपेक्षा करावयाची नाहीं. सरकारांतून फौज व तोफखाना वगैरे सरंजाम श्रीमंत नाना रवाना करितील. ती॥ राजश्री भाऊसाहेबांचें येणें इकडे जाहलें पाहिजे याजकरितां सरकारचें व नानांचें पत्र सत्वर यावें ” म्हणून लिहिलें व राजश्री बाबा काळे यांचा मजकूर लिहिला तो समजला. मी आपलीं पत्रें श्री॥ नाना स्वामींस दाखविलीं व श्रीमंतांचीं पत्रें प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठविलें आहे. व श्री॥ भाऊसाहेबांस पत्र घेऊन पाठविलें आहे त्याजवरून सविस्तर विदित होईल. स्वामींनीं किल्याचा बंदोबस्त करून रात्रंदिवस हुशार राहून बातमी वरचेवर येत जावी. राजश्री दौलतराव बाबांकडील राजश्री मामा आंगरे व गोपाळराव चिटणीस फौज व पलटणें तोफांसुद्धां महाराजांचे बंदोबस्तास व बायांचे बंदोबस्तास रवाना जाहले. व नबाबाकडील सरदार फौजसुद्धां रवाना जाहले ते निकडीनें तिकडे येतील. श्री॥ भाऊनीं व या सरदारानीं मिळून बंदोबस्त करावा असें ठरलें आहे. राजश्री मोरोपंत परांजपे यांस जाऊन बहुत दिवस जाले. त्यांची रवानगी सत्वर जाहली पाहिजे. मार्गाची सोई पाहून त्यांची रवानगी व्हावी. सरकारचीं पत्रें सर्व सरदारांस रवाना जालीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८३४ श्री. ( फाल्गुन व० १४–४ एप्रिल. )

पै ॥ छ ० २७ सवाल. सन तिस्सा तिसैन फाल्गुन मास.

'विज्ञापना. देवजी गौळी व थोरात काल महाराजांकडे गेले होते ते प्रहर रात्रीस आले. बोलणेंत रहस्य राहिलें नाहीं. महाराजांचें आज कूच जाहलें. इंगळीचे मुक्कामीं जाणार असें बोलतात. देवजी गौळी आज श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांकडे गेले. काल राजश्री बक्षीचे पत्र आलें होतें. काल कूच करून पुढें गेले. काल भेटी होणार असें होतें. महाराजांचा मनसबा कृष्णातीरानें सातारेकडे जाणार असें आहे. येथील मनसबा घटकेस एक येणें-प्रमाणें आहे. पुण्याकडे लढाई झाली म्हणोन करवीरकरांचे लष्करांत बोलतात. ... + .... ... .... कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८३५ श्री. (फाल्गुन व० १४–४ एप्रिल.)

पै॥ छ० २८ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक रामाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २७ सवाल गुरुवार प्रथम प्रहर रात्रपावेतों स्वामींचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. राजश्री नारायणराव बक्षी हे फौज सुद्धां कोठें आहेत हें वर्तमान लिहिणेंविशीं आज्ञा, त्यास बक्षीबावा आजपर्यंत मौजे हुणसीहाळ परगणे गोकाक येथें होते. उद्ईक कूच होऊन पुढें जाणेंची वदंता आहे. बक्षी याणीं घटपेनजीक खेडीं तमाम जाळून लुटून फस्त केलीं. कांहीं मुधोळ तालुक्यांतील व कांहीं तेरदळ तालुक्यांतील कुरुंदवाडनि॥ त्या सरदेस होतीं तीं लुटलीं गेलीं. सारांश या प्रांतीं कोणते स्थळींही बाकी राहिली नाहीं. स्वामींचे पुण्यप्रतापें हें ठाणें मात्र फौजेचा उपसर्ग किमपि न होतां राहिलें. शिबंदी वगैरे खर्च मनस्वी पडला. शिंदे यांजकडील देवजी गौळी याचे नि॥ चे स्वार बारा असामी ठाणेंचे रखवालीस चार दिवस होते त्यांस रोज रावतीं अडीच रुपये प्रमाणें तीस असे चार रोजा एकशें वीस रुपये नक्त, शिवाय पोटगी व दाणा वैरण दिली, आणि आज स्वारांस निरोप देऊन रवाना केलें. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८३६ श्रीगणपति. (फाल्गुन व० ३०–५ एप्रिल.)

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. आपण छ० २५ सवालचीं पत्रें पाठविलीं तीं छ० २८ मिनहूस पावलीं.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. +येथील मजकूर महत्त्वाचा नसल्यानें तो गाळला आहे. २ ठाणें तेरदाळ.

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांजकडील द्राक्षें व अंजीर पाठविलें तें पावलें. डांक दुसरे रोजीं यावी म्हणजे जिन्नस ताजा राहील. हल्लींची डांक चवथे दिवशीं आली. याचा बंदोबस्त असावा. चिरंजीव राजश्री हरिपंतबाबा त्रयोदशी बुधवारीं येथें आले ते लष्करांत आहेत. आम्हीं मुरगुडांत आहों. उद्यां वर्षप्रतिपदेस भेटी होतील. रवाना छ २८ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० ५ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रशुद्ध ६ गुरुवार.

नं. ४८३७ श्री. (फाल्गुन व० ३०—५ एप्रिल.)

छ० २९ सवाल. सन तिस्सा तिसैन. चैत्र शु० १ मंदवासर.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २८ सवाल भृगुवासरपावेतों मुक्काम ऐनापूर यथास्थित असे. विशेष. करवीरकर महाराजांचा मुक्काम इंगळीवर गेला. कृष्णातीरानें पुढें जावें असें बोलणेंत आहे. मातुश्री लक्ष्मीबाईचें कूच आज होणार होतें. परंतु बक्षीकडील पत्र येईजेपावेतों होत नाहीं असें बोलतात. बाईस ओलीं द्राक्षें पाहिजेत. दहा शेर मिळालियासीं पाठवावीं. राजश्री लक्ष्मणपंत दातार सविस्तर सेवेशीं विदित करितील. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८३८ श्री. (फाल्गुन व० ३०— ५ एप्रिल.)

पै॥ छ० २८ सवाल. सन तिस्सा तिसैन. फाल्गुन मास.

श्रीमंत महाराज बाळासाहेबाचे खिजमतीस—

छ लक्ष्मणसिंग मिर्धा मुक्काम लष्कर. आदाब बंदगी ऐसी जे आतां शहा महमदखां पठान खांसाहेब सतारखान यांजकडील आहेत ते तेथें आले आहेत जे, यांचा खिजमतगार चीजबस्त घेऊन पळून गेला आहे त्याजकरितां हुडकावयासीं आले आहेत. साहेबीं यांजला दरवाजाची परवानगी देऊन यांचे समगमें सरकारचे दोन जवान देऊन चारी पेठेंत फिरवून असलेस हुडकून घेतील. स्वांर दोघेजण आहेत. बाहीर रहातील. साहेबांस विदित होय. बंदगीस मालुम होय. हे अर्जदास्त.

नं. ४८३९ श्रीगणराज. (फाल्गुन व० ३०—५ एप्रिल)

पै॥ छ० २८ सवाल भृगुवार दोनप्रहर. तिस्सा तिसैन.

विज्ञापना. आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ रघुनाथराव नीळकंठ कुरुंदवाडकर यांचें स्वदस्तुरचें पत्र गंगाधरराव गोविंद यांस.

चतुरसिंग याचा मोड झाल्याचें लिहिलें तें कळलें. सध्यां त्या प्रांताचा भोग चुकला. मी येथपावेतों आलों. पुढें तीर्थरूप मातोश्रीबाईची प्रकृत स्वस्थ नाहीं याजमुळें लवकर येणें होतां दिसत नाहीं. रात्रौ लिहिलेंच आहे. कारकून व पन्नास राऊत पाठवून येथून मिरजेस येत असें झालें पाहिजे. प्रकृत अशक्त झाली. त्यांत मर्जीस वाकफ आहेच. पत्र पाहोन विसर्जन करावया आज्ञा झाली पाहिजे. चिरंजीव रा॥ बापूच्या येण्याचा प्रकार लिहिला, उत्तम जाहलें. रा॥ छ० २८ सवाल. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८४० श्री. ( चैत्र शु० १–६ एप्रिल. )

पै॥ छ० ५ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. गुरुवार चैत्र शु॥ ६

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं

अपत्यें रामचंद्र श्रीधर काळे शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २९ सवालपावेतों पुणें येथें सुखरूप असें. विशेष. वडिलांकडून आशीर्वादपत्र येऊन सांभाळ होत नाहीं. तर सविस्तर लिहावयास आज्ञा व्हावी. इकडील वर्तमान शिंदे कूच करून गेले होते ते मागती पहिल्या तळावर आले. तूर्त जात नाहींत. कारण विना बायांची समजूत जाहल्याशिवाय अथवा पारिपत्य जाहल्याशिवाय कोठें जावयाचें नाहीं. राजश्री गोपाळराव चिटणीस व बाबूराव आंगरे ऐसे आज चार दिवस झाले, बायांचे समजुतीस म्हणोन निघाले. जेजुरीपार गेले. बरोबर चार पलटणें व दोन हजार फौज आहे. तसेंच राजश्री आत्मारामपंत पागनीस यांचे चिरंजीव पहिलेच चार हजार फौज व दोन तीन हजार पलटणी लोक ऐसी फौज पंढरीस गेलीच आहे. गोपाळराव आणि पंढरीवरील फौज ऐसी एक जागीं होऊन पुढें बायांकडे जाणार. तह उरकल्यास उत्तम. नाहीं तर कलह प्राप्त आहे. सारांश आपले प्रांताची बाकी राहत नाहीं. ईश्वरें काय योजिलें आहे कळत नाहीं. मी श्रीमंत राजश्री नानांकडे जात असतों. आपला नमस्कार प्रविष्ट केला. माझेपाशी नानानीं गोष्टी दोन चार वेळां पुसिलें कीं, मिरजेहून बायांचे व करवीरवासी महाराज यांचे सैन्यातील दिनचर्येची बातमी लिहिली कां येत नाहीं ? याउपरी नेहमी बातमीं आणावी. कांहींच समजत नाहीं ! ऐसें बोलले तेव्हां मी उत्तर केलें कीं, लिहिलें गेलें आहे. पत्रें आलीं म्हणजे काळवितों. ऐसें बोलून राजश्री धोंडोपंत जोशी यांस पुसलें कीं, अलीकडे मिरजेहून पत्रें किती दिवस आलीं नाहींत ? मशारनिल्हेनीं उत्तर केलें कीं एक महिना पत्रच आलें नाहीं.

त्यास वडिलीं बाया महाराज या दोन्ही स्थलांची बातमी दिनचर्येची लिहिली येत असावी. करवीरकर यांचें आणि बायांचें वांकडें आलें ऐसें ही बोलतात. राजश्री नारायणराव बक्षी बायांपासून पळून गेले, पठाणांचा फितूर झाला, ऐसें ही येथें मनस्वी बोलतात. इतकें ही श्रीमंत नाना पुसतात. तर वरचेवर लिहिलें येत असावें. मोंगलाची फौज पंढरपुरावर आहे तशी आहेच. आणखी बीडावर फौज आली ऐसी बोलवा आहे. परंतु खचीतसें भासतें. चतुरसिंग सातारकर यांची लढाई होऊन रास्ते यानीं लुटला. यशस्वी राजश्री माधवरावजी झाले. चारशें घोडे पाडाव आले. बहुत दिवशीं यशास पात्र झाले ! दैववान आहेत. इंग्रजांची आणि टिपूची लढाई सुरू झाली. कृष्णगीरचा घांट इंग्रज चढले. टिपूचे पांच सात सरदार ठार होऊन मागें हटला. लवकरच पट्टणास पोंचतील. सरकारांतून सरदाराची योजना होत आहे. मग कोण रवाना करितात पहावें. सारांश याउपरी सरकारांतून फौज व पैका पावून फौज रवाना टिपूवर होणें संकट आहे. इंग्रजाचीं पलटणें संगमेश्वरास दोन आलीं आहेत. माझें मतें तीं पलटणें तूर्त मिरजेपाशीं आणवून घ्यावीं म्हणजे तूर्त वरकडांचा उपद्रव होणार नाहीं. पलटणांचा मजकूर श्रीमंत नानांपाशीं बोलणार होतों. कशास बोलावें म्हणून बोललों नाहीं. नानांचे बोलण्यांतील भाव पाहतां या उपरी करवीरकर यांची उपेक्षा करावयाची नाही. पारिपत्य करावें हाच बोलण्यांतील रंग दिसतो. मग करवीरकर यांचे दैव ! चोंहींकडे पाहतां सुबत्ता कोठें नाहीं. मिरजेस चोहींकडील गुळें जमा झालें म्हणोन मी नानांस विनंती केली आहे. ऐकला आढळला मजकूर लिहिला आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८४१ श्री. ( चैत्र शु० १-६ एप्रिल. )

छ० २९ सवाल. सन तिस्सा तिसैन शुा। १ मंदवासर.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २९ सवाल मंदवासर पावेतों मुक्काम कसबे ऐनापूर यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० २८ सवालचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. पठाणांनीं हिंगणगाव व देशिंग वगैरे गांवांस बहुतच उपद्रव केला आहे. लक्ष्मणसिंगाबरोबर मनाचिठ्या पाठविल्या होत्या, परंतु बोलणें प्रमाण नाहीं. लष्करचा रोख कोणीकडे हें कळत नाहीं. रास्ते यांची व चतुरसिंगाची लढाई झाली, चतुरसिंग मोडला, म्हणून पत्रीं लिहिलें; त्यास पठाण दाशगाकडे गेल्याचें वरचेवर मातुश्री बाईचे कानावर घातलें; परंतु बंदोबस्त होणेंचा प्रकार नाहीं. मनाचि-

ह्यांचें सार्थक काय ? घेऊन फळ नाहीं. चतुरसिंग रास्ते यांसीं सांपडला म्हणोन येथें बोलतात. आज लष्करचा मुक्कामच आहे. बक्षींचें पत्र आलेशिवाय कूच होत नाहीं. येथील स्थिति रीतीचा प्रकार राजश्री लक्ष्मणपंत व रामाजीपंत सांगतां श्रुत होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८४२ श्री. ( चैत्र शु० १–६ एप्रिल. )

पै॥ छ० १ जिल्काद. सन तिस्सा तिसैन.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं

विनंती[1] सेवक मुकुंद नारायण भिडे साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २९ सवाल पर्यंत मुक्काम लष्कर नजीक ऐनापूर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री भवानी दयाशंकर सावकार श्रीमंत मातुश्री लक्ष्मीबाई शिंदे यांजकडील गुमास्ते शालग्राम व हरगुलाल हे चांदी वगैरे जिन्नस खरेदी करावयास आले आहेत. यांस शहरांत यावयाची परवानगी असावी. हांसिलाची[2] माफीची आज्ञा व्हावी. हे गुमास्ते जिन्नस खरेदी करावयास एक दोन वेळां येतील. यांजला शहरांत यावयाची परवानगी असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८४३ श्री. ( चैत्र शु० २–७ एप्रिल. )

पै॥ छ० १ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं[3] बाळाजी बाजी सा॥ नमस्कार विज्ञापना तागायत छ० १ जिल्कादपर्यंत वर्तमान क्षेम असे. विशेष. पठाणांचा मुक्काम सावळजेस जाला आहे. त्याणीं आम्हाकडील सरकारच्या गांवास रोखे करून चिंचणी वगैरे गांवांस उपद्रव भारी केला आहे. पैका मनस्वी मागतात. गांवची खराबी बहुत करितात. कोणताही उपाय चालत नाहीं. यास्तव स्वामींस विनंती लिहिली आहे. तरी तिकडून बक्षीकडे व बायांकडे पत्रें पाठवून बंदोबस्त करावयास आज्ञा व्हावी. आणि त्यांची मनाचिठी पठाणांस आणवावी. करवीरकर यांचा व बायांचा मुक्काम कोणे ठिकाणीं आहे व उभयतांचें रहस्य आहे किंवा बिघाड आहे याचें सविस्तर ल्याहावयास आज्ञा व्हावी. व श्री॥ राजश्री भाऊसाहेबांकडील अलीकडे वर्तमान कळत नाहीं. मुक्काम कोणे ठिकाणीं आहे व श्री॥ राजश्री आपासाहेबांची स्वारी श्रीमंतांस मिळावयास येणार होती ती आले न आलेचें वर्तमान ल्याहावयास आज्ञा व्हावी. पठाणांस

---

१ चिठी बायांच्या लष्करांतून. २ जकातीची. ३ पत्र तासगांवाहून मिरजेस.

मनाचिठी लौकर आल्यास गांव खेडयांचा बंदोबस्त होईल. नाहीं तरीं गांव नागवून सोडितात. खंडणी मनस्वी घेतात. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांसहीं लिहून पाठवावें आणि बंदोबस्त लवकर होईसें करावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८४४ श्रीशंकरप्रसन्न. ( चैत्र शु० २–७ एप्रिल. )

पै॥ छ० ४ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं पोष्य माधवराव अनंत सा॥ नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ० १ जिल्कादपावेतों यथास्थित जाणोन स्वकीय लिहित जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. "राजश्री नारायणराव बक्षी वडिलांकडे गेले आहेत व चि ॥ राजश्री हरिहरराव बाबा जाऊन पोहचले असतील व करवीरकरांचा व बायांचा मुक्काम उगार ऐनापुरावर आहे. प्रांतास बहुत उपसर्ग लाविला आहे व चत्रसिंगाची लढाई जाली येविशींचें सविस्तर ल्याहावें" वगैरे मजकूर लिहिला तो कळला. ऐसीयास बक्षी जाऊन काय ठरलें व राजश्री भाऊंचा रोख प्रस्तुत कसा आहे हें लेहून कळवावें. प्रांतास उपसर्ग बहुत. बोलावें एक, करावें एक, हीं उभयतांचीं आचरणें ! तसा प्रसंगच प्राप्त जाला आहे त्यास उपाय नाहीं. श्री करील तें खरें. चत्रसिंगाची लढाई जाली. त्याचा मोड होऊन पळोन गेले, त्याचा मजकूर पेशजी लिहिलाच आहे त्याजवरून कळलेंच असेल. तिकडे यावयाचा मजकूर लिहिला, त्यास फौज येथें सिद्धच आहे. चत्रसिंग वाळव्यास जाऊन पाटणकरांकडे कुमक आणवावयाकरितां उद्योग करीत आहे. त्याचाही सुमार पाहून आहों. राजश्री भाऊंचें येणें सत्वर जालें असतें म्हणजे बंदोबस्त मागेंच जाला असता. राजश्री नारो विनायक यांचें पत्र पाठविलें त्याचें उत्तर परभारें अलादा पाठविलें आहे. इंग्रजाकडील दोन पलटणें मोरगिरीखालून पाटणखोऱ्यांतून कराडास येऊन राहिलीं आहेत. शिंद्याकडील फौज व पलटणें कांहीं देऊरचे मुक्कामास आलीं म्हणोन बातमी आली आहे. पक्कें समजोन लिहिलें येईल. निरंतर पत्र पाठवून वर्तमान कळवीत असावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४८४५ श्रीगणपति. ( चैत्र शु० २–७ एप्रिल )

चि॥ राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी मुरगुड येथें वे॥ राजश्री दीक्षित बावांच्या दर्शनोद्देशें पांच सहा दिवस होतों. काल वर्ष प्रतिप-

---

१ रास्ते. २ बाया व महाराज.

देच्या मुहूर्ते बावांचा प्रसाद व निरोप घेऊन ×× वर आलों. आज कूच जालें. ×× आसपास जात आहों. बायां कडील यशवंतराव शिवाजी येथें आले आहेत. त्यांची भेट काल जाली. अद्याप कोणता निश्चय जाला नाहीं. ठरल्यानंतर लिहून पाठवितों. आजचा मुक्काम कित्तूरच्या सरहद्देवर आहे. रवाना छ० १ जिल्काद. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० ५ जिल्काद सन तिस्सा तिसैन चैत्र शु॥ ६ गुरुवासर.

नं. ४८४६ श्रीशंकरप्रसन्न. ( चैत्र वद्य ५–७ एप्रिल. )

पै॥ छ० २२ सवाल सन समानतिसैन. चैत्र मास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं

पोष्य माधवराव अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. करवीरकर यानीं चहूंकडे हंगामा मांडिला आहे यास्तव त्यांचें तोंडावर आपण फौजसुद्धां जावें म्हणून सरकारचीं पत्रें गेलीं. हा मजकूर राजश्री शिवरामपंत याणीं आपणांस लिहिला आहे. त्यास श्रीमंतांची पत्रें आपणांस गेलीं त्यावरून आपण विचार काय केला हें समजलें पाहिजे. प्रस्तुत विचार पाहतां करवीरकरांचें माहात्म्य वाढत चाललें आहे. आपण काय योजना केली तें लिहून. कळवावें. रवाना छ० १९ सवाल. बहुत काय लिहिणें लोभ करावा. हे विनंती.

नं. ४८४७ श्री. ( ८ एप्रिल )

पै॥ छ० २ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना त॥ चैत्र शु॥ ३ इंदुवासरे मु॥ ऐनापूर यथास्थित असे. विशेष. येथील वर्तमान तर राजश्री बाळाभाऊ परवांचे दिवशीं महराजांचे लष्करास गेले आहेत. काली देवजी गौळी व महादजी भोंइटे व संताजी कदम असे त्रिवर्ग गेले आहेत. अद्याप आले नाहींत. आज बिनीवाले उगाराकडे घांट लष्कर उतरावयास तळ पहायास गेले आहेत. महाराजांचे लष्करास गेलेले आलेनंतर येथील कूच होऊन उगारावर जाणार. कुचाचा नगारा जाहला. कृष्णा उतरून मुक्काम करावा म्हणोन विनंती केली परंतु पार जाणेंची मर्जी नाहीं. मातुश्रीबाईस महाराजांकडे घेऊन जावें म्हणोन प्रतिपदेचे दिवशीं बहुत आग्रह रा॥ बच्याजी-

१ हें रास्ते यांचें ता० ७ एप्रिल स. १७९८ चें पत्र असून तें यथास्थळीं छापावयाचें राहिलें तें येथें छापलें. २ शिंदे बाया याच्या लष्करांतून गंगाधरराव गोविंद यांस पत्र मिरजेस.

पंत व बाजीपत याणीं केला, परंतु गेलीं नाहींत. आज इंदुवारीं प्रातःकाळींच बाईची स्वारी महाराजांकडे गेली. लष्करचा मुक्काम उगारावर गेला. पलटणें दौलतराव शिंदे यांचीं सांगोलेचे पुढें कडलास येथें आलीं म्हणोन बातमी आली. पठाण खानापुराकडे आहेत त्यांस आजच बोलावणें गेलें आहे. पलटणांकडे जाणें विशीं लिहिलें आहे. सतरखान याचा कारभारी येथें होता तोच गेला. रा॥ बाळाप्पा अण्णा विजापुराकडे गेले आहेत त्यांस पलटणांकडे येणेंविशीं पत्रें गेलीं. एक खंडी दारू पाहिजे म्हणोन मातुश्रीबाईनी सांगितलें आहे. मजलीस गेल्यावर सविस्तर सेवेशीं लिहितों. काल मेंढरें स्वारानी आणिलीं आहेत तीं देतों म्हणोन बाराभाईनीं करार करून बोलले आहेत. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८४८ श्री. ( चैत्र शु ० ४–९ एप्रिल. )

पै॥ छ ० ३ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

[1]विज्ञापना. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांचे शरीरीं बहुतच स्वस्थ नाहीं म्हणोन करवीरकरांचे बातमीत आहे. येथें येऊन सांगतात. स्वामीकडे पत्रें येत असतील. प्रकृति चांगलीच असेल. ल्याहावयाची आज्ञा जाहली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८४९ श्री. ( चैत्र शु० ४–९ एप्रिल. )

पै॥ छ० ३ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० ३ जिल्काद मुक्काम मोळवाड यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० १ मिनहूचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. बक्षीकडील आज दोन तीन दिवस पत्रें आलीं नाहींत. त्यांचे पत्राची मार्गप्रतीक्षा करीत आहेत. मातुश्री लक्ष्मीबाई काल इंदुवारीं महाराजांकडे गेली होती ते सायंकाळीं दोन घटका दिवसास स्वारी मुक्कामास आली. महाराजांनीं फराळाचें साहित्य केलें होतें त्यास बाईनें सांगितलें जे, आम्ही तुमचे घरीं कन्या दिली आहे. फराळ करीत नाहीं. इंदुवारीं संध्याकाळीं भोजन करीत असतात. निरशन उपोषण असतें. राजश्री बाळाभाऊ व महादजी भोईटे व सुभानराव कदम हे त्रिवर्ग काल स्वारीबरोबर आले नाहींत. तेथेंच राहिले आहेत. आज येतील असें बोलणेंत आहे.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र करवीरकरांच्या लष्करांतून नारो हरि करंदीकर याचें मिरजेस.

कृष्णादक्षिणतीरास आजच मुक्कामास एक दोन पथके जाऊन राहिले आहेत. भिरडीवर कही गेली होती. तेथें गोळागोळी होऊन लष्करचे कहीवाले दोन चार माणूस जखमी जाहले. कही माघारी आली. रविवारीं बाराभाई वगैरे यांणीं मेंढरें आणिलीं होतीं ती काय जिवंत हातास लागतील तीं देतों म्हणतात ! काल कांहीं थोडींबहुत धणगराचे स्वाधीन केलीं. आज देवजी गौळी याजकडे कारकून पाठविले होते त्याणीं सांगितलें कीं, काय मेंढरें असतील तीं सोडून देवितों. आतांच बाईकडून जासूद आला जे, मेंढके पाठवून द्यावे. मेंढरें सोडून देवितों. त्याजवरून पाठवून दिल्हे. मेंढरें फार करून मृत्यु पावलीं. ऐनापुरांत तेरदळाहून पन्नास प्यादे आणून ठेविले आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८५० श्री. ( चैत्र शु० ४–९एप्रिल )

छ ० ३ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

[1]विज्ञापना. काल मातुश्री बाई महाराजांकडे गेली होती. निरोपसमयीं तिघी बाईस पातळें दिलीं व एक घोडा व हत्ती येणेप्रमाणें महाराजानीं बहुमान केला. उभयपक्षीं बेलभंडार जाला असेंही सांगतात. महाराज कुमकेस पांच हजार फौज देतों असें बोलतात. काय घडतें पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८५१ श्री. ( चैत्र शु० ५–१० एप्रिल )

छ०८ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्र शु॥ ९ रविवार.

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० ४ जिल्काद पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्री॥ महारांजाच्या व बाया शिंदे यांच्या भेटी जाहल्या परंतु बीत बसत नाहीं म्हणून बाया कूच करून अथणीकडे गेल्या. अक्कल कोटाकडे जाणार म्हणोन वर्तमान आहे. बक्षी व गवळी व यशवंतराव शिवाजी पांच हजार फौजसुद्धां श्री॥ भाऊसाहेबांकडे बोलणेंयासीं गेले आहेत. मागाहून बायाही जाणार ऐसें ऐकितों. यास्तव सविस्तर बातमीचा मजकूर साकल्य लिहून जलद पत्र आलें पाहिजे. छ० ८ सवालापासून पत्रच आलें नाहीं. श्री॥ नानाही आचीर्य करीत आहेत. राजश्री मोरोपंतास सत्वर रवाना केलें पाहिजे. श्री॥ राजश्री दादासाहेबांस पत्र लिहून पाठविलें आहे. पाहून रवाना व्हावें अथवा दादा मिरजेस फौजसुद्धां आले असल्यास उत्तमच जालें. किल्याची

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ पत्र नानांचा कारकून बाळकृष्णपंत बाळ याचें मिरजेस बाळासाहेबांस.

हुशारी रात्रंदिवस करून बातमी वरचेवर येत असावी. श्री॥ नानांस तबखिले-करितां तंबाखू दहा पंधरा शेर चांगली आणविली होती ती मागाहून रवाना करितों म्हणोन आज्ञा आली होती. ती सत्वर आली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८५२ श्री. ( १० एप्रिल. )

पै॥ छ ० ८ जिलकाद सन तिस्सा तिसैन. चैत्र शु॥ ९ रविवार.

[3]सेवेशीं धोंडो बापूजी जोशी दोनीकर जोडून त्रिकाल चरणावरी मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र शु॥ ५ पावेतों बालकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब व आप्पासाहेब व अमृतराव व विनायकराव यांजला राजश्री नानानीं शु॥ २ रविवारीं रात्रीस मेजवानी केली. भोजन झाल्यानंतर श्रीमंत राजश्री बाजीराव व अमृतराव व नाना व चक्रदेव असे खलबतास बसले. चार घटिका बोलणें झालें. नंतर वस्त्रें व जवाहीर श्रीमंतांस दिलें. इतर असामी दहाजण समागमें होते त्यांस वस्त्रें दिलीं. याजप्रमाणें झालें. सर्व मजकूर राजश्री बाळकृष्णपंत भाऊनीं वडिलांस लिहिला असेल. सरकारचीं पत्रें श्रीमंत राजश्री भाऊसाहे-बांस व वडिलांस व दादासाहेब यांस व रास्ते व पंत प्रतिनिधि व गोखले यांस पत्रें लिहून सांडणीस्वाराबरोबर परभारीं रवाना केलीं असेत. भाऊनीं सांगितलें. खंडेराव दरेकर यांजकडील सरलष्करी हें पद काढून मोरे यांजला दिलें म्हणून पेशजी पत्रीं लिहिलें आहे, त्यास मानकरी याणीं सरकारांत कुंजरापाशीं दरेकर याचें पद काढूं नये असें बोलणें लाविलें. परंतु मानकरी यांचें बोलणें चाललें नाहीं. नबाबाची फौज श्रीपंढरपुरास रखवालीस होती. त्यास ( ती ) फौज सरकारांतून बायांकडे रवाना होणार यास्तव पंढरपूरवासी यांसीं आज्ञा कमावीसदार याणीं केली कीं, रखवाली व्हावयाची नाहीं. ज्यास सोय पडेल तिकडे जाणें; असें सांगितलें म्हणून बाजारवर्तमान बोलतात. आंगरे मामा शिंद्यांकडील नीरानजीक फौजेसमेत गेले. परंतु श्रीपंढरपुरपर्यंत रोखे वराता करून राऊत गेले ! तमाम मुलखांत रोखे केले. शु॥ ३ सोमवारीं बाळोबा यांस आणावयास एक पागा वगैरे सरंजाम अणावयास पाठविला. पंधरा लक्ष रुपये द्यावयाचा करार ठरला. तूर्त दहा द्यावे, पुढें पांच द्यावे, असें

---

१ आम्हीं तंबाकू पाठवा म्हणून तुम्हांस लिहिलें होतें. २ तुमचें लिहून आलें होतें. ३ गंगाधरराव गोविंद यांस पत्र पुण्याहून मिरजेस.

ठरलें म्हणून बाजार बोलवा आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८५३ श्री. ( चैत्र शु० ५-१० एप्रिल. )

पै॥ छ० ८ जिलकाद. सन. तिस्सा तिसैन. चैत्र शु॥ ९ रविवार.

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० ४ जिलकादपावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री बाबा काळे आपली जामीनगत काढावयासीं आले आहेत म्हणून पत्रीं लिहिलें, त्यास मशारनिल्हेचें जाणें सर्व ठिकाणीं! सरकारांतून श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांस टिपूवर जावयाची मसलत सांगणार. सरकारांत पैक्याची वोढ आहे. तूर्त भाऊनीं फौजेस पैका देऊन मसलतीवर जावें ही जिमा काळे करितात. त्या अर्थीं त्यांसीं बोलावें लागतें. स्वामींस येविषयींचा इतला यावा तर राजश्री मोरोपंत जाऊन बहुत दिवस जाले. अद्याप आले नाहींत. याजकरितां मशारनिल्हेची रवानगी सत्वर करावी. श्रीमंत भाऊसाहेबांकडे राजश्री नारायणराव बक्षी व देवजी गौळी व यशवंतराव शिवाजी पांच हजार फौज सुद्धां मुरगुडावर बायांकडून गेले म्हणून वर्तमान आहे. अलीकडे आपलें कांहींच पत्र आलें नाहीं. त्यास वरचेवर बातमी येत असावी. श्रीमंत पंतप्रधान बाबासाहेबांचें व श्रीमंत नानांचें खलबत राजश्री नारोपंतसुद्धां आरामबागेंत जालें. गोडीचा प्रकार आहे. व बाबासाहेब व अमृतरावसाहेब व आपासाहेब व विनायकराव नानाचे येथें चैत्र शु॥ २ रात्रीं भोजनास आले होते. बाबासाहेब व अमृतराव व श्रीमंत नानांची गोडी निखालसपणें नारोपंत यांजकडून जाहली आहे. परिणाम लागल्यास चांगलें आहे. शिंदे जात होते ते राहिले. बायाची गोडी जाहल्यावर जातील. राजश्री बाळोबा पागनीस यांस आणावयाकरितां दोन पलटणें नगरास जात आहेत. तो आल्यावर बीत बसेल असें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८५४ श्री. ( चैत्र शु० ६-११ एप्रिल. )

पै॥ छ० ८ जिल्काद. सन तिस्सा तिसैन.

विनंती सेवक बहिरोराम सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० ५ माहे जिल्काद पावेतों स्वामींचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. लष्करचें वर्तमान श्री॥ राजश्री भाऊसाहेब खुद्द फौजेसुद्धां दीक्षित स्वामींचें दर्शन घेऊन चळकोपाहून कूच करून वकुंद प्रांत कित्तूर मलप्रभातीरीं मुक्काम

१ बाळकृष्ण महादेव बाळ यांचें पुण्याहून पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

केले.आहेत. रा॥ धोंडोपंत दादा गोखले यांस भाऊसाहेब यांणीं शिरपेंच व कंठी बहुमान दिला. वस्त्रें देऊन संवदत्तीचें ठाणें घ्यावयास पथकसुद्धां रवाना केले. रांजश्रीनीं संवदत्तीस मोर्चे दिले ते तोफा लागू जाहल्या आहेत. त्वरेनें ठाणें हस्तगत होतें किंवा आठ चार रोज खाईल न कळे. श्री॥ राजश्री आपासाहेबानीं (राजे) बिदनूर घेऊन मिश्रीकोठास वेढा घातला होता तेंही ठाणें हस्तगत जाहलें. ठाण्यांची बंदोबस्ती करून एक मजल अलीकडे आले. एक दो रोजीं फौजेसुद्धां वडिलांस येऊन मिळणार. रा॥ राघोपंत भट नि॥ सरसुभा हे दोन हजार जमावानिशीं जुन्या हुबळीचे ठाण्यांत आहेत. त्या ठाण्यासही उपसर्ग करावयाचा मनसबा ( आहे. ) कित्तूरकर देसाई मुगुटखान हुबळीस आपले जमावानिशीं सडेनें आहेत. कुटुंब जांबोटीस पाठविला. घासदाणेचा ठराव करून घेतला आहे. त्यापैकीं थोडा बहुत ऐवज पोहोंचला आहे. वकील लष्करांत आहेतच. इतकें असून अंतरीं काय दरद खातात न कळे. सावधगिरीनें आहेत. लष्करची कही कबाड कित्तूर तालुकेंत येत असतात. कहीसरशी लहान सान खेडें याचा परामर्षही होतो. बागेवाडीहून लष्करचा मुक्काम चार कोसांवर आहे. कित्तूर तालुके बावेगाडी कर्यातीचीं खेडीं लगतच आहेत. कहीचा उपसर्ग होईल या न होईल भरंवसा नाहीं. लष्करांत पेंढार लुटार बहुत. कैदही सामान्य. राजश्री नारायणराव बक्षी गोकाक प्रांतीं हुणसीहाळनजीक मुक्काम आहे. चार हजार सुमार फौज बरोबर आहे. त्यांजकडून यशवंतराव म्हणोन सरदार भाऊसाहेबांचे लष्करांत आले आहेत. बक्षीसुद्धां भेटी होणार. तदोत्तर शिंदे बाया+

नं. ४८५५ श्रीगणपति. (चैत्र शु ० ७–१२ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. छ ० १ जिल्काद रविवारच्या आवशीचे तास रात्रीच्या रवानगीचीं पत्रें पाठविलीं तीं छ० ४ मिनहू बुधवारीं अस्तमानीं पावलीं. राजश्री नारो हरी करंदीकर याचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. “बायांच्या पीच्छावर नबाबाची वगैरे जमीयत रवाना होणार × × × रांचें सामान चालतें जालें. झैसकरानी मंगळवेढ्यास यवनाकरवीं व तांबोळी याजकरवीं उपद्रव अतिशय करविला आहे. कोणता महाल उपद्रवाशिवाय राहिला नाहीं. दिवस घालवावयाचें परम कठिण आलें” म्हणोन व डाकेस जासुद जोड्या पाठवावयाचा मजकूर लिहिला तो कळला. ऐसीयास कोणाच्या ही राज्यांत

---

+ हें पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें.

स्वस्थ अशी गोष्ट नाहीं. तस्मात् ईश्वराची इच्छा अशीच आहे. तेथें मनुष्याचा यत्न किती ? चिंता तरी कोठवर वहावी ? बायांचे पाऊल प्रांतांतून निघावें या योजनेंत आहों. डांकेचा मजकूर तर रान बहुत खवळलें आहे. डांक बसल्याचा बोभाट होईल. कागद पत्र निभावणार नाहीं. तादृश प्रयोजन ही नाहीं. रवाना छ० ६ जिल्काद. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० ९ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

नं. ४८५६ श्रीगणपति. ( चैत्र शु ० ७–१२ एप्रिल. )

[1]चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. आपण छ ० १ जिल्कादचीं पत्रें पाठविलीं तीं छ ० ४ मिनहूस पावलीं. नूतन व्याही व धोंडोबापूजी यांच्या पत्रांच्या नकला पहावयास पाठविल्या त्या पावल्या. मजकूर समजला. जिकडे तिकडे राजकारणें माजलीं आहेत ! श्रीसत्तेकरून शेवटास जाईल तें खरें. प्रजेचा भाग आहे. ईश्वरेंच संरक्षण करावें. सावनूर-करांच्या चिरंजीवाचा मजकूर लिहिला तो कळला. ध्यानांत आहे. रवाना छ ० ६ जिल्काद बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ ० ९ जिल्काद सन तिस्सा चैत्रमास.

नं. ४८५७ श्री. ( चैत्र शु० ८–१३ एप्रिल. )

छ०७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

विज्ञापना. आज मुक्काम व्हावयाचें कारण सुभानराव कदम गिरवीकर याची भावजई प्रसूत होत आहे म्हणून मुक्काम झाला. राजश्री नारायणराव बक्षी यांचें पत्र येईंजे पावेतों येथेंच मुक्काम करावा असें आहे. राजश्री बाळा भाऊ व करवीरकर यांचे मतें कूच करावें असें आहे. काल राजश्री बाबुराव आंग्रे यांचीं पत्रें बक्षीस व सर्वत्र मराठे मंडळीस अशीं

———————— मातुश्री बाईचे स ———————— मनो-

दयानुरूप ———————— आपण कूच करूं नये ————

———————— काय घडतें पहावें. उगारास घरें मात्र राहिलीं आहेत तेथें रखवालीस बलमदार आहे. मौजे कुसनाळ येथें दोन तीन घरें राहिलीं आहेत तेथेंही बलमदार आहे. मौजे कित्तूर येथें वस्ती आहे तेथें तीन स्वांर

---

१ पत्र परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. हे चाफेकर कारकून यानें बायांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस लिहिलें असून यांत मोकळी जागा सोडिली आहे तेथील अक्षरें कसरीनें खाल्लीं आहेत.

रखवालीस देविले. दर स्वांरास पोट व घोड्याचा दाणासुद्धां चार रुपये प्रमाणें केले. बारा रुपये दर रोज पडतात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ४८५८ ( चैत्र शु० ८–१३ एप्रिल )

बाबाजी विश्वनाथ चांफेकर यांचें शिंदे बायांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस पत्र. छ० ७ जिल्कादचें—

"राजश्री बाजीपंत निसबत करवीरकर बाईकडे आले. किंचित् खलबत करून मुक्काम करविला. आज मसलत काय करतात ते पहावी. तिसरे प्रहरीं महाराजांकडून चव्हाण अगर घाटगे येतात. मसलतीचें बोलणें होत असतें. करवीरकर महाराज करवीरास जात नाहींत. ऐनापूरचे मुक्कामास गेलियावर सडे होणार असें बोलतात."

नं. ४८५९ श्री. ( चैत्र शु० ९–१४ एप्रिल )

पै॥ छ० १३ जिल्काद. चैत्र मास. सन तिस्सा तिसैन.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं—

अपत्यें रामचंद्र श्रीधर काळे शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता।। छ० ८ जिल्कादपर्यंत पुणें येथें वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असे. विशेष. वडिलांचें छ० २६ सवालचें आशीर्वादपत्र पाठविलें त पावलें. परवां सहावे तारखेस पावलें. "ती॥ राजश्री बाबासाहेब निघोन सैन्यांत गेले व बायांचें आणि करवीरवासी महाराज यांचें वैमनस्य बक्षी तीर्थस्वरूप भाऊसाहेबांकडे गेले याजमुळें आलें; व प्रांताची कांहीं बाकी राहिली नाहीं; पठाण आरगेवर येऊन उतरून तमाम मुलूख मारितात;" म्हणोन वडिलीं विस्तारें लिहिलें, आणि पत्र येत नाहीं म्हणोन शब्द ठेवून लिहिलें तें कळलें. त्यास मी येथें आलेपासून एक दोन पत्रें पाठविलीं. पावलीं नसतील. मी येथें ज्या कामासाठीं आलों तें कार्य वडिलांचे आशीर्वादें जाहलें. श्रीमंतानीं जामीनगत मोकळी केली. वाडलांस कळावें. या उपरी निघोन यावें तर श्रीमंत राजश्री पंतप्रधान व नाना याणीं "तूर्त जाऊं नका. भाऊंकडील कितेक बोलणीं जाहलीं पाहिजेत. नजरेचा ऐवेज भाऊंकडे येणें त्याचा उलगडा जाहला पाहिजे, त्यास भाऊंकडील कोणीच येथें नाहीं. मंडळी आहे ती रास्ते यांचे घरीं पेंचांत आहे. यास्तव दुसरा भाऊंकडून बोलणार येई तावत्पर्यंत जाऊं नका;" ऐसें स्पष्ट सांगितलें. त्यावरून राहिलों. वाडिलांसही त्याप्रमाणेंच लिहून पाठविलें आहे. जसें उत्तर भाऊंसाहेबांकडून येईल तैशी वर्तणूक करीन. वडिलांस कळावें. इकडील वर्तमान तर इंग्रजानें टिपूवर मसलत केली. नबाबही पूर्ववत् प्रों कुमक करितात. सरकारची फौज

गेली नाहीं. इंग्रजाची सरकारांत फौजेविशीं बहुत निकड. त्याजमुळें श्रीमंतानीं ती॥ राजश्री भाऊसाहेबांस लिहून पाठविलें आहे कीं, आपली फौज टिपूवर पूर्ववत् प्रमाणें जाऊं द्यावी. ऐशीं मुद्दाम पत्रें पाठविलीं. सरकारचे जासूद गेले त्यांजबरोबर मीही वडिलांसे लिहिलें आहे कीं, श्रीमंतानीं कृपा करून मसलत सांगितली आहे ती अमान्य करूं नये. मान्य करावी. सरंजाम मोठा जाहला पाहिजे, तर सोई सोईनें होईल. सरदेस जाऊन टिपूच्या मुलखांत शिलशिला लावावा. ऐशी सूचना लिहिली आहे. मग कसें करितात पहावें. इतकी फौज घेऊन वारा खात सरकारकाम नसतां अंगावर बाळगून हिंडावें त्यापेक्षां सरकारकाम, होय म्हणावें. मग सरंजामा सरबरा फौजेचा जाहला म्हणजे चालतेही होतां येईल; ऐसें मी चित्तांत आणून भाऊसाहेबांस लिहिलें आहे. मग कशी मर्जी होती पहावी. सावनूर तालुका सरकारचे परवानगीशिवाय घेतात. मसलत सरकार सांगतें त्याअर्थीं मग तालुकेविशीं बोलणार नाहींत; आणि नजरेच्या ऐवजासाठींही रदबदल चालेल ऐसें आहे. मग काय करितात पहावें. आपणास कळावेंकरितां लिहिलें आहे. मी नित्य श्रीमंतांकडे जात असतों. तैसेंच नानाकडेही जात असतों. नाना मला रोज विचारतात कीं, करवीरवासी व बाया बक्षी यांजकडील बातमी दिनचर्येची येत असावी, ती तुमची येत नाहीं हें काय ? तेव्हां मी उत्तर केलें कीं आज एक मास जाहला, तीर्थस्वरूप रा॥ भाऊसाहेबांकडून पत्रच येत नाहीं. मग बातमी कशी सांगावी ? त्यांत मी आलों होतों एका कामास, तेव्हां मजकडे बातमीचीं पत्रें काय म्हणून येतील ? म्हणून विनंती केली. तेव्हां उत्तर जाहलें कीं, वरचेवर पत्रें बातमीचीं आणवीत जाणें. त्यावरून विनंती लिहिली आहे. करवीरकर व बायांच्या सैन्यातील अधिक उणी बातमी वडिलांकडून येथें राजश्री धोंडोपंत जोशी यांजकडे लिहिली येत असावी म्हणजे मलाही कळेल. आणि जोशी सरकारांतही कळवितील. मी येथें आलेपासून भाऊसाहेबांकडून पत्रच येत नाहीं याजमुळें कांहींच समजत नाहीं. ती॥ जनोबा सुभेदार वगैरे मंडळी येथें गुंतली आहे ती विना ढेंकणे आलेशिवाय मुक्त होत नाहींत. श्रीमंतानी ढेंकणे आलेशिवाय मंडळी सुटत नाहीं म्हणोन सांगितलें. वडिलांस कळावें: मिरज प्रांतांत दंगा असतां वडिलीं बाबासाहेबांस कसा निरोप दिल्हा ? अपूर्व भासलें. भाऊसाहेबांची शरीर प्रकृत कशी आहे ती लिहून कळवावें. इकडील राजकीय वर्तमान तर शिंदे माघारे आले. विना बायांची समजूत झालेशिवाय जात नाहींत. रा॥ तात्या पागनीस यांसही नगराहून आणविले

आहेत. दोन चार दिवसांत शिंदे याचे घरीं यावेसे आहेत. ती॥ भाऊसाहेबानीं कर्नाटकचे मसलसीस जाऊं नये, ती॥ रा॥ आप्पासाहेबानीं जावें, ऐसें ठरलें आहे. देशीं दंगे बहुत आहेत. करवीरकर यांस तंबी द्यावयाची आहे. त्यास भाऊ असल्याशिवाय कांहीं व्हावयाचें नाहीं; ऐसें ठरून आप्पासाहेबानीं स्वारीस जावें ऐसें ठरलें आहे. त्यांत सिद्धीस जाईल तेव्हां खरें ! दौलत सरकारची गारद व्हावयाचा सुमार आला आहे. लक्ष्मीनें हातचें सोडलें आहे. प्रांत अगदीं बुडाला. कोणास कोणी पुसत नाहीं अशी अवस्था जाहली आहे. यांत काय परिणाम लागेल तें खरें ! आज श्रीमंतांपाशीं मुखत्यार चक्रदेव आहेत. चक्रदेव याणीं श्रीमंत नानांकडे यावें, सर्व वर्तमान सांगावें, येथील कांहीं ऐकोन घ्यावें, आणि दिनचर्या ढकलावी ! नानांपाशीं बजाबा मुखत्यार आहेत. चक्रदेवापाशीं चिमणाजी खंडेराव म्हणोन जाधवाचा कारकून आहे तो आजचे प्रसंगीं कोणत्या कामांत नाहींत असें नाहीं. बाकी कोठें कांहीं देवपूजा नाहीं. शिंदे यांचे घरीं चिटणीस मंडळ आहे त्याचेंही कांहीं चालत नाहीं. पुढें काय होतें पहावें. पंढरीस मोंगलाकडील फौज आहे त्यांत म्हैसकर आहेत. ती फौज भाऊसाहेबांकडे मिळवावी ऐसें ही बोलणें नानांचें आहे. मिळवावयाचें कारण करवीरवासी यांचें पारिपत्य करावें ऐसें बोलणें आहे. यांत काय घडतें पहावें. आणखी अधिकोत्तर लिहावेंसें नाहीं. कळावें. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. ती॥ राजश्री केसोपंत दादास पत्र लिहिलें आहे तें पावतें करावें. ती॥ रा॥ भाऊसाहेबांकडे लाखोटे पाठवावयाचे पाठविले आहेत ते पुढें पोंचते व्हावे. लाखोटे फार दिवस राहूं नये. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८६० श्री. ( चैत्र शु० ९-१४ एप्रिल. )

पै॥ छ० १२ जिल्काद. चैत्रमास. तिस्सा तिसैन.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ ८ जिल्कादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष स्वामीनीं छ० १ जिल्कादचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळों आला. "महाराज व बाया एकत्र होऊन सर्व प्रांतांत व मिरजप्रांतांत अनेक प्रकारचा उपद्रव केला आहे तो पत्रीं लिहितां येत नाहीं. सर्व प्रांताची वस्ती उठली. पुढें लावणी होणें कठिण. महाराजांच्या व बायांच्या भेटी जाहल्या नव्हत्या त्यापूर्वीं पत्रें लिहीत गेलों. पत्राचें उत्तर ही न येई त्यापक्षीं सरकारांतून उपेक्षा जाली असें दिसोन आलें. हल्लीं महाराजांचा मुक्काम इंगळीवर आहे. बाया येडूरमांजरीवर

आहेत. बायानीं वडिलांकडे बोलणेंयाचा नाद लावून बक्षी वगैरे सरदार वडिलांकडे गेले आहेत. प्रतिपदेच्या भेटी आहेत. वडिलांचें पत्र आलियावर सविस्तर लिहूं. राजश्री चिंतो आत्माराम नि॥ शिंदे फौजसुद्धां सांगोलें याजवरें आहेत. महालास उपद्रव केला आहे व राजश्री बजाबाचे वरातेविशीं मंगळवेढें यास तसदी आहे. चि॥ राजश्री रामचंद्रपंत आप्पानीं सावनूरचे तालुक्याचें काम आटपून मिश्रीकोटच्यावर आले आहेत. आजपावेतों वडिलांजवळ आले असतील. चतुरसिंग भोसले यास रास्ते याणीं लुटून घेतलें. आजपावेतों समेट होतो म्हणून होतें. आतां प्रांत खराब जाला. अद्यापिही सरकारांतून बंदोबस्त होत नाहीं! अबरूशीं गांठ पडली आहे. श्री रक्षील ती खरी !" म्हणून विस्तारें लिहिलें तेंच पत्र श्री॥ नानांस दाखविलें. ( त्यानीं ) अक्षरशः वाचून पाहिलें. महाराज व बाया एक जाहल्या याचा बंदोबस्त करावा असें सरकारांत ठरोन राजश्री दौलतराव शिंदे यांजकडील राजश्री बाबूराव आंगरे व राजश्री गोपाळराव चिटणीस वगैरे सरदार फौज पलटणें तोफांसुद्धां रवाना जाले व नबाबाकडील सरदारांस पत्रें रवाना जालीं कीं तुम्हीं फौजसुद्धां महाराजांचे व बायांचे बंदोबस्ताकरितां जावें. व श्री॥ भाऊसाहेबांस सरकारचें पत्र रवाना जालें. या सर्वांनीं मिळोन महाराजांचा व बायांचा बंदोबस्त करावा. स्वामींस व दादांसही सरकारचीं पत्रें रवाना जालीं तीं सत्वरच येऊन पावतील. शिंदे यांजकडील फौज पलटणें नीरेच्या पुलावर आहेत. राजश्री आंगरे परवां माघारे आले आहेत. मागती फौजेंत जातील तेव्हां खरें ! राजश्री बाळोबा पागनीस यांस नगराहून आणविले आहेत तेही एक दोन रोजांत शिंदे यांजकडे येतील. पागनीस आल्यावर बायांचा समेट व्हावा असा बेत आहे. आल्यावर सर्व विचार कळेल तो सेवेशीं लिहून पाठवितों. छ० २४ व छ० २७ सवालची पत्रें श्री॥ नानांस व मजला पाठविलीं त्याचीं उत्तरें मागाहून लिहून पाठवितों. वडिलांकडे बक्षी गेले होते त्यांचा मजकूर तेथें काय ठरला तो सविस्तर लिहून पाठवावयाची आज्ञा व्हावी. वडिलांकडून रा॥ हरबा धायगुडे फौजेसुद्धां मिरजेस आले होतें ते श्री॥ बाबास घेऊन वाडिलांकडे गेले म्हणून वर्तमान ऐकलें तें लिहून पाठविलें पाहिजे. श्री॥ नानांस[1] तंबाखू चांगली पाठविली आहे म्हणून पत्रीं आज्ञा आली, परंतु ( तंबाकु ) आली नाहीं. ती सत्वर रवाना जाली पाहिजे. दळदार पानाचीं तंबाखू पांनेंच रवाना करावीं.

---

१ नाना फडणवीससुद्धां तंबाकेचे भक्त होते एकण ।।।

डेंरें पाठवूं नयेत. वडिलांचा मुक्काम मुरगुडावर आहे. त्यांजकडील साकल्य व राजे व बायांकडील ख़ातमी वरचेवर येत असावी. राजश्री मोरोपंताची रवानगी जाहलीच असेल. मार्गाची सोय पाहून रवानगी सत्वर जाली पाहिजे. स्वामीनीं व श्री॥ दादानीं फौजेसुद्धां शहरचा व किल्याचा बंदोबस्त सर्व सरंजामानिशीं करून रात्रंदिवस हुशारी असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८६१ श्रीगणपति. ( चैत्र शु० ९-१४ एप्रिल. )

अपत्यें रामचंद्रानें दोनी कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ८ जिल्कादपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलांकडून अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर सदैव पत्रीं सांभाळ करावा. यानंतर मी वडिलांची आज्ञा घेऊन सावनूर तालुक्यांत ठाणीं घालावयाकरितां गेलों होतों. वडिलांच्या आशीर्वादें हुबळीशिवाय बाकीचीं झाडून ठाणीं पडलीं. हुबळीस बसावें तर आंत जमाव हजार बाराशेंपर्यंत आहे. त्याहीवर आमच्या फौजेस खर्चास नाहीं. या गवगव्यामुळें शहास पडलों नाहीं. ती॥ राजश्री विठ्ठलरावबाबा आपल्या फौजेसुद्धां त्यांच्या रखवालीस राहिले आहेत. मी सावनूर तालुक्यांतून येऊन चार पांच रोज झाले. काल मंदवारीं वडिलांची भेट जाहली. त्यावर कूच करून काल मुरगोडाच्या नजीक कोसावर मुक्काम जाला. आज कूच करून शिवापुरास ओढ्यावर जाणार. वडिलांची आज्ञा मला फौजेसुद्धां अघाडीस बारी उतरण्याविशीं, परंतु फौजेस खर्चास नाहीं याजमुळें जाणें होतां दिसत नाहीं. एक दोन रोजीं वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री दीक्षितबाबा यांच्या दर्शनास जाणार. त्यांचें दर्शन झाल्यानंतर सडे होऊन लवकरच बारी उतरावें हा मानस आहे. यांत काय आपल्या आशीर्वादें घडेल तें खरें. वडिलांची प्रकृत बहुतच क्षीण झाली आहे. पंडितरायांचा उपाय चालला आहे. दीक्षित बावांच्या आशीर्वादें आरोग्य होईल. बारीपलीकडे यावें हा विचार आहे, परंतु गवगव्यामुळें कूच होत नाहीं. मोठें अवघड पडलें आहे. त्यांतही कशी तरी तोड पाडून समजी करून बारीपलीकडे येत आहें. लढाईचा प्रसंग बनल्यास श्रीनें रक्षावें ! तिकडील सविस्तर आज्ञा केली पाहिजे. वडिलांचें सामर्थ्य अगदीं राहिलें. स्नानसंध्या निजूनच करितात. श्रीचें अर्चन मात्र सांग होतें. कळावें. बावांचा पूर्ण आशीर्वाद आहे. आरोग्य होईल. सारांश रोग नाहीं. परकृत पीडा आहे. काळजी मोठी आहे. विदित होय हे विज्ञापना.

पै॥ छ० १६ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

नं. ४८६२ श्री. ( चैत्र शु० ९—१४ एप्रिल. )

छ० ८ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं विज्ञापना. काल कूच व्हावयाचें दोन्ही लष्करचें होतें. परंतु बायांकडील राजश्री सुभानराव कदम याची भावजई प्रसूत झाली याजमुळें त्यांचा मुक्काम जाहला. प्रसूत होऊन तीन रोज झाले. पांच दिवस गुंता आहे. पांचवी झालवर कूच होणार असें बोलतात. इकडील कूच त्यामुळें —— —— राहिलें. आज रामनवमी. वडि —— —— —— परवां भौमवारीं कूच ——————चें आहे. मागाहून —— —— ——पाठवितों. राजश्री नारायणराव बक्षी यांची भेट होऊन अद्याप वर्तमान आलें नाहीं. तासगांवाकडे पठाण आहेत त्यांजवर रास्ते याणीं छापा घातला असें वर्तमान आहे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचा मुक्काम कित्तूर प्रांतांत आहे व धोंडोपंत गोखले सौंदत्तीस वेढा देऊन बसले आहेत. श्रीमंत राजश्री आपासाहेब हुबळीस आहेत म्हणोन ऐकतों. त्यास स्वामींकडे वर्तमान असेल तें कळवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय. हे विज्ञापना.

नं. ४८६३ श्री. ( चैत्र शु० ९–१४ एप्रिल. )

पै॥ छ० ८ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ८ जिल्कादपावेतों मुक्काम मौजे मोळवाड यथास्थित असे. विशेष. काल करवीरकरांकडोन नागोजी घाटगे व बचाजीपंत आले होते. सौंदत्तीस राजश्री धोंडोपंत आले होते. गोखले याणीं वेढा घातला आहे, पेठ लुटली, याप्रमाणें पत्रें आलीं, तींच मातुश्रीबाईस दाखविलीं; आणि बोलले जे, राजश्री नारायणराव बक्षी आमचें बोलणें बोलावयासी गेले असतां हें कसें झालें ? येविशीं महाराजांची मर्जी खट्टी आहे. आज दोहीं लष्करांचा मुक्कामच आहे. उद्यां कूच व्हावें असें आहे. काय घडतें पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८६४ श्री. ( चैत्र शु० ९–१४ एप्रिल. )

पै॥ छ० १० जिल्काद. सव तिस्सा तिसैन. चैत्र मास.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

---

१ बायांच्या लष्करांतून फडकेकरांचें पत्र. यांत जेथें मोकळी जागा आहे तेथचीं अक्षरें कसरीनें खाल्लीं आहेत. २ पत्र बायांच्या लष्करांतून.

विनंती सेवक रामाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ८ जिल्काद रविवार सायंकाळपावेतों स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री नारायणरावराजे घोरपडे मुधोळकर हे पुण्याहून येथें आले आहेत. समागमें दोनशें स्वार व दोनशें आरब आहेत. शिवाय वरचेवर लोक राऊत जमा करितात. त्यांची मसलत मुधोळ वगैरे पंचमहाल ठाणीं घालावीं. येविशीं पुण्याहून हुजूरचीं पत्रेंही आहेत म्हणतात. "कुमकेविशीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचें पत्र राजश्री भास्करपंतनाना[१] यांस आणिलें. त्यांजकडे कारकून पाठविले आहेत. काम पडल्यास तुम्हीं थोडी बहुत कुमक ठाणेंपैकीं दिली पाहिजे. शीव शेजारीं वास्तव्य. समयास उपयोगीं पडावें." अशीं कितेक प्रकारचीं बोलणीं नारायणराव यांचीं आहेत. मीं त्यांस उत्तर केलें, ठाणेंत शिबंदीही सरसुभारांत आहे. सांप्रत काळ चहूंकडे दंगा. मिरजेस श्रीमंतांकडेस विनंती लिहून आज्ञा होईल त्याप्रमाणें आपणास कळवीन; असें सांगितलें. परंतु त्यांचें म्हणणें येविशीं वचन असावें. ऐसें म्हणतात. याजकरितां सेवेशीं विनंती लिहिली आहे. आज्ञा होईल तसें करीन. राजश्री महाराव घोरपडे याणीं मुधोळांत जमाव बराच केला आहे. नारायणराव जातांच लढाईचें तोंड लागणार. नारायणराव यांजकडून काम न रेटल्यास बाया शिंदे यांची ही फौज कुमकेस येणार अशी योजना दिसते. मग काय घडतें पहावें. सविस्तर वर्तमान सेवेशीं कळावेंकरितां विनंती लिहिलें आहे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांजकडून लाखोटे वकुंदचे मुक्कामाहून आले ते राजश्री मुकुंदपंत भिडे[२] यांजकडे ( बायांच्या ) लष्करास रवाना केले. बहुत काय लिहिणें सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८६५ श्री. ( चैत्र शु० ९-१४ एप्रिल. )

पै॥ छ० १३ जिल्काद. चैत्रमास. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं बालकृष्ण महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ८ जिल्कादपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. सरकारचें व श्रीमंत नानाचें अशीं पत्रें श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांस बाबा काळे यांजबरोबर रवाना जाहलीं. टिपूसुलतान याचा तह पेशजी श्रीमंत व इंग्रज व नबाब या तिहीं सरकारांसीं जाहला हें ठाऊक सर्व आपणास आहेच. अलीकडे टिपूनें फरांचिसाशीं संधान केलें कीं, तुम्ही फौजेसुद्धां आम्हांजवळ पावावें व जलमार्गानेंही सरंजाम आणावा. हें वर्तमान इंग्रजास समजलेवरून

---

१ पत्र तेरदाळाहून. २ सबदेव. जमाबिंदीचे मामलेदार.

इंग्रजांनीं जलमार्गाचा बंदोबस्त फराशीस न येण्याचा केला. व टिपूस ही फरासीस तुम्ही आणवितां हें सुचविलें. आणि इंग्रजांनीं सर्व सरंजामाची तयारी करून व नबाबाकडून फौज सामलातीस घेऊन टिपूचे प्रांतांत उपद्रव करावयासी गेले. कोडेंयाल[1] बंदरावर इंग्रजाच्या व टिपूच्या लढाया सुरू जाहल्या. तीन सरदार टिपूकडील इंग्रजांनीं पाडाव केले. व लढाईंत टिपूस नामोहरम केलें. सरकारची फौज टिपूचे बंदोबस्तीस रवाना करावी म्हणून इंग्रजांचीं पत्रें व येथें वकील आहेत त्यांची निकड. याजकरितां राजश्री रामचंद्रपंत यांस फौजसुद्धां रवाना करावें, आणि टिपूचा मुलखात उपद्रव करावा, याप्रमाणें ( भाऊंस पत्रें ) रवाना जाहलीं. टिपूनें तिहीं सरकारांसी बिघाडाची सुरत दाखविली त्यावरून टिपूकडील वकील लावून दिले. हा मजकूर आपणास कळवावा म्हणून श्रीमंत राजश्री नामा स्वामीनीं आज्ञा केलेवरून लिहिलें आहे. स्वामींसही काळे मजकूर कळवितील. व वडिलांकडूनही पत्र येईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. बाबा काळे याणीं पत्रें पुढें रवाना केलीं. ते अद्याप येथेंच आहेत. निघोन गेले म्हणजे लिहोन पाठवितों. हे विज्ञापना.

नं. ४८६६ श्री. ( चैत्र शु० ९–१४ एप्रिल. )

पै॥ छ० ११ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक देवेजी कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० ८ जिलकादपर्यंत स्वामींचे कृपें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामीचे मुक्काम वकुंद्रावर आहे. प्रांत शहापूर[2] तालुका पेठ व तालुका गड येथील दिगर गांवास घासदाण्याच्या चिठ्या व राऊत गारदी मसाला रोखे घेऊन येऊन येथें न येतां परभारें गांवचे कमावीसदार पाटील कुलकर्णी रयतांस हाणमार अनर्थ करून कंबरखोली मसाला घेतले. प्रांताचा बोभाट भारी पडला आहे. राउतांबरोबर कारकून राजश्री आनंदरावभाऊचे भाचे आहेत. शंभर स्वार आहेत. परकीय स्वार असते तर येथून ताकीद केली असती. निमित्त ठेऊन लष्करास जाऊन आणखी स्वार आणतों म्हणतात. येविशीं स्वामीनीं श्रीमंतांस पत्र पाठवून स्वार उठून जातसें केलें पाहिजे. चिठ्या केल्या आहत त्यांतील एक नक्कल सेवेशीं पाठविली आहे. खेडेकरांचे श्राप लिहून पुरवेना! उन्हामध्यें उभे करून दगड देऊन मार देतात. दोन रोजांचे

१ मंगलोर. २ पत्र शहापुराहून.

फुरसत नाहीं ! साहेबांची फौज, प्रजा स्वामीची, याप्रमाणें घडलें आहे ! येविशीं आज्ञापत्र राजश्री गणपतराव आपास पाठवून दिल्यास श्रीमंतांस स्वामींचें पत्र प्रविष्ट करोन निरुपद्रव करितील. सेवेशीं अधिकोत्तर लिहिणें शक्त नव्हे. हे विज्ञापना.

नं. ४८६७ श्री. ( चैत्र शु० १०–१५ एप्रिल. )

छ० ९ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं बाबाजी विश्वनाथ. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना मातुश्री बाईनीं देवपूजेकडे बेलफूलतुळशी आणावयाकरितां स्वामींस पत्र देऊन भोयास पाठविलें आहे. लिहिलेप्रमाणें बेल वगैरे देवावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८६८ श्री. ( चैत्र शु० १०–१५ एप्रिल. )

राजश्री गंगाधरराव गोसावी यांसी.

स्ने॥ लक्ष्मीबाई शिंदे. दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष देवपूजेकडे बेलफुल व तुळसीकरितां भोई निसबतसरकार पाठविले आहेत. यांजकडे देऊन पाठविणें. रवाना छ० ९ जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती

मोर्तब
सुद

पै॥ ९ जिल्काद.

नं. ४८६९ श्री. ( १५ एप्रिल. )

पै॥ छ० १३ जिल्काद. चैत्र मास. तिस्सा तिसैन.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र शु॥ १० पावेतों वर्तमान बालकांचें यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळोबा पागनीस यांजला नगरास आणावयास यादो भास्कर शिंदे याणीं पाठविले आहेत. त्रयोदशीसुमारें येणार याजप्रमाणें आहे. परंतु चार दिवस किल्ल्याखालींच रहावें, दुसरें पत्र पाठवूं तेव्हां घेऊन यावें, असें शिंदे याणी यादो भास्कर यांस लिहिलें म्हणून बाजार वर्तमान आहे. परंतु यादो भास्कर आणावयास गेले त्यापक्षीं चार दिवस अधिक उणे ( लागतील; परंतु ) बाळोबास घेऊन येईल, असेंही बोलतात, राजश्री बाबूराव आंग्रे मामा

१ गंगाधरराव गोविंद यांस पत्र. पुण्याहून.

नीरेच्या पुलाजवळ आहेत. मामा आंगरे सडे मात्र शिंदे याणीं बोलावून लष्करांत आणिले. दोन रोज जाले. फौजेंत गोपाळराव आहेत. तमाम गांवांवर रोखे करितात. जेजुरीपासून चार हजार रुपये घेतले. श्रीपंढरपुर-पावेतों रोखे केले याजप्रमाणें वर्तमान आहे. श्रीमंत राजश्री बाजीराव साहेब व नाना ( यांचें ) विश्रामबागांत खलबत जालें. आज चार रोज श्रीमंत नाना व चक्रदेव यांचें जालें, नंतर चक्रदेवही उठोन गेले. मग श्रीमंत आणि नानांचेंच खलबत चार घटिका जालें. कळावें. राजश्री नानांची प्रकृत बरीच आहे. नित्य श्रीविष्णूस जाऊं लागले. स्नानही करूं लागले. दिवसेंदिवस शरीर प्रकृत बरीच आहे. पिरूसाहेब फिरंगी याणें आपला गुमास्ता शिंदे यांजपाशीं ठेविला ( त्याच्या ताब्यांत ) पलटणें सात. त्याजला त्याणें हिंदुस्थानांतून पत्र पाठविलें त्याजवरून तो कंपू पलटणें सात घेऊन निघोन तोफांसमेत गेला. आज चार रोज जाले. दरकूच जात आहे. रा॥ लखबा नानानीं हिंदुस्थानांत शिंदे यांजकडील अंबोजी इंगळे याजला कैद केले असेंही बाजार वर्तमान आहे. कळावें. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८७० श्रीशंकर प्रसन्न. ( १५ एप्रिल. )

पै॥ छ० २६ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत चैत्र वद्य १० दशमी पावेतों यथास्थित असे. विशेष. अलीकडे आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर साकल्य लिहावें. यानंतर प्रस्तुत राजश्री भाऊंचा फौजसुद्धां मुक्काम कोठें आहे ? पाच्छापुरानजीक मुक्कामचें आपलें लिहिणें आलें त्याअलीकडे कोणता सुमार आहे व बायांचा व महाराजांचा मुक्काम कोठें आहे ? राजश्री नारायणराव बक्षी यांची भेटी न होतां माघारे आले त्याचा मतलब काय ? येऊन पुढें अर्थ सिद्ध कोणता केला आहे ? येविशींचें लिहून कळवावें. पुण्याकडील वर्तमान तर राजश्री बाळोबा पागनीस येऊन छ० १६ रोजीं भेटी झाल्या. पुढें विचार होऊन कसा अर्थ ठरतो तें पहावे. हे आल्यामुळें श्रीमंतांची मर्जी ही शिंदेप्रकरणीं ठीकशी नाहीं म्हणोन ऐकण्यांत आहे. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४८७१ श्री. ( चैत्र शु० १०–१५ एप्रिल. )

छ० ९ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

विज्ञापना. सावनूर तालुक्यांतील झाडून ठाणीं पडलीं. श्रीमंत राजश्री आपासाहेब फौज सुद्धां काल सावनूरचे मुक्कामीं आले. मिश्रीकोटचे सुमारें येऊन तें ठाणें हस्तगत करून श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांजकडे लष्करांत जाणार. तूर्त हुबळी अद्यापि मधीं राहिली आहे. तिकडे राजमंडळकर व शिंदे यांच्या बार्यांच्या भेटी होऊन कांहीं शिलशिला लावला आहे म्हणोन वर्तमान आहे. तरी सविस्तर लिहावयाची आज्ञा झाली पाहिजे. राजश्री धोंडोपंत गोखले नरगुंदास खुद्द आहेत. फौज व चिरंजीव थोरले भाऊसाहेब यांजवळ आहेत. दोन पलटणें सरसुभा ( यांजकडून ) कुमक आली तीं गोखले यांजवळ नरगुंदास आहेत. आणखी फौज कांहीं ठेवीत आहेत. हरपनहळ्ळी तालुका काटकानीं घेतला. टिपूचा अंमल तूर्त उठला आहे. त्यांची फौज येणार म्हणतात. काय होतें पहावें. मिरजेचे सुमारें स्वारी भाऊसाहेब यांची लौकर येणार आहे. सेवेशीं श्रुत हे विज्ञापना.

नं. ४८७२ श्री. ( १५ एप्रिल. )

पै॥ छ० १३ जिल्काद. तिस्सा तिसैन. चैत्रमास.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना चैत्र शु॥ १० वर्तमान क्षेम. विशेष. श्रीमंतानीं सावकार बोलावून नेऊन कर्ज ऐवज मागितला. परंतु सावकारानीं कबूल केलें अशी गोष्ट जाली नाहीं. कालपासून दोन चार जागां सावकारांकडे कर्जपट्टीस्तव सरकारांतून प्यादे बसले. राजश्री बापूजी[1] नाईक भावे यांजकडे काल प्यादे आबा काळे[2] याचे बसले होते. संतोष-पट्टीही होणार असेंही बाजार वर्तमान आहे. संतोषपट्टी पेशजी निम्मे उगवली. निम्मे गांव बाकी राहिला आहे त्याजपासून घ्यावी असा बेत दिसतो असें बोलतात. श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री ताई सुखरूप आहेत. वाड्यांत आईनीं दोन चार वेळां भोजनास आणलीं होतीं. हल्लीं चांदवडांस व शिक्यास बट्टा दरसद्दे रुपये ६।=सव्वा सहा रुपये चवल आहे. आजपर्यंत कहीं बाहेर गांवीं होत होत्या. त्यास अलीकडे चार रोज गांवांत किरकोळ कोठें कोठें वैरणीस उपद्रव लागूं लागला. याउपर कह्याही होतील ! राजश्री बाबा काळे याणीं उत्तरं दिलीं तीं पाठविलीं. अजुरा करून गडी पाठविला आहे. वडिलांपाशीं कधीं पावतो तें ल्याहावें व तेथें बैठक गड्याची पडों नये. पडल्यास पोटास ज्याजती मागेल यास्तव वडिलीं सत्वरच रवानगी करावयास आज्ञा करावी. हल्लीं अजुरा

१ बाळकृष्ण लक्ष्मण लागू मामलेदार शिरहट्टी यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र. पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ गंगाधरराव गोविंद यांस पत्र.

रु॥ २॥। पावणे तीन रुो करून पाठविला आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८७३ श्रीगणपति. (१५ एप्रिल.)

[1]चि॥ राजश्री बळवंतराव यांसीं प्रति परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी येथील जासुदाबरोबर छ० २८ सवालचीं पत्रें पाठविलीं तीं छ० २ जिल्कादीं पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बितपशील—

चि॥ राजश्री विठ्ठलराव यांचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. चिरंजीवाच्या लिहिण्यांतील भाव पहातां प्रकृतीचा व स्मृतीचा भाव ठीक दिसत नाहीं. मार्ग सुलभ जाल्यानंतर त्यास आणवावयाची तरतुद करावी. कलम १

इंग्रजांची पलटणें घांटाखालीं आहेत त्यांत लिटली सरदार आहे म्हणोन लिहिले तें कळलें. घांट चढून आले किंवा नाहींत याची बातमी असेलच कलम १

चिरंजीव राजश्री हरिपंत बाबा येथें येऊन पोंचले, व आम्ही मुरगुडास गेलों होतों तेथून निघून कित्तूरचे सरहद्देंत आलों, येविशींचें जोडीबरोबर लिहिलेंच आहे. कलम १

चहा व बुंद व चहादाणी पाठवावयाविशीं पेशजी आपणांस लिहिलें आहे. त्याप्रमाणें रवाना जालें असल्यास बरेंच. जालें नसल्यास पाठवून द्यावें. कलम १

पेशजी मुजरद राजश्री माधवरावजी याणीं चतुरसिंगास मोडिलें येविशींच्या मजकुराचें पत्र त्यांजकडून आपणास आलें तें पहावयास पाठविल्यावरून साविस्तर समजलें. पत्र माघारें पाठविलें आहे. चतुरसिंगाची आवाडाव मोठीच होती. तूर्त शमली. कमल १

'मिरजप्रांताची बाकी राहिली नाहीं. अशांत कांहीं तरी कुमक व्हावी. उपेक्षा करूं नये' म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसीयास याच पैरवींत आहों. चि॥ राजश्री रामचंद्रपंत आपा आम्हांजळ येऊन पोचले. याउप्पर ठरेल तें लिहून पाठवितों. कलम १

चि॥ सौ. ठमाबाई यांच्या मुलास देवी आल्या आहेत म्हणोन लिहिलें तें कळलें. उतार पडालियाचें लिहावें. कलम १

रेशमी नारिंगें व महाळुंगें औषधास पाहिजेत. मिळाल्यास पाठवावीं. कलम १

---

१ पत्रावरील मिति व तारीख पेवस्तीची.

एकूण आठ कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. ××× जिल्काद. बहुत काय लिहिणें. लोभ करावा हे आशीर्वाद. पै॥ छ० ९ जिल्काद सन तिस्सा तिसैन चैत्र शु॥ १० इंदुवार.

नं. ४८७४ श्री. ( चैत्र शु० ११-१६ एप्रिल. )

पै॥ छ० १० जिल्काद. सन तिस्सा तिसैन. मय्या व अलफ. चैत्र मास.

सेवेशीं विनंती सेवक श्रीधर गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १० जिल्कादपावेतों यथास्थित असे. विशेष. पठाण निसबत शिंदे यांचे रोखे आंधळी व बलवडी व भालवणीपर्यंत झाले होते. मागाहून राजश्री गोपाळराव चिटणीस व बाबूराव आंग्रे नजीक आल्याचें ऐकून गांवगन्नांचे पठाणांचे स्वार उठोन गेले. त्यांचा मुक्काम लोंढें येथें आहे. गोपाळराव यांचा मुक्काम नीरेनजीक होल मुरमांवर आहे. पुढें कांहीं फौज घेऊन बाबूराव यांचे बंधु पांच सातशें लोकांनिशीं दहिवडीवर आले आहेत तेथून गांवगन्ना रोखे करितात. खंडण्या मनस्वी घेतात. कंपू मागाहून येणार आहे तो आलेनंतर गोपाळराव पुढें कूच करून येणार. बायांकडे समजाविशीस जातात म्हणोन आवाई आहे. कोंकणांतून दोन पलटणें इंग्रजांचीं मळे घाटानें आलीं त्यांचा मुक्काम सुपणें तांबवें कराडापासून दोन कोस आहे तेथें आहे. पुढें कोणीकडे जाणार हें समजलें नाहीं. येथें गांवचे रखवालीस नऊ असामी लोक होते त्यांपैकीं पांच असामी न पुसतां उठोन गेले. त्यांचे मोबदला पाठवण्याची आज्ञा झाली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८७५ श्री. ( चैत्र शु० ११-१६ एप्रिल. )

छ० १२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेश राम पेठे दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १० जिल्काद पावेतों सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री रामचंद्रपंतआपा यांसमागमें परगणे हनगल व राणेबिन्नूर इकडे कारखान्यासुद्धां जावयाची आज्ञा झाली त्यावरून छ० ३० साबानी गेलों. तिकडील ठाणीं झाडून बसवून माघारे छ० ४ जिल्कादीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांस मिळालों. कारखान्यापैकीं तिकडे बैल सर एक आजारामुळें राहिला. गाडीवान एक गाड्याखालीं सांपडोन पाय मोडला व दर्यावर्दी एक दारूचे थैलीस आग लागून जळाला. ते दोन्ही असामी बरोबरच आणिले. वरकड मजकूर अवि

१ पत्र देवर असें येथून.

कोत्तर नाहीं. तुंगभद्राअलीकडे हुबळीशिवाय झाडून ठाणीं बसलीं. आज मुक्काम मुरगोडाजवळ आहे. उदईक पाच्छापुरचे बारीस येणार. राजश्री धोंडोपंत गोखले यांणीं सौंदत्तीस मोर्चे लावले आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८७६ श्री. ( चैत्र शु० ११–१६ एप्रिल. )

पै॥ छ० १२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

सेवेशीं गणेश गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १० जिल्काद मुक्काम मयाकनमुर्डी तालुका कित्तूर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं मानाजी सुर्वे याजबरोबर पत्र पाठविलें तें पांचवे दिवशीं पावलें. येथील वर्तमान परवां सेवेशीं लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम वकुंदावर होता तेथून कूच करून काल पाच्छापुरचे बारी नजीक येऊन मुक्काम झाला. आज येथून कूच व्हावयाचें होतें. परंतु श्रीमंत राजश्री रामचंद्रपंतआपा यांस काल मागील मुक्कामावर गाडदी यांणीं खर्चाकरितां मुक्काम करविला. ते काल आले नाहींत याजमुळें मुक्काम आज झाला. उदईक येथून कूच होऊन बारीपार होणार. श्रीमंत राजश्री रामचंद्रपंतआपा उदईक मुरगोडास वे॥ राजश्री दीक्षितांचे दर्शनास जाणार आहेत. याजउपरी बारीपार होण्यास दिकत नाहीं. राजश्री धोंडोपंत गोखले सौंदत्तीस जाऊन बसले आहेत. अद्याप ठाणें बसलें नाहीं. बोलणें लागलें आहे. येथील गुंता उरकून गोखले येतील. वरकड सविस्तर श्रीमंतांनीं पत्रीं लिहिलेंच असेल. सेवेशीं श्रुत होय विज्ञापना.

नं. ४८७७ श्री. ( चैत्र शु १२–१७ एप्रिल. )

छ० ११ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

पु॥ सेवेशीं विज्ञापना. ऐसी जे, वेदशास्त्रसंपन्न तपोनिधि राजमान्य राजश्री दीक्षित स्वामी यांजकडे मुरगोडास चिरंजीव राजश्री बसवंतराव व बाळाजी बाबूराव यांस पाठविलें होतें. मिरजप्रांतीं दंगा झाला येविशीं विनंती केली. त्यावरून आज्ञा झाली जे, कांहीं चिंता करूं नये. श्रीकृपें सर्व अरिष्टें पराभव होतात म्हणून. त्याजवरून सेवेशीं विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८७८ श्री. ( चैत्र शु० १२–१७ एप्रिल. )

पै॥ छ० १७ जिल्काद[1]. अस्तमान. तिस्सा तिसैन.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

## श.१७२१ टिपूवरच्या मोहिमेवर भाऊंची योजना. इ.स.१७९९

ती॥ राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं —

अपत्यें रामचंद्र श्रीधर काळे. शिरसा॥ नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता॥ छ० ११ जिल्कादपर्यंत पुणें येथें यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें होतें त्याचें उत्तर पाठविलें आहे. हल्लीं ती॥ रा॥ भाऊसाहेबांच्या नांवें पत्र सरकारचें घेऊन पाठविलें आहे कीं, बाया मेळवून घेऊन करवीरकर यांच्या पारिपत्याविशीं तपशीलवार लिहून पाठवावें. ऐसें पत्र घेऊन पाठविलें आहे. आजपर्यंत आपणास संशय होता. श्री॥ नानानीं मिळूं नका ऐसें लिहिलें होतें त्यावरून तो प्रकार होता. या पत्रावरून बिनदिक्कत जाहलें. हेंही पत्र नानानींच देविलें यांत संशय नाहीं. वडिलीं सर्व पत्रें पाहून भाऊसाहेबांस आपणही तपशीलवार ल्याहावें म्हणजे करवीरकर यांस दाब बसेल. बायांचें यश येईल. आपला प्रांत वांचेल. सुचला प्रकार लिहिला आहे. कर्नाटकची स्वारीही श्रीमंतानीं कृपा करून सांगितली आहे. याविशींही आपण वडिलांस ल्याहावें कीं आज प्रसंगीं नाहीं म्हणूं नये. मग राहिल्याविशीं चार दिवस ओढून धरिलें तरी चिंता नाहीं. यास्तव लिहून खचित करावें. त्यांत भाऊसाहेबांस इकडे मोठींच राजकारणें आहेत तीं कोणतीं तर करवीरवासी यांचा बंदोबस्त, बायांची समजूत भाऊसाहेबांस मध्यें दरम्यान पडून जाहली म्हणजे दिगंतीं कीर्ति आहे. श्रीमंतानीं कृपा करून सर्वथा मसलत तीर्थस्वरूप राजश्री रामचंद्रपंतआपास सांगितली हेंही उत्तम आहे. चार राज्यांत लौकिक आहे. हें सर्व वडिलींही चित्तांत आणून कसें पाहिजे तसें भाऊसाहेबांस ल्याहावें. माझे हातें होईल खटपटीस चुकत नाहीं. ऐवजाचें संकट रास्ते यांजवर आहे तेंही स्वारी कबूल केली असतां परिहार होईल. कळावें. पत्र आपलेकडून व भाऊसाहेबांकडून वरचेवर येत नाहीं यांजमुळें येथें कांहीं सुचत नाहीं. कळावें बहुत काय लिहिणें सेवेसीं श्रुत होय हें विज्ञापना.

नं. ४८७९ ( चैत्र शु० १३–१८ एप्रिल. )

छ० १२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

विज्ञापना. राजश्री नारायणराव बक्षी यांजकडून यशवंतराव पागनीस येथें श्रीमंतांकडे बोलावयास आले होते. बोलणें होऊन बक्षी यांजकडे जावयास गेले. चार दिवस झाले. बोलण्यांतील भाव 'आम्हांकडे तुमचें लक्ष असल्यास करवीरकरांस तुमचा आश्रा असूं नये. अथवा करवीरकरांचा आमचा तह

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ अवतरणांतलें बोलणें भाऊंचें.

करून देऊं म्हणतां त्यास पेशजी, आम्हांकडे तालुका होता तो झाडून त्यांणीं सोडून द्यावा, आणि तासगावची खराबी केली आहे त्याचा जाबसाल करावा; म्हणजे तहाचें बोलणें घडेल. चिंता नाहीं.' याप्रमाणें बोलणें झालें. तेव्हां या दोन जाबसालांपैकीं एक जाबसाल ठरवून येतों ऐसें बोलोन गेले म्हणोन वर्तमान ऐकिलें तें सेवेशीं लिहिलें आहे. श्रीमंतानीं सविस्तर लिहिलेंच असेल. हे विज्ञापना.

नं. ४८८० श्री. ( चैत्र शु० १४–१९ एप्रिल. )

पै॥ छ० १३ माहे जिल्काद. सन तिस्सा तिसैन. मय्या अल्लफ.

राजश्री गंगाधरराव काका गोसावी यांसी–

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॰ यशवंतराव घोरपडे अमीरउल उमराव. दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान न कळतां चित्त सापेक्षित असे. हें वडीलपणास युक्त कीं काय? असें न होतां निरंतर पत्रीं साकल्यवृत्त लिहून चित्त संतोषवावें. तदनंतर इकडील वर्तमान बायांचा व शिंदे यांचा समेट न होतां बाया करवीरप्रांतीं गेल्या. त्या उद्देशें राजकारणनिमित्तें शिंदे यांणीं दहा हजार फौज व कंपू रवाना केला आहे. बरोबर राजश्री बाबूराव मामा आंगरे व गोपाळराव भाऊ चिटणीस उभयतां मुखत्यार आहेत. ते देशीं फौजेचें येणें जलदीच होईल. येथून दोन मजल जेजुरीच्या मुक्कामीं फौज गेली आहे. राजकारणप्रसंग दिसतो. ऐशीयास येविशीं इकडील सविस्तर परस्पर आपल्या समजण्यांत येऊन आपण तो सावध आहांच. हल्लीं फौजेचें वर्तमान वरचेवर घेऊन फार सावध असावें. लिहून कळवावेंसें नाहीं. आपणाकडून येथें कित्येक कामकाजाचें प्रयोजन पडल्यास मी प्रसंगीं आहें. लिहीत जावें. इकडून साहित्यही घडून येईल. आपणाविशीं दुसरा विचार नाहीं. दटवाडीं कुटुंब मुलें मनुष्यें आहेत. या दंग्यांत गांव खेड्याचा बचाव नाहीं याअर्थीं सर्वत्रांस आपणापाशीं आणवून घ्यावें. येविशीं घरीं चिरंजीवास लिहिलें आहे. आपणासंनिध येतील. त्यांस राहणेंस किल्ल्यानजीक एखादा वाडा पाहून सर्वत्रांची सोय होय त्याजोगा वाडा पाहून अगत्य देवावा. वडीलपणेंकडून

१ बायांच्या व करवीरकरांच्या पारिपत्याकरितां म्हणून शिंद्याची फौज येत आहे ही मिरजेच्या किल्ल्यास दगा करील याविषयीं सावध रहा असें पत्र लिहिणारा सुचवितो.

आपण तो वरचेवर परामर्ष करालच. सूचनार्थ लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४८८१ श्रीशंकर प्रसन्न. ( चैत्र व० १-२० एप्रिल. )

पै॥ छ० १७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र वद्य ४

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० १४ जिल्कादपावेतों यथास्थित जाणून स्वकीय लिहीत असावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. " इकडील वर्तमान राजश्री नानांस लिहिलें होतें त्याजवरून तीर्थस्वरूप राजश्री भाऊंस नाना यांचें पत्र आलें. वडिलांकडे रवाना केलें. त्याची नक्कल आपणास पाहण्यास पाठविली आहे. महाराज यांचा मुक्काम श्रीमार्कंडेश्वरासमीप येथून कोसावर येणार. लक्ष्मीबाई यांचें कूच होऊन महाराजांजवळ येणार. राजश्री नारायणराव बक्षी हुनशाळेहून कबूरावर सहा कोस माघारे आले. वडिलांचे व त्यांचे बोलण्यांत बीत बसला नाहीं अशीं बातमीचीं पत्रें आलीं. उभयतां एकत्र होऊन मिरजेचे पेठेवर गलबल करावी असा निश्चय झाला आहे. पाच्छापुरचे बारीनें वडील येणार आहेत. " म्हणोन लिहिलें तें सविस्तर कळलें. नक्कल पाठविली त्यांतील मजकूर सविस्तर कळला. तें पत्र भाऊंस पाठवून त्यांचा निश्चय होऊन पुढें येण्याचा विचार कसा केला हें लिहून कळवावें. उभयतां एकत्र होऊन किल्लासमीप मुक्काम होणार. ते घालमेल करावयास चुकणार नाहींत. जलद पत्रें भाऊंस गेलींच असतील. आणखी ही जाऊन सत्वर त्यांचें येणें झालें म्हणजे सध्यां आचरण चाललें आहे हें कमती पडेल. आपलाही बंदोबस्त पक्केपणें राखावा. सरकारचें पत्र या लिहिण्यावरून भाऊंकडे आलें असावें. त्याचा मजकूर कसा तें लिहावें. बक्षी इतके दिवसांत बायांपाशीं दाखल जाले असतील ते येऊन कौसले[1] काय झालें? उभयतांकडील ही शाश्वती कोणतीही नाहीं. आमचा मुक्काम प्रस्तुत किल्ले सातारा नजीक माहुलीसन्निध कृष्णातीरीं आहे. पुण्याहून हुजरे फौज सुद्धां येणें म्हणोनें पत्रें घेऊन आले आहेत. येथून पर्याय लिहून पाठविले आहेत. उत्तर वडिलांकडून येईल तसा जाण्याचा बेत होईल. शिंद्याकडील फौज पलटणें घांटावर महादेवाचे सुमारें आले आहेत. खंडण्या घेतात. गांवची कांहीं बाकी राखीत

१ पांच सात वर्षें इंग्रजांशीं युद्धं सुरू होतें तेव्हांपासून ह्या ' कौन्सिल ' चा अपभ्रंश मराठींत सुरू झाला.

नाहीं. लुटून घेतात. बहुत काय लिहिणें. निरंतर अधिक आगळें वर्तमान कळवीत असावें. कृपालोभ करावा हे विनंती.

नं. ४८८२ श्रीगणपति. (२० एप्रिल.)

पै॥ छ० १६ जिलकाद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र वद्य १ मंदवासरपर्यंत सुखरूप असों. विशेष. शुद्ध दशमीस लिहून पत्रें सेवेशीं पाठविलीं तीं माघारीं वाटेमुळें गेलीं नाहींत. एकादशी द्वादशी दोन रोज गाड्यांचा खटला पडून मुरकुंबीवरच राहिलों. तेथें तोड पडेना म्हणोन रागा रागा उठून मुरगोडास गेलों. तेथें एक रात्र राहून वेदशास्त्र राजमान्य राजश्री दीक्षितबावांची आज्ञा घेऊन वडिलांजवळ आलों. पायदळाची तोड थोडी बहुत निघून आज मुक्कामास आणिले. वडिलांकडून पत्रें वरचेवर आलीं तीं झाडून पाहिलीं. वडिलीं अशा संकटानें लेखन करावें, आणि फौज एवढी बाळगून समयास उपयोगीं पडली नाहीं, तेणेंकरून जन्म व्यर्थसें झालें ! असो. काल वडिलीं आज्ञा केली जे, गोकाकचे बारीपार जाणें. आज मंदवारीं कूच करावें, तों फौजेचा राडा पडून मुक्काम झाला ! ईश्वर इच्छा प्रमाण ! आज क्षेत्रें[३]च आहे. वडिल आज कूच करून गेले. मौजे खानगांव परगणे गोकाक येथें बारींत मुक्काम झाला. माझी तोड पडली म्हणजे मीही येत आहें. खर्चास नाहीं याजपुढें परिणाम लागणें कठीण आहे. वडिलांची प्रकृत बहुत सूक्ष्म झाली तें संकट किती लिहूं !! मुख्य दीक्षितबावांचा आधार पूर्ण आहे. वरकड कांहीं नाहीं. ईश्वर कृपा करील. तिकडील वर्तमानाची आज्ञा लिहिणेंविशीं होत असावी. सदैव पत्रीं सांभाळावें. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८८३ श्रीगणपति. (चैत्र व० २–२१ एप्रिल.)

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद. उपरी आपण छ० ९ जिलकादचीं पत्रें पाठविलीं तीं छ० ११ मीनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बितपशील—

' फरासखानेंतून डेरा काढून मंगलवेढ्याहून पत्रें विश्वामित्रो- ठेविला आहे. कनाता मात्र नाहींत. पनामक याच्या समुदायाविशीं आप-

---

१ तुम्हांकडून मिरजप्रांतावर संकट आल्याचीं. २ भाऊनी. ३ उपोषण. द्वारांत धरणें बसल्यामुळें. ४ जनोबा म्हैसकर. म्हैस ही विश्वामित्राची सृष्टि असल्या- मळें म्हैसकरास विश्वामित्रोपनामक ही संज्ञा।

आणखी शोध करतों. उंटाची भरती करून लाऊन देतों ' म्हणोन लिहिलें तें कळलें. कनाता कारखान्यांत असतील. लवकर सारा संच करून रवानगी करावी. बरसातीचे दिवस आले. येथें सामान सडें आहे. कलम

राजश्री नाना यांचें पत्र आम्हांस आलेलें पाठविलें तें पावलें. त्याचा जाब पाठविला आहे. रवाना करावा. सरकारचीं पत्रें अद्याप आलीं नाहींत. कलम.

संज्ञेची पुरवणी पावली. वृत्तांत समजला. हुशारीच आहे. कोठवर काळजी करावी! संकर्षणास आणावयाचा बेत झाला असें तहकीकांत लिहिलें आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. अशा आवाया बहुतेक वेळां आल्या. कयासानें जरूर दिसतें. वरचेवर बातमी चहूंकडून आणवून लिहित असावें. कलम.

णास आली त्याचा जाब दिल्याचा मजकूर लिहिला तो कळला. दमानेंच होणें तें व्हावें. केवळ वल्गनेवरच जाऊं नये. कलम.

' करवीरकर व बाया यांचें ऐक्य झालें. कूच मुक्काम व उपद्रव परस्परें संमताशिवाय होत नाहीं. प्रांताची बाकी राहिली नाहीं. ' म्हणोन लिहिलें तें कळलें. सरकारांतून याचा बंदोबस्त करावा असा ठराव होऊन सामान रवाना झालें आहे त्या पक्षीं तेथून पाऊल काढतात किंवा नाहीं तें पहावें. प्रजेस पीडा अतिशय झाली. श्रींनेंच कृपा करावी. कलम.

आमचा मुक्काम पाच्छापूरच्या बारी नजीक हणबरहट्टीजवळ आहे. गोकाकच्या बारीनें कांहीं फौजा पुढें दिखाव्यास पाठविल्या आहेत. आमचेंही कूच लवकरच होईल. गोखले सौंदत्तीच्या ठाण्यास बसले आहेत. कलम.

एकूण सहा कळमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० १५ जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० १६ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

नं. ४८८४ श्री. ( चैत्र व० २–२१ एप्रिल. )

पै॥ छ० १६ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

सेवेशीं गणेश गोविंद. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० १५ जिल्काद मुक्काम नजीक वणूर तालुका कित्तूर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. येथील सविस्तर काल हैबती जासुदा-

१ बाळोबा तात्या.

बरोबर सेवेशीं लिहून पाठविलें आहे, त्याजवरून सर्व सविस्तर विदित होईल. कालच्या पत्रीं पाच्छापूरचे बारीनें श्रीमंतांची स्वारी येणार असें लिहिलें आहे, त्यास कालपर्यंत पाछापूरचे बारीनें जावयाचें बोलण्यांत होतें. काल गोकाकचे बारीकडून जावयाचें ठरून येथील मुक्कामास आले. आज येथून कूच होऊन गच्ची कुरबेटचे सुमारें जात आहेत. गोकाकेस दोन हजार फौज पांढरे वगैरे देऊन रवाना केले. गोखले सौंदत्तीस आहेत. ठाणें लढत आहे. धोंडोपंत गोखले यांचे हातास गोळी चाटून गेली म्हणोन ऐकिलें. ठाणें बसलेनंतर ते येणार. श्रीमंत राजश्री रामचंद्रपंतआपा व दाजी-साहेब सडे होऊन पुढें गोकाकचे सुमारें जाणार अशी मसलत होत आहे. काय ठरतें पहावें. 'मिरजेस दोन हजार फौज नेमून देतों, परंतु तूर्त खर्चास तेथें द्यावें लागेल. म्हणजे फौज घेऊन तुम्हीं जावें.' असें काल यजमान बोलले यास्तव विनंती लिहिली आहे. आज्ञा येईल त्याप्रमाणें विनंती करावयास येईल. सावनूर तालुक्यांत हजार स्वार देऊन राजश्री गणपतराव काका यांची रवानगी होत आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८८५ श्री. (२२ एप्रिल.)

पै॥ छ० २१ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी दोनी कर जोडून त्रिकाल चरणांवर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र वद्य ३ सोमवारपावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें श्रीमंत राजश्री बापूसाहेब यांचे खिसमतगाराबरोबर पाठविलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. 'राजश्री बाळकृष्णपंत बाळ भाऊ यांजला पत्रें पाठविलीं आहेत. ...ाधीं द्यावींविशीं आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें भाऊंस पत्रें दिलीं. जाब आला म्हणजे आज्ञेप्रमाणें पाठवीन. राजश्री बाळोबा नगराहून निघोन गारदवंडेस गेले. कारण कीं शिंद्यापासून एक कंपू निघोन हिंदुस्थानांत सात पलटणें ठेऊन गारदवंड्यावर मुक्काम करून होता तेथें बाळोबा गेले. कंपूसीं बोलणें करून कंपू माघारा घेऊन आले याजप्रमाणें राजश्री बाळकृष्णपंतभाऊनीं सांगितलें. बाळोबा आज उदईक लष्करांत येणार अशी बाजार बातमी आहे. कहीचा उपद्रव गांवांत सरकार पागांचा किरकोळ लागूं लागला. पेशजी मुजरद जासुदासमागमें पत्रें पाठविलीं आहेत त्याजवरून मजकूर कळला असेल. रामा खिजमतगार याजला वडिलांकडे पाठवून फार दिवस झाले. पावल्याचें उत्तर आलें नाहीं. भाऊनींही गोष्ट काढली होती कीं

पत्रें आम्हीं दिल्याचा जाब या पत्रीं कांहीं नाहीं. ऐसें बोलले त्याजवरून वडिलांस लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८८६ श्रीगणपति. ( चैत्र व० ३—२२ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. चहाचा पाला व बुंद पाठविले ते पावले. 'याचें पात्र रुप्याचें आहे. वाट चालत नाहीं याजकरितां पाठविलें नाहीं;' म्हणोन लिहिलें तें कळलें. 'शिंदे यांजकडील बक्षी यांची भेट जाहली नाहीं याचें कारण कोणतें ? बोलणें काय काय जाहलें तें लिहावें म्हणोन लिहिलें तें कळलें. त्यास बायांकडील मुद्दा "आपला जावसाल मिटवून द्यावा. तूर्त फौज कुमकेस द्यावी. पलटणांशीं एक लढाई मारूं. मग काय असेल तें पाहूं." त्याजवरून त्यांस उत्तर सांगितलें कीं, लढाईच्या कामांत पडों नये. पलटणांशीं गांठ, त्यापक्षीं खराबी फार होईल. सरकारांत लिहून पाठवितों. तेथील उत्तर येईल तसें करावयाचें. तंवपावेतों भेटीस येण्याची जलदी करूं नये. असें सांगितलें व सरकारांत लिहून पाठविलें आहे. रवाना छ० १६ जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० १६ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

नं. ४८८७ श्री. ( चैत्र व० ३—२२ एप्रिल. )

पै॥ छ० १६ अिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांस पुण्याहून सरकारचीं पत्रें कालच आलीं. "पट्टणाकडे इंग्रजाचे कुमकेस जावें. शिक्के कटार व दरकदार वगैरे सरकारी सरंजाम पाठवून देतों." अशीं पत्रें आलीं. श्रीमंतांनीं स्वामींस लिहिलेंच असेल. हे विज्ञापना.

नं. ४८८८ श्रीगणपति. ( २२ एप्रिल. )

पै॥ छ० १७ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. वसंत बहुल तृतीया इंदुवारपावेतों गोकाक, घटप्रभा दक्षिण तीर, सैन्यासह वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. इकडील मजकूर परवां लिहिलाच आहे. काल रविवारीं वडिलांची आज्ञा घेऊन येथें आलों. ठाण्यांतील गोळी चालत आहे. वडिलांचा मुक्काम आज बारींत नणदी म्हणोन गांव आहे तेथं येत आहेत.

---

१ चिठी गणेश गोविंद सखदेव याची बाळासाहेबांस भाऊंच्या लष्करांतून. २ पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

उद्यां परवां येथें यावे असें आहे. तिकडील सर्व वर्तमानाची आज्ञा व्हावी श्रीपूरकर व भस्मपंचकाचे वर्तमानाची आज्ञा झाली पाहिजे. सदैव आशीर्वाद पत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४८८९ श्रीगणपति. (चैत्र व० ३–२२ एप्रिल.)

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. आपण छ० १० जिल्कादचीं पत्रें पाठविली तीं छ० १४ मीनहूस पावलीं. राजश्री नारो हरि करंदीकर व बाबाजी विश्वनाथ व सखाराम शेषाद्रि यांचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहून माघारीं पाठविलीं आहेत. बाळ याणीं परांजपे यांस पाठवावयाविसीं लिहिल्याचें व उभय सैन्यांची कस्त पेठेवर गडबड करावी अशी आहे म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशियास आम्हीं छ० १५ मिनहूस गोकाकच्या रोखें खानगांवच्या बारीनजीक आलों. कांहीं जमीयती गोकाकच्या मैदानांत पाठविल्या. आम्ही लौकरच त्या सुमारें येत आहों. फौजेंत गवगवा खर्चाचा अतिशय. कूच लवकर होत नाहीं. समजीखालींच दिवस जातात. बरें ! श्रीकृपेंकरून घडेल तें खरें ! आपण जाग्याची मजबुदी चांगली राखावी. रवाना छ० १६ जिल्काद बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ० १६ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

नं. ४८९० श्री. ( २३ एप्रिल. )

पै॥ छ० २३ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी. दोनी कर जोडून त्रिकाल चरणावरी मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र वा। ४ पावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळोबा व धोंडीबा व आणखी तीनजण काल लष्करांत आले. शिंदे यांच्या व बाळोबाच्या भेटी वा। ३ सोमवारीं बारा घटिका दिवसास जाल्या. बाळोबा यांस वस्त्रें व शिरपेंच व कंठी दिली. धोंडीबास वस्त्रें व शिरपेंच दिला. मोदी व मोदीचा लक व आणखी एकजण असे तिघांस वस्त्रें मात्र दिलीं. याजप्रमाणें बहुमान करून शिंदे व बाळोबा बिचोळ्यांत एकांतास गेले. याजप्रमाणें वर्तमान

---

१ श्री=महालक्ष्मी. श्रीपुर= करवीर. भस्मपंचक=शेणवी, मराठे व पठाण, आणि लक्ष्मीबाई व यमुनाबाई या दोन शिंदे बाया मिळून मुलखाचें भस्म करणाऱ्या पांच स्वाऱ्या. येथें सांगितलेल्या दोन बायांची सवत आणखी एक बाई त्यांबरोबर असे. पण तिची निराळी स्वारी संचारार्थ निघत नव्हती २ गंगाधरराव गोविंद यांस पत्र पुण्याहून.

जालें. कंपू हिंदुस्थानांत जात होता तो बाळोबानें येते समयीं आणविला. वडिलांस कळावें. राजश्री बाळकृष्णपंतभाऊकडील जाब आला नाहीं. आला म्हणजे मागाहून कळवितों. कळावें बहुत काय लिहिणें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८९१ श्री ( चैत्र व० ४—२३ एप्रिल. )

पै॥ छ० १८ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं बाळाजी बाजी. साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १७ जिल्काद वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. पठाणाचें कूच बुरलीवरून होऊन आज नागराळयास गेले आहेत. गांव खेड्यास गोळी वाजवणें म्हणोन आज्ञा, त्यास तासगांव कुंडल दोन्ही गांवखेरीज गोळी वाजवावयाजोगा गांव नाहीं. आम्हीं कांहीं बधत नाहीं. नरसीपूरचे क्षेत्रास व बावांस पठाणांचा उपद्रव झाला म्हणोन राजश्री रत्नाकरपंत व चत्रसिंग व बावडेकर दोन हजार फौजेनिशीं आले आहेत व कराडावरही फौज जमली आहे. पुढें हजार फौजेनिशीं आले आहेत. व कराडावरही फौज जमली आहे. पुढें काय होतें पहावें. राजश्री बाळाजीपंत भावे याणीं आठ हजार रुपये कबूल करून बरोबर राऊत घेऊन भिलवडीस आले आहेत. ऐवज निर्माण होतां दिसत नाहीं. कशी गत होते पहावें. खंडणीचे मध्यस्थ विनायकपंत पठाणांचे दिवाण व बळवंतराव निसबत नारायणराव बक्षी यांचे विद्यमानें बोली झाली होती. परंतु परभारें वर्तमान ऐकिलें कीं, कवठेकर चिंतोपंत कुलकर्णी याणीं त्यांस सांगितलें कीं, तासगांव तालुका भिलवडी सुद्धां पन्नास हजारांचा असतां त्यांसच थोडकें आणि आम्हांस इतकें मागतां हें कसें निभावेल ? याप्रमाणें बोलले म्हणोन येथील बातमीदारांनीं सांगितलें त्याजवरून ही गत भिलवडीची झाली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८९२ श्री. ( चैत्र व० ५—२४ एप्रिल. )

पै॥ छ० २४ जिल्काद. चैत्र मास. सन तिस्सा तिसैन.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

---

१ पत्र तासगांवाहून बाळासाहेबांस. २ सिद्धेश्वर बावांस.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

अपत्यें रामचंद्र श्रीधर काळे शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० १८ जिल्कादपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. वाडेलीं ती॥ राजश्री भाऊसाहेबांचें आणि श्रीमंत राजश्री नानांचें वैमनस्य होतें तें आपण मध्यें राहून नीट केलें. त्यांत दिक्कत किमपि राहिली नाहीं. त्यास हल्लीं राजश्री तात्या पागनीस आले, मुखत्यारीचा कारभार शिंदे यांचे घरीं करणार, तेव्हां ती॥ राजश्री भाऊसाहेबांचा आणि पागनीस यांचा स्नेह आहे. पागनीस सुटले म्हणोन मागती कागदापत्रांचा वगैरे राबता लागेल, आणि येथें वैमनस्य भासेल. त्यास याउपरी कोणतीही गोष्टी होऊं नये ऐसी सूचना आपली वडिलांस जावी. आपण दरम्यान आहेत. जर एकादें घसरलें तर बोल आपल्यावर येईल. यास्तव विनंती लिहिली आहे. जसा स्नेह जाहला आपण मध्यें पडून तैसें चालावें हें फार उपयोगी. वडील सर्वजाण आहेत. सुचलें तें लिहिलें आहे. भाऊसाहेबांचे शरीरप्रकृतीची गलबल येथें बहुत बोलतात. वडिलांकडून कांहीं लिहिलें येत नाहीं, त्यांस सविस्तर लिहून कळवावें. प्रथम मजकूर लिहिला आहे हा वडिलीं वडिलांस गुप्तरूपें लिहून दस्तऐवज आणून आपलेपाशीं ठेवावा. नाहींतर विस्मृतीखालीं एखादें नासेल यास्तव विनंती लिहिली आहे. कळावें. बहुत काय लिहिणें. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८९३ श्रीगणपति. ( चैत्र व० ५—२४ एप्रिल. )

पै॥ छ० २२ जिल्काद. सन तिस्सा. चैत्र मास.

पु॥ अपत्यें चरणांवर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १८ जिल्कादपर्यंत वडिलांचे आशीर्वादेंकरून क्षेम असे. विशेष. राजश्री बापूराव आंग्रे निसबत शिंदे हे फौजसुद्धां नातेंपुतेंजवळ दहा हजारांनिशीं आले आहेत. याच मार्गें येणार. सांगोलें कासेगांव मंगलवेढेंवर रोखे जाहले आहेत. सांगोल्यास दाखल झाला तेव्हां येथें ही येणार. येथें राजश्री चिंतामणराव बापू यांचे खंडणीची भरती कोणे प्रकारें कशी झाली ती सर्व ईश्वरास साक्ष आहे. आणखी यवनाकडीलही उपद्रव होणार. अलाहिदा पत्रीं सविस्तर मजकूर लिहिला

---

१ लेखक बाळासाहेबास सुचवितो की नाना व भाऊ याचा स्नेह तुमच्या मध्यस्थीनें झाला आहे. हल्ली बाळोबा सुटल्यामुळें त्यांचा व भाऊंचा पूर्वीप्रमाणें स्नेहाचा शिलशिला सुरू झाल्यास नानास वैषम्य वाटेल व तुमच्या दरम्यानगिरीस बट्टा येईल. सबब भाऊसाहेबांकडून तसें होऊं देऊं नये. २ तुम्ही भाऊसाहेबांस. ३ पत्र मंगळवेढ्याहून बाळासाहेबास मिरजेस.

आहे त्या वरून विदित होईल. यानंतर ती॥ राजश्री भाऊसाहेबांचें बायांचें एक लक्ष आहे असें लोक म्हणतात येविशींची आज्ञा झाली पाहिजे. यानंतर टिपूचें व इंग्रजांचें झूज लागलें आहे यास्तव सरकारांतून वडिलांस कर्नाटकची मसलत सांगणार, कुमकेस सरकारी फौजा देणार, वडील देशी राहणार, ती॥ राजश्री आपासाहेब मसलतीस जाणार, असें सावकारी एकाचें लिहिलें आलें. सत्य मिथ्या कळेना. वडिलांपाशीं वर्तमान आलें असेल. लिहावया आज्ञा केली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय. कृपा लोभ करावा हे विज्ञापना. क्षेत्रीं नवाबाकडील फौज आहे ही देखील वडिलांसमागमें रवाना होणार असेंही ऐकतों. हे विज्ञापना.

नं. ४८९४ श्रीशंकर प्रसन्न. ( चैत्र व० ६–२५ एप्रिल )

पै॥ छ० २२ जिल्काद. चैत्र मास. सन तिस्सा तिसैन.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं

पोष्य माधवराव अनंत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० १९ जिल्कादपावेतों यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. आपण छ० १६ जिल्कादचें पत्र पाठविलें तें छ० मजकुरीं पावलें. महाराज करवीरकर व बाया यांचें छ० १० तागायत छ० १४ रोज पावेतों दीनचर्येचें वर्तमान व राजश्री भाऊ पाच्छापूरचे बारी अलीकडे राजश्री रामचंद्रराव आपासुद्धां लौकरच येणार येविशींचें व राजश्री यशवंतराव शिवाजी भाऊंकडे जाऊन बक्षीसुद्धां माघारे आलियाचें व वेदशास्त्रसंपन्न राजश्री भटजीबावा यांस पठाणानीं उपद्रव लाविला त्यामुळें महाराजानीं राजश्री रत्नाकरपंतास पठाणांचे पारिपत्यास पाठविल्याचें व ते कोणीकडे जातील नकळे, हुशारीनें रहाण्याविशींचें वगैरे लिहिलें तें सविस्तर कळलें. ऐसियास उभयतांचें धर्म ऐक्य पडलें, तेथें प्रांतात बाकी राहावयाची नाहीं. भाऊंचे येण्यास दिवसगत लागली हें समजत नाही. यशवंतराव शिवाजी जाऊन जाबसाल काय ठरला हें लेहून कळवावें. वेदशास्त्रसंपन्न राजश्री भटजीबावांची अमर्यादा झाली याजमुळें रत्नाकरपंतही आले व राजश्री पंतप्रतिनिधि यांजकडील कारभारी राजश्री बाळाजीपंत व मोरोपंत औंधाहून नरसीपुरास गेले होते. तेथून भटजीबावांस घेऊन कऱ्हाडानजीक कोरव्यावर मुक्कामास रत्नाकरपंतसुद्धां छ० १७ रोजीं आलियाचें कराडचे बातमीचें पत्र येथें आलें. कराडास नेणार असें ऐकण्यांत आहे. राजमंडळकर आले आहेत त्यांची बातमी राखूनच आहों. घडेल तें खरें. पुण्याकडील वर्तमान अधिकोत्तर नाहीं. राजश्री बाळोबास आणावयास गेले ते आले म्हणजे काय

होईल तें लिहावयास येईल. पागनीस छ० १६ रोजीं सोमवारीं येऊन भेटी झाल्या. पुढें काय होईल तें पाहावें. आमचा मुक्काम प्रस्तुत मौजे म्हसवें वेण्णातीर येथें आहे. आपलेकडील अधिकोत्तर वृत्त लिहून कळवीत जावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

नं. ४८९५ श्री. ( चैत्र व० ६–२५ एप्रिल. )

पै॥ छ० २८ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

सेवेशीं आपोजी हरि कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० १९ जिल्कादपावेतों स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळाजी कृष्ण निसबत शिंदे यानीं रेवतगांवाजवळ खंडणी आठ हजार, शिवाय डफळे याजकडील घोडीं घेऊन गांवची तसनस फारच केली. यामुळें गांव अगदीं बेचिराख होऊन घरास एक एक माणूस राहिलें होतें. उपरांत कंपूची फौज दहा बारा हजार व तीस तोफा याप्रमाणें सरंजाम आला. त्यांनीं मंगळवेढेंची खंडणी घेऊन अरळी व नांदूर दोन गांव झाबडून रेवतगांव व शिराढोण धरून वोढ्यानीं मुक्काम करून राहिले. तळ पंधरा दिवस पडला. दोन खंडण्या पडल्या. यासीं खंडणीचे जाबसाल लावावें तरी गांवांत रयत नाहीं. त्याचा बोलणेंचा धडा भारी. बोलणेंचें निभाव न पडे त्यामुळें गांव बेचिराख झाला. त्यांनीं शिराढोण व रेवतगांव अगदीं लुटले. पेवेंहि काढिलीं आणि घरें जाळिलीं. थोर घरें जे होतीं ते खणत्या लावून खाणून हांडीभांडीं मालयेत अगदीं घेऊन गेले. आणि खेड्यांनीं रोखे रोखे करून मनस्वीच खराबी केली. निंबरगीस देवदर्शनास हजार फौज गेली होती. राजश्री गंगाधर नारायण व वडवडगी कोमटी अथणीकर तेथें होते त्यांचीं घरें अगदीं लुटून नेलीं. ते बायका मुलांसुद्धां एका वस्त्रानिशीं रात्रीं निघून गेले. त्यांची मालयत फारच गेली. या प्रांतीं मोठें अरिष्ट गुदरलें. रेवतगांवचे ठाणेंत मात्र वीस प्यादे आहेत. कोणत्या खेड्याची कांहीं बाकी ठेवली नाहीं. कंपूचा मुक्काम धुळखेड टाकळीवर आहे. सोलापुराकडे व अक्कलकोटाकडे शह देऊन खंडणी घेणार. मागाहून आणखी फौजा येतच आहेत. प्रांतांत परिणाम लागावयाचा नाहीं. तमाम मुलूख वोस आहे. सांगोलेंकर कमावीसदार निघाले. गांव लुटला गेला. कोठेंही स्वस्थ कोणी राहिला नाहीं. विदित होय हे विज्ञापना.

---

१ येथून खास दस्तुर. २ परगणे वरडोल येथील कमावीसदार.

नं. ४८९६ ( चैत्र व० ६—२५ एप्रिल. )

मुकुंद नारायण भिडे यांचें पत्र शिंदे बायांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस छ० १९ जिल्कादचे.—

" करवीरकरांचें कूच होऊन मुक्कामास बोरगांव व सदलग्यास गेले. बक्षी सडे होऊन पुण्याकडे जाणार होते ते राहिले. यशवंतराव शिवाजी सडे होऊन बरोबर फौज चार हजार असे पुण्याकडे जाणार. बाईचा मुक्काम चार दिवस येथेंच आहे. गोकाकेवर आपासाहेब व दाजीसाहेब आहेत. भाऊसाहेबांचा मुक्काम कालचा कुरबेटावर होता. "

नं. ४८९७ श्री. ( चैत्र शु० ६—२५ एप्रिल. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं विज्ञापना. ता॥ छ० १९ जिल्कादपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळोबा पागनीस छ० १६ जिल्कादीं राजश्री धोंडीबा व बाजीबा मोदीसुद्धां शिंदे याचे लष्करांत आले. शिंदे यांची भेट जाहली. आतां विचार होईल तो लिहून पाठवीन. श्रीमंत पंतप्रधान स्वामींची व श्रीमंत अमृतरावसाहेब यांची व श्रीमंत नानांची गोडी राजश्री नारोपंत चक्रदेव यांणीं केली आहे. शहर पुणें येथील नाकेबंदीस गारदी गुलटेंकडीपासून नदीपावेतों ( ठेवण्याची तजवीज ) होत आहे. शिंदे यांचे येथें बायांचा समेट करावा, मग पुढील विचार. याप्रमाणें ठरत आहे. मसलत ठरेल ती सेवेशीं लिहून पाठवीन. स्वामींनी व श्रीमंत दादांनीं फौजसुद्धा शहर व किल्याचा बंदोबस्त पक्केपणें करून रात्रंदिवस बहुत हुशार राहून बातमी वरचेवर येत असावी. श्रीमंत भाऊसाहेबांस मिरजेकडे यावयाचें होत आहे. भाऊसाहेबांस पत्रही परभारें रवाना जाहलें आहे त्याचें उत्तर आल्यावर सविस्तर लिहून पाठवीन. बक्षी गेले होते त्याचें काय ठरलें ? व यशवंतराव शिवाजी यांची भेट जाहली तेव्हां बोलणें काय ठरलें तें लिहून यावें. व पहिले दोन कारकून भाऊसाहेबांकडे गेले होते त्याचा मजकूर कांहींच लिहून आला नाहीं तें लिहून यावें. बाया शिंदे भाऊसाहेबांच्या हातें समजतात किंवा उगाच नाद आहे हें लिहून यावें. भाऊसाहेबानीं मुरगुडाहून पलीकडे जाऊं नये. त्याणीं तर हुशारीनें असावें. कारण महाराज व बाया एक आहेत. कोणते समयीं काय विचार करितील, याजकरितां सावधता

१ बाळकृष्ण महादेव बाळ यांचें गंगाधरराव गोविंद यांस पुण्याहून पत्र. त्याचप्रमाणें ४८९९ नंबरचें.

चांगली असावी. उभयतां स्वामींनी बहुत हुशार असावें. दिवस बहुत नाकारे आले आहेत. सर्व साहित्य किल्ल्यांत असावें. कोणते वेळेस कसा प्रसंग पडतो हे अनुमान होत नाहीं. याजकरितां तरतूद चांगली असावी. विशेष सेवकानें विनंती काय ल्याहावी ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४८९८ श्री. ( २६ एप्रिल. )

पै॥ छ० २० जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र वद्य ७ भृगुवासर.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशी.

सेवक यशवंतराव शिवाजी. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथून सरकारचे व आमचे बाजारचे तांबोळी पानें विडेचीं खरेदी करावयास गेले आहेत त्यांस तेथें दिक्कत न पडे तें केलें पाहिजे. वाणी उदमी कांहीं जिन्नस खरेदी करावयास येतील जातील त्यांस खुशखरेदी करावयास आज्ञा द्यावी. बहुत काय लिहिणें कृपा लोभ कीजे हे विज्ञापना.

नं. ४८९९ श्री. ( चैत्र व० ७–२६ एप्रिल. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

विज्ञापना. ता। छ० २० जिल्काद पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. टिपूची व इंग्रजांची लढाई पिरापट्टणावर मातबर होऊन इंग्रजांकडील व नबाबाकडील मीर अलम गेले होते त्यासुद्धां दहा हजार माणूस ठार जाहलें. इंग्रजास टिपूनें बहुत पेंचांत आणिलें आहे; याप्रमाणें बातमी आली आहे. स्वामींकडून तिकडील बातमी येत नाहीं तेव्हां तिकडे बातमी नाहीं असें दिसोन येतें. त्यास तिकडे बातमीस कोणी पाठविल्यास फार चांगलें. याचा विचार वडिलांचे विचारास आल्यास करावा. राजश्री बाळोबा पागनीस शिंदे यांचे येथें आले. हिंदुस्थानांत पत्रें शिंदे यांचीं व बाळोबाचीं सरदारांस रवाना जाहलीं. सर्वांनीं एकविचारें राहून सर्व प्रांतांचा बंदोबस्त करून पूर्ववत प्रमाणें एक होऊन पत्रें यावीं म्हणून गेलीं. बायकांडेही व बक्षींकडे व सरदारांस पत्रें समेटीविशीं गेलीं. मागाहून राजश्री धोंडीबास रवाना करावा याप्रमाणें ठरत आहे. पत्रें गेलीं आहेत त्याचीं उत्तरें आल्यावर मा।निल्हे तिकडे येतील. स्वामींनीं छ० १४ जिल्कादचीं पत्रें पाठविलीं तीं आजच पावलीं. त्याचें उत्तर मागाहून लिहून पाठवितों. श्रीमंत नानांस पत्र होतें तें पाहून प्रविष्ट केलें. पागनीस आल्यामुळें सरकारांतून शहरची नाकेबंदी गारद फौज ठेवून होत आहे. नाके यांजवर लोक कालपासून बसले. बक्षी व यशवंतराव श्रीमंत भाऊसाहेबांकडे गेले होते त्यांचें बोलणें काय जाहलें हें लिहून सवि-

स्तर यावें. व पहिले दोन कारकून गेले होते त्यांचाही भाव लिहून आला तो व बक्षीविशींचें बोलणें काय जाहलें हें वडिलांस लिहून उत्तर आणवून साकल्य लिहून यावें. बाया व महाराज एकच आहेत. मिरजेनजीक येणार त्यास स्वामीनीं वडिलांस लिहून मिरजेकडे यावयाचें जाहल्यास फार चांगलें. कारण राजे व बाया किल्यालगत येणार त्याअर्थी वडिलांचें येणें समीप जाहल्यास दाब चांगला राहील. स्वामीनीं व श्रीमंत दादानीं रात्रंदिवस फौज सुद्धां हुशार राहून बातमी वरचेवर येत असावी. किल्यांत सर्व साहित्याची तरतूद असावी. कोणते वेळेस कसा प्रसंग पडेल हें समजत नाहीं. सर्व तरतूद स्वामीनीं केलीच असेल. परंतु सेवकास सुचलें तें विनंती लिहिली आहे. आज्ञापत्र वरचेवर येत असावें हे विज्ञापना.

नं. ४९०० श्री. ( चैत्र व० ७–२६ एप्रिल. )

छ० २२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेश राम पेठे दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २० जिल्काद मुक्काम गोकाक येथें सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. गोकाकेस मोर्चे बसोन तीन रोज झाले. अद्यापि ठाणें हस्तगत झालें नाहीं. आम्हांस श्रीमंतांची आज्ञा जाहली त्यावरून कारखान्यासुद्धां श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा यांचे लष्करांत आलों. तोफा लागू केल्या आहेत. पुढें जो मजकूर होईल तो सेवेशीं लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९०१ श्रीगणपति. ( चैत्र व० ७–२६ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आशीर्वाद उपरी. टिपूवर मोहीम करण्याविशीं सरकारचें आज्ञापत्र व चिरंजीव राजश्री रामचंद्र श्रीधर यांचीं पत्रें आलीं तीं पाहून रवाना केलीं आहेत. पावलींच असतील. दुसरी रवानगी सरकारचें पत्र 'बायांस मिळून घेऊन करवीरकरांचा बंदोबस्त करावा.' याच अन्वयें रामचंद्र श्रीधर याचीं पत्रें आलीं तीं ही पाहिलीं. 'याचा विचार व्हावा. यांत बहुत कामें होतात. राजश्री नाना यांस कळवून मान्य करावें.' म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसियास "टिपूवर मोहीम करण्याचा मजकूर तर ऐवजाच्या तरतुदीशिवाय कसें घडेल ? तोफा व पायदळ वगैरे सरंजाम पोक्त पाहिजे. चाकरीस उजूर व कसूर व्हावयाचा नाहीं." याप्रमाणें जाब लिहून दिले. उत्तरें काय येतात पहावें. बायांस मिळून घेण्याचा मजकूर

१ परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस पत्र.

तर सरकारचें पत्र छ० २० सवालचें पावलें. त्याजवरून बायांस कोणी मुखत्यार पाठवावा म्हणोन लिहिलें आहे. आलियावर काय तो इत्यर्थ ठरेल. मसलती मोठ्या ! ऐवजाशिवाय निभावणी पडावयाची नाहीं. श्रीइच्छेनें घडेल तें खरें ! रवाना छ० २० जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० २१ जिल्काद. सन तिस्सा तिसैन चैत्रमास.

नं. ४९०२ श्री. ( २६ एप्रिल. )

पै॥ छ० २२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक मोरो शंकर. कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना येथील वर्तमान तागायत चैत्र वद्य सप्तमी मुक्काम श्रीक्षेत्रपंढरपूर स्वामींचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं कृपावंत होऊन आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. सलाबतखान व सुभानखान व खंद्रारकर यानीं गावगन्नाच्या बोली आणिल्या त्या सोडवून ठाण्यास आणून बंदोबस्त करून राजश्री भगवंतरावअण्णा व रामाजी मल्हार वगैरे मंडळी कोठें आहेत हे लिहून पाठवणें म्हणोन आज्ञा, त्यास गांवगन्नांचे बोलीचे सुटकेविशीं खटपट फार करावी लागली. येथून राजश्री जनार्दनपंतभाऊस दोन तीन वेळ सुभानखान याचे गोटास येथून दोन कोस उतरले तेथें घेऊन गेलों. युक्तिप्रयुक्तीनें बोलोन पाहिलें, परंतु सुभानखान याची रीत चांगली नाहीं. नबाब निजाम नवाज जंगबहादूर यांनीं दोन वेळ आपणांकडील भले माणूस पाठविले, पत्रें पाठविलीं, परंतु त्याचे ध्यानांत येईना त्यापक्षीं घासदाणा कबूल करून बोली सोडविल्या. स्वामींचीं पत्रें आलीं तीं प्रविष्ट केलीं, परंतु सुभानखान सरदार माकुल बदमामली ! उपाय नाहीं. जसें म्हटलें तसें ऐकून उपद्रव मना केला. या बोभाटाचीं पत्रें पुण्यासीं नबाब निजाम नवाज जंग यांचीं पत्रें त्यांचे बंधु इंग्रजाकडील वकिलीस आहेत त्यांस व जनार्दनपंत यांचीं पत्रें श्रीमंत राजश्री नाना यांस पाठविलीं आहेत. उत्तरें आलेवर स्वस्थ सुभानखान राहतील. कही पाठवून मोडनिंबेची खराबी केली. गांवांत शिरोन दाणा चिरगुटें व गळ घेऊन आले. फार बदमामली म्हणोन बोभाटाचीं पत्रें उभयतांनीं मोंगलाईंतील वकील राजश्री शेषाद्रिपंत आहेत त्यांस डाकेबरोबर पाठविलीं आहेत. सुभानखान याचे कारभारी परवां आले ते मालसद आणि म्हैसकर यांचे खेडी बनकयावर रयतेस मना होईल मसलत-

खान पन्ही याणीं येतांना गांवगन्ना रोखे करून चार गांवचे पाटील आणिले होते त्यांची चुकोती करून सोडविले. येथील सरदार यानीं साहित्य चांगलें केलें. स्वामीचें पत्र घेऊन मीच गेलों. ते येथून तीन कोसांवर आहेत तेथें जाऊन त्यांची भेटी घेऊन पत्रें पावतीं करून उत्तर घेऊन पाठविलें आहे. या उपर तालुक्यास उपसर्ग करणार नाहीं म्हणोन ( त्यानीं ) वचन दिलें. संद्रारकर राजश्री जोधसिंग राजे बहादर यांस स्वामींचें पत्र दिलेवर बहुत संतोष झाला. " आपला व स्वामीचा घरोबा दोन पिढींचा. आपले चुलते आनीचंद्राजे यांचा व कैलासवासी श्रीमंत रावसाहेब यांजपासून चालत आला त्याप्रमाणें आपणांस अगत्य आहे. तालुका आपला आहे. उपसर्ग लागों देणार नाहीं. " याप्रमाणें अभय दिलें. संद्रारकर यांचा मुक्काम सुस्ते (?) जवळ आहे तेथें गेलों होतों. या खटपटीस पंधरा दिवस लागले. यामुळें ठाण्यास गेलों नाहीं. येथूनच बंदोबस्त राखून होतों. राजश्री विठोजी देशमुख यांस पाठवून दिलें. चार पांच रोज जाहले. आज निघोन करकंबेस जातों. करकंबची मंडळी गेली ते राहिले आहेत. तपशील—

मौजे निंबगाव परगणे टेंबुर्णी.

१ भगवंतराव आपा
१ आपा केसकर
१ आपाजीपंत साठे
१ बाबूराव विष्णु
———
४

रामाजी मल्हार हे अकलुजेस गेले होते तेथून येऊन मौजे उजनी येथें राहिले आहेत. तेथून पुढें गेले म्हणोन आतां वर्तमान एकलें.

मंडळी निघोन गेली. मी एकटा. बोभाट बहुत. स्वामीचे कृपेंकरून निवारण होत आलें. येवेळेस साहित्य राजश्री जनार्दनपंतभाऊ यानीं फारच केलें मोंगलाई सरदार यांस भीड मुरवत कोणाची नाहीं. परंतु म्हैसकर यानीं निभावून नेलें. नवाब बंदेगानअली यांजकडील फौज किती आहे ती लिहून पाठवणें म्हणोन आज्ञा, त्यास—

निजाम नवाज जंग यांचा सरंजाम.

३५०० फौज स्वार.
३५०० पायदळ. आरब व गारदी.
———
७०००
तोफा ५

सुभानखान.

२००० फौज. स्वार अजमार्स.
१२०० पायदळ. रोहिले वगैरे.
———
तोफा सुमार. ४

———

१ गोपाळराव गोविंद

| | |
|---|---|
| हत्ती १ | हत्ती. ५ |
| सलाबतखान पन्हीं. | जोधसिंगराजे खंदारकर. |
| २५०० फौज. | ३०० फौज स्वांर |
| १००० पायदळ कवायती वगैरे. | ३०० पायदळ |
| तोफा सुमार ४. | तोफा हत्ती |
| हत्ती ११ | ० १ |
| | कल्याणराव निंबाळकर. |
| | स्वांर ४०० |

येणेंप्रमाणें सरंजाम येथें जमा झाला आहे. सलाबतखान व खंदारकर यांचा मुक्काम सुस्तेनजीक आहेत. सुभानखान मौजे देगांव परगणे मोहोळ येथें आहेत. नबाब निजाम नवाजजंग श्रीक्षेत्राजवळ नदीपलीकडे दिपमाळे-जवळ राहिले. यांचे लगत कल्याणराव यांचें पथक आहे. मागाहून चार पलटणं व हजार स्वांर व तोफा अठ्ठावीस येणेंप्रमाणें श्रीतुळजापुरानजीक आल्याचें वर्तमान आलें आहे. येथें मिळावयासीं येणार म्हणोन सांगतात. ते कोठें उतरतात, काय करतात, पीडा आली आहे! कोणत्या मार्गे मिळाव-यासीं येतात हा सुमार पाहून येथील सरदार यांचीं पत्रें पाठवितों. खटपट करून पाहतों. आज करकंबेस जाऊन तेथील बंदोबस्त करून तेथें चिरंजी-वास ठेवून मी मागती येथें येतों. नेहमीं येथें राहिलें पाहिजे. गैरमाहिताचें काम नाहीं म्हणोन येथें राहिलों. आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९०३ श्रीगणपति. ( चैत्र व० ७–२६ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. आपण छ० १५ जिल्कादचीं पत्रें पाठविलीं तीं छ० १८ मिनहूस पावलीं. त्यांतील मजकुराचीं उत्तरें बितपशील—

मंगळवेढ्याहून पत्रें आलेलीं पहा-वयास पाठविलीं तीं पावलीं मजकूर समजला. बरें! श्रीनेंच पार पाडावें!

कलम १

दंगा भारी माजला सबब हरि- यशवंतराव शिवाजी याचें बोलणें कसकसें जाहलें हें लिहावें म्हणोन लिहिलें, त्यास त्यांचें बोलणें 'कलह मिटवावा किंवा कुमक यावी.' हशील इतकेंच. त्याजवरून याचें उत्तर

---

१ पत्र परशुरामभाऊंचें बाळासाहेबांस.

पुरास लिहून पाठविलें असतां त्यानीं जाबच दिला नाहीं म्हणोन लिहिलें तें कळलें. यास कोणीं काय करावें ? तें मतच वेगळें ! कलम १

राजश्री बाळोबा पागनीस यांस आणावयाकरितां गेले आहेत म्हणोन लिहिलें, त्यास पुण्याहून पत्रें आलीं त्यांतही असेंच लिहिलें आहे, कलम १

सांगितलें कीं, सरकारांत लिहून पाठवितों. उत्तर येईल तसें केलें जाईल. लढाईचा प्रसंग देशीं पाडू नये. याप्रमाणें सांगितलें. कलम १

महादजी भोईटे वारले. (बायांच्या) लष्करांत कोणेविशीं मर्यादा नाही. बाबाजीपंत चाफेकर निघोन आले, म्हणोन लिहिलें तें कळलें. कलम १

उभय सैन्य ऐक्य आहे याजकरितां सावधगिरी असावी म्हणोन लिहिलें तें कळलें. आमचा मुक्काम गोकाके-नजीक आहे. येथील ठाणें बसलें म्हणजे पुढील रोख.

एकूण सहा कलमें लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. रवाना छ० २० जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

छ० २२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र

नं. ४९०४ श्री. ( चैत्र व० ८–२७ एप्रिल. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन चैत्र व॥ चतुर्दशी. भृगुवार. दोन प्रहर दिवस.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें रामचंद्र श्रीधर काळे शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता॥ छ० २१ जिल्कादपर्यंत पुणें येथें वडिलांचे आर्शीवादेंकरून सुखरूप असें. विशेष. वडिलीं चार बंद पत्र तपशीलवार लिहिलें तें पाहून बहुत आनंद जाहला. मिरज प्रांताची कांहीं बाकी राहिली नाहीं म्हणोन लिहिलें, तैसेंच मंगळवेढें, करकंब, बरडोल या तिनी परगण्यांची दुर्दशा जाहली म्हणोन लिहिलें, तें खरेंच आहे. मी पुणीयास आलों तेव्हां समजुन विनंती केली होती, तेव्हां विचार करितों म्हणून आज्ञा जाहली होती, तें तसेंच राहिलें. आपण थोर. समय पडेल तशी वर्तणूक करावी. एखादें राज-कारण मोठें डोईवर घ्यावें तेव्हांच लौकिक होतो. बाया आल्या तेव्हांच आपले-

---

१ दंगा फार माजला. हरिपुरास राहूं नका. मिरजेस या, असें थोरली भावजय सरस्वतीबाई हिला लिहिलें असतां त्यानीं उत्तरच दिलें नाहीं.

कढे आणून लाख दोन लाख रुपये बायांस कबूल करून करवीरकर यांस मिळूं दिल्या नसत्या तर दिगंतीं कीर्ति होती. मुलूख बचाव होता. करवीरकर यांजवर दाब बसता. आपले विद्यमानें शिंदे आणि बायाचा तह होता म्हणजे लौकिक होता. तें केलें नाहीं. भाऊसाहेब सरकारचे पेंचामुळें दूर राहिले. समय वारंवार येत नाहीं. आज मिरज प्रांत कुरुंदवाड व तासगांव, तेरदाळ जमखिंडी इतका नाश जाहला तो पैका वसुलीपट्टी करून एखादा घाट करून विचार केला असता तर बरें होतें. मींही सुचविलें होतें. असो. होणार कसें चुकेल ? हल्लीं राजश्री तात्या पागनीस नगराहून आले आहेत. या उपरी बायांची समजूत होईलसा भास होतो. मग पहावें ! बहुशा तात्या पागनीस आले आहेत, सर्व बंदोबस्त करितीलसें भासतें. मग प्रजेचें दैव कसें आहे कळत नाहीं. हिंदुस्थानांत कंपू जाणार होता हें काय तें लिहिणें म्हणून आज्ञा, त्यास हिंदुस्थानांत पेरू म्हणोन कंपूचा सरदार आहे त्याचें पत्र या कंपू-वाल्यास आलें कीं, हिंदुस्थान लखबानें घेतलें. आम्हांस पलटणांचे खर्चास तालुका दिला तोही लखबानें घेतला. तात्या पागनीस ( कैदेंतून सुटून ) आले नाहीं तर शिंदे यांची दौलत रहात नाही. तर तुम्ही दौलतराव यांचा निरोप घेऊन येणें. जर तात्यांस आणलें तर आग्रह करून न येणें. तात्या सांगतील तशी वर्तणूक करणें. ऐशीं पत्रें येथें डुप्राट म्हणोन कंपूवाला आहे त्यास आलीं. तेव्हां शिंदे याजपाशीं जाऊन निरोप मागितला. या उपरी कंपूवालेदेखील रहात नाहींत ही खातरजमा जाहली. मग आंगरे मामा आणि दौलतराव याणीं विचार करून तात्यांस आणविलें. नंतर कंपूही आठ कोसांचे पुढें गेला नाही. आतां कोणी शिंदे याचे दौलतीत यावयाचें राहिलें नाही. तात्या या उपरी काय करितात पहावें. परंतु समेट होऊन जाणें अवघड दिसतें. मुख्य द्रव्यशोक सर्वत्र श्रीमंतांचे राज्यांत पडला आहे याजमुळें दौलत वांचणें संकट आहे ! टिपूची आणि इंग्रजांची लढाई जाहली. इंग्रज मागें सरला. मोगलाची फौज पांच हजार अगदीं बुडविली. अशी बातमी टिपूचे वकीलापाशील आहे. सरकारांत जी पैक्याची ओढ आहे ती ईश्वर जाणे. मुदबकास तांदूळ देखील नाहीं अशी गती दौलतीची आहे. अशीच सर्वत्र शिंदे होळकर आम्ही सुद्धां एकच दर ! भोसले नागपुराबाहेर निघाले आहेत त्यांसही आणविले आहेत. दीड महिन्याचे आंत येतील. सारांश अद्यापि प्रजेचा भोग सरत नाहीं. तात्या पागनीस आलेपासून मागती शहरचे पूर्वेस नाकेबंद्या रात्रीच्या करूं लागले सरकारांतून. शिंदे यांचे सैन्यांत

सामसुम असतात. कळावें. हें राज्य बुडावयास बाकी राहिली नाहीं. एक परचक्र मात्र उणें आहे ! जी गति खानदेशची जाहली तशीच हल्लीं मिरज प्रांताची जाहली जाहे. असो. ईश्वरी क्षोभ आहे. आज तीन वर्षे वडिलांवर जो कसाला आहे तो एक सर्वोत्तम जाणत असेल ! राजश्री आप्पाजी गोविंद यांस तगी वडीलीं फौजसुद्धां मिरजेपाशीं आणावयाचें होतें. हरकसें करून शहर मिरजेचें वांचवावें. नाहीं तर लौकिक रहाणार नाहीं. तीर्थस्वरूप रघुनाथराव दादाही कुटुंबसुद्धां मिरजेंत आहेत तेव्हां मिरजेचा तरी बचाव व्हावा म्हणजे पुरे ! येथें श्रीमंतांस व नानांस वारंवार तपशील लिहून फळ नाहीं. यांचे वस्तु कांहींच बंदोबस्त व्हावयाचा नाहीं. मग व्यर्थ करुणा भाकून फळ नाहीं. सर्वांची सत्वें गेलीं आहेत. वडील सर्वजाण आहेत तेथें मी काय ल्याहावें ! मोगलाची फौज सरकारचे लक्षानेंच आली आहे. कळावें. तात्या पागनीस आले हीं पत्रें पहिलींच लिहिलीं आहेत. ही सूचना वडिलांस आपली जावी. ती॥ राजश्री विठलराव बापू येथें आज तीन वर्षे आहेत. शरीरेंकरून बहुत कृश जाहले आहेत. त्यांस वडिलीं साहित्य पाठवून मिरजेस न्यावें म्हणजे दैवी मानवी उपाय होईल. श्रीमंत निरोप देतों असें बोलले आहेत. दिकत पडणार नाहीं. शरीरभावनेंत कांहीं भूतबाधा दिसती. एकदा शरीर तुटलें ( म्हणजे ) मग सांवरणें कठिण आहे. त्यास वडिलीं साहित्य पाठवून न्यावें. येथें बापूसाहेबांस चार रुपये देणें जाहलें आहे त्याचा विचारही वडील करितीलच. रा॥ धोंडोपंत जोशी यांस आज्ञा यावी की बापूसाहेब येऊं लागले म्हणजे ज्याचें देणें आहे त्यास समजून सांगून चिरंजीवाची रवानगी करणें. ऐसें आज्ञापत्र यावें म्हणजे बापूसाहेब बिनदिक्कत निघून येतात. शरीरानें बहुत रोड जाहले आहेत. शरीराकडे पहावत नाहीं. आपलेपाशीं आले म्हणजे उपाय होईल यास्तव विनंती लिहिली आहे. वडिलीं तपशीलवार राजकी वगैरे लिहिलें तें सर्व नानांस सांगितलें. ऐकून घेतात. ' तुम्ही थोर सरदार. तम्हीच रड सांगूं लागलां तर आम्ही काय करावें ? पुण्यांत ( शिंद्याचे लोक ) कह्या करितात तो बंदोबस्त येथें होत नाहीं. मग अठरा गांवांवर आम्ही काय करावयाचें ! ज्याचें त्याणें संभाळावें असे दीस आले आहेत; " ऐसें म्हणणें पडतें. यांत सर्व आहे. अधिकोत्तर जें आढळेल तें मागाहून लिहीन. बहुत काय लिहिणें कृपालोभ करावा श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९०५ श्रीगणराज. ( चैत्र व० ८–२७ एप्रिल. )

पै॥ छ० २१ जिल्काद. सन तिस्सा तिसैन चैत्रमास.

विज्ञापना. छ० १६ जिल्कादीं श्रीमंत राजश्री अमृतरावसाहेब याणीं भोजनास मला बोलाविलें होतें. मुंजीचे अहेर परत झाले. तीर्थस्वरूप त्रिंबकराव टकले यांचा काल झाला, ती॥ सौ॥ आत्या सहगमन गेली, म्हणोन लिहिलें; त्यास आत्याबाईनीं सार्थक केलें. त्रिंबकराव चांगले गृहस्थ गेले. ईश्वरसत्तेपुढें उपाय नाहीं. हल्लीं माझी प्रकृत सुमारांत आहे. परंतु निद्रा लागत नाहीं. राजश्री बाळोबा पागनीस मांजरीच्या मुक्कामास आले. इंदुवारीं अनुराधांवर भेटी शिंद्याच्या त्यांच्या होणार याजप्रमाणें आहे. वडिलांचें कूच होऊन कित्तुराकडे गेले म्हणोन लिहिलें तें कळलें. शिंदे व होळकर यांचें देणेंघेणेंच्या खटल्यामुळें वैमनस्य आलें आहे असें ऐकतों. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. चिरंजीव राजश्री बाबा फडणीस यांचा लाखोटा पाठविला आहे. हे विज्ञापना.

नं. ४९०६ श्री. ( चैत्र व० ८–२७ एप्रिल. )

पै॥ छ० २१ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

विज्ञापना. राजश्री नाना आज दोन प्रहरीं भोजनास श्रीमंत राजश्री अमृतरावसाहेब यांजकडे गेले आहेत. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९०७ श्री. ( चैत्र व० ८–२७ एप्रिल. )

पै॥ छ० २२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

सेवेशीं महादाजी विठ्ठल कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २१ जिल्काद मंदवार प्रातःकाल यथास्थित असे. विशेष. हुजूरचा मुक्काम अद्याप बोरगांवाजवळच आहे. पुढें गोकाकेस फौज पाठवणार. परंतु कोणी जावयास पाय घेत नाहीं. आणि खर्चाविशीं गलबल बहुत आहे. पांढरे व पाटणकरांकडील पांच सातशें स्वार पुढें हिरेकुडीच्या सुमारें गेले आहेत. राजाज्ञा देवास गेले आहेत ते येथें लष्करांत आले म्हणजे कांहीं फौज पुढें रवाना करणार. व राजाज्ञा सामानगडाचे रोखें जाणार. खासा स्वारी करवीरास जावी असें ही म्हणतात. कसें घडतें पहावें. एक दिवस आह्मांकडील शिर्दवाडास कही आली होती. येथें ही लोकांचा भरणा करून हुशारीनें आहों, राजश्री देवराव चौगुले व सूर्यवंशी शिंगरें न्यावयास निरोप घेऊन आले होते. त्यास लष्करनजीक राहिले. कही एक दिवस शिर्दवाडास आली त्याजमुळें

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची पत्र विठ्ठलराव पाडुरंग यांचें मिरजेस. २ बाळाजी गणेश जोशी हिपरगीकर याची चिठी पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस. पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. ३ दातार फडणीस यांचें पत्र इचलकरंजीहून बाळासाहेबांस मिरजेस.

त्यांस चार दिवस येथें ठेऊन घेतलें होतं. काल बायांकडील फौजेची कही बोलवाडानजीक येऊन इकडील तिकडील लढाई झाली म्हणोन येथें बातमी आली त्याजवरून चौगले व मंडळी निघोन आपणाकडे आले आहेत. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम कोठें आला, गोकाक घेतली असें बाजारी येथें बोलतात, त्यास तेथें लिहिलें आलें असेलच तें कळविलें पाहिजे. पुण्यास पागनीस आले म्हणतात. तिकडील वर्तमान समजलें नाहीं. तरी सविस्तर लिहावया आज्ञा झाली पाहिजे. बायांकडील फौज राजमंडळचे कुमकेस यावी असें बोलणें लागलें आहे. पुढें काय होतें पहावें. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९०८ श्री. ( २८ एप्रिल. )

पै।। छ० २१ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी दोनी कर जोडून त्रिकाल चरणावरी मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार. विज्ञापना. तागायत चैत्र वद्य ९ रविवार प्रातःकाल पावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें जासुदासमागमें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री बाळकृष्णपंत बाळ भाऊ यांजवळ राजश्री बाबा काळे यांच्या नांवें लखोटे होते ते त्यांस पावते केले. राजश्री बाबा काळे याणीं पत्रांचीं उत्तरें लिहून पाठविलीं. हल्लींचे जासूदासमागमें असतील. भाऊनीं जाब दिला नाहीं. दिला म्हणजे आज्ञेप्रमाणें वडिलांकडे पाठवितों. भाऊनीं वडिलांच्या नांवें लखोटे तीन व ती।। राजश्री मोरोपंतदादांच्या नांवें एक व दादासाहेब यांच्या नांवें लखोटा एक, एकूण पांच दिले ते पाठविले आहेत. राजश्री बाळोबा व धोंडीबा व मोदी शिंदे यांस भेटोन शिंदे यांणीं जवाहीर वस्त्रें दिल्याचा तपशील पेशजी राजश्री उमाण्णानाईक नरगुंदे यांजकडून रजपुत हुंड्या सावकारी घेऊन आले ते माघारे मागती गेले त्यांबरोबर सर्व मजकूर वडिलांस लिहून पाठविला आहे त्याजवरून कळों आला असेल. इंग्रजानें नबाबाकडील फौज कुमकेस नेली आहे. इंग्रजाचीं पलटणें दहापर्यंत व नबाबाकडील फौज अशी पट्टणानजीक तीस कोसांवर ( एका ) किल्ल्यास लागली होती. फितूर किल्ल्यांत जाला. किल्लेदार याणें टिपूस सांगून निशाणही वर घेतलें. नंतर टिपूकडील जमाव त्याचे दोघे पुत्र घेऊन आले. इंग्रजाजवळ व नबाबाकडील फौज किल्याचे आसऱ्यास होती. इशारत होतांच किल्यावरून मार झाला व दोन टोळया करून टिपूचे पुत्र आले. लढाई मातबर जाहली. तीन हजार घोडा

टिपूकडील पडला. इंग्रजांचीं पलटणें कापून काढून नबाबाकडील चार हजार घोडे पाडाव नेले. बाकी फौज नबाबाची लुटली गेली. इंग्रजाकडील मातबर सरदार एक मृत्यु पावला. एक सांपडला. तोफा सरंजाम अवघा टिपूस सांपडला. याप्रमाणें गांवांत व सरकारांत ही दाट बोलवा आहे. टिपूचा एक पुत्र पडला. हे विज्ञापना.

नं. ४९०९ श्री. ( चैत्र व० ९–२८ एप्रिल. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र व॥ १४ भृगुवार. सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २२ जिल्कादपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० १४ जिल्कादचें पत्र मजला पाठविलें तें पावलें व श्री॥ राजश्री नानांस पाठविलें तें पाहून प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठविलें आहे. त्यावरून विदित होईल. "करवीरवासी महाराज व बाया आजपावेतों एकच आहेत. महाराज इंगळीवर होते ते कूच करून चंदूर देशपांडे मिरजप्रांतींचे (यांचें गांव आहे तेथें) श्रीकृष्णातीरीं आले. तेथून शिरोळ घुमटाचें येथें नरसोबाचे वाडीवरून स्वारी जाऊन मागती मुक्कामास आले. इचलकरंजीकर घोरपडे याणीं ब्राह्मणांस टाकळी हा गांव अग्रहार देऊन वाडा बांधोन ब्राह्मण वीस ठेविले होते. त्यांस महाराजानीं धरून नेऊन चौकींत ठेविलें आहेत. गांवची व अग्रहाराची तसनस केली व इचलकरंजीकर यांचें ठाणें टाकळीचे वाडीस होतें त्यास तोफा लावून खंडणी घेतली. महाराजानीं व बायांचे फौजेनें मिरज प्रांताची बाकी ठेविली नाहीं. बायांकडील पठाण सांप्रत वाळव्यांकडे आहेत. बायांचें कूच होणार होतें. परंतु धारराव शिंदे यांचा मूल मेल्यामुळें उगारानजीक आहेत. बाया व महाराज मार्कंडेश्वर कृष्णातीरीं येणार. मिरजेपासून दीड कोशावर. तेथें येऊन पेठेवर गलबल करावी या विचारांत आहेत. ती॥ राजश्री भाऊसाहेब पाच्छापुरानजीक आहेत. अलीकडे आल्याचें पत्र आलें नाहीं. बक्षी व यशवंतराव शिवाजी वडिलांकडे गेले होते. बक्षीची भेट जाहली नाहीं. यशवंतराव याची भेट जाहली. बोलण्याचा भाव लिहून आला नाहीं. आलियावर लिहून पाठवितों. बक्षी व यशवंतराव बायांजवळ माघारे आले. सरकारांतून बंदोबस्ताची उपेक्षा बहुत होत आहे याचा विचार श्री॥ नानांनीं करावा;" म्हणून आज्ञा आली, व चिंतो आत्माराम नि॥ शिंदे याणी करकंब व मंगळवेढें व बरडोल तीन महाल पैका घेऊन खराब केले. घरास आग × × × × वगैरे सरदार पलटणें शिंदे यांजकडील तूर्त तिकडे ××× बाळोबा पागनीस नगराहून

शिंदे × × × आहेत. सरकारांतून फौज तिकडे रवाना करावयाचा विचार होत आहे. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांस सरकारचीं व श्रीमंत नानांचीं पत्रें परभारीं गेलीं आहेत त्याच्या नकला चार आणीक एक एकूण पांच आपणास इतल्ला असावा म्हणून श्री।। राजश्री नानानीं पाठवाव्या म्हणून सांगितलें त्यावरून पाठविल्या आहेत. त्यावरून कळेल. उत्तर आल्यावर सविस्ताराचे भाव लिहून पाठवीन. तूर्त फौज तिकडे वडिलांची आहे ती महाराज व बाया मिरजप्रातीं येणार या अर्थीं वडिलांचें येणें समीप जाहलियास फार चांगलें. स्वामींचें पत्र वडिलांस जावें. भाऊसाहेब समीप आले असतां राजे व बाया मिरजेस जवळ येणार नाहींत. राजश्री मोरोपंत परांजपे यांस जाऊन बहुत दिवस जाले त्यांची रवानगी सत्वर जाली पाहिजे. राजश्री बाबा काळे येथें आले आहेत परंतु बहुता ठिकाणीं जातात हा संशय श्री॥ नानास बहुत आहे. याचा भाव व साखी कशी आहे हें स्वामीस विदित असल्यास लिहून आलें पाहिजे. माझ्या पत्रीं हा मजकूर लिहून यावा. सरकारची फौज तूर्त तिकडे येत नाहीं. भाऊसाहेबांचें उत्तर आल्यावर रवानगीचा विचार ठरेल. येथें रात्रंदिवस हुशार बहुत आहेत. स्वामींनीं व श्री॥ दादासाहेब याणीं फौजसुद्धां रात्रं दिवस बहुत हुशार राहून किल्याचा बंदोबस्त चांगले प्रकारें करून चोहोंकडील बातमी वरचेवर येत असावी. नबाबाचे फौजेंत राजश्री जनार्दनपंत म्हैसकर आहेत त्यांजकडून स्वामीच्या महालांस वगैरे उपद्रव नाहीं. नबाबाची वरात आहे. वराते प्रों ऐवज नबाबाचे सरदारांस लिहून घेतात. याजकरितां रा॥ बाबूराव म्हैसकर यांस तसदी नसावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९१० श्री. ( २८ एप्रिल. )

पै॥ छ० २७ जिलकाद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र वद्य ९ वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. टिपूकडील फत्तेचें वर्तमान गांवांत व शिंदे यांचे लष्करांत व सरकारांत बोलतात. येविशीं मजकूर आम्हीं अलाहिदा पत्रीं लिहिला आहे. कोंकणांत संगमेश्वरास इंग्रजांची पलटणें तीन उतरलीं होतीं तीं माघारीं मुंबईस गेलीं. सरकारांत खलबतें श्री॥ राजश्री बाजीरावसाहेब व अमृतराव व नानांचीं पांचसात वेळां जाहलीं. नानाही वाड्यांत भोजनास गेले. नानांची प्रकृत बरीच जाहली. पलॅटणें[1] रावसाहेब यांचें सूत्रें लक्ष्मणपंत नातू यांणीं पाठविलीं

---

१ पुण्याहून पेशव्याचीं दोन पलटणें राघोपंत भट सरसुभे यांजकडे हुबळीस गेलीं ती.

होतीं. परंतु निखालसता जाली. त्यावरून मग माघारीं गेलीं. याजप्रमाणें बाजारी वर्तमान ऐकींव लिहिलें आहे. राजश्री बाळकृष्ण बाळ भाऊंनीं दोन तीन वेळां पत्रें दिलीं तेव्हां मग अजुरा करून पत्रें पाठविलीं. अजुरा पडला हल्लींही अजुरा करून पाठविणार होतों. परंतु काळे यांजकडील जासूद गेले यास्तव अजुरा न पाठविला. त्यास दोन जासूद कांहीं दिवस येथें असल्यास पत्रें भाऊंकडील येतांच पाठवीन. याचें उत्तर वडिलीं काय तें लिहून पाठविण्यास आज्ञा करावी. राजश्री बाळोबा व धोंडीबा यांच्या व श्रीमंतांच्या व नानांच्या भेटी व्हावयाचा बेत होत आहे. कधीं होतील पहावें. बाळोबा लष्करांत आल्यावर शिंदे यांसीं बोलणें होऊन बायांकडे पत्रें रवाना जाहलीं. तिकडून जाब आल्यावर धोंडीबा बायांकडे जाणार. बायांचा समेट होईल अशी बाजार बातमी आहे. वडिलांस कळावें. श्री॥ राजश्री बापूसाहेब यांची प्रकृत अलीकडे बरीच आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९११ श्री. ( चैत्र व० ९–२८ एप्रिल. )

पै॥ छ० २२ जिल्काद. सन तिस्सा तिसैन.

सेवेशीं मुकुंद नारायण भिडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २२ जिल्कादपर्यंत मुक्काम लष्करनजीक इंगळी येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ० २१ रोजचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. श्रीमंत राजश्री आपासाहेबांस पुत्र झाला म्हणोन लिहिलें; फार संतोष झाला तो पत्रीं कोठवर लिहावा ? इकडील मजकूर करवीरकरांचा मुक्काम सदलग्यावरच आहे. त्यांजकडील बचाजीपंत व नागोजी घाटगे असे दोन हजार फौजेनिशीं राजश्री बाळाभाऊबरोबर वडिलांकडे गेले आहेत. कृत्रिमाचें पाऊल या उभयपक्षीं आहेसें दिसतें. याजकडील मशारनिल्हेबरोबर दोन हजार फौज गेली आहे. राजश्री बाळोबा पागनीस व धोंडीबादादा व बाजीबा मोदी हे त्रिवर्ग वद्य तृतीया सोमवारीं पुण्यास आले. श्रीमंत राजश्री दौलतराव यांच्या भेटी झाल्या. बाळोबांचें मातुश्री बाईस काल पत्र आलें होतें त्यांतील भाव कीं माघारें यावें हा होता. परंतु दुसरें पत्र येईल तेव्हां निश्चय होईल. हे विज्ञापना.

नं. ४९१२ श्री. ( चैत्रव० १०–२९ एप्रिल. )

छ० २३ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

---

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस बायांच्या लष्करांतून.

स्वामीचे सेवेशीं यशवंतराव शिवाजी साष्टांग नमस्कार विनंती तागायत छ० २३ जिल्कादपावेतों यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावोन लिहिला मजकूर कळला. इकडून पत्र लिहितों तो मजकूर गाळून पत्राचें उत्तर येतें; यास्तव परस्परें मजकूर समजला पाहिजे याजकरितां मागाहून कारकून पाठवून देतों, म्हणजे सविस्तर समजेल. भालदार यांचीं उंटें तट्टें सरंजामसुद्धां सोडून देविलें म्हणोन लिहिलें, त्यास भालदार येथेंच आहे. घोडें तट्टू आलें नाहीं व आमचेही उंट आले नाहीं. मेंढरें आमचे लोकांनीं वळून आणिलीं त्यामुळें उंट आणले म्हणोन लिहिलें, त्यास मातुश्रीकडील लुगारे येऊन मेंढरें नेलीं आणि आमचे उंट कडबा भरीत होते ( ते तुम्ही ) गांवाजवळून नेले ! त्यामुळें आमचेही लोक धांवले. आम्हांस न कळतां आम्हीं मागांच होतों. आम्ही गोटांत आलों असतों तर आमचे लोक न जाते. कारण आम्हीं तर मिरज आपलें घर जाणतों. आम्हीं आपल्याकडील गांवांशीं काडीचा उपसर्ग लागूं दिला नाहीं. पठाण वगैरेंचा उपसर्ग लागला असेल. त्यास उंट दोन व चोपदाराचें घोडें तट्टू ऐसे पाठवून द्यावें. अगर तेवढें ठेविल्यासारखें नुकसानी पुरी पडतीसी दिसल्यास मर्जी आपली ! तीन घोडीं मातबर आमचीं पडलीं. विनाकार्य आम्हीं लढावें कोणाशीं ? परंतु गांवाजवळ स्वार आले आणि उंट नेलेमुळें आम्हीं नसतां लोक गेले. बरें ! झालें तें उत्तम. उंट आपले, आम्हींही आपले, हेंच जाणोन घोडीं उंट पाठवावे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ४९१३ श्रीगणपति. ( चैत्र व० १०–२९ एप्रिल. )

पै॥ छ० २५ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

पु॥ अपत्यें कृष्णानें दोनी कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २३ जिल्काद इंदुवारपर्यंत वडिलांचे आशीर्वादें यथास्थित असे. विशेष. बायांचें व वडिलांचें ऐक्य आहे अशी जनवार्ता आहे, परंतु दिसण्यांत येत नाही. प्रांतास उपद्रव बहुत करितात यावरून लौकिकांत सत्य भासत नाहीं. शिंदेची व नबाबाची फौज बायांवर जाणार अशी दाट आवाई आहे. नबाबाचे फौजेंत अधिकार श्रीमंत नानांचा आहे. वडिलांस दोन पलटणें सामील नानांचे विचारें आलीं असेंही लोकांचें म्हणणें आहे. यास्तव यांतील भाव लिहावया आज्ञा झाली पाहिजे. यानंतर शिराळेकर यांचे वरातेचा तगादा येथें झाला आहे येविशींचें पुणेंस वकिलास लिहून

---

१ पत्र बाळासाहेबास. २ पत्र मंगळवेढ्याहून बाळासाहेबांस मिरजेस.

श्रीमंत नानाची मनाचिठ्ठी आलिया बचाव होईल. नाहींपक्षीं वडिलांची फौज दोन तीन हजार तरी यावी म्हणजे ठांसून राखावयासीतरी येईल ! तें तूर्त होत नाहीं तर पुणेंस तरी मनाचिठ्ठीविशीं सत्वर लिहावयाची आज्ञा झाली पाहिजे. दिवसगत लागल्या आमची स्थीत रहात नाहीं. खेड्यांनीं चिठ्या दिल्या आहेत. परंतु खेडीं वोस आहेत. तेव्हां ते येथेंच येऊन जक्कड बसविणार. फौजेच्या बळावर ते कोणास खातरेस आणीत नाहींत. बरें ! ईश्वरी कृपे वडिलांची स्वारी इकडे येईल तेव्हां तेही आम्हांस उपद्रव करणार नाहींत ! येथें नित्यानित्य उपद्रव अधिक होतो यास्तव माणसें जलद रवाना केलीं आहेत. उत्तरासी सत्वर आज्ञा झाली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४९१४ श्री. ( चैत्र व० १०–२९ एप्रिल. )

सेवेशीं बाळाजी गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २३ जिल्काद इंदुवार चौथा प्रहरपावेतों स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान काल संध्याकाळीं श्रीमन्महाराजांचीं पत्रें श्रीमंत मातुश्री बायांस आलीं कीं, आम्हीं फौजसुद्धां गोकाकेस जातों. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचा व आमचा लढाईचा प्रसंग पडलेस आपण फौज घेऊन सामील व्हावें, म्हणोन लिहिलें होतें. त्यास याणीं उत्तर दिलें कीं उत्तम आहे. पुणेंकडील राजश्री बाळोबातात्या पागनीस यांचीं पत्रें आलीं होतीं कीं, पत्रें पावतांच कूच करून जलदीनें वानवडीस यावें म्हणोन लिहिलें होतें. याणीं उत्तर दिलें कीं, निघोन येतों म्हणून दिलीं. त्यास काल प्रहर रात्रीस कुचाचा मजकूर ठरला होता कीं कूच करून जुगूळ शहापुरावर मुक्काम करावा असें ठरलें होतें. इतक्यांत राजश्री बाळाभाऊ यांचा भाऊ साबाजीबाबा म्हणोन आहेत त्यांस पोटशुळाचा उपद्रव झाला म्हणोन मुक्काम झाला. त्यावर आज तिसरे प्रहरास पुणेंहून सांडणीस्वार आला त्या पत्रांतील सविस्तर कीं श्रीमंत राजश्री दौलतराव शिंदे यांजकडून वकील राजश्री नारो कृष्ण यांसीं पाठविला आहे कीं, मातुश्री बायांसीं बोलून घेऊन येणें म्हणोन रवाना केला आहे. याप्रमाणें लिहिलें आहे. राजश्री बाळाभाऊ व राजश्री नागोजी घाटगे झुंझारराव व बचाजीपंत हे येथून गेले. आज चार दिवस झाले. बागेवाडीवर मुक्काम आहे. गोकाक अद्याप लढती आहे. पालाविशीं तीन चार पत्रांत विनंती लिहिली. परंतु स्वामींस विनंती लिहून आज्ञा आणवितों म्हणोन अजम मिरा पाटील याणीं लिहिलें होतें. त्यास उन्हाळा

फार. सारीं माणसें उन्हांत भाजतात. येविशीं विनंती सेवेशीं लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होईल हे विज्ञापना.

नं. ४९१५ श्रीशंकरप्रसन्न. ( चैत्र व० १०—२९ एप्रिल. )

पै॥ छ० २६ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

पु॥ राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

विनंती उपरी. श्रीमंतांचीं आज्ञापत्रें एक दोन आलीं व वडिलांची आज्ञा आली जे, भेटीस यावें. त्याजवरून आज छ० १३ जिल्कादीं सोमवारीं सढे निघोन पुण्यास गेलों. राजश्री दिवाणजी व राजश्री बाबा फडणीस फौजसुद्धां म्हसवेंनजीक मुक्कामीं आहेत. तिकडील वरचेवर वर्तमान दिवाणजीकडे येत जावें. जागजागां जमाव आहे. विश्वास कोणाचा नाहीं. यास्तव बातमी कळेल तशी लिहून पाठवीत जावी. राजश्री भाऊंकडे पत्र पाठविलें आहे, त्यास आपले गडी जात येत असतील त्यांचे सोबत लावून देऊन गडी पुढें रवाना करावे. रवाना छ० २३ जिल्काद. निरुपाय जाणोन पुण्यास गेलों. भाऊंकडील ऐवजाविशीं कशी निकड बसेल तें कळत नाहीं. मिरजेस राजश्री बाबाकडे चिठ्ठी दिली तों बाबा निघोन गेले. त्यांसही हिसका पडला. पुढें प्राप्त गोष्टीस निर्वाह भाऊनीं केल्यावांचून परिणाम नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४९१६ श्रीगणपति. ( चैत्र व० १०—२९ एप्रिल. )

पै॥ छ० २३ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

तीर्थस्वरूप राजश्री काका वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें हरीनें करद्वय जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २३ जिल्कादपावेतों मुक्काम मंगळवेढें येथें सुखरूप असों. विशेष. अलीकडे वडिलांकडून पत्रें येऊन वर्तमान कळत नाहीं तर सदैव पत्र पाठवून सांभाळ केला पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तर नवाबाची फौज क्षेत्रावर आहे. वरचेवर जमाव होतच आहे. आठ चहूं दिवशीं तेथून निघोन जाणार असें वर्तमान आहे. कोणीकडे जातात पहावें. राजश्री चिंतो आत्माराम नि॥ शिंदे सोलापूर प्रांतांत गेले आहेत. मागाहून राजश्री बाबूराव आंग्रे फलटण-

१ पत्र माधवराव रास्ते यांचें. २ हरिहरराव पुरुषोत्तम. आम्हीं छापिलेली हरिवंशाची बखर ज्यानीं लिहिली त्या बाळकृष्ण हरीचे हे वडील.

णच्या सुमारें आले आहेत. तेही याच मार्गानें येणार असें म्हणतात. सारांश प्रांताचा भोग आला आहे. श्रीकृपेंकरून स्वस्थ होईल तो सुदिन. राजश्री बजाबा शिराळेकर यांची वरात तीस हजार रुपयेची येथें झाली आहे तो दंगा बहुतच आहे. परगण्यांत तों त्राण किमपि राहिलें नाहीं. वडिलीं पुण्यास मनाचिठी आणविल्यासच बचाव होईल. नाहीं तर बचाव होत नाहीं. मनाचिठी सत्वर येई असें झालें पाहिजे. सविस्तर चिरंजीव राजश्री कृष्णराव यानीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. सेवेशीं विदित होय. तिकडील सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें. तीर्थस्वरूप राजश्री भाऊंचा मुक्काम कोठें आहे हें लिहावें. कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४९१७ श्रीगणपति. ( चैत्र व० १२–१ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. आपण पत्रें पाठविलीं तीं पावलीं. चिरंजीव राजश्री रामचंद्र श्रीधर काळे यांचे लाखोटे पुण्याहून आलेले पाठविले ते पावले. त्याचे जाब मागाहून पाठवितों. पत्रांतील मजकूर इंग्रेजाची कुमक करण्याची गोष्ट कबूल करावी, राजश्री बाळोबा तात्या हडपसरास आले, इतका मजकूर आहे. मशारनिल्हेस नगराहून आणिलें ही खबर चहूंकडून आली आहे. पुढें कोणता डौल आहे तो समजत नाहीं. आम्हीं गोकाकेनजीक आहों. येथील ठाणें करवीरकरांकडे होतें त्यास वेढा देऊन तोफा सुरू केल्या तेव्हां आंतील लोकांनीं कौल घेतला. ठाण्यांत इकडील लोक छ० २३ जिल्कादीं गेले. याउपर येथून लवकरच कूच आहे. शिंदे बायांकडून राजश्री बाळोबाभाऊ येथें यावयाकरितां बागेवाडीनजीक येऊन उतरले आहेत. आलियानंतर ठरावांत येईल तें लिहून पाठवूं. चिरंजीव सौभाग्यवती लक्ष्मीबाई मुलासह सुखरूप आहे म्हणोन लिहिलें तें कळतें. संतोष झाला. करवीरकर खुद्द क्षेत्रास गेले. बायांचें व त्यांचें बिनसलें अशीं वर्तमानें उठलीं आहेत. त्यास आपल्या बातमींत काय आहे तें लिहावें. नरसीपूरकर बावांस वगैरे उपद्रव झाल्याचें लिहिलें तें कळलें. ईश्वरी इच्छा प्रमाण ! रवाना छ० २५ जिल्काद. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै ॥ छ० २५ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

नं. ४९१८ श्रीगणपति. ( १ मे. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र

वद्य १२ बुधवारपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलांकडून आशीर्वादपत्र येत नाहीं तर सदैव पत्रीं सांभाळावें. इंदुवारीं गोकाकेंत ठाणें बसलें. काल भौमवारीं बाळोबा बक्षीची भेट झाली. आज वडिलांचें कूच होऊन येथें यावेसें होतें, परंतु वैधृतीमुळें मुक्काम झाला. उद्यां कूच होईल. बक्षीबरोबर पावणे तीनशें घोडें लहान थोर आहे. करवीरकरांचे वकील घेऊन बागेवाडीपर्यंत आले. गोकाकचें ठाणें पडल्याचें कळून ते वकील माघारे गेले. आज वडिलांचे दर्शनास ते जात आहेत. बोलणें जाहलेवर कळेल तें सेवेशीं लिहितों. करवीरकरांचे फौजेंतील वर्तमान कळेल तें ( लिहावयास ) आज्ञा झाली पाहिजे. थोडे बहुतांनिशीं अंगावर येतील असें वाटत नाहीं. आले तर उभयतां महापुरुष बावांचा आशीर्वाद पूर्ण आहे. श्रीगजानन यश देईल. यशवंतराव शिवाजीचा मुक्काम कोठें आहे ? पहिली झटपट झाली त्या अलीकडे वर्तमान कळलें नाहीं, तर आज्ञा करावी. पुण्यास ढालगांवकर आले म्हणोन ऐकलें, त्यास कसे आले ? बळिरामाचें त्यांचें व नरवोंडकर यांचें कसें आहे ? किंवा मागती घोळच आहे तें समजण्यांत आलें असेल ते आज्ञा झाली पाहिजे. या फौजेंत धरणें पारणेंसीं संबंध आहे ! दीक्षितबावानीं आशीर्वाद पूर्ण दिला आहे जे दोन मास दम धरला म्हणजे पैका पावेल. कोणी कोणी शिलेदार धीर धरून आहेत. कोणास धीर निघत नाहीं ते दंगा करतात ! ईश्वर कृपाकर आहे. सर्वही निर्विघ्न होईल. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९१९ श्री. ( चैत्र व० १२– १ मे. )

पै॥ छ २७ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्रमास.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेश राम पेठे शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २५ जिल्कादपावेतों सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. परगणे गोकाक येथें छ०२३ जिल्कादीं ठाणें घातलें. राजश्री नारोपंत जोग यांचे स्वाधीन केलें. आज अदकोसाचें कूच आहे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांची प्रकृत बरीच आहे. आम्ही काल तिकडे गेलों होतों. मिरजेकडील मजकूर जोती खिजमतगार यानें जबानी सांगितला

---

१ नारायणराव बक्षी व बाळाभाऊ २ चिदंबर दीक्षित व श्यामभट बावा. ३ ढालगांवास पेशवे सरकारची पागा होती एवढ्यावरून पागनीस बाळोबा तात्या याचें सांकेतिक नांव ढालगांवकर ! ४ बळिराम म्हणजे बाळाजीपंत नाना फडनवीस ५ नरवाडकर सरंजामदार मिरजसंस्थानांत आहेत त्यांचें आडनांव शिंदे आहे. त्यावरून दौलतराव शिंद्यांचें सांकेतिक नांव नरवाडकर !

त्यावरून कळला. इकडील मजकूर कारखानेंतील लोकांस रोजमरा सवा-ळचा काळ दिला. ऐवजाची वोढ आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९२० श्री. ( २ मे. )

पै॥ छ० ३० जिल्काद. सन तिस्सा तिसैन. वैशाखमास.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी दोनी कर जोडून त्रिकाळ चरणांवरी मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत चैत्र वद्य १२ प्रातःकालपावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें जासुदासमागमें पाठविलीं तीं पावलीं. “ चिरंजीव राजश्री रामचंद्रपंतआपानीं गोकाकेस मुक्काम केला. तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब दोहों दिवशीं तेथें येणार असें वडिलीं लिहिलेचें कळलें. चिरंजीव राजश्री बाबा फडणीस यांस व राजश्री भाऊ बाळ यांस पत्रें लिहिलीं आहेत, देणें. खासोटे जिक-डील तिकडे प्रविष्ट करणें. भाऊ बाळ यांजकडील जाब लौकर न आल्यास माणसें ठेऊन घेऊं नये. बाबा काळे यांचा मात्र जाब घेऊन रवाना करणें. मंगळवेढें यास चिंतामण आत्माराम निसबत शिंदे यांची फौज उतरून उपद्रव बहुत मांडला आहे येविशीं राजश्री भाऊबाळ व बाबा काळे यांस लिहिलें आहे. स्मरण वरचेवर देऊन मनाचिठी परभारें मंगळवेढ्यास रवाना होय तें करणें ” विशीं पत्रीं आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें उभयतांस मंगळवेढ्याचे पत्राचें स्मरण करतों. परंतु कालच मंगळवेढ्याहून गडी राजश्री बाबा काळे यांजकडे आले आहेत त्याणीं सांगितलें कीं मंगळवेढ्याची खंडणी चाळीस हजार करून घेऊन कंपू शिंदेकडील सोलापुराकडे गेले असें गड्यांनीं सांगितलें. त्यास राजश्री बाबा काळे याणीं पक्कें वर्तमान तिकडून पत्रें आल्याचा भाव वडिलांस लिहिला असेल. राजश्री बाळकृष्णपंतभाऊ यांस पत्रें प्रविष्ट केलीं व बाबा काळे यांस प्रविष्ट करून बाबांचें पत्र घेऊन पाठविलें आहे. श्रीमंतांचें व नानांचें खलबत रावसाहेबसमेत[1] एक दिवसाआड होत आहे. फार करून विश्रामबागांत होतें. नाना वाड्यांतही जातात. नानांची प्रकृत चांगली झाली. बाळोबाकडून बायांकडे कारकून गेले आहेत ते आल्यावर धोंडीबा तिकडे जाणार. बाळोबा तूर्त सरकारांत व नानास भेटीस याव-याचा बेत आहे असी आवाई आहे. कळावें बहुत कांय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ अमृतरावासह.

नं. ४९२१ श्री. ( चैत्र व० १३–२ मे. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

सेवेशीं गणेश गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० २६ माहे जिल्काद मुक्काम नजीक गोकाक येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० २१ तारखेचें पत्र जोती खिजमतगाराबरोबर पाठविलें तें छ० २४ तारखेस प्रातःकालीं पावलें. महाराजांचा मुक्काम बोरगांव घोसरवाडाचे मध्यें आहे. बायांचा मुक्काम इंगळीवर आहे. राजश्री यशवंतराव शिवाजी यांचा मुक्काम जुगुळावर होता तेथून म्हैसाळावर चार हजार फौजासुद्धां येऊन उतरले. ते दिवशीं सरकारचें मेंढरांचें खिलार बोलवाडास होतें तेथून घेऊन गेले. वर्तमान कळतांच येथून श्रीमंत राजश्री दादा व नारायणरावजी व माधवरावजी फौजा घेऊन वड्डीपर्यंत गेले होते. तेथून पुढें चिखलओढ्यापर्यंत स्वार इकडील गेले. त्यांचे स्वारांची व इकडील स्वारांची गांठ पडली ते समयीं देवजी वोळेकर यास भाल्याच्या जखमा लागोन गोटास आलेवर वारला. आणखी पांच सात जखमी झाले. तिकडीलही जायांजखमी माणूस बरेंच झालें. मग ते माघारे सरकून गेलेवर इकडील लोक आले. उंट त्यांजकडील दोन ( पाडाव ) आले त्यांजविशीं त्यांचें पत्र आलें होतें. त्यास मेंढरें परत द्यावीं म्हणजे उंट पाठवून देऊं असें उत्तर पाठविल्याचें सविस्तर लिहिलें तें कळलें. त्यांजकडील फौज अधिक असतां त्यांस जरब बसून माघारे सरकून गेले. उत्तम झालें. परंतु याजउपरी कदाचित् त्यांजकडील स्वार आणखी आल्यास थोडे म्हणून खाशांनीं मात्र वड्डीपर्यंत जाणें ठीक नव्हे. वरकड फौज पुढें गेली आणि प्रसंग अवघड दिसल्यास माघारी आली तरी चिंता नाहीं. त्यांचा जमाव भारी. आपलेजवळ फौज थोडी. त्यापक्षीं प्रसंग कसा पडतो न कळे, यास्तव सूचनार्थ विनंती लिहिलें आहे. राजश्री बाळोबा पागनीस पुण्यास आले म्हणोन येथें वर्तमान आहे. व त्यांचीं पत्रें बायांस आलीं. बाया कूच करून पुण्यास जाणार असें येथें बोलतात. त्यास सविस्तर लिहावयास आज्ञा व्हावी. राजश्री नारायणराव बक्षी यांजकडील बाळाभाऊ बक्षी येथें श्रीमंतांकडे बोलावयास आले आहेत. पेशजी यशवंतराव शिवाजी येऊन बोलून गेलियाचें काय ठरलें, हल्लीं हे येऊन काय ठरवितात, पहावें. करवीरकरांची फौज सडी होऊन कबूरचे सुमारें आली म्हणोन येथें वर्तमान आहे. काय घडतें पहावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९२२ श्री. ( चैत्र—मे. )

सेवेसीं विज्ञापना. राजश्री बाळापा देसाई कौजलगीकर यांसीं राजश्री हैबतराव गाईकवाड यांचे विद्यमानें इमानप्रमाण देऊन भेटीस आणविलेनंतर "यादवाडचें ठाणें घालोन देणें. नाहीं तर यादवाड तालुक्याबद्दल छत्तीस हजार व देसगतीपैकीं पन्नास हजार रुपये देणें" म्हणोन पहाऱ्यांत दिलें आहे! देसाई पिता पुत्र दोघेही येऊन अडकले आहेत. काल सोमवारीं पहाऱ्यांत दिले आहेत. आज तीन दिवस जाले. अद्याप बोलणेंचा ठराव जाला नाहीं. कैदेंत आहेत. देसाई यांस नागविल्याशिवाय सोडीत नाहींत. राजश्री आपा राजाज्ञा आपल्या स्वांरी समागमें देसाई यांस घेऊन गेले. मौजे हुणशाळ पा॥ यादवाड येथील गुरें वळून पुढें गेले. प्रांताची खराबी जाली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९२३ श्री. ( चैत्र व० १४–३ मे. )

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री बाळाभाऊ बागेवाडीस होते तेथें श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचें पत्र आलें त्यावरून जावयासीं निघाले. त्यावरून राजश्री नागोजी घाटगे व बच्याजीपंत याणीं बाळाभाऊस न जाणेंविशीं बहुत प्रकारें सांगितलें. परंतु न आयकितां निघोन गेले. त्याजवरून उभयतां 'आम्ही येथें कोणाचे म्हणोन रहावें ?' म्हणोन निघोन बायांचे लष्करास गेले आणि इकडे सदरहूप्रमाणें लिहून पाठविलें. राजश्री हिंमतबहादर ही अगोदर गेलेच होते. काल बुधवारीं इंगळीवरून बायांचे लष्करचें कूच होऊन येडुरावर आले. हिंमतबहाद्दर यांचीं पत्रें आलीं जे, आम्ही येडूरचे मुक्कामास आलों. येथून फौज सुद्धां कबूरच्या सुमारास जातों. आपणाकडील फौज त्यासुमारें यावी. याप्रमाणें पत्रें आलीं होतीं. बायांनीं करार केला कीं, गोकाकचें ठाणें घेऊन देतों, आणि परशुरामपंत यांसीं फौजसुद्धां बारीपार करून देतों, म्हणोन करार केला आहे; ऐसा पत्रांत मजकूर होता. त्यास ऐसे करारमदार आज तागायत बहुत प्रकारें जाहले त्यांतील कोणता प्रत्ययास आला

---

१ नारो हरि-करंदीकर याचें करवीरकरांच्या लष्करांतून मिरजेस पत्र. हें मे महिन्यांतलें समजून येथें छापलें आहे, पण हें यापूर्वी दोन तीन महिने लिहिलेलें असावें. २ नारो हरि करंदीकर वकील याचें करवीरकर महाराज यांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

तो हा येईल? परंतु अद्याप बायांकडील भरंवसा व्हावा हा मानस आहे. प्रत्यक्ष कालचा दाखला. बाळाभाऊ यानीं करार पांच हजार फौज घेऊन जावयाचा केला असतां दोनशें स्वारानिशीं कबुरास गेले. मागाहून फौज येत आहे म्हणून बोलतां बोलतां पांचशेंपावेतों जमले. असें आहे. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९२४ श्री. (चैत्र व० १४—३ मे.)

पै॥ छ० २७ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र.

'सवेशीं विज्ञापना. सांवेनूर तालुक्याचीं ठाणीं घालून फौजा बारीअलीकडे आल्या. जुने हुबळीचें ठाणें राहिलें यास्तव राजश्री विठ्ठलराव यादवाडकर यांजकडील फौज हजार बाराशें स्वार व गाडदी दीड हजार तेथें रहावयास सांगितले. फौजा इकडे येतांच ते ही पोटास नाहीं म्हणोन निघोन आले थाजमुळें गणपतरावकाका यांची नेमणूक केली. त्यांस खर्चास पावून ते निघोन जावयाचेच आहेत. इतक्यांत राजश्री धोंडोपंत गोखले यांणी पेशजी पुण्याहून दोन पलटणें कवायती सरसुभ्याकडे जात होतीं तीं श्रीमंतांनीं फिरवून आणलीं तीं गोखले याणीं ठेविलीं होतीं. तीं हल्लीं हुबळीस लावून दिलीं व कांहीं स्वार ही निरोप दिला असें करून पाठविले. ते जुने हुबळीस जमाव होऊन नवे हुबळीस चौकी दिली. पैका मागतात. वर्तमान तहकीक आहे. राजश्री हरीपंत परचुरे काल येथें आले होते त्याणीं ही राजश्री दाजीबा यांस पत्र दिलें तें पाठविलें आहे. त्याजवरून सविस्तर विदित होईल. हे विज्ञापना.

नं. ४९२५ श्रीशंकर प्रसन्न. (चैत्र व०१४-३ मे.)

पै॥ छ २९ जिल्काद. सन तिस्सा तिसैन. चैत्र मास.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ०२७ जिल्काद पावेतों यथास्थित जाणून स्वकीय लिहित जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री भाऊ यांचें व महाराज व बाया यांचे मुक्कामचें, व राजश्री यशवंतराव शिवाजी याजकडील लोकांशीं व आपलेकडील लोकांशीं मेंढरें वळवून नेलीं सबब गोळागोळी जाहलियाचें, व भाऊंस सरकारची आज्ञा आली जे, बायांस मेळवून घेऊन महाराजांचा

१ पत्रावरील मिती व तारीख पेवस्तीची.

बंदोबस्त करावा; त्याजवरून बायांकडील मुख्य भाऊंनीं बोलाविले आहेत येविशींचें, व बाळाभाऊ दोमशें स्वारांनिशीं तुमचें व भाऊंचें सख्य करून देतों म्हणून महाराजांकडे गेले आहेत येविशींचें, वगैरे विस्तारेंकडून लिहिलें तें कळलें. ऐशियास बायांकडून अखत्यारी भाऊंकडे जाऊन मुद्दे काय पडले व समेट होऊन महाराजांकडील शिलशिल्याचा मजकूर लिहून कळवावा. बाळोबाभाऊ दोनशें स्वारांनिशीं गेले आहेत ते जाऊन बोलण्यांत काय आलें हें कळवावें. इकडे राजश्री गोपाळराव चिटणीस फौज घेऊन आले त्यानीं या प्रांतीं तमाम रोखे करून घासदाणा म्हणोन खंडण्या घेत आहेत. त्यांजकडील एक व आंग्रे यांजकडील एक असे दोन्हीकडून उपद्रव होऊन बहूत खराबी मांडली आहे. कांहीं बाकी राहिली नाहीं. झाडून गांवगन्ना फुटकी वस्ती. आश्रय कांहीं नाहीं. पठाण शिंदेबायांकडील याणीं झाडून कराड प्रांत बेचिराख केला. बहुतकरून गांव वोस झाले आहेत. वाईस उपद्रव करितील किंवा काय हा भरंवसा नाहीं. ईश्वरें मोठा क्षोभ मांडला आहे. परिणाम लागेल तें खरें. पुण्याकडील वर्तमान तर इंग्रजांकडून कुमकेविशींचें बहुत नेट सरकारांत लागलें आहे. भाऊंस कुमकेस यावें असें म्हणणें पडलें आहे. राजश्री रामचंद्र श्रीधर यांचें बोलणें पडलें आहे कीं, "आम्हांस पेंच बहुतच पडला आहे. सरकारांतून उस्तवारी झाल्याखेरीज आमचें जाणें होत नाहीं." याजवर काय ठरेल तें पहावें. आपलेकडेही वर्तमान येतच असेल. अधिकोत्तर असल्यास कळवावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

नं. ४९२६ श्री. ( चैत्र व० ३०–४ मे. )

पै॥ छ०२८ जिल्काद सन तिस्सा तिसैन. चैत्र.

सेवेशीं यशवंतराव शिवाजी साष्टांग नमस्कार विनंती तागायत छ०२८ जिल्काद वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. "खिलारांतील गुरें वळवून नेलीं व गांवगन्नास उपसर्ग लागतो. चांगलें नाहीं." म्हणोन लिहिलें, त्यास गुरें कांहीं आलीं होतीं तीं आपणांकडील खिलारी आला होता त्याचे हवालीं कराविलीं. आतां कांहीं राहिलीं नाहींत. आपणाकडील गांव खेड्यास इकडील उपद्रव मागेंही झाला नाहीं व पुढेंही होणार नाहीं. कळावें बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विज्ञापना.

नं. ४९२७ श्री. ( चैत्र व०३०–४ मे. )

पै॥ छ०२८ जिल्काद सन तिसा तिसैन चैत्रमास.

पु॥ विनंती सेवेशीं देवजी कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र शहापुराहून मिरजेस बाळासाहेबांस.

विज्ञापना ऐसी जे गोकाकचें ठाणें घेतलेलें वर्तमान सेवेशीं कळलेंच असेल. रायरहुबळीस राजश्री राधोपंत भट यांणीं पांच हजार जमावानिशीं उपद्रव केले आहेत. राजश्री धोंडोपंतदादा गोखले गदगेचे ठाणेस स्वार पाठविले आहेत. त्यांची मसलत अद्याप तमाम तालुकेस घासदाणा घेत गोकाकपर्यंत जावें अथवा पुण्याहून कारभारी यांचें संधान येईल तसें करावें हा मनोदय आहे. राजश्री गणपतरावकाका कंकणवाडीकर यांजबरोबर हजार स्वार भरती करून हुबळीचे तोंडाशीं पाठविले होते ते माघारी येऊन मुरगुडास मुक्काम केले आहेत. हुळी सौंदत्ती गोखले यांणीं घेऊन पुढें गेले. राजश्री बापू शिंदे राजमंडळांतून जांबोटीस येऊन धारवाडास गेले. पंचवीस हजार रुपये देऊन (सुटून) आले आहेत. राजश्री हरि जगन्नाथ नि॥ शिंदे बाई कोंकणांत श्रीदेवास जातों म्हणून गेले आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९२८ श्री. ( वैशाख शु० १-५ मे. )

पै॥ छ० ३० जिल्काद. पांच तास रात्र. सन तिस्सा तिसैन. इंदुवार.

सेवेशीं विज्ञापना. छ० २९ जिल्काद मुक्काम नजीक गोकाक. विशेष. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम गच्ची कुरबेटावर होता. तेथून कूच करून छ० २६ रोजीं गोकाकचे मुक्कामास आले. ते दिवसीं प्रदोष होता. मजलीस येतांच गंजीफा खेळत बसले. सायंकाळ जाहला तरी स्नानास उठेनात. खेळ पुरे होईना. सर्वांनीं स्नानास उठावें, प्रदोष आहे, म्हणों लागले. तेव्हां उत्तर जाहलें जे अद्याप बारा घटका दिवस आहे. आतांच उठावयाचें नाहीं. म्हणोन तसेच दोन तास रात्रपर्यंत खेळ जाहला. मग खेळ पुरे केला तथापि स्नानास उठेनात. मनास येईल तसें भाषण करूं लागले. प्रकृतीस कांहीं वायूचा विकार जाहलासा जाहला. तेव्हां तसेच चारी प्रहर रात्र उपवासी. सर्वांस ही उपोषण जाहलें. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं स्नान करून भोजन केलें आणि निजले ते तिसरे प्रहरपर्यंत निजले. जवळ श्रीमंत राजश्री आपा-साहेब व बाबासाहेब नेहमीं एक जण असतात. जवळ दाटी होऊं देत नाहींत. याप्रमाणें भ्रांत पडली आहे. प्रयोग अथवा पित्तप्रकोप वायु असेल असें दिसतें. आठ दिवसांपासून प्रकृतीस भेद कांहीं पडला. परंतु लौकिकांत आलें नाहीं. पत्रीं लिहितां नये याजमुळें लिहिलें नाहीं. हल्लीं सर्वत्र प्रसिद्ध जाहलें. तेव्हां सेवेशीं लिहिलें आहे. आम्ही तर गेलों नाहीं. बीस दिवस जाले. या समयीं जावें तरी भरंवसा पुरेना, यास्तव गेलों नाहीं. परंतु नेहमीं जवळ असतात त्यांचें सांगणें व पाहून आहे त्यांणीं सांगितलेवरून सेवेशीं

लिहिलें आहे. मुरगोडास कारकून गेले. कुरुंदवाडास ही वेदमूर्ति राजश्री बाबा दीक्षित वाटवे यांस ही बोलावूं पाठविलें आहे असें ऐकिलें. स्वामींस वर्तमान कळलेंच असेल. वाईट गोष्ट जाहली. लौकर आरोग्य जाहल्यास उत्तम आहे. सरसुभेकरी याणीं हुबळीकडे गडबड केली आहे यास्तव येथून राजश्री श्रीपतराव भाऊ यांची रवानगी होणार असें ऐकण्यांत आहे. जातात कीं काय पहावें. आम्ही उद्ईक निघोन तेरदाळवें सुमारें जातों. हे विज्ञापना.

नं. ४९२९ श्रीशंकरप्रसन्न. ( वैशाख शु० १–६ मे. )

पै॥ छ० ४ जिल्हेज. वैशाखमास सन तिस्सा तिसैन.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० ३० जिल्कादपावेतों यथास्थित जाणून स्वकीय लिहित जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. " आपलें जाणें पुणियास कधीं जालें व माघारे फौजेंत सत्वरच येणें व्हावें. तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब यानीं गोकाक घेतालियाउपरी पुढें सत्वरच येणें होईल. व लक्ष्मीबाई शिंदे यांचा मुक्काम रांमपुरानजीक आहे व महाराज भोजेवर गेले. उभयतांचा एक विचार आहे. राजश्री बाळाभाऊ वडिलांकडे गेले आहेत, परंतु बोलणें शाश्वत एक ही नाहीं. बोलणें काय होतें हा मजकूर वडिलाचीं पत्रें आलियावर कळवूं व फौजांनीं प्रांतांत कांहीं बाकी ठेविली नाहीं. " वगैरे मजकूर लिहिला तो कळला. ऐशियास पुणियास जावयाकरितां प्रस्थान करून आपणास लिहिलें परंतु फौजेचें दोन वर्षांचें देणें, लोकांचा गवगवा पडला, याजमुळें राहणें जाहलें. बायांकडून राजश्री बाळा भाऊ गेले आहेत. महाराजांचा त्यांचा एक विचार, तेव्हां बोलण्याचा इत्यर्थ कसा ठरेल तें पहावें. राजश्री भाऊंस व महाराजांस जवळ पडलें त्याजमुळें सहजच कोल्हापुर जवळ करीत चालले. •या घाटास गोष्ट आली तेव्हां बंदोबस्तही होईल. तिकडील वरचेवर कळवीत जावें. मिरज प्रांतीं फौजा लगत. आपणही सावधगिरीनें रहात जावें. दोन महिने प्रांतांत बैदा, तेव्हां बाकी काय रहावयाची आहे! राजश्री धोंडोपंत गोखले प्रस्तुत कोठें आहेत? भाऊंकडे येऊन मिळणार किंवा कसें? मोंगलाकडील फौज कुमकेस यावयाची होती ती आली किंवा येणार? येविशीं लिहावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

---

१ टाकळी रामपूर. कृष्णातीर.

नं. ४९३० श्रीगणपति. ( वैशाख शु० १—६ मे. )

पै॥ छ० ३ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

अपत्यें रामचंद्रानें दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ३० जिल्कादपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. इकडील वर्तमान तर अद्याप गोकाकेश्वरच मुक्काम आहे. पैक्याची तंगचाई व गवगव्यामुळें दोन चार मुक्काम पडले. या नंतर पुढील सुरत पाहून घटपा पार होणार. वडिलांची प्रकृत बहुत नाजूक झाली आहे. त्यास वेदशास्त्र संपन्न राजश्री दीक्षित बाबांचा आशीर्वाद आहे. तेही आज येत आहेत. कांहीं चिंता न करावी. येथून कूच करून जागनूरच्या वोढ्यावर जावें ऐसा बेत आहे. म्हणजे बागेवाडीस ठाणें बसवून मग पुढें म्हणजे कृष्णेपर्यंत मध्यें ठाणीं राहिलीं नाहींत. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना

नं. ४९३१ श्री. ( ८ मे. )

पै. छ० ३ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन वैशाख मास.

आश्रित नारायणराव गोडबाले कृतानेक आशीर्वाद येथील क्षेम वैशाख शु० ३ पर्यंत मुक्काम लष्कर सुखरूप असों. यानंतर आपली आज्ञा घेऊन आलों ते सुखरूप पावलों. श्रीमंतांची भेटी झाली. वोखद चालत आहे. प्रकृतिही चांगलीच आहे. कांहीं चिंता नाहीं. आपणांसही वर्तमान विदित होत असेलच. परंतु कांहीं अभिचार योग झाला आहे तो आमचे ध्यानांत आला. नंतर वेदमुर्ति राजश्री दीक्षित स्वामीनींही तसेंच खचीत सांगितलें. तेणेंकडून बुद्धींत कांहीं अस्थिरता गुण उत्पन्न झाला आहे. आणि तेणेंकरून शरीरासही हिसका बसतो. असा विचार आहे. पुढें होईल तें लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ४९३२ श्रीगणपति. ( वैशाख शु० ४—९ मे. )

पै॥ छ० ३ जिल्हेज. तिस्सा तिसैन. वैशाखमास.

विज्ञापना. शहापुराविषयीं वगैरे विस्तार वडिलीं लिहिला तें कळलें. तीर्थस्वरूपांची अनास्था आपले ठायीं असा अर्थ नाहीं. चि॥ आपासाहेब वारंवार शहापुरास फौज पाठविणेंविशीं सांगतात व आज्ञाही घेतात. परंतु खर्चाचा गवगवा मोठा, याजमुळें कोणीही दुसरे कार्यास जात नाहीं. कसेही दिवस काढितों. बाया व करवीरवासी एकत्र होऊन पुढें आहेत हें कोणाच्य चित्तींच नाहीं ! सामान देत (?) म्हणावें तर आज्ञा आणतात. मी आपल्या

सेवेशीं चुकावयाचा नाहीं. वडिलांची प्रकृत राजश्री दीक्षितानीं विदित केलीच असेल. सर्वांचे दैव वडील. तेथें अशी गोष्ट आली ! ईश्वरेच्छा प्रमाण ! दीक्षितेबावा आजपर्यंत आहेत त्यांचा आशीर्वाद पूर्ण आहे. वडिलीं चिंता करूं नये. कांहीं दिवस क्लेश आहेत ते भोगणें प्राप्त आहे. वडिलांचा दम मोठा. उठवत बसवत नाहीं तरी पुढें कूच करून जावें हाच ध्यास ! आज मोठ्या बलात्कारें मुक्काम जाला. बावा आज येत आहेत. दर्शन जालेवर सर्व कळवीन. ईश्वरी पुरुष बावांही तेथें आहेत त्यांसही विनंती केली पाहिजे. मोठें संकट आहे. परिहार जाहलें पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ४९३३ श्रीगणपति. ( वैशाख शु० ५–१० मे. )

पै॥ छ ४ जिल्हेज भृगुवासर. वैशाखमास. तिस्सा तिसैन.

विज्ञापना. वडिलांची प्रकृति तर रोगाची भावना अगदीं नाहीं. परंतु परकृतेंकरून व्यापून गेली. याचा उपाय वेदशास्त्रसं० राजश्री शिवशास्त्री आदिकरून ब्राह्मणांस गुप्तरूपें विचारणा होऊन लवकर झाला पाहिजे. ( वडिलांचें ) उपोषण सुटावयाचें नाहीं, शरीरसामर्थ्य अगदीं नाहीं, आणि अनास्था फार ! परिमाण कसा लागेल श्री गजानन जाणे ! सारांश प्रकृत विषयीं त्वरित झालें पाहिजे. वेदशास्त्रसंपन्न दीक्षित बावा येतात, मुक्काम करावा, म्हटलें तर होईना ! गांठ पडूं देत नाहीं असें झालें. बावाही तेथें आहेत त्यांस श्रुत करावें. दीक्षित बावांचा पूर्ण आशीर्वाद आहे. चिंता नाहीं. शरीरपीडेपुढें उपाय नाहीं. उपाय लौकर करावा. हे विज्ञापना.

नं. ४९३४ श्रीगणपति. ( १० मे. )

पै॥ छ० ४ जिल्हेज. वैशाखमास. तिस्सा तिसैन.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांगनमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत वैशाख शुद्ध ५ गुरुवार जाणून स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. मिरजेहून सराफाकडून ऐवज आणविला आहे तरी राजेरवान सांडणीस्वाराबरोबर राऊत स्वार देऊन ऐवज लष्करास लौकर पोंचता करावयास आज्ञा केली पाहिजे. समागमें सुतरस्वार देऊन ऐवज पावता व्हावा. तेरदळाकडून येऊन पोहचावें. खर्चाचा गवगवा चारीकडून. संकट ईश्वर जाणे ! वडिलांचे प्रकृतीचा मजकूर पुरवणीवरून कळेल. ईश्वर कृपा करील. शहापुरास स्वार गेले तेथें खटला जाहल्याचे

---

१ चिदंबर दीक्षित. २ श्यामभट बावा मिरजेस आहेत ते. ३ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र रामचंद्रपंत आपाचें बाळासाहेबांस.

वर्तमान तपशिलें करून वडिलीं लिहिल्यावरून कळलें. पंत येथें आले, परंतु खटला झाला हें कांहींच सांगितलें नाहीं. मजकडून वावगी गोष्ट घडणार नाहीं. खातरजमा आहेच. आज वडिलांसुद्धां मुक्काम बागेवाडीचे पूर्वेस दोन कोसांवर आहे. उदईक जागनूरचे सुमारें येतों. सदैव आशीर्वाद पत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९३५ श्रीगणपति. ( वैशाख शु० ६-११ मे. )

पै॥ छ० ९ जिल्हेज. सन तिस्सा. वैशाख.

तीर्थस्वरूप राजश्री काका वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें हेरीनें करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ छ० ५ जिल्हेज पावेतों मुक्काम मंगळवेढें येथें वडिलांचे आशीर्वादें करून समस्त सुखरूप असों. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. असेंच निरंतर पत्र पाठवून सांभाळ केला पाहिजे. यानंतर वडिलीं लिहिलें, जे तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम गोकाकेजवळ आहे. गोकाकेचें ठाणें बसल्यावर वडिलांची स्वारी सत्वर इकडे येत आहे, म्हणोन लिहिलें तें कळलें. चिरंजीव राजश्री बाबाजीकडील लाखोटा व माझे नांवचा वडिलीं पाठविला तो पावला. हल्लीं चिरंजीवाचे नांवें लाखोटा पाठविला आहे. लष्करास रवाना करावया आज्ञा करावी. इकडील वर्तमान तर यवनाकडील सैन्य क्षेत्र पंढरीवर होतें तें परांड्याकडे जावया निघोन गेलें. चार दिवस झाले. राजश्री गोपाळराव चिटणीस व बाबूराव आंग्रे चार पांच हजार फौजेनिशीं वेळापुरानजीक आले आहेत. एका दो दिवसांनीं क्षेत्रास येणार असें वर्तमान आहे. राजश्री चिंतामण आत्माराम पागे आज पाटखल खुपसंगीच्या मुक्कामास येणार. उद्ईक तावसी नजीक माण नदीवर मुक्काम करणार. पुढें चिटणीस पागे मिळोन कोणीकडे जातात समजत नाहीं. सारांश या प्रांतांत कांहीं बाकी राहिली नाहीं. श्री इच्छेनें घडेल तें प्रमाण. वडिलीं तिकडील सविस्तर वर्तमान ल्याहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९३६ श्रीगणपति. ( वैशाख शु० ६-११ मे. )

पै॥ छ० ९ जिल्हेज. सन तिस्सा. वैशाख.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब. वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें कृष्णानें करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील

---

१ हरिहरराव पुरुषोत्तम पटवर्धन आंबेकर. यांचे पुत्र बाळकृष्ण हरि यांनीं हरिवंशाची बखर लिहिली ती आम्ही छापली आहे.

कुशल तागायत छ० ५ जिल्हेजपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर पेशजी वडिलांस लिहिलेंच आहे. अलीकडे अविंधाचें लष्कर श्रीक्षेत्र पंढरपुरावर होतें त्यास त्यांचें कूच वैशाख शु० २ द्वितीयेस होऊन परांड्याकडे गेले. तों मागाहून राजश्री गोपाळराव चिटणीस आंग्रेकडील फौज दोन चार हजार ऐसे निंबगांवच्या मुक्कामाहून कूच करून मौजे उमारी परगणे भालवणी येथें आली आहे. क्षेत्रास जावयाची वदंता आहे. तेथून इकडे येणार. तेव्हां उपद्रवाचाच प्रकार घडणार, येविशींचा बंदोबस्त व्हावा, म्हणोन पेशजी वडिलांस लिहिलें आहे आणि हल्लींही तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब यांचें पत्र घेऊन लावून दिलें तर उपसर्ग लागणार नाहीं असें दिसतें. यांत घडेल तें खरें. राजश्री चिंतो आत्माराम पागनीस निसबत शिंदे यानीं मंगळवेढेची मनस्वी खंडणी घेऊन नानाप्रकारचे आढेवेढे जाचणुकेचा व गांवचा तसनस बहुतच करून निघोन सोलपूरच्या परगण्यांत गेले होते. ते तिकडोन माघारे फिरोन मागती मंगळवेढें तालुक्यांतूनच आंग्रेकडील फौजेस मिळावयाकरितां श्रीक्षेत्राच्या सुमारें मिळावयास चालिले आहेत. खुपसंगीचा मुक्काम कालचा होता. कसबे व खेड्याची कही करून चिंधीचोळा केला. लष्करांत बंद नाहीं. धणीपणा एकाचा नाहीं. आज कूच होऊन माणेच्या पाण्यास जाणार. तेथें कांहीं मुक्काम करणार असेंही आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९३७ श्रीगणपति. ( वैशाख शु० ६–११ मे. )

पै॥ छ० ३ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

अपत्यें रामचंद्रानें दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ५ जिल्हेज मंदवार मुक्काम बुगवाड वर्तमान यथास्थित असे. विशेष. वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री चिदंबर दीक्षित बावा यांस लष्करांत आणावयाचा प्रकार करून बावा आज सूर्योदयाचे पूर्वी घटका रात्रीस येऊन वडिलांस दर्शन दिलें. हा सर्वांस संतोष झाला तो पत्रीं कोठवर लिहावा ? बावानीं दर्शन देऊन वडिलांस कृपादृष्टीनें पाहून शरिरावरून हस्त फिरविला. वडिलानीं उठोन साष्टांग नमस्कार घातला. हें संतोषाचें वर्तमान कळावें. वेद मुहूर्त राजश्री शामभट बावा याचे आशीर्वाद पत्रीं लिहिले तें पत्र पावलें. वारंवार त्यांस विनंती करून कृपा होय असें झालें पाहिजे. बावा मुरगुडाहून आले. महापुण्योदय जाणावा. अभय पूर्ण आहे. करवीरवासी करवीरास गेल्याचें

लिहिलें तें कळलें. बागेवाडीस बसावें अशी योजना आहे. बायांचे लष्कराचे वगैरे रागरंग पाहून मोर्चे लावितों. विदित होय हे विज्ञापना

नं. ४९३८ श्रीगणपति. ( वैशाख शु० ६–११ मे. )

पै।। छ० ९ जिल्हेज सन तिस्सा. वैशाख.

अपत्यें कृष्णानें चरणांवर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ५ जिल्हेज् वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीक्षेत्र पंढरपुरावर यवनाची फौज होती ते छ० ३ जिल्हेजीं कूच करून करकंबचे गेंव माघारे गेले. राजश्री त्रिंबकराव साठे व कांहीं आरब क्षेत्रीं राहिले आहेत. परगणे मंगळवेढें येथील वरातेच्या ऐवजाकरितां आरब व पन्नास स्वार येथें तगाद्यास आहेतच. आणखी वरचेवर त्रिंबकराव यांचीं पत्रें येतात "ऐवज पत्र पावतांच रवाना करावा. हें न जाहल्या आम्हांस कामगारी आहे त्यापक्षीं मागती आरब व फौजसह यावें लागेल;" म्हणोन निकडीचीं पत्रें वरचेवर येतात. येथें स्वार व आरब आहेत त्यांनीं नित्य दरवाजास येऊन पाणी बंद करून बसतात. त्यांचे रोजाचा व दाणा शिध्याचा आकार म्हणतां साठ सत्तर रुपये नित्य द्यावे लागतात. येविशीं वडिलांस विनंती लिहीतच आहें. पुण्यास पत्रें पाठविलीं असतील. मनाचिठी आली असल्यास पाठवावी. सर्व संकटें परिहार करणार वडील समर्थ आहेत. राजश्री जनार्दन शिवाजी ही सैन्याबरोबर तिकडे गेले. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना. आतां क्षेत्राहून पत्र आलें त्यात नरसिंहपुरास शिंद्याकडील कृष्णाजी हुजरे म्हणून आला आहे त्याणें श्रीदेवास स्पर्श केला आणि वस्त्रें आणि अलंकार घेऊन ब्राह्मणांसही उपद्रव लाविला आहे. त्यावरून राजश्री गोपाळराव चिटणीस याणीं पंढरीस रखवालीस स्वार पाठविले आहेत. खासाही येणार. होईल तें सेवेशीं मागाहून लिहितों. हे विज्ञापना.

नं. ४९३९ श्रीगणपति. ( वैशाख शु० ६–११ मे. )

चि।। राजश्री बळवंतराव यांसीं परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. आपण छ० १ जिल्हेजचें पत्र पाठविलें तें पावलें. "करवीरकरांचा व शिंदे बायांचा परस्परें रक्षापुत्रपुत्रीचा विवाह होणार. राजश्री बाळोबा पागनीस यांजकडून बायांस माघारे न्यावयाविशीं नारो कृष्ण कारकून गेले आहेत," म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशीयास "विवाह शिरोळच्या मैदानांत होणार. लष्करचें कूच पुढें होऊं नये; व लुगारी फिरूं देऊं नये. याचा बंदोबस्त असावा." असें बायांचें पत्र गोकाकानजीक आलें होतें. त्यास "बैरणीच्या सोई-

सारखें कूच होईल. कूच जालें असतां घरोंड्याच्या जागीं चिंता काय आहे ?" म्हणून उत्तर दिलें. त्याजवर दोन तीन कुचें झालीं. विवाह करितात किंवा नाहीं पहावें. येथून बायांकडे कारकून पाठविले आहेत ते आल्यावर काय तें समजेल. बाळोबाचे कारकून बायांजवळ पोहोंचल्याची बातमी आली नाहीं. आमची शरीर प्रकृत नीट नाहीं, यास्तव वेदमूर्ति राजश्री दीक्षितबावा येथें आले. दर्शन जालें. त्यांच्या अनुग्रहेंकरून यथास्थित होईल. मुक्काम मौजे बडिगवाड पो गोकाक येथें आहे. येथून बागेवाडी दोन कोस. रवाना छ० ५ जिल्हेज. कागदाच्या गड्यांविशीं बहुत खोळंबा आहे. पुण्याचे वगैरे जाब द्यावयाचे तटले आहेत. तूर्त आपल्या संग्रही असतील त्यांतून लहान गड्या दोन व थोर एक पाठवून द्यावी. रवाना छ० मजकूर. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० ६ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

नं. ४९४० श्री. ( वैशाख शु० ७–१२ मे. )

पै॥ छ० ६ जिल्हेज. तन तिस्सा तिसैन. वैशाख.

विज्ञापना श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा यांची चिठी काल आली त्याची नक्कल पाठविली आहे. त्याचें उत्तर लिहून आम्हीं पाठविलें. गोकाकेवर होतों ते समयीं चाकरी दोन वेळ सांगून पाठविली, परंतु लोकांनीं परिछिन्न चाकरीस आम्हीं जाणार नाहीं म्हणाले. त्याजवरून चाकरीस जावयाचे राहिलों. नंतर पुढें लोकांचे आग्रहामुळें कूच करून येथें आलों हें स्वामीस विदितच आहे. आणि हल्लीं येणेंविशीं आज्ञा आली, त्यास लोकांचा विचार पाहतां येण्याचा सुमार दिसत नाहीं असें उत्तर लिहून आजच पाठविलें. लोकांचा माघारां जावयाचा सुमार दिसत नाहीं. दोन प्रहरपर्यंत लोक येऊन बसले होते. कूच करून मिरजेस चलावें म्हणून, त्यांस आम्हीं सांगितलें, श्रीमंतांस पत्र मिरजेस पाठविलें आहे. तेथून आज्ञा आली म्हणजे जातों असें बोललों. तथापि न ऐकत. मग समजून सांगोन काल लावून दिले. स्वामींनीं येथें तूर्त राहावें म्हणोन पत्र पाठविलें, त्यास येथें राहिलों असतां वैरणीचें संकट. दुसरी गोष्ट लोक याउपरी येथें रहात नाहीं म्हणतात. कदाचित स्वामींनीं माघारें लष्करास जावयाचें लिहिल्यास

---

१ भाऊंच्या लष्करांतून मिरजकरांचें पथक उठून तेरदाळास आलें. तेथून त्या पथकावरील कारकून आपाजी गोविंद सहस्रबुद्धे यांचें हें मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

मिरजेस गेलेखेरीज लोक माघारे जावयाचें दिसत नाहीं. सूचनार्थ विनंती लिहिली आहे. एक दोन दिवस या पत्राचें उत्तर येईपर्यंत राहतील. येथील लोकांचा विचार पाहतां आग्रहाचाच आहे. यांत कांहीं गुंता दिसत नाहीं. हे विज्ञापना.

नं ४९४१ श्री. ( वैशाख शु० ७–१२ मे. )

छ० ८ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेशीं गणेश गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० ६ जिल्हेज मुक्काम तेरदळ येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं काल तेरदळचे प्याद्याबरोबर पत्र पाठविलें तें कालच तास रात्रीस पावलें. "बायांचा मुक्काम खिद्रापुरानजीक कृष्णा दक्षण तीरास आला. महाराज आकीवाटानजीक येणार. नंतर लग्नाचा समारंभ होणार. तूर्त तुम्हीं येथेंच रहावें. मागाहून लिहून पाठवूं त्याप्रमाणें येणें. खर्चास तूर्त दोन हजार रुपये पाठवितों. येथें हुंडणावळ न देतां मिळाल्यास घेऊन चिठी पाठवावी" म्हणोन आज्ञा, त्याजवरून येथें गांवांत राजश्री शामराव याजकडून शोध करविला. त्यास येथें ऐवज मिळत नाहीं या प्रमाणें सांगितलें. एथें तर दोन दिवस खर्चा-करितां मोठेंच अवघड पडलें. बाजार नाहीं याजमुळें लोकांस बहुतच अडचण पडली आहे. येथें येऊन चार दिवस झाले. वैरणीचें मोठें संकट आहे. खेडी झाडून सरकारचीं. काल कही सेगुणसीचे रानांत जुन्या बणव्या होत्या तेथें गेली होती. त्यास सेगुणसी व कवठे गोपकरानीं खटला केला. श्रीमंतांचा शब्द लागणार असें अवघड पडलें यास्तव विनंती लिहिलें आहे. येथें दोन दिवस रहावयाचें जाहल्यास वैरणीचें व खर्चाचें कठीण. येविशीं आज्ञा करावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९४२ श्रीगणपति. ( वैशाख शु० ९–१३ मे. )

पै॥ छ० ९ जिल्हेज. सन तिस्सा वैशाख.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलाचे सेवेशीं.

अपत्यें कृष्णानें दोन्ही कर जोडून साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० ७ जिल्हेज इंदुवासरपावेतों वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री चिंतो आत्माराम यांचे लष्करचा दंगा आजपर्यंत झाला तो वडिलांस विनंती लिहीत गेलों. सांप्रत राजश्री बाबूराव आंग्रे यांची फौज निंबगांवनजीक भालवणी येथें आहे. समागमें राजश्री गोपाळराव चिटणीस आहेत. घासदाण्याचे रोखे परभारें गांवगन्ना केले आहेत.

गांवगन्ना स्वार शेंपन्नास येऊन गांवांत कोण असेल त्यास धरून हाणमार करतात आणि खेडेकरांपाशीं मनस्वी खंडणी मागतात. यास्तव येथून चिटणीसास पत्र पाठविलें त्याचें उत्तर आलें जे, "फौजेस खर्चास नाहीं. स्वार काही आमचें ऐकत नाहीत." असें उडाफी जाबसाल लिहिलें आहे ! गांवगन्ना रोखे झाले त्यास पहिलेच राजश्री चिंतो आत्माराम यांचे दंग्यामुळें उद्वस जाले आहेत. त्यांत हल्लीं आंग्रे यांचा उपद्रव. परगण्यांत बाकी राहिली नाहीं. कसब्यासही या उपरी रोखा झाला अशी बातमी आली. यास्तव वडिलास विनंती जे, कुमक हजार पांचशेंची ये समयीं रवाना जाहल्यास आमचा बचाव व कसब्याचा होतो. अनमानें झाल्यास परिणामें लागणें कठीण आहे. रोखा झाल्यास पैसा उत्पन्न होत नाहीं त्यापक्षीं येथील निभाव होणें वडिलांचे ध्यानांतच आहे. शेवट जाबसाल निश्चय समजोन विनंती लिहिली आहे. कागदोपत्रीं बंदोबस्ती जें कर्तव्य तें केलें पाहिजे. आणि कुमकही पाठविली पाहिजे. हजार पांचशें सामान रवाना झाल्यास दाब बसेल. वडिलांस विनंती लिहावी असें नाहीं. शेवटचा पर्याय जाणून लिहिलें आहे. राजश्री आपाजी गोविंद फौजेसह आले म्हणून ऐकलेवरून विनंती लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना. राजश्री आपाजी गोविंद आले नसले तरी वडिलीं कुमक केल्या बचाव होईल हे विज्ञापना.

नं. ४९४३ श्रीगणपति. (वैशाख शु० ९-१३ मे.)

पे॥ छ० १० जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें कृष्णानें करद्वय जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० ७ जिल्हेजपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री गोपाळराव चिटणीस निसबत शिंदे हे फौजसह निंबगांवावर मुक्काम आहे. प्रांतांत रोखे जाहले. आज कसबे मंगळवेढें येथें दोन अडीचशें स्वार चाळीस हजार रुपये घासदाणा व दोन हजार रुपये मसाला करून रोखा आला. रोखा धरोन स्वार ठेऊन घ्यावे तरी राजश्री चिंतो आत्माराम यांची खंडणी मनस्वी झाली, शिबंदी खर्च वगैरे भारी पडला, याजमुळें कोणांत ताकद राहिली नाहीं. ऐसें असतां खेडीं तमाम मारून खराबी फार केली. भंडारकवठेवर मुक्काम होता तेथून कूच होऊन खुपसंगी पाटखळावर मुक्काम केला. परभारें खेडेनीं रोखे करून आणखी वोली नेल्या.

परगर्णेतील तीनशें गाई बैल मेंढरें लुटून नेलीं. हल्लीं रोखा ठेऊन स्वांर ठेऊन घेतल्यास नित्य खच चारशें पांचशें पर्यंत पडोन घासदाणेचा निर्गम होणें कठीण, जाणून रोखा माघारा दिला असतां राऊत मुक्काम करून राहून लष्करास त्यांनीं पत्र पाठविलें आहे. फौज येऊन खटला करणार तेव्हां परिणाम ठीक दिसत नाहीं, जाणून वडिलांस विनंती लिहिलें आहे. तर पांचशेंपर्यंत स्वांर आलेशिवाय परिणाम नाहीं. तेथें इतकी भरती नसल्या वडिलांचें ही सैन्य जवळ आलें आहे तर तेथून आणवून सामान सत्वर रवाना करावयाची आज्ञा जाहली पाहिजे. दिवसगत लागल्या स्थलाचा बचाव होणार नाहीं. स्थलाचें व आमचें सर्वांचें अगत्य वडिलांस आहे तेव्हां मी विनंती लिहून कळवावेंसें नाहीं. ते अविवेकी यास्तव विस्तारें विनंती लिहिलें आहे. यानंतर शिराळेकराचे वरातेच्या तगादेस अरब व स्वांर आहेत ते कसबेंत कारकून फिरूं देत नाहींत. एक दो दिवशीं गांवचें पाणी बंद करतात. असें दोन्ही कडून संकट आलें आहे. वडिलांचे आशीर्वादें पार पडून पाय पाहूं तो सुदिन ! यानंतर राजश्री गोपाळराव चिटणीस यांसी वडिलांचीं पत्रें सत्वर मांडणीबरोबर यावीं. तेणें करून बचाव होईल तर यत्न करून पाहूं. आगाव एक वेळ पत्रें रवाना पुढें झालीं असलीं तरी हल्लीं येथून रोखे माघारे टाकले येविशीं दुसरेनें आणखी चिटणीस यासीं पत्रें पाठवावयाची आज्ञा जरूर व्हावी. सर्व प्रकारें सांभाळ करणार वडील समर्थ आहेत. उत्तराची सत्वर आज्ञा झाली पाहिजे. होईल तें सेवेशीं मागाहून लिहितों. सेवेशीं श्रुत होय कृपा लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४९४४ श्रीगणपति. ( वैशाख शु० ९-१३ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. आपण छ० २ जिल्हेजचीं पत्रें येथील जासुदाबरोबर पाठविलीं तीं पावलीं. " करवीरकर खुद्द करवीरास गेले. तेथें पोंचल्यावर तोफा जाहल्या. फौज बेडकीहाळाजवळ आहे. शिंदे यांजकडील फौज निंबगावास आली. फौजेंत राजश्री गोपाळराव चिटणीस व आंग्रे आहेत त्यांजकडून करकंब वगैरे महालांस उपद्रव होऊं नये येविशीं त्यांस पत्रें पाहिजेत. पाठवून द्यावीं. आंग्रे माघारे पुण्यास गेले आहेत. पत्र असावें. कारण पडल्यास देऊं. " म्हणून लिहिलें तें कळलें. त्यावरून उभयतांस पत्रें पाठविलीं आहेत. आम्ही छ० ६ जिल्हेज रविवारीं कोटबागी नजीक मुक्कामास आलों. येथून हुकेरी दीड दोन कोस आहे. चिरंजीव

राजश्री रामचंद्र श्रीधर काळे यांजकडून जासूद पत्रें घेऊन आले ते येथें येऊन पोचले. त्यांचे जाब देऊन माघारी रवानगी केली आहे. रवाना छ० ७ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ ८ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख मास. भौमवार.

नं. ४९४५ श्रीगणपति. ( वैशाख शु० १०–१४ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. आपण छ० ५ जिल्हेजचें पत्र पाठविलें तें पावलें. तोंडलीं व शेवग्याचा शेंगा पाठविल्याप्रमाणें पोंचल्या. "बायांचा मुक्काम मंगावतीजवळ कृष्णा उत्तर तीरास आहे. लग्न समारंभाची तयारी करतात. पठाणांनीं वांगीची वस्ती लुटली. देवर अष्टयांची खंडणी एक वेळ घेऊन मागती बोली घेऊन गेले" म्हणोन लिहिलें तें कळलें. वरचेवर तिकडील वर्तमान येत असावें. आम्ही हुकेरीनजीक कोटबागीच्या मुक्कामीं आलों येविशींचें काल लिहिलेंच आहे. रवाना छ० ८ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

छ० १० जिल्हेज सन तिस्सा तिसैन. वैशाख.

नं. ४९४६ श्रीगणपति. ( वैशाख शु० १०–१४ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी. आपण छ० ५ जिल्हेजचें पत्र सांडणीस्वाराबरोबर पाठविलें तें पावलें. "इंग्रजांचीं पलटणें कोंकणांतून आलीं होतीं तीं माघारीं गेलीं अशी बातमी आली. यशवंतराव शिवाजी कळंबीच्या मुक्कामास गेले. चिंतामण आत्माराम हुलजतीच्या मुक्कामास आले. गांव लुटला गेला;" म्हणून लिहिलें तें कळलें. शिंदे बाया यांचें पत्र फरासखान्याच्या सामानाविशीं आल्याचें व त्याचा जाब दिल्याचें लिहिलें तें कळलें. पलटणें सरकारचीं फौज लवकर निघत नाहीं, चालती झाल्यावर आणखी येतील, या अन्वयावर माघारीं जाणार म्हणोन पुण्याचीं पत्रें आलीं त्यांत होतें. बातमीस मिळालें. इंग्रजांचा भाव रहस्याचा नाहीं असें लिहिण्यात होतें. प्रसंग पहात. चांगलें दिसत नाहीं. छ० ६ जिल्हेजीं कोटबागेजवळ मुक्कामास आलों. येथून हुकेरी कोस दीड कोस आहे. रवाना छ० ८ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

छ० १० जिल्हेज सन तिस्सा तिसैन. वैशाख.

नं. ४९४७ श्री. ( वैशाख शु. ११–१५ मे )

पै ॥ छ० ११ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेसीं विज्ञापना. काल बुधवारीं आवशीच्या पूर्व रात्रीस चवदा घटका रात्रीस साडे जाहलें. महाराजांची स्वारी साड्यांस गेली होती. दोन चार वेळां हुजूरची स्वारी बायांच्या डेऱ्यास गेली होती. कळावें. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. वरास देणगी विशेष नाहीं. पांच सहा हजार रुपये महाराजांकडूनच लग्नास खर्चास दिले. कळावें. वरकड कापड वगैरेही इकडूनच दिलें. हे विज्ञापना.

नं. ४९४८ श्रीगणपति. ( १५ मे. )

पै॥ छ० ११ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख भृगुवार दोन प्रहर

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख शुद्ध ११ बुधवारपयत मुक्काम कोटबागी येथें सुखरूप असों. विशेष. वडिलीं दोन तीन आज्ञापत्रें पाठविलीं तीं पावलीं. मुंचामि त्वा चा जप करावयाचें लिहिलें त्याजप्रमाणें करतों. बाया करवीरवासी एक आहेत, जपून असावें, म्हणून आज्ञा, त्यास आज्ञेप्रमाणें हुशार आहों. करवीरवासी यांचा व बायांचा शरीरसंबंध होत होता तें काय झालें ते आज्ञा करावी. लग्न झाल्यावर फुटाफुट होती कीं कसें होतें तें समजेल तसें पुढें करावयाचें. वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षितबावा आले आहेत. वडिलांची प्रकृत दिवसेंदिवस बरी आहे. किमपि चिंता करूं नये. पुण्याकडील वर्तमान लिहावें. तीर्थस्वरूप राजश्री वासुदेवकाकाकडून पत्रें आलेलीं पाठविलीं आहेत त्याजवरून कर्नाटकचें विदित होईल. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळावें. येथें दोन चार मुक्काम होतील. वेदशास्त्रसंपन्न राजश्री शामभटबावांचें पत्र प्रविष्ट व्हावें. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना. आपाजी गोविंद तेरदळास आहेत त्यांजकडे पत्र व कारकून पाठविला होता, परंतु येतां दिसत नाहींत. विदित होय हे विज्ञापना. काल तलाव्यास म्हणोन गेलों तों हुकेरीचे ठाणें मोकळें होतें, बंदोबस्त करून आलों. हे विज्ञापना. सुतरस्वार ऐवजासमागमें आला तो माघारा पाठविला आहे हे विज्ञापना

नं. ४९४९ श्री. ( वैशाख शु० ११–१५ मे. )

पै॥ छ० १३ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांच्या स्वारीचे

---

१ चिठी नारो हरी करंदीकर याची करवीरकर महाराजांचे लष्करांतून मिरजेस. २ करवीरकर महाराजांचे लष्करांतून नारो हरि करंदीकर यांचें मिरजेस पत्र

कूच काल भौमवारीं दुपारीहून भोजनानंतर जाहलें ते कृष्णातीरीं मौजे राजापूर येथें मुक्काम जाला. बायांचा मुक्काम कृष्णापैलतीरीं मौजे मंगावतीवर आहे. काल भौमवारीं गोंधळी लग्न लागलें. महाराजांच्या कन्या घाटगे व निंबाळकर उभयतां बरोबर होत्या त्यांस काल दुपारीहून येतांना रांगोळीपासून मुली करवीरीं लावून दिल्या. महाराजांची स्वारी लग्नास गेली होती. दोन घटका बसले होते. नंतर डेऱ्यास दाखल स्वारी जाली. रात्रौ आणखी उभयतां कन्यांस आणावयाकरितां राजश्री हैबतराव गायकवाड पाठविले आहेत. आज सायंकाळपावेतों येतील. नवऱ्यास देणगी झालेल्याचा शोध करून मागाहून लिहितों. आज उभयतां लष्करांच्या कहीनें राजापूर लुटलें. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम आरबावीवर आहे व आप्पासाहेब कोटबागीवर आहेत असें येथें वर्तमान आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री नारो कृष्ण पुण्याहून शिंद्यांकडून राजश्री बाळोबा पागनीस यांचे विद्यमानें आले आहेत. त्यास लग्नाचा समारंभ जालेवर बाया पुण्याकडे जाणार असें वर्तमान आहे. कळावें हे विज्ञापना.

नं. ४९५० श्रीगणपति. ( वैशाख शु० १२–१६ मे. )

पै॥ छ १० जिल्हेज. तिस्सा तिसैन. वैशाख मास.

विज्ञापना. कवठ्यांत महाबळेश्वरकर दीक्षित आहेत त्यांस आणून विचारणा करून अनुष्ठान करावयास पंडितराव यानीं आपणास लिहिलें, त्यास भटजींस आणून विचारणा करून संख्या किती, किती दिवस, तें यथास्थित करून साहित्य विठ्ठलपंत फडके यांस आज्ञा होऊन चालतें व्हावें. मनस्वी मात्र असूं नये. हे विज्ञापना.

नं. ४९५१ श्रीशंकरप्रसन्न. ( वैशाख शु० १२–१६ मे. )

पै॥ छ० १६ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाखमास.

राजाश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील तागायत छ० १० जिल्हेजपावेतों यथास्थित जाणून स्वकीय लिहित गेलें पाहिजे. विशेष. येथून पत्रें गेलीं त्याचा जाब छ० ४ रोजचा पाठविला तो छ० ९ मिनहूस पावला. "तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब यांचा मुक्काम बागेवाडीवर

---

१ रामचंद्रपंत आपांचे पत्र मिरजेस बाळासाहेबांस. पत्रावरील मिति व तारीख पेवस्तीची.

आला आहे. बायांकडून राजश्री बाळाभाऊ गेले होते त्यांचें वडिलांचें रहस्य न बनतां माघारे आले,. करवीरकरांचा व बायांचा एक लक्ष. लग्नाचा समारंभ होत आहे, व मोंगलाची फौज माघारी गेली, व राजश्री गोपाळराव चिटणीस सोलापूर प्रांतीं आहेत, व विठ्ठलराव बल्लाळ यांस मिरजेस आणविले आहेत, गोखले सौंदत्तीकडे आहेत," वगैरे मजकूर लिहिला तो कळला. ऐशास राजश्री भाऊ बागेवाडीवर आले. बायांचा समेटाचा अर्थ नाहीं. पेशजी मोंगलाची फौज व गोपाळराव चिटणीस भाऊंपाशीं पोहचावे अशी सरकारचीं पत्रें आलीं त्यांतील कांहींच झालें नाहीं. बाया व करवीरकर यांचीं लगत लुटत नाहीं. तेव्हां राजश्री धोंडोपंत गोखले लांब आहेत त्यांस आणविले आहेत किंवा नाहींत? मोठ्या अडचणी! श्री करील त खरें. इकडे शिंदे यांजकडून चिटणीस व आंग्रे यांजकडील कारकून व लोक येऊन दुकित्ते खंडण्या घेऊन मनस्वी उपसर्ग केला आहे. बाकी ठेविली नाहीं तें पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. हा पर्याय असा होतच आहे तों बायांकडील पठाण दोन अडीच हजार जमाव सुद्धां कराड प्रांतांतून यथासांग समाचार घेऊन वांई देशांत उतरावयाकरितां नाहवीच्या घाटासुमारें येऊन तमाम राखे केले आहेत. त्यांचे दुमालियावर बारभाई व गौळी आहेत त्यानीं खंडण्याचा यथानुक्रमें पाठ चालविला आहे. अशी चहूंकडून धुंदी आहे. पार पडेल तें खरें. विठ्ठलराव बल्लाळ यांस मिरजेस न्यावयाचें केलें, उत्तम केलें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४९५२ श्री. ( वैशाख शु० १२–१६ मे. )

पौ॥ छ० ११ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेसीं विज्ञापना. आज गुरुवारीं श्रीमंत महाराजांच्या कन्या घाडगे व निंबाळकर उभयतां व राजश्री विश्वासराव घाडगे सर्जाराव यांची स्त्री व राजश्री सिंदरामराव भोसले यांची स्त्री ऐसीं प्रातःकाळच्या तास दिवसास आलीं. नंतर बायांची स्वारी महाराजांच्या डेऱ्यास आली. चार घटका बसली होती. नंतर महाराजांच्या कन्या व सर्जाराव यांची स्त्री व भोसले यांची स्त्री समारामें करून बायानीं बरोबरच घेतलें. आपले डेऱ्यास गेली. येथें चार सहा घटका बैठक जाली. भोजनाचाही योग घडला. नंतर स्वारी माघारी कन्यांची आली.

---

१ करवीरकर महाराज यांच्या लष्करातून नारो हरि करंदीकर वकील यांचें पत्र मिरजेस बाळासाहेबांस.

याप्रमाणें जालें. आज गुरुवारीं कूच होऊन सदलगेच्या मुक्कामीं जावें म्हणोन नगारा जाला होता इतक्यांत बायांचा निरोप आला कीं, आज महाराजांच्या कन्या आल्या आहेत, समारंभ कांहींच जाला नाहीं, तेव्हां आज कूच होऊं नये. त्याजवरून मुक्काम जाहला. कळावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांचा मुक्काम कोटबागीवर आहे. घोडगिरी हुकेरी कोटबागी गुडुस वगैरे तमाम ठाणीं घातलीं. येकमनमुरडीस बुधवारीं फौज जाणार होती. कळावें. हे विज्ञापना.

नं. ४९५३ श्रीगणपति. ( वैशाख शु० १३–१७ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. कागद गड्या चिरंजीव राजश्री विनोबा आबा व हरबाअण्णा यांजबरोबर पाठवितों म्हणोन लिहिलें तें कळलें. रवानगी झालीच असेल. वेदमूर्ति राजश्री दीक्षितबाबा येथें आहेत. लष्करांत रहात नाहींत. कारण संपर्कदोष व दुष्टध्वनिश्रवण होणार याजकरितां गोटाच्या शेजारी गांवांत राहतात. दर्शनोद्देशें आम्हीच तेथें जातों. तेही कोणे वेळेस येतात. रवाना छ० ११ जिल्हेज. बहुत काग लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० १३ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख मास.

नं. ४९५४ श्री. ( वैशाख. शु० १३–१७ मे. )

पै॥ छ० ११ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेशीं विज्ञापना. काल बुधवारीं दक्षिणा ठाणें अकिवाट येथें जाली. ब्राह्मण दोन अडीच हजारपर्यंत जाले. दक्षिणा रुपयापासून उत्तम प्रत पांच रुपयेपर्यंत जाली. राजश्री राजाज्ञा देकारास बसले होते. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९५५ श्री. (वैशाख शु० १३–१७ मे. )

पै॥ छ० ११ जिल्हेज सन. तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेशीं नारो हरि करंदीकर. दोन्ही कर जोडून शिर सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना ता॥ छ० ११ जिल्हेजपावेतों मु॥ लष्कर कृष्णातीर नजीक राजापूर यथास्थित असे विशेष. स्वामींनीं छ० ८ जिल्हेजचें पत्र पाठविलें तें छ० १० मिनहूस पावलें. लग्नाचा समारंभ सिद्धीस गेल्याचें लिहिणें

१ करवीरकर महाराजांचे लष्करांतून नारो हरि करंदीकर याची मिरजेस बाळासाहेबांस चिठी. दासीपुत्राचें लग्न झालें त्यासंबंधें महाराजांनीं दक्षिणा दिली.

म्हणोन आज्ञा, त्यास लग्नसमारंभाचा मजकूर कालच्या पत्रीं सेवेसीं लिहिला आहे. लग्नसमारंभ उत्तम प्रकारें जाला. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. आज भृगुवारीं लष्करचा मुक्कामच आहे. कळावें. हे विज्ञापना.

नं. ४९५६ श्रीगणपति. (वैशाख शु० १४–१८ मे.)

पै॥ छ० १२ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाखमास.

विज्ञापना. वडिलांची प्रकृत अजुनी नीट नाहीं. दैवी उपाय लौकर जाले पाहिजेत. त्यास तेथें ब्राह्मण आहेत त्यांस एकांतीं पुसून परकृत परिहार होऊन स्वकल्याण होय असें त्वरित जालें पाहिजे. वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षितबावा कृपा करून येथें आले. गांवांत राहिले आहेत. त्यांचा पूर्ण आशीर्वाद आहे. 'किंचित शरीरभोग आहे. धैर्य करा. ईश्वर कल्याण करतो.' असें (बावांचें) वारंवार दृढ म्हणणें आहे. ईश्वर कृपा करील. चिंता नाहीं. वडीलींही शोध करून ईश्वराचे सेवेस लागलें पाहिजे. उभयतां महापुरुषांचा आशीर्वाद आहे. चिंता नाहींच. परंतु धैर्य होत नाहीं. हे विज्ञापना.

नं. ४९५७ श्रीगणपति. (१८ मे)

पै॥ छ० १२ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाखमास.

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख शु० १४ मंदवार पर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं बुधवारचें पत्र पाठविलें तें पावलें. पुण्याकडील व वडगांवचें वर्तमान करवीरवासी यांचा बाया शिंदे यांचा शरीरसंबंध जाल्याचें लिहिलें तें कळलें. इकडील वर्तमान तर प्रस्तुत कोटबागीवर मुक्काम आहे. चिकोडी यमकनमुर्डी व बागेवाडी येथील संधानेंही किंचित आहेत. लौकर उलगडेल असें दिसतें. पुण्याकडील (काय वर्तमान तें लिहावयास) आज्ञा व्हावी. पुढें बाया कोणीकडे जाणार ते आज्ञा व्हावी. वडिलांची प्रकृत प्रस्तुत बरी आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९५८ श्रीगणपति. (वैशाख शु० १५–१९ मे.)

पै॥ छ० [1]१३ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाखमास.

विज्ञापना. तीर्थरूपांची प्रकृत वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षितबावा

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

आले पासून किंचित बरी आहे. अनुष्ठानासही बावानीं आज्ञा केल्याप्रमाणें ब्राम्हण लाविले आहेत. आरोग्य होईल. चिंता करूं नये. बावांचे दर्शनास जाऊन चार सहा घटका समागम घडावा हें घडत नाहीं. बावा देवपूजेचे वेळेस येतात. कृपा पूर्ण आहे. 'कल्याण होतें. सर्व विषयीं चिंता नाहीं. कतबा लिहून देतों' म्हणतात. शरीरभोग भोगला पाहिजे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९५९ ॥ श्रीकृष्ण जयराम.[1] ॥ ( २१ मे. )

पै॥ छ० १८ जिल्हेज. सन तिस्सा. वैशाख.

श्रीमंत राजश्री रावजी दादा धर्मपरायण यांप्रती.

स्नेहाभिलाषी महादेव गोसावी संस्थान वडेगांव कृतानेक आशीर्वाद उपरी. येथील क्षेम तागायत वैशाख वद्य द्वितीयापावेतों आपलें कल्याण चिंतोन श्रीसन्निध स्नानसंध्या करून सुखरूप असों. विशेष. इकडील वर्तमान तरी पठाणांचा मुक्काम आमचे गांवानजीक पांचा कोसांवर जाहला आहे. कही-वाले वगैरे स्वांरानीं गांवांत बहुत दंगा केला तो लिहितां पुरवत नाहीं. उपरांतिक गांवचे रखवालीस स्वार असाम्या तेरा आणिल्या आहेत त्यांचा रोज वगैरे खुराक नित्यखर्च भारी पडत आहे. इतकें असोन शेवट परिणाम कसा होईल हें ही समजत नाहीं. बरें. श्री इच्छा प्रमाण ! यानंतरी आम्हीं राजश्री यशवंत शिवाजी यांचे भेटीस गेलों. तेथून माघारे येतांना गांवानजीक दोन कोसांवर चोर रावतानी लुटलें. अंगावरील पोषाख शालजोडी व रुमाल शाल-नामेचा व पायजमा व नेसावयाचा धोतरजोडा व अंगरखा व देव देवतार्चन व घोडेचें सामान आदी करून सर्वस्व हरण झालें. याजप्रमाणें विचार जाहला. श्रुत व्हावा याजकरितां पत्रीं दर्शविलें. वरचेवर पत्रद्वारें परामर्ष करीत जावा. बहुत काय लिहिणें लोभ करीत जावा हे आशीर्वाद.

नं. ४९६०[2] श्री. ( वैशाख व० २—२१ मे. )

पै॥ छ० १७ जिल्हेज. तिस्सा तिसैन. वैशाख.

सेवेशीं अंताजी राम शिराळकर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १५ माहे जिल्हेजपावेतों स्वामींचें कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. तेथें आज्ञा जे, "बायांच्या लष्कराचा मुक्काम शेडसाळ कवठेंवर होणार. फत्तेसिंग माने व चतुरसिंग अंकलीवरून गेले. त्यांचा मुक्काम कोठें जाला ? " म्हणोन आज्ञा, त्यास

---

१ जयरामस्वामीचें. २ पत्र हरिपुराहून बाळासाहेबांस.

मानसिंग व चतुरसिंग व यशवंतराव शिंदे व आणखी एक दोन पथकें मिळोन हजार पर्यंत जमाव होत अंकलीकडून हरिपूरचे दक्षिण वेशीचे सुमारें गोळीचे टप्यावर चार पांचशें स्वांर सडे होऊन येऊन उभे राहिले. त्यांचें म्हणणें आज येथें मुक्काम हरिपुरासच करावयाची ( आह्मांस ) आज्ञा आहे. मागाहून याच मार्गें बायांचें लष्कर येणार; ह्मणोन त्या आलेल्या स्वांरांनीं सांगितलें. त्याजवरून ती॥ बाईनी[1] सांगून पाठविलें जे, येथें मुक्काम करणेचें प्रयोजन नाहीं. मुक्काम केल्यास कलागत होईल. इतके बोलणें होत आहे इतक्यांत त्याणीं मुक्कामाची ढाल उभी केली. त्याजवरून जेजालीच्या गोळ्या दोन चार टाकिल्या. नंतर त्यांस ही समजलें कीं राहिल्यान परिणाम नाहीं. चार घटका उभे राहून बाळंभट दात्ये यांचे मळीचे सुमारें श्रीकृष्णा उतरून डिग्रजेचे सुमारें मुक्कामास गेले. वडिलांचे बातमीदार गेले आहेत. सायंकाळीं कोण ठिकाणीं मुक्काम झाला हे समजेल. बायांचा मुक्काम शेडसाळ कवठेंवर येणार ही बातमी प्रातःकाळच्या चार घटका दिवसास वडिलांची आली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९६१ श्रीगणपति ( वैशाख व० ३–२२ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत छ० १६ जिल्हेजपर्यंत यथास्थित असे. विशेष. शिवाजी खंडेराव सेंडूरकर यांच्या स्त्रिया दोघी. दोघींच्याही पोटीं दोन पुत्र आहेत. धाकटी स्त्री राधाबाई पुत्रसुद्धां हल्लीं गुळ्यांस मिरजेस आहे. तिच्या पोटास मिळत नाहीं व मूल लग्नाचा जाहला त्याचें लग्न होत नाहीं. आनंदीबाईस पुसिलें असतां सुरळीतपणें बंदोबस्त करून देत नाहीं म्हणोन कळलें. ऐशियास आपण येविशीं आनंदीबाईस निक्षून ताकीद करवून वाजवी करणें. शिवाजी खंडेराव यांची धाकटी स्त्री राधाबाई मिरजेंत आहे तिचा विभाग तिला देई तें करावें. म्हणजे तिचे चरितार्थाचा बंदोबस्त होऊन मुलाचें लग्नही होईल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ०१९ जिल्हेज सन तिस्सा तिसैन वैशाख मास.

नं. ४९६२ श्री. ( वैशाख व० ४–२३ मे. )

पै॥ छ० १८ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक रामाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार[2] विज्ञापना

---

१ सरस्वतीबाईनीं २ पत्र तेरदाळाहून.

तागायत छ० १७ जिल्हेजपावेतों स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें "लष्करास जासूद जोडी जात आहे यासमागमें एक प्यादा देऊन पोचवणें. येथून प्यादा दिला आहे तो माघारा येईल. जोती घोरपड्याचें वर्तमान लिहिणें" म्हणोन आज्ञा, त्यास जासूद जोडी आली ती परभारें ऐनापुराहून सोबत पाहून लष्करास गेले म्हणोन प्याद्यानें जबानी सांगितलें. घोरपडा सलतनतसहित हस्तगत राजश्री नारायणराव घोरपडे यांसीं जाहला तो अद्याप मुधोळांत कैदेंतच आहे. त्याची स्त्री पळोन गेली ती कोणीकडे गेली त्याचा पत्ता समजला नाहीं. सविस्तर वर्तमान सेवेशीं कळावेंकरितां विनंती लिहिली आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९६३ श्री. ( वैशाख व० ५-२४ मे. )

पै॥ छ० १९ जिल्हेज. सन तिस्सा. वैशाख.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेशराम पेठे दोनी कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ८ जिल्हेजपावेतों सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. ठाणें बागेवाडी येथें उदईक तोफा सुरू होणार व मोर्चेही लागणार. व चिकोडीसही एक दोन दिवसांत ठाणें बसेल. पेठेंत बाहेरील चौकी बसली आहे. श्रीरंगपट्टण इंग्रजानें घेतलें म्हणोन राजश्री वासुदेवपंतकाका यांणीं मासुराहून पत्र पाठविलें त्यांत लिहिलें होतें. सत्य मिथ्या न कळे. कारखान्याकडील लोकांचे रोजमरे जिल्कादचा रोजमरा राहिला आहे. तूर्त रोजमरा वोढीस पडला आहे. जो मजकूर होईल तो मागाहून लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९६४ श्रीगणपति. ( वैशाख व० ५-२४ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. कागद लिहा वयास अगदीं नाहींत. सारीं लिहिणीं तटलीं आहेत. याजकरितां येथें बाजारांत खर्ची दखील मिळत नाहींत. त्यास आपलीं माणसें वरचेवर येतात त्यांजबरोबर एक दस्ता पाठवून द्यावा. खर्ची कागद असल्यासही चिंता नाहीं. रवाना छ० १८ जिल्हेज. हे आशीर्वाद.

छ० २० जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख

---

१ धोंडदेव पटवर्धन. शेळकर. २ ही चिठी अगदीं भिकार खर्ची कागदावर लिहिलेली आहे.

नं. ४९६५ श्रीगणपति. ( २४ मे. )

पै॥ छ० १४ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

अपत्यें महादेवानें दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख शुद्ध पंचमी भृगुवारपर्यंत यथास्थित असे. विशेष. तुकोजी घोरपडे देशिंगकर यांचीं मुलें माणसें मिरजेंत गुळ्यास आलीं आहेत. त्यास आपणास हर कोणी गैर वाका समजाऊन त्यांचे मुलां माणसांस उपद्रव करवितील. तर हे आपल्या पदरीं आहेत. तेथें गैरवाका कोणी समजाऊन कुटुंबास उपद्रव होईल. त्यास आपले येथें चाकरीस आहेत. चाकरी सोडून जाबसाल करावयास येतां नये म्हणोन विनंती लिहिली आहे. तर फौजही कृष्णेवर लौकरच येईल. त्यांची आपली गांठ पडेल. मीही भेटल्यावर समक्ष विज्ञापना करीन तों पर्यंत त्यांस कोणतेविशीं उपद्रव होऊं नये. आपले अशा तंगचाईत बहुत उपयोगी पडले म्हणून विज्ञापना लिहिली आहे. सर्व प्रकारें पदरीं आहेत. कृपा करावी. पदरीं आहेत. दुसरा विचार नाहीं. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९६६ श्रीगणपति. ( वैशाख व० ५–२४ मे. )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं आशीर्वाद उपरी. आपण छ० १५ जिल्हेजचीं पत्रें पाठविलीं तीं प्रावलीं. राजश्री नारो हरी यांचीं पत्रें पहावयास पाठविलीं तीं पाहोन माघारी पाठविलीं आहेत. "करवीरकर हुपरीच्या मुक्कामास गेले. बाया शिंदे माघारे फिरणार अशी बोलवा आहे. यशवंतराव शिवाजी त्रिंबकवाडीजवळ आले. गांवगन्ना उपद्रव बहुत केला आहे. गोखले कोठें आहेत ? पट्टणाकडील वर्तमान काय ?" म्हणोन व पाढरे कुरुंदवाडास येणार येविशींचें लिहिलें तें कळलें. ऐशियास करवीरकरांकडील जमीयत सडी चिकोडीस आली आहे. खुद्द बेडकीहाळावर आहेत. काल छ० १७ रोजीं इकडील तलावा चिकोडीनजीक गेला होता. जमीयत दृष्टीस पडली. कोटबागीहून काल कूच करून बागेवाडीनजीक आलों. आज येथील ठाणें बसवावयाचें आहे. गोखले येलबर्ग्यास गेले आहेत. येथेंही वर्तमान त्यांचा गळाठा जाला म्हणोन उडालें होतें, परंतु बातल आहे. पट्टणचीं बातमीचीं पत्रें आलीं

---

१ परशुरामभाऊंचे तिसरे पुत्र महादेवराव दाजी यांचें बाळासाहेबांस पत्र मिरजेस लष्करांतून. २ बाळासाहेबांस पत्र परशरामभाऊंचें.

तीं आपणाकडे पाठविलींच आहेत. अद्यापं पक्कें दुणावत नाहीं. रवाना छ० १८ जिल्हेज. बहुत काय लिहिणें. लोभ करावा हे आशीर्वाद.

पै॥ छ० १९ जिल्हेज सन तिस्सा. वैशाख.

नं. ४९६७ श्री. ( वैशाख व० ५—२४ मे. )

पै॥ छ० १९ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन.

चि॥ राजश्री जनार्दनपंत पेठे यांसीं प्रती गणेश राम पेठे. आशीर्वाद उपरी. येथील क्षेम ता॥ छ० १८ जिल्हेज मु॥ बागेवाडी येथें सुखरूप असों. विशेष. तुम्हांकडून फार दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी सदैव पत्रीं सविस्तर ल्याहावें. यानंतर इकडील मजकूर बागेवाडीस उद्ईक मोर्चे व तोफा लावणार. कळावें. चि॥ राजश्री त्रिंबकराव पेठे व वे॥ राजश्री सदाशिवभट नरवणे ऐसे उभयतां काल येथें आले. त्याशिवाय आणिक येथें कुरुंदवाडाहून वे॥ राजश्री बाळंभट्ट सिद्धये व हरभट रानडे वगैरे मंडळी भटजी सात आठ असामी आज येणार. येथून दोन कोशांवर आले. कहीच्या उपद्रवामुळें तेथेंच राहिले. त्यास गडी येथून व प्यादे आणावयास पाठविले आहेत. सायंकाळपर्यंत येतील. पुढें काय मजकूर होईल तो लिहितों. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ४९६८ श्रीगणराज. ( वैशाख व० ६—२५ मे )

पै॥ छ० २० जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे सेवेशीं

अपत्यें विष्णूनें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १९ जिल्हेज पावेतों वडिलांचे आशीर्वादें सुखरूप असों. विशेष वडिलांकडून आशीर्वाद पत्र येऊन सांभाळ होत नाहीं. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळ करावा. यानंतर वडिलांचा मुक्काम बागेवाडीवर आहे. आज बागेवाडीस तोफा लावणार. वेद-शास्त्रसंपन्न राजश्री दीक्षितबावा कोटबागीहून आज शिरट्टीस आले. मंगळ-वेढ्याकडे राजश्री गोपाळराव चिटणीस व आंग्र्यांची फौज आली त्यांनीं घास-दाणेचे रोसे केले म्हणोन चिरंजीव राजश्री कृष्णराव यांनीं लिहिलें होतें.

---

१ इंग्रजांनीं श्रीरंपट्टण घेतल्याचें वर्तमान. २ सावंतवाडी संस्थानांत कऱ्हाडे चितपावनांचा तंटा माजला होता त्यांतले वादी हे भटजी मंडळी तंटा तोडून घेण्याकरितां परशुरामभाऊंच्या लष्करास आले होते. ३ भाऊंच्या लष्करांतून नत्र विष्णु अनंत पटवर्धन यादवाडकर यांचें बाळासाहेबांस.

येथून वडिलांचीं साहित्यपत्रें परगणे मजकुरास उपद्रव करूं नये म्हणोन घेऊन पाठविलीं आहेत. वडिलीं पुण्यास राजश्री बाळोबा तात्यांस लिहून तिकडोन बंदोबस्त करविल्या व्हावयाजोगें आहे. आज्ञा झाल्यास येथून विनंती करून वडिलांचीं पत्रें राजश्री तात्यांस घेऊन सेवेशीं पाठवितों. चिकोडीचें संधान आलें आहे. एका दो दिवसांत हस्तगत होईल. सेवेशीं विदित होय. मंगळवेढ्याकडील वर्तमान लिहिणेंविशीं आज्ञा झाली पाहिजे. कृपा करावी हे विज्ञापना.

नं. ४९६९ श्री. ( वैशाख व ० ६–२५ मे. )

पै॥ छ० २४ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलाचे सेवेशीं.

अपत्यें रामचंद्र श्रीधर काळे शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत वैशाख वद्य ७ मंदवारपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. बायांचा वगैरे उपद्रव आहे तसाच आहे ह्मणून लिहिलें तें कळलें. मी आज निघोन गराड्याच्या मुक्कामास जातों. श्रीमंतांनीं कृपा करून सरकारची शिक्केकट्यावर दिली. जप्तीस चंवरी व पथकाची शिक्केकट्यार होती ती दिली. धारवाडच्या सनदा दिल्या. तीा राजश्री जनोबा सुभेदारसुद्धां मंडळी हवालीं जाहली ती घेऊन वडिलांचे दर्शनास येतों. इंग्रजांनीं पट्टणास मोर्चे बसविले होते. महिनाभर मोर्चे होते. नंतर छ०१ जिल्हेजीं हल्ला करून पट्टण इंग्रजांनीं घेतलें. टिपू रणास आला. कुटुंबसह दौलत इंग्रजांचे घरास गेली. वडीलांस कळावें यास्तव विनंती लिहिली आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९७० श्रीगणपति. ( २५ मे. )

पै॥ छ० १९ जिल्हेज सन तिस्सा तिसैन. वैशाख. मंदवार.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख बहुल षष्ठीपर्यंत मुक्काम बागेवाडी येथें सुखरूप असे. विशेष. वडिलांकडून दोन चार पत्रें आलीं· परंतु उत्तर द्यावयास बनलें नाहीं. कारण इंदुवारीं तलाव्यास गेलों. चिकोडीजवळ गेलों तों आंतील प्यादे निघून गोळ्या मारूं लागले. पेठेवर घोडीं घातलीं. दोन घोडीं ठार झालीं व दहा जखमी झालीं. दोन चार माणसें जखमी झालीं. पेठ थोडीसी लुटली. सायंकाळ जाला. मध्यरात्रीस गोटास आलों. पेठेवर उठलों तेव्हां राजश्री विष्णुदीक्षित यांस उजव्या हातावर लहानशी तरवारीची जखम आहे. दुसरे दिवशीं

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

चिरजीव राजश्री बाबा दाजी उभयतां चमकनमुर्डीस पाठविले तेथें एक दिवस राहून ठाणें घालून आले. मागें आपाकडील फौज येऊन धरणें बसलें तें भौमवार बुधवारीं स्नानदेखील नाहीं. रात्रौ स्नान मात्र झालें. काल गुरुवारीं सकाळचे प्रहर दिवसास तोड होऊन उठून गेले. नंतर कूच करून वडिलांची स्वारी मुक्काममजकुरास आली. दीक्षित बावांकडे कोणी गेलें नाहीं. ते तसेच निघून घरास जावयास म्हणून चालले. मी जाऊन 'येथें यावें. दोन दिवस राहून तीर्थप्रसाद देऊन मग प्रयाण करावें.' अशी विज्ञापना केली. मान्य केली. आज भोजनोत्तर येतील. उद्ईक बागेवाडीस तोफा लावाव्या असें योजलें आहे. करवीरवासी यांची फौज काल तलाव्यास आली होती. चिकोडीजवळ इकडून चिरंजीव राजश्री बाबा काल गले होते. उभय पक्षीं सामानाची नजरानजर मात्र झाली. अस्तमान झाल्यामुळें माघारे गोटास प्रहर सहा घटका रात्रीस आले. बायांची करवीरवासी यांची गांठ तुटली. याज उपरी इकडे ठरूं पावणार नाहींत. सडी फौज घेऊन बेडकेहाळ येथें आहेत. बुनगें ही आलें म्हणतात. एक वेळ रात्री गलबल करून जाणार म्हणतात. मग पहावें. वडिलांची प्रकृत दिवसें दिवस उत्तम आहे. श्री कृपा करील. वेद-शास्त्रसंपन्न राजश्री दीक्षितबावांचा व शामभटबावांचा पूर्ण आशीर्वाद आहे. चिंता नाहीं. चिरंजीव सौभाग्यवती पार्वतीबाईस दशमी एकादशीचे सुमारें पाठवितों. येऊन पावेल. प्रस्तुत बायांचा मुक्काम कोठें आहे तें लिहावें. यशवंत शिवाजी त्रिंबकवाडीवर आहेत म्हणोन लिहिलें, त्यास पुढें त्यांचा रोख कोणता तें कळलें पाहिजे. कवठ्यांहून दीक्षित येऊन भेटून सुमुहूर्त पाहून येतों म्हणोन गेले ते आलेच असतील. ( अनुष्ठानास ) आरंभ जाहल्याची आज्ञा केली पाहिजे. पुण्याकडील वर्तमान लिहिलें पाहिजे. धोंडोपंत गोखले कोपळा-नजीक सुखरूप आहेत. सावनूरकरांसाठीं लिहिलें, त्यास तूर्त तें व्हावयाचें नाहीं. गोखले आज्ञेप्रमाणें वर्तावयाचे तूर्त नाहींत. खैरामिय्या यांस मिरजेस लावून देतों. बहुत काय लिहिणें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९७१ श्री. ( वैशाख—मे. )

सेवेशीं विज्ञापना. पुणियास येथून हुजऱ्या गेला होता तो आला. रा॥ बळवंतराव खांडेकर यानीं पत्र पाठविलें त्यांतील वर्तमान रा॥ आत्माराम बावा

---

१ नारो हरि करंदीकर याचें पत्र करवीरकरांच्या लष्करांतून मिरजेस. पत्रावर महिना व साल अजमासानें घातलें आहे. बहुधा हें पत्र चार सहा महिने आधीं लिहिलेलें असावें.

शेणवी यार्णी राजमंडळचें बोलणें श्रीमंतांसीं केलें. श्रीमंतानीं आज्ञा केली जे, श्री॥ राजश्री नानांकडे जाऊन जें बोलणें असेल तें बोलावें म्हाणोन. त्याजवरून श्री॥ राजश्री नानांकडे जाऊन श्रीमंतांचे आज्ञाप्रों विनंती केली. नंतर नानांची आज्ञा जाली कीं, पेशजी कै॥ श्रीमंत नारायणराव साहेबांचे वेळेस ठराव होऊन कागदपत्र जाले आहेत ते आणवावे. ते समजोन घेऊन त्याप्रों श्रीमंतांस विनंती करावयास येईल. म्हणोन पेशजी कागद पत्र जाले त्यांतील अन्वय पाहतां चिकोडी व मनोळी दोनी तालुके सरकारांतून हुजूरचे सेवेसी यावे. हुजुरून सरकारांत सोळा लक्ष रुपये यावे असें असतां त्यावेळेस ऐवजाची निभावणी इकडून जाली नाहीं. सबब परांजपे यार्णी दोन्ही ठार्णी घेऊन तालुका सरकारांत घेतला त्यापासून आजपावेतों वहिवाटतात. याउपरी इकडून यादी व कागदपत्र पुणियास जाऊन काय ठराव होतो पहावें. खांडेकर यांजकडे कागदपत्र पाठविणेंविशीं आज्ञा जाली. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९७२ श्रीसुब्रम्हण्य. ( वैशाख व० ७—२९ मे. )

पै॥ छ० २० जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाखमास.

राजश्री गंगाधरराव काका गोसावी यांसी.

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित यशवंतराव घोरपडे अमोरुल उमराव दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष आपण पत्र पाठविलें तें उत्तम समयीं पावोन बहुत संतोष झाला. “ मुलें मनुष्यें दटवाडाहून येथें आल्यावर घर जागा आपली आहे; घर ही मिळेल. राज्यकांति आहे. सावध आहों.” म्हणोन लिहिलें, फार संतोष पावलों. वडीलपणें केडून सर्वत्रांचा परामर्ष करावयाचा भार आपणांस मिळाला असतां तेथें लिहून कळवावेंसें नाहीं. राजश्री भाऊंची स्वारी ऐलीकडे आली, वर्तमान ऐकून संतोष आहे. त्या राज्याची बंदोबस्ती होईलसें दिसतें. इकडून ही सरकारचीं पत्रें तिकडे रवाना झालीं आहेत. आपणास कळावें. शिंदे यार्णी आपले बंदोबस्ताकारितां पागनीस यांस आणिले आहेत. त्यास त्याच गृहकृत्यांतील महाली व मुलखी व फौजेंतील बंदोबस्त करावयाचे योजना चालली आहे. ऐलीकडे येथून कागदपत्रें बाया ऐलीकडे येणेंविशींचीं लिहितात. परंतु बाया येणें घडत नाहीं याजमुळें दम खाल्ला. पुण्यांतील भाव व येथील भाव [१]मचर्या पाहतां अतिविषमयोगाची अभिवृद्धि आहे. त्यापक्षीं राज्य-

१ येथून स्वदस्तुर आहे.

कांतीच्या बंदोबस्त आपल्या ध्यानींच आहे. हमेशा डाकेवर पत्रें येत जात असतील त्या जासुदांस ताकीद असावी कीं आम्हांकडील वर्तमान घेऊन येत जाणें. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ४९७३ श्री. ( वैशाख व० ७–२६ मे. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव गोविंद स्वामी गोसावी यांसी.

पोष्य अमृतराव रघुनाथ. नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणें. विशेष. वाळवें महालांत खासगी-कडील ठाणें बसलें होतें. त्यास प्रस्तुत सखाराम थोरात याणीं बखेडा करून ठाणें उठविल्यामुळें राजश्री बळवंतराव यशवंतराव यांजकडे कमावीस सांगोन बंदोबस्ताची आज्ञा केली आहे. त्यास प्रयोजन पडल्यास तुम्हीं मशार निल्हेचे कुमकेस स्वार देऊन अंमल बसवून देणें. जाणिजे. छ० २० जिल्हेज. सु॥ तिस्सा तिसैन मय्या व अलुफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पै॥ छ० २० मोहरम सन मय्यातैन व अलुफ. ज्येष्ठमास.

नं. ४९७४ श्रीगणराज. ( वैशाख व० ७–२६ मे. )

पै॥ छ० २१ जिल्हेज. इंदुवासर. सन तिस्सा तिसैन.

अपत्यें श्रीपतीनें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० जिल्हेज पावेतों वडिलांचे आशीर्वादें करून सुखरूप असे. विशेष. वडिलांस दोनचार पत्रें पाठविलीं तीं पावलींच असतील. पावलियाची आज्ञा झाली पाहिजे. इकडील वृत्त बागेवाडीस तोफा लागू झाल्या आहेत. फौजा तलाव्यास जात आहेत. करवीरकरांकडील फौजेंतील पथकें उठोन आलीं पांढरे व कदम वगैरे मिळून हजार अकाराशें कुरुंदवाडावर. त्यांसही पत्रें गेलीं. येणें विशीं गेलीं आहेत. त्यांची कस्त फार आहे. एक वेळ येऊन लढाई द्यावी अशी आहे. श्रीसत्तेकरून काय घडेल तें खरें. शिंदे बाया हरिपुरास गेल्या. पुढें दूर कूच जाणार म्हणोन पत्रें आलीं. राजश्री धोंडोपंत गोखले येलबर्गे प्रांतीं गेले होते. गदगाकडे वगैरे उपद्रव करणार असें आहे. मुळगुंद वगैरे जागीं घासदाण्याचे वगैरे रोखे केले आहेत. अशी प्रकृत त्यांचा आहे. वडिलांचे पुण्य विचित्र आहे त्या योगें करून सर्वंही यथास्थित घडेल. हल्लीं वडिलांची प्रकृत बरीच आहे. वेदशास्त्रसंपन्न दीक्षित यांची कृपा पूर्ण आहे. सहवास घडावा म्हणजे निःशेष आरोग्य होईल याजविशीं संशय नाहीं. साक्षात सांब मूर्ति ! त्यांचीं लीला तेच जाणत. हल्लीं कोटबागींत आहेत. वेदशास्त्रसंपन्न

ाजश्री शामभटजी ही कृपा करीत आहेत. शिव विष्णु एक रूपें कृपा करीत आहेत. कांहीं चिंता नाहीं. पुण्याहून मंडळी घेऊन राजश्री बाबा फडणीस आले ते कोठें आले तें लिहावयास आज्ञा झाली पाहिजे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९७५ श्रीगणपति. ( २७ मे. )

पै॥ छ० २१ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. वैशाख मास.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख वद्य ९ इंदुवारपयत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. त्यांचीं उत्तरें पाठविलीं. "दोन क्षेत्रें जाल्याचें कळोन वाईट वाटलें, असेच दिवस राहाणार नाहींत" म्हणून लिहिलें तें कळलें. इकडील वर्तमान तर काल रविवारीं ती॥ विष्णुपंत भाऊ फौज घेऊन तलाव्यास गेले. कहीही बरोबर होती. तों मिरज चिकोडी-कडून त्यांची फौज तयार होऊन आली. भाऊ व राघोबा शिंत्रे घोडीखालीं येऊन पाडाव गेले. कहीही दोनशें तट्टें दहा वीस ऊंटें नेलीं. गोटांत वर्तमान कळून ते निघोन गेले. चिकोडीपर्यंत जाऊन गांवास आग लावून माघारे रात्रीस आलों. ईश्वर इच्छा प्रमाण! वडिलांची प्रकृत बरी आहे. दीक्षितबावाही जाणार. कळावें. सदैवपत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९७६ ( वैशाख व० ८—२७ मे. )

पै॥ छ० २१ जिल्हेज.

"आज कही चिकोडीच्या रोखावर गेली होती. कहीबरोबर विष्णुपंतभाऊ समागमें ब्राम्हण मंडळी व दोनशें स्वार होते त्यांवर करवीरकरांकडून हजार पांचशें स्वार येऊन लढाई जाली. चार घटका लढाई चांगली जाली. त्यांची जमीयत भारी व हे थोडे, सबब यांचा मोड होऊन विष्णुपंत व राघोपंत शिंत्रे वगैरे पाडाव गेले. हें वर्तमान गोटांत येतांच चि॥ राजश्री आपासाहेब फौज चार पांच हजार व गाडदी व तोफा घेऊन त्यांच्या पाठीवर गेले आहेत. गांठ पडल्याचें वर्तमान नाहीं. बागेवाडीस मोर्चे कायमच आहेत."

नं. ४९७७ श्रीगणराज. (वैशाख व० ८—२७ मे.)

पै॥ छ० २१ जिल्हेज. सन तिस्सा तिसैन. इंदुवार. वैशाख.

विज्ञापना. वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षितबावा कोटबागीस आहेत.

---

१ फौजेच्या धरण्यामुळें भाऊंस दोन उपास पडले. २ पत्र परशुराम भाऊंच्या लष्करांतून मिरजेस. विनायक भास्कर पटवर्धन यांचें. ३ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

त्यांची कृपा पूर्ण याजविशींचा विस्तार कोठवर लिहावा ? साक्षात् सांबमुहूर्त आहे. वडिलांकडून व वेदमुहूर्ते राजश्री शंकरभट फाटक वेदशास्त्रसंपन्न राजश्री बावाकडून आले ते त्यांजपाशीं आहेत. मर्जी वडिलांवर सुप्रसन्न आहे. मी चार वेळां साष्टांग नमस्कार वडिलांचे म्हणोन केले. वडिलांची प्रकृत बरीच आहे. यांचा त्यांचा योग एकत्र स्थलीं जाहला असतां दिवस लागणार नाहींत परंतु घडत नाहीं. तीही योजना होत आहे. त्यांचे कृपेकरून घडेल तें खरें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९७८ श्रीगणपति. ( २९ मे. )

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख वद्य दशमी बुधवारपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें पाठविलीं त्याचीं उत्तरें वितपशील—

चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपाकडील खर्चाचा मजकूर लिहिला, त्यास त्यांजकडील आदा पावतीची याद्री तयार करविली आहे. होतांच पाठवून देतों. परंतु याजउपरी तोडून टाकावें हें उत्तम आहे. वडिलांचे चित्तांत आहेच, परंतु ऋणानुबंधें-करून तुटेल तेव्हां खरें ! कलम १.

बायांचा मुक्काम बिरनाळ येथें आहे. पुढें कूच होऊन कोणे स्थलीं गेल्या ती आज्ञा व्हावी. यशवंतराव शिवाजी बुधगांवावर शह दिला आहे म्हणोन लिहिलें होतें, त्यास त्यांज-कडील लिहिलें पाहिजे. ती॥ २॥ विष्णुपंतभाऊ करवीरकरांकडे गेल्याचें मागें लिहिलें होतें त्याजवरून विदित जाहलेंच असेल. कलम १.

इंगळगांवचा मजकूर समजला नाहीं. वडिलांस विनंती करून लिहून पाठवितों. कलम. १

विनायक विश्वनाथ येऊन पावले' चिरंजीव राजश्री नारोपंत जोग गोकाकेस आहेत. बोलाऊं पाठविले आहेत. आले म्हणजे चांपेकर यांची रवानगी करतों. ती॥ राजश्री आबा व अण्णा मंडळीसह येऊन पावले. कलम. १.

करवीरवासी यांसीं गांठ घालणें ती विचारें करून तोंडीं तोफा पायदळ ठेवून मजबूतीनें घालावी———पायदळ आहे———दादाजवळही आहे. वडिलीं बोरगांव अगर इचल-करंजीचे रोखें यावें म्हणजे रान साधल्यासारखें होईल " म्हणोन विस्तारें आज्ञा केली ती कळली. प्रस्तुत बागेवाडीस मोर्चे आहेत हें उलगडून मग पुढें यावयाचें. वाटेंत करवीरकर फौजसुद्धां आहेत. तेव्हां आधीं इचलकरंजीकडे येणें कसें होतें ? त्यांस मागें सारावें तेव्हां पुढें

—राजश्री बाबा फडणीस मंडळी सह येणार होते. काय झालें, तेथें विदित असेल, आज्ञा करावी. ती॥ राजश्री वासुदेव काकाकडून पत्रें आलीं. पट्टणाकडील वर्तमान प्रमाण. जखमी आले त्यानीं सांगितलें. कांहीं फौज टिपूकडील हरिहर वगैरे तुंगभद्रा तीरास येऊन आपलाच प्रांत मारतात. असें घडत आहे. इंग्रज पट्टणांत आहेत. तीन टोळया करितात. एक चित्रदुर्ग व एक बिदनूर व एक गुत्तीकडे अशी रवाना होणार म्हणून लिहिलें आहे. कलम १.

यावयाचें. त्यास आपली फौज व ती॥ दादांकडील पायदळ याणीं इचलकरंजीपासून शिलाशिला लावावा. इतक्यांत येथील उरकतें. दोहींकडे शिलशिला लागला असतां सहजच हटतात. आम्हींही पुढें येतों. हा विचार बरासा दिसतो. कशी योजना ठरेल ती आज्ञा झाली पाहिजे. कलम १.

वडिलांची प्रकृत दिवसेंदिवस बरी आहे. एकाएकींच चांगली कशी होईल. परंतु पथ दृष्टीस येतो. दीक्षितबावा कोटबागीस आहेत. सैन्यांत रहात नाहींत. जवळ गांव भरला नाहीं. असें आहे. कलम.

सात कलमांनीं विदित होईल. नित्य उठून उपोषणें होतच आहेत. चिरंजीव सौभाग्यवती पार्वतीची रवानगी उद्यां करतों. येऊन पावेल. सदैव आशीर्वादपत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ४९७९ श्रीगणपति. ( वैशाख व० ११–३० मे )

पै॥ छ० २४ जिल्हेज. तिस्सा तिसैन.

[1]विज्ञापना. वडिलांची प्रकृति नीट नाहीं. याजमुळें कामास व लौकिकास कमी पडतें. विशो बेविशो मात्र आहे. श्रीआराध्य कृपा करील तेव्हां खरें ! दीक्षितबावांचा पूर्ण आशीर्वाद आहे. चिंता नाहीं. हे विज्ञापना.

नं. ४९८० श्रीगणपति. ( वैशाख व० १३–१ जून )

चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. तीर्थस्वरूप मातुश्री सरस्वतीबाई वयनी यांजकडे खर्चाची नेमणूक आपण करून देऊन सांगली व सांगलीची वाडी येथील ऐवज लावून दिला, त्याप्रमाणें ऐवज पावत होता. अलीकडे दोन तीन वर्षें पावला नाहीं. असें

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. चिठी रामचंद्रपंत आपाची बाळासा-

असोन हल्लीं वयनींकडून हरदू गांवीं कारकून व माणसें गेलीं असतां ऐवज गांवकरांनीं दिला नाहीं, आणि त्यांस उठवून लाविलें, ह्मणोन कळलें. ऐशियास हा खटला गांवकरांकडूनच झाला असल्यास त्यांस चांगली शिक्षा करावी. आपल्या कानांवर घालोन केलें असल्यास चांगलें नव्हे. एकदां वयनींचा खटला तुटला आहे त्या पक्षीं आतां दिकतीचें कारण नाहीं. लौकिकांतही चांगलें नाहीं. त्यांत बायकांचा कारभार. त्यांनीं तरी कसें करावें ? सारांश त्यांच्या वडीलपणावर नजर द्यावयाची. याजकरितां नेमणुकेंपैकीं ऐवज पाववयाचा राहिला असेल तो गांवकरांस ताकीद करून देवावा. पुढें यथास्थित पावे तें करावें. जें ठरावांत आलें तें वारंवार घालूं नये. ध्यानांत आणोन पंहावें. लांचवूं नये. वयनींची मर्जी खर्चाची वोढ पडल्यामुळें दिक आहे. त्यांचा संतोष राखावा. परवगौडा सांगलीकर याजकडे वयनींचा ऐवज येणें, त्यास तो सुदामत फडशा करीत नाहीं. याजकरितां त्यास ताकीद करून ऐवजाचा फडशा व्याजसुद्धां करवावा. हें न होय तर पाटील मजकुरास वयनींकडे लावून द्यावें. रवाना छ० २६ जिल्हेज. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

पै॥ छ० २९ जिल्हेज सन तिस्सा तिसैन. अखेर.

नं. ४९८१ श्री. ( ज्येष्ठ शु० ४–७ जून. )

तीं॥ राजश्री वासुदेवपंत मामा वडिलांचे सेवेसीं.

अपत्यें गजेशानें दोनी कर जोडून शिर सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २ मोहरम पावेतों वडिलांचे आशीर्वादें सुखरूप असों. विशेष. वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. बहुत संतोष जाहला. दोन तीन महिन्यांत एक पत्र मात्र आलें म्हणून लिहिलें, त्यास दोन तीन महिने श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा अडूर हनगल राणे बिदनूर हाननूर या प्रांतीं गेले त्यासमयीं आम्हांस जावयाची आज्ञा जाली तेव्हां गेलो होतों. तेव्हां पत्रें कशीं येतील ? लांबचा टप्पा याजमुळें आलीं नाहींत. अलीकडे गोकाकेस आलों तेव्हां विनंतीपत्र लिहिलें. बागेवाडीस ठाणे छ० २४ जिल्हेजीं घातलें. त्यानंतर दोन कुचें होऊन तीन कोसांच्या सुमारें चिकोडीनजीक आलों. याप्रों मजकूर आहे. वे॥ राजश्री बाळंभट सिद्धये व समागमें ब्राह्मण मंडळी असामी सात लष्करांत आले

---

१ अभिप्राय असा कीं, पेशव्यांची नजर आपल्या घराण्याच्या अकल्याणावर आहे. याईचा पेभाट तेथपर्यंत गेला असतां याईस दत्तकाची परवानगी मिळून सरंजामाची वाटणी सुद्धां देण्याचा हुकूम होईल इ० इ०.

आहेत कीं कऱ्हाडे ब्राह्मण यांचे खटलेविर्षी. त्यास काल पत्रें ( सावंत ) वाडीस रवाना जाली. आज निघोन भटजी कुंदवाडास जावयास गेले. कऱ्हाडे यांस पाठविणें म्हणून पत्रें गेलीं आहेत. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ४९८२ ( ज्येष्ठ शु० ४—७ जून )

गणेशराम पेठे यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र. पै॥ छ० २ मोहरम.

" बागेवाडीस ठाणें छ० २४ जिल्हेजीं घातलें. राजश्री हरबाअण्णा यांजकडे ठाणें दिल्हें. लोक ठाण्यांतील कौलानेंच उतरले. व चिकोडीच्या ठाण्यांतील लोक दुसरे दिवशीं रात्रौ निघोन गेले. नंतर इकडील ठाणं बसलें."

नं. ४९८३ श्री. ( ज्येष्ठ शु० ४—७ जून. )

पै॥ छ० ५ सन मय्या तैन. ज्येष्ठमास.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २ मोहरम पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० २० जिल्हेजचीं पांच पत्रें पाठविलीं तीं पावलीं. तेथें लिहिलें कीं, "करकंबें व मंगळवेढें व बर्डोल हे तीन महाल आमचे सरंजामाचे, तेथें राजश्री चिंतो आत्माराम व बाळाजी कृष्ण निसबत शिंदे यांनीं अनेक प्रकारचा उपद्रव करून खंडण्या घेतल्या; यामुळें मुलखाची बाकी राहिली नाहीं. करकंब तो वोस जाली. मंगळवेढें येथें कांहीं वसती आहे तेथें राजश्री गोपाळराव चिटणीस यांणीं पंढरपुरास राहून चाळीस हजार रुपये यांचा रोखा करून स्वार पाठविले आहेत; व राजश्री बजाबा शिराळेकर यांजकडील वरातेच्या बसुलाकरितां मंगलवेढें यास आरब आले आहेत त्याणीं बहुत प्रकारचा उपद्रव केला आहे. बैल मारले. पाण्यास गांवच्या बायका जातात त्यांसही उपसर्ग करितात. आमचे सरंजामाचे महाल झाडून खराब जाहले. एकसाली ऐवज कोठून यावा ? आम्हींच सावकाराचे पेंचांत आलों. व मृगा-

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ आजपर्यंत मय्या व अलफ हें शतक होतें तें चालू साल तिस्सा तिसैन संपल्यावर संपेल. मृग सुरु झाल्यावर मुसलमानी नवीन वर्ष १२०९ फसली सुरू होईल. परंतु त्याचा सुरू सन अक्षरी लिहावयाचा असतो तो कसा लिहावा ! बाराव्या शतकाला आरबींत पर्यायशद्ब कोणता ! असें बाळासाहेबांनीं हें पत्र लिहिणारास विचारिलें होतें. ही माहिती मिरजेस मिळू नये, पुण्याच्या सरकारी मुनशीकडून ती माहिती मिळविण्याचा प्रसंग यावा, हें आश्चर्य आहे !

पुढील सालास काय नांव हें मुनसीस पुसोन लिहून पाठवणें व बंजाबाकडील वरातेचे वसुलावर कारकून आला आहे त्याजकडे मंगळवेढें याहून राजश्री आबाजी गोविंद कारकून बोलावयासी गेला त्यास अटकाऊन घेऊन ऐवजाची याद लिहून मागतात हें चांगलें नाहीं. याजकरितां मनाचिठी घेऊन पाठवावी. व श्रीमंत राजश्री नानांस तंबाखू दोन पेंडकीं पाठविलीं तीं पावलीं. "तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेब बागेवाडीस आले. ठाण्यास तोफा लावल्या आहेत. याउपर चिकोडीसह ठाणीं बसतील. करवीरकरसी महाराज अकीवाटास लग्न करून बेडकीहाळास गेले. तेथून फौज तलाव्यास चिकोडी तालुक्यांत गेली आहे. बाया शिंदे याणीं अकीवाटाहून कुच करून ब्रह्मनाळावर आल्या. पुढें कोठें जातात हें समजलियावर लिहून पाठवूं. सांगलीस पागा शंकर खरांची बांधली होती ती बायांचा मुक्काम तेथें आला तेव्हां जाळली." व टिपूकडील बातमी लिहिली ती कळली. व श्रीमंत राजश्री नानांस दोन पत्रें पाठविलीं तीं पाहून प्रविष्ट केलीं, आणि उत्तर घेऊन पाठविलें आहे. त्याजवरून विदित होईल. श्रीमंत भाऊसाहेबांचे फौजेची व महाराजांचे फौजेची लढाई चांगली जाहली म्हणोन येथें वर्तमान आलें. स्वामींकडून अद्याप कांहींच लिहून आलें नाहीं. त्यास सविस्तर लिहून यावें. टिपूकडील वर्तमान तर इंग्रजांची व टिपूची लढाई श्रीरंगपट्टणाजवळ मातबर होऊन टिपू लढाईंत कामास आला. इंग्रजांनीं पट्टण घेतलें. सर्व दौलत इंग्रजांचे हातीं लागली. सरकारांत पत्रें आलीं. खुशालीच्या तोफा जाहल्या. तमाखू पाठविली ती चांगली नाहीं. सात जुड्या आल्या त्यास दर जुडीस पानें अदशेर नवटाक निघालीं. बाकीचीं नासलेलीं अगदीं वाईट त्या अर्थी स्वामींनीं पाहिलीं नसेल. वरून जुडी चांगली दिसते. परंतु आंत बहुत नाकारी! याजकरितां तमाखूचीं पानें दळदार चांगलीं अदमण पाठविलीं पाहिजे. पानांचे देठ तिकडे वळतात ते चांगले असल्यास ते कांहीं पाठवावयासी आज्ञा व्हावी. सारांश तमाखू चांगली आली पाहिजे. राजश्री बजाबाचे वरातेचा ऐवज सोयीसोयीनें द्यावा. एकसाली ऐवज सर्व सरंजामी सरदारांपासून घेतला त्याअर्थी मना होत नाहीं. आरब[1] गुरें खात नाहीं आणि बैल मारले (असें लिहितां) त्यास बैल मारले नसतील. परंतु लिहून आलें त्यावरून नबाबाकडील सरदारांस लिहून पाठविलें आहे.

---

१ आरब गुरें खात नाहींत ही माहिती आम्हांस नवीन असून महत्वाची वाटते.

चोकशी करून लिहून यावें. ऐवज खावाव लागतो यास्तव हप्ते ठरावून ऐवज देविला पाहिजे. मृग साला पुढील सालास नांव काय हें लिहून पाठविणें ह्मणून आज्ञा, त्यास याद लिहून पाठविली आहे त्यावरून विदित होईल. श्रीमंत नानानीं मुनसीस पुसोन तीन सालांचीं नांवें लिहून घेतली आणि मजला सांगितलें कीं याप्रमाणें लिहून पाठवणें त्यावरून याद पाठविली आहे. शिंदे यांची व बायांची सभेट व्हावी हा विचार होत आहे. शिंदे यांणीं आपली फौज झाडून इकडे आणविली ती सत्वरच इकडे येईल व बाया रहिमतपुरावर आल्या म्हणजे राजश्री बाळोबा पागनीस व आबा चिटणीस व आम्ही तिकडे येणार आहेत. श्रीमंत भाऊसाहेबांची सांप्रत प्रकृत कशी आहे? महाराजांनीं लढाई जुंपली. आतां सर्वांनीं मिळून राजश्रींचा बंदोबस्त चांगला केला पाहिजे. बातमी वरचेवर लिहून येत असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. तमाखू व सुतडे आले ते माघारे पाठविले आहेत व डोन्याही पाठविल्या आहेत. हे विज्ञापना.

नं ४९८४ श्री. ( ज्येष्ठ शु० ६–९ जून. )

पे॥ छ० ४ मोहरम. सन मय्या तैन व अलफ. जेष्ठ मास.

सेवेशीं नारो हरि करंदीकर कृतानेक कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० ४ मोहरमपावेतों मुक्काम लष्कर मौजे बारवाड यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं पत्रें छ० २ मोहरमचीं पाठविलीं तीं छ० ३ मिनहूस तिसरे प्रहरीं पावली. " राजश्री विष्णुपंत भाऊ करवीरीं कोठें ठेविले आहेत, बंदोबस्त कोणाकडे सांगितला आहे, व त्यांजजवळ चाकरीस ब्राह्मण व खिजमतगार आहे नाहीं हें लिहून पाठवणें. नसल्यास येथून पाठवावयास येईल. " म्हणोन आज्ञा, ऐशास भाऊ राजश्री सर्जेराव घाटगे यांच्या वाड्यांत करवीरींच आहेत. बंदोबस्ती त्यांणीं कराविली आहे. ब्राह्मण जवळ नाहीं. खिजमतगार आहे. घाटगेराव यांस विचारून सांगतील त्याप्रमाणें लिहून सेवेशीं लिहितों. तूर्त जखमांची वगैरे बर्दास्त होत आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. रवाना रविवार. प्रातःकाळ. आज लष्करचा मुक्काम आहे. भाऊंच्या ब्राह्मणाची परवानगी मागाहून घेऊन पाठवितों. हे विज्ञापना.

नं. ४९८५ श्रीगणराज. ( ज्येष्ठ शु० ७–१० जून. )

छ० ५ मोहरम. सन मय्या तैन. जेष्ठ.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

[1]विज्ञापना. औषधास शिलाजीत पाहिजे, त्यास येथें शोध केला परंतु मिळत नाहीं. याजकरितां तेथें असलियास चार सहा तोळे पाठवावा. त्याचा वर्ण लाखेसारिखें दिसतें. त्यास वास गोमूत्राचा येतो. पुण्यांत शोध बहुत केला परंतु न मिळे याजकरितां विनंती लिहिलें आहे. शोध घेऊन पाठवावयाची आज्ञा झाली पाहिजे. वैद्यांनीं सांगितलें म्हणोन विनंती लिहिलें आहे. कळावें. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९८६ श्री. ( ज्येष्ठ शु० ८—११ जून. )

पै॥ छ० ६ मोहरम. सन मय्या तैन व अलफ. ज्येष्ठ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० + + पावेतों यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. आपणाकडून अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लेहून कळवावें. राजश्री भाऊंचा मुक्काम कोठें आहे, शरीर प्रकृत कशी आहे, करवीरकर महाराजांचा मुक्काम कोठें आहे, जमाव एके ठिकाणीं आहे किंवा मागें पुढें आहे, राजश्री विष्णुपंत कहींचे रखवालीस गेले होते तेथें कहीवर गलबल होऊन दगा जाहालियाची वर्तमान आहे येविशींचा मजकूर कसा झाला, राजश्री रामचंद्रपंत काळे येथून निरोप घेऊन गेले ते सुखरूप येऊन पोंचल्याचें वगैरे सविस्तर लिहून पाठवावें. इकडील मजकूर तर राजश्री आबा चिटणीस व राजश्री बाळोबातात्या व राजश्री बाबूराव आंग्रे दोन हजार फौज व दोन पलटणें व पांच तोफा याप्रमाणें साळ्याचे घाटानें चढून देउरावर चार मुक्काम केले. तेथें बायांकडून राजश्री बाळाभाऊ व देवजी गवळी वगैरे एक दोघे गृहस्थ येऊन त्यांच्या भेटी जाल्या. नंतर रविवारीं सापच्या मुक्कामास चिटणीस व पारनीस मंडळी मुख्यां गेले. बाया वढ्डी त्रिमलीवरआहेत. बायांनीं रहिमतपुरास यावें, नंतर भेटी व्हाव्या, असें बोलण्यांत आहे. होईल मजकूर तो मागाहून लिहावयास येईल. पठाणाकडील गांवगन्नास उपसर्ग लागला होता व वाईस पाटीलकुलकर्णी खंडणीस येणें ह्मणून रोखा आला होता तो मजकूर चिटणीस व पारनीसांस कळल्यानंतर त्यांनीं बंदोबस्ताविशीं बायांस पत्रें पाठवून इकडेशी लिहिलें जे बंदोबस्त करावा.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पेवस्तीची. पत्र विठ्ठलराव पांडुरंग यांचें मिरजेस. त्यावेळच्या एवढ्या टोलेजंग पुणें राजधानींत शिलाजित मिळूं नये हें नवल आहे.

त्याजवरोन वाईचा रोखा माघारा लाऊन दिला. प्रांतांतील राऊतही उठवून लाविले. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

नं. ४९८७ श्री. ( ज्येष्ठ शु० ८–११ जून )

पे॥ छ० १२ मोहरम. सन मय्या तेन व अलफ. ज्येष्ठ.

सेवेशीं बालकृष्ण महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ६ मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळोबा पागनीस व राजश्री आबा चिटणीस व राजश्री बाबूराव आंग्रे बायांचे समेटीकरितां राजश्री दौलतराव यांचेच संमतें गेले आहेत. बायांचे लष्करांत स्वामींची बातमी असेल. तेथें काय ठरतें हें समजलियास लिहून यावें. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांची व महाराज करवीरवासी यांची लढाई झाली म्हणोन येथें वर्तमान आलें. स्वामींकडून कांहींच वर्तमान लिहून आलें नाहीं. त्यास सविस्तर बातमी वरचेवर येत असावी. श्रीमंत नानांस तमाखू पाठविली ती अगदीं नाकारी ! घराऊ काम. विषय थोडका. चांगला जिन्नस यावा. यास्तव चांगली तमाखू पानें दळदार शिरे पाहून अदमण तमाखू सत्वर आली पाहिजे. बाया व महाराज व श्रीमंत भाऊसाहेब यांचा मुक्काम कोठें आहे हें सविस्तर लिहावयासी आज्ञा वरचेवर होत असावी. वडिलांपाशीं स्वामींची फौज होती ती मिरजेस आलियाचें कारण, व भाऊसाहेबांची प्रकृत सांप्रत कशी आहे, बायांचा व महाराजांचा विचार पुढें काय, हें लिहून यावें. महाराजाची लढाई लागली असल्यास सर्वांनीं मिळोन बंदोबस्त पक्केपणें जाहला तरच चांगलें. राजश्री बाबा काळे वडिलांकडे गेले ते सेवेशीं येऊन सविस्तर श्रुत केलेंच असेल. भाऊंकडील शिलशिला बाबा काळे याजकडून लागला. ते आह्मांखेरीज श्रीमंताशीं खलबत करतात. मजला दाखला देत नाहींत. श्रीमंत नाना मात्र सुचवितात तें सेवेशीं लिहीतच आहें. कोणते ही प्रकारें स्वामींचें चांगलें असावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९८८ श्री. ( ज्येष्ठ शु० ८–११ जून. )

सेवेशीं विज्ञापना. राजश्री बळवंतराव खांडेकर पुण्याहून निघाले. शिराळ्यांस आले. दोन चार दिवसांत येऊन लष्करात दाखल होतील. आलेवर सविस्तर समजोन घेऊन सेवेशीं लिहीन. राजश्री बाबूराव कागलकर यांस येणेंविशीं

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. नारो हरि करंदीकर यांचें पत्र महाराजांच्या लष्करांतून.

## ( ६०१५ )

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

इकडील पत्रें पांच सात गेली. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांची मर्जी बोलावयाची परिछिन्न नाहीं. कागलकर यांस जाणेंची आज्ञा "बेडख्याळास जावें. तेथें महाराजांकडून कोण बोलणार येणार त्यांस आणवून काय बोलतात तें ऐकून यावें." महाराजांच्या[1] लष्करास यावयाची आज्ञा नाहीं. कागलकर काल शिरगांवास आले. आज बेडख्याळास येणार आहेत. आलेवर मीही त्यांजकडे जाऊन उभयपक्षींच्या बोलण्याचा अर्थ समजून घेऊन सेवेशीं लिहीन. चिकोडीची मामलत राजश्री हरबा अण्णांकडे झाली. राजश्री नारायणराव लागू यांजकडे व्हावी येविशीं श्रीमंत राजश्री आपासाहेब व बाबासाहेब व दाजीसाहेब व चिंतामणराव आपा इतक्यांनीं आग्रह धरिला होता, परंतु भाऊसाहेबांनीं इतक्यांचें मोडून अण्णांकडे मामलत सांगितली. याप्रमाणें झालें. कूच मुक्कामाचें दीक्षितरावांचे वचनावर होत आहे. गोकाकेपासुन नऊ मुक्काम आपले वचनाप्रमाणें व्हावे असें दीक्षितरावांचें सांगणें आहे. पुढें मग विचारावयाचें कारण नाहीं. याजमुळें कूच लवकर होत नाहीं. त्यांची आज्ञा होणें तेव्हां कूच होतें ! राजश्री बाबा फडणीस पुण्याहून आले. एडूर मांजरीचा मुक्काम त्यांचा शनवारचा होता. रविवारीं लष्करास दाखल झाले असतील. कर्नाटकांत आपासाहेबांची रवानगी व्हावयाचा बेत आहे परंतु इकडील दम एक वेळ लढाइ यावयाचा बोलण्यांत आहे. यारनव लढाईचें काय होतें हें पाहून नंतर रवानगी करणार अशी बोलवा आहे. पुण्याहून चार हजार फौज------ यासमागमें रवाना झाली ती इटें सानापुरानजीक आले व माधवराव पानसे तोफखाना व गाडद दोन हजार व फौज हजार असे मागाहून येत आहेत असें येथें वर्तमान आहे. सुरापूरकर बेरड याजकडील कांहीं जमाव कुमक भाऊसाहेबांकडे जाण्यास ऐनापुरच्या नजीक आले आहेत. सुरापूरकर याजकडील कारकून भाऊसाहेबांकडे जाऊन यादबर व खर्चास घेऊन गेला. याप्रमाणें वर्तमान असतां इकडील म्हणणें जे, बेरडानें आपणास कुमक पाठविली ती येत आहे असें सर्वत्रांजवळ बोलतात. कळावें. राजश्री पांडुरंगपंत नि॥ राजश्री मानाजी शिंदे हे कांहीं पाईचें माणूस व राऊत घेऊन केनरखेडाहून येत आहेत संख्या अमुक कळली नाहीं. येथें आवई हजारपर्यंत आहे, परंतु त्याजवळ इतकें सामान कैंचें ? शेंपन्नास पायदळ व शेंपन्नास राऊत असतील. असो. येथें आलेवर समजेल. राजश्री नागोपंतआपा यांचा कारकून येथें असतो त्यास

---

१ महाराजांचा.

आजच त्यांजकडे पाठविला कीं, आपास शिरगांवास घेऊन येणें, म्हणजे त्याजकडे बचाजीपंत यांस पाठवितों. कारण सारीं बोलणीं कोणीकडून तह करावा ! आतां उमजलें आहे. फार करून तहाचें बोलणें ठरेल असें दिसत नाहीं. जसें आढळेल तसें सेवेशीं लिहून कळवीन. पुण्याकडील वर्तमान अधिक असल्यास कळवावयाची आज्ञा व्हावी. टिपूचा[१] लेक पंचवीस हजार बार व पांच हजार फौजेनिशीं चित्रदुर्गास आला आहे. श्रीमंतास कोट रुपये व बिदनूर प्रांत देत आहे. कुमक करावी म्हणतो. हे विज्ञापना.

पै॥ छ० ६ मोहरम सन मयातैन व अलुफ. ज्येष्ठमास.

नं. ४९८९ श्री. ( ज्येष्ठ शु० ९ – १२ जून. )

सेवेशीं विज्ञापना. भौमवारीं इकडील पेंढारी जाऊन कहींतील तिकडील उंटें दहा बारा व तट्टें दहा पंधरापर्यंत आणिलीं. राजश्री सर्ज्याराव घाटगे व व चतुरसिंग व पांढरे वगैरे पांचशेंपर्यंत बहलीस गहिले होते. अद्याप आले नाहींत. ते काय करितात पहावें. राजश्री बापूराव कागलकर बेडख्याळास आले आहेत. इंदुवारीं राजश्री बच्याजीपंत त्यांजकडे जाऊन तिकडील बोलण्याचा आशय समजोन आले. इकडील बोलण्याचा अर्थ कागलकर यांनीं श्री॥ राजश्री भाऊसाहेबांस लिहिला आहे. त्याचें उत्तर आलेवर आणखी बच्याजीपंत बेडख्याळास जातील. बोलण्यांतील आशय मला समजला नाहीं. आज मी बेडख्याळास जातों म्हणजे सविस्तर समजोन घेऊन सेवेशीं लिहून पाठवीन. राजश्री यशवंतराव शिवाजी मांगल्यावर मुक्काम आहे. मलकापूर कापशी व पन्हाळेखालील खेडयांस बहुत उपद्रव केला आहे. इकडून राजश्री मानसिंगराव पाटणकर दोनशें राऊतानिशीं रवाना जाले आहेत. कळावें. बारवाडावर आणखी पांच चार मुक्काम होतीलसें वाटतें. बोलणें करावें म्हणतात. बोलणेंस कागलकर आणविले असतां खटला करितात. असो. तिकडूनही आतां पेंढारी आवाडाव करितील. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. रवाना बुधवार प्रातःकाळ.

नं. ४९९०[२] ( ज्येष्ठ शु० १२–१४ जून. )

नारो हरि याचें पत्र करवीरकरांच्या लष्करांतून मिरजेस बाळासाहेबांस. पै॥ छ० ९ मोहरम.—[३]

"राजश्री विष्णुपंत भाऊ यादवाडकर यांजकडून गडी त्यांचजवळ

---

१ टिपूच्या लेकाची बातमी अगदी खोटी ! २ नारोपंत करंदीकर याचें पत्र महाराजांच्या लष्करांतून. ३ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

होता तो शिवजी येथें लष्करास आला आहे. जखमांची वगैरे पथ्य पाण्याची उस्तवारी बरीच आहे. जखमेनें कान एक अगदीं तुटला होता. गहूंभर लग राहिला होता त्यास टांके दिले होते. परंतु कान लागला नाहीं. गळून पडला. वरकड जखमा शेजेस आल्या. चिंता नाहीं. भाऊंच्या स्त्रीकडून आज गडी लष्करास आला तोही घाटगे यांस सांगोन करवीरास पाठविला आहे. तोही समक्ष पाहून येईल. आतां जखमेविशीं चिंता नाहीं. शिवजी आलेला उद्यां तिकडील लष्करास जाऊन करवीरचा समाचार सांगोन येथें मागती या लष्करास येईल. आल्यानंतर त्यांजबरोबर घाटगे याजकडील गडी बरोबर देऊन भाऊंकडे करवीरास रवाना करीन. कळावें. वरचेवर घाटगे यांसही बरद्दास्त होणेविशीं सांगत आहें. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. चार रोजांत दोन तीनशें राऊत निघोन गेले. तिकडील पेंढारी यांनीं तमदलगें शहापूर तारदाळ वगैरे गांवचीं गुरें बहुत नेली. राजश्री यशवंतराव शिवाजी यांनी शिराळ्यास वेढा देऊन बसले आहेत. पैका मागतात. पठाणांनीं कडेगांव पुसेसावळी येथील खराबी बहुत केली. देशपांडे धरून नेले. याप्रमाणें वर्तमान आहे. आज इकडील तलावे जात आहेत. ”

नं. ४९९१ श्री. ( ज्येष्ठ शु० १२–१४ जून. )

पै॥ छ० १० मोहरम. सन मय्यातैन व अलफ. ज्येष्ठ.

विनंती सेवेशीं साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ९ मोहरम स्वामींचे कृपे करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें पावलें. हल्लीं मुक्काम आऊंदावर आहे. राजश्री चिटणीस, फागनीस, बाबूराव आंग्रे, दोघे कर्णेल, ऐसे एक पलटण हजार फौज पांच तोफा निघाले ते आज रहिमतपूरच्या मुक्कामास येणार. येथून तीन कोस आहे. भेटी याच मुक्कामीं होणार. श्रीमंत वडिलांचा मुक्काम लिहिला तो व महाराजांचा लिहिला तो कळला. येथील पठाण मसुरावर आहेत. कऱ्हाड मसूरची खंडणी पंचवीस हजार रुपये झाली व देशांत गवगवा भारी पडला त्याविशीं श्रीमंत राजश्री रावसाहेब रास्ते यांचीं पत्रें आलीं त्यावरून पठाण व शिंदे माने हजार पांचशें लोकांनिशीं गेले ते माघारे आणविले आहेत. राजश्री यशवंतराव शिवाजी यांस येणेंविशीं पत्रें गेलीं आहेत. एका दों दिवसांत येऊन पोंहचतील. राजश्री बाळाजी कृष्ण श्रीकृष्णातीरीनें येणार, त्यास रास्ते यांचे तालुक्यांत उपसर्ग न करणेंविशीं पत्रें पाठविलीं आहेत. परंतु ते सभ्य गृहस्थ आहेत ! श्रीइच्छेनें घडेल तें

१ पत्र बायांच्या लष्करांतून मिरजेस. मोरोपंत परांजपे याचें.

खरें ! श्रीमाहुलीस पठाणांनीं उपसर्ग केला. त्यांकडून चारशें रुपये घेतले. आणि पठाण बसले आहेत म्हणोन दीडशें ब्राह्मण येथें आले आहेत. श्री परिहार भोग करील तेव्हां खरें ! श्रीमंत रावसाहेब यांचें पत्र आलें होतें जे, " भाऊसाहेब यांचा मुक्काम कोठें आहे, येर्गेरा अवघ कां, चिकोडी-वरच मुक्काम कां राहिला, " तें लिहिणें. त्यास येविशींचें लिहिणें म्हणजे लिहून पाठवीन. छ० ३ रोजचें पत्र आज पावलें सातवे दिवशीं. वरचेवर आज्ञापत्र यावें. सेवेशी वर्तमान लिहीन. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९९२ श्री. ( ज्येष्ठ शु० १३–१५ जून. )

छ० १० माहरम. सन मय्यातैन व अलफ. जेष्ठ.

सेवेशीं विज्ञापना. पुण्याकडील वर्तमान श्रीमंत राजश्री नाना व बाळोबा पागनीस यांची चित्तशुद्ध जाहली. व राजश्री आबा चिटणीस यांची व पागनीस यांचीही निखालसता झाली. नानांच्या विचारें सर्वत्रांनीं चालावें असा तह ठरला. श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब व चिमाजी आपा व अमृतरावसा-हेब यांचाही रुकार पडला. सर्वत्रांचा एक विचार जाला. नानांच्या चित्तांत कैलासवासी नानासाहेबांचा वंश बुडवावयाचा नाहीं. अमृतराव यांचा पुत्र दत्तक करावा असा बेत आहे. सरकारांतून टिपूच्या लोकांस कुमक करावी असें ठरलें आहे. पागा व तोफखाना पुण्याहून रवाना झाला. शिंद्यांकडील फौज व तोफाही रवाना टिपूच्या कुमकेबरोबर होणार आहे. तिकडील लष्करचा अद्याप कूच जाहला नाहीं. पेशजीच्या पत्री घाटगे व चतुरसिंग मार्गे वसतीस राहिले म्हणोन लिहिलें होतें, परंतु मागून तास रात्रीस आले. राहिले नाहींत. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९९३ श्री. ( ज्येष्ठ शु० १३–१५ जून )

पै॥ छ ११ मोहरम सन. मय्या तैन. जेष्ठ मास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य नारो विनायक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ०१० मोहरम यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळाजी कृष्ण निसबत शिंदे बाया याचा मुक्काम गुणदाळावर होता तेथून कूच करून तिगणी बिद्रीवर आले आहेत. येथून बारा कोसांवर आहेत. गोटेकरांनीं घासदाण्याचा जाबसाल उरकिला. तिकोट्याकडे जाणार म्हणून बोलवा आहे. कोणीकडे जातात पहावें. विजापुरावर सुरापुराकडील जमाव होता तो विजापुराहून आठ दहा

---

१ पत्र नारोपंत करंदीकर याचें महाराजांच्या लष्करांतून. २ पत्र अथणीहून.

कोस पुढें गेला. करवीराकडे येण्याचा सुमार दिसत नाहीं. राजश्री भाऊसाहेब व शिंदे बाया यांचे लष्करचें वर्तमान लिहिलें तें कळलें. अलिकडील वृत कळविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

नं. ४९९४ श्री. ( ज्येष्ठ शुद्ध १३–१५ जून. )

छ॥ ११ मोहरम. मय्या तैन व अलफ. ज्येष्ट.

सेवेशी नारो हरि करंदीकर दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत छ० १० मोहरम पावेतों मुक्काम लष्कर मौजे बारवाड यथास्थित असे. विशेष. काल भृगुवारीं श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी खडकलाटेपर्यंत गेली होती. बरोबर दोन तीन तोफा व पायदळ हजारपर्यंत व फौज दोन हजार सडी ऐसे तलाव्यास गेले होते. चार घटका स्वारी लाटे नजीक तहकूब होऊन सायंकाळीं माघारी आली. याप्रमाणें झालें. तिकडील लष्करचा कूच नाही. मुक्काम खरोसीवरच आहे. वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री चिदंबर बावा दीक्षित नेरलीस आले आहेत. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब नेरलीस रविवारी येणार असें आहे. येतात किंवा न येतात पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री विष्णुपंत भाऊजवळचा गडी हल्लीं आलेला मिरजेस पाठविला आहे. तेथील समाचार सविस्तर सांगेल. कळावें. ब्राम्हणाची परवानगी घेऊन सेवेशीं लिहितों. कळावें हे विज्ञापना. ब्राम्हणाविषयीं राजश्री सर्जाराव यांस एक पत्र यावें. आपणांस पत्र नाहीं म्हणोन उदास आहेत. हे विज्ञापना.

नं. ४९९५ श्री. ( ज्येष्ठ शु० १२–१४ जून )

पै॥ छ० ९ मोहरम. ज्येष्ठमास. सन मय्यातैन व अलफ.

श्रीमंत राजमान्य राजश्री बाळासाहेब यांसी.

आश्रित नारायणराव गोडबोले अनेक आशीर्वाद उपरी. येथील क्षेम तागायत छ० ९ मोहरम पावेतों मुक्काम कवठें सुखरूप असों. विशेष. आम्हीं काल लष्कराहून घरीं आलों. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांचे प्रकृतीचा मजकूर तर दुखण्याची भावना अंगांत किमपि नाहीं. बुद्धीस संशय झाला होता त्यांपैकीं श्रीचे कृपेकरून कांहीं कमी झाला आहे. थोडकेच दिवसांत बरे होतील. आमचे शरीरीं समाधान नाहीं याजकरितां आपणाकडे चिरंजीव राजश्री सीतारामभट यांस पाठविले आहेत. तर आपलेपासीं फिरंगी वैद्य आहे त्यास येथपावेतों जावें म्हणोन आज्ञा करावी. प्रकृत पाहून माघारा येईल. कळावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ४९९६ श्री. ( ज्येष्ठ शु० १३–१५ जून. )

पै॥ छ० ११ मोहरम. ज्येष्ठ मास. सन मय्यातैन व अल्लफ.

विज्ञापना. सैन्याधिकारी यांची तीन दिवस प्रकृत पाहिली. त्यास बुधवारीं वोलें भस्मलेपन बहुत होतें. संध्याकाळचें भोजन तीन घटका दिवस; गुरुवारीं घटका दिवसास भोजन, भस्मधारण निमे; भृगुवारीं भस्मधारण पूर्ववत. भोजन घटका रात्र. बोलणें ही प्रथम दिवशीं एक जाबसाल पुसिला. दुसरे दिवशीं दोन. तिसरे दिवशीं भृगुवारीं पांच जाबसाल पुसिले. सारांश बावांचे कृपेकरून आठ चार दिवसांत प्रकृत यथास्थित होईल. काल बाबा फडणीस व चिरंजीवसुद्धां आले. एक दोन दिवसांत ठरेल. कळावें. घराऊ मजकूर यांसीं समजण्यांत आला आहे. मागून सविस्तर लिहीन. रोज शनवार. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९९७ श्रीगणपति. ( १५ जून. )

पै॥ छ० ११ मोहरम. सन मय्या तैन व अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत ज्येष्ठ शुद्ध १३ मंदवारपर्यंत यथास्थित असों. विशेष. आपण पत्रें खास दस्तूरचीं पाठविलीं तीं पावलीं. लिहिलें वर्तमान कळलें. वडिलांचे कानांवर घालून उत्तर पाठवून देतों. काल मला वडिलानीं बोलावून आज्ञा केली जे, चिरंजीव राजश्री चिंतामणरावआपा यांचा फडशा चिरंजीव राजश्री बाळासाहेबांस सांगून करवावा. मी विनंती केली जे, उभयतांही वडीलांचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणार. आज्ञा व्हावी. दौलतीचे कारभार जें बोलणें तें समक्ष व्हावें म्हणजे लहान मोठे सर्व कारभार उलगडण्यांत येतील. त्याजवर आज्ञा जाहली जे, समक्ष गांठ पडणें त्यास दिवसगत आहे. घर कलह मोघमांत राहणें ठीक नव्हे. कलागतीस मूळ. याजकरितां लौकर लिहिणें. त्याजवर विनंती केली जे, कसा कसा गुता उरकावा ते आज्ञा झाली पाहिजे. त्याजवरून आज्ञा केली तें सर्व लिहून उद्ईक पाठवितों. त्या अन्वयें घडलें पाहिजे. नाहीं तर कलागतीस आरंभ होणार असें सिद्ध आहे. सरकारांतून कर्नाटकची मसलत करावी म्हणोन राजश्री रामचंद्रपंतबाबा फडणीस करार करोन आले. मागोन सरकारचीं पत्रें आलीं जे इंग्रजानीं सांगितलें जे, तुंगभद्रा पार फौजा जाऊं नयेत असें जलद लिहिलें जावें. त्याजवरून पत्र आलें. तेव्हां तो प्रकार राहिला. पुढें मसलत कोणती ठरेल ती सेवेशीं कळवितों. वडिलांची प्रकृत दिवसेंदिवस उत्तम आहे. श्रीदीक्षितबावा मुरगोडास गेले. कळावें बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ४९९८ श्री. (ज्येष्ठ शु० १४–१६ जून.)

छ० ११ मोहरम सन मय्या तैन व अल्लफ. ज्येष्ठ.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री विष्णुपंत भाऊकडे ब्राम्हणाची परवानगी उदैक घेऊन पाठवितों. तिकडील लष्करचा कूच होऊन हिरेकुडीवर येणार. येथें मसलत लटकी चालली आहे "ताफे बांधावे. टोकरे आणावे. व नाव आणावी. फौजेसुद्धां पलीकडे जावें." काल हजेरी फौजेची जाहली. रोजमरा घेऊन जावें म्हणतात. परंतु सारें मृषापूर्वक आहे. कांहीं खरें नाहीं. राजेश्री बळवंतराव खांडेकर आले आहेत ते म्हणतील, कीं अगदीं अवसान टाकिलें, यास्तव मसलती करितात! कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ४९९९ श्री. (ज्येष्ठ व० १–१८ जून.)

पै॥ छ० १३ मोहरम. मय्या तैन व अल्लफ. ज्येष्ठ.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी महादेव दामले चरणांवर मस्तक ठेऊन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० मोहरमपर्यंत स्वामींचे कृपे करून कसबे रहिमतपूरचें व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळोबातात्या पागनीस व आबा चिटणीस व बाबूराव आंग्रे यांचा मुक्काम मौजे सापावर आहे. बायांचा मुक्काम मौजे कळंबीवर [1]आहे. पठाणांचा मुक्काम आरवी व नागझरीवर आहे. यशवंतराव शिवाजी यांचा मुक्काम मौजे पाल श्रीदेवाची येथें आहे. बाळोबातात्या यांजकडोन समजुतीचें बोलणें बायांकडे लागलें आहे. उभयतांकडून सर्वत्रांच्या भेटी जाहल्या. राजश्री नारायणराव बक्षी सापचे मुक्कामास तात्यांकडे येत असतात व तात्या त्रिवर्ग बायांकडे जात असतात. आजपर्यंत बोलणें बरेंच होतें. परंतु लोकांनीं तलबेविशीं अड घातला आहे व बायांचें बोलणें नगरच्या किल्ल्यांत वस्त ठेविली आहे ती आणोन आमचे स्वाधीन करावी, तेव्हां समजुतीचें बोलणें ऐसें बोलणें आहे. तात्यांकडोन ती वस्त आणावयाचा अनमान आहे. याजमुळें समजुतीचा दिरंग पडला आहे. लष्करचे दंग्यामुळें कराड प्रांताची व वांई प्रांताची दशा राहिली नाहीं. पठाणांनीं झाडून खंडण्या घेतल्या. आतां सारे लष्करच्या कह्या जाऊन वैरण व लांकूडफाटा वगैरे लुटून आणतात. रहिमतपूरचा मजकूर तर राजश्री फत्तेसिंगराव माने येथें येऊन राहिले आहेत त्यानीं पठाणाकडील रोखा मना

---

१ पत्रावरील मिती व तारीख पैवस्तीची. पत्र महाराजाच्या लष्करांतून करंदीकर याचें.

करवून बायांकडे बोलणें केलें. खंडणी पंधरा हजार रुपये ठरवले. आणि आम्हांस रुपयांची तरतूद करणेंविशीं सांगितलें. त्याजवरून गांवांत पट्टी करून ऐवज जमा होत आहे. अद्याप गांवांत कहीचा उपद्रव झाला नाहीं. परंतु पंचवीस तीस हजार कडबा रोखे करून नेला. गांवच्या एक दोन वाड्या होत्या त्या लुटून नेल्या. श्रीमंत राजश्री माधवरावजी रास्ते यांचा मुक्काम मौजे म्हसवें येथेंच आहे. पागनीस यांजबरोबर फौज दोन हजार व पलटण एक व सहा तोफा इतका सरंजाम आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५००० ( ज्येष्ठ व० २–१९ जून. )

नारो हरि करंदीकर याचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र करवीरकरांच्या लष्करांतून. पैवस्ती छ० १४ मोहरमचें.

" तूर्त नानांजवळ बोलले कीं, श्री॥ नानानीं महाडच्या मुक्कामीं करार केला आहे त्याप्रमाणें तुम्ही आम्ही असावें. तुम्हांजवळ आमचें बोलणें काय आहे ? त्याजवर कागलकर याणीं उत्तर केलें कीं, महाडचे मुक्कामीं करार केला त्याची पंचाईत कोण करितो व कोण सांगतो ? आज पंचवीस हजार फौज बांधोन ( भाऊसाहेब ) आले आहेत, तेव्हां पंचाइतीचा जाबसाल नाहीं, यांतील विचार पाहोन जो मनसबा करणें तो करावा इतकें बोलले. निरोप घेऊन गेले. "

नं. ५००१ श्री. ( ज्येष्ठ व० २–१९ जून. )

सेवेशीं विज्ञापना. राजश्री चतुरसिंग येथें लष्करांत आहेत त्यास येथील भरंवशाची खातरजमा त्यांची होऊन गेली. लौकिकांत मात्र महाराजांजवळ आहेत. परंतु येथें खर्चास पावत नाहीं अथवा कारण पडलें असतां इकडील कुमक होणें हा विचार अभावाचा ! यास्तव हल्लीं चतुरसिंग यानीं मसलत केली कीं, येथें राहोन परिणाम नाहीं, येथून जावें तर जावयास ठिकाणा नाहीं. सर्व शत्रुस्थानीं. याजकरितां राजश्री फत्तेसिंगराव माने रहिमतपूरकर हे बायांच्या लष्करांत आहेत त्यांजकडे संधान केलें कीं, बायांकडे आमचा मजकूर समजाऊन आम्हांस कुमक देवावी. म्हणजे थोडा बहुत आपला जमाव कुमक जाऊन रास्ते यांचा समाचार

---

१ बाबूराव नाना कागलकर. पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ करवीरकरांच्या लष्करांतून नारो हरि करंदीकर याचें पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

घ्यावा. असा त्यांचा मानस आहे. येविशीं माने यांचें व चतुरसिंग यांचें इमान प्रमाण कुमकेविशीं जालें आहे. बायांस लाख रुपये द्यावयाचा करार करावा, त्यास तूर्त ऐवज नाहीं. सातारकर महाराजांचे चरण आपणास दाखवावे, म्हणजे तेथें दागिने आहेत, लाख रुपये दागिने देतों. तेव्हां दागिने व महाराज किल्यावर. महाराजांचे चरण कसे दृष्टीस पडतात ? तेव्हां चतुरसिंग यानीं उत्तर केलें कीं, 'रास्ते यांस फौजसुद्धां घांटपार करून द्यावें म्हणजे किल्ल्यावर रास्ते यांजकडील कारकून राजश्री पद्माकरपंत गोखले आहेत त्यानीं आपणाशीं करार केला आहे कीं, रास्ते यांस घांटपार करून द्यावें, म्हणजे किल्ला आपले स्वाधीन करतों. असा करार केला आहे' म्हणोन सांगतात. किल्ल्यावरील बातमी कशी येत्ये तरी महाराजांकडील वाड्यांतील कुणबिणी आहेत त्यांस दरवाजांत जाण्या येण्याची मोकळीक आहे व त्यांची झाडा झडती घेत नाहीं. तेव्हां इकडून कोणी तरी शहरांत जातात, कुणबिणींच्या हातून बातमी पोहचत्ये, व कांहीं खर्चासही त्यांचे हातून चतुरसिंग यांस पावते करतात. असा मजकूर आहे. चतुरसिंग याचे चित्तांत रास्ते यांचा एक वेळ गळाटा करावा असें आहे. चतुरसिंग यांजकडून राजश्री नरसिंगराव गुजर माने यांजकडे रहिमतपुरास गेले. तेथें कुमकेचा मजकूर खाचित झालेवर चतुरसिंग येथून निघोन जाणार. (बायानीं) उघड कुमक दिली तर उत्तम. नाहीं तर चोरून तरी द्यावी ! म्हणजे आपण जाऊन गांठ घालतों. असा बेत जाहे. रास्ते यांस घांटपार केलेवर किल्ल्यावरील कारकुनानें किल्ला स्वाधीन केलेवर रहिमतपूरची सनद फत्तेसिंग माने यास करून द्यावी. येणेंप्रमाणें करार माने यांस चतुरसिंग यानीं करून दिला आहे. चतुरसिंग याचीं पत्रें पुण्यास श्रीमंत राजश्री नानांकडे व दौलतराव शिंदे यांस पाठविलीं आहेत. पहिल्यानें नानांस पत्र राजश्री राघोपंत गोडबोले यांचे विद्यमानें पाठविलें होतें त्याचें उत्तर आलें नाहीं. राघोपंत यांची चिठी होती त्यांतील मजकूर तुम्हीं पत्रें पाठविलीं तीं (नानांस) प्रविष्ट केलीं. उत्तरें मागाहून पाठवितों. इतकी चिठी आली. त्याजवर आणखी हल्लीं पत्रें पाठविलीं आहेत त्याचीं उत्तरें अद्याप आलीं नाहींत. मसलत सिद्धीस जाणें कठीणच आहे. परंतु आढळलेला मजकूर सेवेशीं लिहिला आहे. रास्ते यांस सूचना मर्जीस आल्यास व्हावयाची आज्ञा व्हावी. तिकडील लष्करांतही वर्तमान कळविलें आहे. पुण्याच्या

१ परशुरामभाऊंच्या.

पत्रांचीं उत्तरें काय येतील त्यांतील मजकूर समजोन घेऊन लिहितों. कुमकेचा विचार घडल्यास रास्ते यांचा उठाव करतील. चतुरसिंग यांजकडील जमाव शंभर दोनशें राऊत व कांहीं पायदळ व गाडदी जमा करीत आहेत. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. मसलत तो साधावयाची नाहीं, परंतु प्रयत्न करीत आहेत. हे विज्ञापना.

पै॥ छ० १४ मोहरम.

नं. ५००२ श्री. (ज्येष्ठ व० ३–२० जून.)

पै॥ छ० १६ मोहरम. सन मय्यातैन व अलुफ. ज्येष्ठमास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं.

पोष्य बाळाजी अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० १५ मोहरम जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें " तीर्थस्वरूप राजश्री भाऊंचा मुक्काम चिकोडीवर आहे. श्रीमंत महाराज छत्रपति यांस व वडिलांस सहा सात कोसांचा अंतर आहे. परगणे मंगळवेढें येथें मनस्वी उपद्रव अगोदर झाला. त्याअलीकडे राजश्री गोपाळराव भाऊ यांणीं बेवीस हजारांची निशा घेतली. त्यास हल्लीं उपद्रव मशारनिल्हेनीं लाविला आहे. त्यांस ताकीद होऊन निशादार यास उपद्रव न लागे तें करावें; म्हणोन वगैरे तपशिलें लिहिलें तें सविस्तर कळों आलें. ऐशियास आम्हीं सापचे मुक्कामीं. गोपाळराव भाऊ तिकडे. येथून लिहिल्यानें निशेदाराचा उपद्रव दूर होतो असें नाहीं. तेथें असतां कळलें असतें तरी या गोष्टीचा उपयोग जाहला असता. आतां विना यजमानांची आमची भेट जाहल्याशिवाय उपद्रव दूर कसा होतो ? इकडील आमचें जाणें जाहल्यानंतर जाबसाल होऊन येईल. आपलेकडील काम तें घराऊच, तेव्हां लेहून कळवावें असें नाहीं. राजश्री भाऊंचा मुक्काम चिकोडीस आहे. त्यांचे शरीरास आराम नव्हता. हल्लीं आराम जाहला म्हणोन परभारें ऐकतों. परंतु आपण कांहींच लिहिलें नाहीं ! रात्रंदिवस चिंता लागली आहे. येविशींचें सविस्तर लेहून कळवावें म्हणजे चित्त स्वस्थ होईल. गोपाळराव लष्करांत नाहींत. फौजे सुद्धां लांब आहेत. लष्करांत असतां पत्र आलें असतें तरी ठीक पडतें. सदैव पत्र पाठवून संतोषवीत असावें. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

१ बाळोबा तात्या २ दौलतराव शिंदे यांची.

नं. ५००३ श्री पांडुरंग. (२१ जून.)

पै॥ छ० १९ मोहरम. सुरुसन मय्या तैन व अलफ. ज्येष्ठमास.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें भगवंतराव बहिरव शिर साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना येथीलं कुशल तागायत ज्येष्ठ वद्य चतुर्थीपावेतों मुक्काम ठाणें करकंब येथें वडिलांचे कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान मोंगलांचे व शिंदेचे लष्करामुळें परगणेची खराबी जाहली. गांवचे लोक वस्ती सोडून निंबाळकराचे तालुकेंत जाऊन राहिले आहेत. त्यांस आम्हीं ठाणीयास आलेवर गांवास येणें म्हणोन चिठ्या पाठविल्या. त्यांचें म्हणणें पडतें कीं, आपली खराबी बहुत झाली. मोगलांचे लष्करचा मुक्काम नेहमीं झाला. त्याणीं कडबा झाडून नेला. धाट राहिलें नाहीं. शिराळेकराचे वरातेचे रुपये आम्हांपाशीं घेतले. शिंद्याकडील पागनीस व चिटणीस वगैरे जे सरदार आले त्यानीं खंडण्या घेतल्या व कही केली. व शेवटीं गांव लुटिले. जाळिले. याप्रमाणें अवस्था जाहली. त्यापक्षीं शिरोळेकराचे वराते बद्दल व जनार्दन शिवाजीबद्दल रुपये मजुरा सालमजकुरांत द्यावे व निम्मे सूट द्यावी. असें जाहालियास साहुकाराचे रुपये घेऊन शिराळेकराची वरात वारतों व खंडण्या दिल्या आहेत त्यांतून मुक्त होऊन साहुकारासही भरंवसा पडेल. यास्तव धनी यानीं मेहेरबानी करावी. हें न जाहलियास गांवास येतांच साहुकाराचा तगादा होईल त्यास काय द्यावें ? यास्तव गांवास येणें होत नाहीं. याप्रमाणें त्यांचें म्हणणें पडलें आहे. दिवस हंगामाचे. पर्जन्य कोठें कोठें पडला. पडावयाचे दिवस. या दिवसांत लांबण पडोन जमिनीची मेहनत राहिल्यास गवत होईल. मग मेहनत चालणार नाहीं. पेरणीसही दिक्कत पडेल. कुणबीही कोठें कोठें आपापले सोईनें चालले, यास्तव विनंती लिहिली आहे. येविशीं आज्ञा जाहली पाहिजे. ' आज्ञा आणवितों तों तुम्ही गांवास येऊन आवतें चालतीं करणें. ' हें बोलणें होतच आहे तों इतक्यांत राजश्री बाळाजी कृष्ण निसबत लक्ष्मीबाई शिंदे हे इकडूनच गेले. जातेसमयीं मौजे मेंढापुरी येथें मुक्काम करून खंडणीचें बोलणें वीस हजारांचें झालें. गांवगन्ना चिठ्या करून द्याव्या तों इतक्यांत रा॥ चिंतों आत्माराम पागनीस निसबत राजश्री दौलतराव शिंदे जलद येऊन पोंहचलेमुळें ते रात्रीच कूच करून निघोन गेले. जातां जातां परगणेंतील सात आठ

गांवच्या वोली धरून नेल्या. त्यांपैकीं कांहीं पैका देऊन सुटोन आले. कांहीं पळोन आले. कांहीं अद्यापि लष्करांत आहेत. मेंढापुरीहून कूच करून तारापूरची खंडणी घेऊन आंबें येथील तसनस करून पुढें गेले. बागलकोटापर्यंत जाऊन खंडण्या घेऊन हल्लीं माघारे फिरले ते तिकोटेनजीक विजापूर येथील मुक्कामीं आहेत. पुढें चडचण मंगळवेढ्याचा परामर्ष करून क्षेत्र पंढरपुरास येऊन करकंबेवरून खानदेशांत चराईस जाणार याप्रमाणें बातमी आली. मार्ग करकंबेवरून, तेव्हां पहिला करार स्मरून खंडणी मागों लागल्यास मग प्राणांतिक ! याजमुळें लोक यावयाचे सुमारांत होते ते राहिले. गांव खेडीं उध्वस्तच आहेत. कोठें जुजबी वस्ती आहे तेही या दिकतीनें जावयास करतात. कसब्यांत आम्ही आल्यापासून वस्ती झाली तेही गडबडले आहेत. बाळाजी कृष्ण आला असतां परगणेंत कांहीं हातीं लागावयाचें नाहीं. ठाण्याशीं गांठ घालतील. त्यांजबरोबर पांच हजार फौज व सात आठ तोफा आहेत याजमुळें दहशत खातात. येथील शिबंदीचा प्रकार आम्हीं स्थलांतर केल्यावरी कार्याकारण साठ पावणाशेंपावेतों होती तेच आहे. त्यांस द्यावयास पैसा नाहीं. जास्ती ठेवावे तरी द्यावें काय ? बाळाजी कृष्ण केवळ कृतघ्न आहे. ठाण्याचें रक्षण झालें पाहिजे. यास्तव पांचशें स्वार व पांचशें गारद मंगलवेढेचे सुमारें पाठवावे म्हणजे तिकडील शह टळतांच इकडे यावें अशी ताकीद व्हावी. स्वारांची व गाडद्यांची खर्चाची बेगमी तेथेंच करून दिली पाहिजे. येथें देविल्यास निरोपाय आहे. पैसा मिळावयाचा नाहीं. वडिलीं रागें न भरतां तरतूद होऊन स्वार व गाडदी बेममी होऊन त्वरित यावया आज्ञा झाली पाहिजे. तिकडून सरंजाम आला असतां दाब बसेल. बाळाजी कृष्ण याचा उपद्रव चुकेल. लोक केवळ गडबडले आहेत त्यांस भरंवसा पडेल. क्षेत्र पंढरीही गडबडली आहे. बाळाजी कृष्ण याणें नासिकचें कृत्य केलें आहे याजमुळें कोणास भरंवसा पुरत नाहीं. त्यांत लावणीचा हा हंगाम. समयीं सामान आल्यानें फार उपयोगीं पडेल व लोकांतही दाब आहे. यास्तव वडिलीं कसेंही करून सामान त्वरित रवाना केलें असतां दहशत पडेल. मिरजेहून वरचेवर सामान येतें हें समजोन या मार्गें येणार नाहीं. सेवेशीं श्रुत होय कृपा करावी हे विज्ञापना.

नं. ५००४ श्री. ( ज्येष्ठ व० ६–२३ जून. )

पै॥ छ० २० मोहरम सन मय्या तैन व अल्लफ ज्येष्ठ.

विनंती सेवेशीं सेवकाचे साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १८

---

१ मोरो आपाजी परांजपे याचें पत्र मिरजेस बायांच्या लष्करांतून.

मोहरम रविवार दोन प्रहर सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० १६ रोजचें पत्र पाठविलें तें पावलें. तेथें आज्ञा "राजश्री चिटनीस पागनीवीस येऊन (बायांच्या)[1] भेटी जाहल्या असतील. सविस्तर लिहिणें; व कवठे नागांवकर यांस ताकीद जाली आहे. कराराप्रमाणें ऐवज देतील. याउपर गांवांस उपसर्ग लागूं नये." म्हणोन लिहिलें, त्यास उभयतांचा मुक्काम व मामा आंग्रे व एक कर्नेल, समागमें चार तोफा, एक पलटण, पांच सहाशें स्वार, वरकड कारभारी राजश्री बाजीबा मोदी सुद्धां ऐसे मौजे सापावर उतरले आहेत. मागील तळ देऊरावर होता तेथें एक पलटण, सहा तोफा कांहीं स्वार ठेवून पुढें हल्लींच्या मुक्कामास आले. बुधवारीं भेटीचा निश्चय ठरला. बक्षी बावांनीं पतकें वाईदेशीं वगैरे होतीं त्यांस पठाणसुद्धां यशवंतराव शिवाजीसुद्धां आणविले. विसावे घटकेस भेट व्हावी असें ठरलें. अगोदर बक्षी पुढें एक दीड कोस आडवे जाऊन समारंभें घेऊन आले. वाडियांत डेऱ्यांत बसले. समस्तांच्या भेटी जाल्या. मातुश्री मागील डेऱ्यांत चीक पडदा टाकून बसलीं होतीं तेथें मुजरे जाऊन करून विडापान होऊन मागती सापावर गेले. गुरुवारीं आले नाहींत. शुक्रवारीं आले. बोलणें एकांतीं सामोपचारीं जाहलें. एक दोघे कारभारी मागें राहून मध्यानरात्रपर्यंत बक्षीशीं बोलणें जाहलें. नंतर मंदवारीं काल तेही तिसरा प्रहरीं आले. बोलणें जाहलें. मातुश्री आप्तकीचे मार्गें मागील घडल्या अर्थावरून सक्त आंग्रे यांशीं पडद्यांनीं बोलली. तेव्हां काल आंग्रे व पागनीस आले. चिटणीस निगडीस गेले होते. बोलणें बाह्यरंगीं जमलें ऐसें नाहीं. आज यावयाचा विचार दिसत नाहीं. बक्षीस रोजमरेकरितां लोकांनीं आज गवगवा केला आहे. मातुश्रींशीं समाधानवृत्तीचे बोलणेंचा अर्थ बक्षी बोलून पत्र पाठवितील. उद्वैक तेही येतील. सारांश समेट होईल ऐसें दिसतें. तिकडूनही चिटणीस पागनीस यांजवर यखत्यार· येथेंही बक्षीमंडळ सुटकेच्या गृहस्थाचे लक्षांत दिसतें. त्याअर्थें योग चांगलाच रंगाचा होईल वाटतें. इरादा निराळा पडोन बंदोबस्त येथील मर्जीप्रमाणें घडेल. दुतर्फाही कारभार समुच्चयें ऐक्यविचारें चालून द्वैत मिटवितील. पुढें हरएक मसलतींचा डौल सर्वसमुच्चयें घडावयाचें तें घडवितील. सुटकेच्या गृहस्थास ज्याणीं पाठविलें त्यांचाही इतबार आहे त्या अर्थीं समेट दिसतो. दो तीन रोजांत येथोन कूच होऊन श्रीमहादेवाकडे जावें ऐसा बेत एक. दुसरें

---

१ बाळोबा तात्याच्या.

रहिमतपुरास जावें ऐसेंही आहे. निरेच्या पाण्यांनीं जावें ऐसें बहुधा घडेल. राजश्री यशवंतराव शिवाजी पार्लीवर आहेत. सातारा तालुक्यांत उपद्रव करितात येविशीं श्रीमंत राजश्री रावसाहेब याचें पत्र आलें होतें. त्यास ताकीदपत्रें घेऊन पाठवितों. गांवगन्नाच्या ओली आणल्या त्या अद्याप आहेत. बोभाट पडला आहे. याउपर काय होईल पहावें. श्रीमंत वडील यांचा मुक्काम पुढें आला नाहीं. त्यास येथें वर्तमान बोलणें लागलें आहे त्याकरितां मुक्काम जाला ऐसें बोलतात. राजश्री तात्यांं प्रकृत वडिलांची बरी आहे कीं काय येविशीं वरचेवर विचारितात. लिहावयाची आज्ञा होत असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५००५ श्री. ( ज्येष्ठ व० ६–२३.जून. )

छ० १८ मोहरम सन मय्या तैन व अल्लफ. ज्येष्ठ.

सेवेशीं विज्ञापना. पुण्याहून गुरुवारीं पत्रें राजश्री नारोपंत चक्रदेव व वेदमूर्ति राजश्री गोपीनाथ दीक्षित व वामनराव गोखले यांचीं पत्रें महाराजांस राजश्री रघुनाथराव माने यांचे विद्यमानें आलीं. त्यांतील मजकूर "पेशजी वामनराव यांजबरोबर कराराची याद करून पाठविली होती त्याअन्वयें श्रीमंतांकडून अद्याप बोलण्यांत फेर नाहीं. महाराजांची मान्यता पडत असिल्यास राजश्री रघुनाथराव माने यांस पुण्यास पाठवावें. म्हणजे पेशजीच्या ठरावाप्रमाणें सनदापत्रें करून देवितों आणि महाराजांकडील तालुके चिकोडी मनोळी वगैरे यांस उपद्रव होऊं नये येविषयीं राजश्री परशुरामपंतांकडून बंदोबस्त पुण्याहूनच करून देऊं" याप्रमाणें आलीं आहेत. अद्याप माने यांस पुण्यास पाठवावयाचा निश्चय जाहला नाहीं. जसा निश्चय होईल तसा सेवेशीं लिहून कळवीन. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांस इकडील बंदोबस्ताविषयीं सरकारांतून आज्ञा होते, आणि महाराजांकडे ही पुण्याहून अशीं पत्रें येतात ! तेव्हां यांतील काय भाव आहे समजत नाहीं. स्वामींच्या समजण्यांत असेल. काल मंदवारीं इकडील पेंढार नदीपार दोनतीनशेंपर्यंत जालें. अस्तमानीं झालें. भोजेस रात्रीं राहून रविवारीं प्रातःकालीं तिकडील लष्करच्या कहीवर जाऊन कांहीं उंटें, तट्टें आणणार या बेतानें रवाना जाहले आहेत. तिकडे ही सूचना लिहून पाठविली आहे. नदीवर एक टोकरा तयार केला आहे. एक दोन ताफे बांधिले आहेत. आणखी टोकरे याच्या चिठ्या गांवगन्ना जाहल्या आहेत. कळावें.

---

१ माधवराव रास्ते. २ परशुराभाऊ. ३ बाळोबा. ४ नारो हरि करंदीकर याचें पत्र करवीरकरांच्या लष्करांतून.

सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री राजाज्ञा आज रविवारीं अथवा इंदुवारीं फौज घेऊन नदीपार भोजेनजीक होणार. खुद्द महाराजांची मात्र स्वारी मुक्काम आहे येथें राहावी असा बेत आहे. कळावें. राजश्री नागोपंत आपांकडील कारकुनास काल मंदवारीं रात्रीं बोलावून नेऊन सांगितलें, कीं शिरगांवास जाऊन राजश्री विरूपाक्षपंत अण्णास अथवा नागोपंत आपास शिरगांवास घेऊन यावें. तेथें राजश्री बचाजीपंतास पाठवून देतों. त्यांतील करार तहाच्या बोलण्यांत त्यांणीं पडोन तह करून द्यावा या उद्देशें मसलत करितात. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५००६ श्रीगणपति. ( २४ जून. )

पै॥ छ० २० मोहरम. सन मय्यातैन व अल्लफ. ज्येष्ठ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत ज्येष्ठ व॥ ७ इंदुवारपावेतों यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री बाळोबातात्यांकडे व राजश्री नानांकडे वडिलांचे प्रकृतीचा मजकूर लिहिला कीं नाहीं, याचा विचार कसा तें लिहिणें " विशीं आज्ञा, त्यास उभयतांकडेही आजपावेतों लिहिलें नाहीं. पुढेंही लिहूं नये. कारण दुर्लौकिक, उगाच ल्याहावें कशास ? दिवसेंदिवस ईश्वरकृपेंकरून आरोग्य आहे याजकरितां लिहूं नये असाच निश्चय आहे. वडिलानीं रहावयास मिरजेस यावें विशीं लिहिलें, त्यास ही फौज पैक्यावांचून वडिलांकडे पाहून राहिली आहे. आज वडील येथून गेले म्हणजे झाडून उठून जाणार. तेव्हां इतके दिवस केलें तें व्यर्थ गेलें ! याजकरितां गोकाक अगर बागेवाडी येथें वडिलीं रहावें, कांहीं फौज चिकोडीस ठेऊन येथील बंदोबस्त करावा, छावणींत मनोळी वगैरे खेडीं घटप्रभेपलीकडील झाडून घ्यावीं, पुढें जसा सुमत्ता पडेल तसें करावें, असें योजिलें आहे. घडतां घडेल तें खरें. घराऊ मजकुराची याद पाठविली ती पावलीच आहे. उत्तर लौकर यावें. येथें निकड भारी आहे. सदैव पत्रीं सांभाळावें. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५००७ श्री. ( ज्येष्ठ व० ७–२४ जून. )

छ० ५ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. आषाढ.

सेवेशीं नारो हरि करंदीकर दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० १९ मोहरमपावेतों मुक्काम लष्कर नजीक बारवाड यथास्थित असे. विशेष. राजश्री आकोजाराव चव्हाण यांस मिरजेस

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस महाराजांच्या लष्करांतून.

नेलें आहे. येविशींचा मजकूर पेशजी सेवेशीं सविस्तर लिहिला आहे. हल्लीं आणखी ढिगरजेहून राजश्री नीळकंठराव यांचें पत्र राजश्री प्रीतिराव चव्हाण हिंमत बहाद्दर ममलकतमदार यांस आलें त्यांत मजकूर "कारकून व कुलकर्णी व सावकार व त्यांत कांहीं घरचेंही संमत असा मजकूर होऊन उपद्रव होणार. आपला परिणाम लागत नाहीं व आकोजीराव यांसही मिरजेस उपद्रव होतो." त्यास यशवंतराव चव्हाण देवाधीन झाले त्यांचीं मुलेंमाणसें आहेत. त्यांचा सर्व प्रकारें प्रतिपाळ व्हावयाचा अभिमान स्वामींस असावा. कारकून व कुलकर्णी वगैरे यांच्या सांगण्यावरून हरएक विशींचा उपसर्ग गैरवाजवी होऊं नये. सारांश बचाव होऊन जागा न सुटे तें व्हावें. स्वामींस सर्वत्र समान. सर्व अर्थ ध्यानांत आहेत. मीं लिहून कळवावें असा अर्थ नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५००८ श्रीगजानन. ( ज्येष्ठ व० ७–२४ जून. )

पै॥ छ० १९ मोहरम सन मय्या तैन व अलूफ. ज्येष्ठ.

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती विनायक भास्कर व हरि भास्कर अनेक आशीर्वाद उपरी. येथील कुशल ता॥ छ० मोहोरम मु॥ लष्कर येथें क्षेम असों. विशेष. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री पंतप्रधानांकडून पुण्याहून तीर्थस्वरूप राजश्री भाऊसाहेबांस बाबा फडणीस यांबरोबर सरकारच्या हुजऱ्यांसमागमें शिकेकटारा दोन, पैकीं मुतालिकीची एक व पेशजीच्या सरंजामाची एक पहिली होती ती व चवरी येणेंप्रमाणें पाठविलीं तीं ज्येष्ठ व॥ ५ मंदवारीं सुमुहूर्तें अंगीकार करून खुशालीच्या तोफा केल्या. दुसरें वर्तमान राजमंडळकर यांणीं हुजूर सरकारांत बोलणें पूर्ववतप्रमाणें चिकोडी प्रांत व मनोळी प्रांत सोडून देतों याप्रमाणें ठराव करून आपणास उपसर्ग जाजती इकडून न व्हावा म्हणोन श्रीमतांचीं पत्रें काल सायंकाळीं पुण्याहून आलीं. पट्टणाकडे इंग्रजाचे कुमकेस जाणेंविषयीं आजपर्यंत वडिलांस पत्रें सरकारचीं येत होतीं त्यास कालच्याच पत्रीं लिहून आलें जे इंग्रज याजकडील वकिलानें विनंति केली जे, पट्टण आपण काबीज केलें. प्रांताचा बंदोबस्त जाला. बाकी कांहीं राहिला तो करितों. याजउपर आपणांकडील फौजा रवाना करावयाचें प्रयोजन नाहीं. त्यावरून सरकारची आज्ञा वडिलांस लिहून आली जे, तिकडे फौज न पाठविणें. राजश्री रामचंद्र परशुराम फौज घेऊन गेले असल्यास माघारे आणवणें. बहुमान घेऊन हुजरे दोन असामी आले त्यास दोघांस सोन्याचीं कडीं दोन व शेले पागोटीं दोन दिलीं. याजउपर मसलत

१ पत्रावरील मिति व तारीख पेवस्तीची.

काय होते ती पहावी. वर्तमान बीतपशील आपणास कळावें म्हणोन लिहिलें असे. "प्रांत व ठाणीं पूर्ववत् प्रमाणें सोडचिठ्या पुणेंत आणून देतों असा करार जाहला आहे. ते तुम्हांस उपद्रव करणार नाहींत. तुम्ही त्यांस न करावा असें ( श्रीमंतांच्या लिहिण्यांत ) आहे". वगुत काय लिहिणें आपण विनंती करावयास सांगितली होती ती मागेंच केली. आणोक आपण लिहावें. हे आशीर्वाद.

नं. ५००९ श्री. ( ज्येष्ठ व० ८—२५ जून. )

चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा यांसीं आशीर्वाद उपरी.

गृहकलह तुटावा याअर्थें वडिलांनीं आज्ञा केलेवरून चिरंजीव राजश्री चिंतामणराव आप्पाकडील कलमांची याद पाठविली ती पावली. कोणी कारकून पाठवून तोड मोड होऊन स्वालजाब ठरावे म्हणोन लिहिलें, त्यास वडिलांचे आज्ञेखेरीज माझा स्वालजाब नाहीं; परंतु कारकून पाठवून अथवा लिहोन जाबसाल कोठवर कळवावे ? वडिलांची माझा समक्ष भेट जाल्यावर जी विनंती करावयाची ती करीन. वडिलीं श्रवण करून जसी आज्ञा करतील त्यास उजूर नाहीं. श्रीकृपेंकरून वडिलांचें येणें मिरजेस होईल. श्रीगणपतीचा उत्साहही जवळ आला आहे. तथापि वडिलांचें येणें न जाल्यास मीच वडिलांचे सेवेशीं येईन. तूर्त लोकांचा गवगवा आहे. कळावें. छ० २० मोहरम. लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ५०१० श्री. (ज्येष्ठ व०—९ २६ जून. )

पै॥ छ० २१ मोहरम. मय्या तैन व अल्लफ.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री विश्वासराव घाटगे सर्जाराव यांजकडे किल्ले सामानगड येथील वहिवाट सांगितली. त्याणीं आपलें पथक व पेंढारीसुद्धां तिकडे जाऊन रहावें असें ठरोन काल भौमवारीं किल्ल्यास सनद लिहिली. आज अथवा उद्यां निघोन जाणार. त्यास तिकडे दंगा करणार, शहापूर तालुका लगत आहे, खटला करावयाशीं चुकणार नाहीं. यास्तव सरहद्दीच्या गांवखेड्यांस उपद्रव करतील यास्तव हुशारीविशी मामलेदारास आज्ञा असावी. मी येथें घाटगे यांस सांगतों, व महाराजांकडूनही सांगवितों. राजश्री राजाज्ञा नदीपार भोजेनजीक जाले. बरोबर पंचवीस पन्नास पाईचें माणूस व दहा पंधरा स्वार आहेत. वेदगंगा, दूधगंगा दोहीं नद्या मिळोन उतरले होते. मागती

१ करवीरच्या महाराजांनी केला आहे. २ दारांत सैनिकांचें पगाराबद्दल धरणें बसलें आहे. लष्करास येतां येत नाहीं.

माघारे आणविले आणि दोही नद्यांचे मध्यें गड्डा आहे तेथें उतरावयाची आज्ञा जाली. त्याप्रमाणें येऊन उतरले. आणखी पागा व पाटणकर उद्ईक राजाज्ञाजवळ जाऊन उतरणार. लोकांसही ताकीद उतरणेंविशीं होत आहे. इकडील पेंढारी पेशजी उतरोन तिकडील लष्कराकडे गेले होते. शें दोनशें होते, त्यास तिकडील तलावेच्या झपाट्यास सांपडले. त्यांस लुटलें. कांहीं घोडीं पाडाव केलीं. थोडे बहुत पळाले ते माघारे यावे तर नदीची अडचण. यास्तव तिकडेच पळाले. ते येतात किंवा आणखी तिकडे कोठें सांपडतात न कळे. सोलापुरास ठाणें पडलें. अद्याप तिकडील लष्कराचें कूच नाहीं. मुक्कामच आहे. रा. विष्णुपंत भाऊंकडे ब्राह्मण पाठवावयाची परवानगी घेऊन पाठविणें-विशीं आज्ञा, ऐशास घाटगे यांस विचारिलें आहे. ब्राह्मण व गडी येथें लष्क-रांत आला आहे. आज करवीरास लावून देतों म्हणोन करार केला आहे. महाराजांस विनंती केली. त्यांणीं खातरजमा तुमची ब्राह्मणाविशीं असिल्यास सांगावें म्हणजे परवानगी सांगतों. असा करार जाहला आहे. परंतु घाटगे यांस परवानगी लाविली असतां राग येईल यास्तव एक वेळ घाटगे यांज कडूनच काय होतें पहातों. नाहींतर मग हुजूरची परवानगी लावितों. कळावें. घाटगे यांचें बोलणें प्रमाण वाटत नाहीं. बोलावें त्याप्रमाणें प्रत्ययास येत नाहीं. करवीरीं रक्षा कारभारीण आहे ती येथील सांगणेंप्रमाणें ऐकत्ये असा अर्थ नाहीं. काय होईल तें मागाहून लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०११ श्री. ( वैशाख व० ८–२७ म. )

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २१ जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० १८ जिल्कादचें एक पत्र व छ० २९ जिल्कादचीं पांच पत्रें व छ० ४ जिल्हेजचें एक पत्र एकूण सात पत्रें पाठविलीं तीं पावलीं. व श्रीमंत नानांस पत्रें पाठविलीं तीं पावलीं. पाहून प्रविष्ट केली व उत्तर घेऊन पाठविलें आहे त्यावरून विदित होईल. मला पत्रें पाठविलीं तीं श्रीमंतांस दाखविलीं. श्री॥ राजश्री भाऊंस मुलेंमाणसें ठेवावयाकरितां धारवाडचा किल्ला सरकारांतून देविला व मुतालिकी शिक्केकट्यावर दिली व चवरी व वस्त्रें जवाहीरसुद्धां दिलीं. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपानीं फौजसुद्धां टिपूवर जावें, भाऊसाहे-बानीं जाऊं नये, याप्रमाणें ठरोन राजश्री बाबा काळे येथून निघोन गेले ते स्वामींस भेटून पुढें जातील. भाऊसाहेबांकडे पत्रें गेलीं होतीं त्याचीं उत्तरें

आलीं त्यांतील भाव काळे सांगतां विदित होईल. राजश्री धोंडोपंत गोखले तुंगभद्रापार गेले. श्रीरंगपट्टण इंग्रजानीं घेतलें. टिपूचें ठिकाण मेला किंवा जिवंत आहे असें पक्केपणें आलें नाहीं. पट्टण घेतलें म्हणून सरकारांतून इंग्रजांचे वकिलानें तोफा मारविल्या. इंग्रजानीं टिपूसारखा जबरदस्त बुडविला आणि पट्टण घेतलें हें मोठें काम केलें. इंग्रजांची जबरदस्ती सर्वांवर पडली असें वाटतें. बाया शिंदे व महाराज प्रस्तुतकाळीं कोठें आहेत? बाया इकडे येतात कीं नाहीं? भाऊ मिरजेपावेतों येणार किंवा नाहीं? हें सविस्तर लिहून येत असावें. स्वामींची फौज वडिलांजवळ होती ती मिरजेस आली म्हणून ऐकिलें याचें कारण सविस्तर लिहून यावें. वडिलांची सांप्रत शरीरभावना कशी आहे तें ल्याहावयासी आज्ञा होत असावी. चोहोंकडील बातमी वरचेवर येत असावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री चिंतोपंत व बाळाजीपंत व जयरामपंत व बाळाजीपंत यांचे बंधु हरीपंत व राजश्री जनार्दनपंत मोकळे होऊन तिकडे येत आहेत हे विज्ञापना.[1]

नं. ५०१२ श्री. ( ज्येष्ठ व० ११–२८ जून. )

पै॥ छ० २६ मोहरम. सन मय्यातैन.[2]

सेवेशीं विज्ञापना. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांचा फौजसुद्धां खरोशीवरून कूच गुरुवारीं होऊन हिरेकुडी नागराळ येथें मुक्काम जाला आहे. तलाव्यास फौज भोजेनजीक तीन चार हजारपर्यंत आली होती. गलदग्यानजीक तोफा दोन आणिल्या होत्या. गलदग्यास ठाणें घातलें. लष्करास व तलाव्याचे फौजेस अर्धकोशाची तफावत होती. नदीवर हुजूरची स्वारी जाऊन पहावयास बसली होती. नदीवरून सारे लोक दिसत होते. एक पेंढारी महाराजानीं बातमीस पाठविला होता त्याणें फौजेनजीक जाऊन माघारा येत होता त्यास तिकडून पांच चार राऊत येऊन घोड्यास व पेंढारी यांस तोडिलें. घोडा चांगला होता. पेंढारी निभावून आला. भोजेस यावयाचा बेत होता परंतु सायंकाळ जाला यास्तव माघारे गेले. रात्रीं इकडील लष्करांत जीनबंदी करून हुशारीनें होते. आतां हुपरीच्या मुक्कामास जावयाचा बेत आहे. नदीस पाणी आहे याजमुळें बचाव आहे. राजश्री बळवंतराव खांडेकर यानीं पुण्यास पत्रें लिहिलीं आहेत, त्याचीं उत्तरें

---

१ हे पांच गृहस्थ परशुरामभाऊबरोबर कैदेंत सांपडले होते ते या वेळीं सुटले.
२ महाराजांच्या लष्करांतून नारो हरि करंदीकर याचें पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

येत तोंपर्यंत राहणें जालें. यास्तव चार दिवस करवीरास रहावयाचा निश्चय करून गुरुवारीं निरोप घेऊन गेले. जातांनां हेरवाडावर राजश्री त्रिंबकराव अण्णा यांजकडील कारकून बोलावणेंस आला होता. मेजवानीकरतां हेरवाडास काल सायंकाळीं गेले. आज भृगुवारी भोजनें करून करवीरास गेले. कळावें. आज लष्करचा मुक्काम मंदवारचा आहे. कूच नाहीं. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०१३ श्री. ( ज्येष्ठ व. १२–३० जून )

पै॥ छ० २८ मोहरम. सन मय्यातैन व अलफ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामींचे सेवेशीं सेवक आबाजी रघुनाथ. कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० २६ मोहरम जाणोन स्वकीय कशल लिहीत असावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री बाळाजी कृष्ण याचा उपद्रव महालांस लागतो त्याचे बंदोबस्ताविशी लिहिलें, त्यास पेशजी श्रीमंत मातुश्री बाया यांजकडून मशारानिल्हेस ताकीदपत्र गेलेंच आहे व हल्ली राजश्री नारायणराव बक्षी यांचें पत्र पाठविलें आहे तें त्यांजकडे पाठवून द्यावें, म्हणिजे महालांस कोणेंविशीं उपसर्ग लागावयाचा नाहीं. आम्ही येथें मातुश्रीकडे आलों. समेटाचें बोलणें होत आहे. एका दो रोजांत निश्चयांत येऊन यांचें कूच करवून, दरकूच पुण्याकडे जाणें होईल. बाळाजी कृष्णही लौकरच तिकडून येतील. सदैव पत्र पाठवून संतोषवीत असावें. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

नं. ५०१४ श्री. ( ज्येष्ठ व० १३–१ जुलै. )

छ० २६ मोहरम. सन मय्या तैन व अलफ.

सेवेशीं विज्ञापना. बायांच्या भेटी होऊं नये येविशीं श्री॥ राजश्री नानांचीं पत्रें व नारोपंत चक्रदेव यांचीं व सरकारचीं व खांडेकर यांचीं एक दोन वेळा आलीं त्या पत्रांतील मजकूर एकीकडे ठेवून बायांच्या भेटी जाल्या. भेटी होऊनही उपयोग नाहीं. भ्रष्ठ मात्र जाले. हा दोष उडवावयाकरितां बळवंतराव खांडेकर यांजकडून पत्रें पुण्यास नानांकडे ( महाराजानीं ) लिहिलीं त्यांतील मजकूर कीं, बाया

---

१ शिंद्यांचे कारभारी आबा चिटणीस यांचें पत्र. २ करवीरकरांच्या लष्करांतून नारोपंत करंदीकर याचें पत्र बाळासाहेबांस.

या प्रांतीं आल्या त्या परशुरामपंत यांच्या विचारें आल्या. बाया व आपण एक विचार होऊन आपणावर दाब द्यावा या बेतांत होते. परंतु आपणाकडील मसलत आटोप्यांत आणिली हें समजोन बायांकडील संधान सोडिलें. श्री॥ राजश्री अमृतरावसाहेब व पागनीस व परशुरामपंत यांचा विचार एक आहे. बायांची समजूत होऊन निखालस जालेवर पागनीस याची वर्तणूक आपणाशीं निखालसपणें राहील ही आपली खातरजमा आहेच! आम्हांस[1] शत्रु प्रबळ जाला तेव्हां बायांस मिळवून घेणें प्राप्त जालें तेव्हां संधान केलें. या संधानाचीही पांच रुपये बायांस कबूल करून मसलत मोडिली[2]. अशीं नानाप्रकारचीं कारणें पडलीं. सारांश पागनीस व परशुरामपंत आपणासीं कितीक निखालसता जाली असतां आपले कल्याणप्रद व्हावे हें त्यांजकडून घडणार नाहीं. बक्षी व कुरुंदवाडकर कारकून या उभयतांच्या पत्रांच्या नकला पाठविल्या आहेत. त्याजवरूनही मजकूर ध्यानांत आणावा कीं बायांचें संधान यावयाचें कारण कोणतें? अशी नानाप्रकारची नालस्ती लिहून पत्रें पाठविलीं आहेत. कसेंही करून नानांच्या चित्तांत विकल्प यावा! ऐशास केवळ बळवंतराव याणीं लिहिलें म्हणोन खातरजमा होऊन नानांच्या चित्तांत कल्पना यावी असा अर्थ नाहीं. परंतु खोटे वर्तणुकेच्या कसबास चुकत नाहीं! महाराजांचा बंदोबस्त करून देणेंविषयीं पत्रेंच चक्रदेव व नाना वगैरे मंडळींस लिहिली आहेत. काय उत्तरें येतात पहावीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०१५ श्री. ( ज्येष्ठ व० १३–१ जुलै. )

छ० २६ मोहोरम. सन मय्या तैन. ज्येष्ठ.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री नागोपंत आपा यांजकडील कारकुनांस[3] दोन तीन वेळां आपास शिरगांवास घेऊन येणेविशीं पाठविलें, त्यास काल भृगुवारीं आपा शिरगांवास येऊन राजश्री बचाजीपंत यांस शिरगांवास येणें-विशीं पत्र पाठविलें. त्यास बचाजीपंत उदैक शिरगांवास जाणार आहेत. जाऊन आल्यावर काय बोलणें होतें तें समजेल तसें लिहून पाठवीन. राजश्री बाबा काळे यांचें ही पत्र बचाजीपंत व जोशीराव व रघुनाथराव माने त्रिवर्गास येणेंविशीं काल भृगुवारीं आलें आहे. अद्याप जाण्याचा त्रिवर्गांचा निश्चय

---

१ आम्हांवर. २ परशुरामभाऊनी मोडिली. ३ महाराजाच्या लष्करांतून नारोपंत करंदीकराचें पत्र.

जाला नाहीं. जाल्यावर सेवेशीं लिहितों. वाळवेंच्या सनदा बाबा काळे यांचे नावें मामलतीच्या आल्यों म्हणोन ऐकिलें, त्यास खरें असल्यास कळवावयाची आज्ञा व्हावी. पुण्याहून महाराजांकडे पत्रें काल आलीं त्यांत टिपू जिवंत आहे असें लिहिलें आहे. सत्य मिथ्या न कळे. श्री॥ राजश्री नानांनीं आपणांकडील परीट चालणार आहे त्यास पाठवूनं मुद्दाम बातमी आणविली असें पत्रांत लिहिलें आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०१६ श्री. ( ज्येष्ठ व० १३–१ जुलै. )

पै॥ छ० २६ मोहरम. सन मय्या तैन.

यादी बायांचें निराकरण करून खांडेकर यांनीं पत्रें पुण्यास नानांकडे लिहिलीं, त्यास साधन नारायणराव बक्षी याचें पत्र सांपडलें त्याची नक्कल व सखाराम शेषाद्रि कुरुंदवाडकर यांचें पत्र सांपडलें त्याची नक्कल.

दोनी पत्रांच्या नकला त्यांतील मजकूर बितपशील—

१ नारायणराव बक्षी याणीं राजश्री हरि जगन्नाथ व यशवंतराव शिवाजी भाऊसाहेबांकडे पुढें गेले होते त्यांस गोकाकचे नजीकचे मुक्काम्नें पत्र पाठविलें कीं, परशुरामपंत भाऊ यांस कसेंही करून भेटीस आणावें. भेटीअंतीं त्यांचे मनांतील संशय काढून निखालस होय तें करूं. आम्ही त्यांचे लक्षाशिवाय नाहीं. याअन्वयें लिहिलें होतें तें पत्र पांढरे यास गोकाकेंत सांपडलें. त्याणीं महाराजांकडे पाठविलें त्याची नक्कल. कलम १

१ सखाराम शेषाद्रि याणीं कुरुंदवाडास पत्र पाठविलें त्यांतील मजकूर कीं महाराजांनीं बायांस तीन लाख रुपये द्यावयास केले. पैकीं पावणा लाख रुपये पावले. बाकी सवादोन लक्ष राहिले ते भाऊसाहेब याणीं बायांस द्यावयाचा करार केला आणि बायांनीं महाराजांस कुमक करूं नये. पुण्याकडे निघोन जावें, याप्रमाणें ठराव जाहला आहे. म्हणोन लिहिलें तें पत्र सांपडलें त्याची नक्कल.

१ दोनी नकला पाठविल्या आहेत.

नं. ५०१७ श्री. ( जेष्ठ व० १३–१ जुलै )

छ० २६ मोहरम. सन मय्या तैन. ज्येष्ठ.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री नागोपंत आपा यांजकडील एक दोन

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. हें नारोपंत करंदीकरानें लिहिलें.
२ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र महाराजांच्या लष्करांतून करंदीकर नारोपंत याचें.

गांवास उपद्रव जाला म्हणोन श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांसीं रुसवा केला आहे. एक दोन वेळां पत्रें आलीं परंतु ( भाऊंच्या ) लष्करास गेले नाहींत. नेरलीस उभयतां आहेत. येथें त्यांजकडील कारकून आहे त्यास इकडील बोलणें बोलावया अर्थी "नागोपंतास शिरगावांस घेऊन येणें. बच्याजीपंतास पाठवून दिलें, हुजुरच्या ठायीं लक्ष असावें," म्हणोन कारकुनास दोन चार वेळां हेलपाटे दिले. शिरगांवास यावें असें ठरलें. आणखी इकडील कुमक आपणास व्हावी असा शोध कारकून करीत होता. कारण भाऊसाहेबांचें आपलें वैषम्य आलें यास्तव कुमक व्हावी असा बेत करीत होता. येथें कुमक टिपूस देखील भाषणानें करणार! परंतु फौज जाऊन कुमक व्हावी हा योग घडावयाचा नाहीं. वचनाची मात्र समृद्धि! तेव्हां संशय प्राप्त जाहला कीं, चिकोडीकर गृहस्थ सुदामत नव्हत. खटलेखोर आणि तिकडील फौजेस वगैरे माहीत आहेत. इकडील कुमकेचा शोध करितात. विरूपाक्षपंत व नागोपंत उभयतां नेरलीस आले तेव्हां हा मजकूर खरा किंवा मायावी याचा निश्चय न होय. सबब तिकडेही सूचना लिहिली व सेवेसींही मजकूर लिहिला आहे. सत्य असो अथवा मिथ्या असो. परंतु आढळलेला मजकूर लिहिला आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०१८ श्री. ( ज्येष्ठ व० १३–१ जुलै. )

छ० २६ मोहरम. सन मय्या तैन. ज्येष्ठ.

[1]सेवेशीं विज्ञापना. राजश्री बळवंतराव खांडेकर यांच्या सांगण्यांत कीं, तीन लक्षांचा मुलूख महाराजांस द्यावयाचा करार ठरला आहे. त्यास श्रीमंतांकडून व नानांकडून फेर नाहीं. महाराजांकडून मान्यता पडत असिल्यास मग कराराप्रमाणें × × करून देतों आणि परशुरामपंत भाऊकडील बंदोबस्त पुण्याहूनच करितों. असें खचित आहे. परंतु येथें दिक्कत घेतात कीं, परशुरामपंत या गोष्टीस मानितात असा निश्चय नाहीं. येविशींची बळवंतराव यांचे सांगण्यावरून महाराजांची खातरजमा होत नाहीं. असा मजकूर खांडेकर यांचे सागण्यांत आहे. यांत खरें खोटें काय असेल तें असो ! येविशींची माहितगारी राजश्री बाबा काळे यांस असेल. कळावें हे विज्ञापना.

---

१ नागोशामजी वगैरे बंधु. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र करंदीकराचें महाराजांच्या लष्करांतून.

नं. ५०१९ श्री. (आषाढ शुद्ध. २–५ जुलै.)

पै॥ छ. ३ सफर. मय्यातैन.

चिरंजीव राजश्री जनार्दनपंत पेठे यांसीं प्रती गणेशराम पेठे आशीर्वाद उपरी. येथील क्षेम ता॥ छ० १ सफरपावेतों मुक्काम चिकोडी येथें सुखरूप असों. विशेष. तुम्हीं पत्रें जोतीबरोबर पाठविलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. इकडील मजकूर अधिकोत्तर नाहीं. श्री॥ राजश्री बाबासाहेब व दाजीसाहेब फौजसुद्धां मनोळीस जावयाचा बेत आहे. आजच कूच होईलसें वाटतें. भाऊसाहेब व आप्पासाहेब चिकोडीप्रांतांत राहतात याप्रमाणें वर्तमान आहे. पर्जन्याचे दिवस.विपत्य बहुत आहेत.परंतु चाकरीचे नडतें,उपाय काय आहे ? हल्लीं लिंबाजी गाडीवान याजबरोबर चंदनाचीं खोडें दोन पाठविलीं आहेत. घेऊन पावलियाचें उत्तर पाठवावें. मिरजेस मीच येणार होतों त्यास चाकरी तिकडेस आली तेव्हां येणें तूर्त घडत नाही. वरकड मजकूर मागाहून लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ५०२० श्री. (आषाढ शु० ६–८ जुलै.)

पै॥ छ० ५ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. आषाढ.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांच्या स्त्रीस समाधान नाहीं. राजश्री राजाज्ञा मंदवारीं उत्तर रात्रीस निघोन करवीरास गेले. ते आले नंतर महाराजही फौज बारवाडावरच ठेऊन सडे समाचारास जाणार. एक दोन दिवस राहून मागती येणार असें आहे. स्वारी हुजूरची करवीरास जाल्यास मी समागमें जाईन. आज इंदुवारीं अथवा भौमवारीं जातील असें आहे.कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. आज इंदुवारीं स्वारी हुजूरची करवीरास जात आहे. मी स्वारीबरोबर जातों. कळावें हे विज्ञापना.

नं. ५०२१ श्री. (आषाढ शु० ८–१० जुलै.)

पै॥ छ० ६ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. आषाढ मास.

सेवेशीं विज्ञापना. महाराजांची स्वारी करवीरास जावयाचा बेत होता परंतु तूर्त महकूब झाली. गेल्यास सेवेशीं लिहून पाठवीन. सामानगडाकडे फौज रवाना करावयाचा बेत करीत आहेत. राजश्री राजाज्ञा करवीराहून अद्याप आले नाहींत. आणखी एक दोन रोज राहणार. महाराजांचे स्त्रीस समाधान जाहल्यावर येणार. काल राजश्री नारोपंत चक्रदेव व वामनराव गोखले यांचीं पत्रें पुण्याहून राजश्री रघुनाथराव माने यांजकडे आलीं त्यांतील मजकूर गोखले याणीं लिहिलें आहे कीं, भाऊसाहेबास पत्रें श्रीमंतांचीं व हुजरे व

---

१ पत्र नारोपंत करंदीकर याचें. २ पत्रावरील मिती व तारीख पैवस्तीची पत्र करंदीकराचें.

कारकून महाराजांकडील तालुकेस उपद्रव करूं नये येविशीं नेमून घेऊन सत्वरच येतों म्हणोन लिहिलें आहे. खांडेकर यांणीं पत्रें पुण्यास पाठविलीं त्यांचीं उत्तरें शंकर जोशी व चक्रदेव व बजाबा शिराळेकर यांचे पत्रांचीं उत्तरें आलीं. श्रीमंतांचे पत्राचें व नानांचे पत्रांचीं उत्तरें आलीं नाहींत. मागाहून उत्तरें घेऊन पाठवितों म्हणोन लिहिलें आहे. ठराव झाला आहे तो खाचित आहे म्हणोन लिहिलें आहे. राजश्री राघोपंत फरासखाने याजकडील कारकून पुण्याहून भाऊसाहेबांकडे येणार असें आहे. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०२२ (११ जुलै.१)

मोरो आपाजी परांजपे यांचें खटावाहून पत्र मिरजेस बाळासाहेबांस आषाढ शु॥ ९ गुरुवारचें.

" ( बायांच्या ) सैन्यांत कांहीं एक ताल नाहीं. पठाणानीं रोखा वांईस केला आहे. राजश्री राजाज्ञापत्र राजश्री हैबतराव शंकर यांस कोरेगावचे मुक्कामी आणिलें आहे. त्यांस मोठी निकड लाविली आहे. चार लक्ष रुपये मागतात. वांईचा पळ झाडून झाला. मोठा अनर्थ आरंभिला आहे. बायांच आज्ञेंत परिछिन्न पठाण नाहींत. बारभाई म्हणोन आहेत त्यांचेही गोटांत ताळ नाहीं. तसेंच यशवंतराव शिवाजी मनस्वी वर्तणूक करितात. ईश्वरें सर्व क्षय मांडिला आहे. उभयतां आबा व तात्या येथें आले. राजश्री बाबूराव आंगरेही आहेत. यांणीं जाबसाल ठरावांत बहुतकरून आणिले. पांच चार कलमांचे लढे राहिले आहेत, तेही उरकण्यांत येतील ऐसा सुमार आहे. जाबसाल ठरत आले म्हणजे फौजेचें कच करून पुढें जावें याप्रमाणें ठरलें. सालपें याचे घाटानें उतरोन नीरेच्या पुलाचे रोखें लष्कर गेल्यावर खरें ! पठाणांस पत्रें गेलीं आहेत कीं तहाचा जाबसाल ठरला. प्रांतांत रोखापत्र याउप्पर परिच्छिन्न करूं नये, याप्रमाणें पत्रें गेलीं असतां आइकत नाहीं ! त्यास सर्वांनीं विचार केला आहे कीं, तह होतांच पठाण आइकत नाहीं ऐसें जाहल्यास अगोदर पठाणांचें पारिपत्य करावें. याप्रमाणें अंतर्यामीं मंत्र बाया बक्षीसुद्धां केले आहेत. तह जाहला असें आहे. "

नं. ५०२३ श्री. ( आषाढ शु० ९-११ जुलै. )

छ० १९ सफर. सन मय्या तैन व अलफ. आषाढ.

सेवेशीं विनंती सेवक राघो रामचंद्र दातीर दोनी कर जोडून शिर

१ पत्र बाळासाहेबांस भाऊंच्या लष्करांतून. यांत 'जिकारनामा' आला आहे तो जिवाजी रामचंद्र पोतनीस.

साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० ७ सफरावेतों स्वामींचे आशीर्वादेंकरून मुक्काम लष्करनजीक चिकोडी येथें सुखरूप असों. विशेष. मी स्वामींचा निरोप घेऊन निघालों तो येऊन सुखरूप पावलों. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री चिंतामणराव याणीं आठ दिवस फौज राऊत पांचशें व प्यादे पांचशेंपर्यंत ठेऊन आज दोन तीन दिवस श्रीमंत उभयतां आपासाहेब व बाबासाहेब व दाजीसाहेब वगैरे मुख्य मंडळीसुद्धां खलबतें चालली होतीं व त्यांत जिकारनामही होता. परंतु मसलत बाहेर फुटली नाहीं. तर्‍हां आज रविवारीं मध्यरात्रीस कूच करून निघोन गेले. कोठें गेले हें कांहीं कळत नाहीं. कोणी शहापूर, कोणी तेरदळ, ऐसी बोलवा आहे. याप्रमाणें इकडील वर्तमान आहे. कूच झालें तेच समयीं विनंतीपत्र रवाना केलें आहे. वरकड मजकूर उद्ईक लिहून पाठवितों. रात्रीचा समय, कागद नव्हता, शाई मिळाली नाहीं, व मजकूर गेला असेल. स्वामीनीं राग न करणें. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०२४ श्री. (आषाढ शु० १०–१२ जुलै.)

पै॥ छ ८ सफर. आषाढ मास. सन मय्या तैन व अल्लफ.

विज्ञापना ऐसी जे, राजश्री तात्या व आबा येथें आले. एक महिना झाला. आजपर्यंत कोणताही जाबसाल ठरावांत आला नव्हता. मनस्वी बोलणीं बक्षी व यशवंतराव शिवाजी बोलत होते. कांहीं एक ताळ नाहीं हें पाहून उभयतां रागें भरून उद्ईक कूच करून जातों म्हणून निश्चयांत आणिलें. तुमचें आमचें बोलणें राहिलें म्हणोन बायांकडे सांगून पाठविलें. तेव्हां उभयतांस बायांनीं बोलाविलें आणि स्नेहाच्या गोष्टी सांगितल्या. तह करावा या प्रमाणें बोलण्यांत आलें. नंतर बक्षी व यशवंतराव शिवाजी यांस बायांनीं साफ सांगितलें कीं, राजश्री बाळोबातात्या व आबा चिटणीस उभयतां बहुता दिवसांचे पदरचे. वडिलांपाशीं सेवा चाकरी याणीं केली. हल्लीं उभयतां आले असतां त्यांचें बोलणें ऐकत नाहीं ऐसें म्हणों लागल्यास आणखी कोणाचें बोलणें ऐकावें ? आम्हांस आणखी कोण आहे ? यांचे हातूनच बंदोबस्त करून घ्यावा. याप्रमाणें साफ सांगितलें. तुम्ही ऐकत नसल्यास याउपर आम्हीं कोणाचें ऐकत नाहीं. प्रांत फौजेनें मारिला. दुर्लौकिक आमचे वाट्यांस आला. ईश्वरी इच्छा ! उभयतां कारभारी शहाणे

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र मोरो आपाजी परांजपे यांचें बायांच्या लष्करांतून बाळासाहेबांस. २ महादजी शिंदे याजपाशीं.

प्रामाणिक. हे बंदोबस्त करून देतात तो प्रमाण. याप्रमाणें बक्षी व यशवंत राव शिवाजी यांस सांगितलें. इतरही लहान मोठे होते त्यांसही सांगितल्या वरून सर्वांनीं तह करावा याप्रमाणें ठरलें. आज सहा दिवस झाले. हल्लीं तहाच्या यादी ठरावांत आल्या त्यांतील कलमें ठरलीं येणें प्रमाणें. तपशील—

क

१ अशेरी किल्ला द्यावा.

१ सरंजाम रुपये १०००००० दहा लक्षांचा द्यावा व त्यांत बऱ्हाणपूर जैनाबाद व अशेरी तालुका याशिवाय दहा लक्षांची भरती स्वदेशीं करून द्यावी.

१ बाया रुसोन निघाल्यापासून फौजेचे तलबेचा नालबंदीसुद्धां फडशा करावा. त्याजवरून सांगितलें कीं प्रांताची खराबी करून दक्षणदेश निधांत केला. जे खराबी केली व खंडण्या घेतल्या तो पैका हिसेब समजावणें. तो विचार होत नाहीं त्या अर्थीं पैसा मिळणार नाहीं म्हणोन सांगितलें. त्याप्रमाणें ठरलें.

१ सखाराम घाटगे सर्जेराव यांस दौलतरावबाबा याणीं आपणाजवळ ठेऊं नये याप्रमाणें ठरलें. पाहिजे तर एक दोन गांव बक्षीस द्यावे. त्यानीं तेथें असावें. कलम.

१ पुण्यांत पोहचल्यावर फौजेची तेरीख चालती करावी. गणती घ्यावी. ऐवज चांदवड फौजेस द्यावा. याप्रमाणें कलम.

कित्ता

१ बायांकडे बक्षी व पठाण व मराठे मिळाले यांचे अब्रूस खता होऊं नये. सर्वांस शिंदे यानीं ठेवावें. यास जामीन आबा व राजश्री बाळोबातात्या. कलम.

१ पुण्यास लवकर जावें. तेथें गेल्यानंतर फौजेचा सुमार पाहून दौलतरावबाबा फौज ठेवतील. बाकीच्यांस निरोप होईल त्याणीं जावें. छावणीस फौज बहुत ठेवणार नाहींत. ठेवतील त्याणीं रहावें कलम.

१ आपाजी कदम गिरवीकर यांस गांव सरकारांतून गिरवी इनाम आहे. त्यास सुभानराव कदम आपाजीराव यांचेच भाऊबंद तूर्त काळीं येथें मोठे ढोंग आहेत. त्यानीं निम्मे गांव इनाम मला करून द्यावा म्हणोन आड घातला. त्यावरून सांगितलें कीं, आपाजी कदम यांस इनाम गांव सरकारांतून श्रीमंतांकडून आहे. त्यापैकीं निम्मे तुम्हांस आम्ही देणार कोण ? तुम्हीं शिंदे यांचे चाकर. पुढें एकनिष्ठपणें सेवाचाकरी केल्यानें

१ तात्या व आबा यानीं सांगितलें.

१ बायांकडे खासगत खर्च आज तागायत जाहला आहे. लोकाचें सावकारी देणें कर्ज केलें आहे तो ऐवज द्यावा. उभयतां कारभारी पैसा नाहीं म्हणतात, परंतु कांहीं लाख दोन लाख रुपये द्यावे लागतील. गांवही दौलतरावबाबा देतील. म्हणोन उत्तर झालें. केवळ करारांत आलें नाहीं. परंतु ठरलें. कलम.

१ प्रांतांतील कासारबारीपासून आजपर्यंत ज्या बोली पठाणांकडे व यशवंतराव शिवाजी यांजकडे बाकीचे पैक्याकरितां आहेत त्या सोडाव्या या प्रमाणें ठरलें. कलम.

येणें प्रमाणें कलमें ठरावांत आलीं. आणखी दहा पंधरा कलमें आहेत तीं कळलीं नाहींत. आज उद्यां समजोन घेऊन कळवितों. हे विज्ञापना.

नं. ५०२५ श्री. ( आषाढ शु० १२–१४ जुलै. )

छ० ११ सफर. सन मय्यातैन. आषाढ.

सेवेशीं विज्ञापना. महाराजांचे लष्करांतील पेंढारी भृगुवारीं जाऊन भोजेंत राहिले होते. काल मंदवारीं भोजेंतून गलदगेच्या रानांत जाऊन चार पांचशें पर्यंत गुरें वळलीं. तेव्हां गांवांतील प्यादे व गांवकरी ऐसे मिळोन धांवण निघाले. पेंढारी यांस गांठ घातली. परस्परें लढाई जाहली. उभयतांकडील जायांजखमी दहा पंधरापर्यंत जाहले. दोन घोडीं पेंढारी यांचीं ठार जालीं. गुरें सोडवून घेतलीं. वीस पंचवीसपर्यंत गुरें पुढें हांकून नेलीं तेवढीं मात्र पेंढारी यांचे हातास लागलीं. याप्रमाणें जालें. शिंदेबाया यांचे समजुतीचें बोलणें लागलें आहे. सात लक्षांचा मुलूख बायांस द्यावा. बायांकडील बोलणें पंधरा लक्षांचा प्रांत व एक किल्ला द्यावा येणेप्रमाणें बोलणें आहे. अद्याप समजूत जाहली नाहीं. पागनीस आले आहेत त्यापक्षीं समजूत होईलसें दिसतें. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांचे लष्करांत इकडील बातमीस गेलेला गडी आला त्याणें जबानी वर्तमान सांगितलें कीं, फौजेस निरोप दिला. पांच हजारापर्यंत फौज आहे व पायदळ पांच हजार येणेंप्रमाणें आहे. शरीरेंकरून कसे आहेत म्हणोन महाराजानीं विचारलें. तेव्हां त्याणें सांगितलें कीं, दिशेकडे गेले ते समयीं आपण पाहिलें. शरीरेंकरून ठीक आहेत. याप्रमाणें बातमी आली. राजश्री नागोपंत आपांचें काल पत्र आलें त्यांत वर्तमान लिहिलें होतें कीं, शिलेदारांचा दंगा ( भाऊंच्या लष्करांत ) बहुत पडला होता. हल्लीं तोड

१ पत्र नारोपंत करंदीकर यांचें महाराजांच्या लष्करांतून तसेंच पुढच्या नंबरचें.

निघाली आहे. आतां लौकरच कूच होऊन लाटेच्या अथवा निपाणीच्या सुमारें मुक्काम होणार. असें लिहिलें होतें. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ५०२६ श्री. ( आषाढ शु. १५-१७ जुलै. )

छ० १३ सफर. सन मय्यातैन. आषाढ.

सेवेशीं विज्ञापना. श्री॥ महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्वारी काल भौमवारीं तिसरे प्रहरीं करवीरास गेली. कारण वे॥ शा॥ संपन्न रा॥ राजश्री भटजीबावा नरसीपूरकर हे वर्तमानीं करवीरीं आहेत त्यांचे घरीं बुधवारीं पितृतिथ आहे. भटजीबावांचा सांप्रदाय शिष्यमंडळी आहेत त्यांस भोजनास पितृतिथीचे दिवशीं बोलावितात. महाराजांस आमंत्रण आलें त्यावरून स्वारी करवीरास गेली. मी काल करवीरास गेलों नाहीं. आज प्रातःकाळीं निघोन गेलों. स्वारी दोन तीन रोजांत माघारी लष्करास येणार. राजाज्ञा व जोशीराव व हिम्मतबहाद्दर वगैरे कोणी समागमें गेले नाहींत. लष्करांतच राहिले. कळावें. स्वारी सडी गेली. कळावें. राजश्री बळवंतराव खांडेकर यांचीं पत्रें पुण्यास गेलीं होतीं त्यांचीं उत्तरें काल भौमवारीं आलीं. त्यांत कांहीं उत्कर्ष नाहीं. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांस ताकीदपत्रें पुण्याहून परभारें जावीं म्हणोन लिहिलें होतें तेंही घडलें नाहीं. मागाहून पाठवितों असें उत्तरांत आहे. तेव्हां खांडेकर यांच्या वकिलींत जीव नाहीं असा अर्थ दिसोन आला. बायांकडील पठाणानीं वांईस उपद्रव केला. श्री॥ राजश्री पंत राजाज्ञा यांस धरून नेऊन दोन लाख रुपये मागतात, अशी बोलवा आहे. सत्य असत्य काय असेल तें असो. तिकडील लष्करचें कूच अद्याप नाहीं. मुक्काम आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०२७ श्रीगणपति. ( १८ जुलै. )

पै॥ छ०१२ सफर. शुक्रवार. सन मय्या तैन अल्लफ. आषाढ मास.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत आषाढ वद्य २ गुरुवारपर्यंत यथास्थित असों. विशेष. चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा यांचा रंग वडिलांपासून निभून जावें. पुढें ईश्वर बुद्धि देईल ती वाट पहावी. कारण आपणाकडून उलगडा लौकर होऊन येत नाहीं. त्याजवरून वडिलांस विनंती केली जे, तीर्थस्वरूप राजश्री काकासाहेब वडिलांचे आज्ञेखेरीज नाहीं. श्रीचे उत्सावास वडिलांचें जाणें होईल. न झाल्यास काकासाहेबच येतील. थोर दौलतीचें काम. रुबरू झाल्यावांचून तुटणार नाहीं

---

१ प्रत बाळासाहेबांस लष्करांतून.

त्याजवरून आज्ञा केली जे, आमचें जाणें व्हावयाचें नाहीं. ते यावयाचे नाहींत. तेव्हां खटला कसा तुटेल ? मागती विनंती केली जे, ते येतील. त्यास भाद्रपद मासीं ते येतात असें आहे. तर त्याणीं पत्र पाठवावें जे, आम्हीं येतों. आणखी ती॥ मातुश्री काकू व चिरंजीव विठलरावबापू पुण्यास आहेत त्यांस आणावीं. दहा-पांच खेडीं तूर्त मिरज प्रांतचीं द्यावीं. म्हणजे चिरंजीवांस समजून सांगं. त्याजवरून विनंती आपल्यास लिहिली आहे. याचें उत्तर कसें करूं ते आज्ञा करावी. सारांश कसेंही उरकावें हें बरें. वारंवार विनंती लिहिली व सांगूनही पाठविलें. राजश्री विष्णु दीक्षित याजसमागमेंही सांगून पाठविलें तें उत्तर हीं पावलें. या पत्राचें उत्तर लवकर आलें पाहिजे. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना. सांगली आदिकरून मिरज प्रांतचीं व अन्यत्र खेडीं मिळून चार लक्षांचा मुलूख दिल्यास राहतात. नाहींतर जातात. असा आग्रहच दिसतो. उत्तर लौकर आलें पाहिजे. चिठ्यांसुद्धां[1] उत्तर यावें. हे विज्ञापना.

नं. ५०२८ श्री. ( आषाढ व० ३-१९ जुलै. )

छ० १६ सफर. सन मय्यातैन व अल्लफ. आषाढ.

सेवेशीं विज्ञापना. काल गुरुवारीं वे॥ शा॥ संपन्न राजमान्य राजश्री भटजीबावा नरसीपूरकर यांचे घरीं श्राद्ध जालें. हजार बाराशें पात्र ब्राह्मणांचें जालें. मराठे मंडळी अडीचशें तीनशें पर्यंत जाली. सर्व साहित्य श्री॥ महाराज राजश्री छत्रपति याणीं केलें. व भटजीबावा नरसीपूरने करवीरास आलेपासून दररोज दोनशेंचा शिधा सरंजाम देत असतात. वाड्यांतच रहावयास जागा दिली आहे. कळावें. महाराजांची स्वारी लष्करास सत्वरच जाणार आहे. गेल्याचें सेवेशीं लिहून कळवीन. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.[2]

नं. ५०२९ श्रीपांडुरंग. ( आषाढ व० ३-२० जुलै. )

पै॥ छ० १६ सफर. मय्यातैन व अल्लफ.

तीं॥ राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं. अपत्यें भगवंतराव बहिरव दोनी कर जोडून शिरें सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत श्रावण शु॥ १ पर्यंत मुक्काम करकंब यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळाजी कृष्ण दि॥ शिंदे यांचें लष्कर येऊन उपद्रव जाल्याची विनंती पेशजी लिहिलीच होती. त्यांचें[3] उत्तरही वडिलांचें आलें. आम्ही परभारें येथून राजश्री बाळोबातात्या

१ मागितलेल्या मुलखाच्या सोडचिठ्यासुद्धा. २ पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून. ३ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र करकंब महालाच्या मामलेदाराचें.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

पागनीस व नारायणरावजी बक्षी व आंग्रे व शिवाजी बाजी घाटगे यांस पत्रें पाठवून त्यांच्या निक्षूण ताकिदी व जासूद मशारनिल्हे याजकडे पत्रें प्रविष्ट केलीं. त्याचीं उत्तरेंही आलीं त्यांच्या तालका करून वडिलांकडे पाठविल्या आहेत. त्याजकडील स्वांर येऊन आसपास येथून कोशीं दोन कोशीं गुरें मेंढरें नेऊं लागले तेव्हां येथील स्वांर पाठवून पाडून आणिले. दहा बारा घोडे व माणसें आणून ठेविलीं आहेत हीं सोडून द्यावीं व विजापुराकडून माघारे येतांना तिकोटेंकरानीं कांहीं घोडीं पाडून घेतलीं व बाळाजी कृष्ण यांचे आप्तविषयी कोंकणांतून येत असतां धरून नेऊन ठेविले आहेत ते सोडून द्यावे हा भाव पत्रांत आहे; व कारकून पाठवून द्यावा म्हणजे बोलणें होऊन परगण्यांतील वोली वगैरे सोडून देतों हेंही लिहिलें आहे. त्यास आम्ही परभारें पत्र पाठविलें त्याचें उत्तर निखालस आल्यानंतर कारकूनहीं त्याजकडे पाठवितों. परगण्यांतील वोली सुटतात आणि निरोपद्रव होतो असें जाल्यास त्यांनीं तिकोटच्यांतील मुद्दा घातला आहे त्यांची सुटका व्हावी. त्यास तिकोटें हा गांव प्रस्तुत श्री॥ राजश्री रघुनाथरावदादांकडे आहे. वडिलीं दादासाहेबांस पत्र पाठवून येथील वेध सुटतो या अर्थी तेथें गृहस्थ धरून ठेविले आहेत त्यांस सोडवावें व घोडी सोडून द्यावीं. याप्रमाणें घडविलें पाहिजे. तूर्त बाळाजी कृष्ण खासा क्षेत्रानजीक नदी उतरून अलीकडे कूच करून आहेत. बारशीकडे गेलेली फौज माघारी येऊन मोहोळेचे आसपास आहे. पिंपळनेराकडे अलीगोल म्हणून पथकी सात आठशेंपर्यंत जमावानिशीं होता त्याणें वोली धरल्या आहेत. परगण्यांतील पळ गेलेला ठिकाणीं लावून त्याची खंडणी घेतो. काल मुक्काम मौजे परिंते प॥ भोसें येथून तीन कोशांवर उत्तरेस आला आहे. येथें शिबंदी स्वार पन्नास साठ व प्यादे पांच सातशें आहेत यामुळें आले नाहींत. शह लवकर जाईल म्हणोन शिबंदी ठेविली परंतु त्यांचें कूच होत नाहीं. कोशीं दोन कोशीं फिरतात यामुळें वाट बंद. शिबंदीखर्चाखालीं आलों. आजपर्यंत कर्जवाम घेऊन दिलें. पुढें कांहीं एक विचार सुचत नाहीं. महत्संकट प्राप्त जालें आहे. यशवंत शिवाजी फौजसुद्धां अकलुजेनजीक येऊन खंडणी घेत म्हसवडाकडे गेले. तिकडून तेही माघारे येणार ही आवई आहे. श्रावणमास आला तरी पर्जन्याचें दर्शन नाहीं. परगण्याची अवस्था वोस होऊन गेले त्यांचीं घरें जाळतात ! तीन चार गांव जुजवी वस्ती खंडणी देऊन आहे तेथें स्वार जाऊन मनस्वी उपद्रव होतो. याप्रमाणें वर्तमान आहे तेव्हां पुढील लावणी होण्याचा विचार दिसत नाहीं.

यास्तव कागदोपत्रीं अथवा कांहीं फौज पाठवून बंदोबस्त केला पाहिजे. अथवा कोणती आज्ञा करणें ती करावी. वडिलांचा शब्द लागेल यास्तव लिहिलें आहे. आज्ञा येईल तसें करीन. तिकोट्याचा मजकूर वडिलांस सविस्तर लिहिलाच आहे. बाळाजी कृष्ण याणीं इकडे बोलणें लाविलें आणि न जाणो, परभारें तिकोट्याकडे लेहून सुटकेचा विचार केल्यास येथील सवाल जबाब जाल्याशिवाय सुटका होऊं नये हें दादासाहेबांचे पत्रीं सुचवावें व दादांचें पत्रही तिकोट्यास जावें म्हणजे ठीक पडेल. सेवेशीं श्रुत होय. कृपा करावी हे विज्ञापना.

नं. ५०३० श्री. ( आषाढ व०—जुलई. )

तालीक.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री भगवंतराव स्वामींचे सेवेशीं.

पोष्य बाळाजी कृष्ण. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखन करीत जावें. विशेष. तुम्हीं पत्रें कलमबंदीचीं पाठविलीं ते पावलीं. लिहिला मजकूर कळला. तिकोटेकर याणीं माणसें अटकाविले ते व तुम्हांकडे घोडीं माणसें अटकाविलीं ऐसीं दोन्हीकडील सोडून द्यावीं. गांवगन्नाच्या वोली आहेत त्या सोडून देऊं. परभारें गांवचे चार रुपये तुमचे ज्यानीं घेतले आहेत त्यांजकडोन माघारें द्यावयास येतील. सारांश आमचे कारकून व बायका तिकोटेस अटकाविल्या आहेत त्या सोडून द्याव्या म्हणजे वोली सोडून देऊं. आम्हांस पहिलेपासून पटवर्धनकरांचे घराणेंशीं स्नेह. त्यांचेही ममता आम्हांठायीं हें स्वचित जाणून कर्नाटक प्रांतीं गेलों असतां त्यांचे तालुकेस तिलप्राय तोसीस न दिली. सरकारचीं पत्रें जलद येणेंविशीं आलेमुळें निकडीनें येत असतां मागाहून गृहस्थ येत होते त्यांस लुटून ठार करून मारून बंदीस नेलें. त्याजवर आपणही आम्हांकडील शिलेदार रस्त्यानें जात असतां तुमचे गांवीं वस्तीस राहिले तेथें घोडीं घेऊन कैद केले. त्याजवरून एक दोघे पाटील वगैरे तुमचे तालुकेंतील परभारें ( आम्हीं ) नेले असतील. ऐशास तिकोट्याचे गृहस्थांस तुम्ही अटकाविलें त्यांस व स्वार पाठवणें. तुमच्या वोली अगर रुपये ज्यानीं घेतला असेल तो देऊं. आम्ही पटवर्धनकर घराणेंविशीं निखालसपणें वर्तणूक करीत असतां त्यांजकडील कमावीसदारानीं याप्रमाणें करावें कीं काय ? जें केलें तें उत्तम. अतःपर तरी आमचे कारकून व स्वार पाठवावे. तुमचे तालुकेचे पाटील अगर रुपये ज्यानीं आणिला असेल तो जराबाजरा देऊं. त्यांचे

घराणेंविशीं तिलमात्र अंतर करावयाचें नाहीं असा प्रकार असतां त्यांजकडील तालुकेदार व्यर्थ कलह वाढवितात ! विलाज काय ? बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५०३१ श्री. ( २० जुलै. )

पै॥ छ० ११ सफर. सन मय्या तैन अलफ. आषाढ.

अपत्यें केसो सदाशिव काळे सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत आषाढ वद्य ४ मंदवासरपर्यंत यथास्थित असे. विशेष. आपली आज्ञा घेऊन लष्करास आलों. वडिलांची भेटी जाली. सर्व येथील मजकूर पाहिला. त्यास शरीरप्रकृत चांगली जाली. रक्त अंगांत आलें. गुंता नाहीं. कागदपत्रावरी निशाणें सर्व तेच करितात. गुंता नाहीं. पैका मात्र नाहीं या विवंचनेंत पडले आहेत. दीक्षितांचे आशीर्वादेंकरून तेही गोष्ट परमेश्वर घडवील. फौज तिजाई आहे. घरणीं पारणीं याखालीं कांहीं बाकी राहिली नाहीं. वडिलांची मर्जी काईम आहे. गुंता नाहीं. म्हातारपण आहे. समय-विशेषेंकरून येखादे गोष्टीचा विसर पडतो. नाहीं तरी पूर्ववत्प्रमाणें आहे. याउपरी दिक्कत राहिली नाहीं. बोलणें फार नाहीं. उत्तर प्रतिउत्तर यथास्थित आहे. लष्करांतच रहाणार. आपली भेटी जाली असतां सर्वोपरी चांगलें. यांत मर्जीस येईल तसें करावें. आपला नमस्कार प्रविष्ट केला. सर्व खुशाल आहेत हें ( भाऊनीं ) विचारिलें. मुलांचे नमस्कार सांगितले. मर्जी प्रसन्न आहे. याउपरी मागाहून होईल व दिसेल तें सेवेशीं लिहीन. येकसाल चालणी करते समई खासगत विनंती केली होती. मर्जीस येईल तशी आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०३२ श्री. ( आषाढ व० ३–२० जुलई. )

पै॥ छ० १७ सफर. आषाढ मास. सन मय्या तैन व अलफ.

सेवेशीं साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १६ सफर यथास्थित असे. विशेष. सर्व मजकूर निराळे पत्रीं लिहिला आहे व आणखी मजकूर ऐकण्यांत आहे कीं, चार हजार फौज सरंजाम. त्यापैकीं तीन हजार फौज आपणाकडे असावी व एक हजार स्वामींकडे असावी. तीन हजार

---

१ पत्र बाळासाहेबांस लष्करांतून मिरजेस. २ भाऊंच्या लष्करांतून कोणा कारकुनाचें बाळासाहेबांस पत्र यांत वांटणी प्रकरणीं चिंतामणराव अप्पांच्या बोलण्यांतले मुद्दे लिहिले आहेत. याचेंच पुढच्या नंबरचें पत्र आहे त्यांत चिंतामण-रावांचे बेत व लष्करी तयारी यांचें वर्णन आहे.

फौजेचा सरंजाम आपणाकडे असावा. व एक हजार फौजेचा सरंजाम स्वामींकडे असावा. किल्ला स्वामींकडे राहिल्यास एक लक्ष रुपये इकडे द्यावे. अथवा किल्ला इकडे राहिला तरी याणीं एक लक्ष रुपये द्यावे. याप्रमाणें कालच बोलणें झालें. पुढें मजकूर होईल तो समजेल तसा लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. फौजेची गणती हजीरी घ्यावयाची ती राजश्री जिवाजीपंत अण्णा यांचे विद्यमानेंच होती. झाडून कारभार मशारनिल्हेचे विद्यमानें होतो. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५०३३ श्री. ( आषाढ व० ३–२० जुलई. )

पै॥ छ० १७ सफर. आषाढ मास. सन मय्या तैन व अल्लफ.

सेवेशीं साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १६ सफरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील मजकूर पेशजी महादू सुर्वे याजबरोबर लिहिला त्याजवरून विदित जाहला असेल व हल्लीं मजकूर पांचशें स्वारांची हजिरी जाहली. व पायदळ तीनशें पावेतों हजिरी जाहली व आणखी वरचेवर ठेवीतच आहेत. हा सरंजाम करून कोणीकडे जावयाचा सुमार म्हणोन शोध करितां कित्तुराकडे जातात ऐसें बोलतात. परंतु अंतर्यामींचा मजकूर दोन तीन हजार पावेतों फौज ठेऊन शिवाय भाऊसाहेबांकडून दोन हजार सरंजाम घेऊन हुबळी, तडस वगैरे ठाणीं आहेत यांस उपद्रव करावा व मिरज प्रांतींहीं दंगा करावा असा विचार आहे म्हणोन वदंता आहे. व मिरजेंतील शिलेदार यांचें पत्र आलें आहे कीं, तुम्हीं सांगाल त्या विचारांत आम्ही आहों. त्यास ज्या दिवशीं तुम्हीं बोलावूं पाठवाल त्या दिवशीं सामानसुद्धां तुम्हांजवळ हजीर आहों. याप्रमाणें पत्र मोघम समस्त शिलेदार म्हणोन असेंच आलें आहे. या मजकुराचा पत्ता कशावरून म्हणावा तर राजश्री बाळकृष्णपंत बिनीवाले याणीं पत्र समक्ष पाहिलें. त्याणीं आम्हांस सांगितलें त्यावरून आम्हांस कळलें. याप्रमाणें ऐकण्यांत मजकूर आहे. वरकड मजकूर मागाहून समजेल तो सेवेशीं लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०३४ श्री. नक्कल. ( आषाढ व० ४–२१ जुलै. )

चिं॥ राजश्री रामचंद्रपंत आपा यांसीं आशीर्वाद उपरी. आपण पत्र पाठविलें तें पावलें. पत्रीं लिहिलें जे "चि॥ राजश्री चिंतामणराव आपा यांचा रंग वडिलांपासोन निघोन जावयाचा. पुढे ईश्वर बुद्धि देईल ती वाट

१ पत्र बाळासाहेबांचें.

पहावी. कारण आपणाकडून लौकर उलगडा होऊन येत नाहीं. वडिलांत विनंती माझे बालणेंची केली. वडिलांची आज्ञा जाहली जे, आमचें जाणें श्रीचे उत्साहास होत नाहीं. त्यांचें येणें होत नाहीं. तेव्हां भाग कसा तुटतो?" नंतर चि॥ राजश्री विठ्ठलरावबापूस व ती॥ मातुश्री लक्ष्मीबाई वहिनीस आणवावें, दहा पांच स्वेडीं नेमून द्यावीं असें लिहिलें, त्यास पुण्याचा मार्ग चालत नाहीं. बाया शिंदे यांच्या फौजा जागां जागां आहेत. मार्ग मोकळा जाहलेवर आणावयास पाठविणार. "[1]तूर्त चार लक्षांचे तालुक्याच्या चिठ्या व उत्तर जलद यावें, नाहीं तर जातात" म्हणून लिहिलें तें कळलें. ऐसीयासी यंदां चहूंकडे दंगा होऊन तालुक्यांची बाकी राहिली ( नाहीं. ) आजपावेतों पर्जन्य नाहीं. लावणीचें संकट आहे. चार रुपये रसदही अद्याप कोणाकडून घेतली नाहीं. मग उतावळी होऊं नये. वडिलांचे आज्ञेखेरीज माझा प्रकार तिलप्राय नाहीं. वडिलांचा गांठ पडल्यावर समक्ष विनंती करावयाची केली पाहिजे. कागदोपत्रीं लिहेतां येत नाहीं. दौलतींतील स्वालजबाब बारीक मोठे सर्व वडिलांस विनंती करून जशी आज्ञा होईल तशीच वर्तणूक होईल. येविशीं आपली खातरजमा जाहली आहे. आणि खातरजमा राखावी. वडिलांचे सेवेशीं यावें, परंतु शिबंदीचा व फौजेचा पेंच, खर्चाची ओढ यास्तव मात्र अनमान. एरवीं येणेंस गुंता नाहीं. वडिलांचे आज्ञेखेरीज मी नाहीं. त्यापक्षीं चिरंजीवानीं ही उतावळी करूं नये. आपणही समजून सांगावें. लांबणीवर टाकावें असें माझें चित्तीं नाहीं. आपण खातरजमेनें सांगून उतावळी करून आऊं देऊं नये. सर्व प्रकार तुम्ही जाणतच आहां. वडिलांचे आज्ञेशिवाय मी नाहीं येविशीं आपणही वडिलांस विनंती करावी. रवाना छ० १७ सफर रविवार. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ५०३५ श्री. ( आषाढ व० ४–२१ जुलई. )

छ० १८ सफर. आषाढ मास. सन मय्या तैन व अलफ.

सेवेशीं शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १७ सफर पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील मजकूर काल लिहिलाच आहे. कसबे तेरदळ येथें सरंजाम सुद्धां स्वारी जाऊन दंगा करावा असा विचार आहे. आजच अथवा उदईक जावें असा करार आहे. कांहीं सरंजाम श्रीमंत राजश्री भाऊसाहेब बरोबर देणार ऐसी वदंता ऐकण्यांत

---

१ चिंतामणरावांचा येत.

आहे. वरकड मजकूर समजेल तसा सेवेशीं लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०३६ श्री ( आषाढ व० ५–२२ जुलई. )

पै॥ छ० २० सफर. सु॥ सन मय्यातैन व अल्लफ. आषाढमास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं.

सेवक आबाजी रघुनाथ. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता० १८ सफर जाणोन स्वकीय कुशल लिहित गेलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. " राजश्री बाळाजी कृष्ण याणीं आपल्या तालुक्यांत उपद्रव करून गांवचीं गुरें ढोरें व वोली धरून नेल्या आहेत त्या त्यांस ताकीद होऊन वोली व गुरें नेलीं आहेत त्या सोडून देवाव्या व पठाणांनीं मिरज प्रांतींच्या वोली नेल्या आहेत त्या सोडून देवाव्यात. सांप्रत मुक्काम कोठें आहे, कूच कधीं होणार हें लिहावें, " म्हणोन लिहिलें, ऐसियास बाळाजी कृष्ण यांस श्रीमंत मातुश्रीकडून इकडे येण्याविशीं पत्रें गेलींच आहेत. इकडे लौकरच येतील. वोली व गुरें नेलीं आहेत त्याविशीं ताकीद करावयास येईल. पठाणांनीं वोली ठेविल्या आहेत त्याविशीं राजश्री नारायणराव बक्षी यांस सांगितलें आहे. सांप्रत मुक्काम किनईजवळ आहे. एका दोहों दिवशीं कूच होऊन सालप्याच्या घाटानें पुलावरून जाणें होईल. समेटाचा जाबसाल निश्चयांत आला आहे. याउपरी येथून कूच लौकरच व्हावें असें आहे. राजश्री भाऊंकडील व करवीरकर राजश्रींकडील मजकूर लिहिला तो कळला. सदैव पत्र पाठवून संतोषवीत जावें. बहुत काय लिहिणें लोभ करीत असावें हे विनंती.

नं. ५०३७ श्रीगणपति. ( आषाढ व० ६–२३ जुलै. )

चि॥ राजश्री बळवंतराव यांस प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद उपरी. चि॥ राजश्री चिंतामणराव आपा तिकडे यावयाकरितां येथून निरोप घेऊन गोटाबाहेर जाऊन उतरले आहेत. आपणांस कळावें याकरितां लिहिलें असें. रवाना छ० १९ सफर बहुत काय लिहिणें. लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ५०३८ श्री. ( आषाढ व० ६–२३ जुलई. )

पै॥ छ० २५ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. आषाढ मास.

सेवेशीं बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १९ सफरपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष.

---

१ शिंद्यांचे कारभारी आबा चिटणीस यांचें पत्र.

स्वामींनीं छ० ७ सफरचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. पेशजी स्वामींनीं मिरजेच्या देशमुखीविशीं पत्र श्रीमंतांस लिहिलें होतें तें प्रविष्ट केलें. श्रीमंत राजश्री नानांजवळ एकदोन बैठका जाहल्या. नानांचें अंतःकरण स्वच्छ परंतु श्रीमंतांची मर्जी ! "सनदा तयार झाल्या होत्या त्या युक्तीनेंच राहविल्या होत्या. शिक्के होऊन गेल्या हा मजकूर आपणांस ठाऊक नाहीं. तुम्हीं श्रीमंतांस विनंती करणें." म्हणोन सांगितलें. त्याजवरून एक दोन वेळां विनंती करून पाहिली. परंतु उत्तर जाहलें नाहीं. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबीं येविशीं दोन वेळां पत्रें पाठविलीं होतीं तींही प्रविष्ट केलीं. परंतु मर्जी ! सनदा मना न होत. तेव्हां छ० १७ सफरीं बोलणें येविशींचें बहुत जाहलें. विनंती ही सक्त केली जे, सरकारच्या सनदा गेल्या असतां देशमुखीची जप्ती होते असा अर्थ नाहीं. घोरपडे सरकारचे आप्त. बहुत दिवस त्यांजकडे वतन चालतें. आम्हांकडे वतनाचें संरक्षण करावें या प्रमाणें सरकारची आज्ञा पूर्वापार आहेच, म्हणोन विनंती करावयाचें कारण. त्यास सरकारच्या सनदा गेल्या त्या अमान्य होतील. मग स्वामींची मर्जी रुष्ट होईल. यास्तव वारंवार विनंती करतों. त्याजवरी उत्तर जाहलें, घोरपड्यांजवळ पत्रें आहेत त्यांच्या नकला आणून दाखवणें म्हणोन. त्याजवरून जाहल्या वर्तमानाचा तपशील-वार मजकूर लिहिला आहे. पुढची आज्ञा येईल त्याप्रमाणें विनंती करावयाची. आजपर्यंत पत्र स्वामींस लिहिलें नाहीं म्हणोन पत्रीं दर्शविलें, त्यास ही तो मोठीच गोष्ट सेवकाकडून गेली. इतःपर वरचेवरी आज्ञेप्रमाणें पत्र राजश्री धोंडोपंत जोशी व मोरोपंत परांजपे यांजपाशीं देतों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०३९ ( आषाढ व० ७–२४ जुलै )

वकील मोरो आपाजी परांजपे याचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र. रवाना छ० २० सफरचें—

"श्रीमंत राजश्री नानांची शरीरप्रकृत तूर्त चांगली आहे. श्रीमंत राजश्री अमृतराव कारभारामध्यें आहेत. राजश्री नारोपंत चक्रदेव सर्व अखत्यारी आहेत. त्यांजखेरीज कांहीं एक कारभार होत नाहीं. श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांची फार करून कोणाची गांठ पडत नाहीं."

नं. ५०४० श्रीगणपति. ( २४ जुलई. )

पै॥ छ० २१ सफर. आषाढ मास. सन मया नैन व अलफ

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत आषाढ वद्य ७ बुधवारपावेतों सुखरूप असों. विशेष. वडिलीं तीन पत्रें पाठविलीं ते पावलीं. वडिलांस विनंती केली. पत्रें ही सारा दाखविलीं. चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा वडिलांबरोबर रुसोन रविवारीं आज्ञा घेऊन निघोन मजकडे आले. मी रात्रौ चार दिवस धरण्यामुळें वडिलांजवळ होतों. 'जातों. कृपा असूं द्या.' म्हणाले. मी सांगितलें, 'पत्र मिरजेस गेलें. वडील आज्ञा करतील तशी वतणूक करावी. तीर्थस्वरूप राजश्री काका राजी असतां उतावळी चांगली नव्हे' म्हणोन बहुता प्रकारें सांगितलें, परंतु विचारास न आलें. निघून गेले. दुसरे दिवशीं त्यांचे डेऱ्याकडे जावें तर आम्हांभोंवतें धरणें. दीर्घशंकेस जावयाचें देखील नाहीं, स्नान नाहीं, तीन दिवस भोजन नाहीं, अशी गत! त्याजमुळें जाणें झालें नाहीं. आज जावें तर पत्र आलेलें त्यांजकडे पाठविलें. त्याणीं पाहून माघारें पाठविलें. सारांश चिरंजीव निघून गेले. सेवेशीं विदित होय. मला अगर चिरंजीव राजश्री बाबा यांस येणेंविशीं लिहिलें, त्यास येथें फौजेचा दंगा. भोजनास ही ठिकाण नाहीं. तेव्हां मिरजेस येणें कोठील! हुपरीकरराव[1] आले, परंतु कार्यावर पडले नाहींत. त्यांचा अलीकडील ऋणानुबंध विदितच आहे. यांत समजावें. ईश्वर इच्छा प्रमाण होय. हे विज्ञापना.

नं. ५०४१ श्री. (आषाढ व० ९–२६ जुलै.)

छ० २७ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. आषाढ.

सेवेशीं विज्ञापना ऐसी जे, घरकलहाचा विचार श्रीमंत रा॥ नानांस सांगितला कीं, "श्रीमंत रा॥ चिंतामणराव आपा श्रीमंत रा॥ भाऊसाहेब यांजपाशीं आहेत. अलीकडे सहा महिने त्यांनीं बखेडे मांडिले. महालांवर परभार रोखे करून स्वार पाठवून उपद्रव केला. विभागाचा फडशा लौकर करून द्यावा म्हणतात. कै॥ रावसाहेब याची स्त्री त्यांचे विचारास मिळाली आहे. वल्गना नाना प्रकारें करितात. महालांस उपद्रव केला तेव्हां श्रीमंत रा॥ भाऊसाहेब यांस दोन चार वेळां चिरंजीवांस ताकीद करावी म्हणोन लिहिलें होतें. ते समयीं वडिलांची प्रकृत दुखण्यानें चांगली नव्हती. फौजेचे देणेंचे पेंचानें व शरीरप्रकृतीनें मर्जी कठीण. रा॥ आप्पासाहेब यांस ताकीद जाली नाहीं. जिवाजी रामचंद्र यास आपण कैद करून किल्यावर ठेविलें

---

१ हुपरीकर सावकार यांनीं कर्ज देऊन आम्हांस अडचणींतून सोडवावें तें केलें नाहीं. २ पत्र बाळासाहेबांस वकील मोरो आपाजी परांजपे याचें पुण्याहून.

होतें. नंतर रा॥ यशवंतराव घोरपडे यांचे रजबजलीवरून मुक्त केलें. ते समयींची आपली आज्ञा त्यांस होती कीं, पुण्यास असावें. कोठें जाऊं नये. बखेडे करूं नये. याप्रमाणें होती. ऐसे असतां पुण्याहून निघोन गेले. तूर्त रा॥ चिंतामणराव आपा यांजपाशीं कारभार तेच करितात. केसोपंत काळे यांचे माऊसबंधु जिवाजीपंत बाबा काळे केसोपंतांचे पुतणे. रा॥ निळोपंत पोंक्षे जिवाजीपंतांचे व्याही. लिहिल्याप्रमाणें ते सर्व एकच आहेत. अलीकडे रा॥ चिंतोपंत लिमयेही गेले आहेत. हल्लीं श्रीमंत रा॥ रामचंद्रपंत आपा यांचीं एक दोन पत्रें आलीं कीं अलीकडे रा॥ चिंतामणराव आपा आपले फडशाकारितां वडिलांजवळ वारंवार विनंती करितात. त्याजवरून वडिलांनीं लिहावयास सांगितलें आहे कीं, लौकर फडशा करावा. त्याजवरून श्रीमंत रा॥ भाऊसाहेब यांस मिरजेहून पत्रें लिहिलीं आहेत कीं, वडिलांची माझी गांठ पडिल्याविना फडशा कसा होईल. घरकुत्याचा प्रकार. लौकिक होऊं नये. चार जाबसाल तोडजोडीचे बोलिले पाहिजेत ते वडिलांजवळ बोलावयाचे. त्यास तूर्त मी इकडे यावें तरी फौजेचे देण्यांची निकड. भले लोक जाऊं देणार नाहींत. तसाच किल्ल्याकडील शिबंदीचा गवगवा आहे. गडबडीचे दिवस. सरकारचा नामी ठिकाणा. प्रसंगानुरूप येतां नये. वडिलांची माझी गांठ पडल्यानंतर सर्व विचार होईल म्हणून लिहिलें आहे. तिकडील उत्तरें काय येतील तीं कळविता. श्रीमंत रा॥ नानांस सर्व मजकूर श्रुत करावा. भाऊ व नाना एकच आहेत. परंतु तिकडून बोलणीं कोणते तऱ्हेचीं होतात कळलीं नाहीं. चिरंजीवांनीं तो मोठी गडबड मांडिली आहे. श्रीमंत रा॥ नानांस विनंती करून उत्तर होईल तें लिहोन पाठविणें" म्हणून सांगितलें आहे. त्यास आज्ञा काय ? त्यावरून उत्तर सांगितलें कीं, तुम्हांविशीं तूर्त प्रसंगीं भाऊंचा चांगलेपणा नाहीं हें ऐकितों. मागें भाऊ येथें होते तेव्हां रा॥ गंगाधरराव यांजविशीं घरोब्याचें बोलणें बोलत होते. चिंतामणराव यांजकडे त्यांचें अंग नव्हतें. हल्लीं चलबिचल दिसते. असो. याचा विचार करून सांगतों. त्यांचें बोलणें तरी काय आहे ? त्यावरून उत्तर केलें, कीं, "निमेपेक्षां हजार पांचशें स्वार जाजती आम्ही ठेवावे. त्याचा सरंजाम जाजती व चौघडा निशाण आम्हांजवळ असावें. आम्हांस वाडा राहावयास पाहिजे. त्यास दोन लाख रुपये रोख द्यावे" हीं बोलणीं बोलतात. आणखी अनेक प्रकारचीं बोलणीं बोलतात. त्यास श्रीमंत बाळासाहेब यांचा विचार आपणाशिवाय तिळमात्र नाहीं. आपला स्नेह हेच जोड. आपणांस श्रुत असावें. पुढें तिकडे जो विचार होईल

तो मला आज्ञा येईल. विनंती करितों. 'उत्तम आहे. विचार करून सांगतों' म्हणोन सांगितलें आहे. दोनचार दिवसांत फिरोन एकदोन वेळां युक्तीनें विनंती करून उत्तर होईल तें मागाहून विनंतीपत्रीं लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४२ श्री. ( आषाढ व० ९–२६ जुलै. )

छ० २७ सफर. सन मय्या तैन व अलफ. आषाढ.

सेवेशीं मोरो आप्पाजी परांजपे सा॥ नमस्कार विज्ञापना ऐसीजे, श्रीमंत रा॥ नानांस "बाया शिंदे यांणीं मिरज प्रांताची खराबी केली. गांव जाळिले, लुटिले. पुढें प्रांताची लावणी होणें कठीण. चार वर्षें एकसारखी फौज ठेविली आहे. तसाच किल्ल्याचे शिवबंदीचा वगैरे पेंच. करकंब, मंगळवेढे बरडोल हे महालांची गत जाहली ते श्रुतच आहे. कर्णाटकांतील महालांची खराबी करवीरवासी महाराजांनीं केली. असो. ते कर्जाची गांठ आजपावेतों जाली. पुढें पैसा कर्जही मिळत नाहीं. पांच सात लक्ष रुपये फौजेचें नालबंदी व रोजमरे देणें. लोकांनीं निकड केली आहे. लज्जा ईश्वरें रक्षावी. सर्व जोड आपला स्नेह." याप्रमाणें विनंती करावी म्हणोन आज्ञा जाली आहे. त्यावरून उत्तर जालें, कीं, "तुम्ही सांगतां सर्व मला कळलें आहे. परंतु तूर्त कालीं सर्वांची गत काय चालली आहे हें पहातच आहां ! आजपावेतों तुमचे सरंजामाचे महालास वगैरे उपद्रव लागला नव्हता. इकडे तो हाच प्रकार जाहला आहे. असो. श्रीसत्ता प्रमाण !" म्हणोन उत्तर केलें. फौजेचा खर्च भारी. अद्यापवत् फौज आहे. प्रसंग एक तऱ्हेचा, दूर करितां येत नाहीं, म्हणोन बोलिलों. श्रीमंतांजवळ बोलोन फौज दूर करावी न करावी हें सांगतों म्हणोन बोलिले. श्रीमंत राजश्री रघुनाथराव दादा यांणीं नानांस साष्टांग नमस्कार सांगावा म्हणोन येते समई सांगितलें होतें. नमस्कार साष्टांग सांगितला. दादा कोठें आहेत म्हणून पुसिलें. 'कुरुंदवाडास आहेत. बाया शिंदे मिरज प्रांतांत आलीं ते समयीं मिरजेस आले होते. फौजही आली होती. इकडे बाया आल्यानंतर कुरुंदवाडास गेले;' म्हणोन विनंती केली. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४३ श्री. ( २६ जुलै. )

छ० २७ सफर. सन मय्या तैन व अलफ. आषाढ.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी व मोरो आप्पाजी परांजपे शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत आषाढ व॥ ९ पावेतों सेवकाचें वर्तमान यथा

स्थित असे. पेशजी केशर पाठविलें आहे. पावलें असेल. येथें पुण्यांत केशर नाहीं. आहे तें चांगलें नाहीं. आणि मनस्वी दर नव्वद, पंचाण्णव, शंभर म्हणतात. आणि ठीक नाहीं. जिनसांची याद अलाहिदा पाठविली आहे. बायांचा मुक्काम निरेच्या पुलावर रा॥ गोपालराव भाऊ यांचे नजीक आला. पठाण जेउरावर आहे. कोणी म्हणतात कीं सालपेंचा घाट उतरून खालीं आले. असें लोक बोलतात. रा॥ यशवंतराव होळकर, मल्हारराव होळकर याजला मारिलें तेव्हां पळून गेला. त्यानें तिकडे जमाव चाळीस हजार फौज जमा केली आहे. उज्जनची खंडणी घेतली. चाळीस पन्नास तोफ समागमें आहे. सामान भारी पोक्त त्याणें जमाविलें आहे असें बोलतात. रा॥ काशीबा होळकर याणें सरकारांत व नानांकडे बोलणें लाविलें कीं मल्हारजीचा लेक पुण्यांत आहे तो माझे स्वाधीन करणें. मलाही पुत्र नाहीं. दौलत आहे ती त्याची. ऐशी अनेक प्रकारचीं बोलणीं लाविलीं आहेत. सरकारांतून व नानांचे चित्तांत काशीबा व मल्हारजीचा लेक यांचा बंदोबस्त करोन पुत्र काशीबाचे वोटींत घालावा हा विचार आहे अशी बोलवा आहे. उंटावरून जिन्नस पाठविला आहे. पावला असेल. किल्ल्याकडील लोकांस व पागेकडे वगैरे खर्चास दिल्हें आहे त्याचा तपशील पेशजी लिहिला आहे तो ऐवज जिकडील तिकडून खर्ची उगवून खाजगीकडे जमा करावयाची आज्ञा करावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४४ श्री. ( आषाढ व० ९–२६ जुलै. )

पै॥ छ० ३७ सफर. सन मय्या तैन व अल्लफ.

विज्ञापना. श्रीमंत राजश्री नानांस विनंती केली कीं, 'आपणांस पुण्यास येऊन एक वर्ष होत आलें. श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचें व श्रीमंत राजश्री रावसाहेब यांचें आपलें चित्त मिळालें किंवा किलाफ राहिला आहे ?' त्यावरून बोलिले कीं, 'यांचें आमचें चित्त या जन्मामध्यें मिळावयाचें नाहीं ! लौकिकार्थ बहुता तऱ्हेनें गोड भाषण बोलतात. परंतु चित्तांत भाव कुटिल. रंगामौजी बोलणीं बोलतात.' 'राजश्री बाळोबातात्या आले. आपलें त्यांचें कसें आहे. एक विचार आहे कीं त्यांचे चित्तांत प्रशस्त नाहीं ?' याप्रमाणें पुसिले नंतर उत्तर केलें कीं, 'त्यांचें बोलणें आम्हांकडे आलें होतें जे, आजपर्यंत परस्परें ज्या गोष्टी झाल्या त्या उत्तम. याउपरी आपला स्नेह असावा. त्यावरून आम्हींही सांगितलें कीं, उत्तम आहे. तुमचा आमचा विचार एक व्हावा. कोणी कोणास अंतर देऊं नये. परंतु हा विचार राजश्री परशुरामपंतभाऊ

यांचे विद्यमानें व्हावा. याप्रमाणें सांगितलें. हा मजकूर राजश्री बाबा काळे यांजपाशीं बोलिलों होतों. मिरजेस कांहीं बोलिले किंवा नाहीं न कळे. तुम्हीं कशावरून पुसिलें ? बाळोबाकडून आलां, त्यांचे बोलण्यांत अर्थ आला कीं काय ?' त्यावरून ते कांहीं हा मजकूर मजपाशीं बोलिले नाहीं व श्रीमंत राजश्री बाळासाहेब यांणींही कांहीं सांगितलें नाहीं. मीच विनंती केली. (असें बोललों) उत्तम आहे. याप्रमाणें मिरजेस लिहिणें म्हणोन सांगितलें. त्यावरून विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४५ श्री. ( श्रावण व० ९–२६ जुलै. )

पै॥ छ० २७ सफर. सन मय्या तैन व अल्लफ.

विज्ञापना. श्रीमंत राजश्री नानांची गांठ पडिलेनंतर बोलिले का, "बरे लौकर आलां ! एक दोन वेळां तुम्हीं लौकर इकडे यावें म्हणून बाळकृष्णपंताकडून लिहविलें असतां आलां नाहीं. परशुरामपंतभाऊ यांजकडे शिक्के कटार वगैरे रवाना केली. धारवाडचे किल्ल्याच्या सनदा दिल्या. या तुमच्या इतल्यानें व्हाव्या ऐसें चित्तांत होतें. येथें राजश्री बाबा काळे बोलणें बोलूं लागले. फौज तुंगभद्रापार लौकर व्हावी हा विचार चित्तांत आणून मग सनदा वगैरे दिल्या. असोत. पट्टणाकडील जाबसालही उरकला. इंग्रज प्रबळ झाले. कलकत्तेपावेतों त्यांचा प्रांत झाला. सरकारांत तूर्त हाच विचार पडला आहे. टिपूचें संस्थान गर्द झालें हें सरकारचे दौलतीस चांगलें नाहीं ! होणार चुकत नाहीं." म्हणोन बोलिले. नंतर पुढें विचार सरकारांत काय आणला आहे ( असें मी बोललों ) त्यावरून बोलिले कीं, "येथेंच बैदा पडला आहे. कोणाचा भरंवसा कोणास येत नाहीं. या प्रकारचें वर्तमान आहे. शिंद्याचे घरचा बैदा मोडत नाहीं शिंदे कूच करून गेल्याखेरीज कांहीं एक विचार होत नाहीं." ऐसें बोलिले सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४६ श्री. ( आषाढ व० ९–२६ जुलई. )

तालीक.

चिरंजीव राजश्री हरिपंतबाबा यांसीं आशीर्वाद उपरी.

आपणांस पत्र विस्तारें लिहिलें जे चिरंजीव राजश्री रामचंद्रपंतआप अथवा आपण यावें. वडिलांस विनंती करावयाची ते आपणास श्रुत करूं आपण वडिलांस विनंती करावी. जशी आज्ञा वडिलांची होईल तशी वर्ते

---

१ वकील मोरो आपाजी परांजपे याचें पत्र.

णूक होईल. त्याचें उत्तर आपलें आलें तें काल पावलें. हांशील आग्रहानें चिरंजीव राजश्री चिंतामणरावआपा निघोन गेले. बाणाचे खाचेवर आहेत. येणेंविशीं लिहिलें, त्यास वडिलांचीं आज्ञा पाहिजे असें लिहिलें, त्यास आपण प्रसंगीं असोन चिरंजीव गेले येणेंकरून लौकिक कसा होतो हें जाणत आहां. वडिलांची आज्ञा घेऊन चिरंजीव राजश्री आपा अथवा आपण यावें. तुम्हांजवळ सांगतों ही विनंती वडिलांस करावी. आज्ञेप्रमाणें वर्तणूक होईल. श्रीनें वडिलांस आरोग्य दिवसेंदिवस करून हे दिवस पाहिले. पुढें कृपा करणार श्रीगजाननच आहे. समजून विनंती केली नाहीं. चिरंजीवास कसें जाऊं दिलें हा शद्ब तम्हांस वडीलच ठेवतील. दुर्लौकिक व्हावा हें चांगलें नाहीं. सर्व अर्थ तुम्हीं जाणतच आहां. उभयतांतून आज्ञा घेऊन एकानें यावें. चिरंजीवास समजून सांगावें हें उत्तम आहे. छ० २२ सफर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

नं. ५०४७ श्री. ( आषाढ व० १०–२७ जुलै. )

छ० २७ सफर. सन मय्यातैन. आषाढ.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेशराम शिरसा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २३ सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा यांचें काल दोन प्रहरा कूच होऊन रायबागेच्या सुमारास गेले. समागमें सरंजाम पांचशें स्वार व तीन साडेतीनशें पायदळपावेतों आहे. आणखी वरचेवर ठेवीतच आहेत. तेरदळाकडे जावयाचा रोख आहे, ऐसी वदंता आहे. कोणी म्हणतात कीं मंगळवेढें इकडे जातात. याप्रमाणें म्हणतात. तेरदळकर देसाई व राजश्री जिवाजीपंत अण्णा यांची तेरदळाविशीं घालमेल आहे असें दिसतें. यास्तव त्या रोखास कूच होऊन स्वारी गेली. याप्रमाणें मजकूर. देसाई व मशारनिल्हे यांचें मत एक आहे असें दिसण्यांत येतें. मजकूर समजला तो लिहिला आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४८ श्री. ( अषाढ व० ११–२८ जुलई. )

सेवेशीं विज्ञापना. काल गुरुवारीं श्री॥ राजश्री पंतप्रतिनिधि यांची समजूत केली. वस्त्रें व शिरपेंच व सामानगड तालुक्यांत गांव हेबळ व नेसरी

---

१ पत्र बाळासाहेबांस भाऊंच्या लष्करांतून. २ पत्र नारोपंत करंदीकर यांचें करवीराहून.

वगैरे चार गांव दिले व भिकबाळी दिली व कटार येणेंप्रमाणें दिलें. सदरहू अन्वयेंच श्री॥ राजश्री पंत अमात्य यांची समजूत करणार. हुजूरची स्वारी तूर्त लष्करास जाण्याचा बेत दिसत नाहीं. प्रतिनिधि व अमात्य व शिलेदार मंडळी यांची समजूत करून लष्करास रवाना करीत आहेत. व लोक आणावयाविषयीं लोकांस पत्रें जातात. आणि कोणा कोणास लोक आणविणेंविशीं सांगतात. राजश्री भगवंतराव टकले येथें आले त्याणीं दोनशें लोक आणावयाचा करार केला आहे. मिरजेच्या पथाप्रमाणें बोलीचालीचा ठराव केला आहे. श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांजकडे पुण्याहून सरकारचीं पत्रें गेलीं होतीं कीं, महाराजांकडील तालुक्यास उपद्रव करूं नये म्हणोन. त्याचीं उत्तरें भाऊसाहेबांनीं लिहून दिलीं. ते जासूद राजश्री बळवंतराव खांडेकर याजकडे आले. ते लखोटे येथें फोडून पाहिले. उत्तराचा मजकूर काय होता तो समजला नाहीं. फिरोन लखोटे करून रवाना केले. त्याजवर येथूनही तो अन्वय पाहून पत्रें लिहिलीं आहेत पुण्यास. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०४९ श्री. ( ज्येष्ठ व० १२–२९ जून. )

पै॥ छ० २८ सफर. सन मय्यातैन व अल्लफ. आषाढमास.

सेवेशीं बालकृष्ण लक्ष्मण. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० २४ मोहरम मुक्काम बेक्कनहल्ली नजीक हनगल येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. रा॥ बाबा फडणीस शिक्केकटार व धारवाडचे किल्ल्याच्या सनदा घेऊन मंडळीसह आले हें महत्कार्य जाहलें. वडिलांचें पुण्य थोर. वे॥ शा॥ संपन्न रा॥ रा॥ दीक्षित बाबा यांचे आशीर्वादाचें फल. सरकारांतून कृपा जाहली येणेंकरून पदरींचे पार पडिलों. इकडील वर्तमान इंग्रज पट्टणासच आहेत. धोंडजी वाघ मध्यें पुंड होऊन तिकडील फौज हजार स्वार व दोन हजार पायदळ जमाव करून आधीं होळेहोनूर लहान जागा घेतली. तेथें कमावीसदार आसफ होते त्यांस भरंवसा देऊन त्याचे सूत्रानें शिवमोगे यास गेला. तेथें तुकडी म्हणोन पांच चार मामलेदार जमा जाहले होते त्यांस धरून शिल्लक प्रांतांतील दहा वीस हजार होन जमा होते ते हाताखालीं घेऊन फौजेस वांटणी करून जागाच बळकाविली ! नंतर तुर्क होनाली व शिकारपूर घेतलें. प्रस्तुत कालीं पांच चार हजार फौज पारिपत्यास यावी या सरंजामानिशीं आहे. सावनूर तालुक्यांत उपद्रव करणार आहे. काय रितो पहावें. सोंदे बिदनूर प्रांत रिकामा आणि ठाणीं विशेष नाहींत हें [illegible]ून गोखले याणीं कांहीं ठाणीं

घातलीं व रा॥ बापूजी शिंदे याणीं कांहीं ठाणीं घेतलीं. आमची सरहद्द आम्हांस चौघांनीं भर दिला. त्याजवरून हजार पेंढारी व दोन हजार पायदळ ठेवून आम्ही उद्योग आरंभिला. इतक्यांत परवां यजमान यांचें पत्र आलें कीं टिपूचे राज्यांत हंगामा माजवूं नये याप्रमाणें सरकारचीं पत्रें आलीं आहेत ऐसें आलें. त्याजवरून लोक माघारे आणविले. दहा हजार रुपयांचे पेचांत आलों व सरसुभे याचे कारभारामुळें फार फसावा जाहला. पुढें मामलत करावी तरी रसद पाहिजे. शिलशिले समीप. हुबळी तो आलीच नाहीं. जें जाहलें तें जहालें. याउपरी सोडून सेवेशीं येतों. भेटीनंतर विनंती करीन. आतां साहेब सुभा आला याजमुळें करणार सिद्ध जाहले आहेत. पदरीचें पुरातन. कांहीं तरी सेवा करावी हें जाणून केलें. पुढें पार पाडणें स्वामींकडे आहे. तूर्त सर्वस्वी पेचांत आलों. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५०५० श्री. ( आषाढ व० ११–२८ जुलै. )

पै॥ छ० २७ सफर. सन मय्या तैन व अल्लफ.

विज्ञापना. तागायत छ० २३ सफर रविवार यथास्थित असे. विशेष येथें ( नानांच्या ) दरबारांत कामकाजामुळें नेहमीं जावें लागतें. मागें येथें महिना दोन महिने होतों तेव्हां पंधरा अठरा रुपये प्यादे चौकीदार वगैरे पानसुपारी दिली होती. बाकी कांहीं पुढें देईन म्हणोन बोलिलों होतों. हल्लीं येथें आलों. जाणें नित्य आहे. दरबारचीं माणसें म्हणजे केवळ श्वान! त्यास कसें करावें? कांहीं दिलें नाहीं तरी जागां जागां उपद्रव करितील. गांठ जेव्हां पाहिजे तेव्हां पडली पाहिजे. नानांजवळ उभे रहावयाचे प्याद्यांचे नाईक आहेत ते परमानगी लावितात. परमानगीखेरीज पालखीपदस्थाची देखील गांठ पडत नाहीं! त्यास याचा विचार कसा करूं येविषयींची आज्ञा झाली पाहिजे. त्याप्रमाणें करीन. श्रुत होय. स्मरणपूर्वक आज्ञापत्र आलें पाहिजे. हे विज्ञापना.

नं. ५०५१ श्रीरामलिंग प्रसन्न. ( आषाढ व० १३–३० जुलै. )

पै॥ छ० २९ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. आषाढ.

राजश्री गंगाधररावजी गोसावी यांसीं—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित नारायणराव डफळे देशमुख परगणे जत व करजगी दंडवत विनंती येथील कुशल जाणोन

१ वकील मोरो आपाजी परांजपे यांचें बाळासाहेबांस पत्र.

स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. खासगत मेंढरांचें खांड गोपाळजी चव्हाण याचे निसबतीस चारणीस होतें. हिकडे शिंदे यांचे लष्करचा दंगा जाहला म्हणोन मौजे येळें बेळोंखी हिकडे खांड पाठविलें तों लष्करचा रोंख मिरज प्रांताकडे जाहला. पठाण यांणीं मौजे खंडेराजोरीचे रानांतून मेंढरांची वळणी करून बेळोंशीचीं खांडें व आमचेंही खांडें घेऊन लष्करांत आले. तेव्हां पठाणाचे लष्करांत चिरंजीव यशवंतराव डफळे होते त्यांणीं आपले खांडाची रदबदली करून थोडें बहुत खर्च देऊन खांड सोडविलें. असें असतां आपलेकडील लक्ष्मणसिंग चोपदार म्हणतो जे आपण लष्करांत येऊन बेळोंखीचीं खांडें सोडविलीं त्यांजबरोबर हेंही खांड सोडविलें. सहाशें रुपये खर्च पडला त्याची वरगण देणें म्हणोन गोपाळजी चव्हाण यास तगादा करीत आहे. त्यास चिरंजीवानीं परभारें पठाणांपासून खांड सोडविलें असतां चोपदारानें तगादा करावयाचें कारण नाहीं. आणि पठाण यांणीं चोपदारास तगादा करूं नये म्हणोन पत्र दिलें असतां मानीत नाहीं. असो. सांप्रत विनंती लिहिली असे. तर लक्ष्मणसिंग यास ताकीद करून गोपाळजी चव्हाण यास तगादा न होय तें केलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५०५२ श्री. ( आषाढ व० १४–३१ जुलै. )

नकल.

चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा यांसीं प्रती साळूबाई. आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेष. तुम्ही चिरंजीव राजश्री परशुरामपंत भाऊंजवळ होतां तेथून निघोन जाऊन कर्जभरी होऊन फौज व पायदळ ठेवितां म्हणोन कळलें. ऐसियास हें उत्तम नाहीं. तुम्ही नवे लोक ठेवून कर्जभरी व्हावें हें चांगलें नव्हे. वडिलांचा लौकिक कसा, हल्लीं असें जालें असतां लौकिकांत वाईट; यास्तव निघोन चिरंजीव राजश्री भाऊंजवळ लष्करांत यावें. वांटणीचा प्रकार तर चिरंजीव राजश्री गंगाधरराव बाळ यांचेही चित्तांत खटला तुटक व्हावा असेंच आहे. चिरंजीव राजश्री भाऊ तासगांवास श्रीचे उत्सवास येतील. येथून चिरंजीव राजश्री गंगाधरराव बाळ जातील. भेट जालेवर गुंता राहणार नाहीं. तुटक होईल. उगाच लौकिक करावा ठीक नाहीं. रवाना छ० २७ सफर. बहुत काय लिहिणें. लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ५०५३ ( आषाढ व० ३०–१ आगष्ट )

गंगाधरराव गोविंद यांचें रामचंद्र परशुराम यांस पत्र छ० २८ सफरचें—

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ स. १७९९

" तेरदळचें ठाणें चिरंजीव राजश्री चिंतामणराव अप्पानीं घेतलें. मंगळवेढेस चिरंजीव सडे गेले असें वर्तमान आलें. पक्की बातमी आलेवर लिहितों. दुर्लौकिक होऊं नये. उतावळी करून गेले. गोळी उडाली तरी कठीण गोष्ट म्हणून वारंवार लिहितों. एरवीं बंदोबस्तही श्रीकृपें वडिलांचे आशीर्वादें होईल, परंतु वाढवूं नये यास्तव आपणांस लिहिलें. गेले नसिलियासीं आपण बंदोबस्त करावा. चिरंजीवास वडिलांजवळ आणवावे. चिरंजीव राजश्री बाबांस चिरंजीव राजश्री अप्पाकडे तेरदळास पाठविणार म्हणून लिहिलें, त्यास वडील जुन्नराकडे गेलेपासून चिरंजीवाचीं भाषणें वर्तणूक कशी हें आपण सर्व प्रकारें माहीत आहां. "

नं. ५०५४ श्री. ( श्रावण शु० २–३ आगष्ट. )

छ० ४ सफर. सन मय्या तैन व अल्लफ. श्रावण.

सेवेशीं नारो हरि करंदीकर दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागायत छ० १ रबिलावलपावेतों मुक्काम करवीर यथास्थित असे. विशेष. राजश्री नीळकंठराव चव्हाण यांस राजश्री विठोजी चव्हाण हिंमतबहाद्दर व सावकार व कारकून त्रिवर्ग एकत्र होऊन शेतास वगैरे उपद्रव देतात म्हणोन राजश्री प्रीतिराव चव्हाण हिम्मतबहाद्दर यांजकडे डिगरजेहून पत्र आलें; व राजश्री आपाजीपंत कारकून यांस येणेंविशीं लिहिलें होतें. त्यास मशारनिल्हेनीं मिरजेच्या परवानगीचा उजूर केला. त्याजवरून हिंमतबहाद्दर याणीं मला सांगितलें कीं, आपाजीपंत यांस करवीरास येण्याविशींची परवानगी आणवून ठेविणें. येथें येऊन बोलून जाईल; दिक्कत नाहीं, म्हणोन सांगितलेवरून सेवेशीं लिहिलें आहे. तरी आपाजीपंत यांस करवीरास जाणेंची आज्ञा व्हावी. घरचा खटला हमेशा पडतो याजकरितां त्याजवळ बोलून खटला न पडे असें करावें यास्तव आणविला आहे. तरी आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. आपाजीपंत मिरजेस आला असला तर आज्ञा व्हावी. नाहीं तर आज्ञा चिठी जाणेंची व्हावी. हे विज्ञापना.

नं. ५०५५ श्री. ( श्रावण शु० २–३ आगष्ट. )

छ० २ रबिलावल. सन मय्या तैन व अल्लफ.

सेवेसीं विज्ञापना. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपांची स्वारी काल भृगुवारीं नेजवर गेली होती. तेथें ठाण्यांतील प्यादे बाहेर आले त्यांजवर इकडील गेले होते ते लोक उठले. त्यांणीं तिकडील आठ दहा ठार व वीस पंचवीस जखमी केले आणि

---

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस. २ पत्र भाऊंच्या लष्करांतून.

ध्यादे पिटून आंत घालविले. इकडील चार घोडीं पागेची जखमी व एक ठार व दोन तीन असामी जखमी जाले आहेत. आज श्री॥ राजश्री बाबासाहेब सडे होऊन तिकडे गेले व मिरजेच्या तोफाही बाबासाहेबानीं तिकडे नेल्या. श्री॥ राजश्री भाऊसाहेबसुद्धां एक दोन रोजांत झाडून कूच करून जाणार. श्रीमंतांची प्रकृति उत्तम प्रकारची आहे. शेष राहिलें नाहीं. ऐनापूरचें पत्र पाठविलें आहे. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५०५६ श्रीगणपतिर्जयति. ( ३ आगष्ट. )

छ० २ रबिलावल. श्रावणमास. सन मय्या तैन व अल्लफ.

ती॥ मातुश्री आत्याबाई वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें चिंतामणीनें दोनी कर जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत श्रावण शु॥ २ मंदवारपर्यंत वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असे. विशेष. वडिलीं छ० २७ सफरचें पत्र पाठविलें तें काल दोन प्रहरीं पावलें. लिहिला मजकूर कळला. पत्रीं आज्ञा "चि॥ राजश्री भाऊंजवळ होतां तेथून निघोन जाऊन कर्जभरी होऊन फौज व पायदळ ठेवितां म्हणोन कळलें हें उत्तम नाहीं. वडिलांचा लौकिक कसा व हल्लीं असें जालें असतां लौकिकांत वाईट, वास्तव निघोन चि॥ राजश्री भाऊंजवळ लष्करांत जावें. वांटणीचा प्रकार तर चि॥ राजश्री गंगाधरराव बाळ यांचेही चित्तांत खटला तुटक व्हावा असेंच आहे. चि॥ राजश्री भाऊ तासगांवास श्रीगणपतीचे उत्साहास येतील. येथून चि॥ राजश्री गंगाधरराव बाळही जातील. भेट जाहलेवर गुंता राहणार नाहीं. तुटक होईल. उगाच लौकिक करावा, ठीक नाहीं," म्हणोन लिहिलें, ऐसीयास वडिलीं लिहिलें तें प्रमाण. मागील आजपर्यंत जें जें जालें तें सर्व वडिलांस विदित आहे. मातुश्री व बंधु पुण्यांत आहेत. चिरंजीवाजवळ दोन घोडीं बसावयास ठेवावयास वडिलांस अनकूळ न जाहलें ! तेथें त्यांस खर्चास पाठविलें नाहीं. त्यानीं वस्तवानी मोडून खातात यांत लौकिक चांगला कीं काय ? मी ती॥ राजश्री भाऊसाहेबांबरोबर स्वारीस गेलों. मजबरोबर लोक वगैरे होते त्यांस निघते समयीं थोडें बहुत खर्चास दिलें. पुढें खर्चास पाठवावयाविशीं विनंती लिहिली त्याचें उत्तर मिरजेहून वडिलानीं आपले ओढीचे प्रकार लिहोन दर्शविले ! पुढें कर्नाटकचे महालीं येथील स्वार कमावीसदारांस खर्चास पाठविणेंविशीं पत्रें लिहून रवाना केलीं त्यास वडिलानीं मिरजेहून ऐवज न देणेंविशीं व स्वार गेले होते त्यांस उठून जाणेंविशीं पत्रें पाठविलीं. दोडवाडासमीप लष्करचा मुक्काम जाला. तेथील कमावीस-

दारासी ऐवज खर्चास पाठविणेंविशीं पत्रें लिहिलीं. गाडदी व स्वार पाठविले. त्यांस गांवकरानीं हातीं धरून गांवाबाहेर घातलें ! येविशीं आम्हांस मिरजेची आज्ञाच आहे असें बोलिले. पुढें ती॥ राजश्री भाऊसाहेबांस विनंती करून मी तेथें गेलों तों गांवकरानीं व प्यांद्यानीं तुम्ही गांवाजवळ आलां असतां गोळी मारावयाची आज्ञा आहे ( असें सांगितलें. ) तेव्हां हा लौकिक चांगला कीं काय ? मी मिरजेहून निघोन येथें वडिलांजवळ आलों. विनंती केली, कोठें उतरत जावें ? त्याजवरून आज्ञा केली कीं, आपले फौजेंत उतरावें. त्याजवरून फौजेंत राहिलों. फौजेनें मजबरोबर चालूं नये, कोणी मजकडे येऊं नये ! आपाजी गोविंद प्रथम एक दोन वेळां मजकडे आले होते तेही पुढें येईनासे जाले. हें वडिलानीं लिहून करवावें हें चांगलें कीं काय ? फौज मशारनिल्हे-बरोबर असावी, मजबरोबर नसावी, फौजेचे देणें घेणें मीं पाहूं नये, याविशीं लौकिक नाहीं कीं काय ? वडिलीं मजला लौकिकाविशीं शब्द लावून लिहिलें यास्तव समजावें म्हणून लिहिलें आहे. मजला वडील मिरजेहून खर्चासही पाठवीत नाहींत, महालकरी यांस खर्चास न देणेंविशीं लिहितात, तेव्हां मीं कसें करावें ? येथें वडिलांस विनंती केली जे "चार पांच वर्षें आज्ञा केल्याप्रमाणें आहें. श्रीगणपतीचे कृपें वडील पेचांतून मुक्त जाहले आणि वडिलांवर श्रीमंतांची कृपाही जाली. मिरजेहून तो मजला खर्चास येत नाहीं याची वाट काय ? कसें करावें ? " तेव्हां आज्ञा केली, " मजबरोबर अखेरसालापर्यंत असावें, मिरजेसमीप जातों आणि तुजसीं बोलतों आहों त्याप्रमाणें तुटक करितों. याउप्पर ठेवीत नाहीं. '' असें सांगितलें, व 'तुमचे मातुश्रीस व बंधूस खर्चास पाठविणेंविशीं मिरजेस लिहितों. ' वडिलांचे वचनावर स्वस्थ होतों. पुढें वडील चिकोडीच्या सुमारें आलेनंतर विनंती केली. वडिलांनीं मागील ठरावाप्रमाणें याद व पत्र लिहून मिरजेस पाठविलें त्याचें उत्तर " माझी व वडिलांची गांठ ( गणेश ) चतुर्थीस पडल्यानंतर विनंती करीन. आज्ञेशिवाय नाहीं " असें उत्तर आलें. नंतर मी वडिलांस विनंती केली, वडिलांचें चतुर्थीस उत्साहास जाणें होतें कशावरून ? वडील मोहीमशीर सरकार आज्ञेनुसार. पुढें माझें कसें ? नंतर वडिलानीं ती॥ राजश्री आपासाहेबांस आज्ञा केली, " याजविशीं आणसी मिरजेस तुम्हीं पत्र लिहिणें. ' चतुर्थीस आमचें येणें तिकडे होत नाहीं. याचा जाबसाल पेशजी तुम्हांस लिहिलेप्रमाणें उरकण्यांत यावा. इतःपर ठेऊं नये. " या-

---

१ सरंजामाची वांटणी भुलल्याकडून तुला देववितों.

अन्वयें येथून वडिलांनीं मिरजेस वडिलांस लिहिलें असतां माझी व वडिलांची गांठ पडलेवर विनंती करीन हेंच लिहिणें वारंवार येत गेलें! तेव्हां लांबणीवर टाकावयाचा सुमार दिसोन आला. पोटाची कळकळ सोसवेना. तेव्हां रागानें वडिलांस विनंती केली, दहा महिने वडिलांबरोबर होतों. वडिलीं ल्याहावयाचे प्रकारें बहुत लिहिलें, परंतु माझें दैव आणि त्यांस लोभ सुटेना! ईश्वर बुद्धि देईल तिकडे जातों. असें वडिलांस बोलोन मुहूर्ताचे वेळेस निरोप घेतला आणि निघालों. दौलत ++ मुलूख वडिलांनीं मिळविलें त्याचा उपभोग एकट्यानींच करावा, आम्हांस अधिकार नाहीं, असें दिसोन आलें! तीा को तात्यासाहेब स्वर्गास गेले. आम्ही लहान लेकरें, हे वडील म्हणोन यांचे स्वाधीन आम्हांसह दौलत करून गेले. ते दौलत आपण आटपोन आम्हांस कांहीं न द्यावें हे भाव दिसों लागले. तेव्हां पितृविभागाविशीं सर्वस्व खर्च करावें, परंतु पितृविभाग घेणेंचा यत्न करावा, हें पांडवादिकांचें बोलणें. त्यास श्रीकृष्णनाथाचेंही अनुमोदन आहे. याजकरितां चार रुपये कर्ज काढून फौज व पायदळ ठेविलें. वडिलांसंनिध जावें, उपाशी मरावें, त्याहून वडिलांचे हातून ( लढाईत ) मेल्यास उत्तमच आहे! वडील क्षेत्रच होय. मेल्यास मुक्तीस संशय नाहीं. हें समजोन सावकाराचे पाय धरोन कर्ज घेतलें. मानवी यत्न करावा म्हणोन योजिलें आहे. कर्ज केलें हें त्यांस फेडावयास सांगत नाहीं. कर्ज मीं केलें तें मीं देईन. वडिलांनीं केलेलें वडील दौलतीवर आहेत तेव्हां ते देतील. त्यांची गोष्ट मला कशास पाहिजे? आम्ही विभागाविशीं भांडूं लागल्यापासून कर्ज ज्यानीं केलें ते वारतील हें प्रसिद्धच आहे. त्यामागील कर्ज असेल तें उभयतांस वारिलेंच पाहिजे. मिरजेहून वडील[1] वडिलांस लिहितात, 'माझी आपली गांठ पडल्यावर आज्ञेशिवाय नाहीं.' अशीं गोड उत्तरें लिहितात. त्यास तूर्त मिरजेजवळ कांहीं दंगा नाहीं. चिा राजश्री नारायणराव यांस कारभारीसुद्धां किल्ल्यांत ठेवून वडिलांनीं वडिलांजवळ येऊन काय विनंती करावयाची असेल ती करावी. वडील कैलासवासी यांचा लौकिक रक्षून जाबसाल तुटक करावा यांत उभयपक्षीं चांगलें आणि अवघडही नाहीं. आमचे वडील गेले तेव्हां आम्ही लहान. आम्हांस घरची माहितगारी पहिली नव्हती व अलीकडे होऊं दिली नाहीं. तेव्हां येथें वडिलांस विनंती केली, मजकडे वडीलकी म्हणोन नगारा निशाण व पांचशें राऊत यांचे वांटणींतील व घर इमारत जेथें राहूं तेथें ठाणें बांधणेंबद्दल ऐवज द्यावयाचें

---

१ बाळासाहेब भाऊसाहेबांस लिहितात.

ठरविलें आहे. वडीलकीमुळें जें जें वाजवी मजकडे असावें असें मजला वडिलीं आज्ञा केली आहे तें त्यानीं द्यावें. त्याशिवाय घरवांटणीच्या दोन यादी ती॥ राजश्री काकासाहेबानीं कराव्या. एक मी आवीं घेईन, राहील ती त्यानीं घ्यावी. मी वांटणीविशीं अमुक दागिना अथवा अमुक असें कांहीं बोलत नाहीं. येविशीं येथें वडिलांस विनंती केली त्याप्रमाणें येथून वडिलानीं लिहिलें असतां गांठ पडणेंचा उजूर प्रतिपत्रीं लिहितात हें काय ? सर्व अपराध मजकडेच लौकिकांत दिसतात. कां कीं तूर्त दौलत मजकडे नाहीं. ते दौलतीवर ! तेव्हां सर्व त्यांचे मर्जीसारखें बोलणार. यथार्थ धर्मतः उभयपक्षीं या युगांत सांगणें अवघड. पदरचे कारकून देखील मजला शब्द लावीत असतील. ( कारण ) मजकडून ( कांहीं ) प्राप्त नाहीं ! सर्व विषयबद्ध आहेत. असल्यास आश्चीर्य काय ? श्रीभगवान कौरवांस 'कलह करूं नये, कलहेंकरून लक्ष्मी जात्ये, राज्यनाश होतो, पितृविभाग पांडवांस देऊन सुखरूप राज्य करावें,' असें नानाप्रकारें सांगितलें, परंतु राज्यलक्ष्मीचे मोहास गुंतून ( दुर्योधन बोलला कीं ) सूचीअग्रप्रमाण मृत्तिका द्यावयाची नाहीं ! श्रीभगवान सर्व योद्धे भीष्मादिकरून आप्तवर्ग यानीं बहुता प्रकारें सांगितलें तथापि मान्य न केलें. त्या युगीं याप्रकारचें जालें. आतां कलि प्रवर्तला विशेष. राज्यलक्ष्मीपुढें सर्व अरुच होती हें घरोघर व्यवहार चालत आहे. मी लेकरूं अज्ञान, आपण वडीलपणें मजला बुद्धिवाद पत्रीं लिहिला तो यथार्थ. सर्व वर्तमान आजपर्यंत जालेलें वडिलांस निवेदन असावें म्हणून लिहिलें आहे. राग येऊं नये. मीं वडिलांस न ल्याहावें तर दुसरे कोणास लिहूं ? नदीपलीकडे आलेवर एक विनंतीपत्र ती॥ राजश्री काकासाहेबांस लौकिक न व्हावा म्हणून येविशीं लिहून पुढें यावें असें योजिले होतें तों वडिलानीं वडिलांकडून[1] हें पत्र लिहविलें ! उत्तम आहे. मजकडे महाल अथवा ठाणें असलें तर ठीक नव्हे असें वडिलांचें चित्तीं भासतें. मजकडे गेलें म्हणजे परकी जागां गेलें असें नाहीं. आमचा घरगुती जावसाल. ती॥ कै॥ नाना व रावसाहेब[2] यांचा लौकिक काशीपासून रामेश्वरपर्यंत. त्यांचे वंशीं आम्ही. तेव्हां त्यानीं केला तो लौकिक कीर्तीचा केला. आमचे वांटणीस श्रीनें दुसरा योजिला असला तर आमचे हातून कसा चुकतो ? आपण व ती॥ राजश्री भाऊसाहेब आम्हांस उभयतांस वडील. दोघांसही यथास्थित वडीलपणें सांगाव-

---

१ बाळासाहेबानीं तुम्हांकडून. २ गोविंद हरि व गोपाळराव गोविंद.

यास अधिकार असतां उपेक्षा करून वडिलांचे कीर्तीस झांकण न पडे तें करावें हें वडीलपणास योग्य आहे. ती॥ राजश्री काकासाहेबानीं वडिलांजवळ येऊन वडिलांस काय विनंती करावयाची ती करून विभाग आमचा सवरेसीनें द्यावा. ती॥ कै॥ तात्यासाहेबांचे जागां ती॥ राजश्री काकासाहेब आम्हांस वडील. आमचा विभाग देऊन आम्हांस पूर्ववत मागें पालन केल्याप्रमाणें करावें. आम्हीं वडिलांची सेवा करावी हें मानस. वडिलांचे लौकिकाची कीर्ति राही असें आपण वडीलपणें करावें. सदैव पत्र पाठवून लेंकराचा सांभाळ करावा. सेवेशीं विदित होय हे विज्ञाप ।.

नं. ५०५७ श्री. श्रावण शु० २–३ आगष्ट )

पै॥ छ० ५ राबिलावल. श्रावणमास. सन मय्या तैन व अलफ.

विज्ञापना ऐसी जे राजश्री बाळोबा तात्या यांचा आमचा एक विचार असावा हा भाव लेखक यांणीं राजश्री बाबा काळे यांजपाशीं श्रीमंत राजश्री भाऊंजवळ बोलावयास सांगितला होता. त्यास वडिलांची प्रकृत ठीक नाहीं म्हणोन काळे मशारनिल्हे कांहीं एक बोलिले नाहींत म्हणोन वडिलीं मला मिरजेंत सांगितलें होतें. त्यास राजश्री मोरोपंत साठे राजश्री बाळाजी विष्णु यांजपाशीं मागें होतें ते गडबडीमध्यें अटकेंत मंडळीमध्यें होते. सर्वांची मोकळीक जाहल्यानंतर मोरोपंतही सुटोन श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांजकडे भेटीस गेले होते ते माघारे पुण्यास आले. त्यांणीं तासगांवाहून मजकडे देवर अष्टयांस निघोन आलों ते दिवशीं सांगोन पाठविलें. नंतर त्यांस 'जयराम बाबा याचे वडगांवास यावें, आम्हीही तेथें येतों म्हणिजे तेथून पुढें पुण्यास जाऊं' म्हणोन चिठी पाठविली. वडगांवास त्यांची आमची गांठ पडली. भाऊसाहेब यांचें पत्र राजश्री बाळोबा तात्या यांस होतें. त्या पत्रांतील मजकूर कांहीं अधिकोत्तर नाहीं. ' आमचे शरीरप्रकृतीचा वगैरे मजकूर राजश्री मोरोपंत साठे सागतां कळेल ' म्हणोन लिहिलें होतें. आपले शरीरप्रकृतीचा मजकूर ल्याहावा याप्रमाणें मात्र लिहिलें होतें. तें पत्र मीं पाहिलें. परंतु ( बायांच्या ) सैन्यांत पावल्यानंतर खटावचे मुक्कामीं आम्ही गांवांत एक जागींच राहिलों होतों. तेथून एक दोन वेळां तात्यांकडे गेले होते. चार चार घटका खलबत जाहलें. चार दिवस खटावास होतों. नंतर पुढें बायांचे लष्करास आलों. तेथून स्वार घेऊन पुण्यास आलों. कांहीं बोलणें बोलिलें

१ सौरस्थानें, प्रीतीनें. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र मोरो आपाजी परांजपे याचें बाळासाहेबांस.

तें बोलणें येथें रा॥ बाळाजी विष्णु याजपाशीं सांगितलें असेल. नंतर नानांसही श्रुत जाहलें असावें. नाद चालला आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०५८ श्री. ( श्रावण शु० २–३ आगष्ट. )

पै॥ छ० ५ रबिलावल सन मय्यातैन व अलुफ.

सेवेशीं विज्ञापना तागायत छ० १ रबिलावल मंदवार वर्तमान यथास्थित असे. विशेष. बाया शिंदे फौजसुद्धां नीरेच्या पुलानजीक मुक्कामीं आल्या. राजश्री बाळोबातात्या व आबा चिटणीस याणीं शिंदे यांचे घरचा कलह मोडिला. बाया शिंदे यांचें म्हणणें होतें कीं, राजश्री दौलतराव शिंदे आलिजा बहादूर यांची भेट घेणार नाहीं. अकरा लक्ष रुपयांचा सरंजाम द्यावयाचा करार केल्याप्रमाणें अशेरी किल्ला व शहर बऱ्हाणपूर हे दोन द्यावीं. शिवाय अकरांची भरती करून द्यावी. आम्हीं परभारें तेथें जाऊं. ठाणीं पडल्यानंतर तुमचा आमचा करार. नाहीं तरी प्रमाण बोलण्याचें कांहीं एक तुमचें आमचें नाहीं. याप्रमाणें उभयतांजवळ बोलत होतीं. उभयतांनीं बहुतां प्रकारें खातरजमा दिली. अंतर्यामीं वचनही दिलें आहे. त्यावरून कलहही मिटत आला. + + + ही खर्चास द्यावें पठाणानीं + + + + होता त्यांस ही कांहीं द्यावें + + + + राजश्री बाळाजी कृष्ण पंढरपुराकडे फौजेसुद्धां गेले आहेत व यशवंतराव शिवाजी यांचीही फौज फलटणापलीकडे गेली आहे त्यांस पत्रें माघारें लौकर यावें म्हणोन बाया शिंदे यांचीं गेलीं आहेत. फौज आलियानंतर कूच करून जेजुरीस यावें, तेथें दौलतराव यांच्या भेटी व्हाव्या, याप्रमाणें बेत आहे. काय घडतें पहावें. दौलतराव यांची भेट घ्यावी हें मोठे मिनतीनें करारांत आणिलें आहे. मागाहून होईल तें सेवेशीं लिहितों. जेजुरीस अथवा लोणीचे मुक्कामीं भेटी व्हाव्या याजप्रमाणें बोलण्यांत आहे. बायांचें म्हणणें आलिजाबहादूर यांची भेट घेणार नाहीं ऐसें होतें, परंतु तो अडीचा प्रकार उभयतांनीं हरतऱ्हेनें समजाऊन सांगोन भेटावें ऐसें निश्चयांत आणिलें आहे. भेटी जाहल्यानंतर जांबगावास रहावें, किल्ले अशेरी व बऱ्हाणपूर येथें सनदा जाऊन ठाणीं बसल्यानंतर तिकडे जावें, याप्रमाणें ठरलें. फौज बायांजवळ असावी. + + दौलतराव याणीं अकरा लक्षांखेरीज + + सरंजाम लावून द्यावा याप्रमाणें करार मदार झाले. यशवंतराव शिवाजी व नारायणराव बक्षी या उभयतांस इकडे राहवयाचा भरं-

---

१ मोरो आपाजी परांजपे याचें पत्र पुण्याहून बाळासाहेबांस.

वसा पुरत नाहीं यास्तव आम्हीं बायांजवळ राहूं, सेवा चाकरी तेथें होईल म्हणोन करारांत आलें. मागाहून विनंती लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०५९ श्री. ( श्रावण शु० २–३ आगष्ट )

पै॥ छ० ५ रबिलावल. सन मय्यातैन व अलफ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव स्वामींचे सेवेसीं.

पोष्य बाळाजी जनार्दन. सा॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असावें. विशेष. आपण छ० २९ मोहरमचीं दोन पत्रें राजश्री मोरोपंत परांजपे यांजसमागमें पाठविलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. त्याचीं उत्तरें मोरोपंत याजवळ सांगितलीं त्याणीं आपणास लिहिलींच असतील. व छ० १८ सफरचीं दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं. व मोरोपंतास पत्र पाठविलें तें पाहिलें. राजश्री परशुरामपंत भाऊ फौजसुद्धां चिकोडी नजीक आहेत व श्री॥ महाराज करवीरवासी वेदगंगेपलीकडे आहेत. राजश्री कोल्हापुरास गेले आहेत. लवकरच फौजेंत येणार. नदीस पाणी आहे याजकरितां टोकरे ( जमा ) करीत आहेत म्हणोन लिहिलें तें कळलें. त्यास बातमी वरचेवर लिहून येत असावी. रवाना छ० १ रबिलावल. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

नं. ५०६० श्री. ( श्रावण शु० ३–४ आगष्ट. )

छ० २ रबिलावल. सन मय्यातैन.

सेवेशीं विज्ञापना. श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा याणीं तेरदळास ठाणें घातलें हें वर्तमान करवीरीं आलें. त्याजवरून महाराजानीं मला नेऊन विचारलें कीं, हा मजकूर कसा आहे ? त्यास 'ठाणें घातल्याचें वर्तमान मला लिहिलें आलें नाहीं.' ( असें बोललों. ) 'वर्तमान खरें असें बोलले. याचा प्रत्योपकार करावयाचा मानस तुमचे यजमानांस आहे किंवा नाहीं ?' त्यास उत्तर केलें कीं, घरचा खटला आहे. याचा विचार होणें तो घरींच व्हावयाचा. बाहेर यावयाचा नाहीं. 'तुम्ही मिरजेस लिहोन पाठविणें आणि शोध आणावा' असें सांगितलें. त्याजवर उत्तर केलें कीं, वर्तमान लिहिलें आहे. उत्तर आलेवर विनंती करीन. असें उत्तर केलें. इकडील मानस आपणाकडे लक्ष असावें. आपण त्यांत शिरोन ढवळावें. त्यास कारभारी यांजवळ बोललों कीं, हा पंथ

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून. तसेंच पुढच्या नंबरचे.

पहिलेपासून नाहीं. जो ठराव होणें तो घरच्या घरांतच होईल. बाहेर यावयाचा नाहीं. याप्रमाणें बोललों. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०६१ श्री. ( श्रावण शु० ३–४ आगष्ट. )

छ० २ रबिलावल. सन मय्यातैन व अलुफ. श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री राजाज्ञा यांचें पत्र हुजुर आलें त्यांतील मजकूर तिकडील लष्करचा मुक्काम लाटेवर येणार. हुजूरची स्वारी लष्करास यावी म्हणोन आलें. त्याचें उत्तर गेलें कीं हुजूरची स्वारी निघावयाचा बेत श्रावण शुद्ध पंचमी व नवमी दोन मुहूर्त आहेत. त्यास आपलें पत्र आणखी सत्वर यावें असेंच आलें तर पंचमीस निघोन येतों. नाहीं तर नवमीस निघोन येतों. याप्रमाणें उत्तर गेलें. राजश्री व्यंकटराव घोरपडे सोंडुरास होते तेथून निघोन गुत्तीकडे ठाणीं घालीत गेले. इंग्रजाकडून पेशजी ज्यां ज्यांकडे जो जो प्रांत होता तो तो त्यांजकडे देविला. असें घोरपडे यांचें पत्र आलें. त्याजवरून हुजुरून पत्रें इंग्रजांस लिहिलीं आहेत. "सोंदें बिद्नूर प्रांत वगैरे पेशजी कै॥ महाराज[1] यांजकडे होते त्यास पेशजीप्रमाणें जितके महाल होते त्याचप्रमाणें हुजूरचे हुजूर असावे." याप्रमाणें लिहून घोरपडे यांजकडे पाठविणार. पत्रें तयार जालीं आहेत. राजश्री धोंडजी वाघ सावनूर प्रांतीं आहे त्याचें पत्र हुजूर आलें कीं, आपणास आज्ञा जाहल्यास हुजूरचे सेवेशीं जमीयतसुद्धां येतों. त्याजवरून येणेविशीं वाघ यांस आज्ञापत्र दिल्हें. वस्त्रें तिवट शेला व एक किनखापाचें ठाण सुलतानजी लोंढे कुंद्गोळकर याजबरोबर पाठवीत आहेत. फौज व प्यादे मिळोन पांच हजार फौज ( वाघाची ) आहे म्हणोन आवई आहे. वाघ याचें पत्र आल्यावरून मर्जी बहुत खुष आहे. लाटेवर मुक्काम येणार यास्तव लाटेवर प्यादे रवाना केले. श्री॥ राजश्री पंत अमात्य यांजकडील प्यादे दोनशें व आणखी किरकोळ मिळोन तीनचारशेंपर्यंत रवाना केले. बोरवाडानजीक नदीस दांडगा उतार जाला आहे. मनोळीकडे तीन हजार फौज रवाना केली असें वर्तमान आहे. वाघ सावनुरांत आहे. गोखले यांची व वाघाची झटापट जाली. गोखलेचा मोड वाघानें केला. गोखले मिश्रिकोटास येऊन राहिले आहेत. वाघानें तिकडून यावें व इकडील फौज इकडून ऐसे मिळोन दोहींकडून शह तिक-

---

१ संभाजी महाराज करवीरकर. २ वाघानें गोखल्यास पराजित केल्याची

डील फौजेस यावा अशी योजना आहे. काय होतें पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ५०६२ श्री. ( श्रावण शु० ४–५ आगष्ट. )

पै॥ छ० १३ रबिलावल. सन मय्यातैन व अल्लफ. श्रावण.
राजश्री गंगाधर रावजी गोसावी यांसी.

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव शिंदे दंडवत. विनती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष. राजश्री खंडेराव माने पाटील कसबे रहिमतपूर प्रांत वाई इकडील पदरीं असतात त्यांचे तर्फेतील भाऊबंदांसीं राजश्री फतेसिंग माने खटला करून शेतांत आउतें घालणार म्हणोन समजलें. त्यावरून हें पत्र आपणास लिहिलें असे. त्यासी आपण कसबे मजकूरचे कमावीसदारास लेहून खंडेराव माने पाटील कसबे मजकूर यांचे भाऊबंदांस कोणेविशींचा उपसर्ग लागूं न देतां सुदामत चालत आलें असेल त्याजप्रमाणें चालवावें. नवीन फतेसिंग माने खटला करूं लागल्यास ताकीद करावी. रवाना छ० ३ रबिलावल. बहुत काय लिहिणें हे विनंती.







नं. ५०६३ ( श्रावण शु० ५–६ आगष्ट. )

परशुरामभाऊंच्या लष्करांतून मिरजेस पत्र छ० ४ रबिलावलचें—

" लष्कर चिकोडीहून इंद्रवारीं कूच करून येथें चिंचणीच्या मुक्कामास आलें. भोजेचें ठाणें बसलें. लाट राहिली आहे तेथें आज स्वारी येणार आहे. राजश्री बाळकृष्णपंत लागू लष्करांत परवां आले. राजश्री आनंदराव भाऊ चिकोडीसच राहिले आहेत."

नं. ५०६४ श्री. ( श्रावण शु० ९–९ आगष्ट )

छ० ८ रबिलावल सन मय्यातैन.

सेवेसीं विज्ञापना. तिकडील लष्करचा मुक्काम लाटेनजीक जाला आहे.

---

१ महाराजांच्या लष्करांतून नारो हरि करंदीकर याचें हें व पुढचीं दोन पत्रें.

लाटेचें बोलणें लागलें आहे. आज उद्यां ठाणें पडेल. राजश्री आपा देसाई निपाणकर याचे विद्यमानें बोलणें आहे. आज इकडील फौज वाळवेंनजीक नदीपार होणार. दोही नद्यांच्या दरम्यान करवीराहून थोरली तोफ आनंदी आणविली आहे. आली म्हणजे ऐलतीराहून भोजेस लावणार आणि खास बारदार याणीं हल्ला करून ठाणें घालावें असा बेत केला आहे. काय घडतें पहावें. श्री॥ राजश्री भाऊसाहेबांची स्वारी आज भृगुवारीं शिरगांवास मेजवानी करितां येणार. कळावें. श्री॥ राजश्री दाजीसाहेब दोन हजार फौजेनिशीं कोगनोळीस येणार व आपासाहेब शेंडुरास ठाणें घालावयाकारितां जाणार. मनोळीसही दोन तोफा व फौज रवाना जाली. वरकड नवल विशेष नसे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०६५ श्री. (श्रावण शु० १०–१० आगष्ट.)

छ० ९ रबिलावल. सन मय्यातैन व अलफ.

सेवेशीं नारो हरि करंदीकर दोन कर जोडून शिर सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत छ० ८ रबिलावल पावेतों मुक्काम लष्कर नजीक बारवाड यथास्थित असे. विशेष. श्री॥ महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्वारी काल भृगुवारीं घटका दोन घटका दिवसास सायंकाळच्या नदीपार होऊन कोण्णुरानजीक डेरे जाले. दाहीं नद्यांच्या दरम्यान उतरले आहेत. वरकडही फौज उतरत आहे. श्री॥ राजश्री राजाज्ञा करवीराहून अद्याप आले नाहींत. आज उद्यां येतील. कळावें. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०६६ श्री. (श्रावण शु० ११–११ आगष्ट)

पै॥ छ ९ रबिलावल. सन मय्या तैन व अलफ. श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. हुजूरची स्वारी व पागा व खासबारदार उतरले. पांढरे अगोदरच उतरले होते. वरकड शिलेदार थोडे बहुत उतरले. थोडे बहुत राहिले आहेत. दोन्ही नद्यांचे दरम्यान उतरावयाची मसलत हिम्मतबहादर यांची वरकड मंडळीच्या युक्तीस येत नाहीं. असो. काय काय होतें पहावें. बायांची समजूत जाली. सात लक्षांचा सरंजाम व अशेरीचा किल्ला देणें ठरला असें वर्तमान येथें आहे. वरकड मागाहून लिहीन. लाटेस ठाणें पडलें. कापशीस फौज गेली आहे. तेंही पडेल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. २ लाटेचें ठाणें भाऊंच्या फौजेनें घेतलें.

नं. ५०६७ श्रीपांडुरंग. ( श्रावण शु० १२–१२ आगष्ट. )

छ० १० रबिलावल. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपद.

वडिलांचे सेवेशीं विज्ञापना ऐसी जे, राजश्री बाळाजी कृष्ण दि॥ शिंदे हे क्षेत्रावर आल्यानंतर त्यांजकडील स्वार करकंब परगण्यांत दंगा करूं लागल्यामुळें ठाण्यांतील स्वार प्यादे तलाव्यास जात होते त्यानीं त्यांजकडील घोडीं माणसें धरून आणिलेलीं कैदेंत ठेविलीं होतीं. हा मजकूर पेशजी वडिलांस लिहिलाच आहे. तिकोटयाच्या वोली व करकंबेंतील स्वार सोडून द्यावे म्हणजे परगण्यांत उपद्रव न देतां वोली नेल्या आहेत त्या सोडून देतों असें बोलणें त्यांचें होतें तें न होतां कसब्यावर मुक्काम करून निघोन गेले. येथें घोडीं व माणसें कैदेंत होतीं तशींच आजपर्यंत ठेविलीं. परंतु वैरण दाण्याची महर्गता, या मुळें घोडीं खराब झालीं. पुढें ठेवल्यानें चरिंदा उगवणें कठीण, घोडीं हीं मरावयास लागलीं, यास्तव व शिलेदार बीड प्रांतीचे त्यानीं श्रीमंत मातुश्री लक्ष्मीबाई शिंदे यांची पत्रें व जासूद सोडून देणेंविशीं आणिले म्हणोन विचार पाहतां पुढेंही कटकटीचा संबंध; यास्तव चरिंदा तीनशें रुपये घेऊन घोडीं माणसें सोडून दिलीं. वडिलांस विदित व्हावें म्हणोन लिहिलें असे. सेवेशीं श्रुत होय कृपा करावी हे विज्ञापना.

नं. ५०६८ ( श्रावण शु० १५–१५ आगष्ट. )

दोडवाड येथील कमावीसदार बापूजी–तीर्थो याचें मिरजेस बाळासाहेब यांस पत्र १३ रबिलावलचें—

"टिपूचें अस्ताव्यस्त जाहलेवर धोंडजीवाघ पळोन आला तो बिदनूर तालुकेंत जमाव दहा पंधरा हजारपर्यंत मिळून स्वारीशिकारी करीत बैसला आहे. राजश्री धोंडोपंत गोखले आपले जमावा सुद्धां हानगलावरी राहून सोंधें बिदनूर प्रांतांत स्वारी करून खेडींपाडीं लुटून आणतात. या करितां इंग्रज चित्रदुर्गचें ठाणें घेऊन बिदनूर तालुकेचे सरदेस हरिहर बसवापटणचे सुमारें दोन तीन पलटणें आलीं म्हणोन बाजारी वर्तमान आहे."

नं. ५०६९ ( श्रावण व० ३–१८ आगष्ट )

बाळकृष्ण महादेव बाळ यांचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेब यांस पत्र छ० १६ रबिलावलचें:—

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र करकंबचा मामलेदार भगवंतराव बहिरव याचें.

"राजश्री आबा चिटणीस व बाळोबा पागनीस व आम्ही येथें आले. समेटाची याद घेऊन आले आहेत त्या अन्वयें ठराव जाहलियास समजी होईल. नाहीं तर चार दिवस लागतील. पाटीलबावांची स्त्री[1]....रायानीं विटाळली होती ती नगरांत देवाधीन जाहली. शिंदे यांस सुतक आहे. दहा दिवस जाहले म्हणजे समजाविशीचा विचार होईल. यशवंतराव शिवाजी व देवजी गवळी येथें आले आहेत. नारायणराव बक्षी व बाळाभाऊ बायांजवळ नीरेचे पुलापलीकडे आहेत. पांच लक्ष रुपये बायांचे फौजेस जात आहेत. ते गेलियावर बाया जेजुरीस येतील. श्रीमंत पंत प्रधान व अमृतरावसाहेब व श्रीमंत नाना व शिंदे बाळोबासुद्धां एक चित्त होऊन बंदोबस्त होईल तो सुदिन! अद्याप मनें मिळालीं नाहींत. प्रथम दिवस आहे."

नं. ५०७० श्री (श्रावण व० ४–१९ आगष्ट.)

छ० १८ रबिलावल. सन मय्यातैन व अलुफ.

सेवेसीं विज्ञापना. श्री॥ महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी काल रविवारीं आवशीच्या तास रात्रीस करवीरास गेली होती. सालाबाद गोसावियांचें संतर्पण ×× असतें यास्तव व गोकुळी अष्टमीचा उत्साह याजकरितां गेले. अष्टमी करून स्वारी येणार. काल रविवारीं भोजन करून आपलें पतकसुद्धां संवद्लगेंनजीक गेले. आज प्रतिनिधि पंत जाणार होते. परंतु तूर्त महकुबी जाली. पंत अमात्य मात्र आज इंदुवारीं करवीरास गेले. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०७१ श्री. (श्रावण व० ६–२१ आगष्ट.)

छ० १९ रबिलावल. सन मय्यातैन व अलुफ.

विज्ञापना ऐसी जे. सरकार वाड्यांत श्रीमंतांजवळ आमचे प्रांतांतील गृहस्थ आहे. आमचा अत्यंत स्नेही. त्याणें वर्तमान आमचे वाड्यांत येऊन मजपाशीं एकांतीं सांगितलें कीं तुमचे यजमानाचे घरीं कलह उत्पन्न जाला आहे. त्यास येविशींचे वगैरे मजकूर श्री॥ राजश्री नानांजवळ बोलावयास (तुम्ही) आलां आहां. तिकडील बोलणें तुम्ही बोलतां. नानांची व श्री॥ राजश्री बाळासाहेब यांची ममता एक आहे. वरचेवर तिकडून पत्रें येतात. तुम्ही प्रविष्ट करून जाब घेऊन पाठवितां हें वर्तमान श्री॥ राजश्री पंतप्रधान

---

१ महाराजांच्या लष्करांतून नारोपंत करंदीकर याचें पत्र. २ मोरो आपाजी परांजपे वकील याचें पत्र बाळासाहेबास.

यांस विदित आहे. तुमचें नांवही श्रीमंतांस ठाऊक आहे. राजश्री चिंतामणराव यांचीं पत्रें श्रीमंतांस येतात. ( तीं ) प्रविष्ट होऊन जाब श्रीमंतांचे जातात. त्यास तीं पत्रें कोणीकडून प्रविष्ट होतात त्याचें नांव तुम्हांस ठाऊकच आहे. त्यावरून ( मी बोललों कीं, ) त्याचें नांव कशावरून कळावें ? दिनकरपंत पटवर्धन असतील तर नकळे ! म्हणोन बोललों. त्याणीं असतील ऐसें सांगितलें. तुम्ही बहुत सावधपणें असावें. तुम्हांवर राजश्री चिंतामणराव आपा यांचा रोष बहुत आहे म्हणोन ऐकितों. त्यांजपाशीं अण्णा म्हणोन कारभार करितात त्यांचा. ( ही तुम्हांवर रोष आहे. ) वेळ पडिला असतां तुमची स्थीत रहाणार नाहीं. याप्रमाणें बातमी आहे. बहुत सावधपणें असावें. याप्रमाणें सांगितलें. सत्य मिथ्या ईश्वर जाणे. असलेलें वर्तमान विनंती लिहिली आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०७२ श्री. ( श्रावण व० ७–२२ आगष्ट. )

पै॥ छ० २० रबिलावल. मय्या तैन. श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी करवीराहून बुधवारीं प्रातःकाळच्या प्रहर दिवसास लष्करच्या मुक्कामीं कोणूरावर दाखल झाली. भौमवारीं तिकडील फौज दोन हजार व पायदळ हजार ऐसें सेंडूरावर आलें. गोळागोळी झाली. गांव जाळला. नंतर लोक ठाण्यांत गेले. बाहेरचे लोक खंदकापर्यंत जाऊन मोर्चे देऊन बसले. इतक्यांत दिवस मावळल्यावर सर्वेच ठाण्यांतील लोक पन्नास पावणाशें बाहेर येऊन एक दोन मोर्चेवर जाऊन हुल्लड केली. पंचवीस माणूस ठार व जखमी वीस पंचवीस एकूण पन्नास माणूस जायां केलें. नंतर सारेच लोक व फौज उठोन लष्करच्या मुक्कामास गेली. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचा मुक्काम नाहींगलजेवर आहे व आपासाहेब गव्हाण येरनाळावर आहेत. सदरहू वर्तमान काल शेंडुराहून प्यादा आला त्यानें सांगितलें. काल बुधवारीं हें वर्तमान आलेवर येथून पन्नास खास बारदार पाठविले व राजाज्ञा संवदलगेवर आहेत त्यांस आणखी शेंपन्नास माणूस रवाना करणेंविशीं आज्ञापत्र पाठविलें. हुजूरची स्वारी आज उद्यां कूच करून संवदलग्यावर जाणार. कारण खासा स्वारी गेल्याशिवाय लोक नदीपार होत नाहींत. याजकरितां लोक नदीपार करणेंबद्दल जावयाचें.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र कागदीकराचें महाराजांच्या लष्करांतून. तसेंच पुढच्या नंबरचें.

नदी उतरावयाचा मानस बहुत आहे. परंतु काय घडतें पहावें. राजश्री यशवंतराव शिवाजी पथकसुद्धां चितळी माइणीवर आहे. व नरसिंगराव गुजर पांच चारशें लोकांनिशीं वड्डी त्रिमलीवर आहे. गुजर चतुरसिंग याचे निसबतीचा. इकडे यावयाचा बेत आहे. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

नं. ५०७३ श्री. ( श्रावण व० ८–२३ आगष्ट. )

छ० २१ राबिलावल. सन मय्या तेन व अलुफ. श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. आज रविवारीं भोजनोत्तर राजश्री राजाज्ञा व राजश्री हैबतराव गायकवाड व नारायणराव घोरपडे सेनापति व पंत प्रतिनिधि ऐसे आपापले पथकसुद्धां संवद्लगेवर निघोन गेले. चिखलीनजीक नदीपार व्हावें ऐसे आहे. सेंडुगस राऊत पन्नासपर्यंत आहेत त्याणीं काल कहीची तट्टें तीस व ऊंट तीन पाडाव करून आणिलीं. तिकडील लष्करची येग्नाळच्या डोंगरांत कहीं आली होती. कळावें. चिखलीनजीक राहून तलावे करणार अशी बोलवा आहे. महाराजही लौकरच कूच करून संवद्लगेकडे जाणार. नदी उतरावयाचा मनसबा आहे. काय होतें पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०७४ श्री. ( श्रावण व० ८–२३ आगष्ट. )

पै॥ छ० २६ रबिलावल. मय्यातैन व अलुफ.

सेवेसीं विनंती सेवक बापूजी तीर्थो दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २१ माहे रबिलावलपावेतों ( दोडवाड येथें ) वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर टिपूकडून धोंडजी वाघ पळून आला तो बिदनूर प्रांतांत जमाव करून तिकडे धामधूम इतके दिवस करीत होता. त्याचा उपद्रव भारी जाहला याजमुळें इंग्रज चित्रदुर्ग रायदुर्ग हरिहर वगैरे ठाणीं घालून बारा पंधरा हजारपर्यंत तुंगभद्रा नदी अलीकडे उतरून धोंडजी वाघावर जाऊन छापा घातला. फौज लुटून गेले. वाघ पन्नास पाऊणशें राउतांनिशीं पळून जाऊन उडगणींत शिरला आहे. तेथें फिरंगी जाऊन घेरले आहेत. राजश्री धोंडोपंत गोखले फौजेसुद्धां हानगलाजवळ आहेत. फिरंगी नदी उतरून आले आहेत. काय करितात न कळे. म्हणोन येणेंप्रमाणें वर्तमान राजश्री नारायणराव काळे नांदणीकर हे हानगलाहून (भाऊंच्या) लष्करास जावयाकरितां येथे वस्तीस आले होते त्यांनीं वर्तमान सांगितलें. फिरंगी यांनीं समागमें राजश्री पूर्णय्यास व बिष्टाप्पा

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

बादावी यांस आणिले आहेत म्हणे. ऐकींव वर्तमान विदित व्हावें म्हणोन विनंती लिहिली आहे. सेवेसीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५०७५ श्रीगणपति. ( श्रावण व० ८-२३ आगष्ट. )

चि॥ राजश्री बळवंतराव यांसीं प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद. उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहावें. विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें. वाळव्याचे मजकुराविशीं सरकारचें पत्र व श्री॥ राजश्री अमृतराव साहेब यांचीं पत्रें आलेलीं पाठविलीं आहेत. याचें उत्तर काय द्यावें तें ल्याहावें, त्याप्रमाणें जाब देऊं, म्हणोन लिहिलें तें कळलें व पत्रेंही पाहिलीं. ऐशीयास थोरात येथें चाकरीस होते ते निरोप घेऊन जाते समयीं 'आम्ही पुण्यास जाऊन सरकारांत आपले जाबसालाची विनंती करून बंदोबस्त करून घेतों' याप्रमाणें बोलोन गेले असतां तिकडे जाऊन आमचें नांव सांगतात म्हणोन ऐकतों. व येविशीं श्री॥ राजश्री अमृतरावसाहेब यांचेंही पत्र इकडे आलें होतें त्याचें उत्तर आम्ही लिहोन दिल्हे कीं, "थोरात सरकारांत विनंती करावयास जातों याप्रमाणें बोलून गेले आहेत. इकडून खासगीकडील सरंजामी महालांस कोणेविशीं दिक्कत पडावयाची नाहीं" व थोरातांसही याच अन्वयें लिहून पाठविलें जे, तुम्ही आमचें नांव सांगत असल्यास ठीक नाहीं. येथें सरकारांत विनंती करावयास जातों याप्रमाणें बोलोन गेल्याअन्वयें करणें. याचप्रमाणें आपणही उत्तर लिहून पाठवावें. मिरज प्रांतांतील थोराताचे नेमणुकेचा मजकूर तरी करवीरकरांच्या व शिंद्यांच्या फौजा मिरज प्रांतांत फिरोन कांहींच बाकी राहिली नाहीं. गांव वोस, त्यांत प्रजन्याची आपत्ति, तेव्हां सालमजकुरीं लावणीचें कठीण; या पर्यायें ल्याहावें. दुसरे काय ल्याहावयाचें ? पत्रें पाहून पाठविलीं आहेत. कळावें. रवाना छ० २१ रबिलावल बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ५०७६ श्री. ( श्रावण व० ८-२३ आगष्ट. )

पै॥ छ० २१ रबिलावल सन मय्यातन व अल्लफ.

पुरवणी[1] विज्ञापना. स्वामींनीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांकडून महबुल्लाखान रोहिले जमात सुद्धां स्वामींकडे पाठविले ते तेथें येऊन पावले त्यांचा मजकूर स्वामींनीं लिहिला तो अक्षरशः कळून आला. त्यास येविषयींची विनंती आम्ही केली नाहीं तों आगोदरच श्रीमंतानींच उत्तर सांगितलें कीं, तेथील प्रकार एक प्रकारचा समजण्यांत आला त्या अर्थें विश्वासू म्हणोन

१ कोणा कारकुनाचे पत्र भाऊंच्या लष्करांतून.

किल्यांत रहावयासी रवाना केले. तेथें जाऊन पोहोंचले असतां त्यांस बाहेर मंगळवार पेठेंत ठेविलें तेव्हां तेथें ठेवणें याचा प्रकार दिसत नाहीं. तेव्हां तेथे कशास ठेवावे ? त्यांसी लिहून पाठवावें. माघारे आणवितों. याप्रमाणें बोलिले. सेवेसीं विदित व्हावें यास्तव विनंती लिहिली आहे. बहुत काय लिहिणे हे विनंती.

नं. ५०७७ श्री. ( आषाढ व० ९–२६ आगष्ट. )

तालीक.

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ० २२ सफरपर्यंत वडिलांचे आशीर्वादें क्षेम असे. विशेष. वडिलीं छ० १९ तारखेचें पत्र पाठविलें तें काल अस्तमानीं पावलें. पत्रीं आज्ञा जे, "चि॥ राजश्री चिंतामणराव आपा तिकडे यावयाकरितां येथून निरोप घेऊन गोटाबाहेर जाऊन उतरले आहेत. तुम्हांस कळावयाकरितां लिहिलें आहे" म्हणोन आज्ञा, ऐसीयास चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपाचीं पत्रें 'चिरंजीवाची वांटणी व्हावी, अतःपर ठेवूं नये, म्हणोन आलीं त्याचीं उत्तरें पाठविलीं जे, वडिलांची माझी समक्ष भेट जाहलेवर विनंती करावयाची ती करीन. जशी वडिलांची आज्ञा होईल तशी वर्तणूक होईल. तथापि अतःपर बाजी हातीं रहात नाहीं असें लिहिलेनंतर चिरंजीवास लिहिलें, "येथील फौजेचा देण्याचा पेंच भारी व शिबंदीचा गवगवा, यास्तव माझें येणें होत नाहीं. तुम्ही अथवा चि॥ राजश्री बाबा येथें यावें. जी विनंती वडिलांस करावयाची ती तुम्हांस सांगतों. वडिलांस जाऊस श्रुत करावें. जशी आज्ञा होईल तशी वर्तणूक होईल." असें लिहिलें असतां वडिलांची आज्ञा मान्य न करितां निघोन गेले. आम्ही समजून सांगावें तर लोकांचें धरणें बसलें आहे म्हणोन उत्तर आलें. ऐसीयास वडिलांचे आज्ञेशिवाय माझा मजकूर पहिलेपासोन नाहीं. कांहीं विनंती करावयाची ती उभयतां चिरंजीवांतून एकास आज्ञा व्हावी. ते येथें आल्यावर मजकूर विनंती करावयाचा सांगेन. ते येऊन विदित करितील. वडिलीं समजोन आज्ञा करितील तशी वर्तणूक होईल. यास्तव चिरंजीव राजश्री चिंतामणराव यांस समजून सांगणें तें वडिलीं सांगावें. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५०७८ श्री. ( श्रावण व० ११–२७ आगष्ट. )

पे॥ छ० २७ रबिलावल सन मय्यातैन व अल्लफ. श्रावण.

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचा फौज

---

१ बाळासाहेबांनीं मिरजेहून परशुरामभाऊंस पत्र लिहिलें त्याची ही नक्कल.

सुद्धां कोणूरच्या मुक्कामानें कूच होऊन संवदलगेवर मुक्काम गेला. नदी उतरावयाची कस्त आहे. चार माणूस... व खास बारदार आहे. त्या लष्करासही सूचना लिहिली आहे. कळावें. राजश्री जोशीराव यानीं आपणाकडील कारकून राजश्री पांडुरंगपंत म्हैसकर यास राजश्री बाबा फडणीस यांजकडे पाठविले होते व पत्रही दिलें होतें. ऐशास त्यानीं म्हैसकर यांजबरोबर पत्राचें उत्तर दिलें व जबानी सांगोन पाठविलें कीं शिराळें तालुका व पन्नास हजारांचा सरंजाम लावून द्यावा म्हणजे समजूत करून देतों. त्यास काय निमित्त्य सरंजाम व शिराळें तालुका द्यावा हा आशय बोलण्याचा समजला नाहीं व जोशीराव याणीं व बचाजीपंत यानीं हुजूर येणेंविशीं बाबा फडणीस यांस लिहिलें असतां बाबानीं यावयाचा अनमान केला. कारण एक दोन वेळां आलों परंतु कोणतेंही बोलणें ठरलें नाहीं. यास्तव यावयाचा अनमान केला. त्यास त्याणीं एक वेळ यावें म्हणजे परस्परें बोलणें समजोन तहाचा ठराव होईल. त्यास बाबांच्या बोलण्याचा आशय समजोन मशारनिल्हे लष्करास लावून द्यावे याबद्दल हुजूरची आज्ञा समक्ष मला झाली कीं तुम्हीं जाणें. त्याजवरून मी विनंती केली कीं मला आज्ञेशिवाय जातां नये. मिरजेस लिहून पाठवीन. तेथून आज्ञा आणवून जाईन. त्यास हें मान्यतेस पडलें नाहीं. जाणें विशींचा आग्रह बहुत केला. जोशीराव व हिम्मतबहादर व बचाजीपंत यानींही सांगितलें. त्यावरून काल इंदुवारीं लष्करच्या कुचाबरोबरच निघोन कोगनोळीस आलों. आज वितिपात आहे यास्तव आज राहून......बुधवारीं निघोन सेवेशीं येतों. सेवेशीं विनंती करून मग बाबा फडणीस यांजकडे आज्ञा जाहल्यास जाईन. हुजूरची मर्जी तह करून घ्यावा असा हेतु दिसतो. राजश्री बाबूराव नाना यांचेही एक दोन निरोप जोशीराव यांस आले कीं तह करून घ्यावा यांत उत्तम आहे. त्याजवरून मशारनिल्हेस जोशीराव यांचा निरोप गेला आहे कीं, तिकडील बोलण्याचा आशय खचित घेऊन लिहून पाठवावें म्हणजे तुम्हांस येणेंविशीं हुजूरचें आज्ञापत्र सादर होईल. राजश्री मानाजी शिंदे यांचीं पत्रें आलीं. दोन रोज जाहले. त्यांतील अर्थ खर्चास पाठवावें म्हणजे सरंजामसुद्धां सेवेशीं भाद्रपदमासीं येतों असें आलें. त्याचें उत्तर गेलें कीं येण्याविशीं दिवतगत लावूं नये. सरंजामसुद्धां सत्वर यावयाचें करावें. खर्चास मागाहून तरतूद करून पाठवितों. याप्रमाणें गेलें. राजश्री नरसिंगराव गुजर आरवा नांगझरीवर पांच सातशें लोकांनिशीं आहे. यशवंतराव शिवाजी माईणीवर होते त्यास ते......सुमारें येणार होते. आज-

पर्यंत आले असतील. पेशजीचें संधान साताऱ्यास जावयाचें होतें तो बेत दिसतो. चतुरसिंग यास तिकडे येणेंविशीं गुजर यांचीं पत्रें आलीं, परंतु येथील निरोप त्यांस जाणेस होत नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०७९ श्री. ( श्रावण व० ११–२७ आगष्ट )

पै॥ छ० २५ रबिलावल. सन मय्या तैन व अल्लफ. श्रावण.

पु० ॥ विनंती सेवेशीं देवजी कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे, बिदरुराकडून येथील गृहस्थ गेले होते ते आले. तिकडील वर्तमान धोंडजी वाघ याचें ठाणें नगरास आहे. पंधरा दिवसांमागें लढाई इंग्रजाची त्याची झाली. मोड वाघाचा होऊन नगरास आला. आणखी जमाव जमवून त्यांची यांची लढाई होणार आहे. हरिहरपर्यंत इंग्रजांचीं पलटणें आलीं. श्रीतुंगभद्रा वरदानदीस पाणी भारी. उतार पडतांच पुढें येणार म्हणोन समजलें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. इंग्रजाकडील लोक पट्टणानजीक पंचवीस हजार आहे. नगर उर्फ बिदरूर येथें आठ हजार आहे. टिपूचें कुटुंब सर्व चेनापट्टणास पाठविलें. नगर आजपर्यंत इंग्रजानीं घेतले असतील. शिवमोघेकडे दोन पलटणें आलीं म्हणोन आतांच तिकडील वर्तमान आलें आहे. दिवसेंदिवस चढती आहे. कमी पाया नाहीं. वाघाकडे चद्रंगुत्ती व शिकारपूर उडगणी वगैरे ठाणीं आहेत, परंतु आठ पधरा दिवसांत सारीं स्थळें इंग्रजानीं कांइम कारितात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं.५०८० [१] श्री. ( श्रावण व० ११–२७ आगष्ट. )

पै॥ छ० २५ रबिलावल सन मय्यातैन व अल्लफ.

विज्ञापना. श्रीमंत त्रिवर्ग यांचें व श्री॥ राजश्री नाना यांचें चित्त मिळत नाहीं. लौकिकार्थ परस्परें गोड बोलणें होतें. परंतु अंतर्यामीं दिवसें-दिवस अधिक अधिक किंतु वाढतात. एकविचार होऊन पुढें चालावें असें श्रीइच्छेनें घडेल तेव्हां घडो! शिंदे यांचे घरचा कलह मिटावा असा विचार होत आहे, परंतु यथास्थित बंदोबस्त होईल तेव्हां खरा! दौलतराव अलिजा-बहाद्दर यांची मातोश्री नगरास होती ते देवाज्ञा जाहली. सुतक निवृत्त जाल्या-नंतर जेजुरीस बायांची भेट व्हावी असा विचार होत आहे. बायांचें म्हणणें तो भेट घेत नाहीं. राजश्री बाळोबातात्या व आबा चिटणीस व बाबूराव आंगरे आले आहेत. आंतून कितीएक गुढघे आहेत कीं हा एकविचार न व्हावा

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. पत्र बाळासाहेबांस शहापुराहून. २ मोरो आपाजी परांजपे यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र.

असें आहे. मख्य अलिजाबहाद्दर यांचा विचार तरी कळतच आहे. मागाहून निश्चय काय ठरतो तो लिहून पाठवितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०८१ श्री. ( श्रावण व० १२–२८ आगष्ट. )

पै॥ छ० २९ रबिलावल सन मय्या तैन व अल्लफ. श्रावण.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक देवजी कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० २६ रबिलावलपर्यंत स्वामीचे कृपे सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. यानंतर इकडील वर्तमान तर दोडवाडाहून आज वर्तमान आलें जे, इंग्रजानीं वाघ यास धुडाऊन देऊन बिदरूर उडगणी शिकारपूर वगैरे ठाणीं कायम करून तुंगभद्रेच्या ऐलीकडे आले. जितका तालुका पट्टणाकडे वहिवाटत होता तितका झाडून घेणार. त्याचे लागत्यास सरकारचे तालुके आहेत त्यांस उपद्रव करतीलसें चिन्ह दिसतें. शिरहट्टीकडून वर्तमान आलें असेल. धारवाडास येणार म्हणोन बाजारी वर्तमान आहे. राजश्री धोंडोपंत गोखले हनगलानजीक आहेत. पुढें जाणेंचा दम दिसत नाहीं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०८२ ( भाद्र० शु० ३–२ सपटें. )

श्रीपतरावें मोरेश्वर यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र पै[1]॥ छ० १ रबिलाखर भाद्रपद सन मय्यातैन—

"करवीरकर यांची फौज नदीअलीकडे आली. त्यांचा इरादा मोकाबला करावा असा आहे. वडिलांचाही इरादा आहे कीं, त्यास अंगावर घेऊन मोहला पावावा. मग श्रीकृपेकडून काय होईल तें खरें!"

नं. ५०८३ श्री. ( भाद्र० शु० ५–४ सपटें. )

छ० ५ रबिलाखर. सन मय्यातैनव अल्लफ. भाद्रपद.

सेवेशीं विनंती सेवक गंगाशराम पेठे दोन्हीकर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ३ रबिलाखर मुक्काम लष्कर पट्टणकुडी येथें सुखरूप असों. स्वामींचा निरोप घेऊन निघालों ते छ० २ रबिलाखरीं मंगळवारीं लष्करांत सुखरूप पावलों. लष्कर झाडून एकजागांच आहेत. वरकड मजकूर अधिकोत्तर नाहीं. मागाहून होईल तें सविस्तर लिहितों. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ पत्र शहापूराहून. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची. ३ पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

नं. ५०८४ श्री. ( भाद्र० शु० ११-१० सप्टें. )

छ० १६ रबिलाखर. सन मय्यातैन.

राजश्री गंगाधर रावजी गोसावी यांसीं--

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव शिंदे. दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. मौजे भालवणी येथील ऐवजाचे वसुलाकरितां ती॥ मातुश्री बाई यांजकडून जयराम बाबूराव पागे यांसी पाठविलें होतें त्यास आपण पागासुद्धां धरून नेले आहेत म्हणोन समजलें. त्याजवरून आपणास लिहिलें आहे. तरी मशारनिल्हेकडील पागेची घोडीं इकडील आहेत त्यापक्षीं चीजवस्त घोडीं माणसेंसुद्धां पागे यांस सोडून देवावें. रवाना छ० ९ रबिलाखर बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.







नं. ५०८५ श्री (भाद्र० शु० १३-११ सप्टें.)

छ० १० रबिलाखर. भाद्रपद. सन मय्या तैन व अलफ.

विज्ञापना. इंग्रजानीं हरपनहळ्ळीसुद्धां पलीकडील प्रांताचा बंदोबस्त करून सोंदेंप्रांतीं जावयाकरितां तुर्क होनहळ्ळीवर आले आहेत. सोंदें प्रांतांत ठाणीं राजश्री धोंडोपंत गोखले यांणीं घातलीं सबब सरकारचीं पत्रें ठाणीं सोडून देणेंविशीं इंग्रजानीं आणून लाविलीं आहत. अद्याप ठाणीं सोडिलीं नाहींत. तेथील बंदोबस्त करून इंग्रज लौकरच माघारा जाणार. एक राजा कांहीं पलटणें घेऊन आपले स्थळास गेला. यप्रमाणें वर्तमान आहे. बातमी ठेवली आहे. वरचेवर अधिकोत्तर येईल ती विनंती लिहितों. या प्रांतीं अद्यापि पर्जन्य नाहीं. पुढें काय करितो पहावें. गोखले यांचा उपद्रव बहुत या देशीं

१ बाळकृष्णपंत लाग लक्ष्मेश्वरचे मामलेदार यांचें बाळासाहेबांस पत्र.

आहे. तूर्त त्यांस ठिकाण कोठें नाहीं असें दिसतें. आज्ञेप्रमाणें येथील ठाणें-याचा बंदोबस्त आहे. शिरटीचे किल्ले यास कांहीं दोन हजार रुपयेपर्यंत खर्च केला असतां लहान मोठे उपद्रवाचें भय नाहीं. गुदस्तां तें ठिकाण होतें याज-करितां तालुका राहिला. आज्ञा जाहली तरी थोडें बहुत काम करितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०८६ ( भाद्र० शु. १४–१२ सपटें. )

बाळकृष्ण महादेव बाळ याचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० ११ रबिलाखरचें–

" राजश्री दौलतराव शिंदे श्री॥ पंत प्रधान स्वामीचे येथें श्रीगणपतीचे समारंभांत आले होते. राजश्री बाळोबा पागनीस व धोंडिबा व बाजीबा मोदी व यशवंतराव शिवाजी यांची भेट करविली. वस्त्रें जवाहीर श्रीमंतांनीं दिलें. दौलतराव वाड्यांतून गोटास गेले. पागनीस व चिटणीस आबा वगैरे कार-भारी श्री॥ नानांकडे आले होते. भेट जाली. नानानीं पागनीस व धोंडीबास व बाजीबा मोदी यास वस्त्रें व जवाहीर दिल्हें. त्याजवर मागती आबा व बाळोबा व धोंडीबा व सदाशिव मल्हार सरकार वाड्यांत बोलणेंयास आले होते. तीन घटका खलबत होऊन नानांकडे आले. येथेंही खलबत होऊन गेले. आज उद्यां मागती येणार आहेत. प्रस्तुत खलबत इंग्रजप्रकरणीं आहे. टिपूची सर्व दौलत इंग्रजांनीं घेतली यामुळें चढोन गेले आहेत. सविस्तर मागाहून ठराव होईल तो लिहून पाठवीन. बाया शिंदे यांची व दौलतराव शिंदे यांची भेट अद्यापि नाहीं. बहुतकरून समेट होत आली आहे. एक दोन कलमांचे लढे आहेत ते उलगडले याजवर भेट होईल. शिंदे येथून गेल्याविना बंदोबस्त होत नाहीं. अद्याप प्रथम दिवस आहे. सर्वांचीं चित्तें एक होऊन बंदोबस्त पूर्ववत् होईल तो सुदिन ! वडिलांची सांप्रत प्रकृत कशी आहे व श्री॥ महाराज कोठें आहेत, तह घडतो किंवा नाहीं हा भाव लिहून आला पाहिजे. इंग्रज यांजकडील पलटणें कोठपावेतों आलीं आहेत, मुलखाचा बंदोबस्त कोठपावेतों जाला, हें लिहून यावें."

नं. ५०८७ ( भाद्र० शु० १४–१३ सपटेंबर )

सेवेशी मोरो आपाजी परांजपे सा॥ नमस्कार विज्ञापना तागायत छ० १२ रबिलाखर भृगुवासर सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. बाया शिंदे यांचा तह ठराव जाला. फौजेचा फडशा राजश्री बाळोबा तात्या याणी करावयाचा ( तो ) केला. त्यापैकीं पुण्याहून तीन लक्ष रुपये बायांचे

सैन्यांत पाठविले. दौलतराय शिंदे यांचा मानस बायांची भेट घ्यावी असा फार आहे. परंतु तो विचार बाया कबूल करीत नाहींत. " भेटीचें प्रयोजन काय आहे ? तुमची दौलत तुम्ही करून सुखरूप असावें. आम्हांस सरंजाम व किल्ला अशेरी द्यावयाचा ठरावांत आला त्याचप्रमाणें ठाणीं बसलीं म्हणजे आम्ही परभारी जाऊं. वरकड फौज आम्हांजवळ आहे त्यास ज्याची खातर जमा तुम्हांस पटेल त्यास ठेवणें. बाकीचे रहातील ते आपले घरीं जातील अथवा आम्ही ठेवूं. " वरकड तहही ठरेल. फार करून कलह मिटला आहे. श्री॥ राजश्री पंतप्रधान यांणीं श्री॥ राजश्री अमृतराव यांस दौलतराव शिंदे यांजकडे श्रीगणपतींचे उत्साहाकरितां बोलवावयास पाठविलें होतें. यावयाचा करार केला त्यास नवमीचे दिवशीं येतों म्हणून सांगितलें, परंतु ते दिवशीं आले नाहींत. दशमीस आले. बारा घटका दिवसास आले. वाड्यांत दोन घटका श्रीचे दिवाणखान्यांत बैठक जाली. राजश्री बाळोबा तात्या, धोंडीबादादा, आबा चिटणीस, गोपाळराव भाऊ, बाबूराव आंगरे मामा, बाळाजी शेटचाकडी विठ्ठलपंत व बाजीबा मोदी याप्रमाणें सर्व मंडळी आली होती. श्री॥ राजश्री पंतप्रधान आलिजाबहाद्दर यांस वस्त्रें देत होते परंतु घेतलीं नाहींत. राजश्री बाळोबातात्यास वस्त्र कंठी शिरपेंच दिला व मोदी यास वस्त्रें, येणेंप्रमाणें आणखी दोन तीन असामी दौलतराव यांणीं पेशजी अटकेंत ठेविले होते त्यांस दिलीं. अलिजाबहाद्दर यांची स्वारी निघोन गेली. नंतर राजश्री बाळोबा तात्या व वरकड मंडळी राजश्री नाना यांजकडे आली. नानांचे दिवाणखान्यांत बैठक जाली. दोन घटका सर्व मंडळीसुद्धां एक जागां होते. नानानीं बाळोबातात्या यांस कंठी शिरपेंच दिला. परस्परें शरीरप्रकृति पुसिल्या. नंतर आणखी मोदी वगैरे तीन असामींस नानानीं वस्त्रें दिलीं. नंतर निरोप घेऊन निघोन गेले. बायाशिंदे अद्यापवत् नीरेच्या पुलानजीक आहेत. शिंदे फौजा राजश्री यशवंतराव होळकर यांजवर पाठविणार. होळकर यांणीं उज्जनीस अंमल बसविला. पांच लक्ष रुपये रोख सावकारी वगैरे मिळोन उज्जनीस घेतले. पंचवीस हजार फौज जमाव धरिला. शंभर तोफा, याप्रमाणें जमाव भारी आहे. शिंदे यांस तिकडील पायबंद भारी बसला आहे. आपल घरची कलागत मिटवून घेऊन तिकडे जावें असें सवाच मत जाहलें आहे. तूर्त प्रसंगीं अलिजाबहाद्दर बाळोबातात्या जें सांगताल तें ऐकतात. समेट आठ चार दिवसांत होईल ऐसा आह. श्री॥ राजश्री भाऊ-

साहेब याणीं राजश्री बाळोबातात्यांस एक दोन पत्रें पाठविलीं होतीं ( कीं ) दोन पलटणें करवीरवासी यांचे परिपत्याबद्दल द्यावीं. रोजमुरा नेमणूक करून पाठवावा त्याप्रमाणें देऊं म्हणून लिहिलें होतें. राजश्री बाळाजीपंत सहस्रबुद्धे याणीं पत्रें राजश्री बाळोबातात्यास दिलीं. त्याणीं उत्तर केलें कीं, आमचे घरचा कलह मिटे तोंपावेतों इकडून एक माणूस देखील येत नाहीं. आणखी एक प्रकार हा—बायांच्या कराराद्री ठरल्या त्यांत कलम लिहिलें आहे कीं, करवीरवासी महाराज यांचा व भाऊ यांचा तह सरकारांत आलिजाबहाद्दर याणीं बोलोन ठरावांत गोष्ट आणावी व भाऊसाहेब यांज-पाशीं अलिजाबहाद्दर याणीं शहाणा माणूस पाठवून तह करावा. त्याप्रमाणें बायानीं यादींत मुद्दा लिहिला आहे. त्यास आम्हास पलटणें देतां येत नाहीं; याप्रमाणें उत्तर जालें. पलटणांचा विचार राहिला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०८८ श्री. ( भाद्रपद व० २–१६ सपटेंबर. )

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत महाराज यांचा मुक्काम हमीदवाडावरच आहे. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांचा मुक्काम पट्टणकुडीवर आहे. करवीराहून दोन तोफा एक...हणम ऐशा दोन आणविल्या. लष्करास दाखल झाल्या. पहिल्या दोन व हल्लींच्या दोन एकूण चार झाल्या. लष्कर महाराजसुद्धां पलीकडेच आहे. टोकरे झाडून नदीबाहेर काढून ठेविले आहे. कारण लोक न पुसतां जातात याजकरितां नदी तीरानें चौक्याही ठेविल्या आहेत व जागाही डोंग-राचा आसरा धरून उतरले आहेत. लढाईची कस्त भारी आहे. एक वेळ लढाई खातरजमेची द्यावी. त्यांत यश अपेश देणार भगवंत. परंतु हा जागा सोडावयाचा नव्हे. निपाणीस तोफा लाऊन गांव घेणार. तेथेंच परीक्षा त्या लष्कराची पहावी असा इकडील संकेत, कीं निपाणीस आपण बसलों असतां तिकडील लष्करचा दम कसा आहे तो समजतो. तेथें कुमक न झाली तरी मग दम समजला. लढाई बेजरब द्यावी असा आहे. अळत्यावर श्रीमंत राजश्री आपासाहेब उतरले असें वर्तमान अळत्याहून आलें आहे. राजश्री धोंडोपंत गोखले फौजसुद्धां सत्वरच भाऊसाहेबांकडे येऊन पोंहचणार असें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. महाराजांची फौज दोन हजार अडीच हजार व पायदळ दीडहजार दोन हजारपर्यंत आहे. हे विज्ञापना.

पै॥ छ० रबिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपद.

---

१ पत्र नारोपंत करंदीकर याचें महाराजांच्या लष्करांतून. २ चिंतामणराव आपा.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ५०८९ श्री. ( भाद्र० व० ३-१७ सप्टें. )

पै॥ छ० १७ रबिलाखर. सन मय्या तैन व अलुफ. भाद्रपद.

सेवेशीं विनंती सेवक बाळाजी दामोदर व गणेश राम पेठे दोनी कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १६ रबिलाखर मुक्काम लष्कर पट्टणकुडी येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. महाराजांची फौज येथून दोन कोसांवर आहे. आमचे लष्करची कही व गुरें पाडून नेतात. काल आमचे कारखान्याकडील दारूगोळयाचा भाडेकरी याचे बैल पन्नास शेंडूरकर यानीं नेले. अद्यापि येथें मुक्काम किती दिवस होतात न कळे. विठोजी सुतार यास आणवणेंविशीं श्रीमंत राजश्री भाऊसाहेबानीं पत्र दिलें तें सेवेशीं पाठविलें आहे. सुतारास लवकर पाठवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०९० श्री. ( भाद्र व० ३-१७ सप्टें. )

पै॥ छ० १७ रबिलाखर. सन मय्या तन व अलुफ. भाद्रपद वद्य ४ बुधवार. नऊ तास रात्र.

सेवेशीं विज्ञापना. भौमवारीं प्रातःकाळच्या प्रहर दिवसास महाराजांची स्वारी फौजसुद्धां तोफा वगैरे सरंजाम घेऊन निपाणीनजीक गेले. तिकडील लष्कर तयार होऊन आलें. वोढेंत पायदळ घातलें होतें. परस्पर तोफाची मारगिरी थोडीबहुत झाली. इकडील पायदळ व फौज वोढ्यानजीक जातांना वोढेंतील पायदळ निघोन गेलें. तिकडील रोख फौज होती तीही पळों लागली......त्या फौजेंत होते तेथून नेट..........च जाहला ते समयीं इकडील...............लोन घेतलें. मालोजी पांढरे............. व घोडीं दहा पांच पडलीं. महाराजांबरोबरचे लोक यानीं फिरून नेट केला ते समयीं तिकडील लोकांनीं काढतें घेऊन निघाले. भाऊसाहेबांस दोन तीन जखमा लागल्या. नंतर पाडाव आले. विश्वासराव घाटगे यानीं आणिले. नंतर देवाज्ञा झाले. लष्कर चिकोडीकडे गेलें. गोट दरोबस्त लुटले. झाडून सरंजाम गोटातच होते. गोपाळकाका यांचे चिरंजीव चिंतोपंत पाडाव आले. एक दोन जखमा आहेत. खैर आहेत. येसाजीपंत मजमदार तेही पाडाव आले. याप्रमाणें वर्तमान जाहलें. तोफा व हत्ती वगैरे झाडून सलतनत आणिली. पट्टणकुडी, व लाट व निपाणी येथें ठाणीं घालावयास लोक गेले. बहुत-

---

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस. २ पत्र नारो हरि करंदीकर यांचें. महा-
राजांच्या लष्करांतून मिरजेस

करून ठाणीं पडलीं असतील. हमीदवाड्यावरून लष्कर उद्ईक बुधवारीं कूच होऊन पट्टणकुडीच्या मुक्कामास जाणार. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०९१ श्रीगणपति. ( भाद्र० व० ४–१८ सप्टें. )

पै॥ छ० १७ रबिलाखर. मय्यातैन. व अल्लफ. भाद्रपद व॥ ४ बुधवार. सकाळचा दीडप्रहर दिवस.

अपत्यें रामचंद्रानें शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. काल भौमवारीं सायंकाळचे सहा घटका दिवसास करवीरकरांची लढाई जाली. आपली फौज नामोहरम होऊन माघारी फिरली. नंतर वडील मागें लष्करापुढें तयार होऊन उभे होते, सामान थोडें होतें, तों करवीरकरांचे फौजेची गांठ पडली. ते समयीं वडील जातीनिशीं तट खावून जागा धरून उभे राहिले. 'मागें फिरा' म्हटलें असतां फिरेनात. त्यामुळें जाग्यावर त्यांचे हस्तगत ( झाले. ) दोन जखमा आहेत. कोणी नाहीं म्हणतात. ऐसें आहे. झाडून दौलत गर्द जाली. आम्ही व चि॥ राजश्री बाबा, दाजी, व ती॥ राजश्री विठ्ठलराव व हरबा अण्णा मात्र पळ खाऊन रात्री मध्यरात्रीस अंकलीस आलों. मला दोन जखमा. उजवे हाताचे दंडावर गोळी लागून पार जाहली. बाबास उजवे हाताचे अंगठ्याजवळ तरवारेची पुतळी लागली आहे. विठलराव बाबास डावे मांडीस गोळी लागून पार जाहली. बहुत माणूस कामावर आलें. झाडून बुणगेंसुद्धां दौलत गर्द जाली. आम्ही जखमा लागल्या आहेत त्यामुळें नदी उतरून अलीकडे मांजरीस आलों. बाबा फौजसुद्धां अंकलीवर आहेत. त्यास फौजेंत खर्चीस नाहीं; तर हजार दोन हजार रुपयांची तरतूद करून पाठवावी. उद्ईक प्रातःकाळीं नदी उतरून चिरंजीव सुमार पाहून अलीकडे येतील. फौज दम धरील असें नाहीं. बळवंतराव दीक्षित व विनोबा आबा व श्रीपतराव याणीं जागा सोडिली. परंतु कोणीकडे गेले याचा शोध नाहीं. ईश्वरें मोठा गहजब केला तो लिहितां येत नाहीं. रवाना भौमवार तीन प्रहर रात्र. विदित होय हे विज्ञापना. चि॥ राजश्री बाबा फडणिसांस पुण्यास लौकर पाठवून द्यावें, पुण्यास राजश्री नानांस व बाळोबातात्यांस वृत्त जलदी कळवावें. गर्द होणेंत बाकी राहिली नाहीं. पुढें ईश्वरइच्छा प्रमाण हे विज्ञापना. ए॰ उपराळा लौकर व्हावा म्हणोन सूचना ( पुण्यास ) ल्याहावी हे विज्ञापना. पालखीचे भोई लौकर पाठवावे. हे विज्ञापना.

---

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ५०९२ श्रीगणपतिर्जयति. ( भाद्र० व० ४–१८ सप्टें. )

छ० १८ रबिलाखर. सन मय्यातैन व अलुफ. भाद्रपद व॥ ५

अपत्यें चिंतामणीनें विज्ञापना. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. "ती॥ भाऊसाहेब यांस लढाईत तीन जखमा लागोन कामास आले. मोठी वाईट गोष्ट जाली. तुम्ही हल्लीं वारणा उतरून वाडीच्या रानांत आलां म्हणोन कळलें. ती॥ राजश्री आबा व चिरंजीव विठ्ठलराव बाबा अर्धरात्रौ आले. आबांस पांच सहा जखमा आहेत व विठ्ठलराव यांस पायास गोळी लागोन पार जाली आहे. वारणेस उतार आहे. सावध असावें." म्हणोन लिहिलें, ऐसीयास वडील सर्वांचें छत्र गेलें ! श्रीइच्छेस इलाज नाहीं. वडिलांचा काल जालेचें पत्र नारो हरि यांचें इचलकर्जीस काल सायंकाळीं आलें. ऐकलेपासून कोणते गोष्टीचें चैन पडत नाहीं असें जालें. रात्रौ चंद्रोदय जालेवर काल बुधवारीं निघोन ++ कृष्णा, वाडीजवळ उतरून सांगलीस मुक्काम केला. रात्रौ येतांना चिपरीकर व दानोळीकर याणीं बाहेर निघोन गोळ्या व बाण टाकिले. रात्रीचा मामला. कांहीं समजेना. चिपरीकरानीं फारच दाटी करून जामदारखान्याचीं वगैरे उंटें पांच नेलीं. ती॥ मातुश्री रमाबाई मावशी व श्री॥ राजश्री नारायणराव बाबा समागमें इचलकर्जीहून येथें आले. मातुश्री व श्रीमंत समागमें होतीं याजमुळें उंटें सोडवावयास गांठ पडली नाहीं. रात्रीचा मामला. अभ्र आलें याजमुळें कांहीं न समजे, म्हणोन उंटें राहिलीं. ती॥ राजश्री आपासाहेब यांचें पत्र काल मंगळवारचे तेरखेचें सायंकाळीं तेथें आलें. त्याणीं इचलकर्जीस राहों नये, कूच करून कृष्णापार होऊन लौकर जावें, म्हणोन लिहिलेवरून काल चंद्रोदयीं निघोन आलों. दानोळीकरानीं पहांटेचे फारच दाटी करून गोळ्या मारिल्या. बुनगें संभाळून झांजर झांजर आहे तों वारणातीरीं उतारास मागें तोंडावर उभे राहून उतरून आलों. चिपरीस शिरोळचा जमाव कांहीं आला होता त्यानीं बुनग्यावर दाटी केली हें समजोन तिकडे गेलों. तों उंट गांवांत नेले. दिवस असता तर गांव जाळला असता. रात्रीचें गांवावर कसें जावें ? किती जमाव आहे कांहींच समजेना. तेव्हां बाकी राहिलें बुनगें सांभाळून आलों. जामदारखाना व माझे पोशाख झाडून गेले. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

---

१ पत्र बाळासाहेबांस सांगलीहून.

नं. ५०९३ श्री. ( भाद्र० व० ४-१८ सपटें. )

छ० १७ रबिलाखर. सन मय्या तैन व अलुफ. भाद्रपद्र.

सेवेशीं गणेश गोविंद[१] कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १७ रबिलाखर बुधवार प्रातःकाल प्रहर दिवस. यथास्थित असे. विशेष. काल तिसरे प्रहरीं करवीरकर यांची फौज तयार होऊन निपाणीजवळ आलियाचें वर्तमान श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांस कळल्यावर श्रीमंत राजश्री आपासाहेब तयार होऊन पुढें त्यांचे तोंडावर गेले. तेथें करवीरकरानीं तोफांची मारगिरी करूं लागल्यानंतर श्रीमंतानीं आपणाकडील तोफा नेऊन मारगिरी करूं लागले. चाळीस पन्नास बार तोफांचे झाले. तों त्यानीं चालून घेतलें. आपासाहेब जागा सोडून निघाले नाहींत. तेव्हां तिकडून निघून दाजीसाहेब यांचे फौजेवर चालून घेतलें. तेव्हां ते कचकरून माघारे निघाले. भाऊसाहेब गोटांत तयारच होते ते पालखींतून उतरून घोड्यावर बसले आणि निघाले. तों करवीरकरांची फौज गोटांत शिरली. लष्करची लुटालूट होऊन जिकडे ज्यास मार्ग सांपडला तिकडे निघाले. याप्रमाणें फौजेचा मोड जाहला. खासे पाठीमागे होतें तेथेंही फौज जाऊन गोट लुटला. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब खासा कोणीकडे गेले, काय जाहलें, हें वर्तमान अद्याप समजलें नाहीं. मोड जाहला ते समयीं येकसलकर भोंसले दाजीसाहेब यांचे गोटांत होते त्यांजपैकीं चार स्वार आज प्रातःकाळीं येथें आले. त्यानीं जबानी सविस्तर सांगितलें तें सेवेशीं लिहिलें आहे. वर्तमान तहकीक आहे. चिकोडीकर शिरगांवास आले व केसोपंत काळे शिरगांवास निघोन आले. स्वारांनीं पाहिलें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०९४ श्री. ( भाद्र० व० ४-१८ सपटें. )

सेवेशीं[२] विज्ञापना. भाऊसाहेब पाडाव आले. घाटगे यांनीं घोड्यावर पुढें घेतले होते. त्यास महाराजांच्या समक्ष आलेवर घोड्यावरून ढकलून दिलेवर 'मारा' म्हणोन मुख्यानीं सांगितलें. मग दहा पांच असामीनीं वार टाकिले. तोंडावर तो बाकी तिळमात्र जागा राहिली नव्हती. सर्वांस दिक्क नाहीं. अग्निसंस्काराविषयीं खटपट बहुत केली. त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावें ? परवानगी घेतली. मुक्कामास प्रेत आणण्याचा प्रयास पडला. प्रहर

---

१ हा मिरजकरांच्या थक्कांवरचा कारकून. याचें हें बाळासाहेबांस पत्र.

२ नागो हरि कांद्रीकर यानें लढाईच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं हें पत्र लिहिलें बाळासाहेबांस.

रात्र जाहली. उपाय नाहीं, तेव्हां प्रेत घोडीवर पुढें घेऊन आणिलें. तों तीन प्रहर रात्र झाली. नंतर दहनाचें साहित्य मिळवून भडाग्नि दिली. मी हमदोच्या वाड्यांत एक रोज राहून अस्थि काढून मिरजेस रवाना करितों. आपाजी गाईकवाड लढाईचें वगैरे जबानी सांगतां कळों येईल. सेवेशीं श्रुत होय. येथील चढाचा विचार बोलण्याची वल्गना होतात त्या कर्णेंकडूनही ऐकवत नाहींत ! ईश्वर इच्छा प्रमाण ! भावितव्यास उपाय नाहीं. सार्थकाची वगैरे याद् मागाहून पाठवितों. हे विज्ञापना. अग्निसंस्कार व्हावा असें नव्हतें, परंतु स्वामींचे पुण्यप्रतापेंकरून सेवकाचे हातून सार्थक जाहलें. कळावें. हे विज्ञापना. रवाना प्रातःकाळ. बुधवार.

नं. ५०९५ श्री. ( भाद्र० व० ४–१८ सप्टं. )

पै॥ छ० १७ रबिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपद वद्य ४ बुधवार आठ तास दिवस.

अपत्यें केसो सदाशिव काळे साष्टांग नमस्कार विज्ञापना. काल मंगळवारी दोन प्रहरानंतर महाराज चालून आले. लढाई सुरू झाली. श्रीमंत राजश्री आपासाहेबानीं त्यांचे फौजेचा मोड केला. परंतु बाजूची फौज उघळली त्यामुळें गळाठा झाला. मग त्यांजकडील लोकांनीं चालून आले. वडील मागें होते तेथपर्यंत आले. गांठ पडली. हस्तगत झाले. त्रिवर्ग चिरंजीव अंकलीचे सुमारें आले. राजारामानें सांगितलें. बहुता मुखीं खरें आहे. आपासाहेबांचे उजवे हातास गोळी लागली. जखम भारी आहे. गोष्ट वाईट घडली. ईश्वरइच्छेप्रमाणें जाहलें. सर्व लष्कर लुटलें गेलें. चौमार्गें लोक निघाले ते एडुरापासून तेरदळापर्यंत उतरावयास गेले आहेत. पुढें कोठें तोंड दाखवावयास जागा नाहींशी जाहली. इचलकरंजीकडे गेले[3] आहेत त्यांस पत्र पाठवून धीरे धीरे वारणापार करावें हें चांगलें आहे. अनमान न करावें. परस्परें ज्या गोष्टी जाल्या त्या समेटांत आणाव्या. सर्व प्रकारें वडील सर्वांस आपण आहेत. आपलें चित्त कोमळ आहे. फार लिहिणें शक्त नव्हे. पत्र गुप्तरूपें मनांत वाचावें. याउपरी वडील मुक्त होईसें जरूर तें करावें. वे॥ राजश्री शामभटबावास विनंती करावी. हें पत्र एडुराहून लिहिलें आहे. रवाना बुधवार प्रातःकाळची दोन घटका रात्र. आम्हांकडे ओळखीचे दहा स्वार व दहा प्यादे पाठवावे. सर्व मंडळी येईल. हे विज्ञापना.

---

१ हमादवाडा येथें. २ पत्र बाळासाहेबांस. ३ चिंतामणराव.

नं. ५०९६ श्री. ( भाद्र० व० ४—१८ सप्टें. )

पै॥ छ० १८ रबिलाखर. सौम्यवार. सात तास रात्र. सन मय्यातैन व अल्लफ भाद्रपद.

सेवेशीं विज्ञापना तागायत बुधवार प्रातःकाळ वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल मंगळवारीं चतुर्थीस श्रीमंत राजश्री भाऊसाहेब यांची व राजमंडळकरांची लढाई जाहली. तिसरे प्रहरापासून संध्याकाळच्या दोन घटका दिवसपर्यंत जाहली. इकडील फौजेचा मोड जाहला. येथील स्वार राजश्री दादो आपाजी व सूर्यवंशी वगैरे......असामी......रातोरात पहांटेच्या चार घटका रात्रीस येथें आले. कोण कोठें गेले हें पुर्तेपणीं समजलें नाहीं. राजमंडळची फौज गोटापावेतों आली इतकें यांणीं पाहिलें. पुढें काय झालें हें नकळे. पक्की बातमी आली नाहीं. येथून माणसें पाठविलीं आहेत. आपणाकडे बातमी येईल. असा प्रकार घडला ! पुढें आम्हांस बुद्धिवाद लिहिणें तो लिहावा. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५०९७ श्रीगणराज. ( भाद्र. व० ४—१८ सपटेंबर. )

पै॥ छ० १७ रबिलाखर. सन मय्या तैन व अल्लफ. भाद्रपद.

विज्ञापना. लष्कराहून स्वार आले त्यांनीं वर्तमान सांगितलें. काल भौमवारीं महाराजांची फौज तोफा पायदळसुद्धां तयार होऊन निपाणीजवळ येऊन उभे राहिल्याचें वर्तमान समजोन इकडील फौज चिरंजीव राजश्री आपा व दाजी तयार होऊन तोंडावर गेले. लढाईचें तोंड लागलें. करवीरकरानीं दोन टोळ्या करून चालोंन घेतलें. इकडील लढाई बिघडली. मागां वडिलांची स्वारी तयार होऊन येत होती. इकडील मोढाचे लोक व करवीरकरांचे सरमिसळ जाहल्यामुळें कोणाची खबर कोणास नाहींशी झाली. इकडील लोक चहूंकडून वाट फुटेल तिकडे निघाले. तोफा हत्ती ( जाग्यावर ) राहिले. वडिलांकडील वगैरे मंडळीची स्वशुद्ध बातमी समजली नाहीं. असें वर्तमान सांगितलें. त्यावरून पक्कें वर्तमान आणावयाकरितां माणसें रवाना केलीं आहेत. वडिलांकडे विशेष वर्तमान असेल तें लिहावयाची आज्ञा व्हावी. चिरंजीव चिंतामणराव आपा यांसी सावधतेविशीं मर्जीस आल्यास लिहावें. रवाना छ० १७ रबिलाखर. बोरगांवचें पत्र आलेलें पाठविलें आहे. विदित होय हे

---

१ पत्र इचलकरंजीहून महादाजी विठ्ठल दातार फडणीस यांचें मिरजेस बाळासाहेबांस. २ रघुनाथराव नीळकंठ पटवर्धन यांचें कुरुंदवाडाहून पत्र मिरजेस बाळासाहेबांस.

विज्ञापना. वडिलांपाशीं लोक आहेत त्यांजपैकीं मीर अमदशाची बिरादरी पत्र पावतांच जलद रवाना करावी. हे विज्ञापना.

नं. ५०९८ श्रीगणराज. ( भाद्रपद व० ५–१९ सप्तंबर. )

पै॥ छ० १८ रबिलाखर. मय्या तैन. भाद्रपदमास.

विज्ञापना. चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपांस पत्र पाठविलें होतें तेंच रात्रौ त्यांजकडे रवाना केलें होतें. त्यास श्रीमंत व चिरंजीव हरिपुरास जावयास गेले याप्रमाणें राजश्री [१]महादाजीपंताचें पत्रच बाजिन्नस आलें तेंच पाठविलें आहे. पुढील पर्याय पाहतां काल चिकोडीपावेतों ठाणीं गेलीं त्यांची अशी जनवार्ता. असा प्रसंग प्राप्त झाल्यामुळें कोणामध्यें दम राहिला नाहीं. महाराज खासा अळत्यांस येणार अशी जनवार्ता. सध्यां प्रसंगीं पायदळ—

नं. ५०९९ श्री. ( भाद्रपद व० ६–२० सप्टंबर. )

पै॥ छ० २० रबिलाखर. चार घटका पूर्व रात्र. सन मय्यातैन व अलुफ.

सेवेशीं विज्ञापना. लष्करांतून दुकित्ते पत्रें भौमवारीं व बुधवारीं इचलकर्जीस पाठविलीं. तेथून स्वामींकडे जावीं असें लिहिलें होतें. तीं पत्रें सेवेशीं पावोन मजकूर समजणेंत आला असेल. भौमवारच्या पत्रांत लढाईस जाणार इतका मजकूर होता. कळावें. मी हमदाच्या वाड्यांत दोन रोज राहून बुधवारीं प्रहर दहा घटका दिवसास प्रातःकाळच्या अग्निसंस्कार झाला. मंत्राग्नीकरितां ब्राह्मणाचा शोध बहुत केला. परंतु समयास मिळाला नाहीं. सामान्य एक ब्राह्मण होता. प्रतास शूद्रस्पर्श वगैरे झाला होता. प्रायश्चित्त वगैरे विधि यथास्थित होणार नाहीं, यामुळें भडाग्नि दिला. हमदाचे वाड्यावर तलावानजीक स्थलशुद्धि जागा चांगली सारवून तेथें अग्निचा विधि केला. चंदन व तुळसी काष्ठें व बेलाचें एक दोन ढापे ओलेच मिळवून घातले. अग्निसंस्कार व्हावा असें नव्हतें, परंतु भाऊसाहेबांचें पुण्य अगाध आणि स्वामींच्या पुण्येंकरून सेवकाचे हातून खटपट जाहली तितकी केली. कमतरता केली नाहीं. आपाजी गायकवाड जबानी सांगतां कळेल. महाराजांकडील ठाणीं चिकोडी वगैरे गांवानीं पडलीं. लष्करचा मुक्काम मौजे जतरटावर काल गुरुवारीं आला.

---

१ रघुनाथराव याचें कुरुंदवाडाहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र. हें इतकेंच अपूर्ण सांपडलें. २ १ हें व पुढचें अशीं दोन पत्रें जवळ जवळ एकच मजकुराचीं असून ती नारो हरि करंदीकर यानें लिहिलीं व खात्रीनें पोंचावीं म्हणून निरनिराळ्या बाटामी पाठविलीं.

तूर्त इचलकर्जीकर व शिरगांवकर उभयतांवर मसलत दिसते. त्यांचीं साधनें कारणही जाहलीं. काय घडतें पहावें. श्रीमंत राजश्री आपासाहेब यांस गोळीची जखम हातावर आहे व राजश्री विनोबा आबा यांस दोन तीन जखमा आहेत. व विठ्ठलराव यादवाडकर यांस एक जखम पायास गोळीची आहे असें वर्तमान आहे. सर्व मंडळीचें वगैरे वर्तमान कळवावयाची आज्ञा व्हावी. मी आज भृगुवारचा दिवस कोगनोळीस आहें. आज लष्करचा शोध आणवून उद्ईक लष्करास जातों. महादेव ब्राह्मण याजबरोबर अस्थि पाठविल्या आहेत. येऊन पावतील. उत्तराची आज्ञा व्हावी. राख कृष्णेंत टाकावयाकरितां एका बैलावर लादून आणिली. परंतु दूधगंगेस पाणी बहुत आलें. नदीस टोकरा नाहीं व नाव नाहीं. चिखलीसही गेलों, परंतु तेथें...पडली नाहीं. सडे उतरावयाचें संकट पडलें याजमुळें राख दूधगंगेंतच टाकिली. उपाय नाहीं. याजमुळें कृष्णेचा योग साधला नाहीं. भाऊसाहेब भौमवारीं सायंकाळच्या दोन घटका दिवसास देवाधीन झाले. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१०० श्री. (भाद्र० व० ६—२० सपटेंबर.)

सेवेशीं विज्ञापना. भाऊसाहेबांचे प्रेत होतें त्यास अग्न द्यावयाचा, त्यास येथील विचार पहातां हा विचार पहातां त्या गांवीच नाहीं ! अग्निसंस्कार व्हावा हा मानस ( महाराजांचा ) नव्हता. परंतु युक्तिप्रयुक्तीनें खटपट करून परवानगी घेतली. ते समयीं रात्र तीन तास मुक्कामींच निपाणीनजीक जाहली. माझीं देखील माणसें बरोबरचीं चुकामुक जाली. एक दोन माणसें मात्र जवळ होतीं. पाऊस थोडा थोडा पडत होता. यामुळें अंधार निबिड. मार्ग समजावयाचा नाहीं. खांच खळगे बहुत. तेव्हां प्रेत घोडीवर पुढें घेऊन हमदाचे वाड्यास चार कोस आलों. रात्र तीन प्रहर जाली. नंतर काष्ठांचा वगैरे उद्योग करून बुधवारीं प्रहर दहा घटका दिवसास अग्न जाहला. मंत्राग्नीकारितां बहुत प्रयत्न केला, परंतु तसा ब्राह्मण मिळला नाहीं. सुमारसा एक होता. त्यास प्रेतास स्वर्शास्पर्श जाहलाच, तो प्रायश्चित वगैरे विधि यथास्थित होणार नाहीं यामुळें मग भडाग्न केला. दोन दिवस हमदाचे वाड्यास राहून अस्थि काढु गुरुवारीं घेऊन कोगनोळीस मुक्काम आलों. राख एक

१ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीरकरांच्या लष्करांतून मिरजेस. २ हमीदवाड्यास.

बैलावर लादून कृष्णेंत टाकावयास आणिली होती. परंतु दुधगंगेस पाणी बहुत आणि सांगडी व टोकरा नदीस नाहीं. निरुपाय होऊन दुधगंगेंत राख टाकली. आज अस्थि इचलकर्जीवरून मिरजेस रवाना कारितों. मजकडोन जालें तितकें केलें. सारांश इतका संस्कार व्हावा असा भरंवसा नव्हता. परंतु भाऊसाहेबांचें पुण्य अगाध यामुळें माझे सेवकवृत्तीस यश आलें! काल गुरुवारीं महाराजांकडील लष्करचा मुक्काम जतरटावर आला. तूर्त मसलत इचलकर्जीकर व शिरगांवकर यांजवर आहे. काय घडतें पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. चिकोडी वगैरे गांवानीं ठाणीं (करवीरकरांचीं) पडलीं. कळावें हे विज्ञापना.

नं. ५१०१ श्रीगणराज. ( भाद्र० व० ६–२० सप्टेंबर. )

चिं॥ राजश्री दादा यांसीं. उपरी. वडील तीन जखमानीं जेर जाहलेच होते. घोडेवर स्वारानीं पुढें घेऊन मुख्याजवळ नेलेवर 'मारा' म्हणून सांगितलेवर घोड्यावरून ढकलून दिलें आणि दहा पांचानीं तरवारीनें छिन्न केलें! छत्रपति म्हणवितात, कर्म अंत्यजाचीं केलीं! त्यांचा प्राचीन जन्मार्जित संस्कार तसें घडलें. छ० १९ रबिलाखर. लोभ करावा हे.

नं. ५१०२ श्रीगणपति. ( भाद्र० व० ६–२० सप्टें. )

ती॥ राजश्री गणपतराव काका वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें रामचंद्र परशुराम. विनंती विशेष. वडील पाडाव गेले असें तुम्हांस लिहून पाठविलें आहे, त्यास वडिलांचे डोईवर समोरच्या दोन तीन जखमा लागोन वडिलीं कैलासवास लढाईंत तेच दिवशीं केला. होणारास इलाज काय! ईश्वरइच्छा प्रमाण! आम्ही मिरजेस आलों. सार्थक जाल्यानंतर पुढील विचार. तुम्ही तेथें न राहतां राजश्री धोंडोपंत गोखले यांजकडे जाऊन त्यांचे विचारें तेथेंच असावें. रवाना छ० १९ रबिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विज्ञापना.

नं. ५१०३ श्रीगणपति. ( भाद्र० व० ६–२० सप्टें. )

राजश्री बाळकृष्णपंत लागू स्वामीचे सेवेशीं.

पोष्य रामचंद्र परशुराम. विनंती उपरी. वडील पाडाव गेले असें तुम्हांस लिहिलें होतें, परंतु वडील पाडाव गेले नाहींत. डोईवर समोरच्या दोन तीन जखमा लागोन वडिलीं कैलासवास केला. सावनूर तालुका तुम्हांस मिळाला.[३]

---

१ पत्र बाळासाहेबाचें रघनाथराव कुरुंदवाडकर यास. २ पटवर्धन भिलवडीकर. ३ सावनूर तालुका राखण्याचें जोखीम आम्ही तुम्हांवर सोंपविलें.

तिकडील बंदोबस्त राखणें तो तुम्हांकडे. राजश्री धोंडोपंत गोखले यांसही पत्र लिहिलें आहे. तुम्ही समयानुरूप त्यांचे विचारें वर्तून जेणेंकडून बंदोबस्त राही ते गोष्ट करावी. इंग्रजी पलटणें दोन तिकडून यावयाचीं, त्याविशीं पत्रें पाठविलीं ह्मेतीं तीं पावलींच्र असतील. त्यास तुमचें बोलणें होऊन तीं पलटणें जरूर यावीं. येतात न येतात हें सत्वर कळावें. तालुक्याचा बंदोबस्त पक्का असावा. अवसान सोडूं नये. वडिलांचे पुण्येंकरून सर्व बंदोबस्त होईल. पलटणें येणें तीं चांगलीं लढवाई करवीरकरांचे पारपत्यास उपयोगीं पडेत अशीं यावींत. उगाच भरणा नांव मात्र पलटणें अशीं येऊं नयेत. चांगलें सामान आलें असतां चार रुपये अधिक लागले, खर्चेही पडला, असतां चिंता नाहीं. यास्तव चांगले सामानाचीं दोन पलटणें सत्वर यावीं. रवाना छ० १९ रबिलाखर. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पै॥ छ० २४ रबिलाखर. मु॥ पाच्छापूर.

नं. ५१०४ श्रीराम. ( भाद्र० व० ६—२० सप्टेंबर. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नारोपंत दामले स्वामी गोसावी यासीं.

सेवक जयवंतराव रघुनाथ मंत्री. नमस्कार. विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावें. विशेष राजश्री भाऊंचें व करवीरकरांचें युद्ध होऊन कांहीं वर्तमान वैपरीत्य ऐकिलेवरून चित्त स्वस्थ नाहीं. यास्तव राजश्री गंगाधरराव यांस व तुम्हांस लिहीत आहें. तरी तथ्य असेल तसें स्वस्तिक्षेमपणाचें वृत्त लिहून संतोष होय तें करावें. वरचेवर नवलविशेष लिहीत असावें. रवाना छ० १९ रबिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५१०५ श्री. ( भाद्र० व० ७—२१ सप्टेंबर.)

पै॥ छ० २२ रबिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपद.

चिरंजीव राजश्री गंगाधरराव यांसीं मातुश्री काशीबाई आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष चिरंजीव राजश्री परशुरामपंत यांची व करवीरकरांची लढाई जाहल्याचें वर्तमान येथें ऐकण्यांत आलें. परंतु लढाईचा प्रकार कसा जाहला हें समजण्यांत आलें नाहीं. त्यावरून हें पत्र लिहिलें आहे. तरी सविस्तर मजकूर लिहून पाठवावा. रवाना छ० २० रबिलाखर बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ५१०६ श्री. ( भाद्रपद व ७—२१ सप्तंबर. )

सेवेशीं गंगाधर लक्ष्मण कृतानेक विज्ञापना तागायत मंदवार दोन प्रहर दिवस वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. बातमीचें वर्तमान लिहावया आज्ञा, तर काल भृगुवारीं राजमंडळचें लष्कर खडकलाटेहून कूच करून श्रीमंत महाराज दोन हजार फौज व पायदळ हजार व तोफा तीन येणेंप्रमाणें जत्रटचे मुक्कामास गेले. राजश्री रत्नाकरपंत चिकोडीचे मुक्कामास गेले. त्यां-समागमें दोन हजार फौज व तोफा दोन आहेत. त्या सरदेचीं ठाणीं बसाविलीं. बागेवाडीस जाणार. शिरगांवकरांचा तह जाहला. कांहीं जमावानिशीं चाकरी करावी असा करार झाला आहे. महाराज जत्रटाजवळ नदी उतरणार. इचलकरंजीस जावयाचें खबीर असें पक्कें वर्तमान आहे. यांत ईश्वर काय करतो नकळे. रेणदाळास राजश्री रत्नाकरपंत यांचे पुत्रानीं कोडोलीहून रोखा करून साठी रुपये खर्च पाडिला. राजश्री रामाजी दुर्गो लष्करास कोडोलीस जाऊन मनाचिठी घेऊन आले. महाराज बारवाड मागूर येथें मुक्कामास येणेची बातमी आहे. बोरगांवास दोन कोस आहे. ईश्वर इच्छा प्रमाण ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१०७ श्री. ( भाद्रपद व० ७—२१ सप्तंबर )

पै॥ छ० २० रबिलाखरः तास रात्र. सन मय्या तैन व अल्लफ.

सेवेशीं नारो हरि करंदीकर दोन्ही कर जोडून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २० रबिलाखर भृगुवारपावेतों मुक्काम कोगनोळी यथास्थित असे. विशेष. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचा मुक्काम फौजसुद्धां मौजे जतरट येथें आहे. मी लष्करांस उद्यैक जाईन. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१०८ श्री. ( भाद्र० व० ७—२१ सप्टें. )

पै॥ छ० २० रबिलाखर. रात्र आवशीची. सन मय्यातैन व अल्लफ.

सेवेशीं विज्ञापना. महादेव ब्राह्मण याजबरोबर पाठविलें प्रविष्ट होईल. यास काय देणें तें येथें दिलें आहे. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ बोरगांवच्या ठाणेदाराचें पत्र रघुनाथराव कुरुंदवाडकर यांस. २ परशुराम भाऊंच्या आश्रि पाठविल्या त्या. पत्र बाळासाहेबांस नारोपंत करंदीकराकडून.

नं. ५१०९ श्रीगणराज. ( भाद्र० व० ७–२१ सप्टें. )

पै॥ छ० २१ रबिलाखर. पांच तास. सन मय्यातैन व अलुफ.

विज्ञापना. प्रातःकाळी सविस्तर लिहिलेंच आहे. राजश्री नारोपंतानीं[1] अस्थि रवाना केल्या त्या आज दोन प्रहरीं आल्या. श्रीतीरीं फराळास ब्राह्मणास घालोन पार करोन दिल्या. येऊन पावतील. करवीरकरांची बातमी काय ल्याहावयाची ! इचलकर्जीस येतात. गुंता नाहीं. गाडदी ( व ) खर्चाची रवानगी ( तेथें ) व्हावी. उगेच आठ चार दिवस गुंतावयास जागा तीच. तिचें रक्षण जालें पाहिजे. नाहीं तर ती जागा दगावली असतां मिरजेशिवाय जागा नाहीं. राजश्री माधवराव रास्ते यांस पत्रें जावीं ( कीं, ) सप्तऋषीची बंदोबस्ती पक्की असावी. नाहींतर ते हे एक होऊं पावताल ! गुंता नाहीं. त्यांजकडून कांहीं फौजही ठेवावी. पुण्याचा लगता जवळ आहे. जम तिकडे पडेल. बोरगांवचे बातमीचें पत्र आतांच आलेलें पाठविलें आहे. बाकी राहत नाहीं. रवाना छ० २० रबिलाखर. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५११० श्री. ( भाद्र० व० ७–२१ सप्टेंबर. )

पै॥ छ० २० रबिलाखर. शनवार. चार घटका रात्र आवशीची. सन मय्या तैन व अलुफ.

सेवेशीं विज्ञापना. भौमवारीं लढाई होणार हा मजकूर तपशीलवार लिहून मुद्दाम जासूद रवाना केला तें पत्र ही पावलें. परंतु इतका निकर्ष लढाईचा ध्यानांत आला नाहीं. ............ कमतर केली नाहीं. जासूद अद्याप मजकडे आला नाहीं. मिरजेस गेला असल्यास मजकडे यावयाची आज्ञा व्हावी. भाऊसाहेब जेथें पाडाव झाले तेथें एकही कोणी जायां जखमी झाले नाहींत ! खिजमतगारही कोणी बरोबैर आले नाहींत. असा समय बनला. एवढा मोहोरा पाडाव जाहला तेथें शेंपन्नास किमानपक्ष तरी लोक कामास यावे ! असें झालें त्यास उपाय नाहीं. दोन तोफांचें मात्र झालें. असा प्रकार घडला. ईश्वर इच्छा प्रमाण. गोष्ट बहुतच विलग घडली. वाईटांत बरें एक मानावें. देवाधीन झाले हें उत्तम झालें ! जर जिवंत राहते तरी तें चांगलें नव्हतें. त्यांचा तो काल लढाईतच झाला येणें करून लौकिक चांगलाच राहिला. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ रघुनाथराव कुरुंदवाडकर यांचें बाळासाहेबास पत्र. २ सातान्याचा. ३ नारोपंत करंदीकराचें पत्र बाळासाहेबांस. ४ प्रेनाचराबेर. ५ दोन तोफांचें रक्षण मात्र झालें. त्या शिरगांवकरांकडे पोंचल्या झाल्या, असा भाव. पत्र लिहिणारानें घाईघाईनें लिहिलें हें मजकुरावरून दिसतें.

# श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ५१११ श्रीगणपति. ( भाद्र० व० ८—२२ सपटें. )

पै॥ छ० २४ रबिलाखर. मु॥ पाच्छापूर.

राजश्री रामचंद्रपंत कोटबागी स्वामी गोसावी यांस.

विनंती उपरी. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. तीर्थरूप भाऊसाहेब तेच दिवशीं लढाईत जखमा लागोन सरकारकामास आले. आम्हांसही उजवे हातास बावळ्यावर गोळीची जखम लागोन गोळी पार आहे. ईश्वर इच्छेनुरूप जें व्हावयाचें तें घडलें. आम्ही उत्तरकार्यानिमित्य मिरजेस आलों आहों. हें जाल्यानंतर पुढील विचार होणें तो होईल. तिकडे राजश्री बाळकृष्णपंत लागू व राजश्री धोंडोपंत गोखले आहेत. त्याणीं व तुम्ही मिळोन सावनूर तालुक्याचा बंदोबस्त पक्का राखावा. हालीमानी होऊं देऊं नये. मशारनिल्हे यांस पेशजीही पत्र लिहिलें होतें. हल्लीं आणखी पाठविलें आहे. तुम्ही त्यांजकडे जाऊन पत्रान्वयें बोलून त्यांचें कूच होऊन ते फौजेसुद्धां या रोखें बारीचे तोंडीं येत तें करणें. आणि वरचेवर तिकडील वर्तमान कळवीत जाणें. रवाना छ० २२ रबिलाखर. बहुत काय लिहिणें. सावनूर तालुक्यास राखावयास दुसरा नको असल्यास बरेंच जाहलें. तुमचे तुम्ही राखावें. नाहीं तर राजश्री धोंडोपंत यांस सामील करून तालुक्याचा बंदोबस्त करणें. हरकसें करून राजश्री धोंडोपंतांस अगत्य कुमकेस घेऊन येणें. सूड घेतला पाहिजे तरच या देशीं रहावें ! नाहींतर देशांतर करावें हाच इरादा आहे. तुम्ही त्या तालुक्यांत बंदोबस्त करून रहावें. आम्ही फौजसुद्धां इकडे कायम आहों. आजपर्यंत सेवा तुम्हीं केली त्याचें सार्थक आतां पुढें दाखवाल तेव्हां खरें ! सावनूर तालुक्याचा हरकसें करून बंदोबस्त करणें. रवाना छ० २१ रबिलाखर. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ५११२ ( भाद्र० व० ८—२२ सपटेंबर. )

नक्कल.

अजम कर्नेल लिटलीसाहेब मोहबतहू[1]—

---

१ पूर्वी म्हैसूरच्या स्वारीत भाऊंच्या कुमकेस इंग्रजी पलटणें आलीं होतीं त्यांवरचा सरदार क्यापटन् लिटल् तो हाच. यंदांही तो टिपूवरच्या मोहिमेंत भाऊंस कुमक करण्याच्या उद्देशानें मुंबईहून निघून संगमेश्वरच्या खाडीनें साखरप्यापर्यंत येऊन मळा घांट चढून कऱ्हाडपर्यंत आलेला भाऊ स्वारीस न निघाल्यामुळें परत मुंबईस गेला. हल्लीं पुन्हां त्याचीं पलटणें गोंव्यास आल्याचें ऐकून करवीरकरांवर सूड उगविण्याच्या उद्योगांत त्याची मदत मिळवावी म्हणून रामचंद्रपंत आपानीं हें त्यास पत्र लिहिलें.

अज दिलएखलास दस्तगाह रामचंद्र परशुराम. दुवा आकी तुम्ही आपली खैरखुषी कलमी करीत जाणें. दिगर पेशजी तुम्हांकडून राजश्री कोंडोबा नाईक आले. मजकूर जाहीर जाला त्यावरून लढवाई पलटणें बमय तोफांसुद्धां घेऊन येण्याविशीं तुमचे नांवें पत्र देऊन म॥ निल्हेची रवानगी हमरहां जासूद जोडीसुद्धां केली. ते तुम्हाजवळ दाखल जालेच असतील. ऐशीयास हल्लीं पलटणें मुंबईहून निघोन गोव्याचे बाऱ्यास आलीं म्हणोन विदित जालें. इकडील मजकूर तरी छ० १६ रबिलाखरीं करवीरकरांची व आमची लढाई होऊन फत्ते इकडील व्हावी असें असतां एकाएकीं लढाई बिघडोन बुदरूख भाऊसाहेब सरकार कामास येऊन कैलासवासी जाले. हे खबर तुम्हांस मालूम जाल्यावर तुम्ही दिक्कत इकडे येण्यास खतरा आणाल. त्यास आम्ही फौजसुद्धां कायम राहोन हें खत सादर केलें असे. तरी भाऊसाहेबांची व तुमची दोस्ती व भाईचारा तोच इरादा इकडून. त्यांत दुजाई नाहीं. बेदिक्कत जाणोन पलटणेंसुद्धां घाट चढोन या रोखें येणें. पुढें कोणत्या मार्गें येण्याचें तें ठरावांत आणिलें पाहिजे. रा॥ कोंडोबा नाईक यांस इकडे रवाना करणें. म॥निल्हे समजवोन त्यांची रवानगी करावयास येईल. खातरजमेचा मजकूर तर भाऊसाहेब याणीं पेशजी तुम्हांस लिहिलें आहे त्याप्रमाणें अमलांत येईल. त्यांत कसूर होणार नाहीं. जाणिजे. छ० २१ रबिलाखर. जादा काय लिहिणें.

नं. ५११३ श्री. ( भाद्र० व० ८–२२ सप्टें. )

पै॥ छ० २४ रबिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपद.

सेवेशीं विज्ञापना. महाराजांचा मुक्काम मौजे सुलकूड येथें मंदवारीं जाहला होता. आज रविवारीं भोजन करून कूच करून मुक्काम चिंचवाड येथें झाला. तोफा आज रविवारीं सुलकूडच्या मुक्कामास आल्या.. राजाज्ञा चिकोडींत ठाणें घालून बागेवाडीकडे गेले. बागेवाडी...जमखंडी यादवाड वगैरे ठाणीं घालणार असा बेत आहे. राजाज्ञा यांजबरोबर फौज हजार व पायदळ पांचशें व पेंढार दोनशेंपर्यंत व तोफा दोन येणेंप्रमाणें सरंजाम आहे. महाराजांबरोबर हजार बाराशें फौज पायदळ पांच सातशें हजार पर्यंत आहे. महाराजांची......चिंचवाडच्या मुक्कामास आणविलीं आहेत. पक्षाचा बेत चिंचवाडावरच व्हावा असें दिसतें. तूर्त काळीं मसलत इचलकरं-

---

१ पत्र नारोपंत करंदीकर याचें महाराजांच्या लष्करांतून.

जीची दिसते. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत-आपा व बाबासाहेब व दाजीसाहेब हे एकत्र आहेत किंवा पृथक् पृथक् आहेत, कोणत्या मुक्कामास आहेत, हें कळवावयाची आज्ञा व्हावी. हे विज्ञापना.

नं. ५११४ (भाद्र० व० ९—२३ सप्टें.)

माधवराव रास्ते यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र—

पै॥ छ० २२ रबिलाखर सन मय्यातैन व अल्लफ.

"राजश्री भाऊ यांची व करवीरकर यांची लढाई प्रस्तुत जाहली म्हणून वर्तमान ऐकिलें. परंतु लढाई कोणते मुक्कामीं जाली, काय जाहलें, हें समजलें नाहीं. आपलेजवळ नेहमीं पत्रें येऊन वर्तमान बातमी समजत असेल. त्यास सविस्तर लेहून पाठवावें. इकडील वर्तमान शिंदे बाया पुलावर होत्या त्या मुर्ती मोढवें येथें मोरेश्वरानजीक गेल्या म्हणून वर्तमान आलें."

नं. ५११५ श्रीशंकरप्रसन्न. (भाद्र० व० ९—२३ सप्टें.)

छ० २५ रबिलाखर मय्यातैन व अल्लफ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधररावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य माधवराव अनंत सा॥ नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष. आपण छ० १८ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. "ती॥ भाऊसाहेब यांची व महाराजांची लढाई भाद्रपद वद्य चतुर्थी भौमवारीं मोठी जाली. वडिलांस तीन जखमा लागून सरकारकामास आले. चि॥ राजश्री रामचंद्रपंत आपास उजवे हातास गोळीची जखम लागून गोळी पार जाहली, व चि॥ राजश्री बाबा याचे उजवे हातास अंगठ्याजवळ तरवारेची जखम लागली. खैर आहेत. मांजरीजवळ कृष्णा उत्तरतीरीं आले. बहुत लोक जायां जखमी जाहले. हा मजकूर येथून पुणियास लिहिला आहे. महाराज हांवभरी जाले आहेत. होणारास उपाय नाहीं. सरकारांतून सरंजामाची पैरवी सत्वर होय तें करावें" म्हणून लिहिलें, त्यास हें वर्तमान ऐकून चित्तास परम खेद जाला. सरकार दौलतीची बाजू गेली. परंतु भाऊ यानीं मोठीं मोठीं कार्यें करून शेवट उत्तम लोकांचें साधन केलें. त्यांचे पराक्रमाची शर्त जाली. राजश्री आपा व बाबा व दाजीबा व बापू यांस भाऊ यांचे जागां वडील आपण आहेत. आपण विवेकेंकरून चित्ताचें शांतवन करून त्यांस हिम्मत देऊन फौज व गाडद वगैरे सरंजाम पोक्ता जमा करवून महाराजांचे

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची.

फौजेवर शह द्यावा. सरकारांतून सरंजामाची पैरवी व्हावी येविशीं आपण लिहिलेंच आहे. येथूनही श्रीमंतांस व राजश्री नाना यांस पत्रें पाठविलीं आहेत व ती॥ राजश्री दादासाहेब यांस लिहिलें आहे. भाऊ यानीं महत्कीर्ति संपादन केली. त्यांचे आशीर्वादें पुढें उद्योग तोच करीत असतां यश व कीर्ति संपादन होईल. एक वेळ बाजी विसकटली म्हणून पराक्रमी पुरुष स्वस्थ बसत नाहींत. पुन्हा त्याच कार्यास प्रवर्त होऊन बाजी जमवितात. प्रस्तुत समय पाहतां या उद्योगास विराम करावयाचा समय नाहीं. आपण सुज्ञ व धैर्यवान् आहेत. ल्याहावेसें नाहीं. सारांश ईश्वरसत्ता प्रमाण आहे. धैर्यानें सर्व संकटें परिहार होतील. सरकारांतून कुमक व्हावी येविशीं उद्योग करीत आहों. रवाना० २२ रबिलाखर बहुत काय लिहिणें. कृपा लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ५११६ श्री. ( भाद्र० व० ८–२२ सपटं. )

छ० २५ रबिलाखर. गुरुवार भाद्रपदमास. सन मय्यातैन व अल्लफ.

सेवेशीं मोरो आपाजी दोनी कर जोडून शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २१ रबिलाखर रविवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल सायंकाळपासून शहरांत श्री॥ राजश्री भाऊसाहेब यांची व करवीरकर महाराज यांची लढाई जाली, इकडील तसनस जाली, म्हणोन वगैरे मनस्वी वर्तमान आलें त्यावरून आज प्रातःकाळीं श्री॥ राजश्री नानांकडे गेलों. नानानींही स्वमुखें सांगितलें. लौकर अजुरदार मिरजेस रवाना करून जाब आणविणें येविशीं ( नानांची ) आज्ञा जाली आहे. व विलक्षण गोष्ट ईश्वर इच्छेनें घडली असल्यास श्री॥ राजश्री रघुनाथ-राव दादा याणीं कुरुंदवाडाहून कुटुंबसुद्धां लौकर मिरजेस यावें, जमेत चांगली लौकर धरावी, सावध असावें, येविशीं राजश्री बाळकृष्णपंत भाऊ याणीं सेवेशीं लिहिलें आहे. तिकडून वर्तमान आलेवर सरकारांत विचार होऊन स्वामींस व दादासाहेब यांस पत्रें येतील त्याअन्वयें एकादा विचार करावा लागेल. झाडून फौजांचा जमाव मिरजेजवळ तिकडील देखील व्हावा. इकडे वर्तमानामध्यें लढाई मातबर जाली, फौज मोडिली, वडील पाडाव सांप-डले, ऐसें दोन चार जागां वर्तमान आलें आहे म्हणोन श्री॥ राजश्री नानानीं सांगितलें. लौकर मिरजेस लेहून जाब आणवावा म्हणोन आज्ञा जाली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. अजुरदारानें बुधवारीं प्रातःकाळीं चार घटका दिवसास पोंहोचावें म्हणोन करार आहे. जाब लौकर यावा हे विज्ञप्ति.

## श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

नं. ५११७ श्री. ( भाद्र० व० १०–२४ सप्टें. )

छ० २७ रबिलाखर सन मय्यातैन व अलफ.

विज्ञापना. तागायत छ० २३ रबिलाखर भौमवार सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ० १६ रबिलाखरचीं पत्रें स्वामीनीं पाठविलीं तीं काल छ० २२ रबिलाखरीं बापू मोहिता याजबरोबर पावलीं. घराऊ मजकुराचा विस्तार माझे नांवचे पत्रीं लिहिला आहे त्याप्रमाणें राजश्री बाळकृष्ण भाऊ बाळ व मी श्री॥ राजश्री नानांस विनंती करितों. भाऊसाहेबांकडील लढाई बिघडल्यापूर्वी बापू तेथून रवाना जाला होता. हल्लीं येथें भाऊसाहेब यांचें वर्तमान आल्यापासून शहरांत लोक भाऊसाहेब यांचे पदरीं नाहींत ते देखील श्रमी जाहले तें पत्रीं कोठवर लिहावें ? सरकारच्या दौलतीमध्यें भाऊसाहेब स्तंभ होते. नानानीं तो बहुतच खेद केला. त्यांची एक बाजू खचली ! असो. श्रीइच्छा प्रमाण ! सरकारांत पुढें विचार काय ठरतो याचा अर्थ श्री॥ राजश्री नानांचे मुखें ऐकोन एक दोन दिवशीं बापू मजकूर यास सेवेशीं रवाना करितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५११८ श्री. ( भाद्र० व० १०–२४ सप्टें. )

छ० २७ रबिलाखर. शनिवार. भाद्रपद मास. सन मय्यातैन.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ विज्ञापना. तागायत छ०२३ रबिलाखर पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं छ० १८ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. “ श्री॥ भाऊसाहेबांची व श्री॥ महाराज करवीरवासी यांची लढाई भाद्रपद वद्य चतुर्थीस भौमवारीं होऊन भाऊसाहेबांस तीन जखमा लागोन सरकार कामास आले. सविस्तर राजश्री बाळाजीपंतास व मोरोपंतास लिहिलें आहे त्यावरून कळेल. सविस्तर विनंती श्री॥ राजश्री नानांस करावी. श्री॥ पंतप्रधान व श्री॥ राजश्री नानांस पत्रें पाठविलीं आहेत. प्रविष्ट करून उत्तर[3] घेऊन पाठविणें” म्हणोन आज्ञा, त्यास भाऊसाहेबांचें वर्तमान ऐकोन बहुत खेद जाला तो विस्तार पत्रीं काय लिहूं ? श्री॥ राजश्री नानानीं बहुत बहुत खेद केला. ईश्वरी इच्छेस उपाय नाहीं. राजश्री रामचंद्रपंतआपा व बाबा व दाजीस आपण वडील आहेत. सर्वांचें समाधान करावें. रात्रंदिवस बहुत हुशार असावें. राजश्री बहुत चढले त्या अर्थी सावधता रात्रंदिवस फौजेस असावी. आपांचें लक्ष स्वामींचें ठायीं कसें आहे.

---

१ मोरो आपाजी परांजपे याचें पत्र पुण्याहून बाळासाहेबांस. २ नानाफडनवीस यांचा विश्वासू कारकून याचें हें बाळासाहेबांस पत्र. ३ तुमच्या ठिकाणीं.

हें लिहून यावें. राजश्री चिंतामणराव आपा प्रस्तुत कोठें आहेत, वर्तणूक कशी आहे, हें तपशीलवार लिहून आलें पाहिजे. त्याअन्वयें श्री॥ नानांस विनंती करून पक्केपणें बंदोबस्त करावयासीं येईल. भाऊसाहेबांचा या लोकीं व परलोकीं विजय जाला. त्यांचें चांगलें जालें. मागें आहेत त्याणीं सूड घेतल्यास उत्तम. नाहींतर लौकिक रहाणार नाहीं. येविशींचा विचार सर्वांनीं मिळोन करावा, हेंच चांगलें. श्री॥ राजश्री दादासाहेबानीं कुटुंबसह मिरजेस यावें आणि फौज चांगली निवड जवळ असावी. रात्रंदिवस बहुत बहुत सावधता असावी. स्वामी सावध आहेतच, परंतु सेवकास सुचलें तें विनंती लिहिली आहे. बातमी वरचेवर येत असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री॥ राजश्री दादासाहेबांचे सेवेशीं विज्ञापना. विनंती लिहिली आहे याअन्वयें हुशारी असावी. हे विज्ञापना.

नं. ५११९ श्री. ( भाद्र० व० ११–२५ सपटेंबर. )

सेवेशीं बाळाजी विष्णु. कृतानेक विज्ञापना. छ० २४ रबिलाखर बुधवार प्रातःकाळ पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं पत्र छ० १८ रबिलाखरचें पाठविलें तें छ० २१ मिनहूस आवशीचे प्रहर रात्रीस पावलें. पत्रीं आज्ञा जे, "भाद्रपद वद्य चतुर्थी भौमवार तृतीय प्रहरीं करवीरकरांची व वडिलांची लढाई होऊन वडिलांस तीन जखमा लागोन घोड्याखालीं आले. मोठीच गर्दी जाली. वडिलांस ( विश्वासराव ) सर्जेराव घाटगे याणीं घोड्यावर घालून करवीरकर राजापुढें नेलें. राजानीं केवळ पाजी कर्म केलें." त्यास छत्रपति म्हणवितात आणि हिंदु, त्यास हें नीच कर्म योग्य नसतां त्याणीं केलें तेव्हां त्या वेळेसच त्यांची श्री गेली असें समजावें. वडिलांनीं तो इहलोक परलोक साधन केलें. परंतु राजानें नीच कर्म नरकसाधनाचें केलें. शास्त्र प्रमाणच. तें कसें चुकेल ? होणार जालें. वडिलांचे पाठीमागें सर्वांस वडीस छत्र आपण आहां त्यापेक्षां सर्वांनीं एकदिल होऊन राजास हात दाखवावयाचा योग दृष्टीस दिवसगत न लागतां आणिला पाहिजे. फौजेचा एकदिल करून पत्राचें उत्तर सरकारांत दाखवावयाजोगें जरबेचें आलें असतां इकडूनही सरंजाम जावयास दिवसगत लागणार नाहीं. कितेक घरांतील लहान मोठे खटले आहेत ते यासमयीं मनांत वागवावयाचे नाहीं, आणि स्वामी वागविणारही नाहींत. वडिलांचे पाठीमागें श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा यांचा लौकिक करून दाखविणें हा एक पक्ष, आणि वडिलांपाठीमागें पटवर्धनांचा नक्ष, सरकारचा

---

१ उपनांव सहस्रबुद्धे. यांचें हे बाळासाहेबांस पत्र पुण्याहून.

दाब, शत्रूवर जरब देणें, हें करणें स्वामींशिवाय नाहीं. स्वामी दुरदेशी जाणून सेवकानें सक्तीचें लिहिणें लिहिलें आहे. परंतु सेवकानें समय पाहून विनंती करीतच असावी, अशा मार्गेपासोन चाली ऐकितों. ज्या गोष्टींत स्वामींचें कल्याण आणि दौलतेस श्रेयस्कर म्हणोन विनंती ( लिहिली आहे. ) येविशीं श्री॥ राजश्री नाना व माझें बोलणें बहुत जालें. आणि नानांचीही आज्ञा एकदिल होण्याविशीं जाली. सर्वांस नाना हाच मनसबा लिहितील असें वाटतें. कालदेश वर्तमान पहातां सर्वांनीं एकदिल राहिलें असतां सर्वांवर दाब. यांत सर्व आहे. राजश्री धोंडोपंत गोखले यांस फौजेसुद्धां सामील स्वामींजवळ होण्याविशीं सरकारचीं पत्रें हुजऱ्याबरोबर गेलीं आहेत. घरची सामग्री बळकट असावी हेंच चित्तांत वागावें. दुसऱ्याचे भरंवशावर जावयाचे हे दिवस नाहींत. सांडणीस्वाराबरोबर पत्र यावें, परंतु जलदीनें गेले. श्री॥ राजश्री नानांजवळ व बाळोबातात्यांजवळ बोलणें जाल्याशिवाय काय ल्याहावें; म्हणोन पत्र दिलें नाहीं. हल्लीं श्री॥ राजश्री नानांचें बोलणें होऊन विनंती लिहिली आहे. तात्यांचेंही पत्र मागाहून पाठवून देतों. नानांच्या पत्राचें उत्तर स्वामींस गेलेंच आहे. लढाईत जायां जखमी कोण कोण जाले याचें तपशीलवार लिहिलें यावें. शत्रूकडील बातमी चांगली राखावी. महालीं शत्रूकडील हंगामा होईल त्याचाही बंदोबस्त असावा. तों इतक्यांत इकडूनही श्री॥ राजश्री नाना पुरावा करीतच आहेत. इकडील वर्तमान स्वामींस वरचेवर समजावें लागतें व स्वामींकडीलही दिनचर्येचें वर्तमान श्रीमंतांस ( नानांस ) कळवावें लागतें. यास्तव डांक बसवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१२० श्रीगणपतिर्जयति. (भाद्रपद व० १२–२६ सप्तं.)

पै॥ छ० २५ रबिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपद.

अपत्यें चिंतामणीनें विज्ञापना. मुदबकाकडील राहुटी फाटली आहे. त्यास खाद्या पासोड्या पाहिजे व इचलकर्जीहून येतांना चिपरीस कंठाळा वगैरे सामान गेलें त्याची याद एकंदर सेवेशीं पाठविली आहे. यादीप्रमाणें खाद्या वगैरे पाठवावयाची आज्ञा व्हावी. उंट सामानाचे वगैरे मिळून चार गेले. त्यास चार उंट व लिहिलेप्रमाणें सामान पाठवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५१२१ श्री. (भाद्रपद व० १३–२७ सपटंबर.)

पै॥ छ० २६ रबिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ. भाद्रपदमास.

सेवेशीं विज्ञापना. हुजूरची स्वारी पक्षाकारितां करवीरीं भौमवारीं तिसरे प्रहरीं गेली. लष्करचा मुक्काम चिंचवाडावर होता, त्यास रुकडीनजीक लष्कर तोफखान्यासुद्धां नदीपार झालें. हुजूरची स्वारी त्रयोदशीस लष्करास येणार असें आहे. आज द्वादशीचा पक्ष आहे. उदयीक स्वारी न आल्यास मी करवीरास जाईन. तूर्त मसलत इचलकरंजीची दिसते. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१२२ श्री. ( भाद्र० व० १४–२८ सप्तंबर )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव गोविंद स्वामी गोसावी यांसी

पोष्य बाजीराव रघुनाथ प्रधान. नमस्कार. विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. तुम्ही छ० १८ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें प्रविष्ठ जाहलें. "परशुराम रामचंद्र यांचा मुक्काम पट्टणकुडी जवळ होता व करवीरकर महाराज हमीदवाड्यावर दोन कोसांचे अंतरानें होते. त्यांची व यांची भाद्रपद वद्य ४ भौमवारीं तृतीय प्रहरीं दिवसा लढाई होऊन लढाई बिघडली. यांस तीन जखमा लागोन कामास आले. राजश्री रामचंद्रपंत व हरिपंत व महादजीपंत कृष्णाउत्तरतीरीं मांजरीस आले. रामचंद्रपंत व हरिपंत यास जखमा लागल्या. खैर आहेत. सविस्तर बाळाजी विष्णु यांस लिहिलें आहे. विनंती करतील" म्हणोन लिहिलें, व राजश्री बाळाजी विष्णु यांणीं विदित केल्यावरोन समजलें. ऐशास परशुराम रामचंद्र यांणीं करवीरकर महाराजांशीं मोठे मर्दुमीनें लढाई दिली. शिपायगिरीची शर्थ करून कामास आले. व त्यांचे त्रिवर्ग पुत्रांनीं ही जवामर्दी केली. रामचंद्र परशुराम व हरि परशुराम यांस जखमा लागल्या, हिंमतीनें लढले, हें चांगलें केलें. कामकाज करावया योग्य ऐशी निशा आहे. परशुराम रामचंद्र यांसारिखे मनुष्य राज्यांतील गेले! मोठें वाईट जाहलें. तुम्हांस खेद जाहला. त्यास होणारास उपाय नाहीं. ईश्वर इच्छा प्रमाण. ज्या कालीं होणार तें होतें. हा मृत्युलोक. येथें विवेक प्राधान्य. तुम्ही विवेकी आहां. आपले चित्ताचें शांतवन करून सर्वांचें समाधान करणें. उभयतांचे जखमांचें वर्तमान लिहून पाठवणें. तुम्ही आपले फौजेचा जमाव राखवून खबरदारीनें राहणें. सरकारांतून तिकडे फौज पाठवावयाची तयारी होत

१ पत्र नारो हरि करंदीकर यांचें बाळासाहेबांस महाराजांच्या लष्करांतून.

आहे. लवकरच रवाना होईल. जाणिजे. छ० २७ रबिलाखर. सु॥ मय्या तैन व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ५१२३ श्री (भाद्र० व० १४–२८ सपटेंबर.)

तालीक.

राजश्री रामचंद्रपंत आपा व हरिपंत व माधवराव व गणपतराव गोसावी यांस—

छ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव शिंदे. दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष. "करवीरकर यांचा व आपला लढाईचा ·मुकाबला होता. यांसं भाद्रपद वद्य चतुर्थीस भौमवारीं छाप्यास यावयाची तयारी करून चालून येतात हें परशुरामपंतभाऊ यांस समजतांच तुम्ही सर्वांनीं आपली तयारी करून कोसभर पुढें चालून जाऊन लढाईचा मुकाबला घेतला. तीन प्रहर लढाई बहुत जुरतीनें व तरतुदीनें केली. दोन तीन वेळ करवीरकरांवरी उठावणी करून हटविलें. तेव्हां त्यानींही निकड केली. त्यांत परशुरामपंत भाऊ यांस जखमा लागोन कामास आले" म्हणोन वर्तमान कळलें. ऐशीयास लढाईचा मुकाबला निकडीचा हें वर्तमान पूर्वीं कागदोपत्रीं आपलेकडून समजण्यांत न येत एकाएकीं हेंच वर्तमान आलें ! भाऊनीं आपली शर्त जुरतीची करावयाची ती करून यावत्प्राण आपला नक्षच करून स्वामिसेवेवरी कामास आले. परंतु यशदाता ईश्वर ! ही सत्ता त्याची आहे. ज्याणीं मोठीं मोठीं कामेंकाजें करून दौलतीचे बचाव करीत आले व पुढेंही ज्यांचे भरंवशावरी स्वस्थ असावे अशीं मनुष्यें सरकारचे पदरचीं गेल्याचा खेद कोणास जाला नाहीं असें नाहीं. ईश्वर इच्छा प्रमाण ! तुम्ही विवेक करून चित्ताचें सांत्वन करावें आणि हिंमत धरून लोकांचा जथ करून लहान मोठीं माणसें पदरचीं असतील त्यांस आळा घालून शत्रूचे[1] पारिपत्याची तरतूद करावी. भाऊंसारख्या माणसाचें नुकसान केलें त्यांचें पारिपत्यच करावयाचें. वर्तमान येतांच इकडील कारभारी श्रीमंतांकडे पाठवून तुमचे उपराळ्यास फौज पाठवून देऊन करवीरकरांस जरब देऊन बदला करावा येविशीं विनंती केली. त्यावरून सरकारांतून फौजेचे रवानगीची तरतूद केली आहे. आपलेपाशीं फौज लवकरच येऊन पोंचेल. आपणही कामें काजें करीत आलां व पुढेंही

---

१ ऐतिहासिक–लेखसंग्रहांत करवीरकरांस जुन्या लेखांत 'शत्रु' हा शब्द येथें प्रथमच लावलेला आढळतो. पुढें नं. ५१२५ मध्यें हा शब्द अशाच अर्थी आला आहे.

कराल हा भरंवसा आहे. तरतूद करून करवीरकरांचें पारिपत्य करून ज्यांत सरकारचा नक्ष तेंच कराल. इकडून उपराळा व साहित्य तेंच होईल. खातरजमा राखून शत्रूवरी जरब बसे तें करावें. वरचेवरी वर्तमान लिहून कळवीत जाणें. रवाना छ० २७ राबिलाखर बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५१२४ श्री. ( २८ सपटेंबर. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री आपा व बाबा व दाजी व बापू स्वामीचे सेवेशीं.

सेवक आबाजी रघुनाथ. सा॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता॥ भाद्रपद व॥ १४ जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष. करवीरकर यांचा व आपला मुकाबला होता. त्यास करवीरकर याणीं आगळीक करून चालोन आले. तेथें लढाईचे मुकाबल्यास भाऊही आपले जमावानिशीं गेले. लढाई मातबर घेऊन दोन चार उठावण्या करून करवीरकरांचा मोहरा फिरविला असतां त्यांजकडून निकड जाली. त्यांत भाऊंस जखमा लागोन देहावसान जालें म्हणोन कळलें. ऐसीयास जुरतींत व तरतुदींत कमती न जाहली. परंतु ईश्वरइच्छेपुढें उपाय नाहीं. भाऊंसारखा मोहरा गेला येविशीं सर्वांस खेद जाला! वर्तमान कळतांच करवीरकरांवरी फौज पाठवावी येविशीं श्रीमंतांस व यजमानांस विनंती केली. त्यावरून तरतूद होत आहे. लौकरच फौज पोंचेल. आपणांस भाऊंचे वियोगाचें दुःख मोठेंच जाहलें. ईश्वरसत्तेस उपाय नाहीं. आपण विवेकवान आहेत. चित्ताचें सांतवन करितील. आपल्यासही जखमा जाहल्या आहेत त्या शेजेस आल्याच लिहून संतोषवावें. फौजेचा जमाव आपला आहेच. इकडूनही फौज येऊन उपराळा होईल. करवीरकरांचे पारिपत्याची तरतूद व्हावी. बहुत काय लिहिणें लोभ करीत असावें हे विनंति.

नं. ५१२५ श्री. (भाद्र व० ३०–२९ सपटेंबर.)

पै॥ छ० ४ जमादिलावल. सन मय्यातैन.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री आपा व बाबा व दाजी व बापू स्वामींचे सेवेशीं.

---

१ परशुराम भाऊंच्या मरणासंबंधें पटवर्धनांकडे समाधानार्थ आणखीही पत्रें आलेलीं आहेत व कांहीं पुण्याहून लष्करच्या रवानगीसंबंधीं आहेत त्यांतलीं थोडीं-शींच येथें घेतलीं आहेत. २ आबा चिटणीस शिंद्याचे कारभारी यांचें हें पत्र.

श. १७२१ परशुरामभाऊंची शेवटची स्वारी. इ. स. १७९९

पोष्य बाळाजी अनंत सा॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. करवीरकर यांचा व आपला मुकाबला होता त्यास करवीरकर याणीं आगळीक करून चालोन आले. तेथें लढाईचे मुकाबल्यास भाऊही आपले जमावानिशीं गेले. लढाई मातबर जाली. दोन चार उलटण्या करून करवीरकर यांचा मोहरा फिरविला असतां त्यांजकडून निकड जाली. त्यांत भाऊंस जखमा लागोन देहावसान झालें; म्हणोन कळलें व राजश्री गंगाधररावजी याणीं लिहिलें व द्वारकोजी खिजमतगार आला त्याणेंही सांगितलें. ऐसीयास जुरतीची तो शर्त व तरतुदीची शर्त जाहली. परंतु ईश्वरेच्छेपुढें उपाय नाहीं. भाऊंसारखा मोहरा गेला येविशीं खेद सर्वांसच आहे. आम्हांस आज तीन वर्षें भेटीची उत्कंठा होती. परंतु ईश्वराचे चित्तास गोष्ट न आली! ऋणानुबंध प्रमाण! येविशींचा खेद चित्तास जाला तो पत्रीं कोठवर लिहावा! भाऊनीं तो आपलें क्षात्रधर्मसेवन केल्याचा शेवट केला. चतुर्थी, भौमवार, व्रतस्थ, ते समयीं धारातीर्थी देह ठेवला, तेव्हां सूर्यमंडळ भेदून गणपतिरूप झाले! त्याणीं आजपर्यंत शिपाईगिरीची टेक राखिली तैसीच शेवटास नेऊन दाखविली ही तारीफ पत्रीं कोठवर लिहावी? परंतु करवीरकरानीं अशी गोष्ट करावयाची नव्हती. वर्तमान कळतांच फौज पलटणें पाठवून पारिपत्यच करावें येविशीं श्री॥ राजश्री पंतप्रधान स्वामी यांस विनंती केली व राजश्री नानांसही बोलण्यांत जाणिलें व आमचे श्रीमंत यजमानसाहेबांस विनंती केली. त्यास श्रीमंतांकडून फौजेचे रवानगीविशीं ताकीद जाली आहे व इकडीलही तरतूद लौकरच फौजा येऊन पोहचतील. आपल्यास भाऊंचे वियोगाचें दुःख मोठेंच जालें. त्यास ईश्वरइच्छेस उपाय नाहीं. पुढील कार्यार्थ शत्रूचे पारिपत्याचा ध्यानीं आणून खेद न करतां चित्ताचें शांतवन करून विवेक करावा. आपल्यासही जखमा जाल्या आहेत त्या शेजेस आल्याचें लिहून संतोषवावें. आपली फौज आहे त्याचे सर्वांची खातरजमा करून आळा घालून जमाव पूर्ववत्प्रों होऊन शत्रूच्या पारिपत्याची तरतूद करावी. इकडून फौज व पलटणांची तयारी लौकरच होईल. राजश्री धोंडोपंत गोखले यांसीं श्रीमंतानीं पत्रें आपले कुमकेस येणेंविशीं गेलींच आहेत. सारांश सर्व गोष्टी घडून येतील. एक भाऊमात्र पुन्हां भेटावयाचे नाहींत! ईश्वरइच्छेस उपाय काय? तिल-

---

१ हें व पुढचें अशीं दोन्ही पत्रें बाळोबातात्यांचीं.

प्राय चित्तीं खेद न करितां हिंमत धरावी यांतच लौकिक व नक्ष आहे. उपराळा व्हावयास आळस व्हावयाचा नाहीं. यजमानसाहेबांचें पत्र अलाहिदा पाठविलें आहे. भाऊ गेले त्यास हाच त्यांस लौकिकच आहे. त्यांत त्यांचे टेकेप्रमाणें ईश्वरें त्यांस पार पाडलें, येविशीं आपण खेद न करावा. ईश्वरसूत्रास उपाय नाहीं. आतां विवेक करून मनाचें समाधान करून हिंमत धरून पुढां शत्रूचे पारिपत्याची योजना करावी यांतच लौकिक आणि कीर्त आहे. आपल्या ध्यानांत सर्व आहे. ल्याहावें असें नाहीं. इकडूनही साहित्य जेथवर होईल त्यास अंतर होणार नाहीं. आपण सर्वत्रांस एक करून फौजेचा जथ पाडावा. इतक्यांत इकडून फौज येत आहे. ज्यांत नक्ष तेंच आपण करतील. रवाना छ० २८ रबिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५१२६ श्री. ( भाद्रपद व० ३०–२९ सपटेंबर. )

पै॥ छ० ४ जमादिलावल मय्यातेन व अलफ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव स्वामीचे सेवेशीं.

पोष्य बाळाजी अनंत. साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ० २८ रबिलाखर जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें " भाद्रपद व० ४ स करवीरकरांची व वडिलांची लढाई मातबर होऊन वडील कामास आले. लढाई मातबर जाहली. दोन चार उठावण्या करून मोहरा फिराविला असतां त्यांची निकड जाहल्यामुळें जखमा लागोन कामास आले. करवीरकर याणीं अशी गोष्ट करावयाची नव्हती" म्हणोन लिहिलें तें सविस्तर कळों आलें. ऐसीयास भाऊनीं तो आपल्या शिपाईगिरीची शर्त केली. भाऊंचें वर्तमान ऐकोन चित्तास खेद जाहला तो पत्रीं कोठवर ल्याहावा? त्यास येविशीं श्रीमंतांस विनंती केली आहे. राजश्री नानांसही बोलण्यांत आणलें आहे. आमचे यजमानसाहेबांसही विनंती केली आहे. राजश्री आपा व बाबा व दाजी व बापू यांस सरकारचीं पत्रें खातरजमेचीं व आमचे यजमानांचीं व आम्हीं लिहिलें आहे. त्यास आपण चार गोष्टी सांगोन भाऊंचें दुःख जाहलें आहे येविशींचें शांतवन करून त्याणीं व आपण व सर्वांनीं हिंमत धरून शत्रूचे पारपत्याची तरतूद करावी. बदला घ्यावा यांतच लौकिक न नक्ष आहे. इकडूनही साहित्य जेथवर होईल त्यास अंतर होणार नाहीं. आपण त्यांची खातरजमा करून पुढें ज्यांत

लौकिक आणि कीर्त तेंच करितील. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५१२७ ( भाद्र व० १०—२४ सप्टें. )

सेवेसी मोरो आपाजी परांजपे विज्ञापना. तागायत. छ० २३ रबिलाखर भौमवार. सेवकाचें वर्तमान यथाथित असे. विशेष. करवीरवासी महाराज यांची व भाऊसाहेबांची लढाई भाद्र व० ४ भौमवारीं जाली. वडील सरकारकामास आले. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा व हरीपंत बाबा व दाजी त्रिवर्ग मांजरीचे मुक्कामीं आले म्हणोन स्वामींनीं सरकारांत व राजश्री नानांस पत्रें पाठविलीं तीं छ० २१ रबिलाखरीं रविवारीं चार घटका रात्रीस पावलीं. येतांच वाचून पाहून श्री॥ राजश्री नानांकडे मी व राजश्री बाळाजी विष्णु उभयतां गेलों. पत्रें दिलीं. पत्रें वाचून नानांनीं बहुत खेद केला. आपणाकडील पत्रें आल्याचे पूर्वीं तृतीयप्रहरीं राजश्री बळवंतराव जवाहीरखान्यांचें पत्र नानांस आलें होतें त्यांतही वडील सरकारकामास आल्याचें लिहिलें होतें. तेव्हांपासून साचिंत होते. पत्र पाहिल्यावर बहुत श्रमी जाहले. भाऊसारखे सरदार दौलतीमध्यें कोणी नाहीं. आम्हांस हांक मारावयास आतां कोणी नाहीं. असो ! होणारे गोष्टीस उपाय नाहीं !" याप्रमाणें बोलिले. नंतर विनंती केली जे " जाली गोष्ट ते ईश्वरइच्छेनें जाली. याउप्पर याचा अभिमान सर्वप्रकारें आपणांस आहे. सरकारांतून पैरवी हरएक प्रकारें होऊन बाजी सुधारे असा प्रकार जाला पाहिजे. " सरकारचें पत्र नानानीं पाहून वाड्यांत प्रविष्ट करणें म्हणोन सांगितलें. नंतर प्रातःकाळीं सरकारचें पत्र बाळाजीपंतानीं प्रविष्ट केलें. हल्लीं नानानीं पत्राचें उत्तर दिलें आहे तें सेवेशीं पाठविलें आहे. बाळाजी विष्णु यानींही सेवेशीं विनंतीपत्र लिहिलें आहे त्यावरून श्रुत होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१२८ श्री. ( भाद्र० व० ३०—२९ सप्टें. )

छ० २८ रबिलाखर. सन मय्यातैन.

सेवेशीं विज्ञापना. हुजूरची स्वारी करवीराहून काल भृगुवारीं दोन प्रहरीं + + सीवर आली. तोफा दोन थोर अलीकडे राहिल्या होत्या त्या नदीपार होणेंस अस्तमान जाला. खासा स्वारी दोन तास रात्रीस नदीपार रुकडीनजीक जाहली. हल्लीं लष्करांत तोफा पांच लहान थोर आहेत. आणखी

---

१ समाधानार्थ पेशवे शिंदे वगैरेनीं पाठविलेल्या पत्रांप्रमाणेंच हें नानांचें पत्र असल्यामुळें येथें छापलें नाहीं. २ मिति व तारीख गैरवस्तीची. पत्र नारोपंत करंदीकर यांचें महाराजांच्या लष्करांतून.

करवीराहून दोन गनीमाळा थोर व भद्रकाळी तोफ येत आहे. इचलकरंजीची मसलत खचित आहे. बोलणें करावें असाही भाव दिसतो. काय घडतें पहावें. आज मंदवारीं नगारा जाहला आहे. कूच होऊन कवनुरावर लष्कर जाणार. इचलकरंजीकडे तलावाही जावयाचा बेत दिसतो. कळावें. इचलकरंजी घेतल्यास शिलशिला समीपे आला. ईश्वर घडवील तें खरें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१२९ श्री. ( आश्वि. शु० ३–२ आक्टो. )

पै॥ छ० २ जमादिलावल. मय्यातैन/व अलूफ.

विज्ञापना. श्री॥ राजश्री नानानीं सांगितलें कीं लढाईची हकीगत कशी जाहली, महाराजांकडील लढाईत सरदार आइकण्यांत फार पडले. इकडीलही लोक फार जायां जखमी जाहले. त्यास तुमचे पत्रांत कांहीं लिहिलें आहे कीं काय ? त्यास मीं विनंती केली, आपणांस पत्र आलें त्या प्रमाणेंच माझें पत्रीं होतें. तेंच पत्र स्वामींस दाखविलेंच आहे. त्यावरून सांगितलें कीं, राजश्री गंगाधरराव यांस लिहून कच्चें सविस्तर लेहून आणवावें. तिकडील बातमी नित्य यावी. याप्रमाणें लिहिणें म्हणजे वरचेवर समजेल. नानांची चित्तवृत्त तिकडे लागली आहे. स्वामींनीं नित्य बातमी लिहून पत्रें पाठवीत जावीं. लढाईत महाराजांकडील मातबर सरदार कोण पडले, तिकडील लोक सरकारकामास किती आले; इकडीलही लोक सरकारकामास किती आले, तें वगैरे हल्लीं फौजा कोठें आहेत, जमाव किती जाहला, याचें वरचेवर लिहिलें यावें, याप्रमाणें रुबरू सांगितलें त्यावरून विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१३० श्री. ( आश्विन शु० ३–२ आक्टो. )

पै॥ छ० २ जमादिलावल. मय्यातैन व अलूफ.

सेवेशीं विज्ञापना ऐसी जे, मदार सांडणीस्वार याजबरोबर पत्रें स्वामींचीं आलीं. भाऊसाहेब लढाईत सरकार कामास आले. पुढें याची पैरवी सरकारांतून व्हावी. तेणेंकरून सरकारचा नक्ष होईल म्हणोन श्री॥ राजश्री पंतप्रधान यांस व नानांस पत्रें आलीं तीं पत्रें प्रविष्ट जाहलेवर श्री॥ राजश्री नानानीं परम खेद केला. बहुत श्रमी जाहले. भाऊ निदानचे सोबती होते. सरकार दौलतीमध्यें मर्दुमीस याप्रों कोणी नव्हतें. आमचें त्यांचें मध्यें कांही दिवस ठीक नव्हतें, परंतु तोही विचार यथास्थित जाला होता. मागें मोठीं

---

१ पत्र मोरो आपाजी परांजपे याचें पुण्याहून.

संकटें पडलीं ते समयीं सिद्ध होते. आमचे सोबती होते. असो. होणार ! ईश्वरइच्छा प्रमाण ! म्हणून उत्तर केलें. नंतर राजश्री बाळाजी विष्णु व मी उभयतां विनंती केली कीं भाऊंनीं सरकारकामावर प्राण खर्च केला. त्यानीं कृतकृत्यता केली. याउपर पुढें हरयेक प्रकारें आपण वडील भाऊंचे जागां आहेत. सरकारांतून फौज गाडद रवाना व्हावी याचा उद्योग लौकर व्हावा. श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचेंही पत्र दाखविलें. प्रविष्ट करणें म्हणोन सांगितलें. राजश्री बाळोबातात्या यांस स्वामीनीं पत्र लिहिलें होतें तेंही दाखविलें. 'चांगलें आहे, प्रविष्ट करणें;' म्हणून सांगितलें. आणखी एक पुरवणी खास दस्तूरची होती ती दाखविली त्यावरून फार खिन्न जाहले. 'हीं कर्मे केवळ नीच असतील त्यांचीं! अशी गोष्ट केली ! असो. काय चिंता आहे ?' म्हणोन बोलिले. तें पत्र माघारें दिलें. दुसरे दिवशीं सरकारचें पत्र राजश्री बाळाजीपंत याणीं प्रविष्ट केलें. लौकिकार्थ वाईट गोष्ट जाहली म्हणोन श्री॥ राजश्री पंतप्रधान व रावसाहेब यानीं उत्तर केलें ! पुढें सरकारांतून लौकर पैरवी व्हावी म्हणोन बाळाजीपंत बोलोन आले. राजश्री बाळोबातात्यांचें पत्र प्रविष्ट जाहलेवर ते बहुत श्रमी जाहले. दुसरे दिवशीं श्रीमंतांकडे आले. त्याणी 'भाऊ सरकारकामास आले. याप्रों मातबर सरदार सरकार दौलतीमध्यें नाहीं. एक बाजू दक्षणेकडील होती. याउपर याचा विचार काय केला आहे ? भाऊ तो सरकार कामास आले. पुढील तिकडील बंदोबस्त लौकर केला नाहीं तरी विचार कळतच आहे." ऐसें बोलिले. त्यावरून फौज पाठवावी म्हणोन रावसाहेब बोलिले. नंतर राजश्री बाळोबातात्या नानांकडे आले. नानांचें बोलणें जाहलें. फौज पाठवावी याप्रों निश्चयांत आलें. शिंदे यांजकडील हजार दीडहजार फौज, चार पलटणें, व सरकारांतून दोन हजार फौज दीड हजार गाडदी लौकर रवाना व्हावे याप्रों बोलण्यांत येऊन निश्चयांत आलें आहे. येविशीं श्री॥ राजश्री नारोपंत चक्रदेव यांजपासीं बोलोन श्रीमंतांकडे समजावून फौज पाठवावी याप्रों निश्चयांत आणिलें. फौज पलटणें रवाना होतात. श्री॥ राजश्री नानांजवळ प्रातःकाळीं गेलों. "मिरजेस गडी पाठवतों. फौज वगैरे सरंजाम लौकर रवाना व्हावा येविशीं मिरजेहून श्री॥ राजश्री बाळासाहेब याणीं आपणास लिहिलें त्यांचें काय ?" म्हणोन विनंती केली. उत्तर केलें कीं फौज रवाना होते म्हणोन लिहिणें. याप्रमाणें सांगितलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.



# करवीर राज्यावर स्वारी.



## पूर्वार्ध.

### (इ. स. १७९९ अक्टोबर ते इ. स. १८०० फेब्रुवारी अखेर.)

पटवर्धनानीं करवीरच्या राज्यावर अनेक स्वाऱ्या केल्या त्यांतली ही शेवटची स्वारी होय. हिचा प्रारंभापासून अखेरपर्यंत वृत्तात सांगतांना त्या अवधींत महाराष्ट्रांत इतरत्र ज्या गोष्टी घडत होत्या त्यांचाही परामर्ष घेणें आवश्यक आहे. हें सर्व एकदम एकाच प्रकरणांत करणें सोईचें नाहीं. सबब मागच्या प्रकरणाप्रमाणें याही प्रकरणाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग कल्पिले आहेत. पूर्वार्धांत पटवर्धन, पेशवे व शिंदे यांच्या फौजानीं येऊन करवीरास वेढा दिला येथपर्यंतचा मजकूर येईल, आणि स्वारीच्या अखेरपर्यंतचा मजकूर उत्तरार्धांत येईल.

पट्टणकुडीच्या लढाईंत परशुरामभाऊंचा पराजय होऊन ते मृत्यु पावले. त्यानंतर त्यांच्या फौजेची वाताहत झाली तेंव्हा रामचंद्रपंत आपासाहेब भाऊबंद मंडळीसह मिरजेस आले, हें मागच्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. ( पृष्ठ ५८६८ ) झालेल्या अपजयाबद्दल शत्रूवर सूड कसा घेतां येईल ही आपासाहेबांच्या जीवास एकसारखी तळमळ लागली होती. भाऊंचें उत्तरकार्य झाल्यावर लगेच आश्विन महिन्यांत त्यानीं हरिपंतबाबास हजार पंधराशें स्वार व सर्व पेंढार बरोबर देऊन डेरेदाखल तर केलेंच. चिंतामणराव आपाही तितकेच स्वार व थोडें पायदळ घेऊन सांगलीबाहेर डेरे देऊन राहिले. पण एवढ्यानें काय होणार ? पटवर्धनांत यापूर्वी एकजूट असती तर या पल्लयाला गोष्टी आल्याच नसत्या. आणि हल्लीं यदाकदाचित् ही जूट होऊन सर्वांचें सैन्य युद्धाला निघालें असतें तरी करवीरच्या महाराजांचें पारिपत्य करण्यास तें असमर्थ होतें. पुण्याहून मोठी फौज कुमकेस आणल्याखेरीज आपासाहेबांचा कांहींच इलाज चालण्याजोगा नव्हता. सबब त्यानीं मिरजेस आल्यापासून पेशवे, शिंदे, नाना व बाळोबा यांजकडे आपली कुमक करण्याविषयीं वारंवार निकडीचीं विनंतीपत्रें लिहिलीं व आपल्या वकिलांकरवीं या बाबतींत दरबारांत जिकीर करण्याची परा-

परशुरामभाऊंविषयीं बाजीरावांच्या मनांत किती प्रेम होतें हें प्रसिद्धच आहे. श्रीमंतांचें व दौलतरावांचें एकसूत्र असल्यामुळें या दोघांकडून आपासाहेबांस मदत मिळणें दुरापास्तच होतें. तथापि बाळोबा व नाना यांच्य खटपटीनें आपणास फौजेची कुमक मिळेल ही आपासाहेबानीं धरलेली आशा फोल नव्हती. भाऊंविषयीं बाळोबाचा स्नेहभाव अकृत्रिम होता, व अलीकडे नानाही परशुरामभाऊंचा उत्कर्षच चिंतीत होते. शिवाय तीन वर्षांपूर्वी करवीरकरांना भाऊंवर तरवार उपसण्याविषयीं आपण चिथावून दिलें नसत तर भाऊंवर हा अनर्थ खचित ओढवला नसता; ही गोष्ट नानांच्या मनाला खात होती, व त्यामुळें ते भाऊंच्या मुलांचें कल्याण करून दाखवण्याविषयीं उत्सुक होते. भाऊंच्या मृत्यूचें वर्तमान येतांच बाळोबातात्यानीं सरकारवाड्यांत जाऊन चौघडा बंद करविला व पेशव्यांस बजावलें कीं, परशुरामभाऊ हे सरकारचे थोर सरदार लढाईत कामास आले त्याअर्थीं सरकारची इभ्रत राखण्याकरितां करवीरावर सैन्य पाठवून याचा मोबदला घेतला पाहिजे. या-करितां मोहिमेची तयारी करण्याचा हुकूम व्हावा. नानांचाही पेशव्यांस याच-प्रमाणें सक्त तगादा बसला होता. त्यामुळें श्रीमंतानीं या दोघां मुत्सद्यांच्या आग्रहास मान देतों असें दाखवून आपासाहेबांची कुमक करण्याकरितां कर-वीरच्या राज्यावर मोहीम करण्यास रुकार दिला. शिंद्यानींही या मोहिमेस आपली संमति दिली. परंतु या दोघांची हीं शाब्दिक संमति म्हणजे केवळ धर्मशास्त्राची आज्ञा होती! मोहिमेच्या तयारीला पैसा लागतो त्याचा दोघां-च्याही तिजोरींत अभाव होता. तो पैसा नाना व बाळोबा यांसच पैदा करावा लागला. फौजेच्या व सरकारी तोफखान्याच्या आगाऊ खर्चाकरितां नानानीं पांच लक्ष रुपये दिले, व बाळोबांनीं पलटणांच्या व फौजेच्या तयारीस पदरचे चार लक्ष रुपये भरले. शिवाय करवीरच्या मोहिमेकरितां म्हणून त्यांनीं एक हजार स्वार निराळे चाकरीस नेमून त्यांच्या सरदारीवर गणपतराव भिकाजी नांवाचा आपल्या तर्फेचा मनुष्य नेमला. इतकें सर्व झाल्यावर पुण्याहून फौज व पलटणें निघालीं व हळू हळू चाल करीत मोहिमेवर येऊन दाखल झालीं तों सन १८०० चा जानेवारी महिना आला. या तीन महिन्यांत करवीरचे महाराज व त्यांचे सरदार यांच्या काय उलाढाली चालल्या होत्या हेंही सांगितलें पाहिजे.

पट्टणकुडीची लढाई झाल्यावर महाराजानीं इचलकरंजीस येऊन वेढा दिला. रत्नाकरपंत व हिंमतबहाद्दर व चतुरसिंग वगैरे चोहोंकडे फैलावलेल्या

आपल्या सरदारांस त्यानीं या मुक्कामीं येऊन दाखल होण्याची आज्ञा केली. कृष्णेचें पाणी ओसरल्यावर स्वतःच्या पुढारीपणाखालीं कर्नाटकाप्रमाणें महाराष्ट्रांतसुद्धां फार मोठा दंगा माजवावा असा त्यांचा बेत होता. इतक्यांत पुण्याहून आपल्या पारिपत्याकरितां फौज रवाना होणार हें नक्की वर्तमान कळल्यावरून त्यांस हें चढावाचें धोरण अजीबात सोडून द्यावें लागलें; आणि इचलकरंजीकरांशीं कसाबसा तह ठरवून त्यांनीं आपली फौज उठवून नेली.

यापूर्वीं भाऊंच्या मृत्यूबद्दल रामचंद्रपंत आपास दुखवट्याचीं वस्त्रें पाठावण्याचा छत्रपतीनीं बेत योजिला होता. त्यांच्या मनांतली मसलत काय असेल ती असो, परंतु " जी गोष्ट जाहली ते बरीच जाहली. पुढें तरी विवेक व्हावा यांत उत्तम आहे. हुजूरचें लक्ष असेंच आहे " असें बाह्यतः तरी त्यांचें म्हणणें होतें. मिरजकर व कुरुंदवाडकर यानीं या कामांत चार समजुतीच्या गोष्टी रामचंद्रपंतास सांगाव्या अशी त्यांची इच्छा होती. परंतु स्वाभिमानी रामचंद्रपंतानीं दुखवट्याचीं वस्त्रें स्वीकारण्याचें झिडकारिल्यामुळें तो बेत तितकाच राहिला.

वर सांगितल्याप्रमाणें महाराज करवीरास परत आले तरी त्यांच्या सरदारांचा चोहोंकडे लुटालूट करण्याचा क्रम चाललाच होता. पट्टणकुडीची लढाई झाल्याबरोबर महाराजानीं दोन तीन हजार फौज बरोबर देऊन रत्नाकरपंतास चिकोडी मनोळी तालुक्यांतलीं ठाणीं घेण्याकरितां पाठविलें हें मागल्या प्रकरणांत लिहिलेंच आहे. ( पृष्ठ ५८६८ ) हीं सर्व ठाणीं घेतल्यावर रत्नाकरपंत गोकाक व यादवाड या तालुक्यांत शिरले व तेथें परशुरामभाऊंचीं ठाणीं होतीं तीं घेऊन त्या तालुक्यांत त्यानीं पुन्हां महाराजांचा अंमल बसविला. नंतर ते बेळगांव शहापूर परगण्यांत येऊन लूटालूट करीत फिरूं लागले. तेथें त्यांस प्रसिद्ध धोंडजी वाघ येऊन भेटला. तो तेथें कसा आला हें समजण्याकरितां त्याचें गेल्या चार पांच महिन्यांतलें चारित्र सांगितलें पाहिजे.

बिदनूरच्या मुलखांतून इंग्रजानीं धोंडजी वाघ यास तुंगभद्रेच्या अलीकडे मराठी मुलखांत हुसकून लाविलें असें मागें सांगितलें आहे. ( पृष्ठ ५८५६ ) त्याच्या त्या पडत्या काळांतसुद्धां स्वार पायदळ मिळून दोन हजार पर्यंत लुटारू जमाव त्याजवळ अद्यापि राहिला होता. परशुरामभाऊंशीं लढाई

देण्याच्या इराद्यानें करवीरचे महाराज त्या वेळीं मिळेल तिकडून कुमक मिळविण्याच्या उद्योगांत होते. वाघाचा लौकिक चारी मुलखांत महशूर झाला होता. त्यानें मी तुम्हांकडे येतों असें लिहून पाठवितांच महाराजानीं हर्षभरित होउन त्यास अगत्याचें बोलावणें पाठविलें. तथापि भाउंची फौज चुकवून करवीराकडे येणें धोक्याचें असल्यामुळें तसें करण्याची संधि पहात व लुटालूट करीत धोंडजी वाघ सावनूरच्या आसपास फिरत होता. तशा स्थितींत एकदां त्यानें लक्ष्मेश्वरचे मामलेदार बाळकृष्णपंत लागू यांस सांगून पाठविलें कीं, मला बसावयास सत्तेची जागा नसल्यामुळें आज या गांवीं तर उद्यां त्या गांवीं, असें निराधार हिंडावें लागतें. तुमची आमची मैत्री असावी. मी लक्ष्मेश्वरच्या आसऱ्यास येऊन राहतों. तुमच्या तालुक्यास मजकडून उपद्रव लागणार नाहीं. पुढें कोणतीही मसलत करणें तर तुम्ही आम्ही एकमेकांच्या संमतीनें करीत जाऊं. बाळकृष्णपंतांस वाघाची दहशत असल्यामुळें त्यास येऊं नको म्हणण्याचें धैर्य त्यांस झालें नाहीं. त्यांनीं त्याचें म्हणणें निरुपायानें कबूल केलें. मग त्याप्रमाणें तो वाघ आपलें लष्कर घेऊन निर्धास्तपणानें लक्ष्मेश्वरच्या ठाण्याजवळ येऊन राहिला. हा वाघोबा केव्हां काय करील याचा भरंवसा नसल्यामुळें याची ब्याद येथून कशी टाळावी या विचारांत बाळकृष्णपंत पडले, व तेथून सात आठ कोसांवर धोंडोपंत गोखले उतरले होते त्यांस त्यानीं हा वृत्तांत कळविला. लागूंप्रमाणें गोखल्यांपासूनसुद्धां वाघानें अभयाचें वचन मिळविलें होतें. तथापि या दोघानीं त्यास विश्वासघातानें बुडविण्याची बुद्धि धरली! दोघांचें संगनमत ठरून एके रात्री गोखल्यानीं येऊन वाघावर छापा घातला, व त्याच वेळीं लक्ष्मेश्वरांतले शिपाई बाहेर पडून त्यांनींही त्याच्या लष्करावर हुल्लड केली. त्यावेळीं त्याचें सर्व लष्कर लुटलें जाऊन शेंकडों लोक मारले गेले. तो मोठ्या कष्टानें कुटुंबसुद्धां निभावून तेथून निसटला. त्या दिवसापासून लागू व गोखले या दोघांविषयीं वाघाच्या मनांत पराकाष्ठेचा दंश राहिला त्याचे परिणाम काय झाले, हें पुढें लिहिण्यांत येईल. असो. त्यानंतर धोंडजी वाघ तोंड चुकवून लपत छपत फिरत असतां त्यास मनोळीच्या किल्ल्यांत आश्रय मिळाला. तो किल्ला करवीरच्या महाराजांचा असून तेथें त्यांच्या वतीनें खंडेराव भोसले हा अंमल वहिवाटीत होता.

या गोष्टी घडत तों पट्टणकुडीची लढाई होऊन गेली होती. तथापि वाघासारख्या हिकमती शूर सरदाराचें साहाय्य महाराजांस केव्हांही आव-

इयकच असल्यामुळें त्यानीं त्यास निघून येण्याविषयीं बोलावणें पाठवलें. त्याप्रमाणें तो मनोळीच्या किल्ल्यांत मुलेंमाणसें ठेवून करवीरास येण्याकरितां बाहेर पडला. इतक्यान्दां त्या वाघाचा पराजय होऊन त्याच्या फौजांचा विध्वंस झाला तरी लुटारू शिपायांच्या झुंडी त्याजवळ पुन्हा पुन्हा गोळा होत, हीच त्याच्या सरदारीच्या लौकिकाची उत्तम साक्ष होय ! या प्रसंगीं दोन तीन हजार शिपाई गोळा झाले तेवढेच बरोबर घेऊन तो निघाला तो बेळगांवाकडे आला. तो जवळ येतांच शहापूरकर व बेळगांवकर यानीं त्यावर हल्ला केला. पण वाघानेंच उलट त्यांस ठोक देऊन त्यांचीं हत्यारें हिसकून घेतलीं व त्यांस पिटून लाविलें. मग वाघ त्याच तालुक्यांत रत्नाकरपंत लूट करीत फिरत होते त्यांस जाऊन मिळाला. महाराजांकडून कुमक नेऊन धोंडोपंत गोखल्यांवर सूड उगवावा ही त्याची मसलत होती ती राजाज्ञांस फार पसंत पडली. कारण गोखल्यानीं वाघाप्रमाणेंच त्यांच्याही लष्करचा मागें धुव्वा उडविला होता.

महाराजांच्या भेटीकरितां धोंडजी वाघ करवीरास आला तेव्हां त्यांनीं त्याचा बहुत गौरव करून त्यास ठेवून घेतलें. त्यांचा सरदार धुळोजी पांढरे एका खेड्याजवळ बेफामपणानें उतरला असतां महादजी शितोळे व शिधोजी निंबाळकर यानीं रात्रीं येऊन त्यावर छापा घातला, व मारामारी करून घोडीं उंटें ढेरे दांडे सुद्धां पांढऱ्याचें सर्व लष्कर लुटून घेतलें. तो लुटीचा अजबाब बरोबर घेऊन शितोळे व निंबाळकर आपापल्या कुटुंबांसुद्धां मिरजेस राहिले होते. आणखीही महाराजांच्या वाईटावर असणारे पुष्कळ कुफार मिरजेचा आसरा धरून होते. त्यामुळें त्या शहरावर महाराजांचा विशेष दांत होता. बायांची भेट झाली तेव्हांपासून मिरजेचें शहर लुटावें या मसलतीची चर्चा करवीरच्या दरबारांत वारंवार निघाली व अनेक कारणानीं रहित होत गेली. वाघासारख्या पराक्रमी सरदाराची गांठ पडल्यावर महाराजांची या बाबतींतली आशा पुन्हां अंकुरित झाली. एक हजार निवडक स्वार बरोबर द्याल तर मिरजेची पेठ मारून आणतों, असें वाघानें कबूल केलें. ‘ नदीवर अथवा गांवाबाहेर चौक्या नाहींत. वेशीवरून प्यादे आहेत. गांवांत चार पांचशें प्यादे आहेत. राऊतही विशेष नाहींत. ’ याप्रमाणें मिरज शहराच्या बंदोबस्ताची नक्की बातमीसुद्धां वाघानें मिळविली होती ! परंतु याही खेपेस मिरज लुटण्याची ही मसलत तशीच राहून गेली. याचें कारण महाराजांचीं

पटवर्धनांकडे असलेलीं उसनीं फेडून घेण्याकरितां चतुरसिंगाप्रमाणें फुकट राबणारा धोंडजी वाघ हा मनुष्य नव्हता! महाराजांकडून आपल्या सरदारीचें कांहीं स्वास्थ्य करून घ्यावें आणि गोखल्याचें परिपत्य करण्यासाठीं कुमक मिळवावी हे दोन उद्देश मनांत धरून तो करवीरास आला होता. ते त्याचे उद्देश पूर्ण करण्याची महाराजानीं टाळाटाळ चालविली तेव्हां तो नोव्हेंबरच्या अखेरीस रुष्ट होऊन करवीर सोडून गेला. परत जातांना पुन्हां त्यास मिळवून घेण्याच्या इरायानें रत्नाकरपंतानीं राहून घेतलें. तेथें असतां त्यानें अकस्मात् लांब दौड करून रामदुर्गच्या पेठेवर धाड घातली. परंतु तेथें कांहींच लाग न साधल्यामुळें त्यास हात हालवीत परत यावें लागलें. करवीरचा पक्ष सोडूं नये म्हणून राजाज्ञानीं वाघास पुष्कळ आग्रह केला. तेव्हां त्यानें अखेरचा जाबसाल सांगितला कीं, महाराजानीं तूर्त पन्नास हजार रुपये द्यावे, फौजेच्या खर्चासाठीं दरमहां एक लक्ष रुपये द्यावे, आणि मुलेंमाणसें ठेवण्याकरितां मनोळीचा किल्ला द्यावा. या त्याच्या मागण्या राजाज्ञानीं महाराजांस कळविल्या. परंतु तिकडून निश्चयाचें उत्तर येण्याचें लांबणीवर पडूं लागलें. राजाज्ञांच्या संगतीस राहून वाघाचें पोट भरेना. कर्नाटकांत जावें तर त्यास गोखल्याचा दरारा असल्यामुळें तिकडे जाण्याची सोय नव्हती. पूर्वेच्या बाजूस मात्र पटवर्धन व रास्ते व प्रतिनिधि यांच्या मुलखांत सरकारच्या फौजा नव्हत्या. तो प्रांत त्यास मोकळा होता. तिकडे जाऊन चार दिवस पोट भरतों असें सांगून तो राजाज्ञांचा निरोप घेऊन गेला तो विजापूर बागलकोटाकडे जाऊन गांवोगांव खंडण्या घऊन पुन्हां त्यांजकडे दिसेंबरांत आला. मनोळीऐवजीं पाच्छापूरच्या सनदा महाराजानीं त्यास दिल्या, परंतु तें ठाणें त्यास नको होतें. फौजेच्या खर्चास ऐवज किंवा मुलूख नेमून देण्याच्या बाबतींत महाराजानीं मौन धरिलें तेव्हां यांस आपला भरंवसा येत नाहीं व यांजकडून कांहीं लभ्यांश व्हावयाचा नाहीं हें तो मनांत उमजला; आणि जानेवारींत रत्नाकरपंताशीं भांडून निराळा फुटला तो पुन्हां करवीराकडे आला नाहीं. त्यानें पुन्हां बागलकोटाकडे स्वारी केली आणि तालिकोटकर लढाईस उभे राहिले त्यांचा पराजय करून त्यांस खंडणी देणें भाग पाडलें. मुधोळास नारायणराव व महाराव घोरपडे यांमध्यें लढाई जुंपली होती तींत वाघानें महारावांचें साहित्य करून मुधोळचें ठाणें त्यांस घेऊन दिलें. तेव्हां नारायणराव घोरपडे तेथून पळून गेले. त्यांस हनगंडीच्या देसायानें आश्रय दिला. याप्रमाणें फेब्रुआरी अखेरपर्यंत तो वाघ त्याच

बाजूस धामधूम करीत फिरत होता. मार्च महिन्यांत करवीरच्या मोहिमेकरितां धोंडोपंत गोखले सावनुराहून निघून रामदुर्गच्या बारीअलीकडे आल्यामुळें कर्नाटकांत जाऊन निर्धास्तपणानें लुटालूट करण्यास त्यास आयताच वाव मिळाला; तेव्हां तो कूच करून हुबळी धारवाडाकडे गेला.

वाघाच्या येण्यापासून करवीरच्या महाराजांचा कांहीं एक फायदा न होतां मनोळीचा किल्ला मात्र त्यांच्या हातचा गमावला. कारण तेथील किल्ले-दार खंडेराव भोसले त्यांजवर बिथरला होता त्यासच सामील करून घेऊन वाघानें मनोळीचा किल्ला बळकाविला इतकेंच नव्हे, तर त्यानें चंद्रापा देसाई तलूरकर व कितूरकर देसाई यांशीं कूट जमवून पुन्हां कधीं त्या किल्ल्यास महाराजांकडून उपद्रव होऊं नये असा बंदोबस्तही केला.

साताऱ्चें राज्य सोडवण्याच्या कामीं कुमक देण्याची लालूच दाखवून चतुरसिंगास करवीरच्या महाराजानीं आपल्या दिमतीस लावून घेतलें होतें. आणि पेशव्यांच्या राज्यांत त्याचें सर्वांशीं शत्रुत्व असल्यामुळें करवीरच्या पक्षास चिकटून रहाण्यावांचून त्यालाही गत्यंतर नव्हतें. तथापि हात फावेल तेव्हां साताऱ्याच्या आसपास येऊन रास्त्यांच्या अंमलांत गडबड करण्याची संधी तो व्यर्थ घालवीत नसे. नोव्हेंबर डिसेंबर महिन्यांत तो चतुरसिंग धामधूम करीत रहिमतपुरापर्यंत आला होता. तो व त्याचे सरदार नरसिंगराव गुजर व संताजी भोसले मिळून तीन हजारांपर्यंत ही लुटारू फौज गोळा झाली होती. या वेळीं साताऱ्याचें शहर लुटणें चतुरसिंगास कांहींच अगाध नव्हतें. साताऱ्याच्या किल्ल्यावर दोन हजारपर्यंत पायदळ होतें व खालीं शहरांत रास्त्याचे कारभारी पांच चारशें स्वार घेऊन राहिले होते. ते कारभारी कांहीं गलबल दिसली असतां किल्ल्यावर पळून जात आणि स्वस्थता झाल्यावर खालीं येऊन रहात ! अशी स्थिति असतांही साताऱ्याच्या वाटेस चतुरसिंग गेला नाहीं हें त्यास भूषणास्पद आहे.

नोव्हेंबरच्या अखेरीस बावडेकर पंतअमात्य यानीं कोंकणप्रांतावर स्वारी करून खारेपाटणची गढी घेतली, आणि मागून राजापूरचें ठाणें घेऊन तेथील पेठ लुटून जाळून फस्त केली. परंतु आरमाराचे सरदार धुळप व कोंकणचे सरसुभे यानीं अमात्यांची आवाडाव फार दिवस चालूं दिली नाहीं. त्यानीं तीन हजार पायदळ गोळा करून अमात्यांशीं लढाई दिली आणि

राजापूर व खारेपाटण हीं दोन्ही स्थळें पुन्हां हस्तगत करून शत्रूची फौज बावड्याच्या घेऱ्यांत परत हुसकून लाविली.

मागच्या प्रकरणांत बाया दौलतरावांची भेट न घेतां जेजुरीहून जांबगांवास गेल्या असें (पृष्ठ ५८५४) लिहिलें आहे तें बरोबर नाहीं. तिकडे जावयास त्या निघाल्या होत्या हें खरें. तथापि तंटा मिटला आहे त्याअर्थी फटकून दूर रहाण्यांत दुर्लौकिक होतो, याकरितां आम्हांजवळ येऊन रहावें, आम्ही आपल्या हुकमाबाहेर जाणार नाहीं, अशी दौलतरावानीं पराकाष्ठेची भीड घातली; त्यावरून बायांच्या मनांत विश्वास उत्पन्न झाला व त्या पुण्याच्या बाजूस येऊं लागल्या. तों झालेल्या समेटांत बिघाड होण्याचें एक कारण अकस्मात् उद्भवलें. तें असें—

बाया पुण्याकडे चालल्या तेव्हां त्यानीं चोहोंकडे पांगलेले आपले सरदार परत बोलाविले. त्या सरदारांपैकीं बाळाजी कृष्ण हा करकंब वगैरे पटवर्धनांच्या महालांत मनस्वी उपद्रव देत फिरत होता. तो सरळ मार्गानें बायांच्या लष्कराकडे न जातां अहमदनगराकडे जाऊन मोंगलाईंत शिरला व तेथें लुटालूट करूं लागला. तेव्हां मोंगलाईचे सरदार सुरतवाला नबाब व सुभानखान यानीं त्यावर हल्ला केला व त्याचें बहुतेक लष्कर लुटून त्यास पिटून लाविलें. तेथून तो बाळाजी पळ खाऊन आला तो तळेगांवच्या मुक्कामास बाया आल्या होत्या त्यांच्या लष्कराजवळ येऊन उतरला. त्या सुमारास शिंद्याचीं कांहीं पलटणें पारनेराकडे चाललीं होतीं तींही बाळाजीच्या गोटापासून चार कोसांवर येऊन उतरलीं. त्या पलटणवाल्यांची व बाळाजीची चुरस पूर्वीपासूनची होती, तरी बाया व दौलतराव यांमधला तंटा मिटला असल्यामुळें आतां हीं पलटणें आपलें काय करणार या समजुतीवर तो बेफाम राहिला. तों दुसऱ्याच्या दिवशीं पहांटेस पलटणानीं येऊन त्याच्या गोटावर छापा घातला, व शेकडों लोक मारून त्याचा सबंध गोट लुटून फस्त केला! याप्रमाणें कलागतीस प्रारंभ होतांच बक्षी व पठाण पलटणांवर चालून आले. सायंकाळपर्यंत लढाई होऊन उभयपक्षीं चार पांचशें माणूस ठार झालें. बाया तळेगांवपर्यंत आल्या होत्या त्या पुन्हां बिथरून गणेगांव वाघोलीच्या मुक्कामास परत गेल्या. तें पहातांच दौलतराव शिंदे चिंताक्रांत झाले, व त्यानीं सदाशिव मल्हार दिवाण व धोंडीबा दादा यांस बायांच्या समजुतीकरितां पाठविलें. त्यानीं

बायांस परोपरीनें विनविलें कीं, या कलागतीशीं शिंद्यांचा संबंध कांहीं एक नाहीं. पलटणवाले व बाळाजी कृष्ण यांचें आपसांत वांकडें फार दिवसांचें होतें त्याचा हा परिणाम झाला. दौलतरावाप्रमाणें आपणही धनीच आहां. जे गुन्हेगार असतील त्यांस खुशाल शिक्षा करावी. याप्रमाणें बोलून त्यानीं पलटणांवरचे गोरे अंमलदार बायांपुढें नेऊन उभे केले. त्या अंमलदारानीं 'टोप्या काढून' त्याच अभिप्रायाचा अर्ज केला व आपल्या कराचल्या बायांपुढें ठेवल्या. इतकें झालें तरी बायांची खात्री होईना. मग दौलतरावांच्या मनांत पापबुद्धि नाहीं, ते इमानानें आपल्या आज्ञेंत वागतील, अशी बाळोबाताल्या व आबा चिटणीस व कंपूवाले मुख्य गोरे अंमलदार यानीं हमी दिली; तेव्हां त्या निःशंक होऊन पुण्याजवळ भीमेच्या कांठीं तुळापुरास येऊन राहिल्या. दिवसेंदिवस झालेल्या समेटाविषयीं त्यांचा भरंवसा वाढत चालला; तो इतका कीं फक्त दोन हजार फौज जवळ ठेवून बाकीच्या सैनिकांस त्यानीं निरोप दिला आणि त्यांच्या जागीं छावणीच्या बंदोबस्ताकरितां शिंद्यांचीं दोन पलटणें आणून आपणांजवळ नेहमीं राहून घेतलीं.

पेशवाईच्या कारभारांत पराकाष्ठेची अव्यवस्था माजली होती ती मोडण्यासाठीं नानांच्या हातांत कारभाराची कुलमुखत्यारी यावी म्हणून बाळोबातात्यानीं बाजीरावसाहेबांस या वेळीं कसा तगादा बसविला होता हें पुढील उताऱ्यावरून समजेल.

"राजश्री शिंदे यांजकडील कारभारी राजश्री बाळोबाताल्या, आबा चिटणीस, मामा आंगरे याणीं श्री॥राजश्री पंतप्रधान यांजपाशीं विजयादशमीच्या पूर्वीं पांच सात दिवस बोलणें लाविलें कीं, सरकारच्या दौलतीमध्यें बखेडा जाला. हरएकविशीं बंदोबस्त होत नाहीं. आमचे घरांत कलह उत्पन्न जाला होता तो मिटत आला आहे. पुढें इंग्रज प्रबळ जाले आहेत यांचा रेंच मोडिला पाहिजे. त्यास याचा विचार काय ? राजश्री नानांचें तुमचें मिळत नाहीं. सर्वांचें छत्र सरकारची दौलत. त्यास येथें विचार या प्रकारचा ! पुढें याप्रमाणेंच असल्यास विचार कळतच आहे ! यावरून श्री॥ राजश्री पंतप्रधान व रावसाहेब याणीं उत्तर केलें कीं "राजश्री नानांस कारभार निखालसपणें करावा म्हणोन सांगितलें; एक दोन वेळां जालें; परंतु ते यथास्थित चित्त घालीत नाहींत" म्हणोन आज्ञा केली. बाळोबानीं उत्तर केलें कीं, त्याणीं चित्त घातलें असतां बंदोबस्त होईल. नाहीं तरी आम्हांस विचार पहावा लागेल !

त्यावरून विचार करून सांगतों, ( असें उत्तर जालें. ) 'एक दोन वेळां शिंदे यांचे कारभारी यांचें श्रीमंतांजवळ हेंच बोलणें पडलें. राजश्री नानांसही राजश्री बाळोबातात्या व चिटणीस याणीं सांगितलें. नानानीं उत्तर केलें कीं, आम्हांस कारभार कांहीं एक नलगे. तुम्ही कारभार दौलतीचा करावा म्हणतां, त्यास माझे शरीराची प्रकृत कळतच आहे. बहुत दिवस श्रीमंतांचे दौलतीमध्यें काम केलें. याचा शेवट श्रीभागीरथीस जावें हाच आहे. श्रीमंतानीं कृपा करून आम्हांस निरोप द्यावा हें उत्तम. राजश्री अलिजाबहादर यांचें आमचें गारपीरचे मुक्कामीं आम्ही ( सुटून ) आलों ते समयीं हेंच बोलणें आहे. याउपरी कारभार माझ्याचेनें व्हावयाचा नाहीं; म्हणोन उत्तर केलें. नंतर कारभारी शिंदे यांजकडील यांचा नेट पाहून श्रीमंतांनींही कारभार नानांस सांगावा याप्रमाणें विचार केला होता. नाना तो कारभार करीत नाहीं म्हणतच. परंतु सर्व लौकिकांत विजयादशमीस मुहूर्तेंकरून नानांस कारभार सांगावा असें होतें. परंतु विजयादशमीस तो प्रकार जाला नाहीं. पुढें काय ठरतें पहावें."

वरील उताऱ्यांत नानानीं कारभार पतकरिला नाहीं तर 'याचा विचार आम्हांस करावा लागेल' अशी जी बाळोबानीं बाजीरावसाहेबांस दहशत दिल्याचें लिहिलें आहे त्याचा अर्थ श्रीमंतानीं आपल्या बुद्धीप्रमाणें काय घ्यायचा तो घेतला होता. नाना, तात्या व भाऊ यांचें त्रिकूट भाऊंच्या मृत्युमुळें विसकटलें तरी बाकी राहिलेले दोघे मुत्सद्दी नाना व बाळोबा हे श्रीमंतांस कमी भयप्रद वाटत होते असें नाहीं. त्या वेळच्या सांकेतिक लेखांतून 'अंगठीवर हिरा आहे तो काढून नवीन हिरा बसवावयाचा आहे' असा ज्याचा निर्देश केला जात असे तो बेत, म्हणजे बाजीरावसाहेबांस पदच्युत करावयाचें आणि विनायकराव अमृत यांस विनायकराव माधव बनवून गादीवर त्यांची स्थापना करावयाची, हा बेत नाना व बाळोबातात्या यांच्या मनांत खरोखरच घोळत होता कीं नाहीं हें सांगणें कठीण आहे. एवढें मात्र खरें कीं, त्यांचा तो तसा बेत असल्याविषयीं बाजीरावसाहेबांस बालंबाल खात्री वाटत होती एवढेंच नव्हे, तर पुण्यांतले अमृतरावांसुद्धां सर्व नवे जुने मुत्सद्दी व शिंद्याकडील सर्व शेणवीमंडळ या बेतांत सामील आहेत असा त्यांचा पक्का ग्रह झाला होता ! त्या ग्रहास अनुसरून त्यानीं पुढें या सर्व लोकांवर कसा कसा सूड घेतला त्याचें वर्णन यथास्थळीं करण्यांत येईल.

ता० ६ नोव्हेंबर सन १७९९ दिवशीं पश्चिमकिनाऱ्यावर मोठें वादळ झालें होतें त्याचें वर्णन एक दोन पत्रांतून आलें आहे तें असें—

"कार्तिक शु० ९ बुधवारीं वादळ सुटलें त्यांत मुंबईच्या बंदरांतील व बाऱ्याकडील मिळोन अठरा गुराबा व तीनशें लहान मोठें गलबत एकदांच बुडालीं. वसईस आरमार खुषखीस होतें त्याजखालील वाळू वाऱ्यानें उडून गलबतें वाळवेंत गढलीं याजमुळें जायां बहुत जालीं. दोन गलबतें पाण्यांत ओढलीं होतीं तीं वाऱ्यानें हटलीं. त्यांचा ठिकाण नाहीं. तसेंच सुवर्णदुर्गचे आरमारापैकीं तरांडीं तरतीं होतीं तीं वादळानें हटलीं. त्यांचाही ठिकाण नाहीं. एक गुराब वाऱ्यानें हटली ती किल्ल्यापासून दोन कोसांवर आहे. त्याचीं अवजारें व चऱ्हाटें तुटलीं. नांगरही तुटले. त्याजवर माणसें आहेत त्यांस अन्नपाणी खुषखीहून पोंचत नाहीं. वसईच्या बागांतील नारळ सुपारी आंबे जांबळी पिंपळ ऊंस केळीचे फड झाडून जमीन दोस्त जाले. तीन दिवस पाऊस अहोरात्र पडला, त्याजमुळें भातें कापलीं होतीं तीं कांहीं गेलीं. कांहीं पाण्यांत भिजलीं."

"वारा समुद्रांत भारी लागला. मुमई, वसई, सुवर्णदुर्ग, उंदेरीचें आरमार झाडून बुडालें. शिवाय सावकारीही माल बहुत बुडाला. इंग्रजांचा तीन कोटीपर्यंत नाश जाला. मुमईचे बंदरांतील पाल गुराबा जहाजें वगैरे सामान लहानथोर अडीचशेंपर्यंत बुडालें. सरकारचें आरमारही वसई व सुवर्णदुर्गचे बाहेर होतें तें गेलें. अंजनवेल, रत्नागिरी विजयदुर्ग इकडे वारा लागला नाहीं. सावकारी, सरकार व इंग्रज मिळोन पांच सात कोटी पाण्यांत नाश जाला. वसई प्रांताची बागशाई झाडून पडली. तळें किल्ल्याचा बुरूज अशक्त होता तो एक पडला. असा वारा लागला. याजप्रमाणें गांवांत सर्व बोलतात."

गंगाधरराव गोविंद पटवर्धन मिरजकर व त्यांचे पुतणे चिंतामणराव पांडुरंग उर्फ आपासाहेब यांजमध्यें सरंजामाच्या वगैरे वांटणीबद्दल तंटा सुरू झाल्याचें मागें ( पृष्ठ ५८६० ) लिहिलें आहे. त्या वेळीं परशुरामभाऊनीं स्थूल मानानें उभयतांत कशी वांटणी व्हावी याबद्दल कलमें ठरविलीं होतीं. परंतु गंगाधरराव उर्फ बाळासाहेब यांच्या आग्रहामुळें वांटणी प्रकरणाचा निकाल न होतां उभयपक्षीं धुसपूस तशीच चालू राहिली. परशुरामभाऊ वारल्यानंतर हल्लीं त्यांच्या इच्छेप्रमाणें वादी प्रतिवादी वांटणी करून घेण्यास कबूल झाले तेव्हां रामचंद्रपंतआपा व रघुनाथराव कुरुंदवाडकर यानीं मध्यस्थी करून उभयतांची वांटणी करून दिली. तींत गंगाधरराव गोविंद यानीं दोन हजार व चिंतामणराव पांडुरंग यानीं सव्वीसशें स्वार बाळगावे व त्याप्रमाणें सामा-

न्यतः दर स्वारांस सालिना तीनशें रुपयांच्या दरानें जो ऐवज होईल तितक्या आकाराचा सरंजामी मुलूख दोघानीं विभागून घ्यावा. २ याखेरीज 'नक्त व कापड शिल्लक व येणें देणें घेणें कर्जसुद्धां भांडीं गुरें मळे शेत इनामगांव घर कुणबिणी शिंदेपोरगे सोन्यारुप्यांचीं भांडीं ... एकजागीं करोन हिशेबीं वाजवी रीतीनें जें खासगीसंबंधें असेल तें उभयतानीं निम्मेनिम द्यावें व घ्यावें. ३ शिवाय पथकसंबंधें कापड नक्त शिल्लक जवाहीर तसलमात येणें देणें घेणें कर्ज व कापडाचा तपशील येणें, पागा घोडीं हत्ती नग उंट थट्टी मेढरें शेळ्या रथ गाड्या फरासखाना वगैरे जें असेल तें निम्मेनिम द्यावें घ्यावें. हीं तीन मुख्य महत्वाचीं कलमें असून आणखीही कांहीं इतर कलमें होतीं. छ० २९ जिल्हेज तिस्सा तिसैनअखेर ( ४ जून १७९९ ) पर्यंत उभयतां एकत्र होते आणि छ० १ मोहरम मय्यातैन व अल्लफ ( ६ जून १७९९ ) पासून विभक्त झाले असें समजून त्याप्रमाणें व्यवहार चालू करावा असेंही या वेळीं ठरलें. त्या दिवसापासून गंगाधरराव बाळासाहेब यांच्या घराण्यास मिरजकर व चिंतामणराव आपासाहेब यांच्या घराण्यास सांगलीकर म्हणावयाचा प्रघात पडला. उभयपक्षीं याप्रमाणें विभक्तपणा झाला तरी एवढ्यानें या घरगुती तंट्याचा अखेर निकाल लागला असें मात्र नाहीं. किरकोळ व मुख्य बाबतींतलेसुद्धां अनेक लढे उलगडून जातपर्यंत पुढें पुष्कळ वर्षें हें भांडण मधून मधून चाललेंच होतें.

गेल्या दोन वर्षांत इंग्रजानीं आपली फौज निजामअल्लीकडून त्याच्याच राज्यांत चाकरीस म्हणून ठेवविली व तें राज्य पर्यायानें कबज्यांत आणल्या सारखेंच केलें. टिपू एवढा बलिष्ठ असतां त्याचें राज्य तर त्यानीं संबंध बुड-विलें. याप्रमाणें हिंदुस्थानांत ते प्रबळ सत्ताधीश होऊन बसले तेव्हां पेशवाई दरबार आपलें वर्चस्व कबूल करतें कीं नाहीं हें चांचपून पहावें असें त्यांच्या मनांत आलें ! त्यानीं विलायतच्या बादशहाचें म्हणून एक फर्मान बरोबर देऊन चौघे गोरे वकील पुण्यास पाठविले. त्या चौघानीं बाजीरावसाहेबांस सांगितलें कीं, आम्हीं विलायतच्या बादशहाचें फर्मान तुम्हांस आणलें आहे त्याचा तुम्हीं गौरवपूर्वक स्वीकार करावा. तो गौरव तुम्ही पांच प्रकारानीं करावा असें आमचें म्हणणें आहे. ते पांच प्रकार हे कीं, १ या फर्मानाचा स्वीकार करण्यासाठीं श्रीमंतानीं मुद्दाम बाहेर डेरे द्यावे व तेथें दरबाराचा समारंभ व्हावा. २ आम्ही फर्मान घेऊन येऊं तेव्हां श्रीमंतानीं आम्हांस सामोरे यावें. ३ मागें वकीलमुतलखीच्या वेळेस फर्मानबाडीचा समारंभ

झाला होता तसा याही वेळेस थाटमाट व्हावा. ४ आम्ही दरबारांत फर्मान हजर करूं तेव्हां सन्मानार्थ श्रीमंतानीं उभे राहून तें हातीं घ्यावें. ५ त्या प्रसंगानिमित्त खुशालीच्या शंभर तोफा माराव्या. याप्रमाणें इंग्रजानीं डाव टाकतांच बाजीरावसाहेब संकटांत पडले व त्यानीं नानांकडे विचारावयास पाठविलें कीं याप्रसंगीं कसें वागावें व इंग्रजांस काय उत्तर द्यावें ? राज्यकारभाराची आस्था जरी नानांस बिलकुल राहिली नव्हती तरी पेशवाईचा अभिमान त्यांच्या मनांत जाज्वल्य होता. त्यानीं इंग्रजांचा कावा ओळखून पांच कलमांचीं उत्तरें सांगितलीं. "१।२।३ फर्मान घेण्याकरितां मुद्दाम डेरे देणें व तें घेऊन येणाऱ्यास सामोरें जाणें व फर्मानबाडीचा समारंभ करणें हे सन्मान फक्त दिल्लीपतीखेरीज पेशवे सरकार कोणासही देत नाहीं. मागें माधवराव बल्लाळ यांच्या वेळीं असेंच विलायतच्या बादशहाचें पत्र घेऊन माष्टिन येथें आला होता त्यानें नेहमींच्या दरबारांत पत्र आणून दिलें तसेंच याही वेळीं व्हावें. ४ श्रीमंतानीं पत्र उभें राहून घ्यावें असें इंग्रज म्हणतात, तर जेव्हां श्रीमंत दरबारांत जातील तेव्हां बसण्यापूर्वीं इंग्रजानीं त्यांस पत्र द्यावें म्हणजे झालें ! श्रीमंतानी तें पत्र त्यांच्या हातून घेऊन वाचण्याकरितां मुनशीच्या हवालीं करावें. ५ हा खुशालीचा विशेष प्रसंग समजून शंभर तोफा माराव्या असें इंग्रज सांगतात, पण तसें करण्याचें कारण नाहीं. खुशालीच्या इतर सामान्य प्रसंगाप्रमाणें तोफांचे वीस बार मात्र करावे." या बाबतींत इंग्रजानीं पुष्कळ तकरार व जिकीर केली तथापि त्यांचें कांहीं चाललें नाहीं; आणि अखेर नानांच्याच म्हणण्याप्रमाणें छ० ११ साबानीं (७ जाने० १८०० ) विलायतच्या बादशहाचें पत्र वाचण्याचा हा समारंभ घडून आला.

नाना व बाळोबा यांच्या खटपटीनें करवीरच्या स्वारीकरितां फौज पुण्याहून रवाना झाली तींत सुमारें तीन हजार स्वार व शिंद्यांचीं पांच पलटणें, शिवाय अलीगोल म्हणजे बिनकवाइती पलटणाचे कांहीं लोक, व सत्तावीस तोफा याप्रमाणें सरंजाम होता. याशिवाय गणपतराव पानशे सरकारी तोफखाना घेउन या स्वारीस निघाले होते. शिंद्यांच्या पलटणांवर मुख्य सरदार इंग्रज जातीचा होता त्याचें नांव ब्राऊनसाहेब असें होतें. वर तीन हजार स्वारांची बेरीज सांगितली तींत नानांचें पथक पांचशें स्वारांचे व शिंद्यांचे एक हजार स्वार यांचीही गणना होते. बाकीची भरती विंचूरकर, पेठे, जाधव, पवार यांचीं पथकें मिळून करण्यांत आली होती. नानांनीं व श्रीमंतानीं पत्रें लिहून धोंडोपंत गोखले यांस कर्नाटकांतून रामचंद्रपंत आपांच्या कुमकेस आणविलें

त्यांबरोबर पांच हजार स्वार, तीन हजार पायदळ व सात आठ तोफा असें निवडक सामान होतें. मोहिमेस लागणारा खर्च रामचंद्रपंत आपानीं महाराजांपासून खंडणी वसूल करून तींतून भरावा असें जरी ठरलें होतें, तरी फौजेच्या व पलटणांच्या तयारीकरितां लागणारा पैसा नाना व बाळोबातात्या यानींच पुरविला होता हें पूर्वी लिहिलेंच आहे.

बाळोबातात्यानीं बायांची समजूत करून शिंद्यांच्या घरांतला तंटा मोडून टाकला हें बाजीरावांच्या मतें ठीक झालें नाहीं. नाना व तात्या यानीं करवीरची मसलत सिद्ध केली हेंही श्रीमंतांस आवडलें नाहीं. या मुत्सद्यांच्या अशा बिकट मसलती सिद्धीस जाऊं लागल्या तर त्यांच्या हातांत पैसा जातो, फौजेवर वजन बसतें, कारभारास शिस्त लागते, आणि असें यांचें स्तोम वाढत गेलें म्हणजे आम्ही धनी निर्माल्यासारखे होतों. मग आम्हाला कोण विचारतो ? ही श्रीमंतांच्या विचाराची दिशा नेहमींचीच होती. त्यांतून शेणवीमंडळ बाळोबाभोंवतीं जमल्यामुळें त्यांचा शिरजोरपणा त्यांस असह्य होत चालला होता. बाजीरावसाहेबांची शेणव्यांवरची समशेर म्हटली तर सर्जेराव घाटगे ! तो घाटग्या तर हल्लीं शिंद्यांच्या लष्करांत कैदेंत होता. तो मुक्त झाल्याखेरीज शेणवी सरदार मुत्सद्यांच्या नाड्या आंवळतां येणें शक्य नव्हतें. सबब त्यास सोडून देण्याविषयीं श्रीमंतानीं दौलतरावास इशारा दिला ! शिंद्यानीं तें काम बाळोबातात्यांशीं भांडण्याचा प्रसंग न आणितां सफाईनें पार पाडलें ! प्रथम सर्जेरावाची मुलगी व दौलतरावाची बायको बायजाबाई हिनें बापास कैदेंतून सोडण्याविषयीं नवऱ्याजवळ हट्ट धरला व रागानें अन्न सोडलें. तुझ्या बापास सोडणें केवळ माझ्या हातांतलें नाहीं; त्याला कारभाऱ्यांची संमति पाहिजे ती कधीं मिळावयाची नाहीं; तथापि सर्जेराव सुटेपर्यंत तुझ्या प्रीतीस्तव उपोषणें करणें माझ्या हातांतलें आहे तेवढें मी करतों. असें बोलून दौलतरावानींही अन्न टाकलें ! एक दोन दिवस शिंद्यांच्या लष्करांत ‘ कारभारी घाटग्यास सोडूं देत नाहींत म्हणून धनी व धनीण यांस उपास पडतात ’ अशी चर्चा होऊं लागतांच बाळोबास लोकापवाद टाळण्यासाठीं सर्जेरावाची सुटका करण्यास चुंबत अनुमोदन द्यावें लागलें ! करवीरच्या मोहिमेवर फौज रवाना झाली नाहीं तोंच घाटग्याची सुटका होत आहे यांत त्या मोहिमेचें आवाहन विसर्जन एकदमच होत आहे हें त्या वेळीं कोणाच्याही लक्षांत आलें नाहीं ! तात्यांचें अनुमोदन मिळतांच दौलतरावानीं ता. ४ जानेवारी सन १८००

दिवशीं सर्जेरावास बंधमुक्त केलें व त्याच दिवशीं आपल्या डेऱ्यास नेलें आणि त्यास कंठी, शिरपेंच, वस्त्रें वगैरे बहुमान देऊन शिवाय रोख पन्नास हजार रुपये खर्चाकरितां दिले. हें वर्तमान करवीरच्या महाराजांस कळतांच आपणावरचें अरिष्ट टाळण्यास सर्जेराव हें एक उत्तम साधन झालें असें समजून त्यांनीं साखरा वाटून आनंदोत्सव केला !

बाळोबातात्यांनीं घाटग्यास सोडतांना दौलतरावापासून असें ठरवून घेतलें होतें कीं, त्यानें तैनात खाऊन स्वस्थ बसून रहावें, कारभारांत काडीमात्र ढवळाढवळ करूं नये. पण घाटगेराव महापराक्रमी पुरुष ! स्वस्थ बसून त्याला चैन कसें पडावें ? त्यानें आपली चांडाळचौकडी पुन्हां गोळा केली आणि सुटून दहा बारा दिवस झाले नाहींत तोंच पौष व० ४ मंगळवारीं मोठें अवतारकृत्य केलें ! तें कृत्य महादजी शिंद्यांच्या बायकांवर मारेकरी घालण्याचें होय. तो प्रकार असा—

"महादजी शिंदे यांच्या बायकांवर मारेकरी कोणी घातले होते. त्यांनीं चतुर्थी मंगळवारीं पहाटेचे प्रहर रात्रीस यमुनाबाई धाकटी बायको हिजवर निजल्या जाग्यास हात चालविला. पाठीवर तरवारीचा वार भारीच आहे. गलबल जाली तेव्हां एक मारेकरी ठार जाला. एक जखमी आहे. एक शाबूत सांपडला. चौकशी करितां सर्जेराव याचें नांव त्यानें लिहून दिलें. याखेरीज दुसरे कोण आहेत याचें ठिकाण अद्यापि लागत नाहीं. सर्जेराव सुटल्यानंतर येथून ( दौलतरावांच्या लष्करांतून ) दोन चार पुर्बे ( पुरभय्ये ) जुने ओळखीचे चाकरीस रहावयाकरितां बायांकडे गेले. बहुत दिवसांचीं जुनीं माणसें म्हणून देवडीवर चाकरीस ठेविलीं. त्यांनींच हें कर्म केलें ... सर्जेराव सुटल्या दिवसापासून पूर्व रंगांतच आहेत ... .. मारेकऱ्यांच्या गलबलींत एक कुणबीण ठार जाली. बाईची जखमही भारीच आहे."

"सर्जेरावबापू कैदेमध्यें होते ते शिंदे यांनीं सोडून वस्त्रें व जवाहीर दिलें त्यास दहा बारा रोज जाले. बायांचा मुक्काम भिमेवर होता. जवळ कंपूचीं दोन पलटणें व दोन हजार फौज, शिवाय शागीर्दपेशा व आंतील चौकीस हिंदुस्थानी मेवाती लोक होते. त्यांजपैकीं चौघेजण मेवाती याणीं दुसरेची गोष्ट शिंद्यांकडील मुत्सद्यांची ऐकून बायांस जिवें मारावें याजप्रमाणें होऊन सायंकाळच्या समयीं सहा घटका दिवसास चौघी (?) बाया आहेत त्यांजमधून एकीस तीन वार लागले. एक खांद्यावर भारी आहे. हातावर व पाठीवर एकूण तीन वार लागले. दुसऱ्या बायांस दगा करावा तो गूल जाली. बाया

पळोन कनातेच्या आंत गेल्या व तिकडोन कंपूच्या चौकीकडे आल्या. पाठीस मारेकरी लागले. इतक्यांत बायांच्या खिजमतगारानें एकास जिवें मारिलें. तिघे मेवाती मारेकरी सांपडले. त्याजबरोन मग तेथें चौकशी केली तेव्हां चौदा असामींचीं नांवें त्यानीं लिहून दिलीं. सर्जेराव, बाणाजी शेटे, विठ्ठलपंत, कृष्णराव बक्षी व मोदी वगैरे येथील आणि बायांजवळ लोक आहेत त्यांतील चौकीदार व कांहीं दफेदार व जमादार असे आहेत. ऐसी याद लिहोन तेथील पलटणवाल्यानीं कंपूकडे पाठविली. त्यावरून कंपू अडून बसला आहे. "आम्ही व राजश्री बाळोबा व आवामध्यें दरम्यान राहून बायांस येथें आणून समजी करून ठेवल्या. मधें जामीन आम्ही असतां मारेकरी घालून नाश करावयाचा माकुल ( ? ) मारेकरी यांणीं याद लिहून दिली. उत्तम आहे. आपला पैका टाकून देणें. तुम्हांपाशीं रहात नाहीं. शेर मिळेल तेथें जाईन. बाया याउपर गेल्यास आपला जिम्मा नाहीं" याजप्रमाणें कंपूवाला अडोन बसला आहे. राजश्री बाळोबातात्या यांचेंही याचअन्वयें बोलणें. "कारभार करीत नाहीं. ( वाटेल तर ) मला बिडी घालून किल्यावर ठेवणें. मनस्वी गोष्टी होऊं नयेत त्या होऊ लागल्या ! मला कारभार नको." काशी-यात्रेस जाण्यास निरोप मागतो. कंपूवाला बाळोबास म्हणतो कीं, तुम्ही आम्ही जामीन. त्यास मी आपला पैका घेतों. तुम्ही आम्ही येथून जाऊं. तुजला एकट्यास मी जाऊं देणार नाहीं. असें कंपूचें व तात्यांचें बोलणें आहे. "नाहीं तर यादीप्रमाणें असामी आमच्या हवालीं करावे. आम्ही पारि-पत्य करूं." याप्रमाणें आज पांच चार रोज जाले. राजश्री नानांकडेही पत्र तात्यांचें व कंपूचें आलें कीं, येथें प्रकार असा घडला. यास उपाय काय तो सांगावा."

पहिल्या व दुसऱ्या उताऱ्यांत बायांवर मारा झाल्याची वेळ दिली आहे तींत चार प्रहरांचें अंतर आहे. तथापि तो मुद्दा आम्ही विशेष महत्त्वाचा समजत नाहीं. गर्दीच्या वेळीं लिहिलेल्या लेखांत अशी तपशिलांत तफावत आढळणें साहजिक आहे.

हा प्रकार होतांच आपल्याही जिवावर सर्जेरावाकडून कांहीं अरिष्ट येईल म्हणून बाळोबातात्यांस भय पडलें. दौलतरावानीं वारंवार बोलाविलें असतांही ते दरबारास जाईनात. आपल्या दारीं यशवंतराव शिवाजी धरणें देऊन बसला आहे तो हालूं देत नाहीं, असें त्यानीं सांगून पाठविलें. पण हा फक्त बहाणा होता. खरा प्रकार असा होता कीं, ती फौज तात्यानीं स्वतःच्या

बचावासाठीं धरण्याच्या निमित्तानें मुद्दाम जवळ बसवून ठेविली होती ! याप्रमाणें कंपूवाले व बाळोबातात्या अडून बसले तेव्हां त्यांचें समाधान करून त्यांच्या मनांतलें किल्बिष घालविण्यास दौलतरावांना किती प्रयास पडला हें पुढच्या उताऱ्यावरून दिसून येईल.

"बायांवर मारेकरी पडल्यापासून आठ नऊ दिवस बैदाच पडला. राजश्री तात्या आपले जागां खट्टे होऊन चार दिवसपर्यंत वाड्यांत गेले नाहींत. न जाण्याचें कारण यशवंतराव शिवाजी व बाजीबा मोदी या उभयतांचीं ऐवजाकारितां धरणीं चार दिवसपर्यंत हजार दीड हजार लोकांनिशीं बसलीं तीं कारणानें बसलीं ! वाड्यांत बोलावणें बाणाजीबरोबर दहा पांच वेळां तात्यांस आलें. त्यांणीं साफ सांगितलें जे, आपणास कारभार करावयाचा नाहीं. मर्जी असेल त्यास सांगावा. मला आज्ञा होईल तेथें राहीन. या अन्वयें चार दिवस लोटले. पांचवे दिवशीं कंपूवाले सतलंज व जुरससाहेब व फिलोजसाहेब मुकीराचा लेंक तिघे मिळोन माफक सरंजामानिशीं राजश्री दौलतराव यांजकडे येऊन तिघे टोपीकर व दौलतराव या चौघांचेंच खलबत जालें. नंतर राजश्री धोंडीबा दादा यांस दौलतराव यांचें व टोपीकरांचें बोलावणें गेलें तेव्हां दादा दहा पांच खासे घेऊन वाड्यांत गेले. दोन घटका बोलणें जालें. नंतर तिघे टोपीकर व दौलतराव यांजकडील बाणाजी शेस्या ऐसे तात्यांस बोलावण्याकारितां आले. तात्यांजवळ बोलणें होऊन तात्यांस घेऊन वाड्यांत गेले. एक प्रहरपर्यंत दौलतराव, तात्या, दादा, आबा चिटणीस, यशवंतराव शिवाजी, बाजीबा मोदी, नारायणराव बक्षी, यादवराव भास्कर, बाणाजी शेस्या, विठ्ठलपंत व टोपीकर मिळोन बोलणें जाहलें. त्यांतील ठराव 'तात्यानीं यखत्यारीनें कारभार करावा. सर्वांनीं तात्यांचे आज्ञेंत चालावें. सखाराम घाटगे यास पोटापुर्ते देऊन काढून द्यावें अथवा नजरबंदींत ठेवावें. याप्रमाणें ठरोन प्रहररात्रीस माघारे आले. लहान मोठीं चार माणसें दौलतेंत आहेत त्यांपैकीं तात्यांच्या व दौलतेच्या उपयोगी ती ठेवावीं. उपयोगी नसतील ती दूर करावीं. याप्रमाणें टोपीकरांच्या विद्यमानें ठराव जाला."

मात्र या ठरावांत सखाराम घाटगे यांस 'पोटापुर्ते देऊन काढून द्यावें अथवा नजरबंदींत ठेवावें' असें ठरलें त्यापैकीं दौलतराव शिंद्यांनी कांहींच केलें नाहीं !

करवीरच्या महाराजानीं तह करण्याविषयीं खुद्द बाजीराव व अमृतराव, नाना फडनवीस, बजाबा शिरवळकर, नारोपंत चक्रदेव, बाळोबातात्या, आबा चिटणीस, या सर्वांकडे बोलणें चालविलें होतें. त्या वेळीं पुण्यांत बाळोबातात्या म्हणतील ती पूर्व दिशा असें असल्यामुळें त्यांजकडे महाराजांच्या वकिलानी बोलण्याची विशेष लगट केली. तात्यानीं सांगितलें कीं, तुम्हांस तह करणें असल्यास पेशवे व शिंदे यांच्या दरबारांतल्या मुत्सद्यांस दोन लक्ष रुपये दरबारखर्च देणें पडेल. याशिवाय पंतअमात्यांनीं कोंकणांत लूट करून नुकसान केलें आहे तें व कै॥ परशुरामपंतभाऊ यांची खराबी जितकी झाली असेल ती सर्व तुम्ही भरून द्यावी आणि मागें तह केले त्या वेळी देऊं केलेल्या पैक्याची बाकी राहिली असेल तिचा निकाल करावा. याखेरीज पलटणांच्या चार महिन्याच्या बेगमीस आम्ही चार लक्ष रुपये दिले आहेत ते द्यावे व नानांचें कर्ज तुम्हांकडे दोन लक्ष रुपये आहे तें द्यावें. याशिवाय आम्हांस राहण्याकरिता रांगणा, सामानगड, भूधरगड यांतला एखादा किल्ला द्यावा. आमच्यामार्फत तह करणें असेल तर याप्रमाणें फडशा करून करारांची यादी सत्वर कायम करावी. रामचंद्रपंतानीं करवीरास वेढा बसविल्यानंतर मग आम्हांशीं बोलणें राहिलें नाहीं. ते व तुम्ही परभारेंच तह ठरवावा. महाराजांस हीं कलमें जबर वाटल्यामुळें त्यानीं तीं मान्य केलीं नाहींत. सर्जेरावाच्या हातांत शिंद्याचा कारभार लवकरच येईल असें त्यास दिसूं लागलें होतें. त्याच्या मार्फतीनें तह ठरविला असतां तो आपणास विशेष सोईचा होईल असें त्यांस वाटलें. सर्जेराव जर आपणावर होणारी ही स्वारी रहित करील तर त्याच्या मुलास आपली कन्या देऊं असें या वेळीं करवीरचे महाराज बोलूं लागले होते !

सावंतवाडी संस्थानास लागून असणारा वरघांटाचा मुलूख आजरें कित्तूर बेळगांव शहापूर वगैरे आहे तेथें शेणव्यांची वस्ती पूर्वीपासून थोडी बहुत होतीच. अलीकडे त्या वस्तींत भर पडण्यास सावंतवाडी संस्थानांतला कऱ्हाडे चितपावनांचा तंटा हें एक विशेष कारण झालें. शेणव्यांच्या घरीं कऱ्हाडे स्वतः याजन करीनात आणि चितपावनांसही करूं देईनात ! संस्थानिक देसाई यानीं आग्रहानें कऱ्हाड्यांचा पक्षपात धरिला व या बाबतींत शेणव्यांची फिर्याद मनावर घेण्याचें नाकारिलें. त्यामुळें त्यांच्या घरचीं हव्यकव्यादि धर्मकार्यें बंद पडलीं. त्या स्थितीला त्रासून पुष्कळ लोक घरेंदारें टाकून वरघांटीं बेळगांव शहापुराकडे येऊन राहिले. यासंबंधें ता० २१ जाने.

सन १८०० या दिवशीं गोपाळराव अनंत व शिवराम जिवाजी सबनीस यानीं लिहिलेलें एक व साबाजी राम केरकर यानीं लिहिलेलें एक अशीं दोन पत्रें या प्रकरणांत छापिलीं आहेत तीं पहावीं.

आपल्या राज्यावर पेशवे पटवर्धन व शिंदे यांची फौज चालून येणार हें पहातांच महाराजानीं करवीर व पन्हाळा वगैरे स्थळांची मजबुती करण्याचें व फौज गोळा करण्याचें काम चालू केलें. तथापि राज्याच्या बचावाकरितां तपस्वी ब्राह्मणांची कृपा संपादन करावयास ते विसरले नाहींत.

"महाराज करवीरांत शिष्टांचे दर्शनास गेले होते. त्याचा तपशील—अप्पा म्हणोन ब्राह्मण गांवाबाहेर लोणारावर रहातात ते अनुष्ठाते शरभ म्हणोन प्रयोग आहे त्याचें साधन आठ दहा वर्षें करीत आहेत. व गांवांत काशीकरबावा म्हणोन यजुर्वेदी ब्राह्मण गणपतिउपासक आहेत व शास्त्री म्हणोन देवीउपासक व मांत्रिक आहेत. या त्रिवर्गांचे दर्शनास गेले. कारण आपलें अभीष्टचिंतन व्हावें. एतद्विषयीं त्रिवर्गांची प्रार्थना जाली आहे. भटजीबावा नरसीपूरकर तो गुरुच आहेत." पूर्वींच्या व हल्लींच्या स्थितींतला विपर्यास लक्षांत आणणाऱ्यांस हा मजकूर मनोरंजक वाटेल यांत संशय नाहीं !

पुण्याहून फौजा आल्या त्यांत शिंद्यांकडील फौज व पलटणें अघाडीस होतीं तीं कऱ्हाडच्या सुमारें आल्याचें वर्तमान येतांच मिरजेहून सुमारें पंधराशें स्वार बरोबर घेऊन जानेवारीच्या दुसऱ्या तारखेस रामचंद्रपंतआपा निघाले ते चौथ्या तारखेस सायंकाळीं रेटरें येथें पलटणांचा मुक्काम आला होता तेथें पोंचले. पलटणांवरचा अंमलदार ब्राऊनसाहेब व फौजेवरचा सरदार गणपतराव भिकाजी हे त्यांस सामोरे आले व त्यानीं खुशालीच्या दहा तोफा केल्या. नंतर दुसरे दिवशीं एकंदर लष्कराचें कूच होऊन पलटणें बोरगांवास उतरलीं व रामचंद्रपंत बहें येथें राहिले. तेथें या लष्कराचा सात आठ दिवस मुक्काम झाला. कारण वारणेपलीकडे चतुरसिंग व पाटणकर व चव्हाण हिंमतबहाद्दर जमून राहिले होते त्यांवर जरब ठेवण्याकरितां जेवढें घोडदळ पाहिजे तेवढें रामचंद्रपंताजवळ जमलें नव्हतें. हरीपंतबावा पेंढार व फौज घेऊन जतेकडे गेले होते ते व सांगलीहून चिंतामणराव आप्पा आपल्या फौजेसह लष्करांत आल्यावर ही उणीव दूर झाली. नंतर जानेवारीच्या तेराव्या तारखेस कूच होऊन हें सर्व लष्कर शिराळ्यास गेलें. त्याच दिवशीं सायंकाळीं तेथील ठाण्यास वेढा बसून त्यावर तोफांचा मारा सुरू झाला. अथणीकडे रत्नाकर-

पंत होते त्यांस महाराजानीं निकडीनें बोलाविल्यावरून ते पाटणकर चतुरसिंग वगैरे सरदारांस कोडोली पारगांवच्या मुक्कामीं येऊन मिळाले तेव्हां त्या फौजेची संख्या पांच हजारांवर गेली. तरी तिच्यानें शिराळ्यांतील लोकांची कुमक झाली नाहीं. तें ठाणें तीन दिवस लढलें. चौथे दिवशीं ब्राऊनसाहेबानें हल्ला करून शिराळें घेतलें. आंत सात आठशें माणस होतें तें बहुतेक मारले गेलें. पलटणांचें सामान पुण्याहून येईल तें ठेवण्याकरितां ही जागा आम्हांस पाहिजे असें पलटणवाल्यानीं सांगितल्यावरून रामचंद्रपंतानीं तें ठाणें त्यांच्या हवालीं केलें.

याच मुक्कामीं विंचूरकर, पेठे व नाना फडनवीस यांचीं पथकें लष्करांत दाखल झालीं. नंतर पुढें कूच करावें तों पलटणवाले बोलले कीं, येथें दारू गोळा खर्च झाला आहे त्याच्या संदुखा पुन्हां भरल्याखेरीज आम्ही जाग्यावरून हालत नाहीं ! त्यामुळें त्यांच्या म्हणण्याप्रमाणें दारूगोळ्याचा भरणा होई-पर्यंत थोडा खोळंबा झाला. नंतर लष्कर वारणेच्या दक्षिणतीरास आलें. करवीरकरांची फौज तोंडावर होती ती बाजूस सरून पन्हाळ्याच्या माचीस गेली व तेथें बंदोबस्तानें राहिली. ती फौज गांठण्याच्या उद्देशानें रामचंद्र-पंतानीं पारगांवास लष्कर नेलें. तेथून पन्हाळ्याची माची चार कोस होती. जानेवारीच्या सव्विसाव्या तारखेस पुढें पलटणें, त्यांच्यामागें डावे बाजूस चिंतामणराव व हरीपंतबाबा, उजव्या बाजूस शिंदे व विंचूरकर वगैरे पथकें, व सर्वांस वेळोवेळ कुमक पुरविण्याकरितां सर्वांच्या पिछाडीस स्वतः आपण, या-प्रमाणें रचना करून रामचंद्रपंत शत्रूच्या गोटावर चालून गेले. तों पलटणवाले अघाडीस होते त्यानीं तोफा लागू करतांच करवीरकरांची फौज उधळली ती डोंगर चढून वरच्या माचीस जाऊन उभी राहिली. एकट्या चतुरसिंगानें मात्र आपल्या चिमुकल्या पथकानिशीं थोडा वेळ लढाई दिली तींत त्याचा सरदार संताजी भोसले हा ठार झाला आणि वीस पंचवीसपर्यंत माणूस ठार व शंभर-पर्यंत जखमी झालें. तरी त्यानें पलटणांशीं ठांसून लढाई दिल्यामुळें इतर फौजेस पळून जावयास वाव सांपडला. वरच्या माचीस करवीरकर गेले तेव्हां तेथें पटवर्धनांचें घोडदळ व पलटणें यांचा इलाज चालेना. तथापि पेंढाऱ्यानीं तेथपर्यंत जाऊन लगट केली व शेंदीडशें घोडें पाडून आणिलें. हे पेंढारी अलीकडे फार धीट झाले होते. लढाईपूर्वी तीन दिवस नारायणराव घोरपडे सेनापति यांची पागा तलाव्यास गेली असतां ती या पेंढाऱ्यानीं गांठून सबंध

लुटून फस्त केली होती. त्यांचा सरदार गोपाळपंत मामा देवघर म्हणून होता त्याला 'पेंढारीमामा' असें नांव पडलें होतें !

असो. याप्रमाणें लढाई झाल्यावर रामचंद्रपंतांची फौज व पलटणें मुक्कामास आलीं व २९ व्या तारखेस कूच करून वडगांवाजवळ बहादुर्ले या खेड्यावर मुक्काम करून दुसऱ्या दिवशीं म्हणजे फेब्रुआरीच्या पहिल्या तारखेस टेंबलाईवर येऊन राहिलीं. तें पहातांच करवीरकरांची फौज पन्हाळ्यास होती ती करवीरास आली शत्रूशीं लढाई देण्याचा त्यांचा हिय्या मोठा होता तरी दुसऱ्या दिवशींच लढाई झाली तींत त्यांचा पराजय झाला. त्या लढाईचें वर्णन खुद्द रामचंद्रपंतानीं लिहिलें आहे तें असें—

आज रविवारीं दोन प्रहरीं पंचगंगा उत्तरतीराहून पलटणें तोफांसुद्धां व सरकारी तीन तोफा व सारी फौज घेऊन करवीरचे तलाव्यास अस्तमानीं दीड प्रहर दिवसास करवीरानजीक आलों. डावे बाजूस चि॥ राजश्री चिंतामणरावआपा व हरिपंतबाबा, पलटणांचे पिच्छाडीस आम्ही, उजवे बाजूस शिंदे व नाना, विंचूरकर, पेठे हीं पथकें, येणेंप्रमाणें तोफेची मारागिरी करीत असतां त्यांची फौज किल्याचे व ब्रह्मपुरीचे दरम्यान उतरली होती त्यांजवर चालोन घेतलें. तेथें त्यांचा टिकाव न निघे तेव्हां ते किल्याचे पूर्वेस आले. प्रीतिराव चव्हाण आपले पथकासुद्धां ब्रह्मपुरीपुढें ओढा होता त्या आसऱ्यास जाते ( वेळीं ) त्यांजवर शिंदे, नाना, पेठे हीं पथकें उठलीं तेव्हां नामोहरम जाले. तेथें या पथकानीं काम काज चांगलें केलें. डावे बाजूस शत्रूची फौज जमली आणि तीन चार हिरिऱ्या आमचे फौजेवर केल्या. परंतु त्यांची काटगिरी चालों दिली नाहीं. ( तेथें ) उभयतां चिरंजीवांचीं पथकें होतीं. उभयतानीं अंगेजणी चांगली केली. नारायणराव घोरपडे बाबांकडे पाडाव आले. सरकारचेही तोफांची मारगिरी चांगली जाली. बराऊनसाहेब यांची तो शर्तच ! एक पलटण व एक तोफ घेऊन किल्याची वसे पाहून खुद्द आले ! श्रीगजाननाचे कृपेकरून ( लढाई ) चांगली जाली. अस्तमान झाल्यामुळें फिरोन टेंबलाईचे टेंकडीजवळ आलों. "

याच लढाईचा वृत्तांत विनायक भास्कर व हरि भास्कर पटवर्धन देतात कीं—

"आज रविवारीं दोन प्रहरां पलटणें व तोफखाना व झाडून फौजा तयार होऊन टेंबलाईजवळ गेलों. परंतु करवीरकरांच्या फौजा जितीचा ओढा सोडून पुढें न येत. तेव्हां पलटणें पुढें घालून मागें फौजा लावून मारागिरी करीत

जितीच्या ओढ्यावर चालून घेऊन वोढा काईम केला. नंतर त्यांची फौज गांवच्या आसऱ्यास गेली ते समयीं पलटणानीं स्वामींचे मठाकडून चालोन घेऊन तेथूनही फौज उधळून गांवांत गेली. गोट उतरला होता तो जाऊन एक तोफ पाडाव करून आणिली. पूर्वेच्या अंगास एकवीरेच्या देवळानजीक त्यांचे फौजेची एक टोळी होती त्याणीं जम बाधोन आमची फौज उभी होती त्यांजवर चालोन आले. तेथें हातघाई बरीच होऊन नारायणराव सेनापति पाडाव आले. त्यांचा मोड होऊन माघारे पळून गेले."

हा पराजय झाल्यावर करवीरची फौज पुन्हा पन्हाळ्याच्या आसऱ्यास गेली. लढाईंत नारायणराव घोरपडे सेनापति पाडाव सांपडले त्यांस रामचंद्रपंतानीं मंगळवेढ्यास नेऊन ठेविलें. तें रघुनाथराव कुरुंदवाडकर यांस खपलें नाहीं. इचलकरंजीच्या घोरपड्यांप्रमाणें कुरुंवाडकर पटवर्धनांचेही सेनापति कापशीकर हे यजमान असल्यामुळें रघुनाथराव दादानीं त्यांस मंगळवेढ्याहून कैदेंतून सोडवून आणून आपणाजवळ गौरवानें व इतमामानें ठेवून घेतलें.

लढाई झाल्यावर करवीरकरानीं शहराबाहेरच्या पेठा जाळून टाकल्या. एकही माणूस बाहेर राहूं दिलें नाहीं. स्वतः महाराज जनानखाना चीजवस्तंसुद्धां ७ व्या तारखेस आवशीच्या प्रहर रात्रीस वरुणतीर्थ वेशींनं बाहेर पडून पन्हाळ्यास गेले. सर्व मराठ्यांचीं कुटुंबें त्यांबरोबरच गडास गेलीं. गोरगरीबें व वाणी बकाल व सर्व ब्राह्मणवस्ती मात्र गांवांत राहिली. ब्राह्मणांपैकीं कोणास बाहेर जाऊं दिलें नाहीं. शहरच्या संरक्षणाचा सर्व भार महाराजानीं रत्नाकरपंत राजाज्ञा व प्रीतिराव चव्हाण हिंमतबहाद्दर यांजवर सोंपविला होता. तें काम त्यानीं किती उत्तम रीतीनें बजावलें हें पुढच्या हकीगतीवरून दिसून येईलच. त्यांच्या दिमतीस तीन हजार पायदळ व एक हजार स्वार देण्यांत आले होते, आणि दारूगोळा व धान्यसामग्री वगैरे सामानाची भरपूर तरतूद केलेली होती. शिवाय लढणारे लोकांस धीर व सल्लामसलत देण्याकरितां महाराजांचे गुरु सिद्धेश्वरबावा हे गांवांतच राहिले होते.

करवीरास मोर्चे बसविण्याविषयीं रामचंद्रपंत उतावळे झाले होते. परंतु मिरजेहून दारू गोळा यावयाचा होता तो येऊन दाखल होण्यास पंधरा वीस दिवस लागले. तेथपर्यंत त्यांस स्वस्थ बसावें लागलें. मोर्चे बसल्यावर करवीरकरांची फौज गडाहून येऊन गोट्यावर गलबल करील, सबब ती छापा घालून उधळून लावावी, ही कल्पना त्या संधींत ब्राऊनसाहेबानीं काढली ती रामचंद्रपंतास पसंत पडली. ती करवीरची फौज पन्हाळा पावनगडच्या

मध्यभागीं माचीस दोनी किल्यांच्या दक्षिणेस उतरली होती. तींत चतुरसिंग, चव्हाण, पाटणकर, वगैरे सरदारांसुद्धां खुद्द महाराजांची स्वारी राहिली होती. रामचंद्रपंतानीं वाटेचा व जाग्याचा वगैरे नीट शोध आणविला आणि गोटाच्या संरक्षणाकरितां चिंतामणरावांची फौज व एक पलटण ठेवून शिवरात्रीच्या दिवशीं पहांटेस प्रहररात्रीस पलटणेंसुद्धां ब्राऊनसाहेब यांस चालतें केलें, व मागून चार घटकांनीं सर्व घोडदळासह आपणही निघाले. पलटणानीं सूर्योदयापूर्वींच शत्रूचा गोट गांठला. तेव्हां अघाडीस अलीगोल पलटणाचे लोक चालत होते त्यांतल्या दोनशें लोकानीं पुढें घुसून शत्रूच्या तीन तोफा व दारूच्या तीन पेट्या काबीज केल्या, व त्याच तोफा शत्रूवर लागू केल्या ! कोणी म्हणतात कीं तोफांच्या तोंडाचें माप पलटणवाल्यानीं आगाऊ नेलें होतें व त्या फर्म्याचे गोळे व दारूचे थैले भरून येतांना बरोबर आणले होते, त्यांचाच त्यानीं तोफा सुरू करण्यांत उपयोग केला ! हा अकस्मात् छापा आलेला पाहून करवीरकरांच्या फौजेंत गलबल उडाली तों पलटणानीं लगट केली. त्याच वेळीं रामचंद्रपंतआपा जाऊन पोचले त्यानींही हत्यार सुरू केलें. तें पहातांच करवीरकरानीं अवसान टाकिलें, व ते डोंगर चढून किल्याच्या दरवाजाकडे धूम पळत सुटले. महाराजांचे पाय अधू असल्यामुळें त्यांस पळवेना, तेव्हां जवळच्या लोकानीं त्यांस उचलून मोठ्या प्रयासानें वर नेलें. त्या गर्दींत करवीरकरांचा सबंध गोट लुटला जाऊन शेकडों लोक मारले गेले व शेकडों पाडाव झाले. सांपडलेल्या लोकांत महाराजांच्या अत्यंत प्रीतींतला सरदार विश्वासराव गायकवाड हा सांपडला. भाऊंच्या मृत्यूचा सूड घेण्याकरितां रामचंद्रपंतआपानीं या विश्वासरावास ठार मारविलें हें अगदींच अविचाराचें कृत्य केलें व त्यायोगानें त्यांच्या थोरवीला कमीपणा आला यांत संशय नाहीं. पट्टणकुडीच्या लढाईंत महाराजानीं 'मारा' म्हणून सांगितलें असतां ज्यानीं भाऊंच्या शरीरावर वार टाकले त्यांत ही गायकवाड मंडळी होती असा लोकप्रवाद आहे. तो खरा असला तरी त्यामुळें सुद्धां रामचंद्रपंतांच्या कृत्याचें समर्थन होत नाहीं. चिंतामणराव आपासाहेब सांगलीकर यानीं स्वतःच्या चरित्राचा कांहीं भाग लिहून ठेवला आहे त्यास 'आपासाहेबांचा वाका' असें म्हणतात. त्या वाक्यांत चिंतामणरावानीं यासंबंधें जे विचार लिहिले आहेत ते आम्हांस योग्य वाटतात. ते लिहितात—

"विश्वासराव याजवर श्री॥ महाराज छत्रपति यांचा लोभ पुत्रवत्. ते पाडाव सांपडला. ती॥ परशुरामपंत भाऊसाहेब यांस श्री॥ महाराज छत्रपति

याणीं माराविलें सबब विश्वासराव यास मारिलें ही गोष्ट बेहिशेबाची. ती॥ परशुरामपंत भाऊसाहेब यांस मारिलें म्हणून छत्रपति यांस कोणी चांगलें म्हटलें नाहीं. विश्वासराव गायकवाड सांपडला त्यांची बरदास्त करावी, बहुमान करून छत्रपतींकडे पाठवावें, ते न करितां मारिलें, ही अपकीर्तीची गोष्ट जाली. आमचे घराण्याचे अवसाफास योग्य न जालें."

पलटणें व फौज छापा घालण्याकरितां पन्हाळ्याकडे गेल्याचें वर्तमान कळतांच त्या दिवशीं शहरांतील लोक पटवर्धनांच्या गोटावर चालून येण्यास चुकले नाहींत. परंतु चिंतामणराव आपल्या फौजेसुद्धां तयारच असल्यामुळें त्यानीं लढाई देऊन शहरवाल्यांस मागें हटवून गांवांत परत घालविलें.

मिरजेहून व पुण्याहून तोफा आल्या व दारूगोळ्याचा भरणा होत चालला तेव्हां रामचंद्रपंतानीं करवीरास मोर्चे देण्याची योजना ठरवून ता. २७ फेब्रुवारी रोजीं पलटणांचा पहिला मोर्चा बसविला. ते लिहितात—

"छ० २ सवालीं दोन प्रहरीं पलटणें फौजसुद्धां चालोन जाऊन कोल्हापुरास उत्तरेचे अंगें बनपुरीनजीक मोर्चाची जागा कायम करून पलटणांतील कवाइती व अलीगोल हे माणूस बसविले. सरकारी तोफाही दिवाळतोडी दोन नेऊन लागू केल्या आहेत. गांवांतूनही कांहीं लोक बाहेर पडले होते, त्यांची यांची गोळागोळी बरीच होऊन फिरोन ते गांवांत गेले. रात्रीस दुमदारीवर चि॥ राजश्री चिंतामणराव आपा व ती॥ राजश्री विठलराव बाबा यांस फौजसुद्धां ठेवून आम्ही फौजसुद्धां गोटास आलों. रातबिरात पन्हाळ्याकडून गोटावर गलबल करितील याकरितां आलों. बंदोबस्त करून आज तेथें नेहमीं रहावयास येण्याचें ठरावांत येईल तें लिहीन."

याप्रमाणें करवीरच्या शहरास पलटणांचा मोर्चा बसल्यानंतर लगेच दुसरे दिवशीं तोफखानेवाले पानशे यानीं त्या मोर्चाचे डावे बाजूस आपला मोर्चा बांधिला, व त्यांतून शहरावर तोफांची मारगिरी सुरू केली. यानंतर वेढ्याचें काम पुढें चाललें त्याचा वृत्तांत पुढील प्रकरणीं देण्यात येईल.

---

नं. ५१३१ श्रीगणराज. ( २३ सप्तंबर. )

पै॥ छ० ७ जमादिलावल मय्या तैन.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेसीं.

अपत्ये गणेशानें दोनी कर जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत

---

१ गणपतराव विश्वनाथ पटवर्धन भिलवडीकर.

भाद्रपद वद्य ९ पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून मु॥ हुबळी नवी येथें सुखरूप आहें. विशेष. वडिलांचे फौजेची व करवीरकरांचे फौजेची लढाई होऊन वडिलांकडील फौज उधळली म्हणोन मनस्वी वर्तमान बाजारी बोलतात. याजकरितां विनंतीपत्र पाठविलें आहे. तर सविस्तर लिहावयास आज्ञा जाहली पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ५१३२ श्रीगजानन. ( भाद्र० व० १३–२७ सप्टं. )

पे॥ छ० ६ जमादिलावल. सन मय्यातैन व अलुफ.

श्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव रावजी स्वामीचे सेवेसीं. पोष्य धोंडो बल्लाळ कृतानेक सा॥ नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० २६ रबिलाखरपावेतों मुक्काम सावनूर आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित आहे. विशेष. श्रीमंत राजश्री भाऊ यांची व करवीरकर यांची लढाई होऊन बिघडली म्हणून राजश्री आपासाहेब यांचें पत्र आलें त्याजवरून सविस्तर कळलें. होणार तें जाहलें. अतःपर त्यांचे परीक्षेचा समय आहे. त्यांचे पुण्येंकरून आहों हें पुष्कळ! सर्वांनीं सर्वस्वास उदार होऊन एकविचार करून मसलतीचा उद्योग होऊन शत्रूचा सूड घ्यावा हा पुरुषधर्म आहे. येविषईंचा विचार तेथें असतील त्यांस बोध होऊन पक्केपणें ठरेल त्यांत मी आहें. मजपाशीं पांच हजार फौज तीन हजार पायदळ तोफा सरंजामसुद्धां आहे. पक्का निश्चय जाहल्यानें ईश्वर अनुकूल होईल. या उद्योगास मसलत मोठी, पैका पाहिजे, परिणाम कसा होईल, धनीपणाचा विचार एक प्रकारचा, पुरवणी मागून होणें कठीण, मोठेपणाप्रमाणें पदरीं पैसा नाहीं, हे अंदेशे समजावणार बहुत मिळतील! परंतु ते चित्तांत आणावयाचा हा समय नव्हे. पटवर्धन यांच्या घराण्यांत कैलासवासी गोविंदपंत नाना त्यांच्या वंशानें दौलत मिळविली ती पाठीमागें भाऊ यानीं रक्षिली; त्यापेक्षां पुढेंही त्यांचे कोणी आहेत असें म्हणाविणें आपल्याकडे आहे. इतके विस्तारें मी लिहावें अशी माझी योग्यता नाहीं. परंतु भाऊंजवळ माझें वचन गुंतलें आहे कीं, चार ( पुत्र तुमचे ) तसा मी पांचवा. यास्तव हें ( लिहिणें ) लौकिकी नव्हे. बहुत काय लिहिणें कृपावृद्धि असावी हे विनंती.

नं. ५१३३ ( भाद्र० व० ३०–२९ सप्टें. )

बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे यांचें पत्र बाळासाहेबांस रवाना छ० २८ रबिलाखर.

---

२ परशुरामभाऊंच्या. २ गोखले. ३ याच अभिप्रायाचें आणखी एक पत्र धोंडोपंत गोखले यानीं रघुनाथराव कुरुंदवाडकर यांस लिहिलें आहे तें येथें घेतलें नाहीं.

"आपलीं पत्रें सरकारांत व राजश्री बाळोबातात्या यांस आलीं तीं प्रविष्ट करून उत्तरें घेऊन पाठविलीं आहेत. करवीरकरांकडील व कर्नाटकांतील व मिरजेकडील बातमी दिनचर्येची समजली पाहिजे यास्तव तुम्हीं लिहून डांक बसवावी म्हणोन श्री॥ राजश्री नाना व बाळोबातात्यांचें सांगणें जरूर आहे. डांक जरूर बसवावी. धोंडोपंत गोखले ( यांची ) कर्नाटकांतील बातमी वरचेवर लिहिली पाहिजे. करवीरकर यांजकडील नामी माणूस कोण कोण पडले वगैरे व जायां जखमी किती याची बातमी तपशीलवार आणून नांवनिशीवार लिहावें, याप्रमाणें श्री॥ राजश्री नानानीं सांगितलें आहे. सर्वांनीं एकदिल व्हावें हेंच सांगणें त्यांचें वारंवार आहे. सरकारांतून शेला घालावयास व समाधानार्थ राजश्री गोविंदराव नीळकंठ लिमये येत आहेत व नानांकडील रा॥ बाळकृष्णपंत बाळ व शिंद्यांकडील कारकून येत आहे. त्यास तेथें सर्वांचा एकोपा दृष्टीस पडावा यांत बहुत गुण आहेत."

नं. ५१३४ श्री. ( आश्विन शु० १—३० सप्तंबर. )

छ० १ जमादिलाखर. सन मय्यातैन.

सेवेशीं विज्ञापना. श्री॥ महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्वारी काल रविवारीं भोजन करून रुकडीच्या मुक्कामाहून कूच होऊन कबनूरच्या मुक्कामास आले. आज इंदुवारीं कबनुराहून कूच होऊन इचलकरंजीच्या रानांत पश्चिमेस माळावर मुक्काम जाला. आज तीन तोफा नेऊन मारागिरी होत आहे. राजश्री कृष्णापा चिटणीस इचलकरंजीहून बोलण्याकारितां आले आहेत. हुजूरची मर्जी निदानीं पन्नास साठ हजारपर्यंत उरकल्यास गांवांनीं ठाणीं घातलीं आहेत तीं उठवावीं व इचलकरंजीस उपद्रव करूं नये. शिवाय दरबारखर्च चार रुपये पडतील असा मजकूर आहे. चिटणीसाच्या बोलण्यांत दहा निदान पंधरा वीसपर्यंत. जाजती नाहीं. तेव्हां येथील बोलणें राजश्री महादाजीपंत दादास समजलें पाहिजे यास्तव उदईक संध्याकाळपर्यंत बोलण्याचा काय तो निश्चय येऊन समजावा, व अवकाश मागावयाचें करून मशारनिल्हे श्री॥ मातुश्री बाईचा उजूर धरितील, यास्तव अवकाश मागितला आहे. आज चिटणीस इचलकरंजीस जातील. उदैकपर्यंत परस्पर उपसर्ग लागों नये याप्रमाणें बोलण्यांत आहे. बोलण्यांत राजश्री हिंमतबहाद्दर व जानराव जाधव व बचाजीपंत त्रिवर्ग आहेत. आणखी आढळेल

---

१ पत्र नारो हरि याचें करवीराहून मिरजेस बाळासाहेबांस.

तें मागाहून सेवेशीं लिहून पाठवितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. इकडील प्यादे वगैरे पंधरा वीस पर्यंत जायां जखमी जाले. बहिरजी गाइकवाड हुकेरीकर यांस गोळा लागला.........वगैरे उडाले गेले. बोहरच्या तोफा अद्याप कारागीर नाहींत. कळावें हे विज्ञापना. लिटली दोन पलटणांनिशीं गोव्यास आला. पुढें येत आहे असें वर्तमान आहे. हुजूरचें पत्र येणेंविशीं आहे म्हणोन वर्तमान आहे. हे विज्ञापना.

नं. ५१३५ श्रीगणराज. ( २ आक्टोबर. )

पै॥ छ०२२ जमादिलावल. सन मय्यातैन व अल्लफ.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेसीं.

अपत्यें [1]गणेशानें दोनी कर जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत अश्विन शुद्ध ३ पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून मुक्काम नवी हुबळी सुखरूप असें. विशेष. वडील सर्वांस छत्र होते तें ईश्वराचे चित्तास नये, तेव्हां ऐसें जाहलें! त्यांचे ठायीं वडील आपण आहेत. राजश्री गोखले यानीं घासदाण्याचे रोखे तर्फ तडसावर व नवी हुबळीवर केले. सावनूर तालुक्यांत परगणा पाहून रोखे करीत आहेत. कळावें. गोखले यांचा मुक्काम सावनुरांत आहे. इंग्रजाचा मुक्काम हनगलानजीक आहे. बातमीस माणसें गेलीं आहेत. येतांच विनंतीपत्र लिहितों. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.

नं. ५१३६ श्रीगणराज. ( आश्विन शु० ३–२ आक्टों. )

[2]चिरंजीव राजश्री रामचंद्रपंत आपा यांसीं.

आशीर्वाद उपरी. आपणाकडील रोहिले जमातदारसुद्धां राजमंडळाकडे जाणार असें ऐकिलें. बित्तीम नाहीं. जनावार्ता. प्रतिबंध होईल यास्तव जमातदार यांस खर्चास देऊन गुंतवणें. मग माणसें आपले विचारास येतील तसीं ठेवावीं. परंतु मुख्यास जाऊं देऊं नये. छ० २ जमादिलावल. लोभ करावा हे आशीर्वाद.

श्रीगणराज.

विज्ञापनीं. झाडून पायदळास निरोप जाहला खर्चासाठीं. कळावें हे विज्ञापना.

नं. ५१३७ श्री. ( आश्विन शु० ५–३ आक्टो. )

पै॥ छ० ४ जमादिलावल. आश्विन मास. सन मय्यातैन व अल्लफ.

---

१ गणेश विश्वनाथ पटवर्धन भिलवडीकर. २ चिठी बाळासाहेबांची व खालचें उत्तर रामचंद्रपंतांचें.

सेवेसीं नारो हरि करंदीकर दोन्ही कर जोडून शिर सा॥ नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत छ० ३ जमादिलावल पावेतों मुकाम लष्कर इचलकरंजी यथास्थित असे. विशेष. श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्वारी करवीरास आज गुरुवारीं दोन प्रहरीं गेली. कारण महाराजांस ललितापंचमीचें व्रत आहे याजकरितां गेले. उदईक स्वांरी माघारी लष्करास यावी असा बेत आहे. न आल्यास दसरा करून येणार. मी लष्करांतच आहें. उद्यीक स्वारी लष्करास न आल्यास मी करवीरास जाईन. कळावें. वरकड सरदार तोफखानासुद्धा लष्करांतच आहेत. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१३८ श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ० ४ जमादिलावल. सन मय्यातैन. आश्विन मास.

[1]सेवेसीं विज्ञापना. मला मिरजेस जाणेविशीं ( महाराजांची ) आज्ञा जाहली याचें कारण स्वामींचें व श्रीमंत. राजश्री दादासाहेबांचें लक्ष हुजूरच्या ठायीं आहे. त्यापेक्षां जी गोष्ट जाहली, ते बरीच जाहली. पुढेंतरी विवेक व्हावा यांत उत्तम आहे. हुजूरचेंही लक्ष असेंच आहे. दुखवट्याचीं वस्त्रें इकडील येणार आहेत व पत्रें स्वामींचे नांवें एक व दादासाहेबांचे नांवें व श्रीमंत राजश्री रामचंद्रपंत आपा यांचें नांवें अशीं तीन पत्रें येणार. वरकड इकडील बोलण्याचा भाव समक्ष सेवेसीं निवेदन करीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना वे॥ संपन्न राजश्री रामचंद्र दीक्षित बाबा वाटवे ही या बोलण्यांत असावे असा येथील मानस आहे. कळावें हे विज्ञापना.

नं. ५१३९ श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ०४ जमादिलावल. सन मय्या तैन व अल्लफ.

[1]सेवेसीं विज्ञापना. महाराजांची स्वारी करवीरास गेली. कारण बाह्यात्कारी ललितापंचमीकरितां गेली. अंतर्यामींची मसलत निराळी ! पुण्याचीं पत्रें राजश्री आत्माराम धोंडदेव व रत्नाकर अण्णाजी यांचीं आलीं त्यांतील अर्थ 'पुण्याहून फौजा रवाना जाहल्या. इचलकरंजीस शह दिला हें ठीक न केलें.' आतां शह दिलेवर उठोन कसें जावें, तेव्हां कवाइतीतें जावें ! नरसिंगपुरकर भटजीबावांकडेही चिटणीस इचलकरंजीहून गेले आहेत. महाराजही करवीरास आहेत. पुण्याकडील नेट आहे असें खचीत आहे तर 'भटजी-

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

बावांनीं सांगितलें, त्यांचें वचन मान्य केलें !' थोडयां बहुतावर तोड पाडून शह उठवावा. अशी एक मसलत आहे. कदाचित पुण्याकडील नेट नरमच असल्यास मग मसलत केलीच आहे. राजश्री जानराव जाधव यास पुण्यास रवाना करावयाची सिद्धता होत आहे. त्रिवर्ग श्रीमंत यांस वस्त्रें व नानांस वस्त्रें व गोपिनाथ दिक्षित करवे यांस वस्त्रें पाठवणार जाधव यांजबरोबर. कळावें. आणखी जसा मजकूर समजण्यांत येईल तसा कळवीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१४० श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ०४ जमादिलावल. सन मय्या तैन. आश्विन मास.

[1]सेवेसीं विज्ञापना. इकडील फौज पेशजी फुटली त्यांतील लोक फिरोन यावयास लागले. फिरोन फौजेचा जथ पडावयास लागला आहे. मौजे शिरगांव येथें भाऊसाहेबांकडील तोफा दोन होत्या त्यांची मुदईगिरी गलदर्गेकरानीं केली. त्याजवरून हुजूरनें हुजऱ्या शिरगांवास रुजवातीकरितां पाठविला आहे व गलदर्गेकरांसही आज्ञापत्र सादर आहे कीं, रुजुवात करून देणें. राजश्री नागोपंत आपाकडील कारकून यानीं विनंती केली कीं तोफा होत्या परंतु नेल्या. शिरगांवीं राहिल्या नाहींत असें बोलले. परंतु मुदईगिरी जाहली आहे. काय होतें पहावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. पाच्छापुरास ठाणें इकडील बसलें. हे विज्ञापना.

नं. ५१४१ श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ०४ जमादिलावल. सन मय्यातैन व अलफ. आश्विन.

[2]सेवेसी विज्ञापना. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा व दादासाहेब सर्वत्र मंडळी मिरजेंत एकत्र होऊन स्वामींचे विचारें व सर्वत्र मंडळीच्या विचारें समुच्चयें ठरलें कीं आणखी फौज धरून मसलत वाढवावी, सोडूं नये, असें ठरलें; म्हणोन श्री॥ महाराज बोलले. तिकडील मंडळीस सर्वत्रांस आसरा (तुम्ही) दिला याचा विचार काय ? तेव्हां उत्तर केलें कीं पेशजी भाऊसाहेब पुण्याहून जुन्नरास गेले ते समयीं हुजूरची स्वारी तासगांवास जाण्याचा बेत जाहला. ते समयीं सर्वत्र मंडळी मिरजेंतच राहिली होती. हल्लीं ही मोड जाहला याजमुळें मंडळी मिरजेस आली असेल. जागा देणें

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकर याचें मिरजेस. २ मुद्दा पत्ता दाखवून देण्याचे जोखीम. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून बाळासाहेबांस.

प्राप्त आहे. याजविशीं महाराजानीं चित्तांत दिक्कत आणूं नये. वरकड जाबसाल त्याची मसलत ते करीतच आहेत. त्यांत सामलातीचा भाव परस्पर समजण्यांत आलाच असेल व पुढेंही कोणे तऱ्हेची वर्तणूक होईल तीही कळेल. आजपर्यंत एकसारखें ( महाराजांकडे आमचें लक्ष ) असतां कितेक उपसर्ग हुजूरचेच जाले तितकेही सोसून असतां रिकामे संशय चित्तांत येतात त्यास उपाय काय ? काळगतीचा महिमाच या तऱ्हेचा जाला आहे. सारांश गैरवाका मात्र चित्तांत येऊं नये म्हणजे जें लक्ष आहे तेंच आहे. दुसरा अर्थ नाहीं. सामलातीचा विचार ज्याचे ते स्वतःसिद्ध मसलत करणार. आम्ही सरकारचे सेवक. जिकडे फौजसुद्धां सेवेची आज्ञा होईल तिकडे केली पाहिजे यास उपाय नाहीं. वरकड स्वतः ( आम्हांस ) मसलतीच्या अधिकाराचें कारण नाहीं. याप्रमाणें उत्तर केलें. यांत अधिकउणें काय पडलें असेल तें असो. राजश्री बचाजीपंत यांस हुजूरनें विचारलें कीं, पुढें मसलत कशी ? त्यास मशारनिल्हेनीं उत्तर केलें कीं पेशर्जा सरकारचा ठराव तीन लक्षांचा प्रांत चिकोडी मनोळी राहून द्यावयाचा ठरला आहे त्याप्रमाणें मान्य व्हावें. परशुरामपंत भाऊ सरकारचे सेवक, सरकार कामावर खर्च जाले, त्यापेक्षां हुजूरनें व पुण्यांतून सरकारांतून त्यांची समजूत काढली पाहिजे. बोलणें पडलें असतां असेंच पडेल म्हणोन बोलले. तूर्त मिरज कुरुंदवाड या दोनी स्थळांस उपद्रव करूं नये असें बोलण्यांत आहे. आणखी आढळेल तें सेवेशीं लिहून पाठवीन. श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री विष्णुपंत भाऊ यादवाडकर यांस करवीरीं घाडगे यांणीं आपले वाड्यांत तसदी बहुत केली होती. कारण चार रुपये कबूल करावे हा मानस. तूर्त लांबणीवर सुटकेचा विचार पडला. ईश्वरइच्छा प्रमाण. हे विज्ञापना.

नं. ५१४२ श्री. (आश्विन शु० ६–४ आक्टो.)

पै॥ छ० ९ जमादिलावल. सन मय्यातैन व अल्लफ. आश्विन.

श्री॥ राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक देवजी कृष्ण देशपांडे कृतानेक सा॥ नमस्कार. विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० ४ जमादिलावलपर्यंत स्वामीचे कृपें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. या नंतर इकडील वर्तमान तर इंग्रजानीं हानगलास तोफा लावून चढाई केली याजकरितां राजश्री धोंडोपंतदादा गोखले फौजेसुद्धां तडस बेटगिरेस आले. ऐलीकडे नवलगुंद तालुक्यांत येणार आहेत. सदाशिवगडाकडे इंग्रज होते त्याणीं हल्याळ सांबराणी घेतलें. तेथें ठाणें राजश्री

बापू शिंदे धारवाडकर यांचें होतें. कित्तूर प्रांतचे सीमेस दाखल जाले. गोमांतकांत बारा तरांडीं बारा हजार जमाव आलेलेपैकीं चार हजार उतरले ते रेडी वेंगुर्ले किल्ला नि॥ सावंतवाडीकर व मालवण नि॥ श्री॥ महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचा किल्ला खालीं करून देणेंविशीं सक्त तगादा लाविले आहेत. आठ रोजांत तिनी किल्ले घेणार. आलेल्याचें नांव ईटपसाहेब म्हणोन सांगतात. पक्कें वर्तमान चार दिवसांत सेवेशीं विनंती लिहितों. कित्तूरकर देसाई याणीं बागेवाडी घेतल्यानंतर इकडे हालचाल करून पाहिलें, परंतु स्वामीचे पुण्य तल्लक्षण! जमाव भारी देखोन माघारे गेले ते बेलवडीपर्यंत जाऊन तेथील देसाईस धरून त्याचें इनामगांव गोवनकोप घेऊन आपण माघारे संगोलीस आले. ठाणें दोडवाडास जावें हा बेत भारी. तेथें जमाव भारी याजकरितां एकाएकीं बेफाम असतेसमयीं हस्तगत करावें ऐसे मसलत आहे. पांच प्यादे कित्तूरकरांचे जाऊन ठाणें देणें अगर एकसाली पैका देणें म्हणोन दोडवाडास गेले आहेत. "श्रीमंतांचें आज्ञापत्र आणिल्यास देऊं, येथें यक्तियारी कोणी नाहीं, वतनबाब सर्व चालत असतां दिगर जाबसाल करणें ठीक नाहीं, तत्राप केलिया सरकार आहे, मुलाजा होणार नाहीं, ऐसें उत्तर सांगितलें आहे. एकजण जाऊन पुसोन येतों म्हणोन गेला आहे. कजियेस प्रारंभ करून कडेगुद्दी माझा इनामगांव येथील गुरें चोवीस घेऊन गेले. स्वल्पविषयासाठीं बदला करून कजिया वाढवूं नये म्हणोन फेर केले नाहींत. बागेवाडींत मामलेदार केंचपा मदनहल्ली सरनोबत आहे. स्वामींचें आज्ञापत्र कारकुनाबरोबर पाठवून देतों. दसरेस बागेवाडीस देसाई येणार आहेत. ईश्वरइच्छेनें घडेल तें खरें. राजश्री राजाज्ञा यांचा मुक्काम हुकेरीवर आहे. घोडगेरीस येणार आहेत. पाच्छापुरास येणार म्हणोन बारीस लोक पाठविले आहेत. पेशजी कित्तूरकर आमचे संमतींत होते. कणवीची बेगमी जमाव दोन हजार पर्यंत जाला होता. हल्लीं ते प्रतिकूळ आहेत याजकरितां कसें होतें न कळे. श्री॥ राजश्री दादासाहेब स्वामींची स्वारी येलुरास येणार म्हणोन येथें लोकवार्ता ऐकून शत्रु आपापले स्थानीं योजनेंत आहेत. ईश्वरकृपें सत्य होईल तेव्हां खरें! धोंडजी वाघ याचे जमाव गोकाक प्रांतीं मालदिनी नजीक आहे. नित्य स्वारी शिकारी करीत आहे. लुटारू बहुत मिळाले आहेत. उदईक येईल तें वर्तमान सेवेशीं विनंती लिहून पाठवितों. आजपर्यंत स्वामींचे कृपे याप्रमाणें वर्तमान आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१४३ श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ० ४ जमादिलावल. सन मय्यातैन. आश्विनमास.

सेवेसीं विज्ञापना. राजश्री महादाजीपंत दादांचा दम चांगला आहे व लोकांचाही नेट तसाच आहे. हुषारी फारच चांगली आहे. पुण्यांतून त्यांचे चिरंजीवांचीं पत्रें आलीं. त्यांतील वर्तमान रविवारीं वर्तमान भाऊसाहेबांचें समजलें. नंतर राजश्री बाळोबा पागनीस वाड्यांत जाऊन सरकारचा चौघडा बंद केला आणि इकडे फौजा रवाना करावयाचा बेत आहे. निसबत राजश्री माधवराव रामचंद्र व शिंद्याकडील धोंडोबा व कृष्णोबा चिटणीस पांच पलटणें व सरकारच्या दहा तोफा येणेंप्रमाणें सरंजाम रवाना करावयाची सिद्धता जाली. दसऱ्याच्या सुमारें कृष्णातीरास यावें अशी निकड आहे. राजश्री धोंडोपंत गोखलेही धारवाडास आले. त्यांसही पुण्याचीं पत्रें आलीं आहेत. कळावें. शिरगांवास तोफा भाऊसाहेबांकडील दोन आहेत त्याची मुद्दईगिरी गलदगेकरानीं केली त्याजवरोन शिरगांवास हुजूरनें आज्ञापत्र व हुजऱ्या गेला आहे. त्यास शिरगांवकरांकडील कारकुनास सांगोन बोलाविलें जे, मिरजेंत शिरगांवकरांचीं कुटुंबें आहेत. त्यास तोफा दिल्यास अडचण होईल असें बोलोन मनाचिठीची परवानगी हुजऱ्यास घेऊन पाठविली आहे. उठोन येईल. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञावना.

नं. ५१४४ श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ० ४ जमादिलावल. सन मय्यातैन. आश्विनमास.

[2]सेवेशीं विज्ञापना. काल हुजूरची खासा स्वारी इचलकरंजीनजीक जाऊन तोफांची मारागिरी जाली. काल गांवा नजीक सडे फौजेचा हुजूरच्या स्वारीसुद्धां मुक्काम जाला. मी व शिरगांवकरांकडील कारकून उभयतां ठाण्यांत राजश्री महादाजीपंत दादाकडे गेलों होतों. त्यांजकडील बोलणें पराकाष्टा निदान पंधरा हजार पावेतों आहे. जाजती नाहीं. इकडील पन्नास हजारपर्यंत आहे. श्री॥ मातुश्री बाईचीं पत्रें वे॥ सं॥ रा॥ राजश्री भटजीबावा नरसीपूरकर यांजकडे राजश्री नारोपंत घेऊन गेला होता. बावांचें उत्तर आलें कीं, कारकून पाठवून द्यावा. त्याजवरून राजश्री कृष्णापा चिटणीस काल करवीरास तिसरे प्रहरीं निघोन गेले. आज सायंकाळपावेतों इचलकरंजीस

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून. तशींच पुढचीं दोन पत्रें. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

येतील. आल्यावर बावांचीं पत्रें घेऊन येतात किंवा काय तो मजकूर समजेल तसा सेवेशीं लिहून पाठवीन. आजही हुजूरची स्वारी डेऱ्यास आली नाहीं. मारागिरी तोफांची होत आहे. पेठेवर निकड करावयाचा बेत आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१४५ श्री. ( आश्विन शु० ६–४ आक्टो. )

पै॥ छ० ४ जमादिलावल. सन मय्यातैन. आश्विनमास.

[1]सेवेशीं विज्ञापना. राजश्री धोंडोपंत गोखले कुसेगलच्या सुमारें फौजसुद्धां आले असें वर्तमान मनोळीहून आलें. राजाज्ञा पाच्छापुरास गेले. गोकाक यादवाड व मनोळी तालुक्यांतील व येकुडीसुद्धां ठाणीं पडलीं. राजश्री नरसिंगराव गुजर नि॥ चतुरसिंग याची व रास्ते यांच्या फौजेची लढाई निगडी नजीक कोरेगांव येथें जाली. रास्ते यांच्या फौजेचा गळाठा गुजर याणीं केला असें वर्तमान आहे. हल्लीं गुजर यांचा मुक्काम इस्लामपुरानजिक आहे. बरोबर पांचशेंपर्यंत लोक आहेत. अष्टे वाळवेंसुद्धां ठाणीं बसलीं. सुरापूरकर याजकडून कारकून बोलण्यास आला आहे. कुमकेचें संधान आहे. पुण्यास श्रीमंतांस वस्त्रें रवाना करावयाची योजना ( येथून ) होत आहे. मागाहून सविस्तर लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१४६ श्री. ( आश्विन शु० ७–५ आक्टो. )

पै॥ छ० १० जमादिलावल. सन मय्या तैन व अल्लफ.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेसीं. सेवक बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० ५ जमादिलावलपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजी स्वामींकडून पत्रें आलीं त्यांचीं उत्तरें पाठविलीं आहेत. इकडील अर्थ सर्व पत्रीं दर्शविलेच आहेत. त्यांचीं उत्तरें समर्पक रवाना जालींच असतील. वडील लढाईंत सरकार कामास आले, शत्रूनें नीच कर्म केलें, हें वर्तमान श्रीमंत नाना व राजश्री बाळोबा तात्या या उभयतांस स्वामींची स्वदस्तूरची पुरवणी आली होती ती दाखविल्यावरून उभयतांस जो खेद जाहला त्याचा बयाज पत्रीं लिहितां येत नाहीं. पुढील कर्तव्याचा विचार उभयतांजवळ बोलावयाच्याअन्वयें बोलून सरंजामाची रवानगी करावयाची योजना केली आहे. लौकरच रवानगी व्हावी असें आहे. उभयतांचा नेट पारिपत्यच करावें हाच

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

खंबीर आहे. परतु येथें उभयतांच्या बोलण्यांत वारंवार येतें जे, ' यांच्या घरांत येकोपा नाहीं ! ' याजमुळें संशय घेतात. त्याविशीं खातरजमा करावयाच्या अन्वयें केली. नानांचें म्हणणें " सारे एक विचारें चालले असतां यांत सरकार उपयोग आणि शत्रूवर जरब बसोन भाऊंचे पाठीमागें दौलतीचा नक्ष. सर्वांचें कल्याण. घरांतील किती एक फिसादीमुळें परस्परें रोष वाढले आहेत ते या समयीं कोणी मनांत न आणितां एकदिल होऊन भाऊंचे पाठीमागें नक्ष करून दाखविला असतां घरांतील अडचणी त्या कितां ? भाऊंचा आमचा ऋणानुबंध किती होता त्या धोरणावर सर्वांनीं एकरूप होऊन एकादी गोष्ट दौलतीच्या कल्याणाची मला इकडे लिहिली असतां ज्यांत सर्वांचा नक्ष राही तीच सांगण्यांत कसूर व्हावयाची नाहीं. चोघै चहूंकडे या दिवसांत पाहूं लागल्यास आजपर्यंत जो दाब सरदारींत होता तसा राहणें अवघड" या अन्वयें बहुत ममतेचीं नानांचीं व माझीं बोलणीं जालीं. त्याजवरून मी नानांची खातरजमा केली जे भाऊंचे मागें बाळासाहेब सर्वांस वडील आहेत. कोणती गोष्ट जाहिराण्यांत वांकडी व्हावयाची नाहीं आणि होणार ही नाहीं. सर्वांस गोष्ट लागली आहे जे एक वेळ करवीरकरांचें पारिपत्यच करावें. दुसरा विचार नाहीं. तेव्हां नाना बोलले जे, तुम्हीं म्हणतां तें प्रमाणच आहे. हल्लीं या मन्मंतरांत उगेंच एकाद्याचे नादीं लागावें त्यांत काम नाहीं. परंतु घरांतील नाद मात्र जात असावे ! मागेंपासून तुमच्या घराण्यांतील चाली पाहतां सरकार कामास सर्वांचें एकचित्त होतें.. घरांतील खटले असतात ते सरकार चाकरीस दाखवीत नाहीं अशा चाली परंपरागत तुमच्या आहेत, सबब कोणाचा काट चालत नाहीं. याजमुळें सर्वांची जरब. हे अर्थ बोलण्यांत आले ते स्वामींस समजावे याअर्थीं किंचित् दर्शविले. स्वामी दुरदेशी. सेवकानें लिहून कळवावें असें नाहीं. तथापि कालानरूप हल्लींच्या येथील चालीवरून जर सूचना न केली तरी सेवकाकडे शब्द लागतो; यास्तव विनंती लिहिली आहे. श्रीमंत राजश्री नानांकडूनही येविशीं बोलावयाकरितां कारकून जाणार आहे. तुमची सूचना जावी म्हणोन ( नानानीं ) सांगितलें त्यावरून लिहिलें आहे. या पत्राचें मनन होऊन उत्तर समर्पक यावें आणि कारकून जाईल त्याजवळ-ही सर्वांचें एक दिलाचेंच बोलणें पडलें असतां यांत सर्व अर्थ आहेत. मन-सबा ठरोन सर्वांचीं पत्रें नानांस यावीं आणि सरकारांतही पत्रें सर्वांचीं याच अन्वयें यावीं. आजपर्यंत कैलासवासी भाऊसाहेब याणीं सरकारचाकरी केली. त्यांची पत फौजेंत सावकारांत व दरबारीं कसी होती तें एक स्वामींसच-

जाहीर. पांच रुपये घरांतील व बाहेरील सावकारी काढून सरकार चाकरी नक्षानेंच केली हें वडिलांचें चालिवणें आपणाकडे. सर्वांनीं मिळोन फौज जमा करून शत्रूचें पारिपत्यच करावें हें स्वामींच्याही मनांत वागतच आहे. सारांश येथील सर्व अर्थ राजश्री मोरो बल्लाळ साठे यांजबरोबर नानानीं समक्ष सांगोन पाठविले आहेत. विनंती करितां ध्यानांत येईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१४७ श्री. ( आश्विन शु० ८–६ अक्टो. )

पै॥ छ०६ जमादिलावल. मय्या तैन व अल्लफ.

'सेवेसीं विज्ञापना. महाराज दसरा करून लष्करास येणार. रा॥ धोंडजी वाघ यास जमावसुद्धां आणविलें आहें. कित्तूरकर देसाई याजकडीलही जमाव यावयाचें संधान जाहलें आहे. सेनाखासकील यांजकडील जमाव व सेनापतीकडील व राजाज्ञाही इचलकरंजीवरच येणार. राजश्री चतुरसिंग भोसले यांजकडील नरसिंगराव गुजर पांचचारशें लोकांनिशी कोडोली पारगांवावर आले आहेत त्यांसही इचलकरंजीवरच येणेंविषयीं चतुरसिंग याचें पत्र व हुजूरचें येणेंविषयीं गेलें आहे. हरिपूरच्या सुमारें चतुरसिंगांकडील फौज ठेवणार. तासगांवची सनद चतुरसिंग यास लिहून दिली. कराड प्रांतें प्रतिनिधि पंत विशाळगडकरी जाणार. नद्यांचें पाणी उतरलें म्हणजे कृष्णा उतरणार. जम पडेपर्यंत मात्र गोड बोलतात. परंतु सर्वत्र प्रांतास उपद्रव करणार असा विचार दिसतो. याचा कांहीं विचार निघाल्यास उत्तम आहे. नाहींतर परिणाम प्रांताचा अवघड दिसतो. आढळलेला प्रकार सेवेसीं लिहिला आहे. याचा' विचार करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. इचलकरंजीचें गुळें राजमंडळचे गांवानीं आहे त्यांस आणून नागवितात. तमाम गांवगन्ना राखे जाहले आहेत. कबनुरास पंचवीस तीस कुळें होतीं तीं काल आणून तीन हजार रुपये दंड बांधला. आणखी वरचेवर उमगोन आणीत आहेत. उद्योग गोविंद नाईक आळतेकर करितात. कळावें हे विज्ञापना.

नं. ५१४८ श्री. ( आश्विन शु० ११–९ आक्टो. )

पै. छ० ९ जमादिलावल. सन मय्या तैन व अल्लफ.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र मोरोपंत करंदीकर याचें.

¹पुरवणी विनंती सेवेसीं देवजी कृष्ण देशपांडे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे, गोमांतकास कारकून याजबरोबर पेशजी स्वामींनीं पत्रें पाठविलेलीं देऊन बहुगुण कामत यास पत्र देऊन डिचोळीस पाठविले आहेत. तेथें राहून बहुगुण कामत यानीं लिटली साहेब यांजकडील सरदार आलेला खरा ठरलियास पत्रें द्यावीत. नाहीं तर देऊं नये. ( बरोबर ) कारकून राजश्री कोंडोबा नाईक आहे. सर्वही तपशीलवार आज्ञेप्रमाणें सांगून काल रवाना केला आहे. वर्तमान येईल तें सेवेसीं विनंती लिहितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं ५१४९ श्रीगणपति. ( आश्विन शु॥ ११–९ आक्टो. )

ती॥ राजश्री गणपतराव काका वडिलांचे सेवेशीं

अपत्यें रामचंद्र परशुराम सा॥ नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. लढाई बिघडल्याचें इकडे लोक मनस्वी बोलतात; याकरितां सविस्तर ल्याहावें म्हणोन लिहिलें, त्यास छ० १६ रबिलाखरीं करवीरकरांची व आमची लढाई जाली. एकाएकीं लढाई बिघडली. आणि वडील आमचे डावे बाजूस उभे होते, सारी फौज आजूबाजूनें तोंडावर होती, असें असतां वडील होते तेथेंच करवीरकरां-कडील एका टोळीची जूट बसोन गर्दी जाली. त्यांत वडिलांस समोर दोन जखमा तरवारेच्या डोईवर लागोन सरकारकामास येऊन जाग्यावरच कैलासवासी जाले. होणारानुरूप गोष्ट घडली. वडिलीं इहलोक साधिला. ईश्वरइच्छा प्रमाण ! आम्ही मिरजेस उत्तरकार्यानिमित्त आलों तें जालें. याउपरी पुढील विचार पुण्यास पत्रें पाठविलीं. तिकडून व राजश्री बाळोबातात्या यांजकडून कुमक पलटणें वगैरे सरंजाम येणार तोही लौकरच यावा असें आहे. चि॥ राजश्री हरिपंतबाबा यांस दसऱ्याचे मुहूर्तें डेरेदाखल करवणार होतों तों वृद्धि आल्यामुळें तो मुहूर्त राहिला. याउपरी पुढें लांबणीवर पडों न देतां त्या रोखें येतों. तुम्ही बहुत बहुत सावधपणें राहून राजश्री बाळकृष्णपंत लागू यांजकडे वरचेवर पत्रें पाठवून एक विचारें तिकडील बंदोबस्त पक्केपणें राखणें. गोखले यांसही पत्रें पाठवीत जाणें. पत्रांत थोरपणा त्यांजकडेच देऊन लिहीत जाणें. मशारनिल्हेस येथून वरचेवर पत्रें जात असतात. तुम्ही तिकडे आहां यामुळें आम्ही तुमचे भरंवशावर. त्या सरदेस येऊन दाखल होऊं तोंपावेतों त्या तालुक्याचे बंदोबस्ताविशीं ( आम्ही ) बेफिकीर. सारांश गोष्ट वडिलांचे

१ पत्रावरील मिति व तारीख पेशव्याची आहे.

पुण्यप्रतापेंकरून सर्व गोष्टी मनोदयानुरूप घडतील. सावधगिरीस कमी न करितां वरचेवर पत्र पाठवून वर्तमान कळवीत जाणें. बहुत सावधगिरीनें राहून तालुक्याचा बंदोबस्त करावा. रवाना छ० ९ जमादिलावल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ५१५० श्री. ( आश्विन शु० १२–१० आक्टो.

सेवेसीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० १० जमा॥वलपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. तींच पत्रें श्री॥ राजश्री नाना स्वामींस दाखविलीं व राजश्री मोरोपंतास पत्रें पाठविलीं तीं श्रीमंतांस दाखविलीं व श्री॥ राजश्री नानांस पत्रें पाठविलीं तीं प्रविष्ट केलीं. उत्तरें मागाहून पाठवितों. मजला आज्ञा जाली कीं, राजश्री गंगाधरराव व राजश्री रघुनाथराव यांसीं पत्रें पाठवावें कीं, सर्वांनीं एकचित्त करून फौज चांगली लढाऊ जमा करून महाराजांस हात दाखवावा, तरच भाऊंचे मागें आहेत त्यांचे स्वरूप ! सरकारांतून फौज व तोफा व शिंदे यांजकडील पलटणें व फौज रवाना होत आहे. राजश्रींचा बंदोबस्त आपण व सरकारचे सरदार मिळोन चांगला करावा त्यावरून विनंती लिहिली आहे. सर्वांनीं एकचित्त होऊन लढाईचा सरंजाम चांगला करून महाराजांस हात दाखवावा हेंच चांगलें. श्रीमंत आपांस सरकारचा शेला घालावयाकरितां राजश्री गोविंदराव नीळकंठ खासगीवाले रवाना जाले ते लवकरच येतील. श्रीमंत नानांकडूनही गृहस्थ येणार आहे खातमी वरचेवर येत असावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१५१ श्री. ( आश्विन शु० १४–१२ आक्टो.

पै॥ छ० १५ जमादिलावल. सन मय्या तैन व अलफ.

विज्ञापना. ता॥ छ० १२ जमादिलावल सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री शिंदे यांजकडील कारभारी राजश्री बाळोबा तात्या आबा चिटणीस व मामा आंगरे याणीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांजपाशीं विजयादशमीच्या पूर्वीं पांच सात दिवस बोलणें बोलिले कीं, सरकारचे दौलतीमध्यें बखेडा जाहला. हरएकविसीं बंदोबस्त होत नाहीं. आमचे घरांत कलह उत्पन्न जाहला होता तो मिटत आला आहे. पुढें इंग्रज प्रबळ जाहले आहेत यांचा रेंच मोडिला पाहिजे. त्यास याचा विचार काय ? हिंदुस्थानांत दंगा जाला आहे. पुढे दौलतीचा विचार काय ? राजश्री नानांचें तुमचें मिळत नाहीं. सर्वांचें छत्र सरकारची दौलत. त्यास तेथें विचार या प्रकारचा

पुढें याप्रमाणेंच असल्यास विचार कळतच आहे ! त्यावरून श्रीमंत राजश्री पंतप्रधान व रावसाहेब याणीं उत्तर केलें कीं, राजश्री नानांस कारभार निखालसपणें करावा म्हणोन सांगितलें. एकदोन वेळां जाहलें. परंतु यथास्थित चित्त घालीत नाहीं; म्हणोन आज्ञा केली. बाळोबानीं उत्तर केलें कीं, त्याणीं चित्त घातलें असतां बंदोबस्त होईल. नाहींतरी आम्हांस विचार पहावा लागेल ! त्यावरून विचार करून सांगतों असें उत्तर आलें. एकदोन वेळां शिंदे यांचे कारभारी यांचें श्रीमंतांजवळ हेंच बोलणें पडलें. राजश्री नानांसही राजश्री बाळोबा तात्या व चिटणीस यानीं सांगितलें. नानानीं उत्तर केलें कीं, आम्हांस कारभार कांहीं येक नलगे ! तुम्हीं कारभार दौलतीचा करावा म्हणतां, त्यास माझे शरीराची प्रकृत कळतच आहे. बहुत दिवस श्रीमंतांचे दौलतीमध्यें काम केलें याचा शेवट श्रीभागीरथीस जावें हाच आहे. श्रीमंतानीं कृपा करून आम्हांस निरोप द्यावा हें उत्तम. राजश्री अलिजाबहादूर यांचें आमचें गारपीरचे मुकामीं आम्ही (सुटून) आलों ते समयीं हेंच बोलणें आहे. याउपरी कारभार माझ्याचेनें व्हावयाचा नाहीं. म्हणोन उत्तर केलें. नंतर कारभारी शिंदे यांजकडील यांचा नेट पाहून श्रीमंतानींही कारभार नानांस सांगावा याप्रमाणें विचार केला होता. नाना तो कारभार करीत नाहीं म्हणतच. परंतु सर्व लौकिकांत विजयादशमीस महूर्तेंकरून नानांस कारभार सांगावा असें होतें. परंतु विजयादशमीस तो प्रकार जाहला नाहीं. पुढें काय ठरतें पहावें. राजश्री मोरोबादादा यांजकडे राजश्री नानानीं मोरोपंत गोडबोले यांस बोलावयास पाठविलें आहे. ते बोलोन आल्यानंतर दादा पुण्यास येणार. श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांचा नेट त्यांस आणावयाचा आहे. राजश्री मोरोबा दादा यांचे पुत्रास विजयादशमीचे मुहूर्तें पारनेरचे अजमासावर नानानीं रुबरू जवळ बसोन मखलसी करविली. याप्रमाणें वर्तमान आहे. मागाहून आढळेल तें विनंती लिहितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१५२ श्री. ( १२ आक्टोबर. )

पै॥ छ० १५ जमादिलावल. मय्या तैन व अल्लफ.

सेवेशीं मोरो आपाजी परांजपे दोनी कर जोडून शिरसा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ आश्विन शु॥ १४ मुक्काम पुणें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. येसू काकडा याजबरोबर पत्रें स्वामींचीं आलीं त्या पत्रांतील भाव श्री॥ राजश्री नानांस श्रुत केला. घरकलहाचा मजकूर तरी राजश्री

१ पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

चिंतोपंत लिमये व धोंडोपंत जोग यांस श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा व दादा याणीं पाठविले आहेत. बोलोन आल्यावर त्यांचा विचार कळेल. राजश्री नानानीं उत्तर केलें कीं, " त्रिवर्ग एक विचारें जाहले असतां काय चिंता आहे ? महाराज यांची मसलत जाहल्याखेरीज आणखी कांहीं एक मनाला आणावयाचें नाहीं. त्याणीं ही गोष्ट बोलूं नये. " राजश्री चिंतामणराव आपांकडून इकडे श्रीमंतांकडे बोलावयास कारकून आला आहे. श्री॥ राजश्री नानांकडेही बोलणें बोलावें. त्यास त्यांचे शोधांत असावें म्हणोन आज्ञा, त्यास येथें शोध केला. कोण आला हें समजत नाहीं. श्री॥ राजश्री नानांस कारकुनाचा मजकूर श्रुत केला. " कोण आला शोध लावणें. आम्हांकडे आल्यास यथास्थित जाबसाल सांगों " याप्रमाणें सांगितलें. पत्रें स्वामींचीं वरचेवर यावीं. पु॥ पत्रीं बाया शिंदे यांजकडील बाळाजी कृष्ण याजकर पलटणवाल्यानीं दंगा करून विजयादशमीस सूर्योदय व्हावयाचे संधीस गोटावर एकाएकीं चालोन आले. दहा बारा तोफा सुरू केल्या. लोकांस अवसान बसों दिलें नाहीं. गोट उधळोन गेला. तळ लुटला. नंतर दुसरे दिवशीं बायांकडील पठाण वगैरे पलटणावर चालोन आले. लढाई जाली. नंतर बाया शिंदे कूच करून निघोन गेलीं. कालचा मुक्काम गणेगांव वाघोली याजवर होता. हा विचार राजश्री बाळोबातात्या यांचा नाहीं असें लोक म्हणतात. कोणीकडून विचार जाहला आहे न कळे. बायांकडे राजश्री दौलतरावबाबा याणीं राजश्री सदाशिव मल्हार व धोंडीबादादा यांस बोलावयास रवाना केलें. दोन कोसांवर गेले आहेत. विचार काय होतो तें मागाहून विनंती लिहीन. मसलत पूर्व स्थितीस आली. इकडे उत्तरा हस्ताचा पर्जन्य उत्तम जाहला. पिकें चांगलीं जालीं आहेत. परंतु दमानें राहत नाहींत. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा यांस दुःखवस्याचीं वस्त्रें राजश्री नाना रवाना करणार, त्यास राजश्री बाळकृष्णपंत भाऊ यांस तुम्हांस जावें लागतें म्हणोन आज्ञा केली. भाऊंनीं उत्तर केलें कीं, भाऊ गेले. याउपरांत भाऊंचे जागां आपण वडील आहां याप्रों तिकडून पत्रें येतात. त्यास विना सरकारची फौज तोफा गाडद व शिंदे यांजकडील पलटणें दोन कुचें करून दहा बारा कोसांवर गेल्याखेरीज मी जात नाहीं. तेथ जाऊन त्यांस काय सांगावें ? दुःखवटाच पाठवावयाचा असल्यास दुसरा कारकून हरकोणी गेला असतां जाऊन येईल. नानानीं सांगितलें कीं, फौज तों रवाना एक दोन दिवसांत करितों. तुमचें जाण्याचें कारण सर्वांचें चित्त एकविचारें करून यावें हेंच कारण

आहे. 'उत्तम आहे. परंतु फौज निघाल्याखेरीज अगोदर मला रवाना करूं नये' याप्रों (भाऊनीं) उत्तर केलें. फौजेची रवानगी होते. नानांकडून नेट फार आहे. राजश्री गणपतराव पानशे यांस ताकीद जाली. खर्चास देतांच निघावयाचा विचार केला. सरंजाम तोफांचा करूं लागले. विठल शिवदेव विंचूरकर व राजश्री नीळकंठराव रामचंद्र तोफखानेवाले वगैरे व आणखी पांच चार पागांची नेमणूक जाली आहे. लौकरच निघतात. कूच होतांच विनंती लिहितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१५३ श्री. ( आश्विन शु० १४–१२ आक्टो. )

पै॥ छ० २० जमादिलावल. सन मय्या तैन व अल्लफ.

सेवेसी येसाजी गोविंद. कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० १२ जमादिलावल मंदवार मु॥ ठाणें तडस वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर राजश्री धोंडोपंत गोखले हानगलास होते, त्यास तिकडे इंग्रज समीप सरदेस आले व श्रीमंत भाऊसाहेबांचें वर्तमान आलें. त्यावरून कूच करून बंकापुरास येऊन पुढें धारवाडाकडे तडसावरून जाणार म्हणोन पुढें मुकामाची जागा पहावयास स्वांर आले. इकडे आलीयास खराबी होईल, करितां कारकून पाठविला. तेव्हां हे मार्गें येऊं नये म्हणोन विनंती त्यांस केली. तेव्हां एक दिवसाचे चंदीचा खर्च देणें म्हणोन दीडशें होन धारवाडी दरबार खर्च सुद्धां द्यावे लागले ! तेथून कूच करून सावनुरास जाऊन शहरांत मुक्काम करून राहिले आहेत. सावनूर तालुक्यास चिठ्या केल्या. तूर्त दोन लाख रुपये खर्चास मागत आहेत. व तालुक्यांची जप्ती करावयाची पत्रें पुण्याचीं गोखले यांस आलीं आहेत, त्यास तूर्त दोन लाख रुपये घ्यावे, नंतर जप्तीही करावी, या मनसब्यांत आहेत. काय करितात पहावें. सरंजामाचे तालुक्यास घासदाणाही घेणार याप्रमाणें बोलत आहेत. काय घडतें पहावें. हुबळीस राजश्री गणपतराव काका वगैरे आहेत त्यांस लागूंकडून खर्चास पावत नाहीं. तेव्हां तेथून गेले असतां जुनेहुबळीकर पेठ लुटतात आणि चोंहींकडे दंगा करितात. पूर्णय्याचा चिरंजीव इंग्रजांबरोबर आहे. सात आठ पलटणें मुंडगोडाजवळ व हालीहाळ सामराणीस उतरलीं आहेत. सावनुराहून गोखले यांची कही तरी नित्य तालुक्यांत येतच आहे. कुडलगीकर व सोमणकोपकर जमीदार मोवास होऊन स्वाऱ्या करीत आहेत. तडसचीं चारपांच गांवचीं गुरें नेलीं. नित्य उपद्रव चालला आहे. जदीद प्यादे पाऊणशें व गांवगन्नासुद्धां शंभर ठेविले आहेत. परंतु परिणाम पुढें दिसत नाहीं. वाघ व

कित्तुरकर एक जाहले. त्यांचा उपसर्ग लागलियास मग कोठें जावयासीदेखील स्थळ नाहीं. इंग्रज चार पांच कोशीं आहेत, परंतु त्यांचा उपद्रव कांहीं तूर्त दिसत नाहीं. पुढें काय होईल तें होवो. प्रांत बहुतकरून उजाड. त्यांत दंगा. पैशास ठिकाण नाहीं. सेवेसीं श्रुत होय कृपा करावी हे विज्ञापना.

नं. ५१५४ ( आश्विन शु० १४-१२ आक्टो.)

बाळकृष्ण लक्ष्मण लागू यांजकडून पत्र मिरजेस. रवाना छ० १२ जमादिलावलचें—

"इंग्रज शिकारपुरावर कांहीं आहेत. कांहीं हल्याळ सांबराणी सुंदें प्रांतीं आहेत. जमाव फार आहे. आपले राज्यांत स्वस्थ आहेत. आम्ही कारकून ( त्यांजकडे ) नेहमीं ठेविला आहे. वरचेवर फर्मास वगैरे सरंजाम पाठवून स्नेह राखिला आहे."

नं. ५१५५ श्री. ( १२ आक्टोबर. )

पै॥ छ० १५ जमादिलावल. मय्यातैन व अल्लफ.

सेवेशीं धोंडो बापूजी व मोरो आपाजी परांजपे सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ आश्विन शु॥ १४ पावेतों वर्तमान सेवकाचें यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळाजी कृष्ण, बाया शिंदे यांजकडील, पेशजी श्री पंढरपुराकडून वगैरे दंगा भारी करीत होता तो हल्लीं बाया तळेगांवापाशीं आहेत त्यांचे समीप दोन कोसांवर उतरला. पारनेराकडे शिंदे यांजकडील पलटणें चार पांच, बैल चारणीस गेलीं होतीं त्यांपैकीं पलटणें बाळाजी कृष्ण याजवर आलीं. चार कोस अंतरानें राहिलीं. हें वर्तमान बाळाजी कृष्ण यास कळलें कीं पलटणें आपल्यावर येतात. परंतु बायांचें व शिंदे यांचें सख्य होत आहे, पलटणें येऊन काय करणार ? हें चित्तांत आणून स्वस्थ होते. आश्विन शु॥ १० प्रहररात्र पलटणानीं येऊन बाळाजी कृष्ण याचे गोटानजीक येऊन गोळे मारिले. छऱ्यांचे गोळे मारिले. गोटांतील लोक दिशेकडे गेले होते. कांहीं गोटांत होते. प्रातःकाळ. समय संभाळून निघावयास अवसान राहिलें नाहीं. कंपूनें मारगिरी भारी केली. बाळाजी कृष्ण शेंदीडशेंनिशीं पळाले. बाळाजीचा गोट लुटला गेला. नंतर एकादशीस बक्षी व पठाण व बाळाजी कृष्ण यांजकडील जमाव पलटणांवर जाले. लढाई भारी जाली. पलटणवाले दोन चारशें जाया जखमी व मृत्यु पावले. दुसरीं पलटणें समीप होतीं तीं त्यांस येऊन मिळालीं नंतर उभयतां सांभाळून राहिले. मग बाया शिंदे याणीं तळेगांवाहून कूच

व धोंडीबा रवाना जाले. कोणीकडून तंटा कळ माजली हें पुर्तें समजण्यांत आलें नाहीं. आल्यावर मागाहून लिहितों. कळावें. राजश्री बाळोबातात्यांस हें कांहीं ठाऊक नाहीं. आणि निखालसता आहे. अलिजाबहादूर ही ऐसेंच म्हणतात. परंतु लोकानीं तर्क विना यांचे इतल्लयाखेरीज पलटणवाले येऊन कटकट करतील असें होणार नाहीं हें लौकिकांत लोक बोलतात. बाया रुसोन चालल्या. पूर्वस्थितीस राजकारण येतें. प्रजेचा संहार जाला. चुकोन राहिली त्यांचा याउपर नाश ईश्वरें मांडला आहे ! श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१५६ श्री. ( आश्विन व० १–१४ आक्टोबर. )

पै॥ छ० १४ जमादिलावल. सन मय्यातैन. आश्विन.

[१]सेवेशीं विज्ञापना. राजश्री नागोपंत आपा यांजकडे भाऊसाहेबां-कडील तोफा दोन आहेत त्याजविशीं हुजूरचें आज्ञापत्र व हुजरे गेले; याजविशीं आपांकडील कारकुनानें मनाईविशीं विनंती केली. मनाईची आज्ञा जाली. फिरोन आणखी तोफांविशीं आणखी आज्ञापत्र व हुजऱ्या रवाना जाला. तोफा हुजूर आणविणेंचा आग्रह पडला आहे. कित्तूरकर देसाई यास वंटमुरीकर देसाई याची कन्या × × त्यास कित्तूरकरांकडील कारकून संधाना-करितां आणविणें विशीं नागोपंत आपांकडील कारकुनास "पत्रें देतों. पाठवून संधान आणविणें"ची आज्ञा जाली. कित्तूकर देसाई याचे पत्रांत "वंट-मुरीकर देसाई याणीं व नागो शामराव याणीं हुजूर विनंती केली त्यावरून आज्ञापत्र सादर जालें असे. तरी पेशजीच्या कराराच्या यादी व तुम्हांकडील कारकून पाठवून देणें. उभयतांच्या विद्यमानें तुमचा बंदोबस्त केला जाईल." याप्रमाणें पत्रांत मजकूर आहे व एक वंटमुरीकर देसाई यांस पत्र. नागो-पंत आपास पत्र, येणेंप्रमाणें पत्रें लिहून दिलीं आहेत. काय घडतें पहावें. सुरा-पूरकर यांजकडील कारकून आले आहेत त्यांचे बोलणें 'पेशजी आपणा-कडील फौज कुमकेस रवाना केली त्या फौजेस महाराजांकडील थोडी बहुत फौज आडवी जाऊन घेऊन यावें तें न जाहलें. आपणाकडील फौजेचा निभाव मार्गामुळें न जाहला. सबब फौज माघारी गेलीं. त्याबद्दल चाळीस हजारांचा पेंच आपणावर पडला तेवढे पैसे उलगडून यावे आणि पुढें खर्चास द्यावें म्हणजे फौज व पायदळ कुमक घेऊन येतों असें बोलणें आहे. त्यास इकडील अर्थ ऐवज देणेंचा कळतच आहे ! तेव्हां तिकडीलही

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नागोपंत कारकुनाचें बाळासाहेबांस.

कुमक येणें ताही विचार तसाच आहे. नाद मात्र आहेत. हल्लीं पुण्यास पत्रें श्री॥ राजश्री बाजीरावसाहेब व नाना व चक्रदेव व गोपीनाथ दीक्षित (कर्वे) व बजाबा शिराळेकर व वामनराव गोखले व रघुनाथ भट वैद्य इतके मंडळीस पाठविलीं. त्यांतील सारांश "आपणाकडून आगळीक नाहीं. हुजूरचें लक्ष प्रधानपंतांचे ठायीं आहे. त्यांत दुसरा विचार नाहीं. तिकडील वाका गैरवाका समजाविल्यास ध्यानांत नसावा." नानांकडील ऐवजाची निम्मी तरतूद करून राजश्री बळवंतराव खांडेकर याची रवानगी करावी या बेतांत णाहेत. परंतु ऐवजाची तरतूद अद्यापि नाहीं, जानराव जाधव यास खांडेकर याजबरोबर पाठविणार. श्रीमंतांस वगैरे मंडळीस वस्त्रेंहीं जाधव याजबरोबर पाठविणार. धोंडीबा वाघ याचीं पत्रें मनोळीहून आलीं होतीं त्यांतील मजकूर आपणास हुजूरची आज्ञा असावी म्हणजे माझ्यानें जितका उद्योग होईल तितका करीन. त्याचे पत्राचा जाब जाला. त्यांतील मजकूर कीं, "तुम्ही हुजूरच्या सेवेशीं येणें. आलेवर तुमचे मनोदयानुरूपच तुमचा बंदोबस्त करून दिला जाईल. तुम्ही बिनदिक्कत सत्वर यावें." याप्रमाणें उत्तर गेलें. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५११७ श्री. (आश्विन व० १–१४ आक्टो.)

पै॥ छ० १७ जमादिलावल. सन मय्यातैन व अलफ. आश्विन.

सेवेशीं बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना तां॥ छ० १४ जमादिलावल पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ० ७ जमादिलावलचीं पत्रें पाठविलीं ती छ० १२ मीनहूस पावलीं. लिहिलें वृत्त साविस्तर कळलें. श्री॥ राजश्री नाना व बाळोबा तात्या या उभयतांनीं करवीरकरांच्या पारिपत्याविशीं नेट स्वामींच्या मनोदयानुरूपच धरिला आहे. वर्तमान ऐकतांच सरंजाम पोंचावा, परंतु उभतां स्वतंत्र नाहींत याजमुळेंच दिवसगत. इतःपर दिवसगत लागों नये या बेतानेंच तयारी होत आहे. स्वामींनीं फौज जमविण्याविशीं ढील करूं नये. हल्लीं फौज ठेवणें ती खातरजमेची जमवावी याप्रमाणें (नाना व तात्या यांचें) बोलणें वारंवार पडतें. यास्तव फौज जमविणें ती रुबरू घोडें राऊत पाहून जमवावी. तसेंच पायदळ. येथील सरकारचा प्रकार बोढीचा. कोणत्या कारखान्यामध्यें हुशारी राहिली असा अर्थ नाहीं. त्यांत नाना जलदीनें रवानगी होण्याची कस्त करीत आहेत. याच अन्वयें बाळोबा तात्यांचीही जलदीच आहे. तात्यांनीं पत्राचें उत्तर दिलें तें पाठविलें

आहे. सरंजामाच्या नेमणुका जाल्या त्याची याद काल पाठविलीच आहे. तोफखान्याकडील बैल चारणीस आहेत ते आणावयास पाठविले आहेत. दोन चार रोजांत येऊन पोंचतील. तेथील मात्र सर्वांचा येकदिल ठेवावा याविशीं वारंवार लिहित आहें. उत्तरेंही लिहिल्या अन्वयें येतात, परंतु आपआपल्या फौजेचा जम पाडावा तों अद्यापि पडत नाहीं; याप्रमाणें येथें बातम्या येतात. भाऊ सरकार कामावर खर्च जाले असतां आजपर्यंत स्वस्थ मंडळी बसली हेंच आश्चर्य करितात. तेव्हां एकदिल नाहीं असे अंदेश येथेंच घेतात. स्वामींस सविस्तर इकडील कळावें म्हणोन विनंती लिहिली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१५८ श्री. ( आश्विन व० ३–१९ आक्टोबर. )

पै॥ छ० २० जमादिलावल. मय्यातन व अल्लफ.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० १९ जमादिलावलपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं तीन पत्रें पाठविलीं तीं पावलीं व राजश्री मोरोपंतास पत्रें पाठविलीं तीं पाहून सविस्तर मजकूर श्रीमंत नानांस विदित केला. श्रीमंत नानांस पत्रें दोन पाठविलीं त्याचीं उत्तरें घेऊन पाठविलीं आहेत त्यावरून सर्व अर्थ निवेदन होईल. कडवें माणूस तिकडे नसल्यास सेवकास लिहून यावें म्हणजे हजार आरब व दोन हजार स्वार खासे पठाण वगैरे करार करून रवाना करितों. सरकारचे फौजेची मार्गप्रतीक्षा करीत बसल्यास मसलत शिथिळ पडते. याकरितां सर्व सरंजाम चांगला करून महाराजांस भाऊसाहेबांमागें हात दाखवावा हाच नक्ष ! आजपावेतों सर्व राज्यांत लौकिक तसा नक्ष राहे तो विचार आधीं करावा. सर्वांचें चित्त एकरूप जालें असतां चिंतिलें काम सिद्धीस ईश्वर नेतो असा प्रकार आहे. येथून लोक पाठवावयाची मर्जी असल्यास एक महा खर्चाची बेगमी करून पाठवावी. आज्ञा येईल त्याप्रों फौज आरब रवाना करीन. आतां सरकारांत व श्री॥ राजश्री नानांस पत्र येणें तें नक्षाचें यावें विशेष काय लिहूं ! सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री॥ राजश्री दादासाहेबांस व आपासाहेबांस शिरसा॥ नमस्कार विज्ञापना. सविस्तर वडिलांस लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. दिवसगतीवर घालूं नये. भाऊसाहेब कैलासवासी जाहले. सूड घेतला ही

---

१ नानांचा विश्वासू कारकून. उपनांव वाळ. वास्तव्य कल्याण.

मार्गप्रतीक्षा करीत आहेत ती सर्वांनीं एकचित्त होऊन सिद्धीस न्यावी तरच मागें राहिल्याचें सार्थक ! विशेष सूचना काय लिहूं ! हे विज्ञापना.

नं. ५१५९ ( आश्विन व० ३–१६ आक्टो. )

बाळकृष्ण लक्ष्मण लागू यांचें पत्र मिरजेस. रवाना छ० १६ जमादिलावलचें.

"धोंडोपंत गोखले फौज सुद्धां सावनूर तालुक्यांतील हनगलास होते तेथून श्री॥ भाऊसाहेब यांचें वर्तमान ऐकतांच कूच करून सावनुरास येऊन राहिले आहेत. आंम्हांस दोन चार पत्रें पाठविलीं कीं सावनूर तालुक्याचा बंदोबस्त राहून पुढील मसलतीचा विचार करावयाचा आहे. तरी तुम्ही कोणे गोष्टीचा अंदेशा न धरितां भेटीस यावें. मी टाळाटाळ करीतच आलों. परंतु त्यांची सांगणी आली कीं तुम्हीं न आलां तर मीच येतों ! तेव्हां न गेलें असतां मुक्काम पुढें आलियास प्रांताची खराबी होते हें समजून भेटीस आलों. आठ चार रोज कांहीं एक बोलले नाहींत. भाऊसाहेब यांजविषयीं श्रमी होऊन त्यांची स्तुति व तिकडे जावयाविशींचे जाबसाल बोलत होते. इतक्यांत पुण्याहून श्रीमंतांचें पत्र त्यांस आलें कीं, "भाऊ यांची फौज फरारी जाली. खाशांचें ठिकाण नाहीं. तरी फौज फरारी जाली ती जमा करून बारीच्या तोंडीं तालुक्याचा बंदोबस्त राखोन महाराज यांचा पाय कर्नाटकांत न शिरेल तें करून राहणें." त्यावरून "खर्चास पाहिजे, देणें, नाहीं तर (सावनूरच्या महालांच्या) सोडचिठ्या देणें. ऐसें न जालियास कळेल त्याप्रमाणें करितों." ऐसीं कडोविकडीचीं बोलणीं पडों लागलीं. तेव्हां जितका प्रयत्न तो करून पाहिला. परंतु एकच धरून बसले. आज पैका नाहीं म्हणावें तर महाल जातात. तेव्हां दीड लक्ष रुपये कबूल करणें प्राप्त जालें. सरंजामी तालुक्यांवर झाडून रोखे जाले आहेत. त्यांचें म्हणणें कीं, कोण बोलणार न येई त्याचे भेटीस आपण फौजसुद्धां जातों ! तेव्हां पुढें परिणाम कसा लागतो ? लक्ष्मेश्वरास पंचवीस हजार रुपये मागतात. नाहीं तर मुक्कामास येणार ! एक मुक्काम म्हटलें असतां सहजांत पांच हजार रुपयांचें कडें (?) होतें. उपाय नाहीं. आज चार वर्षें यांगीं संबंध पडला आहे. या देशीं यांची इभ्रत फार बाळगितात. चार कोसांवर मुक्काम आला असतां गांवांत वस्ती रहात नाहीं ! सर्व पार करणार स्वामी आहेत. साल मजकुरीं दोन महिने मात्र दंग्याचे दिवस पाहिले नव्हते तों ईश्वरें आणखी आणिले आहेत."

नं. ५१६० श्री. ( आश्विन व ० ४-१७ आक्टोबर. )

पै॥ छ० २० जमादिलावल. मय्यातैन व अल्लफ.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव. विज्ञापना ता॥ छ० १७ जमादिलावलपावेतों वर्तमान यथास्थित असे- विशेष. श्री॥ भाऊसाहेब कैलासवासी जाहले. राजश्री रामचंद्रपंत आपा व हरिपंत बाबा व दाजी मिरजेस आले आहेत त्यांचीं पत्रें श्री॥ राजश्री नानांस आलीं कीं, " वडिलांचे मागें वडील आपण आहेत त्याअर्थीं सरकारांतून फौज व तोफखाना व शिंदे यांजकडील फौज व पलटणें लौकर रवानगी करितील. आम्ही सरंजामासुद्धां चाकरीस सिद्ध आहों. वडिलांचा सूड घेतल्याशिवाय सोडीत नाहीं." याप्रों दोन पत्रें आलीं त्यावरून श्रीमंत नाना फौजेचे व तोफखाना निकडीनें रवानगीचे तरतुदेंत आहेत. सरकारांत पैक्याचा अर्थ नाहीं यास्तव चार दिवस अधिक उणे लागतात. आपासाहेबांची उमेद कशी आहे, फौज किती जमा केली, पैक्याची तरतूद कशी काय केली आहे, याचा अर्थ पत्रीं लिहून आला नाहीं. येथें कर्णोपकर्णीं ऐकण्यांत 'फौज दूर केली. पुढें ठेवीत नाहीं. पैक्याची सोय नाहीं त्याअर्थीं स्वस्थ बसले आहेत. सरकारांतून राजश्रींचा बंदोबस्त जाहल्यास उत्तम. नाहीं तर काय घडतां घडेल तें घडो !' त्यास जर करितां लिहिल्याअन्वयें अवसान सोडलें असल्यास आपणांस व दादांस मसलत कबूल करणें प्राप्त जाली. वडिलांचा लौकिक राखिला पाहिजे. यास्तव याचा विचार पत्र पावतांच होऊन राजश्री चिंतामणराव आपांची गोडी करून घ्यावी. दादा व आपा व नारायणराव याणीं फौज नामी जमा करून डेरेदाखल होऊन तयारी सत्वर व्हावी. मसलत शेवटास न्यावी. राजश्रींचा प्रांत आहे व सरकारचे महाल आहेत त्यांपासून पैका घ्यावा आणि फौज चांगली सत्वर ठेवून फत्ते करावी. सरकारचा सरंजामही सत्वर येतच आहे. भाऊसाहेबांचे मागें दहा दिवसांत एक दोन लढाया जाहल्याचें पत्र सरकारांत व नानांस यावें तें कांहींच आलें नाहीं ! असो. आतां तरी सर्व तयारी करून राजश्रींची गांठ घालावी तरच मागें राहिले सरदारांचें सार्थक ! आपण व दादा व चिंतामणराव यानीं ही मसलत करावी हें श्री॥ राजश्री नाना स्वामींचें चित्तांत नाभीपासून आहे. सरकारचाही रुकार येईल. परंतु आपा थकले अथवा पैका नाहीं यास्तव टाळाटाळ करीत असल्यास सिद्धांत पक्केपणीं करून पत्राचें उत्तर सत्वर यावें. मुजरद गडी याच कामाकारितां पाठविला आहे. जलदीस

मोल आहे. नानांचे पत्राचे जाब मागाहून लवकरच पाठवितों. इतका प्रकार सेवक लोकानीं लिहूं नये, परंतु मसलत लांबत चालली. पूर्वीचा नक्ष रहावा, यास्तव विनंती पत्र सेवेशीं लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री॥ राजश्री दादासाहेबांस शिरसा॥ नमस्कार विज्ञापना सविस्तर श्री॥ राजश्री बाळासाहेबांस विनंती लिहिली आहे. विदित होईल. सारांश नक्ष होईल तो प्रकार घडावा. उभयतांस लौकिक रक्षणें प्राप्त, या अर्थी चिंतामणराव यांची खातरजमा आपण करून समेट करून घ्यावा. आणि सर्वांनीं एकचित्त होऊन राजश्री समीप आले आहेत त्यांस हात दाखवावा. पत्रांचें उत्तर अतिसत्वर यावें हे विज्ञापना.

नं. ५१६१ ( आश्विन व० ५–१९ आक्टो. )

मोरो आपाजी परांजपे यांचें पत्र मिरजेस रवाना छ० १९ जमादिलावलचें—

"बाया शिंदे यांजकडील बाळाजी कृष्ण यांस पलटणवाल्यांनीं लुटलें याजमुळें बाया रुसोन गेल्या होत्या त्यांची समजी जाली. एक मजल माघाऱ्या आल्या. एक दोन दिवशीं खडकीवर मुक्काम येणार. (करवीरकरांच्या पारिपत्यार्थ) इकडून फौज तोफा व शिंदे यांजकडील फौज तोफांच्या रवानगीची तरतूद होत आहे. नानांस मोठी काळजी आहे. लवकरच फौज निघेल. शिंदे यांजकडील फौज व फलटणें निघतात. श्री॥ राजश्री नानानीं पूर्ववत् प्रमाणें कारभार करावा याप्रमाणें शिंदे यांजकडील कारभारी सरकारांत बोलतात. निकडही आहे. आंतून विचार होत आहेत. काय ठरतें तें पहावें."

नं. ५१६२ ( आश्विन व० ६–२० आक्टोबर )

मोरो आपाजी परांजपे यांचें बाळासाहेबांस पत्र. पै॥ छ० २० जमादिलावलचें.—

विज्ञापना ऐसी जे, म्हसू काकडा याजबरोबर पत्रें पाठविलीं आहेत त्यांत बाया शिंदे यांजकडील बाळाजी कृष्ण यास कंपूकडील पलटणांनीं लुटलें, त्यावरून बाया कूच करून रुसून गणेगांव वाघोल्यास गेल्या, समजीकरितां राजश्री सदाशिव मल्हार व धोंडीबादादा गेले आहेत, म्हणोन विनंती लिहीलीच आहे. त्यास राजश्री सदाशिव मल्हार बायांकडे जाऊन विनंती केली कीं, " पलटणवाले यांची व बाळाजी कृष्ण यांची चुरस मागेंपासून आहे. हल्लीं मिसळीकरितां[1] कटकट जाली. त्यास हा कजिया

---

१ कोणी कुठें उतरावें याबद्दल.

लाबला. राजश्री दौलतराव यांणीं शपथपूर्वक मला सांगितलें आहे. उभयतां चाकर आपले. आपण व दौलतराव बाबा भिन्न नाहीं. ज्यांकडे अंतर पडलें असेल त्यांचे पारिपत्य आपण रुबरू करावें असें दौलतराव बाबानीं सांगितलें आहे व पत्रींही लिहिलें आहे." ज्या पलटणवाल्यांनीं काजिया केला होता त्या दोन असामींस बायांचे रुबरू नेलें. त्यांणीं टोप्या काढून अर्ज केला कीं आपण पारिपत्य करावें. धणी आपण. बाळाजी कृष्ण यांणीं आम्हासीं कटकट केली. याप्रमाणें समजुतीच्या गोष्टी सांगितल्या. कराचल्या पुढें ठेविल्या. नंतर बायानीं सांगितलें कीं, याउपर कटकट केली असतां कार्यास येणार नाहीं. राजश्री बाळोबातात्यानीं निखालसपणाचीं पत्रें पाठविलीं होतीं त्यावरून खातरजमा होऊन समजी जाली. सदाशिव मल्हार व धोंडीबादादा माघारे आले. बाया कूच करून एक मजल माघाऱ्या आल्या. एकदोन दिवसांत पांच चार कोसीं येतील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२६३ ( आश्विन व० ६–२० आक्टो. )

मोरो आपाजी परांजपे याचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र. पै॥ छ० २० जमादिलावलचें––

"चिंतामणराव आपानी नानांस पत्र लिहिलें होतें कीं, भाऊसाहेब कैलासवासी जाहले त्यांमागें आम्हांस वडील बाळासाहेब. ते मला आज्ञा करितील त्यास आपण मान्य आहों. दुसरा विचार नाहीं. नानानीं उत्तर केलें कीं, 'सर्वोपरी उत्तम. याप्रमाणें बुद्धि जाहली असल्यास सर्वोपरी चांगली. पुढें मसलत उभी राहिली हे सिद्धीस न्यावी. नंतर घरकलहाचा विचार समजावयास येईल.' मजपाशीं नाना बोलिले कीं, 'चिंतामणराव यांचें पत्र निखालसपणाचें याप्रमाणें आलें आहे. असें असिलें तरी फार चांगलें' म्हणोन सांगितलें. त्यास विचार याचा तूर्त प्रसंगीं तेथें कसा चालिला आहे, बोलण्यामध्यें एकीचा विचार कांहीं आहे किंवा पहिल्याप्रमाणेंच बेताल बोलणीं पडतात हें लिहावें."

नं. ५२६४ श्री ( आश्विन व० ६–२० आक्टो. )

पै॥ छ० २० जमादिलावल. मय्यातैन व अलफ.

सेवेसीं मोरो आपाजी साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसी जे, श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा यांचीं पत्रें श्री॥ राजश्री पंतप्रधान यांस व श्री॥ राजश्री नानांस उमेदीचीं आलीं कीं, वडिलांचा सूड घेतल्याखेरीज सोडीत नाहीं. सरंजाम फौज तयारी करीत आहों. सरकारांतून फौज तोफा लौकर

रवाना व्हाव्या. शिंदे यांजकडील पलटणें फौज यावी याविशींही लिहिलें. राजश्री बाळोबातात्या यांसही पत्रें लिहिलीं होतीं. त्यावरून श्री॥ राजश्री नानानीं खटपट करून फौज तोफांची तरतूद केली. लौकर निघतील असा येथील प्रकार आहे. शिंदे यांजकडील हजार फौज तीन पलटणें निघावयाची तरतूद बाळोबातात्यानीं केली आहे. त्यास हल्लीं दोन चार दिवस पुण्यांत कर्णोपकर्णी लोक बोलताल कीं, रामचंद्रपंत आपा याणीं अवसान सोडिलें. फौज मोडांतील आली त्यांस निरोप दिला, पुढें फौज ठेवीत नाहीं. तरतुदे-विशीं वगैरे कांही एक बोलत नाहींत. याप्रा येथें तहकीक लोक बोलतात. त्यावरून हल्लीं राजश्री बाळकृष्णपंत भाऊ यानीं विनंती पत्र लिहिलें. जर करितां त्याणीं पुढील उद्योगाचा विचार सोडला हे गोष्ट तहकीक आहे, तरी मग श्री॥ राजश्री दादासाहेब व आपण याचा विचार करावा. स्वामींजवळ पैका नाहीं हें तो खचीत. परंतु प्रसंगही तसाच आला आहे. जर करितां हे समयीं महाराजांची मसलत जाहली नाहीं तरी वडिलांचा लौकिक कसा राहतो ? दादासाहेब याणीं सर्वस्वें मसलत कबूल केली पाहिजे. श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा यांचा आपला एक विचार दादानीं बोलोन करावा. तूर्त वांटणीचा वगैरे कांहीं येक खटला घालूं नये. फौजेत निघावें. श्री॥ राजश्री नारायणरावसाहेब याणीं एक विचारें असावें. दादासाहेब याणीं सर्वांस सांभाळावें. पैका मसलतीस कोणाजवळ नाहीं. तशांत दादासाहेब यांचा आब आहे. त्यांणीं कांहीं पैक्याचा विचार पहावा. कांहीं पैका वडिलीं सरंजामाचे महालांपासून सालमजकूरजे ऐवजीं घ्यावयाचें करावें. आज-पावेतों महालांपासून रसद घेतली नाहीं त्याचें कारण घरकलह लागला आहे यास्तव घेतली नाहीं. हल्लीं श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा यांची समजी जाली तरी रसद घ्यावी. न समजी जाली तरी मसलतच कबूल करणें जाहल्यास रसद घ्यावीच लागेल. हल्लीं ( बाळकृष्णपंत ) भाऊनीं इकडे लौकिक खबर ऐकिली त्यावरून पत्र लिहिलें आहे. दादासाहेब व आपण मसलत कबूल करितात असा अर्थ जाहला तत्रापि तासगांवकर यांचें चित्त दुखवावयाचें नाहीं. त्यांसही मसलतीमध्यें घेऊन एकविचार कारभार व्हावा. सरकारांतून स्वामी म्हणनील त्याप्रों श्रीमंतांकडील व नानांकडील रुकार येईल. गुंता नाहीं. याचा विचार दादा व आपण एकांतीं करून पत्राचीं उत्तरें खंबीर करून खचीत यावीं. आपलें स्वदस्तुरचें व दादासाहेब यांचें पत्र श्री॥ राजश्री नानांस व श्रीमंतांस यावें, त्याप्रमाणें येथें करार मदार ठरोन येईल. हेंच पत्र

श्री॥ राजश्री दादासाहेब यांस मर्जीस आल्यास दाखविल्यास चिंता नाहीं. उत्तर लौकर यावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१६५ श्रीगणपतिर्जयति. ( आश्विन व० ८–२२ आक्टो.)

नक्कल.

तीर्थस्वरूप राजश्री दादासाहेब व आपासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें चिंतामणीनें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० २२ जमादिलावलपर्यंत सुखरूप असों. विशेष. ती॥ राजश्री गंगाधरराव काका यांजमध्यें व आम्हांसी गृहकृत्याविशीं व सरदारी वगैरेविशीं खटला पडला. त्याजवरून आपण उभयतां वडिलानीं आज्ञा केली कीं, आम्ही उभयतां सांगों तें उभयतानीं मान्य करून खटला तोडावा. त्याजवरून आम्ही विचार करितां गृहकृत्याचा खटला लांबवणें चांगलें नाहीं. याजकरितां उभयतां तीर्थस्वरूपानीं तीर्थस्वरूप कैलासवासी भाऊसाहेब यानीं याद ठराविली आहे त्याअन्वयें विचार करून आज्ञा करावी. त्याप्रमाणें मान्य करीन. सुरुसन मय्या तैन व अल्लफ. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५१६६ श्रीगणराज. ( आश्विन व० ८–२२ आक्टो.)

चिरंजीव राजश्री रघुनाथराव दादा व रामचंद्रपंत आपा यांसीं प्रती गंगाधर गोविंद. आशीर्वाद उपरी. चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपामध्यें व आम्हांमध्यें गृहकृत्याविषयीं विभागाचा खटला पडला, त्यास उभयतांसही आज्ञा करणार तीर्थस्वरूप भाऊसाहेब होते. त्यांची आज्ञा उभयतांसही मान्य. वडिलांचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं असेंच म्हणणें होतें. परंतु ईश्वर इच्छेकरून वडील कैलासवासी जाहले. यास्तव तुम्हीं उभयतां वडिलांचे स्थळीं मानून तुम्ही पूर्वापार विचार करून घर वांटणी व सरंजाम वगैरे येविशीं सांगाल त्याप्रमाणें आम्ही मान्य असों. छ० २२ जमादिलावल. आश्विनमास. सिद्धार्थी नाम संवत्सर. सन मय्या तैन व अल्लफ. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नं. ५१६७ श्रीगणराज. ( २५ आक्टोबर.)

पै॥ छ० २ जमादिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें गणेशानें दोन्ही कर जोडून सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत आश्विन वद्य १२ पावेतों मु॥ नवी हुबळी येथें वडिलांचे आशीर्वादें करून सुखरूप आहे. जुने हुबळीचा तह रा॥ धोंडोपंत गोखले यानीं कर-

विला. त्यांचीं तीन खेडीं अदरगुची, छबी, कुर्डीकिरें हीं रा. बाळकृष्णपंत-भाऊंकडे होतीं तीं देविलीं. येथील स्वांर पायदळ आहेत हे येथें ठेऊं नये याप्रमाणें गोखले निकड करितात. येथून स्वांर पायदळसह करजगीकडे जावें असें बाळकृष्णपंत यांचें पत्र आलें. अमावास्या करून जावें लागेल किंवा कसें होतें पहावें. आपणाकडील फौजेचा भरणा भारी जाहल्याविना इकडील गृहस्थांस दबाव बसत नाहीं. पुण्याकडील किंवा राजश्री बाळोबा तात्यांकडील पलटणें येत असलियास ठीक आहे. नाहींतर इकडील बंदोबस्त करावयाची सोय वडिलीं केली पाहिजे. सावनूर तालुका व सरंजामी आपणाकडील महाल मिळून अडीच लक्ष रुपये तूर्त गोखले यानीं घ्यावयाचें ठरविलें आहे. महिना दोन महिने तिकडील सुमार पाहून आणखी कांहीं घ्यावयाचा सुमार आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१६८ श्री. (आश्विन व० १३—२६ आक्टो.)

छ० १२ जमादिलाखर सन मय्यातेन व अल्लफ. कार्तिकमास.

राजश्री गंगाधररावजी गोसावी यांसी. सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य.

स्नेहांकित दौलतराव शिंदे. दंडवत. विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. ती॥ मातुश्री बायांकडून कसबे भाळवणी येथें वसुलाकरितां राजश्री जयराम बाबूराव सरकारची पागा घेऊन गेले होते. त्यास आलसंदकर यांचें समजाविल्यावरून राजश्री चिंतामणराव याणीं मशारनिल्हेस पागेसुद्धां धरून नेऊन अटकेंत ठेविले आहेत. ते सोडोन देण्याविशीं पेशजी आपणांस लिहिलें असतां अद्याप मशारनिल्हेची सुटका जाली नाहीं म्हणोन समजलें. त्यावरून हें पत्र लिहिलें आहे. तरी मशारनिल्हेस पागा व चीजवस्त लुटून घेतली असेल त्यासुद्धां माघारी देऊन लष्करांत रवाना करून द्यावें. येविशी दिक्कत न पडावी. ( आम्हांकडून ) राजश्री गोपाळराव हरि आले आहेत ते सांगतील. रवाना छ० २६ जमादिलावल बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

मोर्तब
सूद

श्री
जोतिस्वरूप च
रणीं तत्पर माहाद
जी सुत दवलत रा
व शिंदे निरंत
* र

नं. ५१६९ श्री. ( आश्विन व० ३०—२८ आक्टो. )

पै॥ छ० २८ जमादिलावल. सन मय्यातैन व अल्लफ.

पुरवणी सेवेशीं विनंती. मोंगलाकडील फौज सुभानखान व सुरतवाला नबाब यांची फौज चांभारगोंदेनजीक मांडवगण आहे तेथून नगर दहा कोस समीप आहे. तेथें राजश्री बाळाजी कृष्ण निसबत शिंदे इकडील प्रांत विध्वंस करून गेले ते तेथें होते. तिकडे ही दंगा फारच केला म्हणोन मोंगलाची फौज गेली. त्यांचें पारिपत्य यथास्थित केलें. बाळाजी कृष्ण याची फौज सारी लुटून फस्त केली. पन्नास लोकांनिशीं मशारनिल्हे पळून बायांकडे गेला. बायांपासोन एक मुक्काम अलीकडे होता. मार्गे कंपूचे लोक त्यास धरावें म्हणोन शिंद्याचे आज्ञेवरून गेले होते. त्यानींही लुटल्यावर सडा पळून बायांचें लष्करांत गेला. उपरांत बाया व पठाण मिळोन कंपूवर चढाई करून गेले. त्यांची यांची लढाई जाहली. कंपूकडील लोक चारपांचशें पर्यंत ठार जाहले. मग कंपूनीं तोफखाना सुरू केला तेव्हां हजार पांचशें पठाण ठार पडले. बायांचा मोड होऊन तळेगांवचे सुमारें दहा पंधरा कोस पलीकडे जाऊन उतरले. पठाणांची फौज बायांस सोडोन गेली. याप्रमाणें वर्तमान एका गृहस्थाचें लिहिलें आलें. सत्य मिथ्या नकळे. आढळलेलें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. तिकडेही पुण्याचें वर्तमान सेवेशीं आलेंच असेल. सुरतवाला नबाब यांस परांड्याचा किल्ला रहावयास दिला आहे म्हणोन वर्तमानही आहे. सुरतवाल्याकडील लोक हजार स्वांर व गाडद परांड्यांत ठाणें बसवावयाकरीतां आले. परांड्यांत किल्लेदार होता तो भागानगरास गेला. किल्यांत कारभारी आहेत. याप्रमाणें इंदापुराहून लिहिलें आलें तें सेवेशीं लिहिलें आहे. विदित होय हे विज्ञापना. सुरतवाला नबाब याजकडे परांड्याचा किल्ला दिला. खेरीज मोहोळ व मंद्रूप दोन्ही तालुके त्याकडे दिले आहेत. अंमलास कांहीं फौज येणार म्हणोन बोलतात. किंवा सनदेवरच जाहल्यास होईलसें दिसतें. विदित होय. हे विज्ञापना.

नं. ५१७० श्री. ( कार्तिक शु० १—२९ आक्टो. )

छ० २९ जमादिलावल. सन मय्यातैन व अल्लफ. कार्तिक शु॥ १ सेवेशीं विज्ञापना. चतुरसिंग याणीं भिलवडीस ठाणें घातलें. पुढें

---

१ पत्र करकंब महालाच्या मामलेदाराचें बाळासाहेबांस मिरजेस. २ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून बाळासाहेबांस.

तासगांवाकडे जावयाची योजना आहे. श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा व बाबासाहेब फौजेंत आहेत, त्यास चतुरसिंगाकडून उभयतां जेथें राहिले आहेत तेथें रातबिरात दगा फटका करावा या बेतांत आहेत. आवई जाण्याची कराडाकडे वगैरे घालून जावें या मनसब्यांत आहेत हें खचित समजण्यांत आलें त्याजवरून सेवेशीं विनंती लिहिली आहे. येविशींची सावधता, बातमी व फौजेंत रात्रंदिवस हुशारीनें राहण्याची आज्ञा व्हावी. नद्याचा गुंता जाण्या येण्यास तूर्त नाहीं. कोणे वेळेस निघतात याची बातमी समजत्ये असा अर्थ नाहीं. यास्तव आगाऊ सूचना लिहिली आहे. सावधते-विषयीं आलस्य तिळमात्र होऊं नये. बागणीकरांस उपद्रव जाहला तेव्हां वीस हजार चवली रुपये ठरले. पुढे इसलामपुरास उपद्रव करणार. कवठें दुधगांव वगैरे येथें मनस्वी उपद्रव करितात. मींहीं विनंती केली आहे. अद्याप उत्तर जालें नाहीं. परभारें लष्करांत बोलणें बोलतात ऐसेंही ऐकतों. तूर्त हिंमतबहा-द्दर खोचीनजीक आहेत. इचलकरंजीवर फौज होती ती मशारनिल्हे बरोबरच आहे. मशारनिल्हे काल सायंकाळीं खोचीहून लष्करांतून करवीरास आले आहेत. इथून मुख्याची स्वारी निघावी अथवा रहावी याचा इत्यर्थ ठर-णार. राजश्री बळवंतराव खाडेकर व जानराव जाधव उभयताची रवानगी पुण्यास दिपवाळी जाहलेवर पंचमी सप्तमीस करणार. चतुरसिंगाजवळ तूर्त पांचशेंपर्यंत सामान चांगलें आहे. पुण्याचीं पत्रें काल आलीं आहेत. वर्तमान समजण्यांत आलें नाहीं. मागाहून शोध करून लिहून पाठवितों. मौजे भडकंबें येथें राजश्री नागोजीराव घाटगे याणीं ठाणें घातलें आहे. मागाहून जाबसाल ठरेल तसें लिहून कळवितों. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री शहाजी निंबाळकर यांजकडे चिकोडी तालुक्यातील गांव करजगें इनाम करून दिल्हा होता तो हल्लीं हुजूरून जप्त केला. निंबाळकर गांव देवणेंबद्दल पांचशें रुपये कबूल जाहले. परंतु गांव सोडिला नाहीं. सबब मशारनिल्हे आपले घरास कोगनोळीस रुसून गेले. राजश्री बळवंतराव खांडेकर यांजकडील पत्रें पुण्यास नानांकडे गेलीं. प्रथम पत्र + + जाहल्याचें गेलें होतें तें वर्तमान कळलें इतकें मात्र उत्तर आलें. त्याजवर पत्रें गलीं दोन वेळां त्यास एक महिना जाला. उत्तरें आलीं नाहींत. हल्ली ' हुजूरची आज्ञा जाली आहे. निघोन येतों ' म्हणोन खांडेकर याणीं पत्र पाठविलें आहे. याप्रमाणें खांडेकर यांचे पत्राचा मजकूर आहे. कळावें हे विज्ञापना.

नं. ५१७१ ( कार्तिक शु० १–२९ आक्टो. )

देवजी कृष्ण देशपांडे यांचें शहापुराहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० २९ जमादिलावलचें—

"धोंडजी वाघ जमावसुद्धां केंचनगुड तर्फ कडोली येथें लढाई जालेवर जाऊन उतरला होता. दोन दिवस तेथेंच मुक्काम होता. येथून आणखी जमाव घेऊन जाऊन छापा घालावयाचा बेत केला होता. परंतु तेथून कूच करून पुढें जाऊन राहिला आहे. कयातीची बाकी कांहीं राहिली नाहीं. राजाज्ञा यांचा मुक्काम माणगांवावर आहे. त्यांची व वाघाची भेट होणार होती. त्यांस यास चार कोशांचें अंतर आहे. उभयतांचाही मुक्काम प्रस्तुत परगणेमजकुरीं आहे. मागाहून पांढर यांचें पथक येणार व दोन चार तोफा येणार. नंतर सर्वत्र येक होऊन सावनूर तालुका व राजश्री धोंडोपंत गोखले यांजवर जाणार असा बेत दिसतो."

नं. ५१७२ ( कार्तिक शु० ३–३१ आक्टो.)

मोरो आपाजी परांजपे यांचें पत्र मिरजेस. रवाना छ० १ जमादिलाखर गुरुवारचें—

"श्री॥ राजश्री नानांनीं राजश्री बाळकृष्णपंत भाऊ यांजपाशीं कांहीं एक मजकूर सांगितला. त्याचा मजकूर विस्तारेंकरून राजश्री बाळकृष्णपंत भाऊ याणीं लिहिला आहे. मुद्दाम गडी श्रीमंतानीं रवाना करावयास सांगितल्यावरून रवाना केला आहे. सारांश गोष्ट मसलतीची त्वरा करावी. मागें पुढें कोणी पाहूं नये. पाहिलें असतां लौकिक यथास्थित रहात नाहीं. याचा विचार लौकर जाला पाहिजे. श्रीमंत भाऊ कैलासवासी होऊन दीड महिना जाला. येथें लौकिक बातमीमध्यें फौज कोणीच ठेवीत नाहीं व विचारही फौज ठेवण्याचा नाहीं. सरकारची कुमक आल्यानंतर मग फौजेची तयारी करावी हीं वर्तमानें श्री॥ राजश्री नानांस कोणी श्रुत केलीं त्यावरून नानांनीं सांगितलें कीं, तुम्ही सर्व मिळोन एकरूप होऊन फौज ठेवून महाराजांचा बंदोबस्त होत असल्यास उत्तम. नाहीं तर उगाच श्रम मात्र कामाचा नाहीं. याप्रमाणें राजश्री गंगाधररावजींस व राजश्री दादांस लिहावें. भाऊंमागें सर्वांस वडील उभयतां. त्याणीं हें करावें यांत लौकिक आहे. याउप्पर मसलत करीत नाहीं तरी लौकिक रहाणार नाहीं. शिंदे यांजकडे नानाप्रकारें बोलतात. यास्तव बिघडली बाजी लौकर सुधरावी."

नं. ५१७३ श्री. ( कार्तिक शु० ३–३१ आक्टो. )

छ० ४ जमादिलाखर. शनिवार. सन मय्यातैन व अलफ.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री राजाज्ञा यांचा मुक्काम कोळींद्रेनजीक शहापूर तालुका येथें आहे. त्या प्रांतीं दंगा मांडिला आहे. धोंडजी वाघ याजवर बेळगांवकर यांचा जमाव येऊन उभयतांची लढाई जाली. बेळगांवकर यांचा जमाव वाघानें मोडिला. प्याद्यांचीं हत्यारें वगैरे लुटलीं गेलीं. गांव खेड्यांची वगैरे खराबी करीत आहेत. किणी कोवाडासही रोखा घासदाण्याचा जाला आहे. कित्तूरकरही जागां जागां जमाव करीत आहेत. राजश्री नीळकंठराव शिंदे काल भौमवारीं करवीरीं आले. महाराज यांजकडे सायंकाळीं गेले होते. हिंमतबहादूर करवीरीं आलेवर तूर्त महाराजानीं स्वारीस निघों नये असें ठराविलें आहे. फौजा मात्र जागां जागां असाव्या. राजश्री जानराव जाधव याची रवानगी पुण्यास व्हावयाची होती त्यास तूर्त मंदीशी दिसते. कारण खंडणीचा ऐवज जमा होतो तो खर्च होतो. शिलकेस रहात नाहीं असा विचार आहे. वंटमुरीकर देसाई याजवर पन्नास हजारांचा रोखा व नेरलीवर लाख रुपयेचा रोखा राजाज्ञा याणीं केला होता त्यास केदारजी भान्ये याचे विद्यमानें ठरलें कीं, तर्त लोक चाकरीस यावे. स्वार तीनशें व प्यादे दोनशें येणेंप्रमाणें यावे असें ठरलें. पांचशें प्यादे व खाशानें कोणी तरी यावें असें म्हणणें हुजूरचें पडलें. त्यास चिकोडीकर यांचें म्हणणें पडलें कीं, सामानगडचा किल्ला आमचे स्वाधीन करावा. नंतर राजश्री आबास पाठवून देतों असें होतें. त्यास तें ठरलें नाहीं. मनाचिटचा रोख्यास दिल्या. तूर्त लोक मात्र चाकरीस यावे असें ठरलें आहे. कळावें. बेळगांवास ( इंग्रजी ) पलटणांपैकीं कांहीं लोक आले आहेत. वरकड गांवेस आहेत. त्यांजकडे महाराजांकडून कारकून गेला होता त्याचें वर्तमान कीं पलटणें आणविलीं होतीं, परंतु मागें भाऊसाहेबांचा काल जाहला याजमुळें त्याणी येण्यास अंदेशा घेऊन कलकत्यास पत्रें पाठविलीं आहेत. तेथून उत्तर आलेवर जसी आज्ञा येईल तसें करितील. इकडून येण्याविशींच कारकून गेला होता त्यास इकडे यावयाचें संधान जाहलें नाहीं. वाटेगांव पेठ नेरलें येथें राजश्री नारायणराव पाटणकर सरलष्कर आहेत. फौजसुद्धां प्रतिनिधीपंतही तिकडेच जाणेस काल बुधवारीं कूच करून गेले. कळावें तूर्त स्वारी हुजूरची निघावयाचा रंग दिसत नाहीं. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ पत्र नागेशर याचे करवीराहून मिरजेस बाळासाहेबांस.

नं. ५१७४ श्रीव्यंकटेश. ( कार्तिक शु० ३-३१ आक्टो. )

छ० ५ जमादिलाखर सन मय्यातैन व अलुफ. कार्तिक.

ती॥ राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें रामराव सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० १ जमादिलाखर गुरुवासर पावेतों यथास्थित असे. विशेष. अलीकडे आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाही तरी निरंतर पत्र पाठवून सांभाळ करावयास आज्ञा केली पाहिजे. यानतर करवीरकरांची फौज कोठें आहे, राजश्री बाबासाहेब फौज सुद्धां कोठें आहेत, राजश्री चिंतामणराव आपा यांचा मोकाम कोठें आहे, हें सविस्तर ल्याहावयास आज्ञा करावी. राजश्री आपासाहेब यांची जखम शेजेस येऊन स्नान करूं लागले कीं नाहीं, पुढील विचार काय, ती आज्ञा करावी. बहुत काय लिहिणें लोभ असावा हे विनंती.

नं. ५१७५ श्री. ( कार्तिक शु० ४-१ नोव्हेंबर. )

पै॥ छ० ७ जमादिलाखर. मय्यातैन व अलुफ.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. ता॥ छ० २ जमादिलाखर पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. भाऊसाहेब कैलासवासी जाहल्यास दीड मास जाहला. श्रीमंत महाराज करवीरवासी याणीं बहुतकरून ठाणीं बसविलीं. इचलकरंजीस मोर्चे देऊन बसले आहेत, आपण व श्री॥ राजश्री दादासाहेब व आपासाहेब स्वस्थ बसला, त्यास आज पावेतों आपले घरचा नक्ष भाऊसाहेब गेल्यामागें सरकारचाकरी करून दाखवावी तें कांहींच नाहीं ! तरी फौजेचा सरंजाम चांगला करून सरकारचाकरी करून दाखवावी हेंच सरदारांचें भूषण, यास्तव सर्वांचें एकचित्त होऊन सिद्धता व्हावी. सरकारांतूनही फौज व तोफा रवाना होत आहेत. राजश्री गणपतराव पानशे मुहूर्तेंकरून डेन्यास गेले व शिंदे यांजकडील फौज व पलटणें तोफां सुद्धां रवाना होत आहेत. लौकरच तिकडे येतील राजश्री चिंतामणराव आ[१] यांजवळ दीड हजार फौज, शिवाय पायदळ जमलें आहे. त्यांची उमेद सरकार चाकरी करून दाखवावयाची बहुत आहे त्याअर्थी चिंतामणराव याणीं फौज सरंजामी ठेवून सरकारचाकरी करून दाखवावी. त्यांचे खर्चास आपण देत जावें. महाल मुलुखास उपद्रव चिंतामणराव यांजकडून होणार नाहीं हें न पुरवे

१ भावे रामदुर्गकर.

तरी फौज ठेऊन महाल मुलखाचा. वसूल घेऊन फौजसुद्धां सरकार चाकरी करतील. आपण मिरजेचा बंदोबस्त करून असावें. यांतून कोणता ही प्रकार करून मसलत शेवटास न्यावी. मसलत जालीयावर धराऊ ठराव करणें तो व्हावा. याचें उत्तर मनन करून आठ दिवसा आंत सत्वर यावें. 'खर्चास काय द्यावें ?' असा अंदेशा आपण करितील त्यास पहिल्यापासून सरंजामी फौजेस खर्चास द्यावयाची चाल असेल त्याप्रमाणें देत जावें. व खाशांस दरमहा देत जावा. आपण मिरजेचा बंदोबस्त करून रहावें म्हणोन लिहिलें आहे, यास्तव मर्जी उदास होईल, त्यास चिंतामणराव आपा धटाईस चांगले आणि तरवार मारावयाची उमेद बहुत आहे त्याअर्थी फौज त्याणीं खातर-जमेची ठेवावी. लढाईस त्याणीं जावें. महाल मुलखाचा बंदोबस्त स्वामीनीं करून आपांचे फौजेचे खर्चाची खाशांसुद्धां बेगमी दरमहा करून देत जावी हें चांगलें. श्री॥ राजश्री नाना स्वामींचें मानस कीं, "धराऊ फडशा मसलत सिद्धीस गेल्यावर करावयास येईल. परंतु सर्वांनीं एकरूप होऊन भाऊंचा सूड घ्यावा यांतच सरदार लोकांचें स्वरूप. आजपावेतों सर्वांत लौकिक तुमचा आहे तो नक्ष रहावा." पत्राचें उतर सत्वर देविलें पाहिजे. मार्ग लक्षीत आहें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री॥ राजश्री दादासाहेब व आपासाहेबांस सा॥ नमस्कार विज्ञापना सर्वांनीं एकरूप होऊन राजश्रीची मसलत सिद्धीस न्यावी आणि पूर्वींचा नक्ष राखावा. भाऊसाहेबांचा हेत पूर्ण करणें स्वामींकडे. आतां द्रव्याकडे व शरीराकडे पहावयाचें नाहीं. लढाऊ सरंजाम चांगला जमा करावा. हे विज्ञापना.

नं. ५१७६ श्री. ( कार्तिक शु० ५–२ नोव्हें. )

छ० ७ जमादिलाखर. सन मय्यातैन. कार्तिक.

सेवेसीं नारो हरि करंदीकर करद्वय जोडून शिरसा॥ नमस्कार विनंती विज्ञापना. तागायत छ ० ३ जमादिलाखरपावेतों मुक्काम करवीर यथास्थित असे. विशेष. वे॥ राजश्री जीवराव जोशी हे महायात्रेस जाणार. करवीराहून आणखी चाळीस पन्नास यात्रा जात आह. त्यास मिरजेहून कोणी मातब्बर मंडळींपैकीं वगैरे कोण कोण जातात व पुण्याहून ही मातब्बर मंडळी कोण कोण निघणार व यात्रा कधीं निघणार याचा शोध जोशी राव यांस समजला पाहिजे. यास्तव से शीं विनंती लिहिली आहे. तरी याचा शोध होऊन कळवावयाची आज्ञा जाली पाहिजे. से शीं श्रत होय हे विज्ञापना.

नं. ५१७७ श्री. ( कार्तिक शु० ७–४ नोव्हेंबर. )

पै॥ छ० १४ जमादिलाखर. मय्यातैन. कार्तिकमास. भौमवार.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० ५ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्री॥ राजश्री नानास्वामीनीं राजश्री बाळाजीपंत गंवडे यांस कांहीं कार्यानिमित्य राजश्री नागोपंत आपाकडे रवाना केले आहेत. त्यास मार्गीं राजश्रींचा दंगा आहे याजकरतां स्वामीनीं दोनशें स्वांर बरोबर देऊन नेरलीस मा॥निल्हेस पावते करून देविले पाहिजेत. येविसीं श्री॥ राजश्री नानांचें पत्र आपणास आहे त्यावरून विदित होईल. महाराज खासा सांप्रत कोठें आहेत, चतुरसिंग भोंसले वांईकडे येणार म्हणोन वर्तमान आहे ते कोठें आहेत, त्यांजवळ व महाराजांजवळ फौजेचा भरणा किती आहे, व रत्नाकरपंत कितीक जमावानिशीं कोठें आहेत, पुढें उमेद कशी आहे, स्वामीनीं व श्री॥ राजश्री बाबा व रामचंद्रपंत आपा व चिंतामणराव आपा व सर्वांनीं मिळोन एकरूप होऊन फौज व पायदळ हल्लीं किती जमा आहे, व लढवाई सरंजामाची तरतूद कोणती तयार आहे, ( हें लिहावें. ) श्री॥ भाऊसाहेबांमागें सरकारचा नक्ष करून दाखवावा हेंच सरदारांचें भूषण असें असतां भाऊसाहेबांस दीड मास जाहला असतां कांहींच नक्षाची गोष्ट घडोन आली नाहीं यास्तव श्री॥ राजश्री नानांचें चित्त बहुत उदास आहे. सरकारांत पैक्याची ओढ कशी आहे हें विदित ( च आहे. ) त्यांत तरतूद निकडीनें रवानगीची होते आहे. सारांश भाऊसाहेबांचे चित्तांतील गोष्ट सिद्धीस नेणें सर्वांकडे आहे. पत्राचें उत्तर सत्वर यावें. तंबाखू चांगली वीस शेर पाठवावयाची आज्ञा जाहली पाहिजे. श्रीमंतांस पाहिजे. ती चांगली पाहून रवाना व्हावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१७८ श्री. ( कार्तिक शु० ८–५ नोव्हें. )

छ० ७ जमादिलाखर. सन मय्यातैन कार्तिक.

सेवेशीं विज्ञापना. श्री॥ महाराज राजश्री छत्रपति यांची स्वारी काल इंदुवारीं दोन प्रहरापूर्वीं कोटतीर्थावर डेरेदाखल जाली. भोजनोत्तर तिसरे प्रहरीं वे॥ शा॥ सं॥ रा॥ राजश्री भटजीबाबा नरसीपूरकर यांची सून प्रसूत जाली पुत्र जाला. यास्तव स्वारी पांच दिवसपर्यंत तहकूब जाली. सायंकाळीं

---

१ नानांस. २ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून मिरजेस बाळासाहेबांस.

स्वारी डेऱ्यांतून वाड्यास माघारी आली. राजश्री धोंडजी वाघ स्वारी आले-समयीं डेऱ्यांत आला होता. तेथें खर्चाचे ओढीचें बोलणें निघालेनंतर राबता काढून एकांत जाला. वाघ याणें मिरजेची पेठ मारून आणितों असें कबूल केलें. आपणाबरोबर हजार राऊत निवड द्यावे. × × × अमुक दिवशीं निघतात असें खचित वर्तमान समजल्यास सूचना कळवीन. कदाचित् बातमी न लागल्यास अमुक दिवशीं येतात याचें कशावरून लिहूं? त्यास सावधतेविशीं रात्रंदिवस चहूंकडील बातमीचें संधान राखून उभयतां फौजें-तील सरदार याणींहि बहुत हुशारीनें राहिलें पाहिजे. आतां जितकी सबुरी होईल तितकी उपद्रवास कारण आहे. आजपर्यंत उपद्रव होत होता ती गोष्ट अलाहिदा होती. हल्लींचा प्रसंग एक प्रकारचा दिसतो. यासमयीं जुमाम-र्दीचें काम आहे. सारांश सावधतेविषयीं आलस्य एकंदर होऊं नये. आढळलेला मजकूर सेवेसीं लिहिला आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. वाघमजकूर करवीरास आला ते दिवशीं मेजवानी म्हणोन पांचशें रुपये महाराजानीं खर्चास पाठविले होते. कळावें हे विज्ञापना.

नं. ५१७९ श्री. ( कार्तिक शु० ९–६ नोव्हेंबर. )

पै॥ छ० ७ जमादिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ.

[2]सेवेसीं विज्ञापना. भिलवडीस ठाणें राजश्री चतुरसिंग यांजकडील पडलें होतें, त्यास श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपा [1]यांजकडून लोक येऊन भिलवडीस चतुरसिंगांकडील लोक होते त्यांस मारामारी करून दहा-वीस माणूस जायां जखमी जाहलें अशी आवई येथें आहे. त्यास तूर्त दंगा मिरज प्रांतांत व्हावा अशी येथील मर्जी दिसत्ये. त्यास येविषईंची सावधता व्हावयाची आज्ञा व्हावी. यासमयीं तिकडून कांहीं उलटबाजीचा विचार न घडला असतां इकडून उपद्रवास कमतर होत नाहीं. यास्तव सूचना लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१८० श्री. ( कार्तिक शु० ९–६ नोव्हेंबर. )

छ० ७ जमादिलाखर. सन मय्यातैन. कार्तिक.

[3]सेवेशीं विज्ञापना. पुण्यांत राजमंडळाच्या तहाचें बोलणें पेशजी

---

१ चिंतामणराव व हरिपंत बाबा. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकराचें करवीराहून. ३ पत्र नारो हरि याचें करवीराहून मिरजेस बाळा-साहेबांस. पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

राजश्री वामनराव गोखले यादी वगैरे करार करून आले होते त्यांत व इकडील राजश्री रत्नाकर अण्णाजी व आत्माराम धोंडदेव उभयतांत वांकडे-पणा आला. त्यामुळें वामनराव याणीं पेशजीच्या बोलण्यास हिसका घातला. इकडील उभयतां गृहस्थांचें कांहीं चालत नाहीं. एक दोन वेळां पत्रें पेश-जीच्या कराराप्रमाणें येथील बोलणें खचित आहे म्हणोन पत्रें आलीं होतीं. परंतु त्यांतील सारांश पाहतां लिहिणेंच बातल असा मजकूर येथें समजणेंत आला. कळावें. यंदां जितक्या खंडण्या होतात तितक्या नरसीपुरकर बावांचें विद्यमानें होतात. सांप्रत सर्वत्रांस तारूंच भटजीबाबा जाले आहेत ! परंतु त्यांतील अर्थ पाहतां भटजीबाबा थोर, निस्पृही, लोभ नाहीं, असें समजोन कोणी हलकें पडेल म्हणोन बोलण्यास जातात. तेव्हां जो जाबसाल पांच हजारांवर ठरावयाचा तो सात आठ हजारांवर जातो ! असा मजकूर घडतो तेव्हां दुसरेकडे जावें तर बावांचा ठराव राहतो. दुसरे याचे विद्यमानें जालें असल्यास कराराप्रमाणें निभावणी पडेल न पडेल हा अंदेशा खाऊन त्यांजकडेच जातात. ते महाराजांची मर्जी संपादून जें करणें तें करितात. ( त्यांजकडे जाणारे ) देखतभुलीचा विचार घडोन फसतात ! सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. कवेंठेकरानीं[1] बावांचे विद्यमानें परभारें नऊ दहा हजारांवर बोलणें ठराविलें. मला यांतील बोलणें तिलमात्र समजों दिलें नाहीं., कळावें हे विज्ञापना.

नं. ५१८१ श्री. ( कार्तिक शु० ११–८ नोव्हेंबर. )

पै॥ छ० १८ जमादिलाखर. मय्यातैन व अल्लफ.

सेवेसीं बाळकृष्ण महादेव कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना ता॥ छ० ९ जमादिलाखर पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण श्री॥ राजश्री नाना स्वामींस पत्र पाठविलें तें प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठविलें आहे त्यावरून विदित होईल. पत्राचें उत्तर सत्वर यावें. सर्वांनीं एकरूप होऊन फौज चांगली नामी लढवाई सरंजाम पोक्त करून सुमुहूर्तेंकरून राजश्री रामचंद्रपंत आपांस व हरीपंतबावांस व दाजींस व सर्वांस आपण व राजश्री दादानीं डेरेदाखल होऊन सिद्धता असावी. इतक्यांत सरकारची व शिंदे यांजकडील फौज तोफा पलटणें सत्वरच येऊन पावेल. मग सर्व एकरूप होऊन कैलासवासी भाऊसाहेबांचा मनोरथ पूर्ण करून राजश्रींचा

---

१ कवठें पिरान.

बंदोबस्त केला पाहिजे. स्वामींचें पत्र श्री॥ नानांस आलें त्यांतील भाव पाहतां उपरीपणाचा दिसोन आला त्यावरून नानास्वामींस संतोष वाटला नाहीं. अद्याप तरी फौजेची व लढाई सरंजमाची पोक्त तरतूद होऊन आजपावेतों भाऊसाहेबांचा मनोरथ सिद्धीस जावा ती गोष्टच जाहली नाहीं. या प्रसंगीं पैक्याकडे पहावयाचें नाहीं. सरकारांत पैक्याची ओढ बहुत हें कळलेंच आहे त्याअर्थी पैक्याकडे पाहूं नये. आजपावेतों नक्ष पूर्वींचा आहे तोच रक्षावा हेंच सरदारांचें भूषण. सांप्रत सर्वांची फौज व पायदळ किती जमा आहे याची याद व लढाई सरंजाम किती आहे तें लिहून यावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

श्री॥ राजश्री दादासाहेबांस सा॥ नमस्कार विज्ञापना. सविस्तर राजश्री नानास्वामींना आपणास पत्र लिहिलें आहे त्यावरून ध्यानांत येईल. निरंतर पत्रीं आज्ञा होत असावी. भाऊसाहेबांमागें माघार घ्यावयाची नाहीं. आजपावेतों अघाडी आपली आहे त्याअर्थी सर्वांस दिलभरंवसा उभारणी करून पुढें होऊन नक्षाची शर्त करून दाखविली पाहिजे. सारांश श्री॥ नानांस बहुत हर्ष निरंतर होई तें जाहलें पाहिजे. नानांस पत्र आतां येणें तें बेशर्तीचें यावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. सरकारचा सरंजाम सरदार फौज तोफांसुद्धां दोन कुचें जाहालियावर मी सेवेशीं येऊन पावतों. हे विज्ञापना.

नं. ५१८२ श्री. ( कार्तिक शु० १२–९ नोव्हें. )

छ० १९ जमादिलाखर. सन मय्यातैन. व अल्लफ. कार्तिक.

सेवेसीं बाळकृष्ण लक्ष्मण कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० १० माहे जमादिलाखरपावेतों मुक्काम सावनूर वर्तमान यथास्थित असे. विशेष आपण पत्रें पाठविलीं तीं पावलीं. पत्रीं आज्ञा जे, 'राजश्री धोंडोपंत गोखले यांणीं लक्ष्मेश्वर तालुक्यास घासदाण्याकारितां उपद्रव लाविला आहे येविशीं पुण्यास पत्रें गेलीं आहेत. तुम्ही त्यासीं नाद लावून तुटक उत्तर न सांगणें' म्हणोन. आज्ञेप्रमाणें आजपर्यंत वोढून धरलें होतें. दोन तीन रोजांत ऐवजावर वराता करून निकड लावून ( त्यांनीं ) बहुतेक ऐवजाची तोड करून घेतली. बाकीच्याही वराता जाल्या आहेत. दोन चार रोजांत तोही फडशा करून घेतात. उपाय नाहीं. पैक्यापुढें कोणाचा स्नेह भीड मुरवत नाहीं. त्यांस दर्द कोणाची वाटत नाहीं. विना सरकारचें पत्र निक्षून व हुजरे येऊन घेतला ऐवज माघारा घेतल्याविना उपद्रव चुकणार

नाहीं. सावनूर तालुक्याचे ऐवजाकरितां भागवून ठाणीं घ्यावीं या बेतानें निकडीची बाकी ठेविली नाहीं. आजपर्यंत दम धरून तोड जोड केली आहे. उपाय नाहीं. चोहींकडून पेचांत येऊन सर्वस्वें बुडालों आणि नित्य तगादे ! काय यत्न करावा हें सुचत नाहीं. ईश्वरकृपेनें फौजा लौकर या प्रांतीं आल्या तरीच अंमल राहून माझाही बचाव होईल. एक वेळ हालीमानी जाली असतां मोठा प्रेत्न केला पाहिजे. वरचेवर विनंती लिहितों. मला सर्वोपरी रक्षिणार स्वामी आहेत. जासुदास फार दिवस जाले. याजउप्परी ठेऊन न घेतां लौकरच रवानगी करून पाठवितों. गोखले यांचे दंग्यामुळें कांहीं सुचत नाहीं. हंगामाचे दिवस. रानांत कोठे पिकें आहेत तेथें उपद्रव बहुत होतो. रयता दिलगीर. पैका यावयासीं मोठे श्रमतात. शिवाराची नासाडी बहुत होत आहे. पुण्याचीं पत्रें येतांच इकडे पाठवावयाची आज्ञा व्हावी. या प्रांतीं फौजा किती दिवसांत येतील ती आज्ञा आली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१८३ श्री. ( कार्तिक शु० १२–९ नोव्हें. )

छ० १२ जमादिलाखर. सन मय्यातैन. कार्तिक.

[1]सेवेशीं विज्ञापना. राजश्री बळवंतराव खांडेकर यांस निरोप काल भृगुवारीं जाला. कालच निघोन पन्हाळयास गेले. एक दोन रोजांनीं पुढें निघोन जातील. श्री॥ राजश्री नानांच्या ऐवजापैकीं मशारनिल्हेबरोबर पन्नास हजारांचा भरणा केला आहे. व मशारनिल्हे यांस खर्चाबद्दल दोन हजार रुपये देविले. आणखी तीन हजार रुपये देविले आहेत, परंतु त्याचें नांव समजण्यांत आलें नाहीं. शंकर जोशी किंवा दुसरा कोणी गृहस्थ आहे न कळे. राजश्री जानराव जाधव यांची रवानगी तूर्त राहिली यांतील कारण तूर्त तेथील मर्जीचा पुर्ता अजमास समजला नाहीं. जाधव गेले असतां एखादा अवमान होईल यास्तव खांडेकर याणीं पुण्यास गेल्यावर तेथील मर्जीचा आशय समजोन घेऊन उत्तर आलें म्हणजे उत्तरा अन्वयें रवानगीचा निश्चय करून मग रवानगी करणार. खांडेकर यांचे चित्तांत जाधव गेले याणीं न यावें हेंच होतें. त्यास ही मसलत हिंमतबहादर याणीं काढून जाधव यांचें राहणें करविलें. खांडेकर यांस सारांश सांगितलें कीं, पहिला करार ठरला आहे त्याप्रमाणें ठरावाचा बेत करणें. नानांचा ऐवज पन्नास दिला. बाकीचा देणेंचा करार करावा याप्रमाणें सांगितलें आहे. त्यासही

---

१ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून मिरजेस बाळासाहेबांस.

बहुत दिवस जाले व निघोन येणेंविशीं पत्रेंही आलीं त्याजवरून निरोपंही जाला. निघोन गेले. कळावें हे विज्ञापना.

नं. ५११८४ श्रीगणपति. (कार्तिक शु० १३–१० नोव्हेंबर.)

राजश्री बाळकृष्णपंत लागू स्वामीचे सेवेशीं.

पोष्य रामचंद्र परशुराम. नमस्कार विनंती उपरी. तुम्ही दुकित्ता पत्रें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री धोंडोपंत गोखले याणीं तालुक्यांत उपद्रव करून घासदाणा ठरविल्याचें व पुण्याहून त्यांजकडे राजश्री बाबूराव दादाजी यांचीं पत्रें आल्याचें व जुने हुबळीहून तेथें कारकून येऊन बोलतात येविशीचें व राजश्री हरि विष्णु यांचे रवानगीचें व कमाविशीचीं घोडीं जमा झालीं आहेत तीं पाठविण्याचें विस्तारें लिहिलें तें सविस्तर कळलें. ऐशीयास प्राप्त प्रसंगानुरूप जें करणें तें तुम्ही केलें. गोखले यांस चार रुपये द्यावयाचें ठराविलें त्यापक्षीं इकडून काय ल्याहावें ? त्यांची बदनजर, ते हरएकविशीं उपद्रव करावयास चुकणार नाहींत, यास्तव तुम्हीं तालुक्यांतील ठाण्यांचा वगैरे बंदोबस्त पक्का राखणें. तुमचीं पत्रें येण्याचे पूर्वीं व अलीकडे गोखले यांस सरकारचीं निक्षून ताकीदपत्रें परभारें जावीं व इकडेही पत्रें यावीं म्हणजे आम्ही रवाना करूं; याप्रमाणें पुण्यास लिहून मुद्दाम कारकूनही या कामाकरितां पाठविले आहेत. पत्रांची परवानगी जाली आहे. मागाहून लौकरच पाठवितां. याप्रमाणें तेथून लिहिलें आलें. त्यांतून तुम्ही गोड बोलून आपला हात जाऊं न देतां त्यांस चार रुपये द्यावयाचे ते ओढून धरोनच उलगड्यांत आणावयाचें हें कारस्थान करण्याविशीं तुम्हांस ल्याहावें असें नाहीं. हरि विष्णु याची रवानगी करण्यास दिवसगत लागों नये. येथें वरचेवर लोकांचा जथ पडत चालला यामुळें खर्चास लौकर आलें पाहिजे. भिस्त येविशींची तुम्हांवर असें असतां तुम्ही तिकडे गोखले यांचे खटल्यांत पडल्यामुळें इकडील रवानगी राहिली ! खर्चाविशीं येथें बहुत ओढ आहे तें पत्रीं कोठवरी ल्याहावें ? अतःपर लांबणीवर पडों नये. हरतऱ्हा करून पेशजी लिहिल्याप्रमाणें ऐवज देऊन हरीपंत याची रवानगी करणें. पुण्याहून काल पत्रें आलीं. शिंदे बाया यांजकडील व शिंद्यांकडील बोलणें समेटांत आलें. राजश्री नारायणराव बक्षी येऊन शिंद्यांस भेटले. बायाही तुळापुरास आल्या. त्यांच्या भेटी होणें त्या लौकरच होतील. तोफखान्यासुद्धां राजश्री गणपतराव पानशे कार्तिक शुद्ध प्रतिपदेस डेरेदाखल जाले. सरकारची फौज व शिंद्यांकडील फौज व पलटणें आठा रोजांचे आंत चालतीं होतील. याप्रमाणें लिहिलें आलें.

दिवसगत लागावयाचें कारण होतें तें जालें. सरंजाम येतो यांत गुंता नाहीं. चि॥ राजश्री हरिपंत बाबाही अथणीचे सुमारें गेले ते तिकडे येतात. मागाहून आम्ही येतों. तालुक्यांत कमाविशीचीं घोडीं जमा झालीं आहेत तीं एकंदर जमा करून त्यांची निगा करणें. खराब होऊं न देणें आणि हरिपंत याजबरोबर पाठवणें. सारांश गोष्ट तुम्हांकडून ऐवजाची सोय पहिलें लिहिले गेलें आहे त्याप्रमाणें व्हावी. निकडीस उपयोग पडे तें सत्वर करणें. भाऊ ! तुमचा भरंवसा फार होता, परंतु समयास कामास पडलां नाहीं ! गोखले यांस पैका दिल्हा ! असो. काळ तसाच आला तसें केलें. अजून तरी आम्हांस धर्मार्थ तरी पाठवावें ! दारू हानुरीं आहे ती नीट करवणें. रवाना छ० ११ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

पै॥ छ० १८ जमादिलाखर. सन मय्यातैन व अलफ. कार्तिक मास.

नं. ५१८५ श्री. ( कार्तिक शु० १४–११ नोव्हें. )

छ० १२ जमादिलाखर. सन मय्यातैन अलफ. कार्तिक.

[1]सेवेसीं विज्ञापना. राजश्री गणपतराव पानशे हजार गाडद व तोफा व सरकारच्या पागा येणेंप्रमाणें जेजुरीवर सामान आलें. मागाहून पथक्ये व शिंद्यांकडील फौज व पलटणें निघणार. शिंदे बायांस लुटल्या व धरिल्या. एक बाईचें ठिकाण नाहीं. मेली किंवा काय जाहली ( न कळे. ) राजश्री धोंडोपंत गोखले संवदत्तीवर आले. बरोबर पांच हजार फौज व दहा तोफा आहेत. पायदळ दोन तीन हजार आहे. येणेंप्रमाणें आवई बोलतात. हें वर्तमान कलमी नव्हे. स्वामींकडील पुण्यांतून वगैरे वर्तमान असिल्यास कळवावयाची आज्ञा व्हावी. राजाज्ञा यांचा मुक्काम तूर्त राजगुळीवर आहे. गोकाकेकडे लौकरच येणार असें काल राजाज्ञांचें पत्र आलें. वाघ गोखले यांचे पारिपत्यास जाणार. इकडीलही मानस तसेंच आहे. त्यास वाघाबरोबर हिंमतबहादर फौजसुद्धां यावे असें ठरत आहे. याणीं त्याणीं कसें चालावें हें अद्याप ठरलें नाहीं. ठरत आहे. ठरेल तसें लिहून पाठवीन. लौकर निघणार अशी बोलवा आहे. वाघाकडील बातमी[3] मिरजेस गेली होती ते आले. त्यांचे सांगण्यांत नदीवर अथवा गांवाबाहेर चौक्या नाहींत. वेशीवरून प्यादे आहेत. गांवांत पांच चारशें प्यादे आहेत. राऊतही विशेष नाहींत. अशी बातमी आली. पुढें आढळेल तें लिहून पाठवीन हे विज्ञापना.

---

१ येथून खामदस्तूर. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. ३ बातमीदार.

नं. ५१८६ श्री. ( कार्तिक शु० १४-११ नोव्हें. )

छ० १२ जमादिलाखर. सन मय्यातैन. कार्तिक.

[1]सेवेशी विज्ञापना. राजश्री सुलतानराव निंबाळकर बहादूर हे महाराजांचें जावई. घोड्याविशीं अगत्यवाद भारी. दोन चार वेळां मला ( महाराजांची ) समक्ष आज्ञा जाली. घोडा न सुटल्यास मला अडचण बसवावी अथवा दुसरे कोठे उपक्रम करून घोडा उगवावा असा विचार दिसतो. यास्तव विनंती लिहिली आहे. मर्जीस येईल ती आज्ञा व्हावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१८७ श्री. ( कार्तिक शु० १४-११ नोव्हें. )

छ० १२ जमादिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ कार्तिक.

[2]सेवेसीं विज्ञापना. श्री॥ मातुश्री[3] बाई हरिपूरकर यांजकडून महाराजांस घोडा एक हजार रुपये किंमतीचा व तीनशें रुपयांत तिवट व शेला जहानाबादी येणेंप्रमाणें जोशीराव यांचे विद्यमानें आलें. चार रोज जाले. सनगें महाराजानीं राजाज्ञांचे चिरंजीवास दिलीं. घोडा हुजूरपागेंत ठेविला. बाईस वस्त्रें द्यावयाची परवानगी जोशीराव यांजकडे सांगितली आहे. पातळ पावणाशें शंभरपावेतों पाठवितील. तूर्त बाईकडील कारकून येथें आहे. बाह्यात्कारी हरिपुरास उपद्रव लागेल यास्तव मनोधारण राखितों असें आहे. अंतर्गत काय साधन असेल तें असो. राजश्री आत्माराम धोंडदेव व रत्नाकर अण्णाजी यांचीं पत्रें पुण्याहून आलीं. चार रोज जाले. त्यांतील वर्तमान येथून राजश्री सदाशिव मल्हार व बाळोबा पागनीस या उभयतांस हिंमत बहादूर याणीं आपले नांवें पत्रें व महाराजांचीं पाठविलीं होतीं. त्या पत्राचें उत्तर उभयतां बोलले कीं, अशींच महाराजांचीं पत्रें लोभयुक्त येत असावीं. महाराज थोर कृपावंत आहेत. याप्रमाणें बोलले म्हणोन लिहिलें होतें. व राजश्री गणपतराव पानशे डेऱ्यादाखल जाले. पागा व पथके यांस निघणेंविशीं सरकारांतून ताकीद होत आहे. शिंद्याकडील पलटणें व फौज द्यावयाचा निश्चय ठरत आहे. पेशजीचा तह तीन लक्षांचा प्रांत नवा द्यावा असें बोलण्यांत व याद्दी जाल्या होत्या त्यास तेंही आतां मान्य करूं म्हटल्यास श्रीमंत व कारभारी ऐकत

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. २ पत्र नारो हरि याचें करवीराहून मिरजेस बाळासाहेबांस. पत्रावरील मिती व तारीख पैवस्तीची आहे. ३ सरस्वतीबाई. ४ सांगलीकर व मिरजकर यांत भाऊबंदकीचा तंटा होता त्यासंबंधें. तंट्यांत बाई सांगलीकरांच्या बाजूच्या होत्या.

नाहींत. याप्रमाणें वर्तमान लिहिलें होतें. पानशे इंदुवारीं डेऱ्यादाखल मुहूर्त करून निघाले असें लिहिलें आहे. राजश्री नागोपंत आपांकडील पथक चाकरीस यावें, रोजमरा देतों, याप्रमाणें बोलण्यांत ठरलें त्याजवरून आपानीं तीनशें राऊत कोगनोळीस पाठविले. पोटापाण्याचा ठराव करून घेऊन मग करवीरास जावें, त्यास आतां पोटापाण्याचें बोलत नाहींत ! हिंमतबहादूर यांचें म्हणणें कीं, तुमचे राऊत आमचे उपयोगीं काय ? पुण्याहून फौजा आलेवर राऊत जातील. रहाणार नाहींत. यांचा उपयोग काय ? राऊत तुमचे नको. कोगनोळी व नाहिंगळज हे दोनी गांव तुम्ही सोडावे. न सोडाल तर फौज घेऊन जातों. दोनी गांवीं ठाणीं घालितों. महाराजानीं अनमान केल्यास ऐकावयाचें नाहीं. याबद्दल आपणावर गैरमर्जी जाली तरी चिंता नाहीं, परंतु दोनी गांवीं ठाणें घालावयाचें; याप्रमाणें काल बोलणें जालें. पुढें काय ठरतें पहावें. हे विज्ञापना.

नं. ५१८८ श्री. ( कार्तिक व० १-१३ नोव्हें. )

छ० १४ जमादिलाखर. सन मय्यातैन कार्तिकमास.

[1]सेवेसीं विज्ञापना. राजश्री धोंडजी वाघ करवीरास आला होता त्याचा मानस गोखले यांचें पारिपत्य करावें. त्यास इकडील कुमक घेऊन जावें या उद्देशानें जाला. परंतु यानीं कुमक आजपर्यंत कोणास दिली हा मागील शिलाशिला नाहीं व पुढेंही देत नाहीं. नादाचीं बोलणीं मात्र बोलतात ! तो आधींच कुफार. यांजकडून कुमक जाहले ( वर ) यांच्या आज्ञेंत कोठें चालणार ? तळीखोराची वर्तणूक त्याची. तेव्हां वाघ काल कूच करून करवीराहून नेरली तांबगांवच्या मुक्कामास गेला. याप्रमाणें जालें. पालखी वाघास महाराजानीं पाठविली होती ती जातेसमयीं त्याणें माघारी पाठविली. घेतली नाहीं. आज नेरलीहूनही कूच करून जाणार. असें वर्तमान आहे. याउपरी समजूत करून आणितात किंवा निघून जातो हें समजण्यांत येईल तसें लिहून कळवीन. लोक बरोबर आहेत त्यांस खर्चास नाहीं. बहुत ओढ आहे. मिरजेच्या वगैरे मसलती साऱ्याच तूर्त राहिल्याशा जाहल्या ! गोखले नवलगुंदावर आहेत. बारीअलीकडे लौकरच येणार असें मनोळीचें लिहिलें आलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकराचें बाळासाहेबांस.

नं. ५१८९ श्री. (कार्तिक व० ४–१६ नोव्हेंबर.)

पै॥ छ० १७ जमादिलाखर. सन मय्यातैन व अल्लफ.

सेवेशीं[1] विज्ञापना ऐसी जे हल्लीं बाळकृष्णपंत भाऊ यानीं पत्रें स्वामींस लिहिली आहेत यांतील अर्थ राजश्री बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे यांस श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा यांचीं पत्रें नेहमीं येतच आहेत. हल्लीं पत्रें आलीं त्यांतील भाव जे, राजश्री चिंतामणराव आपा फौज जमा करून मसलत करावी. श्री॥ राजश्री बाळासाहेब याणीं महालांचा बंदोबस्त व किल्याचा राखोन पैका फौजेस द्यावा. याप्रों जाहलें असतां चांगलें. वरकड राजश्री आपासाहेब यांची घोड्यावर बसावयाची व शिपाईगिरीची तारीफ मा॥निल्हे करीतच आहेत ! यांतील भाव स्वामीचे चित्तांत असावा. बाळकृष्ण भाऊनीं सांगितल्याप्रमाणें पुरवणी एक सेवेसीं लिहिली आहे. सारांश गोष्ट या प्रसंगीं राजश्री चिंतामणराव आपा याणीं फौज ठेऊन प्रबल जाहले असतां जमेत तिकडे करामत होईल. यास्तव तो विचार ध्यानांत स्वामीनीं आणावा. श्री॥ राजश्री रघुनाथराव दादा व आपण मिळोन पोक्त विचार करावा. श्री॥ राजश्री रामचंद्रपंत आपा याणीं वडिलांचे पायाची शपथ वाहोन आपणांस वचन दिलें आहे त्याप्रमाणेंच श्री॥ राजश्री हरिपंतबाबा यांचें वचन घ्यावें. चौघे एकरूप होऊन श्री॥ राजश्री चिंतामणराव आपा यांस जरब द्यावी तेव्हां बंदोबस्त होईल. उभयतां कृष्णें[2] व एक नीलें[3] सर्वोपरी त्यांचे साहाय्यकर्ते. येथें त्यांचीं पत्रें सहस्रमनीषास[4] आलीं व पुढें ही येतील. त्यास वडिलीं लौकर याची पैरवी कोणते तऱ्हेने करावयाची ते करावी. सरंजामाची फौज ठेऊन मसलतीस जाणें जाहल्यास राजश्री आपासाहेब धणी. श्री॥ राजश्री नारायण-रावसाहेब याणीं मखलासी वगैरे कागदपत्र पाठवणें बोलणें चालणें फौजेचें बोलावें. याप्रों व्हावें. पैका आपण द्यावा. त्याणीं प्रांतांतील झाडून ठाणीं उठवावीं याप्रों जाहलें असतां उत्तम. नाहीं तरी त्याणींच फौज ठेवावी, पैका मात्र आपण पाठवावा, व पुढें जमेत जाहल्यानंतर जें म्हणतील तें कबूल करावें यांत काय जीव आहे ? आजच विभाग जाहला असतां चिंता नाहीं. स्वामी सर्वज्ञ आहेत. सेवकानें काय लिहावयाचें आहे ! सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ वकील मोरो आपाजी परांजपे याचें पुण्याहून पत्र मिरजेस बाळासाहेबांस २ केसोपंत व रामचंद्र श्रीधर उर्फ बाबा काळे. ३ निळोपंत पोक्षे. ४ बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे.

नं. ५१९० श्री. ( कार्तिक व० ४–१६ नोव्हें. )

पै॥ छ० १८ जमादिलाखर सन मय्यातैन व अल्लफ.

विज्ञापना ऐसी जे, कालच पत्रें वसईहून सरकारांत आलीं त्यांतील वर्तमान कार्तिक शु॥ नवमी बुधवारीं वादळ सुटलें त्यांत मुंबईच्या बंदरांतील व बाऱ्यावरील मिळोन आठरा गुराबा व तीनशें लहान मोठें गलबत येकदांच बुडालीं. वसईस आरमार खुष्कीस होतें त्याजखालीं वाळू वाऱ्यानें उडून गलबतें वाळवेंत गढलीं याजमुळें जायां बहुत जालीं. दोन गलबतें पाण्यांत वोढिलीं होती तीं वाऱ्यानें हटलीं त्यांचा ठिकाण नाहीं. तसेंच सुवर्णदुर्गचे आरमार पैकीं चार तरांडीं तरतीं होतीं तीं वादळानें हटलीं त्यांचाही ठिकाण नाहीं. येक गुराब वाऱ्यानें हटली ती किल्ल्यापासून दोन कोसांवर आहे. त्याचीं अवजारें व चराटें तुटलीं. नांगरही तुटले. त्यांजवर माणसें आहेत त्यांस अन्न पाणी खुषकीहून पोंचत नाहीं. वसईच्या बागांतील नारळ सुपारी आंबे जांबळी, पिंपळ, ऊंस, केळींचे फड झाडून जमीनदोस्त. तीन दिवस पाऊस अहोरात्र पडला त्याजमुळें भातें कापिलीं होतीं तीं कांहीं गेलीं. कांहीं पाण्यांत भिजलीं. असा बहुत नाश जाला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१९१ श्रीगणराज. ( कार्तिक व० ६–१८ नोव्हें. )

पै॥ छ० ११ रज्जब. सन मय्यातैन. मार्गशीर्ष व० १३

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती वासुदेव धोंडदेव. आशीर्वाद विनंती. ता॥ छ० १९ जमादिलाखर वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपलीं पत्रें चार पांच एकदांच आलीं. विस्तारें वर्तमान कळलें त्याजवरून समाधान जालें. इकडील वर्तमान इंग्रज पूर्णय्यासुद्धां बिष्टोपंत आदीकरून फौजसुद्धां चेनापट्टणास जाणेंकरितां बेंगरूळ सोडून दोन मजली पुढें गेले. कारण बंगालेमध्यें इंग्रजांची व फुरांशिस यांची लढाई जाली म्हणोन बातमी उठविली आहे. खरें लटकें न कळे. मुद्दाम बातमी आठ दहा दिवसांत यावी अशी जोडीच पाठविली आहे. बातमी येनांच लिहून पाठवितों. राजश्री धोंडोपंत गोखले याणीं सावनुरांत बसोन तमाम तालुक्याचा पैका राजश्री बाळकृष्णपंत भाऊ यांजकडूनच वसूल करवून आपण घेत आहेत. भाऊही त्यांचे आज्ञेविना नाहींत. प्रसंगानुरूप वर्तणूक पाहोनच करीत आहेत. तालुकेंत ( आपली ) फौज येऊन बंदोबस्त केला असतां असें न

१ पटवर्धन शेळकर. मासूर प्रांत सावनूर येथील ठाणेदार.

होतें. परंतु घडणार गोष्टी घडोन तालुकेयास नाकर्तेपणानें पेंच पडोन सावनूर प्रांतांत बाकी राहिली नाहीं. या तालुक्यांत फौज ठेवीन म्हटल्यास चार हजार फौज मिळेल. आठ हजार तयार आहे. बाकी दीड महिनेंत. याप्रमाणें वर्तमान आहे. ×× बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ५१९२ श्री. ( कार्तिक व० १२–२४ नोव्हें. )

पै॥ छ० २८ जमादिलाखर. मय्यातैन. मार्गशीर्ष.

राजश्री गंगाधररावजी गोसावी यांसीं—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ चतुरसिंग राजे भोंसले दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष प्रांत मिरज येथील तालुकियांत सरदेशमुखी वतन बाबेचा ऐवज महालमक्ता रुपये चाळीस हजार आहेत. त्याचा सालमजकूरचा वसूल फौजेचे खर्चास घ्यावयाचा, त्यास सदरहू अमलाचे फडशास कारकून व जमीदार पाठऊन द्यावे. म्हणजे वाजवी वहिवाटीप्रमाणें जाबसाल उगवावयास येईल. कारकून येणियासीं अवधि पडल्यास परभारें महालांत रोखे होऊन वसूल घेतला जाईल. आपला आमचा स्नेह जाणून लिहिलें आहे. पत्राचें उत्तर अविलंबें यावें. तदनुसार पुढें कर्तव्यता घडणियांत येईल. रवाना छ० २५ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५१९३ श्री. ( कार्तिक व० १२–२४ नोव्हेंबर )

पै छ० २५ जमादिलाखर. सन मय्यातैन. कार्तिक.

सेवेशीं विज्ञापना. पुण्याहून राजश्री बळवंतराव खांडेकर यांजकडे पत्रें आलीं त्यांतील मजकूर सरकारची फौज रवाना व्हावयाचा निश्चय होऊन गारपिरावर जथ पांच सात हजारपर्यंत पडला. तोफखाना व मानकरी मंडळी मालोजी घोरपडे व मानाजी फांकडे वगैरे राजश्री बाबा फडके जरीपटकासह रवानगी जाली व शिंद्यांकडील पांच पलटणें व दोन हजार फौज आहे. श्री॥ नानानीं पांच लाख रुपये खर्चास दिले. आणखी पोत्यापैकीं खर्चास द्यावे असें ठरलें आहे. खांडेकर याणीं पन्नास हजार रुपये कर्जाऊ एवजापैकीं रवानगी होत आहे म्हणोन ( नानांस ) लिहिलें होतें, त्याचें उत्तर आलें नाहीं. खांडेकर याजकडील गृहस्थ होते त्यांजवळ ( नानांचें ) उत्तर आलें कीं, "पन्नास हजारांवाचून खाळंबा कोणता ? ऐवज येईल. त्याची काळजी कोण करितो ? बळवतराव यांस तेथें रहावयाचें कारण नाहीं. कां राहिले ?"

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकराचें.

असें रोषेंकरून बोलले. याप्रमाणें वर्तमान आहे. राजश्री जानराव जाधव आज गुरुवारीं निघोन पुण्यास गेले. प्रस्थान अगोदरच केलें होतें. कळावें. खांडेकर व जाधव उभयतां मिळोनच जातील. जाधव यांजबरोबर शिलेदार मंडळी तीस चाळीसपर्यंत आहेत. खांडेकर यांस पन्नास हजारांशिवाय आणखी पांच हजार दिले. त्याचा तपशील खांडेकर यास खुद्द जातीस हजार रुपये व शंकर जोशी हजार. शिवाय नानांच्या स्त्रीस सणगें नाना महाडच्या मुक्कामास असतां दिले हजार रुपये, पेशजी भोंसले यांजकडे जानराव जाधव पुण्याचे मुक्कामीं गेले ते समयीं सणगें वगैरे जिन्नस दोन हजारांचा दिला ते, ऐसे पांच हजारांचा येणेंप्रमाणें तपशील आहे. राजश्री आपा निपाणकर याणीं पांढरे यांचें शिष्ट कृत्य केलें. त्यापैकीं पंधरा घोडीं मिरजेंत दरवाजा-पुढें बांधिली आहेत म्हणोन बातमी आली. येथील माणसें गांवांत परकी येतात जातात त्यांची चौकशी वेशीवर चांगली व्हावयाची आज्ञा असावी. बागणीवरची फौज शिरदवाडच्या सुमारें आली. मसलत बोरगांवची आहे. तेथून अंकली मांजरीवर जाणार. राजाज्ञा यांचा मुक्काम घोडगिरीवर होता ते परभारे × ×वर जाणार. मांजरींत × × × आहे असें यांच्या समजण्यांत आलें. × × × × वगैरे वाण्यांस गल्ला आणावयाकरितां यावें म्हणोन ताकीद करितात. याप्रमाणें वर्तमान आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१९४ श्री. ( कार्तिक व० १३—२५ नोव्हें. )

छ० १० रज्जब. सन मय्यातैन.

विनंती सेवक तिमराव गोविंद. कृतानक सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २६ जमादिलाखरपर्यंत मुक्काम भागानगर वर्तमान यथास्थित असे. विनंती. इकडील मजकूर तपशीलवार लिहून श्री॥ राजश्री आपासाहेब यांस विनंतीपत्र पाठविलें आहे त्याजवरून निवेदनांत येईल. राजकी मजकूर तर टिपूकडील तालुकेपैकीं गुत्ती कोपळ बहादूरबंडा वगैरे ठाणीं हजरत बंदेगानअल्ली यांजकडे आलीं आहेत. तो झाडून तालुका मीर अलम याजकडे दिला. सरंजामसुद्धां रोषनाईयास घेऊन मीर अलम त्या प्रांतीं जाणार. सिद्धता होत आहे. पुण्याकडून करवीरच्या मसलतीस फौजा व कंपू रवाना होणार म्हणोन येथील वकिलाचीं पत्रें जागा जागां आलीं आहेत. आज्ञेप्रमाणें एक मास येथें राहून सत्वरच दर्शनास येतों. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५१९५ श्री. ( कार्तिक व० ४–१६ नोवेंबर. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव गोविंद स्वामी गोसावी यांस—

पोष्य बाजीराव रघुनाथ. प्रधान. नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. करवीरकर व परशुराम रामचंद्र यांची लढाई जाहली. परशुराम रामचंद्र लढाईंत ठार जाहले. करवीरकरांनीं प्रांतांत दंगा बहुत केला असतां तुम्ही लोकांचा दिलादिलासा करून फौज सुद्धां तयार होऊन त्या रोखें जाऊन त्यांजवरी दाब पडे ऐसें करावें तें कांहींच ऐकण्यांत येत नाहीं. हें तुमचे सेवाधर्मास योग्य नाहीं. सरकारचे थोरले सरदार कामास आले, तेव्हां याचा बदला व्हावा हे गोष्ट सरकारांतून करणें जरूर. यास्तव तुम्ही फौजसुद्धां निघोन राजश्री रामचंद्र परशुराम व चिंतामणराव पांडुरंग व रघुनाथराव नीलकंठ मिळोन फौजेस दिलदिलासा देऊन जथ चांगला घालून करवीरकरांचे मोहल्यावरी जाणें. व तोफखाना व गाडद व राजश्री दौलतराव शिंदे आलिजाबहादर यांजकडील फौज व पलटणांची तयारी होत आहे. सत्वरच येऊन पोचतील. जाणिजे. छ० १७ जमादिलाखर. सु॥ मय्यातैन व अलफ. बहुत काय लिहिणें. हे विनंती.

नं. ५१९६ श्री. ( कार्तिक व० १४–२६ नोव्हेंबर. )

पै॥ छ० २७ जमादिलाखर. मय्यातैन. कार्तिक. इंदुवार.

[1]सेवेशीं विज्ञापना. बोरगांव व अंकली येथील मसलत तूर्तच करावयाचा बेत केला होता. कऱ्हाड प्रांताकडील फौज व राजाज्ञा यांसही अंकलीच्या सुमारें आणविलें होतें. ही मसलत तूर्त रहावयाचें कारण आज तीन चार वर्षे जी वर्तणूक जाली आहे ती अतिरिक्त ! हल्लीं राजश्री बळवंतराव खांडेकर व जानराव जाधव उभयतां पुण्यास रवाना जाले हे सालसाईचे बोलण्याचा भाव बोलणार व कर्जाऊ ऐवजापैकीं पन्नास हजार रुपये देऊन पत खरी करणार. त्यास प्रांतांत फौजा फिरल्यानें आपली फौज बेकैदी, कैदवार नव्हे, आणि वारंवार बोभाट आणखी पडतील, तेव्हां सालसाईचे बोलण्यास दूषण लागतें; हा दूर अंदेशा पाहून शिरवळकर पाटणकर फौजसुद्धां मुक्काम होता त्यांस हुपरीनजीक धुडधुडीवर आणविलें. ते आले. राजाज्ञा यांचाही मुक्काम तूर्त घोडागिरीसच आहे. त्यांणीं तूर्त तेथें असावें [illegible]-

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. २ साफसूदपणाच.

डळच्या फौजा तूर्त पर तालुक्यांत नाहींत, आपलेच तालुक्यांत आहेत, असा भाव दर्शविला आहे. पुण्यांतील अन्वय उभयतांच्या लिहिण्यांत येईल त्या अन्वयें पुढील कर्तव्यता करणार अशी तूर्त मसलत होऊन अंकलीची व बोरगांवची मसलत तहकूब जालीसी दिसते. राजश्री आपा देसाई निपाणकर यांचीही आवाई तवाई खातात. याजमुळें धुडधुडीवर ठाणेंच्या आसरेस मुक्काम केला आहे. कळावें. दोन रोज महाराजांस समाधान थोडेसें नाहीं. कोणत्याही कर्मास येथील अातुरपक्ष. परंतु आतां पुण्याहून फौजा निश्चयें करून येतात हें वर्तमान राजश्री नारायणराव घोरपडे सेनापति यांचे चिरंजीवांकडून पुण्याहून आलें व खांडेकर यांजकडूनही पत्रें आलीं तेव्हां पुढील परिणाम शुद्ध नाहीं हें मनांत आणून बोकेसंन्यास काल्पिला आहे ! उभयतां पुण्यास पावल्यावर तेथें कसा प्रसंग पडतो पहावें. राजश्री धोंडजी वाघ मुधोळ प्रांताकडे गेला. मुधोळ प्रांतांतील गांवांस उपद्रव केला. तेथें मुधोळकर घोरपडे याणीं बातमी राखून छापा घालून लुटला. पळोन गेला. असें वर्तमान बाजारी आहे. श्री॥ राजश्री दाजीसाहेब गोखले यांस आणावयाकरितां गेले असेंही वर्तमान आहे. मुंबईवर वादळ पडोन कांहीं घरें पांचचारशें व कांहीं आरमारी जहाजें व दोन चार हजार माणूस जायां जालें, लाखों रुपयांस सावकार बुडाले, असें वर्तमान पुण्याच्या लिहिण्यांत आहे. बाया निसबतचे पठाण कांहीं खानदेशच्या प्रांतांत दंगा करून होते ते लुटले गेले. राजश्री प्रीतिराव चव्हाण यानीं आपले किताब एका चिरंजीवास 'हिंमत बहाद्दरी' दिली व एका चिरंजीवास 'ममलकतमदारी' दिली. आपण फक्त राहिले तेव्हां त्यांस हुजुरून किताब जाहला कीं 'उमदेतुल उमराव बहाद्दर' हा किताव नवा दिला. कळावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५१९७ श्री. ( कार्तिक व० ३०—२७ नोव्हें. )

नक्कल.

राजश्री चतुरसिंग भोंसले गोसावी यांस—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ गंगाधरराव गोविंद आशीर्वाद विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें "प्रांत मिरज येथील सरदेशमुखीचा ऐवज फौजेचे खर्चास घ्यावयाचा, यास्तव जमीदार पाठवावे", म्हणून लिहिलें त्यास प्रांत मिरज सरदेशमुखीसुद्धां इकडील फौजेचे सरंजामास सरकारांतून आहे. तर आपण इकडील तालुक्यास हरयेकविसीं तोसीस लाऊं नये. आपला

आमचा स्नेह. त्यांत अंतर न होय तें व्हावें. रवाना छ० जमादिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

नं. ५१९८ ( मार्ग० शु० ७–३ डिसेंबर. )

दादाजी व्यंकटेश यांजकडून मिरजेस बाळासाहेबांस पत्र. रवाना छ० ५ रज्जब—

"रत्नाकरपंताचा मुक्काम फौजसुद्धां गोकाकनजीक घोडगिरीवर आहे. धोंडजी वाघ याचा मुक्काम कुइलगोडावर होता तो एकाएकीं जमीयतसुद्धां येऊन रामदुर्गाच्या पेठेवर निकड केली, परंतु काट चालला नाहीं. एक दोन स्वाऱ्या राजाज्ञांकडील पेंढाऱ्यांनीं मुदलावी व बागलकोट तालुक्यावर केल्या. पुढें येऊन दंगा करावा असा बेत आहे. गोखले सावनुरावरच आहेत.

नं. ५१९९ श्री. ( मार्ग० शु० ९–५ दिसेंबर. )

पै॥ छ० १० रज्जब. सन मय्यातैन. मार्गशीर्ष.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब साहेबांचे सेवेशीं.

विनंती सेवक बाळाजी महादेव दामले चरणांवर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ०७ रज्जबपर्यंत स्वामीचे कृपेकरून कसबे रहिमतपूरचें व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री चतुरसिंग भोसले यांचा मुक्काम दोन हजार फौजेनिशीं कडेपुरचे ओढ्यावर आहे. प्रांतांत रोखे करून चौथाई सरदेशमुखी नाडगौडकीचा वसूल घेतात. खटावपर्यंत रोखे जाहले आहेत. औंधावर मुक्काम येणार. नंतर वाई प्रांतांत रोखे करावयाच्या विचारांत आहेत. साताऱ्यास फौज नाहीं. दोन हजार पायदळ किल्ल्यावर आहे. दोन चारशें स्वार शहरांत आहेत. करवीरावर जाण्याकरितां पलटणें पांच व तीस तोफा आल्या त्यांचा मुक्काम देउरावर जाहला आहे. फौजही शिंद्यांकडील मागाहून येत आहे. बहुत काय लिहिणें सेवेसीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२०० ( मार्ग शु० ९–५ दिसेंबर. )

बाळकृष्ण महादेव बाळ यांचें पुण्याहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० ७ रजबजें—

"तबखिलेकरितां श्रीमंत राजश्री नाना स्वामींस तमाखू चांगली अदमण वजन पक्का स्वारांबरोबर रवाना जाहली पाहिजे."

नं. ५२०१ श्री. ( मार्ग० शु० १०–६ दिसेंबर. )

पै॥ छ० ८ रज्जब. सन मय्यातैन व अलफ. मार्गशीर्ष.

[1]सेवेसीं विज्ञापना. राजश्री नागोपंत आपांकडील राऊत चारशें व गाडदी दोनशें इंदुवारीं करवीरास आले. महाराजांकडून केदारजी मान्ये बोलण्यास नेरलीस गेले होते तेही समागमेंच आले. आज उद्यां हजिरी घेऊन मग चाकरीस रवाना करणार. फार करून हिंमतबहार यांजकडेच रवाना करणार आहेत. हिमतबहाद्दर भिलवडीकडे जाणार. तासगांवासही जावयाची बोलवा आहे. राजाज्ञांसही येणेंविशीं आज्ञापत्र गेलें आहे. कधीं येतात पहावें. राजश्री आत्माराम धोंडदेव यांचीं पत्रें पुण्याहून भौमवारीं आलीं त्यांत वर्तमान पुण्याचें लिहिलें कीं, पांच सहा हजार फौज व तोफखाना व पलटणें चार दिव्याचा घाट उतरलीं असें लिहिलें होतें. हल्लीं राजश्री सदाशिव मल्हार यांजकडे बोलण्याचें संधान लाविलें आहे. जंजिरे राजापुरी येथून एक कारकून व शिवाजी भोसले ऐसे आले आहेत. काय राजकारण आहे समजण्यांत आलें नाहीं. मागाहून लिहितों. श्रीमंत पंत अमात्य यांणीं राजापुर प्रांतें दंगा मांडिला आहे. दोन तीन हजार प्यादे व दोनशें राऊत बरोबर आहेत. कळावें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२०२ श्री. ( मार्ग० शु० १२–८ डिसेंबर. )

राजमान्य राजश्री गंगाधरराव गोविंद यांसीं आज्ञा केली ऐसी जे, तुम्हीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ निवेदन जाहला. दावेकरी यांचा मुद्यानिशीं पत्ता लागल्यास दावेकरी पाठवून देतों म्हणोन विनंती लिहिली, आणि फौज येऊन आम्हांकडील सरंजामाच्या महालीं पायमल्ली जाहली हें हुजूर विदितच असेल म्हणोन लिहिलें तें निवेदन जाहलें. राजश्री शिदोजी निंबाळकर देसाई व महादजी शितोळे यांणीं मौजे दडलिहाळावरी राजश्री धुळोजी पांढरे उतरले होते ते रात्रीं येऊन तोडातोड करून शंभर घोडीं घेऊन गेले. ते मिरजेस घोडीं व आपलीं मुलें मनुष्येंसुद्धां मांजरीहून तेथें आले आहेत. त्या उभयतांस नागावेसुद्धां पाठविणें. महालचे गांवांचा मजकूर लिहिला, त्यास या गोष्टीचा बंदोबस्त जाहलेवरी फौजेस आज्ञापत्र सादर होऊन उपसर्ग लागणार नाहीं. जाणिजे. सु॥ मय्यातैन व अलफ. रवाना छ० १० माहे रज्जब. बहुत काय लिहिणें.

बार.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकराचें बाळासाहेबांस. २ करवीरच्या शिवाजी महाराजांचें आज्ञापत्र.

नं. ५२०३ श्री. ( मार्ग. शु० १२–९ दिसेंबर. )

विनंती सेवक धोंडो जिवाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ० ९ रज्जबपर्यंत यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. " फिरंगी टोपकर तोफ पसंत करील तिचें नांव लिहून पाठविणें. मग लिहून पाठवूं त्याप्रमाणें रवाना करून देणें. दारूचा कारखाना जलद चालू देणें. नवी दारू रोज किती होती ती लिहिणें, व मासल्यास दोन शेर दारू पाठवून देणें, " म्हणोन आज्ञा; त्याबरोन फिरंगीयास तोफा व जंबुरे स्वामींच्या आज्ञेप्रमाणें दाखविले. त्यांपैकीं गणेश जंबुरा पंचरसी गाजनूरचे लढाईंत पाडाव दोन तोफा आणिल्या होत्या त्यांपैकीं मोबदला एक तोफ देऊन हा जंबुरा घेतला. यास मळसूत्र केलें आहे. हा मात्र पसंतीस आला. याचा गोळा पक्के दोन शेर वजनी आहे. येथें ही साऱ्या तोफांत हीच चांगली आहे. विदित व्हावें म्हणोन विनंती लिहिली आहे. दारूचे तीन डंग लाविले आहेत. दररोज वजन ॥५ पसतीस शेर नवी होती. काम तडका चालतें. मासला पहावयाकरितां नवी दारूपैकीं वजन ०८२ दोन शेर कच्ची सेवेशीं पाठविली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

पौ॥ छ० १० रज्जब. सन मय्यातैन व अल्लफ.

नं. ५२०४ श्री. ( मार्ग शु० १२–९ दिसेंबर. )

पौ॥ छ० १७ रज्जब. सन मय्या तैन. मार्गशीर्ष मास.

[1]सवेशीं धोंडो बापूजी जोशी शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायेत मार्गशीर्ष पावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. पुण्यांतील चौकींचे प्यादे वडिलीं दूर करविले. श्रीमंत राजश्री विठ्ठलराव बापूही निघोन गेले. वाडयांत आम्ही मात्र आहों. चौकीवर कोणी नाहीं. आज पंधरा दिवस दरवडे पुण्यांत पडतात. रविवारपेठ व वेताळपेठ या पेठेंत दरवड्याची हूल पडोन पळ सुटोन दुकानें लागलीं. कितेकांचा नाश जाला. पहातां कोठें कांहीं नाहीं. नित्य दरवडे शनिवार पेठेंत हणमंतानजीक पडले. याजप्रमाणें आहे. वाड्यांत दिवसाचें कोणी येऊन लपोन राहिला तर कळावयाचें नाहीं. दगा देऊन जाईल. यास्तव दोन तीन प्यादे ठेवण्यास आज्ञा करावी. अथवा मिरजेहून पाठविण्याची आज्ञा करावी. येथील वाड्याचे कुळांची याद नेली आहे त्यांचा आकार रुपये ५०८ आहे. पैकीं गेलीं आलीं, नवीं राहिलीं,

---

१. पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

त्याजमुळें कमजाजती आकार होईल. याजपैकींच दोन तीन प्यादे यांचा आकार व वाड्याची डागडोजी, शाकारणी बद्दल ऐवज भाडेंपैकीं खर्च होऊन कांहीं ऐवज राहे तो जमा करावयासीं येईल असें माझे मतें आलें. ते सुचली बूध वडिलांस लिहिली आहे. परंतु प्यादे चौकीस पाहिजेत खरे. ठेवण्यास आज्ञा करावी. भोईमहाल रिकामा, जाहाल्यावर आबा काळे यांणीं आपली पालखी व आटाळा महालांत घातला. पागा रिकामी आहे त्यांत कुळें ठेवण्यास मी पहात आहें. जागा अडवून टाकितों. येथें दाद नाहीं ऐसी गत आहे. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२०५ श्री. ( मार्ग शु० १३–१० दिसें. )

छ० १३ रज्जब. सन मय्या तैन व अलफ. मार्गशीर्ष.

सेवेशीं विज्ञापना. काल इंदुवारीं रा॥ जानराव जाधव यांचीं पत्रें पुण्याहून सांडणीस्वाराबरोबर तिसरे दिवशीं आलीं. पत्रांतील मजकूर तपशीलवार समजण्यांत आला नाहीं. जाधव याणीं सांडणीस्वारास जबानी अर्ज करणेंविशीं सांगितलें कीं, आपली अद्याप श्रीमंतांची व नानाची भेट जाली नाहीं व येथील कारभार आपले वस्तु आटोप्यांत येत नाहीं. राजश्री भाऊ जोशीराव अथवा निंबाजी यादव या उभयतांतून एका जणाची रवानगी पत्र पावतांच व्हावी. फौजा व पलटणें लोणीवर आलीं. याप्रमाणें सांडणीस्वारानें हुजूर अर्ज केला. आपण इतका मजकूर आयकिला. ते समयीं जोशीराव यांस बोलावून आणून निघणेंविशीं तयारी करणेंची आज्ञा जाहली. आज भौमवारीं बुधवारीं दोन दिवसांत रवानगी होणार अशी निकड बोलण्यांत आहे. पत्रांच्या नकला हिंमतबहादर यांजकडे व राजाज्ञा यांजकडे तेच क्षणीं रवाना केल्या. राजश्री बळवंतराव खांडेकर यांचींही पत्रें आहेत. उभयतांच्या पत्रांतील भाव समजोन घेऊन सेवेशीं लिहितों. सांडणीस्वाराच्या जबानींत कैलासवासी भाऊसाहेब यांस करवीरकर मंडळी मारावें असें बोलत होते त्या अन्वयेंच पुण्यांतील लहान थोर इकडील मसल्यास बोलतात ! याप्रमाणें वर्तमान आहे. श्रीमंत राजश्री पंत अमात्य याणीं खारे पाटणची गढी घेतली. तीन रोज गढी लढली. तिसरे दिवशीं हल्ला करून घेतली. तेव्हां दहा असामी ठार व पन्नास माणूस जखमी जाहले. पुढें राजापुरास ठाणें घालून ... घेणार. हुजूरची आज्ञा दंगा करणेंविशीं नवती व पत्रेंही गेलीं कीं निघोन येणें. नंतर या वर्तमानाचीं

---

२ मालकाला विचारणें नाहीं पुसणें नाही। जागा रिकामी पहातांच जबरदस्तीनें आपलें सामान आणून भरलें।

पत्रें आल्यावर येणेंविषयींची मसलत राहून "उद्योग जाहला हा ठीक जाहला. पुढें आणखी फौजेचा जथ पाडून आणखी हात पोहोंचेल तेथवर ठाणीं घालून खंडणी वगैरे घ्यावी" याप्रमाणें रवाना जालीं! राजाज्ञा यांचा मुक्काम सतीगिऱ्यानजीक आहे. राजश्री बाळोबा पागनीस यांचा नेट फारच चांगला आहे असें येथीलही समजण्यांत आलें आहे. सारांश पुण्यांतील नेट आहे तसाच असावा. कंपेश होऊं नये येविशींचा बंदोबस्त असावा. राजश्री धोंडोपंत गोखले सावनुरावरच आहेत. त्यांजवळ जमीयत पांच हजार फौज व पायदळ तीन हजार, तोफा दहा व हत्ती सात आहेत. याप्रमाणें सरंजाम आहे. इकडे यावयाची आवई आहे. राजश्री चतुरसिंग व नरसिंगराव गुजर आउंधावर आहेत. आपले जमीयतसुद्धां येथून गेले. त्या प्रांतीं गांवगन्ना जमेप्रमाणें आकाराची चवथाई खंडणी घ्यावी याप्रमाणें पथ घातला आहे. साताऱ्यावरील महाराज पुरंधरावर नेल्याची आवई आहे. त्यास सत्य मिथ्या हें कळवावयाची आज्ञा व्हावी. अमात्यांनीं कोकणांत बहुत उपद्रव मांडला आहे त्याचा विस्तार पत्रीं कोठवर लिहावा? ईश्वर इच्छा प्रमाण! पुण्याकडील वगैरे अधिकोत्तर असेल तें कळवावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. काल रात्रीं इंदुवारीं नवी तोफ ओतविली. थोर आहे. दुसरी त्याच फर्म्याची ओतवावयाची आज्ञा जाली आहे. हे विज्ञापना.

नं. ५२०६ श्री. (मार्ग० शु० १३-१० दिसें.)

नक्कल.

आज्ञापत्र राजमंडळ स्वारी राजश्री चतुरसिंग राजे भोसले तहां कसवे रहिमतपूर सुरू सन मय्यातैन व अल्लफ.

कसबेमजकूरचा सालमजकूरचा ऐवज येणें, त्याचे ठरावास पाटील कुलकर्णी पिंपरीचे मुक्कामास येणें. या कामास स्वार पाठविले आहेत यांस मसाला रुपये २०० दोनशें आदा करणें. जाणिजे. छ० १२ रज्जब मोर्तब सूद. मोर्तब.

नं. ५२०७ श्री. (मार्ग० शु० १५-१२ दिसें.)

छ० १४ रज्जब. मय्यातैन. मार्गशीर्ष.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री बळवंतराव खांडेकर व जाधव यांचीं पत्रें आलीं. त्यांतील मजकूर जानराव जाधव यांची भेट एकादशीस श्रीमंतांची

---

१ रहिमतपुरचा कमावीसदार यानें मिरजेस नक्कल पाठविली. २ पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून.

व नानांची होणार होती. भेट जालेवर सविस्तर लिहितों या प्रमाणें लिहिलें होतें. शिंदे यांचीं पलटणें यवत म्हणोन भीमातीरीं गांव आहे तेथें आलीं आहेत. मजल दरमजल जाणेंची आज्ञा बाळोबा पागनीस यांची आहे. राजश्री धोंडोपंत गोखले यांजकडून राजश्री बाबूराव दादाजी पुण्यांत बोलण्यास होते. त्यास त्यांचे आडमुद्दे होते ते नानांनीं करार करून दिले आणि फाटक यास गोखले यांजकडे पाठविण्याचीं सरकारचीं पत्रें व नानांनीं आपलीं पत्रें दिलीं कीं, श्रीमंत राजश्री आप्पासाहेब यांजकडे जाऊन जलद सामील होणें. याप्रमाणें पत्रें घेऊन बाबूराव दादाजी गेले. राजापूर प्रांतीं अमात्यपंत यांणीं दंगा मांडिला आहे येविशीं मामलेदारांकडून बोभाट पुण्यास गेले. सदरहू वर्तमान खांडेकर यांचे पत्रीं लिहिलें आहे. ‘ असे बोभाटे येतात त्यापेक्षां येथें बोलणारांनीं काय बोलावें ? ’ असें लिहिलें आहे. राजश्री चतुरसिंग यांस काल भौमवारीं फौजसुद्धां येणेंविशीं पत्रें गेलीं. दुधगांवच्या मुक्कामास येणें म्हणोन लिहिलें आहे. जाधव यांची भेट होऊन पत्रें येतील त्यांतील भाव समजोन मग जोशीराव यांच्या जाण्याचा निश्चय होणार. वाळवें तर्फेचे गांव चार पांच इकडे आहेत त्यांचे मोकाळिकेविशीं जाधव यांणीं लिहिलें होतें त्यावरून वाळवेंतर्फेच्या गांवांच्या मोकळीकचिठ्या देविल्या. जाधव यांची सालसाई राखिली ! कळावें हे विज्ञापना.

नं. ५२०८ श्री. ( मार्ग० शु० १५-१२ दिसें. )

पै॥ छ० १६ रज्जब. सन मय्यातैन व अल्लफ. मार्गशीर्ष.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब साहेबांचे सेवेशीं—विनंति सेवक बाळाजी महादेव दामले चरणांवर मस्तक ठेवून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १४ रज्जबपर्यंत स्वामीचे कृपेकरून कसबे रहिमतपूरचें व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री चतुरसिंग राजे भोंसले यांचा मुक्काम दोन हजार फौजेनिशीं श्री आउंधावर आहे. रा॥ संताजी भोसले यांचा मुक्काम सातशें जमावानिशीं मौजे पिंपरीवर आहे. प्रांतांत तमाम माहुलीपर्यंत रोखे होऊन गांवगन्नांनीं वसूल घेतात. रास्ते यांची फौज सातारियास अगदीं नाहीं. काय आहेत ते वाईंत आहेत. किल्ल्याचा मात्र बंदोबस्त करून वरकड शहरसुद्धां मोकळें आहे. रा॥ बाबा फडणीस व विठ्ठलपंत शहरांत आहेत. गडबड झाली म्हणजे किल्ल्यावर जातात. संताजी भोसले याचा तलावा मौजे तासगांवपर्यंत जातो. गांवगन्नांनीं राऊत, प्यादे, स्वारी

शिकारी होत आहे. परंतु रास्ते यांजकडील चालचलण कांहीं एक नाहीं सारखें जाहलें आहे. रहिमतपुरावर सालमजकूरचे वसुलाचे फडशास पाटील कुलकर्णी येणें म्हणोन रोखा आला आहे. लष्करचा मुक्काम नजीक पिंपरीवर. रोज तलाव्यास जातात येतात; याजमुळें उपाय चालत नाहीं. आज तीन रोज त्यांची आमची लागली आहे. याजमुळें गांव बहुत घाबरा जाहला आहे. उदमी यांस कोठें जावयास ठिकाण नाहीं. गांवचे बाहेर निघाले असतां लुटून घेतात याजमुळें खंडणी करावी म्हणोन बोलणें करितात. याजकरितां आज लष्करांत बोलावयास पाठविलें आहे. तीन साडेतीन हजार फौजेचा मुक्काम जवळ शिंवेनजीक. यास्तव उपाय नाहीं. न बोलावें तर गांव लुटला जातो. शिवाराची खराबी होत्ये. रानांतील मेंढरें, तट्टें त्यांणीं वळून नेलीं आहेत. पलटणांचा तोफखान्यासुद्धां मुक्काम मौजे आदरकीनजीक घांट सालप्याचा येथें आहे. पुण्याहून फौजा आल्याशिवाय तोफा घांट चढवीत नाहींत. फौजेचें येणें तर रा॥ गणपतराव मसूरकर याम वस्त्रें जाहलीं. हडपसरावर मुक्काम आहे. फौज निघावयास पंधरा रोज पाहिजे या प्रांतात कोणी नाहीं याजमुळें भोसले चाट्राखालीं येऊन दंगा भारी करून दिला आहे. रास्ते यांनें तासगांव लुटून आणिलें. रहिमतपूर हा गांव पहिले अमदानींत श्रीमंत महाराज आईसाहेब यांचे खासगीचा आहे यास्तव ठाणें घालावयाचें, हहीं बोलवा आहे. तीनशेंपर्यंत प्यादा आम्हांपाशीं आहे त्यांची तीन हजार फौज. आणखी वरच्यावर ठेवीत आहेत. रास्ते यांच्यानें कांहीं एक होत नाहीं. सेवेशीं विदित होय हे विज्ञापि. रोख्यांची[1] नक्कल पाठविली आहे. हे विज्ञापि.

नं. ५२०९ श्रीगणराज. (मार्ग० शु० १५-१२ दिसें.)

पै॥ छ० १४ रज्जब. सन मय्या तैन. कार्तिक मास.

[2]विज्ञापना. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. मौजे म्हापण तर्फ पाट प्रांत कुडाळ येथें खासगत ठिकाणांत घर आहे तें वे॥ महादेव भट गाडगीळ यांजकडे होतें. हल्लीं त्या घरटिकाणांत वे॥ राजश्री बाळंभट गोरे गांवकरी यांस येथून पत्र नेऊन राहिले आहेत म्हणोन आज्ञा, त्यास गाडगीळ घर सोडून गेले. त्या घरांत एक कुणबी होता म्हणोन कळलेवरून गोरे यांस पत्र

---

१ ही नक्कल नं. ५२०६ स छापली आहे. २ रघुनाथराव कुरुंदवाडकर यांचें बाळासाहेबांस पत्र मिरजसे. यावरून हरभट बाबा पटवर्धन यांचें म्हापण येथें ठिकाण व घर होते असें सिद्ध झालें.

लिहून दिलें. हल्लीं घरठिकाणांत गोरे आहेत. वडिलांस कळावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ५२१० श्री. ( १३ दिसेंबर )

पै॥ छ० १७ रज्जब सन मय्या तैन. मार्गशीर्ष मास.

सेवेशीं धोंडो बापूजी शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत मार्गशीर्ष व॥ १ पावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. राजश्री गणेशपंत कात्रे याचे फितुराचे कागद करवीरकर महाराजांकडे जात होते ते सरकारांत सांपडले त्याजवरून कात्रे यास व पुत्र उभयतांस शु॥ १५ स कैद करून कोहोज किल्ल्यावर एक जण व करणाळयावर एक जण असे दोहों किल्ल्यावर पाठविले. करवीरकर महाराजांकडील फितूर असें लोक बोलतात. कळावें. रास्ते यांजकडील आरबांपैकीं दोन जणांनीं सरकारचे दोन चार असामी जायां जखमी चौकापासून ते शनवारपेठेपर्यंत केले. नागव्या तरवारा करून मारीत पळत गेले. मग राजश्री आबा काळे यांचे लोकांनीं आरब दोन शनवारांत ठार केले. त्याजवरून रास्तेकडील आरब तयार जाले व नानांकडीलही जाग्यावर तयार जाहले. नंतर वाड्यासभोवतीं पलटणें आबा काळे व रूपराम चौधरी यांचीं दोन आहेत हीं तयार होऊन रस्ते बंद केले. तोफा चौफेर नाक्यांनीं लाविल्या. आपल्या भोई महालानजीक लोक तयार बसले. तट पडला. आबा काळेकडील कारकून जमादार ( आमच्या ) वाड्यांत आले. " लोक गच्चीवर घालणार व कोठीमागील भिंतीवर बसविणार, रस्ते रोखणार, दरवाजा उघडून द्यावा," असें बोलले. " आम्हांस (सरकारची) परमानगी आहे. " असें बोलले. मग "यजमान मंगळवेढ्यास गेले. जामदारखाना कांहीं व कोठीचें सामान व फरासखान्याचें दिवाणखान्यांत व माडीवर आहे. पहारे दोन आहेत. कुलपें आहेत. आम्ही उघडून देणार नाहीं. कोठीकडे एक पहारा आहे." येथील गड्यांचा चोंका कोठीपाशीं दाखविला. मग ते आबाकाळेकडे गेले. नंतर वाड्यांतील माणसें व सदाशिव खिजमतगार व जासूद राजबा यांजला दरवाजाबाहर चार जण व कोठीकडील माडीवर एक दोन घटाटोप करून बसविले. माणसें पाहून मग काळे याजकडील लोक आले नाहीं. दरवाज्यास कुलपें घालून ठेविलीं. असें दहा घटका दिवसपर्यंत जालें. मग रस्ते मोकळे जाले. नानानी आरबांस ताकीद केली. वाड्यांत कारकून गेले. नंतर रस्ते चालूं लागले. जर कारितां गोळी सुटत होती तर (आमच्या) वाड्यांतील चीजवस्त रहात नव्हती. जबरदस्तीनें आरब अथवा सरकारी लोक शिरते. ईश्वरें एक वेळ

वैवाटली. अद्याप प्रमाण नाहीं. लोक मनस्वी बोलतात. कोणें समयीं काय होईल न कळे. चौकीवर एकही माणूस नाहीं. प्रसंग कठीण ऐसें बोलतात यास्तव आजच दोन प्यादे दरवाजावर ठेविले. गडबड जाल्यास दरवाजा लावूं. बळकटीस्तव अलाहिदा पत्रीं प्यादे मिरजेहून पाठवण्यास आज्ञा करावी अथवा येथें ठेवावयाशीं आज्ञा करावी ऐसें लिहिलें आहे. त्यानंतर ही गलबल जाली. मग धीर न पुरे. यास्तव तूर्त दोन प्यादे ठेविले. वडिलांस कळावें. सदरहू दोन प्यादे ठेविले. गलबलीचें वर्तमान सर्व सदाशिव खिजमतगार सांगतां कळों येईल. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२११ श्री. ( १२ दिसेंबर. )

पै॥ छ० १७ रज्जब. सन मय्या तैन. मार्गशीर्ष मास.

सेवेशीं धोंडो बापूजी जोशी शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत मार्गशीर्ष व॥ १ पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष शिंदे यांकडील पलटणें रवाना जालीं. कोरेगांवचे सुमारें गेलीं. फौज तीन हजार निधोन लष्करानजीक चार कोसांवर जाऊन उतरले. दरमजल येणार अशी बाजारबातमी आहे. वारा समुद्रांत भारी लागला. मुमई, वसई, सुवर्णदुर्ग, उंदेरीचें आरमार झाडून बुडालें. शिवाय सावकारी ही माल बहुत बुडाला. इंग्रजाचा तीन कोटीपर्यंत नाश जाला. मुमईचे बंदरांतील पाल, गुराब, जहाजें वगैरे सामान लहान थोर अडीचशेंपर्यंत बुडालें. सरकारचें आरमारही वसई व सुवर्णदुर्गचे बाहेर होतें तें गेलें. अंजनवेल, रत्नागिरी, विजयदुर्ग इकडे वारा लागला नाहीं. सावकारी, सरकार, इंग्रज मिळोन पांच सात कोटी पाण्यांत नाश जाला. वसई प्रांतींची बागशाई झाडून पडली. तळें किल्ल्याचा बुरूज अशक्त होता तो एक पडला. असा वारा लागला. याजप्रमाणें गांवांत सर्व बोलतात. वडिलांस कळावें. बहुत काय लिहिणें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२१२ श्री. ( मार्ग० व० २–१४ डिसें. )

छ० १६ रज्जब. सन मय्या तैन व अलफ. मार्गशीर्ष.

[1]सेवेशीं विज्ञापना. पंत अमात्य याणीं रविवारीं राजापुरास ठाणें घातलें. शहरचा तसनस बहुत केला. प्रांतांत पिकापाण्याचा नाश होतो. प्रथम पन्नास हजारांवर खंडणीचा ठराव जाला त्यापैकीं दहा पंधरा हजार वसूल पडला. बाकीचा ऐवज यावा त्यांत ठाणेंच घेतलें ! शहरचें गुळें

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून.

जालेंच होतें. जिन्नस हरजिन्नस बेमुब्बलग गांवांत आहे. ब्राम्हणांस वगैरे तसदी बहुत होत्ये. याप्रमाणें वर्तमान आहे. शिरगांवकर यांच्या पथकाची हजिरी चारशें राऊतांची जाली. एकंदर तैनातजाबता सरसाल आकार दोन लाख वीस हजार रुपये जाले. सरासरी सकट शेरा साडेपांचशेंचा पडला. पैकीं दरमहा चवदा हजार रुपये द्यावे. बाकी चवथाई मात्र तहकूब रहावी. शिवाय कापड आहे. चालत्या रोजमरेपैकीं रोख दोन हजार व सिद्राम भोंसले यांजकडे हवाला पांच हजार व पाच्छापुरावर वरात पांच हजार येणेंप्रमाणें बारा हजारांचा भरणा केला. बाकी दोन चालत्या महिन्यांचें देणें राहिलें. याप्रमाणें तोड पाडली. शिंद्याकडील पलटणें लोणंदवर आलीं. तोफखाना व सरकारची फौज मागाहून येत आहे. पलटणें मात्र जलद मजलदरमजल येतात असें वर्तमान आहे. अद्याप जाधव यांची भेट होऊन पुण्याहून पत्रें आलीं नाहींत. कळावें. शिंदे बायांस व त्यांजकडील कारभारी तात्या फोंडकर वगैरे यांस पत्रें लिहिलीं आहेत कीं, इकडील बोलण्यास अनुकूलता करावी. याप्रमाणें लिहिलीं आहेत. फौजेचा खर्चाचा गवगवा येथें पडला आहे त्याची एक महिन्याची तोड तूर्त काढून गांव शीव हवाला हवाला व कांहीं रोख अल्प स्वल्प देऊन तोड पाडणार; आणि हिंमतबहादर खाचीवर आहेत त्यांजकडेच रवानगी होत आहे. शिरगांवकर व खानापूरकर मिळोन सहाशें राऊत आहेत व किरकोळ आणखी पांच सहाशें ऐसे तूर्त हजार बाराशेंची रवानगी होत आहे. चतुरसिंगाचें बोलणें समेटाचें पुण्याकडे लागलें आहे असें बाजारी वर्तमान आहे. सत्य मिथ्या कळत नाहीं. येथून त्यास पत्रें गेलीं आहेत कीं, हिंमतबहाद्दर यांजवळ पोहोचावें. येतात किंवा न येतात, उत्तर आलेवर कळेल तसें लिहून कळवीन. पुण्याकडील सामान न यावें या प्रेत्नाची बहुत कासोविशी होत आहे. या प्रेत्नाची काटगिरी होऊं नये. राजश्री शितोळे व ( निपाणकर ) देसाई यांजविशीं विनंती करणेंची आज्ञा पत्रीं जाली, त्यास कारण अकारण पाहून आज्ञेप्रमाणें विनंती करितों. पत्रांच्या नकला पाहिल्या. त्याही पत्रें यथापद्धत नाहींत, नवीन चाल लिहिली आहे, याजविशींही विनंती करितों कीं लिहिण्यांत कंपेश लिहिलें म्हणोन थोरपणाचें महत्व कंपेश होतें असा अर्थ नाहीं असाही भाव दर्शवितो. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२१३ श्री. ( मार्ग व० ५–१७ दिसं. )

छ० १९ रज्जब सन मय्या तैन व अल्लफ. मार्गशीर्ष.

सेवेशीं विज्ञापना. राजश्री गणेशपंत कात्रे प्रतिनिधीकडील कारभारी यांस पुण्यांत कैद केलें व त्यांचे चिरंजीवासही कैद केलें असें वर्तमान आहे. कात्रे यांचे बंधु राजश्री बाळाजी काशी हे करवीरास कराडाहून काल रविवारीं आले. आणि श्रीमंत अमृतराव साहेब व दौलतरावे शिंदे यांचाही परिणाम अस्ताव्यस्त बोलतात. परंतु लिहिण्यांतील वर्तमान नाहीं. बाजारी आहे. ऐशास स्वामींकडे पुण्याचीं पत्रें आलींच असतील. एवढें वर्तमान असिल्यास समजण्यांत आलेंच असेल. सत्यमिथ्या कळविण्याची आज्ञा व्हावी. पलटणें व सरकारचा तोफखाना फौज कोणत्या मुक्कामास आली हें कळविलें पाहिजे. हुजूरनें पत्र राजश्री बाळोबा पागनीस यांस रा॥ आत्मराम धोंडदेव यांचे विद्यमानें गेलें होतें तें मशारनिल्हेनीं वेदमूर्ती राजश्री नरसिंह शास्त्री, पागनीस यांजवळ असतात त्यांचे विद्यमानें पागनीस यांस प्रविष्ठ केलें. पत्र पाहून पत्राचा आचीर्य केला, आणि पत्राचें उत्तर दिलें नाहीं. उत्तर मात्र सांगितलें कीं, ज्याप्रमाणें कैलासवासी परशुरामपंत भाऊचा परिणाम महाराजांनीं केला, तसा सारे पटवर्धनांचा परिणाम महाराजांनीं केला असतां स्वस्थपणीं नेत्र भरून मग निद्रा घ्यावी. तें न होय तर पटवर्धनाचें कुळ ! निद्रा लागोन चैन पडों देणार नाहींत ! इतकें उत्तर मात्र जालें. अद्याप जानराव जाधव यांची भेट होऊन पत्रें आलीं नाहींत. भेट अद्यापि न जाली असेंच समजण्यांत आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२१४ ( मार्ग० व० ५-१७ डिसें. )

नारो विनायक याचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र अथणीहून छ० १९ रज्जबचें—

"धोंडजी वाघ गलगल्याजवळ कृष्णापार होऊन शूर्पालेवर आले आहेत. हजार बाराशें स्वार व तीन चार हजार पाईचा जमाव आहे. शूर्पालेस चौकी दिली आहे. गांवकरानीं खंडणीचें बोलणें लाविलें आहे. मौजे कंकणवाडी परगणे जमखिंडी हा गांव लुटून पस्त केला. शूर्पालचा जाबसाल उरकल्यावर कोणता रोख धरितात पहावें. आम्ही येथें जमाव राखून हुशार आहों. प्रजापीडा सरत नाहीं. श्रीइच्छा काय आहे न कळे."

नं. ५२१५ श्रीपांडुरंग. ( २१ डिसेंबर. )

पै॥ छ० २६ रज्जब. सन मय्या तैन व अल्लफ.

ती॥ राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेसीं.

अपत्यें भगवंतराव बाहिरव शिर सा॥ नमस्कार विज्ञापना तागायत

मार्गशीर्ष वद्य नवमीपावेतों मुक्काम श्रीक्षेत्र पंढरपूर येथें वडिलांचे कृपेकरून सुखरूप असों. विशेष. श्री॥ राजश्री आपासाहेब यांणीं करकंबेहून मंडळीसह मंगळवढेयास नेलें हें विनंतीपत्र पेशजी सेवेसीं लिहिलें होतें. तेथें नेल्यानंतर आज्ञा केली जे, करकंबें महालचे सालमजकूरचे ऐवजीं तीस हजार रुपये तूर्त देणें. नाहीं तर मामलत दुसऱ्यास सांगतों. मी विनंती केली जे, मामलत मला निभावणार नाहीं. तेव्हां राजश्री मोरोपंत फडणीस व राजश्री आपाजीपंत साठे यानीं साडे बारा हजार रुपये एकूण व दरबार खर्च एक हजार• एकूण साडे तेरा हजार रुपये तूर्त द्यावयाचे कबूल करून ठाण्यास आले. परंतु मुख्यत्वें मोरोपंत कारभारी, आपाजीपंत त्यांचे विचारें कामकाज करितात मी आज्ञा घेऊन क्षेत्रास आलों. कृपाळु होऊन सांभाळ करणार वडील समर्थ असा. सेवेशीं श्रुत होय. कृपा करावी हे विज्ञापना. मीही आठ दहा दिवसानीं चरणांसंनिध येतों हे विज्ञापना.

नं. ५२१६ श्री. ( मार्ग. व० १२–२३ डिसें. )

छ० २४ रज्जब. सन मय्यातैन. मार्गशीर्ष.

सेवेशीं विज्ञापना. जानराव जाधव यांचीं व खांडेकर यांचीं पत्रें पुण्याहून काल मंदवारीं आलीं. अद्यापि जाधव यांची भेट जाली नाहीं. दत्त-काची संज्ञा जाधव यांच्या पत्रांत 'अंगठीवरला हिरा आहे तो काढून दुसरा बसवावयाचा आहे' असें लिहिलें आहे. नानांकडील ऐवजाची निकड लिहिली आहे. सावकारी चिठ्या पाठवून द्याव्या म्हणोन लिहिलें आहे. त्यास धोंतुपोषण चिठी यादव याची पाठविली आहे ती जाधव यांचे नांवची पाठ-विली आहे. परंतु जाधव यांजकडून पुण्यांत निशा पटत्ये असा अर्थ नाहीं. नाद लावावयाचें कारण नरसिंगपूरकर बावाकडून पत्रें श्रीमंत राजश्री बाजी-रावसाहेब यांजकडे इकडील अनुकूलतेविषयीं गेलीं होतीं. परंतु त्यांतील भाव उत्तराचा समजला नाहीं. सारांश जाहलेले मसलतीस वेत्यय पडों नये येविशींचा बंदोबस्त पक्केपणें असावा. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. अमात्य-पंत यांजकडून वेदमूर्ति राजश्री महादेव भट पंडित आले त्यांजवर महाराज रागें भरले कीं, "तुम्ही कोंकणांत मसलत केली याजमुळें पुण्यांत बोलण्यास ठीक पडत नाहीं. नाश जाहला." फारच रागें भरले. हे विज्ञापना.

नं. ५२१७ श्री. ( पौष शु० १–२७ डिसें. )

पै॥ छ० ६ साबान. सुसन मय्यातैन व अल्लफ. पौष मास.

---

१ पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून बाळासाहेबास. २ भुलथाप.

## श. १७२१ बावडेकरांची कोकणांत स्वारी. इ. स. १७९९

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गंगाधर राव स्वामीचे सेवेसीं.

पोष्य नारो गोविंद. मुक्काम जंजिरे विजयदुर्ग. साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० २९ माहे रज्जब जाणोन स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष. पंत अमात्य बावडेकरी तीन चार हजार लोकांनिशीं घांटाखालीं उतरोन गढी खारेपाटण घेतलें व राजापुर शहर जाळून तालुक्यांतील गांव लुटिले. पुण्यास पत्रें कुमकेविशी लिहिली आहेत. अद्याप कुमक येऊन पोंहोंचली नाहीं. आपल्याकडील पांचचारशें राऊत कुमक आली पाहिजे. पत्र पावतांच दोन अडीचशें राऊत येत असें करावें. राजश्री महादाजीपंत बेडेकर विनंती करितील त्याप्रमाणें तरतूद जाहली पाहिजे. राजश्री आनंदराव धुळप सुभेदार आरमार व सुभाकडील अंताजीपंत गोगटे तीन चार हजार लोकांचा जमाव करून अमात्य यांस गढी खारेपाटणापलीकडे हटविले आहेत. गढीस मोर्चे लागू केले आहेत. अमात्य यांचा मुक्काम भुईबावडेयास आहे. आपल्याकडील कुमकेची मार्गप्रतीक्षा करितों. (त्यां) जवळ राऊत आहेत. आपल्याजवळ अगदीं नाहींत याजकरितां लिहिलें आहे. कांहीं तरी सोय करून पाठविले पाहिजेत. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ५२१८ श्री. ( पोष शु० ४—३० डिसेंबर. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधरराव स्वामींचे सेवेशीं.

पोष्य नारो गोविंद. मुक्काम जंजिरे विजयदुर्ग सा॥ नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत छ० ३ माहे साबानपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. पुण्याहून पलटणें वगैरे फोज करवीरचे पारिपत्याकरितां येत आहे म्हणोन लिहिलें, त्यास मिरजेनजीक आलींच असतील. मोहिमेचा मजकूर ल्याहावा. इकडील मजकूर तरी पंत अमात्य बावडेकर तीन चार हजार लोकांनिशी घाटाखालीं उतरून गढी खारेपाटण व गढी राजापूर ठाणीं घेतलीं. राजापूर शहर जाळून तालुक्यांतील गांव लुटले. त्याजवर राजश्री आनंदराव धुळप सुभेदार आरमार व चि॥ राजश्री दाजीबा व राजश्री अंताजीपंत गोगटे तीन चार हजार लोकांचा जमाव करून तीन स्वाऱ्या करून तिहींकडून राजापूरचे रोखें जाऊन त्यांसीं लढाई देऊन त्यांचा मोड होऊन माघारे लाविले. गढीचा व शहरचा बंदोबस्त करून त्याचे पाठलागावर स्वाऱ्या गेल्या. पुनः मौजे तिटवली त्यांचा गांव तेथें दुसरी लढाई मातबर जाली. त्यांचा मोड होऊन माघारे घेऱ्यांत भुईबावड्यास लाविले. खारेपाटणच्या ठाण्यांत त्यांचे लोक अडीच तीनशें होते त्यांस चोहोंकडून मोर्चे लावून

तोफांचा व गरनाळेचा मार देऊन त्या लोकांचा नाश करून जेर केलें. ( त्यांत ) ताकद राहिली नाही. असें करून लोक गढींतून बाहीर लाविले. पाठीमागें स्वांऱ्या गेल्याच आहेत. खारेपाटणच्या गढींत निशाण लावून प्रांताचा बंदोबस्त केला. श्रीमंतांचे पुण्येंकरून ईश्वरें मोठें यश दिलें. राजश्री गणपतराव सरसुभेदार वगैरे लोक घेऊन कुमक येत आहेत. मागाहून सविस्तर लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ५२१९ श्री. ( पौष शु० ७—२ जाने. )

पै॥ छ० ६ साबान. सन मय्या तेन व अल्लफ.

[1]विज्ञापना. महाराज करवीरांत शिष्टांचे दर्शनास गेले होते त्याचा तपशील—अय्या म्हणोन ब्राह्मण गांवाबाहेर लोणारावर राहतात ते अनुष्ठाते शरभ म्हणोन प्रयोग आहे त्याचें साधन आठ दहा वर्षे करीत आहेत व गांवांत काशीकरबावा म्हणोन यजुर्वेदी ब्राह्मण गणपतिउपासक आहेत व शास्त्री म्हणोन देवीउपासक व मांत्रिक आहेत. या त्रिवर्गांचे दर्शनास गेले. कारण आपलें अभीष्ट चिंतन व्हावें येतद्विषयीं त्रिवर्गांची प्रार्थना जाहली आहे. भटजीबावा नरसींपुरकर तो गुरुच आहेत. असा विचार आहे. कळावें-करितां सूचना लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२२० श्री. [2]( पौष शु० ७—२ जाने. )

पै॥ छ० ६ साबान. सन मय्या तेन व अल्लफ.

सेवेसीं विज्ञापना. पुण्याहून मसलत होऊन फौज व पलटणें रवाना जालीं येविशींची पायमल्ली करण्याचीं संधानें राजश्री सदाशिव मल्हार निसबत शिंदे यांजकडे व बजाबा शिरोळेकर व नारोपंत चक्रदेव यांजकडे संधानें चालली आहेत. शिराळेकर यांजकडून हमेशा राजश्री रामचंद्र अण्णाजी कागवाडकर हे करवीरीं येत असतात. राजश्री बळवंतराव खांडेकर तो त्याच उद्योगांत आहेत. पत्रें एक दोन रोजां आड करून नेहमीं पुण्यास जातात. ऐशास मसलतीची पायमल्ली न होणें असा बंदोबस्त पक्केपणें असावयाची आज्ञा व्हावी. इकडे लोक चाकरीस आहेत त्यांच्या घरीं उपद्रव जाहला असतां इकडील जमीयत फुटत्ये. नाहींतर लोक ठेवावयाचे असल्यास येण्याविशींही सिद्ध आहेत. दोहींतून एक मसलत जाली असतां जमीयत फुटत्ये. आणखी कोणी येणारासही दर्द पडत्ये.

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र नारोपंत करंदीकराचें. तशींच पुढचीं दोन. २ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

असा विचार आहे. श्रीमंत राजश्री आपासाहेब यांस पुण्याकडील बंदोबस्ताविषयीं वारंवार सूचना व्हावयाची आज्ञा व्हावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२२१ श्री. ( पौष शु० ७—२ जाने. )

पै॥ छ० ६ साबान. सन मय्यातेन व अल्लफ.

[1]सेवेशीं विज्ञापना. राजश्री जानराव जाधव यांचीं पत्रें इंदुवारीं आलीं त्यांतील वर्तमान पत्रांत जाधव यांची व श्री॥ नानांची व सरकारची भेट जाल्याचें वर्तमान नाहीं. पत्रें घेऊन गडी आला त्याचे जबानीं तलें वर्तमान मागील इंदुवारीं व सोमवारीं नानांच्या व सरकारच्या भेटी जाधव यांच्या जाल्या. राजश्री बळवंतराव खाडेकर यांची पत्रें नाहींत. वर्तमान भेटीचें बातल असें दिसतें. जाधव याणीं विवेकाचा उपाय पत्रीं सुचविला आहे. 'नानांच्या कर्जाच्या ऐवजाचा फडशा व्हावा. शिवाय लाख रुपये दरबारखर्च जाल्यास तहाचा जाबसाल पटेल' म्हणोन लिहिलें आहे. या पत्राच्यापूर्वीं पत्रें आलीं होतीं त्यांत 'अमात्यपंत यास करवीरास आणावें, खारेपाटणचें ठाणें स्वाधीन व्हावें, नानांचा ऐवज द्यावा.' त्याचीं उत्तरें जाधव यास गेलीं कीं, फौजा माघाऱ्या जातात अशी खातरजमा जाहलेस दीड लाख रुपयेची तोड पाडून देऊं. खारेपाटणचें ठाणें स्वाधीन करणेंचा ठराव राजश्री हैबतराव गाइकवाड विश्वासराव यांचे विद्यमानें धुळपाचे स्वाधीन व्हावें असें ठरावांत आलें आहे त्याप्रमाणें होईल. वाळवें तर्फचे गाव कांहीं हुजूर आहेत त्याजविशींही जाधव याणीं स्वाधीन होणेंविशीं लिहिलें होतें त्याचें उत्तर गेलें कीं, पुण्याहून गांव स्वाधीन करून घ्यावयास कारकून येईल त्याचे हवालीं गांव स्वाधीन करणेंची आज्ञा होईल. याप्रमाणें उत्तरें गेलीं. अमात्यपंत भुईबावड्यास आहेत. अलीकडे त्यांचा उत्कर्ष नाहीं. पंत राजाज्ञा अथणीच्या सुमारें वाघसुद्धां आहेत म्हणोन वर्तमान आहे. पलटणें कराडच्या सुमारें आलीं असें वर्तमान आहे. चतरसिंग आपले जमीयतसुद्धां हैबतराव गाइकवाड घेऊन आले. अष्टें याजवरील लष्कर व चतुरसिंगसुद्धां मागती खोचीवर आले. दुधगांवास तोफा लावावयाचा मनसबा चव्हाण व पाटणकर करीत आहेत. काय होतें पहावें. शिराळें प्रांताच्या गांवगन्नाच्या ओली करवीरास आणिल्या. आजपर्यंत वसूल द्विगुणित घेऊन

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे.

पुढें ही जो ऐवज निघेल तो घ्यावा या बेतानें आणिल्या. सेवेशीं श्रुत व्हावें हे विज्ञापना.

नं. ५२२२ श्री. ( पौष शु० ७–२ जाने. )

यादी. ठराव गंगाधरराव गोविंद व चिंतामणराव पांडुरंग सुरुसन मय्यातैन व अलूफ. सिद्धार्थीनाम संवत्सरे.

६५०० १ किल्ल्याचे खर्चाची नेमणूक सरकारांतून नाहीं. शेऱ्यांत आहे. सबब हल्लीं नेमणूक सरंजामापैकीं समाईक.

४३००० तैनात बा। बेहडा.

४०००० कैलासवासी गोविंद हरि व गोपाळराव यांची नेमणूक.

३००० कैलासवासी वामनराव गोविंद यांची नेमणूक.

४३०००

हल्लीं तपशील.

२०००० गंगाधरराव गोविंद.

२३००० चिंतामणराव पांडुरंग.

४३०००

येणेंप्रमाणें तैनातीचा ऐवज सदरहू बा। वांटून घ्यावा. कलम १

स्वार सरकार बेहड्या बा।

४६००

२००० गंगाधर राव गोविंद.

२६०० चिंतामणराव पांडुरंग.

४६००

शेताळीसशें स्वारांचा सरंजाम यथाविभागें घेऊन सरकार चाकरी करावी. एकूण कलम १

१००००० घर बांधावयास एक लाख रुपये गंगाधरराव गोविंद यानीं आपल्या विभागापैकीं द्यावे चिंतामणराव पांडुरंग यांस. येणेंप्रमाणें कलम १

————मातुश्री स्वरस्वतीबाई व सौभाग्यवती कुसाबाई व सौ॥ मनाबाई व सौ॥ मथाबाई यांची

नेमणूक आहे त्याप्रमाणें खासगीकडून उभयतांनीं चालवावी. येणेंप्रमाणें कलम १

१ तैनातदार मंडळी यांची नेमणूक बेहड्यास आहे त्या प्रमाणें उभयतांतून जिकडे चाकरी संष ( ? ) कडून करतील तिकडून तैनात नेमणूक ब॥ गांव द्यावी. येणें प्रमाणें कलम १

कैलासवासी भास्करपंत आपाकडे नेमणूक शेडसाळ गांव दरोबस्त व क॥ मिरज पैकीं शेत पूर्वीपासून तैनातेंत चालत आहे त्याखेरीज पथकाकडून पोत्यापैकीं नेमणूक रुपये.

५००० नक्त रुपये. तैनात.

११४० भोयांचा रोजमरा. सरसाल.

७१८७ पालखीचे सामानाची नेमणूक.

एक साला आड

५१८६ नक्त.

कापड आंख २२८॥

दोनशें साडे अठ्ठावीस आंख. दर रुपयेस अडीच आंख.

९१॥ प्रत. नक्त रुपये ९१॥ साडे एक्याण्णव रुपये.

१४२॥।=

एकशें पावणे त्रेताळीस रुपये पैकीं दरसाल निम्मे प्रमाणें द्यावे. बाकी तबकडीस व मेणकापड याची चाल पेशजी ब॥ असेल त्या प्रमाणें द्यावीं. कलम. १

२५५० शेडसाळची रकम.

२३८९ ऐन रुपये.

१६१ चढाबद्दल. खेरीज कबज.

२५५०

१२५ शेत व मळा नक्त रुपये.

८८८६।≡

तपशील.

२५५० शेडसाळ.

२३८९ ऐन.

१६१ चढाबद्दल खरीज कजब खर्च लिहावयाचे. सालाबाद खर्च लिहितात.

२५५०

१२५ शेताब॥ व मळयाब॥

६२११८≡ हल्लीं गांव नेमणूक करोन द्यावयाचे. समाईकपैकीं.

८८८६८≡

खासगीकडील

चिंतामणराव पांडुरंग.

१ कैलासवासी यशवदाबाई.

१ मातुश्री लक्ष्मीबाई.

२ सौ॥ रखमाबाई व सौभाग्यवती अन्नपूर्णाबाई.

४

चौघी जणींची वस्तभाव व कापड जें असेल तें ज्याचें त्यांजकडे.

गंगाधरराव गोविंद.

१ सौ॥ उमाबाई

१ सौ॥ गोपकोबाई.

१ सौ॥ पार्वतीबाई.

१ सौ॥ सत्यभामाबाई.

१ मातुश्री राधाबाई.

१ देवींच्या सुद्धां. श्रीमाधवजीची वस्तभाव.

६

पांच जणींची वस्तभाव व श्रीच्या कापडसुद्धां ज्याच्या त्याजकडे.

१ या खरीज नक्त व कापड शिल्लक व येणें देणें घेणें कर्ज- सुद्धां भांडीं गुरें मळे शेत इनाम गांव घर कुणबिणी शिंदे पोरगे सोन्याचीं रुप्याचीं भांडीं कैलासवासी गोविंद हरि नाना व कैलासवासी गोपाळराव गोविंद दादा व कैलासवासी

वामनराव गोविंद बाबा व कैलासवासी पांडुरंगराव गोविंद तात्या व राजश्री गंगाधरराव गोविंद व चिंतामणराव पांडुरंग यांच्या खासग्या एकजागीं करोन हिसेबी वाजबी रीतीनें जें खासगीसंबंधें असेल तें उभयतांनीं निम्मेनिम यावें व घ्यावें. कलम १

५ पथकसबंधीं कापड नक्त शिल्लक जवाहीर त॥ येणें देणें घेणें कर्ज व कापडाचा त॥ येणें पागा घोडीं हत्ती नग उंट थट्टी मेंढरें शेळ्या रथ गाड्या फरासखाना वगैरे जें असेल तें———निम्मेनिम यावें घ्यावें. कलम १

महालचे हिशेब देणें घेणें फाजील कर्ज रदकर्ज याचे हिशेब होणें ते बाळासाहेबांकडे होऊन वाजवी हिशेबीं ठरेल त्याप्रमाणें बाकी सुद्धां निम्मेनिम. कलम १

१ किल्याचे जकीऱ्याचें सामान दारू तोफा जेजाला बाण शिसें गोळे तोफांचें हरजिनसी दाणा कोठीपैकीं गंधक सोरमीठ वगैरे आदिकरोन हरजिन्नस किल्याचें किल्याकडे असावें. कलम १

किल्याचे जकीऱ्यापैकी चिंतामणराव यांस मोघम द्यावयाचें.

| | |
|---|---|
| दारू खंडी पक्के. | २ |
| शिसें खंडी. | १ |
| जेजाला सुमार. | १० |
| रेखले सुमार. | २ |
| बाण सुमार. | १०० |
| रेखल्याचे गोळे सुमार.—— | १०० |

येणेंप्रमाणें जिन्नस मोघम द्यावे.

१ वर्षासनें. महालीं वर्षासनें असतील तीं ज्यां ज्यां कडे महाल येतील तेथील वर्षासनें ज्यांचीं त्यांनीं चालवावीं. इनाम जमीनीसुद्धां.

१ खासगीकडील वर्षासनें यथाविभागें निम्मोनिम चालवावीं.

१ पथकांतील वर्षासनें स्वारांचे हिस्सेरशीप्रमाणें लिहिलें आहे अलाहिदा त्याप्रमाणें स्वारांचे हिस्सेरशीप्रमाणें वर्षासनें पथकांतील उभयतानीं द्यावीं.

---

३

तीन कलमें.

१ पथकसंबंधीं दरखदारांची कारकुनी व दरबार खर्च जो पडेल तो वगैरे स्वारांचे हिस्सेरसिदीप्रमाणें परस्पर द्यावा घ्यावा.

१ सरकारांत दरबारखर्च कारकुनी वगैरे पट्टीबाब जी पडेल ती सरंजामाचे अन्वयें द्यावा घ्यावा. येणेंप्रमाणें कलम १

१ चौघड्याच्या खर्चास सव्वीसशें स्वारांत चिंतामणराव पांडुरंग यानीं पाहोन घ्यावा. कलम १

१ श्रीपतराव मोरेश्वर यांचे तैनातेचे ऐवजीं गांव लावून द्यावा.

१ सन तिसा तिसेन अखेर सालपावेतों छ० २९ जिल्हेजपावेतों समाईक उभयतां एकत्र. छ० १ मोहरम सन मय्या तैन व अलफपासून जमाखर्च ज्याचा त्याकडे. येणेंप्रमाणें कलम १

१ स्वार शेताळीसशेंपैकीं गंगाधरराव गोविंद यांचे हिश्शापैकी तीनशें राऊत जाजती चिंतामणराव पांडुरंग यांजकडे द्यावे असें ठरलें. त्यास शेताळीसशें राऊतांचा सरंजाम नाहीं. कमी आहे. सबब किल्याची नेमणूक व तैनातदार व कैलासवासी तीर्थस्वरूप भास्करपंत आपा यांची नेमणूक अलाहिदा यादीस लिहिली आहे ती खेरीज करून बाकीचा शेरा राऊतांवर बसेल त्याप्रमाणें वीसशें सव्वीसशें हिस्सेप्रमाणें सरंजाम घ्यावा. येणेंप्रमाणें कलम. १

१ अदवानी, बाळापूर थोरलें, कित्तूर येथील सरंजाम सुटल्याउपर सव्वीसशें वीसशेंच्या हिस्सेरसिदीप्रमाणें वांटून घ्यावा. येणेंप्रमाणें कलम १

१/२० उभयतानीं चाकरी सरकारची एकत्र करावी. कलम १

कलमें वीस. सदरहू लिहिलेप्रमाणेंयतान उभीं वर्तावें.
छ० ६ साबान. पौषमास? सु॥ मय्यातैन व अलुफ. सिद्धार्थीनाम संवत्सरे. पौषमास. गुरुवार. मु॥ मिरज.

नं. ५२२३ श्रीगणपति. ( ३ जाने. )

पै॥ छ० ७ साबान. सन मयातैन व अलुफ.

तीर्थस्वरूप राजश्री बाळासाहेब वडिलांचे सेवेसीं. अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। पौष शु॥ ८ पर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. " उभयतांस राजी जाहलों. पत्र लिहून दिलें. यादी ठराविली त्याजवरही मान्य करून दिलें. चिरंजीवानीं मान्य करून दिलें नाहीं. तुम्ही रात्री निघून गेलां. पुढें आम्हीं कसें करावें ? तालुक्यांत रोखेपत्र चिरंजीव रा॥ आपा करितात याचा बंदोबस्त करावा " म्हणोन आज्ञा, त्यास काल आपली आज्ञा घेऊन निघालों ते चिंरजीवाकडे आलों. ती॥ रा॥ दादाही आले होते. माझें व वडिलांचें बोलणें चिरंजीवासीं जालें तें सर्व वे॥ रा॥ बाबा दीक्षित व रा॥ बळवंतराव लेले यांनीं ऐकलेंच आहे. त्यास मी आलों. चिरंजीवापाशीं यादी ठेविल्या. विचार करून सांगतों म्हणोन बोलले आहेत. व तेही इकडे येणार. खर्चाची तरतूद करून येतों म्हणोन बोलले. त्यास त्यांजकडील जसा मजकूर समजेल तदनुसार कळवीन. बहुत काय लिहिणें विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२२४ श्रीगणपति. ( पौष शु० १०–५ जाने. )

पै॥ छ० १० साबान. सन मय्यातैन व अलुफ. पौष.

अपत्यें रामचंद्र परशुराम सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० ९ साबानपर्यंत यथास्थित असे. विशेष. मिरजेहून आवशीचे दीड प्रहर रात्रीचे सुमारें निघालों तों उजाडतां तासगांवीं येऊन श्रीगजाननाचें दर्शन घेऊन तसाच राहुटीस आलों. नंतर काल मंदवारीं प्रातःकाळचे दीड प्रहरीं तेथून कूच करून अस्तमानीं चार घटका रात्रीस पलटणानजीक नावेच्या रेंटऱ्याचे मुक्कामीं आलों. पुढें अदकोस राजश्री गणपतराव व बराऊन साहेब सामोरे येऊन भेटी जाल्या. ते आपले गोटास गेले. आम्ही आपले गोटास आलों. आज आणखी दोन अडीच कोशांचें कूच बहें बोरगांवचे रोखें

केलें. वडिलांस विदित व्हावें याकरितां लिहिलें आहे. कळावें. पलटणांतील सरदार भेट घेऊन गेल्यानंतर त्याणीं खुशालीच्या दहा तोफा केल्या. आज मुक्कामच आहे. चि॥ राजश्री बाबा कोठें आहेत, त्याजकडोन कांहीं पेंढार घेऊन गोपाळ महादेव ( हे ) रत्नाकरपंत व वाघ आहेत त्यांजवर आले म्हणोन जमखिंडीचें लिहिलें आलें, त्यास हल्लीं कोठें आहेत, काय वर्तमान, ते आज्ञा केली पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ५२२५ ( ५ जानेवारी )

धोंडो बापूजी जोशी यांचें बाळासाहेबांस पत्र पौष शु॰ १० चें पुण्याहून.

" पुण्यांत दरवडे पडत होते. मध्यें मना जाले. फिरोन अलीकडे आठ रोज दरवडे मागती रोज पडतात. दोन दोनशें लोक असतात. रात्र जाली म्हणजे लोक भयभीत होतात. "

नं. ५२२६ श्रीगणराज. ( पौष शु॰ ११-६ जाने. )

चि॥ राजश्री हरिपंतबाबा यांसीं प्रती गंगाधरराव गोविंद. आशीर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावें. विशष. अलीकडे तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळलें नाहीं. तर प्रस्तुत तुमचा मोकाम कोठें आहे, राजमंडळाची फौज कोठें आहे, हें ल्याहावें. चि॥ राजश्री रामचंद्रपंत आपा मिरजेहून छ॰ ६ साबान गुरुवारीं कूच करून तासगांवचे मोकामास गेले. तेथून पुढें मंदवारीं कूच करून कुंडलेवरून गेले. पलटणें रेटरेंचे मोकामास आलीं. चिरंजीवाची त्यांची गांठ पडल्याचें पत्र आलें नाहीं.

---

१ उपनाव देवधर. मूळ वास्तव्य वेळंब ता॰ चिपळूण. यांची भाची तासगांवच्या जोगांकडे दिली होती, व जोगांची मुलगी परशुरामभाऊंस दिला होती, म्हणून त्या दोन्ही घरांत त्यांस मामा हें नांव पडलें होतें. पुढें पेंढाऱ्यांची सरदारी मिळाल्यावर मुलखांत हे पेंढारी मामा म्हणून प्रसिद्धीस आले. यानीं भाऊंच्या अनेक स्वाऱ्यांत कामकाज केलें होतें त्याबद्दल त्यांस वसगडें येथें इनामजमीन व प्रांत सावनूर पैकीं परगणे अडूर येथील फडणिशीचा दरख मिळाला. हे शरीरानें धिप्पाड व पराक्रमाचे शक्तिमान् होते. यांच्याच घराण्यांतले आबाजी गोविंद देवधर हे जमखिंडीस मोठ्या हुद्यावर नोकरी करीत असतां १८५७ सालीं त्यांवर बंडाची तोहमत येऊन त्यांचें फार नुकसान झालें. घाटावर आल्यानंतर गोपाळ महादेव देवधर पेंढारी मामा यानीं कुडची येथें घर बांधिलें व तेथच त्यांचे वंशज अद्यापि राहतात.

माणसें पाठविलीं आहेत. गांठ पडल्याचें वर्तमान आलें म्हणजे आपणास कळवितों. राजमंडळचा जमाव पाटणकर व चत्रसिंग दुधगांवनजीक वारणातीरीं खोचीवर आहेत. दुधगांवावर नित्य तोफा आणून मारगिरी करितात. आज तेथून कूच केल्याचें बातमीचें पत्र आलें आहे. तुम्ही रत्नाकरपंत व वाघ यांची बातमी राखोन सावध असावें. रवाना छ० १० साबान. राजश्री रत्नाकरपंत व वाघ यांचा मोकाम हळीइंगळी व तवधडी ( ? ) नजीक श्रीकृष्णेवर आहे. बहुत सावधपणें असावें. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे आशीर्वाद.

नक्कल.

नं. ५२२७ श्रीगणपतिर्जयति. ( पौष शु० १२–७ जाने.)

राजश्री बापूजी तीर्थो कसबे बेहट्टी स्वामी गोसावी यांसीं. सेवक चिंतामणराव पांडुरग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणें. विशेष. आमचा घरगुती जाबसाल अद्याप निल्हेस लागला नाहीं. त्यास कसबेमजकूर येथील सालमजकूरचा ऐवज पाठविणेंविशीं मिरजेहून ती॥ राजश्री काकासाहेबांकडून पत्र आल्यास तिकडे ऐवज न पाठविणें. जर करितां ऐवज पाठविला तर तुम्हांस ( भरून ) द्यावा लागेल हें पुर्तें समजोन वडिलांकडे ऐवज न देणें. रवाना छ० ११ साबान. सुरुसन मय्यातैन व अल्लफ. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

नं. ५२२८ श्री. ( पौष शु० १२–७ जाने. )

पै॥ छ० १३ साबान. सन मय्यातैन व अल्लफ. पौष मास.

श्री॥ राजश्री बाळासाहेब साहेबांचे सेवेशीं.

विनंती सेवक बाळाजी महादेव दामले चरणांवर मस्तक ठेवून शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० ११ साबानपर्यंत स्वामीचे कृपेकरून कसबे रहिमतपूरचें व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्री॥ राजश्री नाना फडणीस यांचें खास पथक पांचशें स्वार व दोनशें पायदळ यांचा मुक्काम मौजे पाडळीवर छ० ९ साबानीं आला. एकदोन रोज मुक्काम होऊन उदईक मौजे डिघीवर मुक्काम येणार. प्रांतांत रोखे करितात याजकरितां पाडळीचे मुक्कामास ( आम्ही ) कारकून पाठविला होता. फौजेंत सरदार राजश्री मोरो सदाशिव साठे आहेत. गांवावर रोखा होऊं नये व मुक्काम होऊं नये हें बोलणें कारकून बोलतांच त्याणीं उत्तर केलें कीं, पेशजी पाऊण लक्षांची

बरात मिरजेवर होती त्यापैकीं कांहीं ऐवज पावला. बाकी राहिला आहे तो येणें आहे तो मिरजकरांचे गांव लागतील त्यांपासून घ्यावयाचा. रहिमतपुराजवळ दहा पांच हजार रुपये घेऊं असें बोलणें त्याणें लाविलें आहे. कारकून याणें उत्तर केलें कीं, हा मजकूर आम्हापाशीं कशास बोलतां ? आपण पुढें जातच आहां. काय जाबसाल जसतील ते मिरजेस बोलावे. येथें बोलल्यानें निर्वाह व्हावयाचा नाहीं. इतकें उत्तर केलें. रहिमतपुरावर मुक्काम होऊं नये यास्तव कारकून लष्करांत आहेच. परंतु मशारनिल्हेचें बोलणें ऐवज घेऊं असें आहे याजकरितां विनंती लिहिली आहे. डिघीवर मुक्काम होणार तेव्हां उपद्रव करितील याजकरितां गांवास उपद्रव घासदाण्याविशीं व या मजकुराविशीं करूं नये म्हणोन जलद पत्र येऊन पोंचलें पाहिजे. येविशीं सांडणीस्वार याजबरोबर पत्र आल्यास जलद पोंहचेल. बहुत काय लिहिणें. सदाशिवपंत कुरणे सातारकर बजाबा शिराळेकर याचे धणी यांचा लेक मोरो सदाशिव हे सरदार आहेत. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२२९ श्रीगणपति. ( ७ जाने. )

पै॥ छ० ११ साबान. सन मय्यातैन व अलुफ.

अपत्यें रामचंद्रानें शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत पौष शु॥ १२ भौमवार मुक्काम बहें श्रीकृष्णा उत्तरतीर येथें आज मुक्कामास आलों. पलटणें दक्षिणतीरीं आहेत. केवळ अनिवार ! कैदेची जात नाहीं. चि॥ राजश्री बाबा जतेनजीक आले. तेथून रविवारचीं पत्रें पाठविलीं तीं काल पावलीं. आज दोन दिवसांत कोठें आले कळलेंच असेल. रत्नाकरपंत व वाघ कोठें आहेत ? त्यांजवर पेंढारी घेऊन देवधर आले त्यांचा काट चालला की नाहीं ते आज्ञा करावी. चि॥ राजश्री बाबा व चिंतामणराव आपा व नारायणराव येऊन मिळतांच इकडे सुरुवात करितों. पलटणांचे सामान फार चांगलें आहे. पुण्यातून पत्रें आलीं त्यांत इंचूरकर व नानांकडील साठे व पेठे व पवार जाधव चालते जाले. सारा जमाव पंधराशें आहे. तोफखाना राजेवाडीकडे गेला असें लिहिलें होतें. कळावें. विदित होय हे विज्ञापना. दुधगांवकडील फौज कोठें आहे, तिकडील काय वर्तमान, ते आज्ञा व्हावी. तोफखान्याचें साहित्य करावें. खर्चाची चिठी उद्यां पाठवितों हे विज्ञापना.

नं. ५२३० श्री. ( पौष शु० १३–८ जाने. )

पै॥ छ० १२ साबान. सन मय्यातैन. पौष.

सेवेशीं आबाजी बच्याजी सा॥ नमस्कार विज्ञापना. तागायत छ० १२ साबानपर्यंत स्वामींचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं बाळू पवार यास येथील पलटणांच्या तोफांचा अजमास पहावयास पाठविला, त्यास तोफा सुमार सत्तावीस व पलटणें पांच याप्रमाणें आहे. पलटणांत जाऊन पवार यास पाहूं देइनात, याजकरितां अजमास लिहून पाठविला आहे. व घोगांवची मनाई घेऊन दिली. गांवची मजला माहितगारी नाहीं. आणि मी येथें बोलून ही ठेविलें आहे. गैरमाहितीनें त्यांनीं रोखा केला, त्यास मनाई देविली. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२३१ श्री. ( पौष शु० १३–८ जाने. )

पै॥ छ० १६ साबान.

सेवेसीं बाळाजी विष्णु सहस्रबुद्धे कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ० १२ साबानपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजी इंग्रजाकडील वकील मालीट होता तो विलाइतेस जाऊन आपल्या पातशहाचीं पत्रें सरकारांत पाठविलीं तीं मुंबईकर जनरालाकडे आलीं. तेथून पुण्यास सरकारांत आलीं. बरोबर टोपीकर चार आहेत. येथें आल्यावर त्यांचें बोलणें सरकारांत पडलें जे, पातशाही पत्रें आणिलीं आहेत, त्यास सरकारचा डेरा बाहेर होऊन श्रीमंतानीं सामोरे येऊन फरमानबाडीचा समारंभ करून श्रीमंतानीं उभ्यानीं पत्रें हातीं घ्यावीं. याप्रमाणें चार रकमा त्यांच्या बोलण्याच्या पडल्या. त्याजवरून श्रीमंतानीं श्रीमंत राजश्री नानांस पुसावयास पाठविलें जे, या इंग्रजांच्या मागील चाली कशा आहेत ? तेव्हां नानानीं मागील चाली सांगितल्या. दिल्लीपर्ताशिवाय सामोरे जाणें अथवा फरमानबाडी करणें ही चाल नाहीं. मागें थोरल्या[1] रावसाहेबांचे वेळेस इंग्रजांच्या पातशाहाकडील पत्र आलें होतें तें टापीकरानीं कचेरीस रावसाहेब यांचे हातीं दिलें. याप्रमाणें चाली असतां नव्याच रकमा बोलण्याच्या काढाव्या या दौलतदारांच्या चाली नाहींत ! तेव्हां इंग्रजांकडील बोलणें पडलें जे, आजपर्यंत चाली चालत आल्या खऱ्या. त्या चालींत इंग्रजांकडील मातबर मनुष्य सरकारांत बोलावयासीं आला असतां त्यास मदारुलमहाम[2] अगर मातबरांतील इस्तकबिल ( सामोरे ) येत गेले. हल्लीं तो पातशाही पत्रें घेऊन आलों आहों. त्यापेक्षां या चारी रकमा वढाव्या. तेव्हां मागती सरकारांतून नानांस विचारावयाकरितां

१ थोरल माधवराव. २ हा नानांचा किताब

पाठविलें. याप्रमाणें आठ दिवस घाटत होतें. नंतर नानानीं चोहों रकमांचीं चार उत्तरें सांगितलीं जे, श्रीमंत सामोरे येणार नाहींत. डेरा देऊन फरमानबाडी व्हावयाची नाहीं. उभ्यानीं पत्रें द्यावयाचीं त्यास इंग्रज पत्रें घेऊन वाड्यांत येतील तेव्हां श्रीमंत इंग्रजाच्या भेटीकरितां कचेरीस येतील. त्या संधींत इंग्रजानीं पत्रें श्रीमंतांच्या हातीं द्यावीं. श्रीमंतानीं पत्रें घेऊन मुनसीच्या हवाला करावीं; आणि खुशालीच्या तोफा शंभर माराव्या असें इंग्रजाचें म्हणणें होतें त्यांपैकीं वीस तोफा सोडाव्या असें ठरोन छ० ११ साबानीं लिहिल्याअन्वयें घडलें. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२३२ श्रीगणपति. ( पौष शु० १३–८ जाने. )

पै॥ छ० १३ साबान. मय्यातैन.

विज्ञापना. येथील वर्तमान ता॥ छ० १२ साबानपर्यंत यथास्थित असे विशेष. वडिली पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. चि॥ राजश्री हरिपंत यांचें तासगांवनजीक पुणदीचे मुक्कामीं येतों असें पत्र आलें होतें. पुण्याचीं पत्रें आलीं. साठे राजश्री नानाकडील पथकांतील पांचशें स्वार घेऊन येतात ते व विंचूरकर याप्रों चालते जाहले. पागा पथकेंही निघावयाची ताकीद होत आहे ऐसें लिहिलें होतें. फलटणें पैल कृष्णातीरीं आहेत. दिनशुद्धि आज रात्रीस आहे. आम्ही अलीकडे मुक्काम करून आहों ते पलीकडे जातों. करवीरकरांकडील जमाव खोची वगैरे त्या सरदेस आहे. घोगावची मनाचिठी घेऊन पाठविली आहे. खिजमतगार कंपूंतील तोफा पाहून आले आहेत. विदित करितील. सामान फार सुंदर आहे. परंतु कैदेची जात नाहीं ! नानांचें पथक रहिमतपुरास आलें म्हणे. यास्तव आज तिकडे माणसें पाठविलीं आहेत. चि॥ राजश्री बाबास इकडे येणेंविशीं लिहिलें आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२३३ श्री. ( पौष शु० १४-९ जाने. )

पै॥ छ० १७ साबान. सन मय्या तैन व अलफ.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेसीं.

विनंती सेवक मोरो सदाशिव सा॥ नमस्कार विनंती येथील क्षेम तागा- छ० १३ साबानपावेतों मु॥ रहिमतपुर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री नाना स्वामीनीं खासपथकसुद्धां ( मला ) श्रीमंत राजश्री आपासाहेब यांजकडे सेवेसीं पाठविलें आहे. येका दो दिवशीं त्यांज-

---

१ पत्र रामचंद्रपंत आपाचें वर्हे येथून बाळासाहेबांस.

पाशीं जाऊन पोंचतों. राजश्री आनंदराव भाऊ हुपरीकर यांजकडे यजमान स्वामींचा ऐवज येणें त्यापैकीं त्यानीं फौजेचे खर्चास वीस हजार रुपये देविले आहेत. आपणही त्यांस सांगून ऐवज देवावा. व आपल्याकडे सरकारचे सरजामपट्टीचा ऐवज येणें त्याजपैकीं खास पथकाचे व फौजेचे खर्चाची वरात पाऊणलक्ष रुपयांची आपल्याकडे आहे तोही ऐवज घ्यावयाची आज्ञा आहे. यास्तव आगाव सूचना लेखन केली आहे. तरतूद होऊन ऐवज स्वार व कारकून यांजकडे देविला पाहिजे. व श्रीमंत राजश्री पंतसचिव यांची वरात चौसाला आपल्याकडे होती त्यापैकीं ऐवज येणें त्याविषयीं पेशजी पत्र आलें होतें त्यांत ऐवज देवितों म्हणोन लेख आला होता. त्यास हल्लीं फौजेचे खर्चाची अडचण जाणोन विनंती लिहिली आहे. ऐवज कारकु-नापाशीं देविला पाहिजे. राजश्री नागोपंत आपा चिकोडीकर यांजकडे चारशें होन राजश्री नारोबा काका यांचे विद्यमानचे येणें त्यापैकीं कांहीं आलें नाहीं. यास्तव आपण त्यांस ताकीद करून सदरहू चारशें होन देवविले पाहिजेत. उमेदराम साहुकार याजकडे तीन हजार रुपये देऊन पुण्याची हुंडी घेतली त्याचा ऐवज पुण्यास पावला नाहीं व येथेंही माघारा दिला नाहीं. यास्तव त्यास पत्र लिहिलें आहे. आपणही त्यास सांगून हुंडीचा ऐवज सकराई नकराई व्याजसुद्धां देवावा. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२३४ श्री. ( पौष शु० १४–९ जाने. )

पै॥ छ० १५ साबान. मय्यातैन.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर रावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य नारो विनायक. सा॥ नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० १३ माहे साबान यथास्थित असों. विशेष. राजश्री रत्नाकरपंत राजाज्ञा व धोंडजी वाघ यांचे खंडणीचे वांटणीकरितां वैमनस्य आलें होतें. त्यास रत्नाकरपंताकडील कारकून जाऊन समजोत करून फौजसुद्धां वाघास परवां बुधवारीं सप्तसागरचे मुक्कामास घेऊन आले. काल उभयतांचा मुक्काम तेथेंच होता. आज कूच होतें न होतं पहावें. राजश्री धोंडोपंत गोखले सावनुराहून निघाले. इकडे येणार अशी बोलवा आहे. त्यास गोखले यांचा येण्याचा संकेत खचित आहे किंवा कसें, येण्याचें जाहल्यास कोणत्या रोखें येतील, हें कळविलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती. ( वाघ व राजाज्ञा ) उदईक कूच करून एनापुराकडे येणार असें वर्तमान आहे. हे विनंती.

नं. ५२३५ ( पौष शु० १५-१० जाने. )

नारो विनायक यांचें अथणीहून मिरजेस बाळासाहेबांस पत्र छ० १४ साबानचें--

"पलटणें व राजश्री रामचंद्रराव आपा यांचा मुक्काम बर्हे बोरगांवावर आहे. राजश्री बाबाही त्यांस जाऊन मिळणार व राजश्री चिंतामणराव आपा मिरजेहून कूच करून गेले. लौकरच जाऊन पोचतील. राजश्री नारायण रावही जाणार" म्हणोन लिहिलें तें कळलें. राजश्री रत्नाकरपंत व वाघ यांचा मुक्काम सप्तसागरावर होता. काल कूच होऊन रत्नाकरपंत कुडचीचे सुमारें गेले. वाघ विजापुराकडे जाणार म्हणोन कृष्णा उतरून सत्तीवर आले, येविशींचें अलाहिदा पत्रीं लिहून येथील गड्यासमागमें पत्र दिलें आहे त्याज-वरून सविस्तर कळेल."

नं. ५२३६ श्री. ( पौष शु० १५-१० जाने. )

पै॥ छ० १७ साबान. सन मय्या तैन. पौष.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर राव जी स्वामीचे सेवेसी

पोष्य नारो विनायक सा॥ नमस्कार विनंती येथील कुशल ता॥ छ० १४ माहे साबान यथास्थित असे. विशेष. राजश्री रत्नाकरपंत राजाज्ञा व धोंडजी वाघ यांचा मुक्काम सप्तसागरावर होता. त्यास करवीराहून रत्नाकर-पंतास माघारे येणेंविशीं महाराजांचीं पत्रें आलीं. वाघासही रत्नाकरपंतानीं समागमें बोलाविलें. त्यास रत्नाकरपंत " खर्चास देतों. किल्ला यावयाचा त्याचा मजकूर महाराजांचे कानावर घालून काय तें सांगूं " असें म्हणूं लागले तेव्हां वाघ म्हणूं लागला जे, चार दिवस विजापुराकडे जाऊन गुदराण करितों असें म्हणूं लागला. काल कूच होऊन रत्नाकरपंत कुडचीचे सुमारें गेले. पुढें मिरज प्रांतांत आवाडाव करीत जाणार. वाघ कूच करून काल सत्तीनजीक आले. विजापुराकडे जाणार म्हणतात. इकडील तालुक्यास उप-सर्ग लागूं नये असें बोलणें आहे. परंतु केवळ भरंवसा करितां येत नाहीं. या रोंखावर कांहीं फौज येती तर पराभव होता. परंतु तिकडे मसलत आहे त्यापक्षीं तो अर्थ घडणार नाहीं. प्रजेचा भोग आहे! याउपर वाघ कोणीकडे जातो व प्रांताची अवस्था काय होते पहावें. बहुत काय लिहिणें. कृपा लोभ करावा हे विनंती.

नं. ५२३७ श्री. ( पौष व० १-१२ जाने. )

पै॥ छ० १९ साबान. मय्यातैन.

[1]विज्ञापना ऐसी जे. मुंबईकर जनरलाजवळचे मुनसी श्री॥ राजश्री रावेंसाहेब यांणीं आकारण करून आणविले आहेत. बरोबर चार पांच असामी आले आहेत. अद्यापि बैठक होऊन बोलणें जालें नाहीं. जाल्यावर समजण्यांत आल्यास मागाहून सेवेशीं लिहून पाठवीन. सूचनार्थ लिहिलें आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२३८ श्री. ( पौष व० १–१२ जाने. )

पै॥ छ० १६ साबान. सन मय्या तैन.

[2]विज्ञापना ऐसी जे. राजश्री सर्जेराव घाटगे शिंद्याकडून अटकेंत होते ते छ० ८ साबानीं मुक्त जाले. दौलतरावानीं आपल्या डेऱ्यास सुटल्या दिवशींच नेले. वस्त्रें कंठी शिरपेंच याप्रमाणें बहुमान जाला. त्यांच्या जातीस सरंजाम लावून द्यावा, तेथें त्यांणीं स्वस्थ असावें, याप्रमाणें बोलण्यांत ठरलें आहे. पुढें अमलांत काय येतें पहावें. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२३९ श्रीगणपति. ( पौष व० २–१३ जाने. )

पै॥ छ० १७ साबान. सन मय्या तैन व अलुफ.

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता॥ छ० १७ साबानपर्यंत यथास्थित असे. विशेष. आज मौजे बहें येथील मुक्कामींहून चिरंजीव राजश्री चिंतामणराव आपा, हरिपंतबाबा व आम्हीं पलटणेंसुद्धां कूच करून शिराळ्याचे रोखें गेलों. पुण्याचीं पत्रें आलीं तीं पहावयाकरितां तीन पुरवण्या पाठविल्या आहेत. सरकारचा तोफखाना निरेचे तीरीं वडगांवचे मुक्कामीं आला. व राजश्री नानांकडील पथक घेऊन रा॥ मोरोपंत साठे येतात ते विंचूरकराचें पथकसुद्धां मौजे सुरली नजीक-कराड येथें आले. एक दो रोजांत येऊन मिळतील. तिकडील वर्तमान वाघ व रत्नाकरपंत कोठें आहेत हें ल्याहावयाची आज्ञा जाहली पाहिजे. करवीरकरांकडील चव्हाण व पाटणकर किनई घुणकीवर आहेत. उदईक केळाचे ऐंतवडेंनजीक मुक्काम नेमला आहे. मुक्कामास गेल्यावर तेथील रागरंग समजेल तसें शिराळ्यावर जाऊं अगर फौजेवर जाऊं. वडिलांचे आशीर्वादेंकरून घडेल तें लिहीन. तोफांचें काम चालतें व्हावें. तूर्त कांहीं खर्चास पाहिजे त्याजपैकीं दोन हजार रुपये विठ्ठल अनंत याजकडून आणून

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र धोंडो बापूजी जोशी यांचें पुण्याहून. २ अमृतराव याणीं. ३ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र धोंडो बापूजी जोशी याचें पुण्याहून.

घ्यावेत आणि काम चालवावें. वरचेवर भरणा करितों. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२४० श्रीगणपति. ( पौष व० ३-१४ जाने. )

पै॥ छ० १९ साबान सन मय्या तैन अलुफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. भौमवार, ऐसी जे, वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें तें पावलें. रत्नाकरपंत व धोंडजी वाघ यांजकडील बातमी लिहिली ते कळली. घाटग्याचे मजकुराचीं पुण्यास पत्रें सूचनार्थ जावयाविशीं लिहिलीं त्याप्रों पत्रें पाठविलीं. आम्ही छ० १७ साबानीं येथील मुक्कामींहून कूच करून शिराळ्यानजीक मुक्कामास आलों. कालचे अस्तमानीं मुहूर्त तोफा लावावयास होता त्यामुळें तोफा लाविल्या आहेत. छबिन्याचा वगैरे बंदोबस्त करून हुशार राहतों. बापू खिजमतगार याजबरोबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. वाघ उधळून गेला, त्यास प्रस्तुत कोणे ठिकाणीं आहे, पुढें कोणें रोखें जाणार, ते आज्ञा करावी. रत्नाकरपंत मंगावतविर आले, त्यास कोठवर आले ते आज्ञा करावी. बापूस उद्यां पाठवितों. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२४१ ( पौष व० ५-१५ जाने. )

नारो हरि करंदीकर याचें करवीराहून पत्र--

"हुजूरची खासा स्वारी आज बुधवारीं निघावयाचा बेत दोन प्रहरानंतर जाला आहे. तिकडील फौजेचा वाटेगांवावर मुक्काम आहे. इकडील फौज कोडोली पारगांवच्या मुक्कामीं आहे. राजाज्ञाही फौजेंत येऊन मिळणार."

नं. ५२४२ ( पौष व० ५-१५ जाने. )

नारो हरि करंदीकर याचें करवीराहून पत्र--

"सारे फौजेचा मुक्काम शिराळ्यानजीक गेला. शिराळें लढत आहे. राजश्री नारायणराव घोरपडे यांस रहावयाकरितां व मुलें माणसें ठेवावयाकरितां बहिरवगड नेमून महाराजानीं दिला. खासा स्वारी निघावयाचा अनमान आहे. जावें असेंही म्हणतात."

नं. ५२४३ ( पौष व० ५-१५ जाने. )

नारो हरि करंदीकर याचें करवीराहून पत्र—

" धोंडजी वाघ याचे समजुतीबद्दल पाच्छापूरचे ठाण्याच्या सनदा करून त्याजकडे पाठविल्या आहेत. धोंडजी येणार असें लोक बोलतात. शिराळ्यास अद्यापि ठाणें पडलें नाहीं. राजाज्ञा यांचा मुक्काम काल वड-

गांवावरी होता. आज कोडोली पारगांवच्या मुक्कामीं जाणार. हिंमतबहाद्दर तेथेंच चतुरसिंग फौजसुद्धां आहेत. तोफखाना सरकारचा व विंचूरकरांचें पथक वगैरे मागाहून कोण कोण पथकें आलीं हें कळविण्याची आज्ञा व्हावी. धोंडोपंत गोखले यांचा पुतण्या दोन हजार फौज व हजार पायदळ व दोन तोफा येणेंप्रमाणें सरंजामानिशीं गोटेंच्या सुमारें आले. हुजुराची स्वारी बुधवारीं निघणार होती. महकूब होऊन गुरुवारीं निघावयाचें बोलवा आहे. ”

नं. ५२४४ ( पौष व० ५– १५ जाने. )

नारो हरि करंदीकर याचें करवीराहून पत्र––

“ मनोळीच्या ठाण्याची किल्लेदारी राजश्री खंडेराव भोसले यांजकडे आहे. त्यास भोसले यांची मुलेमाणसें करवीरीं असावीं, भोसले याणीं ठाण्यांत लोकसुद्धां सडे असावें, असा करार होता. परंतु भोसले याणीं युक्तीनेंच मुलेंमाणसेंसुद्धां निघोन मनोळीस गेले. हल्लीं वाघ याचीं मुलेंमाणसेंहि मनोळींतच आहेत. तळूरकर देसाई, चंद्रापा व भोसले व वाघ यांचें संमत एक आहे. मुरगोडाकडे तळूरकराचा जमाव व कांहीं कित्तूरकराचा. मनोळीच्या ठाण्यांत हजार प्यादा काटक त्या प्रांतचा आहे. हुजूरचे लोक शंभर सवाशें मात्र आहेत. हल्लीं भोसले हजार आठशें प्यादा व दोनशें स्वारांनिशीं राजाज्ञा यांजवळ आहेत. सालमजकूरचा मनोळीचा ऐवज एक पैसा भोंसले याणीं सरकारांत अथवा राजाज्ञांस दिला नाहीं. शिबंदीस खर्च जाला म्हणतात. आपणांस सरंजामास मनोळी लावून द्यावी, पांचशें स्वार व हजार प्याद्यांनिशीं चाकरी करितों असें भोसले याणीं बोलणें लाविलें. त्यास राजाज्ञा याणींहि नाद लावून येथपर्यंत आणिलें. हल्लीं हुजूरनें मनोळी भोसले यांजकडून काढून रायाजी जाधव यांजकडे वहिवाट सांगितली. जाधव यांचा कारकून मनोळीस गेला त्यास प्याद्यानीं आंत घेतला नाहीं. मनोळीचा किल्ला बदलला. भोसले अटकाविले तरी तूर्त किल्ला यांच्या हुकमांत येतो असें नाहीं. ”

नं. ५२४५ ( पौष व० ५–१५ जाने. )

नारो हरी करंदीकर याचें करवीराहून पत्र––

हुजूरची खासा स्वारी बुधवारीं निघणार. हिंमतबहाद्दर घुणकीवरून कूच करून कोडोली पारगांवाच्या सुमारें आले. तिकडील फौज शिराळयाचे रोखें वाटेगांवच्या मुक्कामास आली. राजाज्ञांस

हिंमतबहाद्दरांस जलदीनें जाऊन मिळण्याविशीं आज्ञापत्रें गेलीं आहेत. शिराळ्यापर्यंत तिकडील फौजा तलाव्यास येत आहेत. फौजेचा अजमास राजाज्ञांसुद्धां पांच हजारांचा आहे चतुरसिंग सह. चतुरसिंगाचे लोक फुटत चालले. कारण त्यांचीं घरेंदारें व बायका पोरें तिकडील तालुक्यांत आहेत. महाराजांजवळ चार माणूस चांगलें आहे व शेर जाले आहेत. दम भारी बाळगितात. एक वेळ लढाई खातरजमेची घ्यावी असा चार मानकरी यांचा व मुख्याचा मानस आहे. राजाज्ञांचा व वाघाचा बिघाड जाहला. कारण वाघानें आडमुद्दे घातले कीं, तूर्त पन्नास हजार रुपये खर्चास द्यावे व दरमहा लाख रुपये खर्चास द्यावे. त्याची निशा सावकारी द्यावी. व मनोळीचा किल्ला रहावयास द्यावा. हे मुद्दे राजाज्ञा यांचे वस्तु कबूल न करवत, सबब तो फुटोन राहिला."

नं. ५२४६ ( पौष व० ५-१५ जाने. )

नारो हरि करंदीकर याचें करवीराहून पत्र—

"सखाराम घाटगे कैदेंत होते, त्यास हल्लीं मोकळीक जाली हें वर्तमान आलेवर येथें खुशालीची शर्करा वांटली. आणखी वर्तमान बोलतात कीं, "पेशजी रामजी पाटील याजकडे शिंद्यांकडून सरकारांत बोलण्याचें काम होतें तें हल्लीं घाटगे यांजकडे जालें. वस्त्रें जालीं." त्यास असें तो होऊं नये असें वाटतें. परंतु न कळे ! हुजुरून अकाराम यादव, विश्वासराव घाटगे, सर्जाराव याजकडील कारकून आपाजीपंत, यांस घाटगे याजकडे पाठविले आहेत. कारण सखाराम घाटगे याणीं इकडील साहित्य करावें व मसलत फिकी पाडावी. मुख्य शिंदे यांजवळ धर नाहीं. क्षणभंगुर विचार आहे. त्यास घाटगे याचें पेशजीप्रमाणें जालें असतां मग विचार कळतच आहे ! मोकळीक मात्र जाली हें खरें. परंतु खटलेखोर मनुष्य ! उगेच राहणारे नव्हत. याकरितां सूचना लिहिली आहे. दुष्ट स्वप्न पडलें असतां विष्णुस्मरण करावें या अर्थें लिहिलें आहे. येविशींचा बंदोबस्त पुण्यांत पुर्तेपणें असावा."

नं. ५२४७ ( पौष व० ५-१५ जाने. )

नारो हरि करंदीकर याचें करवीराहून पत्र—

"पुण्याहून येथें मजकूर समजण्यांत आला तो—

'राजश्री रत्नाकर अण्णाजी पुण्याहून येऊन चार रोज जाले. त्यांतील वर्तमान कीं, आत्माराम धोंडदेव व रत्नाकर अण्णाजी उभयतां इकडील मजकूर बोलावयास श्री॥ राजश्री बाजीरावसाहेब यांजकडे गेले होते. श्रीमं-

तानीं बोलणें आयकितां उभयतांच्या बरोबर खिजमतगार देऊन बाळोबा पागनीस व नाना यांजकडे पाठविलें. "जें बोलणें असेल तें उभयतांजवळ बोलावें. इकडे यावयाचें कारण नाहीं." उभयतांकडे खिजमतगारानें उभयतांस नेऊन रुजू केलें. उभयतांच्या बोलण्याचा भाव कीं, तहाचा जाबसाल बोलावयाचा नाहीं. करवीरच्या मुक्कामीं रामचंद्र परशुराम यांजवळ बोलावा. नंतर चक्रदेव यांजकडे गेले. त्यास उभयतांच्या सांगण्यांत कीं, "आठ लक्ष रुपये रामचंद्र परशुराम याणीं फौजेच्या खर्चास कबूल केले आहेत ते तुम्ही द्यावे म्हणजे पेशजी चिकोडी मनोळीखेरीज करून तीन लक्षांचा प्रांत नवा द्यावयाचा याजप्रमाणें बोलणें होतें त्याप्रमाणें करून देतों. नानांच्या कर्जास ऐवज द्यावा" असें रत्नाकर अण्णाजी सांगतात. परंतु पर्याय पहातां बोलणें व्हावें असा रंग दिसत नाहीं. हल्लीं मशारनिल्हे येथें चक्रदेवांचा नाद सांगतात त्यांतील भाव आपण पुण्यास बोलावयास गेलों आणि आपणाकडून बोलणें जालें नाहीं असें नाकारपण आणून कां घ्यावें ? तेव्हां त्यांजकडूनच बेरजेच्या धोरणानें बोलणें थकलें असें दाखवावें. आठ लक्ष व नानांकडील दोन लक्ष ऐसे दहा लक्ष रुपये कोठे आहेत ? तेव्हां हुजूरचें म्हणणें पडलें कीं, दहा लक्ष रुपये असते तरी आणखी पंचवीस हजार फौज ठेवून आणखी राज्य सोडाविलें असतें ! तेव्हां कांहींच घडावयाचें नाहीं असा रंग दिसतो.

१ राजश्री बळवंतराव खांडेकर याचींहीं पत्रें पुण्याहून पंधरा दिवसांत दोन चार वेळां आलीं त्यांच्याही लिहिण्यांतील भाव जे, अमात्यानीं कोंकणप्रांत नागविला आहे तो नागावा झाडेनिशीं द्यावा. व ( नानांच्या ) कर्जाचा ऐवज व्याजसुद्धां फडशा व्हावा, आणि करवीरास शह बसला नाहीं तों पूर्वीं पुण्यांत बोलणें पडावें. तें खचीत जसें ठरेल तसें वर्तावें. अशी खातरजमा होत असलियास येथें बोलणें होईल. करवीरास शह बसला तर मग पुण्यांत बोलणें व्हावयाचें नाहीं. मग जें होणें तें रामचंद्र परशुराम यांजवळ व्हावयाचें असा मजकूर आहे. त्यास हा देखील विचार निदर्शनास आलेविना ( महाराजांस ) सत्य वाटत नाहीं. जेव्हां साऱ्या फौजा करवीरानजीक येतील तेव्हां खरें भासेल ! आतां मसलतीस दिवसगत होऊं नये. जितकी त्वरा तितकी उपयोगी आहे. येथें शहर पडला म्हणजे पुण्यांतील बोलणीं रहातील. पुण्यांतही श्रीमंत व शिंदे व सरकार नि॥ कारभारीमंडळी सर्वांच्या समुच्चयें-

---

१ नाना व बाळोबा यांच्या.

करून मसलत जाहली आहे. परंतु चक्रदेव व बजाबा शिराळेकर वगैरे कोणी कोणी अपाय करण्याच्या साधनांत आहेत. याजकरितां पुण्यांतील पक्केपणाचा बंदोबस्त आहेच. परंतु आणखी बळकटी होत असावी. शिंदे मंडळ मतलबी. हा पंथ पूर्वापार त्यांचे दरबारचा आहे. सर्व स्वामींच्या ध्यानांत मजकूर आहे. मी लिहून कळवावें असा अर्थ नाहीं. वारंवार जिकडे सूचना व्हावयाची तिकडे होत असावी."

नं. ५२४८ (१७ जाने.)

रमाबाई इचलकरंजीकर यांचें मिरजेस बाळासाहेबांस पत्र पौष व० ७ चें—

"काल संध्याकाळीं एक गृहस्थ करवीराहून आला त्याणें सांगितलें कीं, गुरुवारीं शिराळें हल्ला करून घेतलें. सात आठशें माणूस आंत होतें तें जायां जाहलें म्हणतात. इकडील फौजा जाखल्या पोकळ्यानजीक आहेत म्हणतात."

नं. ५२४९ श्रीगणपति. (पौष व० ६–१६ जाने.)

पै॥ छ० २१ साबान. मय्या तैन व अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २० साबान अडीच प्रहर दिवस यथास्थित असे. ठाणें शिराळें येथें मोर्चे देऊन तोफा लाविल्याचें पेशजी लिहिलेंच होतें. त्यास आजच बराऊनसाहेब याणीं हल्ला करून ठाणें दोन प्रहरीं घेतलें. आंतील माणूस जायांजखमी फार जाहलें आहे. सविस्तर मागाहून लिहून पाठवितों. रत्नाकरपंत कोणे ठिकाणीं आहेत ते आज्ञा करावी. हे विज्ञापना. दारू शिशासाठीं परवां लिहिलें होतेंच. तर दारू, शिसें व बाण नवे लौकर पाठवावे. राजश्री नाना यांजकडील मोरोपंत साठे व पेठे व विंचूरकर यांचीं पथकें येऊन पावलीं. याउपर वारणेअलीकडे (करवीरकरांचे) ठाणें नाहीं. पुढें लढाईचा मुकदमा होईल यास्तव बाण लौकर आले पाहिजेत. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२५० श्रीगणपति. (पौष व० ८–१८ जाने.)

पै॥ छ० २३ साबान सन मय्या तैन अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसा॥ नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० २२ साबानपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. रत्नाकरपंत इकडे करवीराकडे आल्याचें व वाघ कोल्हार ममदापुराकडे जाणार येविशींचें लिहिलें तें कळलें. ऐशियास रत्नाकरपंत याच रोखें ग्रेथें

वारणातीरीं पाटणकर वगैरे आहेत त्या जमवांत आपले जमावानिशीं येऊन मिळाले. शिराळ्याचें ठाणें हल्ला करून घेतल्याचें व राजश्री नानाकडील व विंचूरकर पेठे यांजकडील पथकें शिराळ्याचे मुक्कामीं येऊन पोंचल्याचें विनंतीपत्र पाठविलें आहे. पोंचलें असेल. बातमी राखण्याविशीं आज्ञा, त्यास वरचेवर बातमी आणवीत आहे. तोफखानाही घाट चढोन पुसेसावळीच्या मुक्कामीं आला. सरंजाम पोक्त जाहला. खर्चाची मोठी ओढ आहे. नारोपंत करंदीकरास पत्र लिहिलें आहे. प्रविष्ट जाहलें पाहिजे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२५१ श्रीगणपति. ( पौष व० ९–१९ जाने. )

पै॥ छ० २४ साबान. मघ्या तैन व अल्फ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ० २३ साबानपर्यंत मुक्काम शिराळें यथास्थित असे. विशेष. हें ठाणें बसलें. पुढें कूच व्हावयाचें, त्यास पलटणांतील सरदारांचें बोलणें पडलें आहे कीं, ठाणेंमजकुरीं दारूगोळा खर्च जाहला तो येऊन कारखान्यांतील संदुखा भरल्याखेरीज कूच व्हावयाचें नाहीं. याजकरितां मुद्दाम येथून सांडणिस्वार असामी ५ पांच सेवेशीं पाठविले आहेत. तरी तेथें इकडील दारूचें दास्तान आहे त्यापैकीं दोन खंडी दारू वजन पक्कें या सांडणी व आणखी तेथील सांडणी व एक दुसरा उंट देऊन दारू जलद लष्करांत येऊन पोहोंचे अशी आज्ञा जाहली पाहिजे. दीड खंडीस तो कमी येऊं नये. येविशीं पुण्यासही मागें लिहिलें होतें. हल्लींही जलद माणसें पाठविलीं आहेत कीं कोणे गोष्टीची आड न धरतां हुकमाप्रमाणें करीत जाणें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं. ५२५२ पौष व० १०–२० जाने. )

पै॥ छ० २४ साबान. इंदुवासर.

विज्ञापना ऐसी जे, महादजी शिंदे यांच्या बायकांवर मारेकरी कोणी घातले होते त्याणीं चतुर्थी मंगळवारीं पहांटेचे प्रहररात्रीस यमुनाबाई धाकटी बायको इजवर निजल्या जाग्यास हात चालविला. पाठीवर तरवारीचा वार भारीच आहे. गलबल झाली तेव्हां एक मारेकरी ठार जाला. एक जखमी आहे. एक शाबूद सांपडला. चौकशी करितां सर्जेराव याचें नांव त्याणें लिहून दिलें. याखेरीज दुसरे कोण आहेत याचें ठिकाण अद्यापि लागत नाहीं. सर्जेराव सुटल्यानंतर येथून दोनचार पुर्बे जुने ओळखीचे

१ वानवडीहून शिंद्यांच्या छावणीतून.

चाकरीस रहावयाकरितां बायांकडे गेले. बहुतां दिवसांचीं जुनीं माणसें म्हणोन देवडीवर चाकरीस ठेविले. त्यांणींच हें कर्म केलें. त्याजवरून सर्जेराव यास जामगांवास पाठवावें हा एक पक्ष, अथवा त्याच्या पोटापुरतीं दहा पांच हजारांचीं खेडीं द्यावीं, तेथें जाऊन त्याणीं रहावें, हें बोलणें पहिलें होतें. आतां काय घडतें पहावें. सर्जेराव सुटल्या दिवसापासून पूर्व-रंगांतच आहेत. कालपासून राजश्री दौलतराव व धोंडीबादादा एक जागांच आहेत. तात्या ( बाळोबा ) आपले वाड्यांत आहेत. चौकी पहाऱ्याचा बंदोबस्त करून आपले जागां हुशार आहेत. कारण कंपूवाले बायांस जामीन आहेत ते हें वर्तमान ऐकून बहुत बिथरले आहेत. कोण रंगास जातें पहावें. मारेकऱ्यांच्या गळबलींत एक कुणबीण ठार जाली. बाईची जखमही भारीच आहे. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२५३ ( २० जानेवारी. )

श्री॥ राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं

विनंती सेवक धोंडो बापूजी जोशी शिर सा॥ नमस्कार विज्ञापना तागायत पौष व० १० पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. सर्जेराव बापू कैदेमध्यें होते ते शिंदे याणीं सोडून वस्त्रें व जवाहीर दिलें त्यास दहा बारा रोज जाले. बायांचा मुक्काम भीमेवर होता. जवळ कंपूचीं दोन पलटणें व दोन हजार फौज, शिवाय शागीर्द पेशा व आंतील चौकीस हिंदुस्थानी मेवाती लोक होते त्यांजपैकीं चौघेजण मेवाती यानीं दुसरेची गोष्ट शिंद्या-कडील मुत्सद्यांची ऐकून बायांस जिवें मारावें याजप्रमाणें होऊन चौघांनीं मिळोन सायंकाळचे समयीं सहा घटका दिवसास चौघी बाया आहेत त्यांजमधून एकीस तीन वार लागले, एक खांद्यावर भारी आहे. हातावर व पाठीवर एकून तीन वार लागले. दुसऱ्या बायांस दगा करावा तों गुल जाली. बाया पळोन कना-तेच्या आंत गेल्या. व तिकडून कंपूच्या चौकीकडे आल्या. पाठीस मारेकरी लागले. इतक्यांत बायांचे खिजमतगारानें एकास जिवें मारिलें. तिघे मेवाती मारेकरी सांपडले. त्याजवरून मग तेथें चौकशी केली तेव्हां चौदा असामींचीं नांवें त्याणीं लिहून दिलीं. सर्जेराव, बाणाजी शेट्ये, विठ्ठलपंत, कृष्णराव बक्षी व मोदी वगैरे येथील आणि बायांजवळ लोक आहेत त्यांतील चौकी-दार व कांहीं दफेदार व जमादार असे आहेत. ऐसी याद लिहून तेथील पलटणवाल्यानीं कंपूकडे पाठविली. त्याजवरून कंपू अडून बसला आहे. आम्हीं व राजश्री बाळोबा व आबामध्यें दरम्यान राहून बायांस येथें आणून

समजी करून ठेविल्या. मध्यें जामीन आम्ही असतां मारेकरी घालून नाश करावयाचा माकुल ! मारेकरी याणीं याद लिहून दिली. उत्तम आहे. आपला पैका टाकून देणें. तुम्हांपाशीं रहात नाहीं. शेर मिळेल तेथें जाईन. बाया याउपर गेल्यास आपला जिमा नाहीं. याजप्रमाणें कंपूवाला अडोन बसला आहे. राजश्री बाळोबा तात्या यांचेंही याच अन्वयें बोलणें "कारभार करीत नाहीं. ( वाटेल तर ) मला बिडी घालून किल्यावर ठेवणें. मनस्वी गोष्टी होऊं नयेत त्या होऊं लागल्या ! मला कारभार नको." काशीयात्रेस जाण्यास निरोप मागतों. कंपूवाला बाळोबास म्हणतो कीं तुम्ही आम्ही जामीन. त्यास मी आपला पैका घेतों. तुम्ही आम्ही येथून जाऊं. तुजला एकट्यास मी जाऊं देणार नाहीं. असें कंपूचें व तात्यांचें बोलणें आहे. नाहीतर यादी-प्रमाणें असामी आमचे हवालीं करावे. आम्ही पारिपत्य करूं. याप्रमाणें आज पांच चार रोज जाले. राजश्री नानांकडेही पत्र तात्यांचें व कंपूचें आलें कीं, येथें प्रकार असा घडला, यास उपाय काय तो सांगावा. असें जालें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२५४ श्रीगणपति. ( पौष व० १०–२० जाने. )

पै॥ छ० २७ साबान. सन मय्यातैन व अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० २४ साबानपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं आशीर्वाद पत्र पाठविलें तें पावलें. बाणांचा मजकूर व धोंडजी वाघाचें वर्तमान लिहिलें तें कळलें. राजश्री नारो हरि यांचीं पत्रें आलेलीं पहावयास पाठविलीं तीं पाहून पाठविलीं आहेत. शिराळ्याचें ठाणें घेतल्यानंतर पुढें करवीरचे रोखें वारणापार व्हावयाचें असा बेत असतां ठाणेंमजकुरीं दारूगोळा खर्च जाहला आहे तो भरल्याविना कूच व्हावयाचें नाहीं याप्रमाणें फलटणवाल्यांचें म्हणणें पडलें, त्यावरून मुक्काम करणें प्राप्त होऊन याच मुक्कामीं आहों. आणि हा मजकूर वडिलांस लिहून सांडणीस्वांर दारू आणावयाकरितां पाठविले आहेत. त्यांची रवानगी सत्वर व्हावी. दीड दोन खंडी दारू आली पाहिजे. सांडणीस्वांर पाठविले आहेत त्यांशिवाय आणखी एक दोन उंटें लागतील तीं देऊन रवानगी जाहली पाहिजे. ती॥ राजश्री विनोबा आबा व हरबाअण्णा व चि॥ राजश्री यशवंतराव याप्रों काल लष्करांत आले. 'लुटार फार मिळालें. बंदोबस्त चांगला राखावा,' म्हणोन आज्ञा केली, त्यास आज्ञे-प्रमाणें करितों. पुण्याहून पत्र आलें तें पाठविलें आहे. पाहून पाठवावें. ईश्वर-

इच्छा प्रमाण ! विदित होय हे विज्ञापना. तोफखान्याचें काम चालीस लागलें तें लिहिलें तें कळलें. इकडेही लोखंड व लांकडांचा शोध घेतों. हे विज्ञापना.

नं. ५२५५ ( पौष व० ११–२१ जाने. )

नारो हरि करंदीकर याचीं करवीराहून २५ साबानचीं पत्रें आलीं त्यांतील उतारे--

१ "पुण्याकडील पथकें राजश्री नानांकडील व विंचूरकर चि॥ राजश्री रामचंद्रपंत आपा यास येऊन मिळालीं. तोफखानाही सरकारचा समीप आला. राजश्री धोंडोपंत गोखलेही इकडे यावयाकरितां सावनुराहून निघाले" म्हणून आपण लिहिलें तें कळलें. शिराळ्याचें ठाणें पडलें असें लिहिलें तेंही कळलें."

२ हुजूरची खासा स्वारी काल इंदुवारीं करवीराहून तिसरे प्रहरीं केदारलिंगाच्या डोंगरास जाण्याकरितां निघाली. चव्हाण व राजाज्ञा यांमध्यें कांहीं वांकडें आलें आहे त्याचे समजुतीकरितां जाणार. त्या दोघानीं केदारलिंगाच्या डोंगरास यावें असा संकेत आहे कोणी म्हणतात कीं स्वारी लष्करासही जाणार. वाड्यांतून स्वारी निघाली ते समयीं एक ब्राम्हणाचें मूल रूदंती करीत पुढें आलें हा शकून जाला. नंतर श्री अंबाबाईचें दर्शन घेऊन जाण्याच्या बेतानें देवालयासमीप आले असतां दर्शन न घेतां तसेच गेले. कोणी कोणी अर्ज केला त्यांस उत्तर केलें कीं, येतेसमयीं दर्शन घेऊं. असें बोलोन गेले. तिकडील लष्करावर कांहीं छाप्याचें संधान करावें यास्तव गेले आहेत. फौजेंत गवगवा पडला, चव्हाण व राजाज्ञा या उभयतांचे वडीलकीवर काम होत नाहीं तेव्हां आपणच लष्करांत रहावें असें म्हणतात."

३ " आकाराम यादव यांस पुण्यास घाटगे यांजकडे रवाना केलें म्हणोन पेशजी लिहिलें होतें. त्यास करवीराहून निकडीनें रवाना मात्र केलें, परंतु मार्गाच्या दहशतीमुळें अद्यापि लष्करांतच आहेत. तेथून पत्रें घाटगे यांस लिहिलीं आहेत व घाटग्यांची मातुश्री लक्ष्मीबाई इनेंही पत्र लिहिलें आहे. या पत्रांचीं उत्तरें आल्यावर यादव जाणार. घाटगे यांचे सुटकेबद्दल शिंदे याणीं व त्यांची स्त्री घाटगे यांची कन्या हिनें दोन उपोषणें केलीं, तेव्हां घाटग्याची सुटका जाली ! नंतर शिंदे याणीं घाटग्यास सरंजामाबद्दल पन्नास हजार रुपये दिले. पुढें कारभारांतही मन घालणार असें येथें वर्तमान बोलतात. त्यास घाटगे यांच्या हातुन फौजा माघाऱ्या जावयाची अनुकूलता जाल्यास घाटगे यांच्या पुत्रास महाराजांची कन्या द्यावी हें

अतंर्यामीचें संधान चाललें आहे. याजकरितां सूचना लिहिली आहे. वाटगे उपद्व्यापी पुरुष! याजकरितां पुण्याकडील बंदोबस्ताविशींची सावधगिरी असावी. राजश्री बळवंतराव खांडेकर यांचीं पत्रें पुण्याहून आलीं त्यास दोन रोज जाले. त्यांतील वर्तमान नानांकडील कर्जाचा ऐवज द्यावा. शिवाय नानास व बाळोबांस व शिंद्यांस व श्रीमंतांस दरबारखर्च करावा. कोंकणचा नागावा द्यावा व कै॥ भाऊसाहेब यांजकडील जितकी खराबी जाली असेल तितकी द्यावी. व मागील तहापैकीं बाकी राहिलेला ऐवज. याप्रमाणें फडशा होत असल्यास नंतर तहाचा जाबसाल करावा. त्यास इतके जाबसाल घडावयाचे नाहींत त्यापेक्षां तह कशानें होतो? आणखी तीन पलटणें व दोन हजार फौज शिंद्याकडील रवाना जाली हें वर्तमान खचित आहे."

नं. ५२५६ श्री. ( २१ जाने. )

पै॥ छ० २ रमजान. सन मय्या तैन व अलफ.

सेवेसीं धोंडो बापूजी जोशी दोनी कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत पौष व॥ ११ पावेतों वर्तमान बालकाचें यथास्थित असे. विशेष. शिंदे बायांस मारेकरी यांणीं वार केले त्यांचें वर्तमान बाजार ऐकींव कालच राजश्री उमाण्णा नाईक यांचे गड्यासमागमें वडिलांस लिहिलें आहे. त्यास रा॥ बाळोबा तात्या व धोंडीबा असे दरबारास जात नाहींत. यशवंतराव शिवाजी व मोदी दोघे लोक घेऊन तात्यांपाशी धरणें देऊन पैक्यास्तव बसले आहेत. याशिवाय कंपूचेही लोक चौकीस तात्यांपाशीं आहेत. शिंदेकडील बोलावणें दरबारास येतें. परंतु तात्या सांगतात कीं, धरणें बसलें आहे. असें सांगतात. जात नाहींत. कंपूही सावध आहे. बाकी मंडळी यजमानांचे लक्षांत आहेत. याजप्रमाणें बाजारांत बोलतात. कोणत्या थरास जातें नकळे असेंही बोलतात. वाड्यांतही धरणें बसलें आहे. बहुत काय लिहिणें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२५७ श्री. ( पौष व० ११–२१ जाने. )

पै॥ छ० ९ रमजान. सन मय्यातैन व अलफ. माघ.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळासाहेब मुक्काम मिरज स्वामीचे सेवेशीं–

पोष्य गोपाळराव अनंत व शिवराम जिवाजी सवनीस साष्टांग नमस्कार विनंती तागायत छ० २५ साबानपावेतों आपले कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. बहुत दिवस आपल्याकडून पत्रें येऊन सांभाळ होत नाहीं. ऐसें

नसावें. ती॥ कै॥ विठोबा दादाचा आपला घराबा चालत होता. तेव्हां कागदीं पत्रीं वळवटा चाले. त्याअलीकडे राहिला. तर आपण थोर आहां. पूर्वममता स्मरून सर्वार्थी संगोपन करावें हें आपणास उचित आहे. यानंतर करहाडे ब्राह्मण यांस आपल्या गृहस्थांतील थोडीं बहुत उपाध्येपणें होतीं. त्यास आज दोन वर्षे त्यांणीं नाना ते प्रकारें कलह उत्पन्न केला. तेव्हां चोहूंकडील लष्कर आदीकरून सर्व ज्ञातीचा कट होऊन उपाध्येपणें दूर केलीं होतीं. त्यास हल्लीं सरकारांतून न्याय अगर उभयतांची समजूत न करितां त्यांचीं उपाध्येपणें चालवावीं हा आग्रह ! ज्ञातीचा तंव कट सर्वासंमताविना मोडत नाहीं म्हणोन बहुता प्रकारें यजमानांस विनंती केली. परंतु मर्जी दुसरें प्रकारची न होय. तेव्हां कर्म चालत नाहीं, कर्म चालेल तेथें जावें, ऐसें सर्व ज्ञातीस या प्रांतांतील प्राप्त जाहलें. त्यास इतुक्यांस घरांची जागेची सोय जाहली पाहिजे. याविशीं राजश्री सावाजीबावा केरकर यांणीं आपणास लिहिलें आहे हें ध्यानीं घेऊन त्यांणीं लिहिल्याअन्वयें शहापूर प्रांतांतील तालुके त्यां स्वाधीन केल्यास रसदेचा भरणा करितील. इतुकें आपण चित्तावर घेऊन यांस जागा देऊन संग्रह केल्यास चाकरीच्या उपयोगीं पडतील. जागेस तोटा आहे ऐसें नाहीं. परंतु समीप-वर्ती कुटुंबांस ठेवावयास जागा पाहिजे याकरितां लिहिलें आहे. मर्जीस येऊन पदरीं बाळगावें हा अभिमान आपल्या थोरपणास उचित आहे. उत्तरें सत्वर द्यावया आज्ञा असावी. बहुत काय लिहिणें लोभ केला पाहिजे हे विनंति.

नं. ५२५८ श्री. ( पौष व० ११-२१ जाने. )

पै॥ छ० ९ रमजान. सन मय्यातैन व अल्लफ. माघ मास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बळवंत रावजी स्वामीचे सेवेशीं-पोष्य सावाजी राम केरकर साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० २५ शाबान जाणोन स्वकीय कुशल लेखनीं संतोषवीत असिलें पाहिजे. विशेष. बहुत दिवस आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर ऐसें नसावें. पत्रप्रेषणीं सदोदित स्नेहाची अभिवृद्धि करीत असावें. यानंतर ह्या प्रांतीं करहाडे यांचा व स्वकीय ज्ञातीचा कलह उत्पन्न होऊन दोन अडीच वर्षे होत आलीं. त्यास अलीकडेस पूर्ववत्प्रमाणें करहाडे यांस उपाद्धेपणा द्यावा ऐसा प्रभूचा आग्रह. तेव्हां कट मोडणेंविशीं सर्व ज्ञातीचें संमत नाहीं.

---

१ प्रसिद्ध सरदार विठ्ठल विश्राम. २ शिंद्यांचें लष्कर ३ देसाई सावंतवाडीकर यांस. ४ सावंतवाडीकर देसाई यांचा.

तेव्हां मंडळीसहवर्तमान वरघांटीं येणें प्राप्त. त्यास एवढे मंडळीस जागाजुगेची व वेठ बेगारीची सोई जाहली पाहिजे. त्यास आपले निसबत[1] शापूर तालुका आहे तेथें जागा करावा ऐसें मानस. याकरितां हें पत्र आपणास लिहिलें आहे. तर तेवढी मामलत आपले जिमा आहे ती आमचे जिमा करावी. त्याचे रसदेची तोडजोड करितां येईल. घरोबेचें काम जाणोन आपणास लिहिलें आहे. याविशींचें आपल्या विचारास आल्यासारखें सत्वर उत्तर द्यावें. वरकड सविस्तर राजश्री बळवंतरांव लेले यांस लिहिलें आहे. ते निवेदन करितील त्यावरून कळेल. या समयीं या मंडळीस आपण पैसा न देतां सदरहू रसद घेऊन आश्रय दिल्यास आपले उपयोगीं पडून कीर्त राहील. याविशीं विस्तारें लिहिणें नलगे, बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों द्यावा हे विनंती.

नं. ५२५९ ( पौष व० १२–२२ जाने. )

नारो विनायक यांचें अथणीहून बाळासाहेबांस पत्र. छ० २६ साबानचें.

"वाघाचा मुक्काम जेनापुरावर आहे. गेणुरास शह देऊन बसला आहे. मुधोळाहून तोफा येण्याची वाट पहात आहे. विजापूरची खंडणी वाघानें पूर्वी ठरविली होती तिचा वसूल अद्यापि जाला नाहीं याकरितां विजापुर तिकोटें इकडे जावें किंवा बागलकोटाकडे जावें असा त्याचा मनसबा आहे. वाघाबरोबर हजार बाराशें स्वांर व तीन हजार पायदळ, खेरीज तीन हजार पोटभरू, असा जमाव आहे. गोटें विजापूर ममदापुर व कोल्हार येथील खंडणीचें बोलणें उरकलें. दर्द न मानितां खंडण्या घेत जातो ! या प्रांतींच्या प्रजेचा भोग आला आहे. फौजा पाठीवर आल्याखेरीज हा प्रांत सोडून जाईल असें वाटत नाहीं."

नं. ५२६० श्रीगणपति ( पौष व० १४–२४ जाने. )

पै॥ छ० २९ साबान मय्या तैन व अलफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० २८ साबानपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें पाठविलीं तीं पावली. राजश्री नारो हरि यांचींही पत्रें पोंचून मजकूर कळला. दारू रवाना केली ती पोंचली. पत्रें पाहून परत पाठविलीं आहेत. घाटगे प्रकरणीं मजकूर पुण्यास मुद्दाम एक दोन वेळां लिहिलें आहे. उत्तर आलें नाहीं. आल्यानंतर कळवितों. इकडील मजकूर तरी शिराळ्याहून कूच करून मौजे आईतवडें खुर्द येथील मुक्कामीं वारणा दक्षिण तीरीं आलों. दक्षिण तीरास करवीरकरांची फौज पाटणकर वगैरे एक कोसाचे अंतऱ्यानें मुक्काम

---

१ निसबत कुरुंदवाडकर. लेले हे मूळ रहाणार सावंतवाडी प्रांतांतले.

करून होते ते रत्नाकरपंतसुद्धां कूच करून दोन खिंडीनें बोरपाळ्याचे मुक्कामी बुणगेंसुद्धां आम्ही या मुक्कामीं आलों तेच रोजीं गेले. सडी फौज दोन हजारपर्यंत अस्तमानपावेतों उभी होती. नंतर तेही गेली. पुण्याहून तोफखाना घेऊन राजश्री गणपतराव पानसे आम्हांपासून अदकोसाचे अंतरावर वारणतीरीं आजच येऊन राहिले. मुहूर्त पाहून भेटून गोटालगत मिसळीस येऊन उतरतील. " तोफांचे गाडे नीट करावयास लाविले. कांहीं लोखंड घेतलें. कांहीं तिकडे मिळाल्यास शोध करून घेऊन पाठवावें. तशींच लांकडें. " म्हणोन आज्ञा, ऐसीयास गरनाळीचा गाडा आहे तो गरनाळीसच राखोन सवाई व लक्ष्मण तोफेचे नवेच गाडे करवावे. काल पुण्याहून पत्रें आलीं त्यांत घाटगे यानीं मारेकरी घातले याजमुळें घोळ पडला आहे, काय होतें पहावें, ऐसें लिहिलें होतें. सारांश त्याचा विशेष उत्कर्ष असा अर्थ नाहीं. वडिलांकडेही वर्तमान येतच असेल. येथें मुक्काम व्हावयाचें कारण दोनशें बैल दारूगोळा शिंदे यांजकडील रवाना जाहला आहे तो येतांच पुढें जातां ऐसें पडलें आहे. त्याजमुळें एक दोन मुक्काम होतील. कालपर्यंत करवीरकर यांजकडील पन्नास घोडीं दोन उंटें पेंढारी याणीं आणिलीं. वरचेवर पाड लागला आहे. विदित होय हे विज्ञापना. चि॥ राजश्री नाना व बापू यांसीं आशीर्वाद.

नं. ५२६१ श्री. ( पौष व० ३०—२५ जाने. )

अस्सलबमोजीब नक्कल.

पै॥ छ० २९ साबान.

[१]विज्ञापना ऐसी जे, बायांवर मारेकरी पडल्यापासून आठ नऊ दिवस बैदाच पडला. राजश्री तात्या आपले जागां खट्टे होऊन चार दिवसपर्यंत वाड्यांत गेले नाहींत. न जाण्याचें कारण यशवंतराव शिवाजी व बाजीबा मोदी या उभयतांचीं ऐवजाकरितां घरणीं चार दिवसपर्यंत हजार दीड हजार लोकांनिशीं बसलीं तीं कारणानें बसलीं ! वाड्यांत बोलावणें बाणाजीबरोबर दहा पांच वेळां तात्यांस आलें. त्याणीं साफ सांगितलें जे, आपणास कारभार करावयाचा नाहीं. मर्जी असेल त्यास सांगावा. मला आज्ञा होईल तेथें राहीन. या अन्वयें चार दिवस लोटले. पांचवे दिवशीं कंपूवाले सतलंज व जुरससाहेब व फिलोससाहेब मुकीराचा लेंक तिघे मिळोन माफक सरंजामानिशीं राजश्री

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र धोंडो बापूजी जोशी यांचें पुण्याहून बाळासाहेबांस.

दौलतराव यांजकडे येऊन तिघे टोपीकर व दौलतराव या चौघांचेंच खलबत जालें. नंतर राजश्री धोंडीबा दादा यांस दौलतराव यांचें व टोपीकरांचें बोलावणें गेलें. तेव्हां दादा दहा पांच खासे घेऊन वाड्यांत गेले. दोन घटका बोलणें जाहलें. नंतर तिघे टोपीकर व दौलतराव यांजकडील बाणाजी शेट्या ऐसे तात्यांस बोलावण्याकरितां आले. तात्यांजवळ बोलणें होऊन तात्यांस घेऊन वाड्यांत गेले. एक प्रहरपर्यंत दौलतराव, तात्या, दादा, आबा चिटणीस, यशवंतराव शिवाजी, बाजीबा मोदी, नारायणराव बक्षी, यादवराव भास्कर, बाणाजी शेट्या, विठ्ठलपंत, व टोपीकर मिळोन बोलणें जाहलें. त्यांतील ठराव 'तात्यानीं यखत्यारीनें कारभार करावा. सर्वांनीं तात्यांचे आज्ञेंत चालावें. सखाराम घाटगे यास पोटापुर्ते देऊन काढून द्यावें अथवा नजरबंदींत ठेवावें. याप्रमाणें ठरोन प्रहर रात्रीस माघारे आले. लहान मोठीं चार माणसें दौलतेंत आहेत त्यांपैकीं तात्यांच्या व दौलतीच्या उपयोगीं तीं ठेवावीं. उपयोगीं नसतील तीं दूर करावीं. याप्रमाणें टोपीकरांच्या विद्यमानें ठराव जाहला. ठरावाप्रमाणें अमलांत आल्यावर मागाहून लिहितों. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२६२ श्रीगजानन. ( २६ जाने. )

पै॥ छ० २ रमजान. सन मय्यातैन व अल्लफ.

श्रिया सहस्रायु चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती विनायक भास्कर अनेक आशीर्वाद उपरी. येथील क्षेम माघ शु॥ द्वितीया रविवार तिसरा प्रहर पर्यंत मुक्काम लष्कर नजीक पारगांव वर्तमान यथास्थित असे. विशेष. आज रविवारीं प्रातःकालीं सूर्योदयाबरोबर चार पलटणें व झाडोन फौजेसुद्धां करवीरकरांच्या फौजेवर चालोन गेलों. त्यांचा मुकाम पनाळ्याचे माचीचे खालीं होता. आम्हांस व त्यांस चार कोस अंतर होता. तेथपर्यंत चालोन जाऊन पलटणांकडील तोफा त्यांजवर लागू केल्या. करवीरकर समूर उभे न राहतां माचीचा डोंगर चढून टेंकडीवर गेले. तेथपर्यंत पेंढारी चालोन जाऊन तोंड लाविलें. संताजी भोंसले चतुरसिंगाकडील सरदार ठार जाहले व एक शिंदा मातबर माणूस ठार जाहला. आणखीहि पांच चार असामी ठार जाहले. परंतु त्यांची नांवनिशी समजली नाहीं. चाळीस पन्नास घोडीं पाडून आणिलीं. करवीरकर आज मैदानांत असते तर श्रीचे इच्छेकरून आजच फडशा होत होता. परंतु त्यानीं गडाचा आसरा करून डोंगर धरिला त्याणें फौजेचा व पलटणांकडील तोफांचा इलाज न चाले. सबब तिसरा प्रहरपर्यंत डोंगरानजीक

उभे राहून आतांच माघारे आलों. या उपरी करवीरकर समूर उभे रहात नाहींत असें वाटतें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

अपत्यें नारायणाचे व यशवंतरायाचे व माधवरायाचे शिरसा॥ नमस्कार.

नं. ५२६३ श्रीगणपति. ( माघ शु० २–२७ जाने. )

पै॥ छ० २ रमजान. सन मय्या तैन व अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० १ रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. काल रविवारीं प्रातःकाळीं पुढें पलटणें, डावे बाजूस चि॥ राजश्री चिंतामणराव आपा व हरिपंत बाबा, मध्यें व पिछाडीवर आम्ही, उजवे बाजूस शिंदे, राजश्री नानाकडील, (व) विंचूरकर पेठे हीं पथकें, याप्रमाणें करवीरकरांकडील जमाव पन्हाळ्यानजीक माचीचा आसरा जवळ करून सडे मुक्काम करून होते त्यांजवर चालोन गेलों. ते तयार होऊन आपले तळावर उभे राहिले. त्यांजवर पलटणी तोफा लागू केल्या. पेंढारी यार्णीही हुल्लड केली. त्यांचे वस्तु राहिल्या जाग्यावर बूम न निघे. तेव्हां तेथें मिसळामिसळ जाहली. दहा वीस माणूस जायां जखमी होऊन जाग्यावर राहिलें. याखेरीज जखमी निभाऊन गेले ते वेगळे. तीस चाळीस घोडें पाडाव जाहलें. जमाव निघोन किल्यावरचे माचीचे आसऱ्यास गेला. हें कृत्य होण्यास अडीच प्रहर जाहले. ते अडचणींत. तेथें तोफांची व फौजेची काटगिरी चालावयाची नाहीं. याकरितां माघारे मुक्काम मजकुरीं वारणा उत्तरतीरास आलों. शिलशिला लागल्या तागायत पेंढारी यार्णी लहान मोठे शंभर घोडे आणिले. पुढें ते माचीच्या आसऱ्यास राहतात किंवा मैदानांत निघतात पहावें. पुण्याहून पत्र आलेलें पाठविलें आहे. इंग्रजाकडील दारूगोळाही येऊन पावला. याजउपरी कूच करून पुढें येतों. काल फडशाच व्हावा, परंतु अडचणी डोंगराची म्हणोन साधलें नाहीं. विदित होय हे विज्ञापना.

नं ५२६४ श्री. ( माघ शु० २–२७ जाने. )

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ० २९ साबान पर्यंत क्षेम असे. विशेष. राजश्री आत्माराम धोंडदेव महाराजांकडून पुण्यांत बोलण्यास आहेत त्याणीं राजश्री बाळोबा पागनीस यांजकडे बोलण्याचें संधान करून पत्रें पाठविलीं. त्यास पत्रें येऊन चार रोज जाले. त्यांतील बोलण्याचा तपशील—

---

:न साहेब याजकडे शिंद्याच्या छावणींतून.

१ श्रीमंत नानाकडील कर्जाचे दोन लक्ष रुपये व्याजसुद्धां फडशा करावा.

यावर म॥ निल्हेचें ( आत्माराम धोंडदेव याचें ) उत्तर—जानराव जाधव यांजबरोबर पन्नास हजार रुपये पाठविलेच आहेत. बाकी दीढ लक्ष रुपये राहिले त्यांचा फडशा करितों. व्याज द्यावयाचें नाहीं. याचें कारण आम्ही मसलत नानांच्या विचारें केली. फौजेच्या शिबंदीच्या पेचांत आलों. त्यापेक्षां व्याज मागों नये. ऐन मुद्दल ऐवजाचा फडशा करून घ्यावा.

१ तासगांवांतील वाडा जळाला त्यास बांधावयास लागवड खर्च लागला असेल तो द्यावा.

याजवर उत्तर—वाजवी लागवड खर्च असेल तो द्यावा.

१ कै॥ भाऊसाहेब यांचा परिणाम लढाईंत जाला त्याजबद्दल महाराजानीं पंचवीस हजारांचा सरंजाम त्यां समजुतीबद्दल द्यावा.

याजवर उत्तर—पांच हजारांचा सरंजाम समजुतीबद्दल लावून देऊं असें बोलले. निदानीं दहा हजारपर्यंत देऊं.

१ दरबार खर्च श्रीमंत व शिंदे व नाना व पागनीस वगैरे मिळून अदमासें रुपये २००००० द्यावे.

याजवर उत्तर—लाख रुपये देऊं. निदानीं दोन लाखही देऊं. याप्रमाणें बोलणें जालें.

१ आत्माराम धोंडदेव याणीं पागनीस यांजवळ बोलणें केलें, परंतु महाराजांचे कुलअखत्यार राजाज्ञा व हिंमतबहादर हे उभयतां. त्यास उभयतानीं या बोलण्यांतील जाबसाल ठरावून घ्यावया बरोबर यावें म्हणोन सांगितलें.

याजवर उत्तर—आत्माराम याणीं हुजूर पाठविलें कीं, उभयतांनीं ठराव करून घ्यावयास पुण्यास यावें असें पागनीस यांचें म्हणणें आहे म्हणोन करवीरास पत्र आलें. त्यास उभयतांस पाठवावयाचा अंदेशा घेतला कीं, आपलें राज्यांत उभयतांचाच लौकिक विशेष आहे. याच काराणास्तव आणविले कीं काय ! हें ध्यानांत आणून रघुनाथ माने यांजकडून आत्मारामपंतास उत्तर पाठविलें कीं, उभयतांस हुजूरचा निरोप व्हावयाचा नाहीं. त्यावरून हल्लीं कोणीतरी मुखत्यार पाठवावा म्हणून उत्तर आलें आहे. त्यास रघुनाथ माने याचे चित्तांत आपण जावें असें आहे. परंतु अद्यापि कोणाचा जावयाचा निश्चय ठरला नाहीं.

पागनीस यांजकडील कलमें--

१ रांगण्याचा किल्ला आपणांस द्यावा. हल्लीं किल्याकडील सरंजाम आहे त्यासुद्धां--

यावर मा।निल्हेचें उत्तर--सामानगड अथवा भूदरगड उभयतांतून एक देऊं. याचें कारण सामानगड किल्ला पाण्यास कमतर आहे. नांवाप्रमाणेंच किल्ला यास्तव देणार! भूदरगडास कैलासवासी भाऊसाहेबांचा संबंध आहे याजकरितां तहांत पेशजीप्रमाणें किल्ला द्यावयाचा ठरेल याजकरितां तिकडे किल्ला जाऊं नये या बेतानें पागनीस यांजकडे योजिला. दोनीस दोन कारणें योजून उत्तर केलें.

१ शिंद्याकडील पलटणें सरंजामासुद्धां पागनीस यांणीं अंगेजणी करूनं खर्चाची तरतूद चार महिन्यांची बेगमी करून रवाना केलीं आहेत. त्यांस चार महिन्यांच्या बेगमीस चार लक्ष रुपये लागले आहेत ते द्यावे.

यावर उत्तर--चार लक्ष रुपये द्यावे आणि पलटणें माघारीं न्यावीं.

१ पेशजी सरकारांतून महाराजांचे समजुतीकरितां तीन लक्षांचा नवा प्रांत चिकोडी मनोळी खेरीज करून द्यावा असें ठरून वामनराव गोखले गुदस्तां सरकारांतून रवाना केले होते त्याप्रमाणें तीन लक्षांचा प्रांत नवा सरकांरांतून द्यावा.

हें कलम पागनीस यांची अनुकूलता पडोन पेशजी कराराप्रमाणें करून द्यावें.

१ पागनीस यांकडील पलटणांचे चार लक्ष व दरबारखर्च पैकीं काय ठरेल त्यास रोख ऐवज द्यावयास अनुकूलता न पडे तरी सरकारांतून तीन लक्षांचा प्रांत नवा देतात तो पागनीस यांचे ऐवजाचे रदकर्जास लावून द्यावा असें बोलण्यांत आहे. त्यास हुजूरचें संमत या कलमास पडतें.

१ नानांकडील दोन लक्ष व वाड्याचे अदमासें दोन लक्ष व दरबारखर्चापैकीं एक लक्ष ऐसा पांच लक्षांचा भरणा रोख व्हावयाचा, त्यास चिकोडी मनोळी वगैरे महाल यांजवर सावकारा करून भरणा करावा. त्यास आपले विद्यमानें सावकारा जाहल्यास उत्तम. नच होय तर पागनीस यांचे विचारें सावकारा करावा म्हणजे उभयपक्षीं खातरजमा.

१ हा मजकूर अद्यापि नानांकडे श्रुत नाहीं. पागनीस यांजकडेच

पेशजीची खंडणी कै॥ भाऊसाहेब यांचे विद्यमानें जाली त्यापैकीं बाकी राहिली असेल ती द्यावी असें पागनीस यांचें म्हणणें पडलें. त्याजवर इकडील उत्तर मागील बाकी राहिलेला ऐवज द्यावा, परंतु प्रांतांतील वसूल काय घेतला याची रुजुवात हिशेब पाहून ठराव होईल त्याअन्वयें तो फडशा होईल असें ठरावून द्यावयाचें. शिंद्यांचा दरबार मतलबी. मोठ्या मोठ्या दौलती पेचांत आणिल्या ! बोलण्याची व शपथेची प्रमाणता नाहीं. व मुख्य शिंदे यांजवळ तों कांहींच धर नाहीं असा विचार आहे. आपला मतलब साधत असतां मसलतीस हिसका देतील. त्याणीं हिसका दिला असतां दुसऱ्याचा काट चालणार नाहीं. न जाणो, इकडे मसलतीचा घावडाव दाखवून मतलब साधतात किंवा कसें काय आहे तें कळत नाहीं. याजकरितां आढळला मजकूर सेवेशीं लिहून सुचविला आहे. मर्जीस येईल तसा याचा बंदोबस्त त्वरेनें व्हावयाची आज्ञा व्हावी. या मसलतीस दिवसगत होऊं नये. जितकी त्वरा होईल तितकी फार उपयोगी. जितकी ढिलाई पडेल तितकी गैरउपयोगी आहे. फौजेंत खर्चाची आबादी असावी व गवगवा नसावा म्हणजे चार लोक उमेदीनें राजी राहतील. मी हा मजकूर मोठ्या युक्तीनें शोध लावून लिहिला आहे. अद्यापि तेथूनही निश्चय नाहीं व येथूनही नाहीं. रागरंग पाहून काय ठरण्यांत येईल तें सेवेशीं लिहीन. परंतु वर्तमान खरें आहे. मसलत याप्रमाणें चालली आहे. आत्माराम धोंडदेव शेणवी. जातीस जात. किल्याच्या वगैरे मोहास गुंतोन ( बाळोबातात्या ) मसलतीस हिसका देतील यास्तव याचा बंदोबस्त व्हावा. त्या लष्करांतही मजकूर कळवावयाची आज्ञा व्हावी. मीही परभारें लिहिलें आहे. आज रविवारीं पावनगडानजीक तिकडील फौज येऊन त्यांची यांची गांठ पडली. बरीच लढाई जाली. परंतु जायां जखमी यांचा तपशील समजला नाहीं. मागाहून लिहितों. इकडील माचीस गेले. तिकडील गोटास गेले. उभयपक्षीं माणूस जायांजखमी फार जालें म्हणून बोलवा आहे. मागाहून सविस्तर लिहितों. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२६५ ( माघ शु० २–२७ जाने. )

नारो हरि करंदीकर यांची करवीराहून छ० १ रमजानचीं तीन पत्रें आलीं त्यांतील उतारे—

" शिंदे बाया यांस पुण्याहून आणशपथ देऊळ कंपूच्या विचारें आणिल्या, त्यास घाटगे पराक्रमी पुरुष ! त्यांची मुक्तता झालेवर त्याणीं

बायांवर मारेकरी घालावयाचा उद्योग केला. एक्या बाईस जखमा आहेत. इतक्यांत एवढा उद्योग केला! तेव्हां पुढें आणखी घाटगा बैदा करील!"

"लष्करचा मुक्काम आइतवडें येथें आहे. इंदुवारीं कूच होणार अशी बोलवा आहे. इकडील फौज बोरपाळ्यावर आहे. काल रविवारीं थोडी बहुत लढाई जाली. उभयपक्षींही लोक जायां जखमी जाले."

"गुरुवारीं राजश्री नारायणराव घोरपडे यांजकडील घरपागां व शिलेदार चाळीस पन्नासपर्यंत भुयांनजीक जाऊन तलाव्यास उभे राहिले होते. इतक्यांत दोन तीनशें पेढारी आले त्याणीं गांठून चाळीस पन्नास घोडीं पाडाव करून नेलीं व वीस पंचवीस जायां जखमी असामी जाली. घोडें माणून चांगलें होतें. पेशजी पांढरे यांची गत निपाणीकरानीं केली त्याअन्वयेंच घोरपडे यांचें पथक पेंढारी याणीं बसवून दिलें!"

नं. ५२६६ श्रीगणपति. ( माघ शु० २–२७ जाने. )

पै॥ छ०१ रमजान. सन मय्यातैन. माघ मास.

[1]अपत्यें रामचंद्रानें सा॥ नमस्कार विज्ञापना ऐसी जे, राजश्री बाजीबा मोदी आपले नातीचें लग्न मु॥ भिलवडी येथें कृष्णातीरीं माघमासीं करणार. याजकरितां विनंती लिहिली असे. तरी यांस लग्नसंबंधें फडफर्मासीच्या चिठ्या द्यावयाची आज्ञा होऊन साहित्यें येऊन कार्याचे उपयोगीं पडे तें केलें पाहिजे. भांडीं व बिछाइतेचें सामान व फरासखान्याचेंही द्यावयास आज्ञा जाली पाहिजे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२६७ श्री. ( माघ शु० ३–२८ जाने. )

पै॥ छ० ८ रमजान. सन मय्या तैन व अल्लफ. माघमास.

सेवेशीं बाळकृष्ण महादेव. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ० २ रमजानपावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. आपण छ० २५ साबानचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. त्यास आपले कडील व श्रीमंत दादांकडील फौज अद्याप आपांकडे गेली नाहीं. तरी पत्र पावतांच उभयतांकडील फौज लढाईचे समारंभास सत्वर जाई तो अर्थ जाहला पाहिजे. तमाखू सूतरस्वांराबराबर रवाना व्हावी. घराऊ मजकूर सविस्तर लिहून यावा. महाराजांकडील व सरकारच्या फौजेची बातमी श्रीमंत राजश्री नाना स्वामींस वरचेवर लिहून येत असावी. ( तुम्हां ) उभयतांकडील फौज

---

१ पत्रावरील मिति व तारीख पैवस्तीची आहे. पत्र रामचंद्र परशुराम यांचें बाळासाहेबांस.

अद्याप लढाईचे समारंभास आली नाहीं म्हणोन श्रीमंत नाना आचीर्य करितात. यास्तव फौज अतिसत्वर रवाना होऊन लढाईची बातमी आपले फौजेची लिहून यावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२६८ श्रीगणपति. ( २९ जाने. )

पै॥ छ० ६ रमजान. सन मय्या तैन व अलुफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांगनमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ता॥ माघ शु॥ चतुर्थीपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्रें पाठविलीं तीं पोहोंचलीं. "गरनाळेचा गाडा तसाच राखोन दोन गाडे तोफेचे करावयास लाविले. रा॥ नारो हरि यांचीं पत्रें आलीं तीं पहावयास पाठविलीं आहेत." येविशींचें व शिंदे बायांवर मारेकरी घातल्याचें वर्तमान आलेलें लिहिलें तें कळलें. ऐशियास गरनाळेचा गाडा राखोन दोन गाडे तयार करविले, उत्तम आहे. नारो हरि यांचीं पत्रें पाहून पाठविलीं आहेत. सेवेसीं पोहोंचतील. पुण्याकडील वर्तमानाची पुरवणी पेशजी पाठविली आहे. पोहोंचून मजकूर विदित जाहला असेल. त्या पत्राअन्वयें थरावर गोष्ट बसली असतां बरें आहे. वाघाचा मजकूर लिहिला, त्यास तें तोंड मोकळें, सबब त्यास पोट भरावयास जागा चांगली जाली ! राजश्री भास्करपंत मामा यांचें पत्र आलें होतें त्यांतील मजकूर जमाखिंडी परगण्यांतील पांच सात गांव जाळले. याजकरितां सात हजार रुपये खंडणीचा ठराव केला. रा॥ महादोबा नाईक रास्ते यांजकडील लग्नपत्र आलेलें पाठविलें तें पावलें. रा॥ केशवराव बेळगांवकर पाच्छापुरास ठाणें घालावयाकरितां गेले होते ते त्यांचे हस्तगत जाले. जखमाही आहेत. त्यांचे पुतणे मलबा बेळगांवास आले तेही जखमी म्हणोन लिहिलें, त्यास केशवराव शाहणा माणूस, फसावयाचा नव्हे, परंतु होणारानुरूप घडतें ! बेळगांवचे किल्ल्याचा बंदोबस्त त्यांचे पुतण्याचे हातून यथास्थित राहिला असतां बरें आहे. पुण्याहून दारूगोळा पलटणांकडील येण्यामुळें वारणा उत्तरतीरीं मुक्काम जाहला होता त्यास दारूगोळा दोनशें बैल सुमार काल येऊन पोंहचल्यावरून आज येथून कूच करून मौजे बहादुर्लेनजीक वढगांव येथील मुक्कामीं गलों. उदैक पंचगंगेवर जातों. पावणाशें बैल दाखल जाले. बाकीचेही येत आहेत. आधीं करवीरकडे जावें किंवा शिरोळ वगैरे मोकळें करावें ते आज्ञा जाली पाहिजे. विदित होय हे विज्ञापना. भौमवारचीं पत्रें पांवलीं. लोखंडाचा मजकूर कळला. आज्ञेप्रमाणें मिळालें तर घेतों. आतां पाठविलें हें उपयोग नसेल तर विठ्ठल अनंत यांचे स्वाधीन करावें. तोफखाना

सरकारचा आज आपले मिसळींत दाखल जाला. तोफा पाहून येऊन तपशील लिहितों. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२६९ श्री. ( माघ शु० ५–३० जाने. )

पै॥ छ० ५ रमजान. मय्यातैन.

सेवेशीं विज्ञापना. आत्माराम धोंडदेव यांच्या पत्रांतील मजकुराची उत्तरें येथून गेलीं. पलटणांबद्दल चार लक्ष रुपये द्यावे, पैकीं दोन लक्ष देऊं. भूदरगड किल्ला ( आम्हीं ) द्यावा. नानांकडील ऐवज मुद्दलामुद्दल देऊं. व्याज द्यावयाचें नाहीं. कैलासवासी भाऊसाहेब यांजबद्दल पांच हजारांचा सरंजाम लावून देऊं. ज्याजती देणार नाहीं. वाड्याचें वगैरे कांहीं द्यावयाचें नाहीं. याप्रमाणें उत्तरें गेलीं आहेत. अद्याप रघुनाथ मान्ये अथवा कोणी जावयाचा निश्चय नाहीं. जालेवर कळवीन. खांडेकर यांचें पत्र आलें नाहीं. गडी पाठविला त्याजबरोबर मुक्का निरोप होता कीं, येथून बोलण्याचा अर्थ राहिला. स्थळांची वगैरे सावधता असावी. याप्रमाणें आहे. इकडील फौज पन्हाळ्यानजीक होती ती काल बुधवारीं पंचगंगातीरीं नजीक वडणगें येथें झाडून लष्कर आलें. चतुरसिंग यांचा रुसवा आहे. ते गडानजीकच आहेत. समजूत जालेवर येणार असें आहे. तिकडील लष्करचा मुक्काम शिर्यें बहादूर वाडीच्या मध्यें मुक्काम वारणातीरीं आहे. आज अथवा भृगुवारीं कूच होऊन वडगांव अथवा शिरोली येथें मुक्काम येणार अशी बोलवा आहे. परवां लढाई जाली, त्यांत चतुरसिंगाकडील लोक पंधरा वीस असामी ठार. जखमी शंभर- घोडीं तीस चाळीस मेलीं. याप्रमाणें जालें. नंतर इकडील फौज सारी बुणग्या- सुद्धां गडाच्या माचीस निघोन गेले. याप्रमाणें जालें. कळावें. मागाहून सवि- स्तर लिहितों. कळावें सेवेशीं श्रुत होयं हे विज्ञापना.

नं. ५२७०[1] श्री. ( माघ शु० ६–३१ जाने. )

पै॥ छ० ६ रमजान. सन मय्यातैन व अलफ. माघ मास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर रावजी स्वामीचे सेवेशीं–पोष्य नारो विनायक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० ५ माहे रमजान यथास्थित असे. विशेष. धोंडजी वाघ याचा मुक्काम तालेकोट परगण्यालगत गेला आहे. तालिकोटीं स्वार प्यादे जमाव होता तो वाघाचे तोंडावर येऊन लढाई छ० ३ रमजानीं दोन प्रहरापासून दोन प्रहरपर्यंत जाहली. तालीकोटाकडील जमाव कच खाऊन चोहूंकडे फुटला.

---

१ पत्र नारोपंत करंदीकर याचें करवीराहून. २ मखतः = तोंडजबानी.

गांतास वाघाचा बहुत उपसर्ग लागेल असें दिसतें. दिवसेंदिवस वाघ बळावत चालला. याचे पिछावर फौज येऊन प्रांतांतून काढून दिल्याखेरीज बचावाच्या अर्थ दिसत नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

नं. ५२७१ श्रीगणपति. ( माघ शु० ६–३१ जाने. )

पै॥ छ० ५ रमजान. सन मय्यातैन व अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ छ०५ रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. वरकड सविस्तर काल पत्र रवाना केलीं तीं पोहोंचून विदित जालेंच असेल. आज बहादुलें येथील मुकामाहून कूच करून पंचगंगा उत्तरतीरीं हेरल्याचे मुक्कामीं गेलों. विदित व्हावें. करवीरकरांची फौज श्री देवाचे डोंगरानजीक आहे. याउपरी करवीरचे रोखें येईलसें वाटतें. बातमी येईल त्याप्रमाणें लिहून कळवितों. विदित होय हे विज्ञापना.

नं.५२७२ श्रीगणपति. ( माघ शु. ७–१ फेब्रु. )

पै॥ छ० ६ रमजान. सन मय्यातैन व अल्लफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० ६ रमजानपर्यंत यथाथित असे. विशेष. काल पंचगंगा उत्तरतीरास दक्षिणतीरानजीक टेंबलाई या मुक्कामीं आलों. करवीरकरांची फौज पन्हाळ्याकडे होती ते सारी या तोंडीं आली. अद्यापि मोहल्यास उभे राहिले नाहींत. बेत काय असेल तो असो. लोकवार्तेंत जितीचे ओढ्यांत काय घडणें तें घडेल असें बोलणें बोलतात म्हणोन सांगतात. पुण्याचें पत्र पाहून पाठविलें तें पावलें. वाघ बसवंत बागेवाडीवर आहे येविशींचें व इकडील पेंढारी याणीं शिरोळपर्यंत येऊन गुरें नेल्याचें लिहिलें तें कळलें. या मुक्कामींहून एक दोन तलावे करावे असें आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२७३ श्रीगजानन. ( माघ शु० ८–२ फेब्रु. )

पै॥ छ० १२ रमजान. सन मय्या तैन जल्लफ. माघ.

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती विनायक भास्कर व हरि भास्कर आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत छ० ७ रजमान जाणून स्वकीय लिहीत जावें. विशेष. आज रविवारीं दोन प्रहरीं पलटणें व तोफखाना व झाडून फौजा तयार होऊन टेंबलाईजवळ गेलों. परंतु करवीरकरांच्या फौजा जितीचा ओढा सोडून पुढें न येत. तेव्हां पलटणें पुढें घालून मागें फौजा लावून मारगिरी करीत जितीच्या ओढ्या-

वर चालून घेऊन वोढा काईम केला. नंतर त्यांची फौज गांवच्या आसऱ्यास गेली ते समयीं पलटणांनीं स्वामीचे मठाकडून चालून घेऊन तेथूनही फौज उधळून गांवांत गेली. गोट उतरला होता तो जाळून एक तोफ पाडाव करून आणिली. पूर्वेचे अंगास एकवीरेच्या देवळानजीक त्यांचे फौजेची एक टोळी होती त्यांणीं जम बांधोन आमची फौज उभी होती त्यांजवर चालून आले. तेथें हातघाई बरीच होऊन नारायणराव सेनापति पाडाव आले. त्यांचा मोड होऊन माघारे पळून गेले. ईश्वरें मोठें यश चिरंजीव रा॥ आपा साहेबांस दिल्हें. प्रहर रात्रीस माघारे गोटास आलों. उदईक चालून जाऊन गांव घेणार असें टोपीकर यांचें म्हणणें आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ६२७४ श्री. ( माघ शु० ८–२ फेब्रु. )

पै॥ छ०८ रमजान सन मय्यातैन.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० ७ रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. आज रविवारीं दोन प्रहरीं पंचगंगा उत्तर तीराहून पलटणें तोफांसुद्धां व सरकारी तीन तोफा व सारी फौज घेऊन करवीरचे तलाव्यास अस्तमानीं दीड प्रहर दिवसास करवीरानजीक आलों. डावे बाजूस चि॥ राजश्री चिंतामणराव आपा व हरीपंत बाबा, पलटणाचे पिछाडीस आम्ही, उजवे बाजूस शिंदे व राजश्री नाना, विंचूरकर, पेठे हीं पथकें, येणेंप्रमाणें तोफेची मारागिरी करीत असतां त्यांची फौज किल्याचे व ब्रह्मपुरीचे दरम्यान उतरली होती त्यांजवर चालोन घेतलें. तेथें त्यांचा टिकाव न निघे तेव्हां ते किल्याचे पूर्वेस आले. प्रीतिराव चव्हाण आपले पथकासुद्धां ब्रह्मपुरीपुढें ओढा होता त्या आसऱ्यास जाते ( वेळीं ) त्यांजवर शिंदे, नाना, पेठे, हीं पथकें उठलीं. तेव्हां तेही नामोहरम जाले. तेथें पथकानीं कामकाज चांगलें केलें. डावे बाजूस शत्रूंची फौज जमली आणि तीन चार हिरिऱ्या आमचे फौजेवर केल्या, परंतु त्यांची काटगिरी चालों दिली नाहीं. उभयता चिरंजीवांचीं पथकें होतीं. उभयतानीं अंगेजणी चांगली केली. नारायणराव घोरपडे कापशीकर बाबांकडे पाडाव आले. सरकारचेही तोफांची मारागिरी चांगली जाली. बराऊनसाहेब याची तो शर्तच ! एक पलटण व एक तोफ घेऊन किल्याची वेस पाहून खुद्द आले ! श्रीगजाननाचे कृपेकरून चांगली जाली. अस्तमान झाल्यामळें फिरोन टेंबलाईचे टेंकडीजवळ

आलों. घोडें माणूस जायांजखमी दोन्हीकडील काय जालें तें अद्यापि समजलें नाहीं. प्रस्तुत टेंबलाईनजीक उभे आहों यी—

नं. ५२७५ श्री. ( माघ शु० ८–२ फेब्रु. )

पै॥ छ० ७ रमजान. सन मय्यातैन व अलफ. माघ मास.

राजश्री गंगाधरराव दाजी गोसावी यांस—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य–स्नेहांकित नाईकजी चव्हाण ठाणें शिरोळ दंडवत विनंती उपरी येथील क्षेम जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. काली मौजे अर्जुनवाड येथील रानांत आपलेकडील कही येऊन शाळू व हरभरा बांधोन नेला. आणि पांच चारी माणसें धरून नेलीं. हें आपणांस कळून जाहलें किंवा न कळतां जाहलें हें समजलें पाहिजे. यास्तव आपणास पत्र लिहिलें आहे. तरी उत्तर पाठवावें. आजी चारी वर्षें आम्ही कोणत्या रीतीनें चालतों हें आपणास दखलच आहे. आपणही कांहीं उपसर्ग न करितां त्याजप्रमाणें चाललां. ऐसें असून काली कही भरून नेली. हुजुरून फौजा आल्यास आमचा उपाय नाही. आणि पुण्याहून फौज आल्यास आपलाही उपाय नाहीं. परंतु आम्हांकडून मिरज प्रांतास उपद्रव होऊं नये आणि आपले कडून ठाणेंनिसबत गांवगन्नास उपद्रव होऊं नये ऐसें आजीपर्यंत चाललें. हल्लीं आपणास कळूनच जाहलें असल्यास उत्तर पाठवावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ कीजे हे विनंती.

नं. ५२७६[1] श्री ( माघ शु० ८–२ फेब्रु. )

पै॥ छ० ७ रमजान. सन मय्या तैन व अलफ. माघमास.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गंगाधर रावजी स्वामीचे सेवेशी–पोष्य नारो विनायक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० ७ माहे रमजान यथास्थित असे. विशेष. वाघाचा मुक्काम तालिकोट परगणे यांत गेला. तालिकोटचा जमाव त्याजवर आला होता. यांची त्यांची लढाई होऊन तालीकोटचे जमावानें कच खाऊन चोहूंकडे फुटला म्हणोन बाजारी वर्तमान आलें तें लिहिलें होतें. त्यास हल्लीं वर्तमान आलें जे, तालीकोटचा जमाव मौजे याळवर परगणे कोकटनूर येथें आला. हें वर्तमान वाघास समजोन वाघ याळवरावर गेला. तालीकोटचा जमाव थोडा. वाघाचा जमाव भारी. मैदानांत तालीकोटचे जमावाचा टिकाव होईना सबब गांवांत शिरले. वाघांनीं गांवासभोंवता वेढा दिला. संध्याकाळपावेतों

[1] पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें.

ोळागोळी होत होती. नंतर सलुखाचें बोलणें ठरावांत आणावें याप्रमाणें दरम्यान देऊन तालीकोटचा जमाव तालीकोटास गेला. या उपर ाघ कोणता रोख धरितो पहावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विनंती.

नं. ५२७७ श्रीगजानन. ( माघ शु० ९–३ फेब्रु. )

पै॥ छ० १२ रमजान. सन मय्या तैन व अल्लफ.

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती विनायक भास्कर. आशीर्वाद उपरी. येथील कुशल ता. छ० ८ रमजान जाणोन स्वकीय लिहीत जावें. विशेष. आपणास येतांना आपली फौज पाठविणेंविशीं सांगून आलों आणि येथूनही दोन चार वेळां सांगून पाठविलें. परंतु आपण आजपर्यंत फौज पाठविली नाहीं हें ठीक केलें नाहीं. तर हे दिवस पुढें कांहीं येणार नाहींत. तर फौज पाठवावी. नाहीं त्यापेक्षां तेथें चिरंजीव राजश्री रघुनाथराव दादांनीं पलटण ठेविलें आहे त्यांचें म्हणणें आहे कीं, दोन तीन तोफा व चार पांचशें राऊत दिल्यास शिरोळचें ठाणें घेऊं म्हणतात म्हणोन ऐकिलें. हें होत असल्यास बरोबर सामान देऊन हें काम करवावें म्हणजे चांगलें आहे. याउपर सरकारचा बोल न लागेसें करावें. हे आशीर्वाद.

नं.५२७८ श्रीगणपति. ( माघ शु० १०–४ फेब्रु. )

नक्कल.

राजश्री नारो हरी करंदीकर स्वामी गोसावी यांस.

सेवक रामचंद्र परशुराम. नमस्कार. विनंती उपरी. तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें. विवेकाचा मजकूर लिहिला तो विदित जाला. ऐशीयास पहिलेपासून साऱ्या गोष्टींचा तिकडून अविवेक जाला त्यापक्षीं विवेक तो काय ? तुम्ही आपले येण्याचें लिहिलें, त्यास यावयाचे असल्यास येणें. रवाना छ० ९ रमजान. हे विनंती—समस्त ब्रह्मवृंद व वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री भटजीबावा[१] यांसीं साष्टांग नमस्कार प्रविष्ट करून प्रार्थना करावी आणि सर्वांनीं कुंटुबें घेऊन यावें असें व्हावें. श्री जगदंबाबाईस साष्टांग नमस्कार प्रविष्ट करणें हे विनंती.

नं. ५२७९ श्रीगणराज. ( माघ शु० १०–४ फेब्रु. )

पै॥ छ १० रमजान सन मय्या तैन व अल्लफ.

---

१ महाराजांचे गुरु.

अपत्यें रामचंद्रानें शिरसा॥ नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागाईत छ० ९ रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. छ० ७ रमजानीं करवीरकरांची व आमची लढाई जाहल्याचा मजकूर विस्तारें सेवेसीं लिहून पाठविला आहे तो पावोन सविस्तर विदित जाहलेंच असेल. याउपरी दिवसगतीवर पडों न देतां करवीरास शह द्यावयाचा, दारूगोळा हें सामान भरपूर पाहिजे, याकरितां विनंती लिहिली आहे. तरी ती॥ राजश्री दादा याणीं पन्नास खंडी दारू पाहिजे असें मजजवळ सांगितलें होतें त्यास तें व कांहीं येथील जाकिऱ्यापैकीं वडिलांकडून याप्रमाणें तरतूद होऊन दारू लौकर आली पाहिजे. मोठा खोळंबा आहे. दारूचें काम वडिलांकडून होऊन न आलें असतां येथील काम चालत नाहीं. पक्षीं रिकामे दिवस जातात. येविशींचा अर्थ चि॥ राजश्री नारोपंत बापू जोग विदित करितां श्रुत होईल. मशारनिल्हेस मुद्दाम येविशीं विनंती करावयास पाठविलें आहे. थोरल्या तोफांचे तयारीचें काम चालत आहे त्याचीही तयारी लौकर होऊन तोफा याव्या. सदरीं तोफखान्यांत व पलटणांत इकडून दारूगोळा दिल्या विना काम चालावयाचें नाहीं. पलटणें तो कूच करावयाचींच नाहींत. असें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. दोनच हजार गोळे पाहिजेत त्यास मागाहून फरमे पाठवून देतों त्याजप्रमाणें द्यावयाची आज्ञा व्हावी. श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२८० **श्रीगणपति.** ( माघ शु० ११–५ फेब्रु. )

छ० ११ रमजान सन मय्यातैन.

अपत्यें रामचंद्रानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० ११ रमजान गुरुवार प्रातःकाल यथास्थित असे. विशेष पलटणवाल्यांस मेजवानी करावयाची भेटी समयीं. त्याजवर हें कालचें शास्त्र केलें. याउपरी जालीच पाहिजे. त्यास कापड पाहिजे, सबब मिरजेस मुद्दाम रा॥ महादाजीपंत केतकर पाठविले आहेत. कापड त्यानीं पाहिलें, परंतु उधार कोणी देत नाहीं रोख रुपये दिले वांचून. यास्तव वडिलांजवळ राजश्री बाजीपंत करमरकर ज्या सावकाराचें कापड आणून दाखवितील त्यांस वडिलीं सांगून मुदत करून देतील त्या मुदतीस पैका पोंचेल–गुंता पडावयाचा नाहीं. तेंच कापड सांडणीस्वारांबरोबर रवानगी करून देवावी. एक पलटणवाले साह्य आहेत तेणेंकरून सर्व गोष्टी... दारू गोळ्या वांचून खोळंबा होत आहे तो पक्षीं कोठवर ल्याहावा ? यास्तव

वडिलीं दारू व थोरल्या तोफा आणविल्या आहेत त्यांचे गोळे यांची रवानगी जरूर करून द्यावी. दारू व गोळे —

नं. ५२८१ श्रीगणपति. ( माघ शु० १२–६ फेब्रु. )

पै॥ छ० ११ रमजान. सन मय्यातैन व अलफ.

अपत्यें रामचंद्रानें शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ० १० रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. धोंडजी वाघ याचा मजकूर लेहिला तो आपले व राजश्री नारोपंत अथणीकर यांचे पत्रावरून कळला. ऐसीयास तें तोंड मोकळें पडोन त्यास पोट भरावयास जागा चांगली जाहली. ईश्वरइच्छेनुरूप प्रजेचा भोग सरून त्याचा बंदोबस्त कधीं होईल तो होवो! नारोपंत याचें पत्र पाहून पाठविलें आहे. दौलतराव हिंदुराव घोरपडे यांचा काल जाल्याचें लिहिलें तें कळलें. ईश्वरईच्छा प्रमाण. लढाई जाहल्यानंतर काल करवीराहून राजश्री नारो हरि यांचें पत्र आलें त्याच्या नकला व इकडून पत्र पाठविलें त्याची नक्कल पाठविली आहे त्याजवरून विदित होईल. क्षेत्रस्थ समस्त ब्राह्मणवृंद इकडून पत्र पाठविलें होतें जे, करवीरास शह द्यावयाचा, याकरितां तेथून निर्वेध स्थळीं स्थळांतर करावें. त्याचें उत्तर नारोपंताचेच पत्रीं लिहिलेलें आलें आहे. होणारानुरूप काय घडेल पहावें. काल रात्रीस तेथील अधिकारी व तत्संबंधी यांचीं कुटुंबें व चीजवस्त करवीराहून निघोन पन्हाळ्यास गेली. पोहचवावयास फौज गेली होती ते पोहोचवून आली. याप्रमाणें वर्तमान आहे. दारूगोळा याविना खोळंबा, याजकरितां विस्तारें सेवेशीं पत्रें लिहून चि॥ राजश्री नारोपंत जोग पाठविले आहेत. दारूचा उपराळा जाहला असतां काम पुढें लौकर चालतें होईल. विस्तारें चि॥ राजश्री नारोपंत जोग सांगतां विदित होईल. येणेंकरून लौकिक विशेष होईल. चि॥ बापूनें लिहिलें होतें जे आपले शरीरीं समाधान नाहीं. त्याजवरून चिंता लागली आहे. आरोग्याचें लिहिलें पाहिजे. करवीरीं जखमी फार जहाले. विदित होय हे विज्ञापना.

नं.५२८२ श्री. ( ६ फेब्रु. माघ शु.१२ )

पै॥ छ० १३ रमजान. सन मय्यातैन व अलफ.

सेवेशीं विज्ञापना. मी बुधवारीं करवीराहून लष्करास आलों होतों. मला ही येण्याचें कारण होतें. श्रीमंताचीही चिठी आली होती. एक दिवस राहिलों.

---

१ पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें. २ पत्र नारो हरि करंदीकर याचें करवीराहून मिरजेस बाळासाहेबांस.

आज गुरुवारीं प्रहर दिवसास निघोन करवीरास गेलों. राण्या वगैरे मंडळीचीं कुटुंबें करवीराहून गेलीं. तिकडीलही बोलण्याचा नाद होता हें कारण योजून आलों याजमुळें येणें जाहलें. सारांश बोलण्याचा अभावच आहे. उद्ईक कूच होऊन बावड्याचे सुमारें पंचगंगातिरीं मुक्कामास ( लष्कर ) जाणार असें आहे. गोखले करीकोपेस वारीअलीकडे आले. सरकारच्या तोफा थोर दोन कराडानजीक आल्या. दौलतराव घोरपडे यांचें पथक पळोन गेलें. वाळवेंकरांनीं व पेंढारी यानीं घोडीं सत्राशें दीडशें पाडाव करोन घेतलीं ! राजमंडळांत चाकरीस होते. याप्रमाणें जालें. मागाहून सविस्तर लिहितों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ५२८३ श्री. ( माघ शु० १३–७ फेब्रु. )

पै॥ छ० १३ रमजान. सन मय्यातैन व अलुफ.

अपत्यें केशव सदाशिव काळे साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत छ० १२ रजमान भृगुवासरपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलांचा निरोप घेऊन निघालों ते रविवारीं दीड प्रहर दिवसास पावलों. ते लागलेच स्वांरीबराबर चालते जाहला. ते दिवशींचें वर्तमान यजमानानीं लिहिलेंच आहे. त्यावरून विदित जाहलेंच आहे. कालपर्यंत मुकामच होता. आज कूच होऊन मौजे बावडेयावरी पंचगंगा दक्षिणतीरास येऊन मुकाम जाहला. करवीरकरानीं झाडून पेठा जाळून फस्त केल्या. गांवाबाहेर प्रतिज्ञापूर्वक एक माणूस देखील नाहीं. करवीरांतून ब्राह्मणांखेरीज झाडून मराठे यांचीं कुटुंबें पन्हाळयास गेलीं. हजारपर्यंत स्वांर आंत आहेत. राजश्री नारोपंतांचीं पत्रें व बातमी येत आहे. उद्ईक मोर्चेयास इंग्रज पलटणें घेऊन जाणार. मुक्कामास लष्कर देखील जावयाजोगें जातें. मठ व स्मशानांत देखील ( मोर्चा ) आहे. श्रीची कृपा गांवावर राहिली नाहीं. वडिलांचे पुण्येंकरून सर्व गोष्टी मनोदयानुरूप कार्यासिद्धी होईल. राजश्री नाना व तात्यांनीं कृपा पूर्ण केली त्याचें सार्थक श्रीनें केलें. सेवेसीं श्रुत होय. याउपरी होईल तें लिहीन. हे विज्ञापना.

नं. ५२८४ श्रीगणपति. ( माघ शु० १३–७ फेब्रु. )

पै॥ छ० १३ रमजान. सन मय्यातैन व अलुफ.

अपत्यें रामचंद्रानें शिर सा॥ नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागाईत छ० १२ रमजान पर्यंत यथास्थित असे. विशेष. आम्ही आज कूच करून पंचगंगा दक्षिणतीरास करवीरचे उत्तरेस नजीक शिंयेंभुयें येथील मुक्कामीं

आलों. आज पहांटेस राजश्री नारोपंत करंदीकर यांचें पत्र आलें त्यांतील मजकूर "येक वेळां बोलणें समजोन घ्यावें. नंतर मर्जी असेल तसें कर्तव्य व्हावें. सूर्योदयास हुजूरचे आज्ञेप्रमाणें राजश्री जोशीराव यांस घेऊन येतों." याप्रमाणें लिहिलें आहे. इकडील कूच जहालेमुळें राहिले असतील. त्याणीं यावें, आम्ही त्यांचें बोलणें ऐकावें, असें कांहीं राहिलें नसतां व याच अन्वयें साफ सांगितलेंही असतां उगाच नाद लावितात इतकेंच. सविस्तर वडिलांस विदित व्हावें याकरितां लिहिलें आहे. नारोपंत परत येऊन काल गेले. आजच पत्र आलें. मुख्य निघावयाचे सुमारांत आहेत. आज वाटेजवळ येऊन मुक्काम केला याजमुळें कसें करतात कळेना. वडिलांची प्रकृति कशी आहे ती आज्ञा करावी. विदित होय हे विज्ञापना. चि॥ राजश्री नाना व बापू यांसीं आशीर्वाद.

नं. ५२८५ (माघ शु० १४–८ फेब्रु.)

नारो हरि करंदीकर यांचें पत्र करवीराहून मिरजेस––

पै॥ १३ रमजान.

"भृगुवारीं आवशीच्या चार घटका रात्रीस वरुणतीर्थ वेशीनें सांगरूळच्या मार्गानें श्रीमन्महाराज पन्हाळ्यास निघोन गेले. बरोबर दोन हजार राऊत गेले. नरसीपूरकर भटजीबावा वाड्यांत राहिले. समस्त ब्रह्मवृंदही आहेत. कोणास बाहेर जाऊं देत नाहींत. ठाण्यांत राजाज्ञा व चव्हाण उभयतां मुख्यत्वें आहेत. ठाण्यांत माणूस तीन हजार पर्यंत आहे. प्रतिनिधि गाईकवाड व जाधव वगैरे मंडळी पाटणकर घाटगेसुद्धां गडास गेलीं. तेथून स्वाऱ्या पेंढारी वगैरे यांजवर करण्याचा बेत आहे. लढाई समयीं बुणग्याचा गळाठा करावा अथवा कंपूवर गलबल करावी याप्रमाणें बेत आहे. याकरितां हुशारी चांगली असावी. पढारी तुटक तुटक गडाकडे धाडूं नयेत. भरणा चांगला, हुशारीनें जाणें तर जावें. चतुरसिंग वगैरे मंडळी गडासच आहे. तेथून चारशें पायदळ इकडील कुमकेस आज येणार आहे.

नं. ५२८६ श्री. (माघ शु० १४–८ फेब्रु.)

पै॥ छ० २२ रमजान. सन मय्यातैन व अलफ.

सेवेसीं बालकृष्ण लक्ष्मण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना त॥ छ० १३ रमजानपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ० ५ रमजानचें पत्र रवाना जालें तें छ० १० रमजानीं पावलें. लढाईचें वर्तमान

ऐकून बहुत संतोष जाला. श्रीमंत वडील पुण्यवंत ! त्यांचे पुण्येंकरून सर्व यथास्थित होईल. अलीकडील वर्तमान ल्याहावयास आज्ञा जाली पाहिजे. इकडील वर्तमान राजश्री धोंडोपंत गोखले मुरगोडचे सुमारें गेले. कित्तूरकर देसाई यांची खंडणी पावणे दोन लक्ष रुपयेपर्यंत उरकली अशी बोलवा आहे. इंग्रजाकडील सौंदे नगर प्रांतींचा जिन्नस घांटाखालीं नेतात. हरपनहळ्ळी तालुका हैदराबादकर नबाब यांस देणार असें बोलतात. वरकड अधिकोत्तर नाहीं. मी तूर्त हावेरीस आलों आहें. या महालचे बंदोबस्त करून लौकरच लक्ष्मेश्वरास जातों. वाघ तालिकोटचे सुमारें आहे. बरोबर जमाव दोन तीन हजार लुटारे सुद्धां जमले आहेत. गोखले या प्रांतीं होते यामुळें त्याचें भय नव्हतें. याउपरी काय घडेल पहावें. शिरहट्टीस कांहीं जकीरा करून ठेवितों. या देशांत जागा ही बळकट आहे. वरचेवर विनंती लिहितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. \

नं. ५२८७ श्रीगणपति. ( माघ श० १५—९ फेब्रु. )

पै॥ छ० १४ रमजान रविवार. सन मय्यातैन व अलफ.

अपत्यें रामचंद्रानें शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता॥ १४ रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. वडिलीं आशीर्वाद पत्र पाठविलें तें पावलें. " रा॥ धोंडोपंत गोखले बेटगिऱ्यास धारवाडावरून आले याप्रमाणें वर्तमान आहे. माझी प्रकृति बरी आहे. एकांतरा दोन ज्वर आले होते " म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशीयास गोखले यांचे आल्याचें वर्तमान वडिलीं लिहिल्याप्रमाणेंच इकडेही आहे. प्रकृत बरी आहे हें लिहिलें आल्यावरून संतोष जाहला. चिरंजीव राजश्री जयराम बाबूराव यांचा ऐवज वरातेप्रमाणें देण्याविसीं राजश्री बालकृष्णपंत लागू यांचे नांवें पत्र पाठविलें आहे. काल अस्तमानीं कैलासवासी बाळ जोशीराव यांचे पुत्र कोल्हापुराहून इकडे येत असतां पलटणांतील बिकट पहाऱ्यावर सांपडले. ते त्यानीं इकडे लावून दिले. विवेकाचें बोलणें बोलावयास आलों याप्रमाणें बोलले. बरोबर नारोपंत करंदीकरही होते. त्याचें उत्तर केलें कीं, साराच अविवेक ! त्यापक्षीं इकडून विवेकाचें बोलावयाचें तें काय ? याप्रमाणें सांगोन तेच क्षणीं निरोप दिल्यावरून ते गेले. कालच रात्रीं आणखी कांहीं चीजवस्त व जनानखाना पन्हाळ्यास गेल्याची बातमी आहे. पक्कें आल्यावर कळेल. दारूगोळे नाहींत याजमुळें मसलत आटपावी लागेल. विदित होय हे विज्ञापना.

नं. ५२८८ श्रीगणपति. ( माघ व० १–१० फेब्रु. )

पै॥ छ० १६ रमजान. सन मय्यातैन व अलफ.

अपत्यें रामचंद्रानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम त॥ छ० १६ रमजानपर्यंत यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. तोफांचे गाडे तयार होण्याचा मजकूर लिहिला, त्यास गाड्यांचे उपयोगीं समयास थोर लांकूड मिळत नाहीं व लोखंडही तसेंच. याकरितां 'अस्मानतडाख्याचें' सामान सवाई तोफेस लाऊन तेंच लौकर तयार करण्याविशीं आज्ञा आली पाहिजे. गोळ्यांचे फर्म्यांचा व पानशे यांचे पत्राचा मजकूर लिहिला, त्याजवरून मशारनिल्हे यांचें पत्र व गोलंदाज वगैरे इकडून रवाना केलेच आहेत. तेथें आल्यानंतर जे फर्म्यास गोळे मिळतील ते देऊन रवाना व्हावे. दारूचे तलासाविशीं वडिलीं पत्र पाठविलें आहे त्याचें उत्तर येऊन दारू मिळत असल्यास त्याचा दरदाम लिहून कळवावा. दारूविना कामच बंद जालें आहे. इलाज काय ? तोफेचे बार दोन दिवस ऐकावयास आल्याचे लिहिलें, त्यास पंचगंगा उत्तर तीरींहून दक्षिणतीरीं आलों ते दिवशीं स्वारी येतेसमयीं व दुसरे दिवशीं मुक्कामास जागा पहावयास चिरंजीव राजश्री हरिपंत बाबा यांजबरोबर पलटणांतील बराउन साहेब देऊन बनपुरीकडे पाठविले होते तेव्हां जुजबी जुजबी दहा वीस बार केले ते ऐकावयास आले असतील. सनगांचा मजकूर लिहिला, त्यास सनगें लौकर आलीं पाहिजेत. आज आठ रोज व्यर्थ दिवस घालविले. पुढें किती दिवस लागतील कळेना ! विदित होय हे विज्ञापना.



१ रामचंद्र परशुराम यांचें पत्र बाळासाहेबांस मिरजेस.

# ऐतिहासिक-लेख-संग्रह.

या पुस्तकांत पटवर्धन सरदारांच्या जुन्या दप्तरांतील ऐतिहासिक महत्वाचे निवडक अस्सल कागदपत्र सालवारी व प्रकरणवारी लावून तारीख, महिना व सन यांच्या अनुक्रमानें आम्ही छापीत आहों. प्रत्येक कागदावर तारीख महिना व सन घातलेला असतो आणि त्याखाली अर्थाची फोड करणाऱ्या भरपूर टिपाही दिलेल्या असतात. शिवाय प्रत्येक प्रकरणास आंतील विषयाचें सुसंगत विवेचन करणारी एक एक प्रस्तावनाही जोडिलेली असते. पानिपतच्या युद्धापासून तों तहत बाजीरावीच्या अखेरीपर्यंतचा इतिहास या पुस्तकांत येत असून तो त्या त्या काळांतील पेशवे, प्रमुख मुत्सद्दी व सरदार यांच्याच शब्दांनीं वर्णिला जात आहे! आजपर्यंत या पुस्तकाचे अकरा भाग प्रसिद्ध झाले आहेत. यांपैकीं पहिले चार भाग शिल्लक नाहीत. पुढचे पांचव्यापासून अकराव्यापर्यंत सात भाग विक्रीस आहेत. दहाव्या व अकराव्या भागाची किंमत चार रुपये असून बाकी सर्व भागांची किंमत प्रत्येकी ३ रु० आहे. शिवाय पोस्टेज प्रत्येक भागास ८० निराळे पडेल.

---

## ऐतिहासिक-लेख-संग्रहांतील विषयानुक्रम.

**भाग पहिला**—सन १७६० जानेवारी ते १७६३ मे पर्यंत. नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीची अखेर-माधवरावास पेशवाईची वस्त्रें-मोंगलाची पुण्यावर स्वारी-लढाया व तह-माधवराव व दादासाहेब यांमध्ये वितुष्ट-घोडनदीची लढाई-समेट-राघोबाची पटवर्धन वगैरे सरदारांवर गैरमर्जी-मिरजेचा वेढा-मोंगलाची पुण्यावर दुसरी स्वारी-पुण्याचा विध्वंस-पेशव्यांची मोगलाईवर स्वारी. डे. अ. पृ. ४८०.

**भाग दुसरा**—सन १७६३ मे ते १७६४ डिसेंबरापर्यंत. राक्षसभुवनची लढाई-मोंगलांशी तह-हैदरअल्लीचें मनोवेधक चरित्र-पेशव्यांची हैदरअल्लीवर पहिली स्वारी-रटेहळ्ळी, अनवटी, हावेरी येथील लढाया-सावनूरचें रक्षण-धारवाडचा वेढा. डे. अ. पृ. ४८०.

**भाग तिसरा**—सन १७६४ डिसेंबर ते १७६९ ऑक्टोबरपर्यंत. अनंतपूर व बिदनूर येथील लढाया-हैदरअल्लीशी तह-भोसल्यावर पहिली स्वारी-तोतयाप्रकरणाचा उद्भव-राघोबाची गोहद वगैरे उत्तरप्रांतीं स्वारी-पेशव्यांची हैदरअल्लीवर दुसरी स्वारी-शिरें-मद्दगिरी, चेनरायदुर्ग, येथील लढाया-तह-माधवराव व राघोबा याची आनंदवल्लीस भेट-धोडपची स्वारी व राघोबास कैद-भोसल्यावर दुसरी स्वारी. डे. अ. पृ. ४८०.

**भाग चवथा**—सन १७६९ ऑक्टोबर ते १७७३ ऑगस्टपर्यंत. भोसल्याशीं तह-हैदरअल्लीवर तिसरी स्वारी-कोल्हार, बाळापूर, नंदिदुर्ग वगैरे ठिकाणीं लढाया-हैदराचा गोपाळरावावर छापा-निजगलचा वेढा-पेशवे देशीं येतात-गोपाळरावाचा मृत्यु-त्रिंबकराव मामाचे पराक्रम-मोतीतलावाची लढाई-श्रीरंगपट्टणाचा वेढा-तह-बिनीवाल्यांची फत्तरगडावर स्वारी-जाटांशीं लढाई-बादशहाची स्थापना-दिल्लीची लढाई-रोहिल्यांवर सूड-पेशव्यांचा आजार व त्यांतील अनेक हृदयद्रावक प्रसंग-मृत्यु-रमाबाईचे सहगमन-नारायणरावाची पेशवाईवर स्थापना-छोटी कारकीर्द व खून. डे. अ. पृ. ६००.

**भाग पांचवा**—स. १७७३ ऑगस्ट ते १७७६ जुलईपर्यंत. बारभाईचे कारस्थान-निजामअल्लीशी लढाई व भेट-गंगाबाईची स्थापना-कासेगांवची लढाई-राघोबाचा पाठलाग-समेटाची खटपट व राघोबाचें पलायन-गुजराथची मोहीम-इंग्रजांशी लढाया-पुरंदरचा तह-कोळ्यांचा दंगा-प्रतिनिधींचा दंगा-कोल्हापूरकरांशीं लढाया-तोतयाच्या बंडाची सुरवात. डे. अ. पृ. ६००.

**भाग सहावा**—१७७६ ऑगस्ट ते स १७७८ एप्रिलपर्यंत. तोनयाच्या बंडाचा बीमोड-परशुरामभाऊंची कोल्हापुरावर मोहीम-पांडुरंगरावांची धारवाडप्रांती स्वारी-सावशीची लढाई व सैन्याची वाताहत-परशुरामभाऊ कुमकेस जातात-त्याच्या गर्नीमी हालचाली-पाळेगाराचे पारिपत्य-भाऊ व हरिपंत यांची धारवाडप्रांतीं छावणी-हैदरअल्लीवर पाचवी स्वारी-महादजी शिंद्यांची कोल्हापुरावर स्वारी-मोरोबादादांचें कारस्थान-उभारणी व चलती-कर्नाटकच्या फौजा देशी येतात. डे. अ. पृ. ६००.

**भाग सातवा**—सन १७७८ एप्रिल ते १७८४ एप्रिलपर्यंत. मोरोबादादाचे कारस्थान (उत्तरार्ध) व पारिपत्य-दरबारची डळमळ-परशुरामभाऊ स्वारीस निघतात-बेरड बंड-खोरांचा दंगा-भाऊंची सुरापुरावर स्वारी-इंग्रजांची पुण्यावर स्वारी-पराजय व वडगांवचा तह-करवीरकराचा बंदोबस्त-कित्तूरकराचें पारिपत्य-इंग्रजांशीं तिसरा बिघाड-इंग्रज गुजराथ व्यापितात-वसई व कल्याण घेतात-पुण्यावर चालून येतात-पटवर्धनांशीं निकराने लढतात-रसदेची लूट व पीछेहाट-सालबाईचा तह-स्वस्थतेचीं दोन वर्षे-काशीयात्रा-करवीरकराचा पुन्हा बंदोबस्त व तह. डे. अ पृ० ६१०.

**भाग आठवा**—स. १७८४ मे पासून १७९१ फेब्रुवारीपर्यंत-मराठे व मोगल यांच्या यादगीर येथें भेटी-टिपूचा नरगुंदास वेढा-नरगुंदकराची मर्दुमी-परशुरामभाऊ कुमकेस येतात-झटापटी-तह-टिपू दगा करून नरगुंद व कित्तूर घेतो-टिपूवर पहिली मोहीम-होळकर व बेहेरे कित्तूर प्रांती येतात-मराठे व मोगल यांच्या पुन भेटी-बदामी-अदवानी-टिपू मराठे व मोगल यास छापे घालून हैराण करितो-तह-स्वस्थतेचीं पुन. तीन वर्षे-पेशवे नाशिकास जातात-परभू ग्रामण्यप्रकरण पुन्हां उद्भवते-सोनार व वेदोक्त-टिपूवर दुसरी मोहीम-मराठे, मोगल व इंग्रज एकत्र होतात-परशुरामभाऊचा धारवाडास वेढा-निकराच्या लढाया-इंग्रजांची मर्दुमी-बागिऱ्या, पेठ, रेवणी, व खदूक यावर हल्ले. डे. अ पृ. ६००.

**भाग नववा**—स. १७९१ मार्च ते १७९६ नोव्हेंबरपर्यंत. धारवाड काबीज होतें-म्हैसूरच्या राज्यावर स्वारी-बाकी नबाबाचा पराजय इंग्रजांची श्रीरंगपट्टणावर स्वारी व पीछेहाट-इंग्रजी व मराठी लष्करांच्या भेटी-इंग्रजांचा पट्टणास वेढा-घाशीराम कोतवाल-पाटीलबावा देशी येतात-श्रीमंताची कृष्णास्नानार्थ स्वारी-साताऱ्यास महाराजांची भेट-टिपूशी तह-पाटीलबावाचा पुण्यास मुक्काम-वकीलमुतलखी-नानाशी वैमनस्य-सचिव प्रकरण-गायकवाडाची सरदारी-पाटीलबावाचा मृत्यु-अळत्याची लढाई-करवीरकरांवर मोहीम-खर्ड्याची लढाई-सवाई रावसाहेबाचा मृत्यु-बाजीरावसाहेब पुण्यास येतात-शिंद्यांचे प्राबल्य-नाना साताऱ्यास जातात-शेणवी कारभारी व पटवर्धन सरदार यांचा मिलाफ-चिमाजीआप्पाची स्थापना व छोटी कारकीर्द-नाना वाईस जातात-महाडाकडे पळतात-महाडचें कारस्थान-शेणवी व पटवर्धन यांचा पाडाव-परशुरामभाऊंस कैद. डे. अ. पृष्ठे ६००.

**भाग दहावा**—स. १७९६ डिसेंबर ते १७९८ डिसेंबरअखेर. बाजीरावसाहेबांची स्थापना—नबाब, भोसले, शिंदे, होळकर यांच्या लष्करांचा पुण्यास मुक्काम-पेशवे व शिंदे यांजविषयीं नानांचा बेभरंवसा-शिंद्याकडून नानांच्या द्रव्यहरणाची सुरुवात-नबाब, शिंदे व भोसले यांचे लंढे व समजूत-काशीराव होळकरांस सरदारीची वस्त्रें-खुन्या मुरलीधर-मल्हारराव होळकरावर छापा व त्याचा मृत्यु-नाना व शिंदे यांत द्रव्यमूलक वितुष्ट-मुकीराची दगलबाजी-नानांचा कारागृहवास-घाटगेशाहीच्या राक्षसी लीला-अब्रूदार धनिकांचा अमानुष छळ-शेणवी सरदारावर सांडसाती-शिंदे बायांचें बंड उद्भवतें-बंड जोरावतें-घाटग्याचा अमृतरावावर छापा-पेशवे व शिंदे यांत बेबनाव-सातारकर महाराजांचा दंगा-रास्त्यांची त्रेधा-परशुरामभाऊंची सुटका-नानांची सुटका-भाऊंच्या सातारकरांशी लढाया-साताऱ्या•

